# मराठी नाटकांची गंगोत्री

## अर्थात तंजावरी मराठी संगीत नाटके

संपादिका

डॉ. सरोजिनी शेंडे

एम्. ए. पीएच्डी



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई



# मराठी नाटकांची गंगोत्री

अर्थात

# तंजावरी मराठी संगीत नाटके

संपादिका
**डॉ. सरोजिनी शेंडे**
मराठी विभाग प्रमुख
(सेवानिवृत्त)
एल्फिन्स्टन कॉलेज
मुंबई ४०० ०३२




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : मे, १९८६



प्रकाशक

सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२



मुद्रक

व्यवस्थापक
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय
चर्नी रोड, मुंबई ४०० ००४



## प्रस्तावना

डॉ. सरोजिनी शेंडे यांनी संपादित केलेला "तंजावरी मराठी संगीत नाटक" हा ग्रंथ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून प्रकाशित होण्याचा आज योग आहे. श्रीमती शेंडे आपल्या ग्रंथास "मराठी नाटकाची गंगोत्री" म्हणून संबोधितात. "तंजावर येथील एक नाटक सांगलीच्या श्रीमंत पटवर्धन राजांनी पाहिले आणि त्या धर्तीवर विष्णुदास भावे यांना नाटक लिहून त्याचा प्रयोग करण्याचा आदेश पटवर्धनांनी दिला. अर्वाचीन मराठी नाटकाची सुरुवात ही मराठी नाट्यसृष्टीचे पुनरुत्थान आणि तंजावूर हे या पुनरुत्थानाचे उगमस्थान" असा पक्ष श्रीमती शेंडे यांनी मांडला आहे. अर्थात हे विधान वादातीत नसले तरी श्री. विष्णुदास भावे हे अर्वाचीन मराठी नाट्यसृष्टीचे जनक आहेत हे मात्र सर्वांना मान्य व्हावे. त्यांच्यावर तंजावरी नाटकाचा किती परिणाम झाला ही गोष्ट साहित्य नाट्याची चिकित्सा करणारे इतिहास-नाटककार ठरवितील. पण श्रीमती शेंडे यांच्या या ग्रंथामुळे यासंबंधी साधकबाधक चर्चा करणे सुलभ व्हावे. अर्थात विष्णुदास भावेंनी मराठी नाट्यसृष्टीत पदार्पण करण्यापूर्वी आणि नंतरही, तमाशा, दंढार, ललित, दशावतार इत्यादी निरनिराळ्या, स्वरूपांत मराठी नाटक अस्तित्वात नव्हते असे नाही. आणि संस्कृत नाटकांचा आस्वाद तर मराठीतील पंडित घेतच होते. पण ज्यांना आपण सुविहित जग म्हणतो त्या जगातील विद्वानांचे नाट्यसृष्टीकडे लक्ष वेधले नव्हते हे मात्र निश्चित. पुढे संस्कृत नाटकांबरोबरच इंग्रजी नाटकांचीही ओळख मराठी माणसाला झाली आणि संस्कृत, इंग्रजी आणि इतर युरोपियन भाषांतील नाटके आणि आपल्या प्रांतातील लोकनाट्य यांच्या सरमिसळीमुळे आपली नाट्यसृष्टी फुलली. नाट्य आणि नृत्य यांच्या मूळ अर्थात फरक नाही. आपल्या लोकनाट्यातूनही असेच दिसून येते. पण भरताच्या नाट्य शास्त्रावर आधारित अशा एका नाट्य–नृत्य-संगीत परंपरेची थोडीफार जोड आपल्या नाटकांना, राजे पटवर्धनांना सरफोजी भोसले यांच्या नाटकाची थोडीशी ओळख झाल्यामुळे मिळाली असेल तर तंत्र आणि इतिहास या दोन्ही दृष्टीने ही घटना महत्त्वाची मानावी लागेल. (थोडीफार म्हणण्याचे कारण, आपल्या त्यावेळच्या नाटकात नृत्य नाहीच. अभिनय आणि संगीत यांवरच आपला भर). तंजावूर मध्ये मिळालेल्या नाटकांस, संगीत आणि ज्याला आज श्रीमती रुक्मिणी अरुंडेल यांच्या संशोधन कार्यामुळे भरतनाट्य असे नाव मिळाले आहे, त्या तंजावूरच्या

मोहिनीअट्टम्, दासीअट्टम् (आणि कदाचित कुचिपुडी) इत्यादी नृत्य-प्रकारांची आणि संगीताचीही जोड आहे. १९व्या शतकापासून मराठी नाटक आणि रंगमंच यांचा जो उत्कर्ष झाला त्याला ह्या सर्व घटना कारणीभूत असणारच. प्राचीन मराठीतील लिखित साहित्य बहुधा काव्य आणि बखरीच्या स्वरूपात होते आणि ज्याला नाटच म्हणता येईल अशा लोकसाहित्याचा आविष्कार लावणी, ललित, वासुदेव, दशावतार, पोवाडे इत्यादींच्या बाहेर झाला नव्हता. त्यामुळे आपल्या जुन्या वाङ्मय परंपरेत भास, कालिदास, भवभूती, शूद्रक आदींच्याप्रमाणे काही नाटककार निर्माण झाले नाहीत आणि त्यांनी नाटकांची निर्मिती केली नाही, असा समज होता. हा गैरसमज तंजावूरच्या नाटकांचा शोध लागल्यामुळे दूर व्हावा. इतकेच नव्हे तर श्रीमती शेंडे यांची भूमिका बरोबर असेल तर आपल्या नाटकांच्या विकासाचा पूर्वापार संबंध व्यवस्थित लागावा.

पण डॉ. सरोजिनी शेंडे यांचे प्रतिपादित सर्वस्वी खरे असो वा नसो, तंजावूरच्या चोल, नायक आणि भोसले घराण्यांनी कला, संगीत आणि साहित्य यांना जे उत्तेजन दिले, इतकेच नव्हे तर आपली ज्ञान आणि कला संपदा यांची जी जोपासना केली, याबद्दल मराठी माणसाने त्यांना कृतज्ञ असले पाहिजे. तंजावूर म्हणजे तामीळ संस्कृतीचे आगर. पण या तामीळ संस्कृतीच्या केन्द्रात तेलगु, तामीळ, मराठी, कानडी आणि संस्कृत या सर्व भाषांची आणि नृत्य संगीताची जोपासना शेकडो वर्षे या राजांनी केली, ही गोष्ट निश्चितच महत्त्वाची आहे. सरफोजी भोसले यांनी तर स्वत: अनेक नाटकेही लिहिली. शहाजी राजांनीही तेच केले. यापैकी एक नाटक तर मराठी, तेलगु, तामीळ, कानडी आणि संस्कृत या पाच भाषांत आहे. ते हस्तलिखित माझ्या डोळ्यांनी पाहण्याचा योग मला आलेला आहे. डॉ. सरोजिनी शेंडे यांच्या या संपादित पुस्तकात या नाटकाचाही अंतर्भाव आहे. या बहुभाषी नाटकामुळे बहुभाषी लोकांत संप्रेषण कसे होते याचा-पण प्रत्यय येतो.

तेथील चोल, नायक आणि भोसले राजांचा हा वारसा आजही सरस्वती महाल ग्रंथालयाच्या रूपाने अस्तित्वात आहे. या ग्रंथालयाकडे महाराष्ट्र शासनाने लक्ष पुरविले पाहिजे. सरस्वती महाल ग्रंथालयाचे मालक राजे तुळजेंद्रराजे भोसले हेपण मला हेच सांगत होते. तामीळ विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. सुब्रमण्यन् यांचीही हीच चिंता दिसते. एक हजारावर अधिक मोडी दप्तरे, मोडी वाचणारे न मिळाल्यामुळे, आज या ग्रंथालयात धूळ खात पडली आहेत. अनेक मराठी नाटके तर तेलगु लिपीत आहेत. सुदैवाचा भाग एवढाच की, या सर्व हलाखीच्या

स्थितीतही गेली ३० वर्षे तंजावुरी मराठी पंडित भीमराव व तेलगु पंडित विश्वनाथ शक्य होईल तितके, या पोथ्यांवर काम करून त्यांना मराठीत आणीत आहेत. ग्रंथांची सूची करीत आहेत. इतिहासाचार्य राजवाडे तंजावूरला जाऊन आले होते. तेथील ग्रंथालयातील हस्तलिखिते त्यांनी हाताळली होती आणि मराठी माणसाच्या प्रबोधनाचे काम सुरू केले होते. त्यांची ही परंपरा डॉ. श्रीधर कुलकर्णी, श्रीमती माया सरदेसाई, डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या सारख्या अनेक पंडितांनी नाही म्हणावयास पुढे चालविली आहे. डॉ. सरोजिनी शेंडे ह्यापण याच परंपरेतील आहेत. तंजावूरमधील ३७ मराठी नाटकांचा हा संभार डॉ. सरोजिनी शेंडे यांच्या प्रयत्नामुळेच साहित्य संस्कृती मंडळाला आणि मराठी माणसाला उपलब्ध होऊ शकला. या नाटकांच्या अध्ययनातून मराठी माणसाला आपल्या परंपरेतील अनेक अज्ञात गोष्टींची जाणीव होईल यात शंका नाही.

या ग्रंथाच्या पहिल्या भागात ११ प्रकरणे आणि काही परिशिष्टे आहेत. प्रथम प्रकरणात लेखिकेने तंजावूरच्या नायक आणि भोसले राजांचा संक्षिप्त इतिहास, त्यांची नाट्यनिर्मिती तसेच त्यांच्यासंबंधी संस्कृत ग्रंथ यांच्यावर प्रकाश टाकला आहे. दुसऱ्या प्रकरणात भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा संस्कार, तर तिसऱ्या प्रकरणात या नाटकांची संस्कृत नाटकांतील रचनेशी तुलना आहे. प्रकरण ४, ५, ६ यांमध्ये तंजावूरची संगीत नृत्यनाटके, पूर्वपीठिका व स्वरूप, त्या नाटकांची वाङ्मयीन चिकित्सा आणि त्या नाटकांतील काव्याचा विचार झालेला आहे. प्रकरण ७, ८, ९, १० आणि ११ यांमध्ये राजे शहाजी, एकोजी, प्रतापसिंह, सरफोजी आणि शिवाजी यांच्या नाटकांचा विचार केलेला आहे. भाग दोनमध्ये तंजावूरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात मिळालेल्या ३७ मराठी नाटकांची श्रीमती सरोजिनी शेंडे यांना उपलब्ध झालेली संहिता दिलेली आहे.

श्रीमती सरोजिनी शेंडे यांच्या या कार्याबद्दल साहित्य संस्कृती मंडळ तर कृतज्ञ राहीलच पण सामान्य मराठी माणूसही इतिहासात आपली कृतज्ञता नोंदवील याविषयी मला शंका नाही.

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य
आणि संस्कृती मंडळ.

४२, यशोधन,
मुंबई २०,
दिनांक ७ एप्रिल १९८६.

# ऋणनिर्देश

सुप्रसिद्ध संशोधक वि. का. राजवाडे यांना तंजावर येथील रामदासी मठात 'लक्ष्मी-नारायण कल्याण' हे नाटक आढळले. ते त्यांनी इ. स. १९०६ च्या सुमारास प्रकाशित केले. राजवाड्यांचे संकीर्ण लेखसंग्रह वाचीत असताना मी ते वाचले तेव्हापासून तंजावरला जावे व सरस्वती महाल ग्रंथालयातील मराठी नाटकांची हस्तलिखिते वाचावी असे वाटत होते; योगायोगाने मद्रास सरकारने प्रकाशित केलेले कोर्वंजी पद्धतीचे सरफोजी राजांचे नाटक 'देवेन्द्र-कोर्वंजी' प्रा. वि. दा. करंदीकरांनी भेट म्हणून दिले. तेव्हा पुन्हा त्या विचाराला चालना मिळाली व मी अभ्यासाला सुरुवात केली. त्यानंतर मी नऊ-दहा वेळा तंजावरला जाऊन तेथील मराठी नाटकांची हस्तलिखिते नकलून आणली व मराठी भाषेतील तेलगू लिपीत लिहिलेली काही नाटके नकला करवून घेतली. तेथील वास्तव्यात तंजावरच्या आसपासचा परिसर अभ्यासला कारण बऱ्याच नाटकात त्यासंबंधीचे संदर्भ होते.

मुंबई महापालिकेचे उप आयुक्त श्री. एस. एम. वाय. शास्त्री हे तेलगूतील एक नामवंत लेखक व मराठी जाणणारे म्हणून ओळखले जातात. त्यांच्या सहाय्याने तेलगू लिपीत लिहिलेल्या मराठी नाटकांच्या हस्तलिखितांचे लिप्यंतर केले आणि अभ्यासाला सुरुवात केली.

हा संकल्प पुरा करताना अनेक सज्जनांचे विविध प्रकारचे सहाय्य लाभलेले आहे. सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालय, तंजावर येथील मानद सचिव श्री. पिल्ले (इ. स. १९६८), तेथील ग्रंथपाल, मराठीचे पंडित भीमस्वामी व तेलगू पंडित श्री. विश्वनाथ यांचे बहुमोल सहाय्य लाभले. नंतरच्या तंजावरच्या वेळोवेळीच्या भेटीत प्रत्येक वेळी बदललेले प्रशासक, सचिव, ग्रंथपाल व तेथील कर्मचारीवर्ग यांनी आपुलकीने सर्वतोपरी सहाय्य केले म्हणूनच तेथे जाणे व तेथील वास्तव्य हे सुखावह वाटले.

हा ग्रंथ संपन्न होताना अनेक ग्रंथालयांतील ग्रंथांचा आधार घेतला आहे. दिल्ली येथील 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा' येथील हिंदी, मराठी, इंग्रजी ग्रंथ आणि मासिके यांचा उपयोग नाटकांच्या संदर्भात बराच उपयुक्त ठरला. तेथील ग्रंथपाल सौ. शिवराम स्वामी यांनी खूप मदत केली. साहित्य ॲकॅडमीचे ग्रंथपाल

श्री. दत्ता व संगीत नाटक अॅकॅडमीचे ग्रंथपाल श्री. वर्क यांनी आवश्यक ते ग्रंथ सहाय्य केले. या सर्वांची मी ऋणी आहे.

मुंबई येथील मराठी ग्रंथ संग्रहालय, दादर येथे सर्व प्रकारचे आवश्यक ते मराठी ग्रंथ ग्रंथपाल सौ. प्रिया आठवले, श्रीमती लतिका जोशी व श्रीयुत पारायणे यांनी उपलब्ध करून देण्यात क्षणाचाही विलंब लावला नाही. त्यांचीही ऋणी आहे.

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे विश्वविद्यालय अनुदान आयोगाची योजना योग्यवेळी माझ्या वाचनात आली आणि ते मिळाल्यामुळे या योजनेचे मला चांगले सहाय्य झाले.

महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळाने हा ग्रंथ प्रकाशित करण्याचे उत्तरदायित्व स्वीकारल्यामुळे आनंद वाटला. मंडळाचे अध्यक्ष डॉ. वारलिंगे आणि सर्व सदस्य यांची मी ऋणी आहे.

शासन मुद्रण व लेखन सामग्री संचालनालयाचे संचालक श्री. आर. बी. अल्वा, उप संचालक श्री. जी. डी. धोंड, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. व्ही. आर. जोशी, उप व्यवस्थापक श्री. ए. सी. सय्यद आणि मुद्रणालयाचे सारे कर्मचारी यांनी घेतलेल्या अनंत परिश्रमांची मला जाणीव आहे. त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.

**सरोजिनी शेंडे,**
मराठी विभाग प्रमुख (सेवानिवृत्त),
एलफिन्स्टन कॉलेज, मुंबई ४०० ०३२.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला

## अनुक्रमणिका भाग पहिला—चालू

## अनुक्रमणिका भाग पहिला——चालू

# अनुक्रमणिका

## भाग दुसरा

### तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयातील मराठी नाटके

## अनुक्रमणिका भाग दुसरा—चालू

## अनुक्रमणिका भाग दुसरा—समाप्त

## प्राक्कथन

तंजावरच्या भोसले राजवंशातील व्यंकोजी राजे यांचे पुत्र शाहराज उर्फ शहाजी राजे हे विद्याव्यासंगी, विविध भाषा जाणणारे व रसिक पुरुष होते. त्यांनी मराठी, तेलगू, तामिळ, संस्कृत व हिंदुस्तानी (हिंदी) भाषांत ग्रंथलेखन केले. त्यांनी मराठीत कित्येक नाटके व पदे लिहिली. त्यांच्या नाटकांपैकी 'लक्ष्मीनारायण कल्याण' ह्याचे हस्तलिखित सुप्रसिद्ध संशोधक वि. का. राजवाडे यांना तंजावर येथील रामदासस्वामींच्या मठात आढळले. राजवाडयांनी ते इ. स. १९०६ मध्ये प्रकाशित केले. ही तंजावरी मराठी नाटकेच मराठी नाटकाची गंगोत्री होय. अप्पासाहेब पटवर्धन या सांगली संस्थानाच्या अधिपतीने, दक्षिणेतून आलेल्या भागवत मंडळीने केलेला प्रयोग पाहिला. तो त्यांना फार आवडला. म्हणून त्यांनी तशाच प्रकारचे स्वयंवर नाटक करण्यासाठी त्यांच्या पदरच्या हरहुन्नरी गृहस्थास-विष्णुदास भावे यांस सांगितले. त्या स्वयंवर-नाटकाप्रमाणे, 'विष्णुदास भावे यांनी इ. स. १८४३ मध्ये सीतास्वयंवर' या नाटकाचा प्रयोग केला. दक्षिणेत अशा प्रकारच्या नृत्यसंगीतात्मक नाटकांची परंपरा रूढ होती. त्यात कल्याण म्हणजे विवाह-नाटके विपुल होती. दक्षिणेत बहुतेक प्रसिद्ध मंदिरांना जोडून एक कल्याण-मंडप असतो. तेथे मंदिरांतील देव-देवतांचे विवाह सोहळे उत्सव प्रसंगी साजरे केले जातात ; किंवा स्थानिक प्रथेप्रमाणे त्या दैवताच्या निमित्ताने भरणाऱ्या यात्रेजत्रेच्या वेळी तो विवाह नाटचरूपाने (यक्षगान पद्धतीने) सिद्ध केला जातो. ईश्वरोपासनेचाच हा एक भाग आहे. भागवतात सांगितलेल्या नवविधा भक्तीतील असे हे नृत्यसंगीतनाटचादी प्रयोग ही साधने आहेत. कुचिपुडी, मोहिनी आट्टम, भरत नाटचम्, कथाकली वा इतर नृत्यकलांच्या निर्मितीमागे ईश्वरभक्तीचीच प्रेरणा होती. ह्याचा प्रत्यय कर्नाटक, तामिळनाडू वा उत्तर-भारत या प्रांतातील तत्कालीन व तत्सम वाङमयावरून येतो.

तंजावर येथे रामदासस्वामींचा एक मठ आहे. त्या मठाचे पहिले मठाधिकारी भीमस्वामी यांना समर्थांनी लिहिलेले एक पत्र उपलब्ध आहे. त्यात रामदासांनी दक्षिणेत रूढ असलेल्या नाटकांचा व विविध कलांचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे—

चित्रकला नाना नाटक। म्हणोनी नामें कर्नाटक।
तेथें जे राम उपासक। पत्र त्यांसी ।।

या ओवीत रामदासांनी मोठ्या कल्पकतेने 'कर्नाटक' या प्रांतनामाची व्युत्पत्तिच तेथील विविध कला व नाटके यांच्याशी जोडून दिली. हा उल्लेख तेथील भागवतमेळा व यक्षगान बायलाटा यांच्या संदर्भात असावा, असे म्हणायला प्रत्यवाय नसावा. रामदासांनी दासबोधात महाराष्ट्रातील (विशेषत: कोकणातील) दशावतारी खेळाचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे.

खेळता दशावतारी नेटके। तेथें येती सुंदर नारी।
नेत्र मोडिती कळाकुसरी। परंतु अवघे धटिंगण ।।

दशावतारी खेळांत पुरूषच स्त्रीपात्रांची सोंगे घेत असत. हा प्रकार पुढे नाटके प्रगल्भ स्वरूपात रंगमंचावर आली तरी. स्त्रियांची भूमिका पुरुषच सिद्ध करीत, असा होता.

यक्षगान व दशावतारी खेळ या प्रकारांत काही साम्य दिसते. लोकपरंपरेतून आलेल्या या दोन्ही खेळांचा प्रयोग उघड्यावर देवालयाच्या किंवा घराच्या ओसरीवर किंवा मोकळ्या पटांगणात होत असे. पूर्वी मशालींच्या उजेडात प्रयोग होत असत. त्यामुळे रंगमंच मर्यादित मापाचा असे. त्याची लांबी, रुंदी इत्यादींचा उल्लेख पुढील श्लोकात आढळतो.

पंचहस्तेन विस्तीर्णं दशहस्तेन उन्नतम् ।
अर्धचंद्रप्रमाणेन तिष्ठते रंगमंडपम् ।।

तंजावरी नाटकात मशाली धरणारे यांचा 'दिवटि' धरणारे असा उल्लेख आढळतो. शहाजीराजांच्या 'लक्ष्मीनारायण नाटकांत' पुढील संवाद आहे—

**पंतूळ :** हे दोघे जण कोलिते घेऊन का रे उभे आहेत ?

**सूत्रधार :** स्वामी, ते दिवटी उजियडासाठी ठेवले आहेत.

यक्षगान व दशावतारी खेळ यांमध्ये ईशस्तवन वा नांदी झाल्यावर गणपतीला आवाहन केले जाते. भागवत किंवा सूत्रधार, हे आवाहन करतो. दशावतारी खेळात ऋद्धि-सिद्धींसह गणपती नाचत येतो. नंतर सरस्वतीला आवाहन करतात. ती मोराच्या पाठींवर बसून येते. हा मोराचा लाकडी मुखवटा असतो. यक्षगानात फक्त गणपतीचा लाल सोंडेचा मुखवटा असतो. अशाच प्रकारे तंजावरी, नाटकात गणपतीचे नृत्य करीत आगमन होते. त्याचे वर्णन सूत्रधार पदातून व श्लोकामधून करतो. या नाटकात लेखकाच्या इष्ट देवतांचे स्तवन पुढे केलेले असते. यक्षगान व दशावतारी खेळ यामध्ये विदूषकसदृश पात्र येते. यक्षगान प्रकारात ते हनुमन्नायक व त्यांचे कोडंगी (वानर) सहचर असतात, तर दशावतारी खेळात संखासूर व म्हाबळू भट असे असतात. तंजावरी नाटकात सूत्रधार हाच यक्षगान व दशावतारी खेळांमधील भागवताप्रमाणे तोच दिग्दर्शक. सुरुवातीपासून शेवटपर्यंत रंगमंचावर तो उपस्थित राहून नाटकातील पात्रांचे आगमन, निर्गमन, पात्रांचे रूपवर्णन व प्रसंगांच्यामधील गोष्टींवरील भाष्य करीत असतो. सूत्रधार हा पुजारी, कंचुकीराय, भिकाजी नाईक, बाष्कळपंत नगुंडोदर, कट्टीकरण इत्यादी इत्यादी भिन्न नाटकांतील विदूषकसदृश पात्रांबरोबर शाब्दिक कसरती व विविध पातळ्यांवरचा विनोद करीत असतो. शहाजीराजांच्या बहुतेक नाटकांत सूत्रधार आपल्याला भागवत व दशावतारी म्हणवतो. त्याच्याबरोबर विविध वाद्यांचा मेळ असतो. एकतारी (तरि), तंबोरा (बुरु), मृदंग, झांजा व नृत्याचे बोल म्हणणारा नट्टुवा असतो. यक्षगान व दशावतारी खेळाहून अधिक प्रगत शास्त्रीय पद्धतीचे संगीत व नृत्य अंतर्भूत असते. प्रत्येक पदाचा या नाटकांत (दरु) राग व ताल दिलेला असतो. शिवाय काही ठिकाणी पुढीलप्रमाणे सुरांवलीही आढळते. 'लक्ष्मीनारायण कल्याण' या नाटकातील हे पद आहे.

(राग : सळांदरु)

(पद) जय जलदनिभ शरीर । जय जलनिधी गंभीर । जय असुरकुल संहार । जय अदि मत्स्यावतार । नी स रि रि रि सा म गा ग रि रि सा । ग म प ध ध पा । प म गा मा पा नी सरि रि सि स नि । रि सा नि ध ध पा । सानिध पा म प धा । पमगा म गा गरिसा । सल्लामु सल्लामु रे ।।

तंजावरी नाटकांचे लेखक हे संगीत व नृत्य या कलांचे विशेष जाणकार होते. त्यामुळे त्यांनी योजिलेल्या रागरागिण्या व नृत्यांचे बोल वा पदन्यास यांचा समुचित आविष्कार आढळतो. 'गोवर्धनोद्धारण' या नाटकात कृष्णाचा प्रवेश हा त्याच्या खेळकर, प्रसन्न, उच्छृंखल व्यक्तिमत्त्वाला साजेशा पदन्यासाने (सोल्लुकुट्ट) व हावभावांनी (अडुवूंनी) व्यक्त केला आहे.

कांत जनमदन संतोषें नृत्य करी. झंतरि किटतक धरि किट धि मि झु णु झनुतका। झणऊऊ ल्त धिमिकिट झंतरितहत्त इझणु घणघण तद्धि ताहत तकभिमि ताथेकित तक धळांगु।

अशा पद्धतीने प्रवेश करतो, असे वर्णिले आहे. नर्तक या बोलावर प्रथम संथ लयीत व क्रमाक्रमाने लय वाढवीत, तीनचार वेळा आवर्तने घेत असा प्रेक्षकांसमोर येतो, असे समजायचे.

तंजावरी नाटकांतील पदे ही सामान्य श्रोत्याला शब्दाशब्दांतून कळावी, अशी काहीशी सामान्य दर्जाची आढळली तरी इतर काही पदे ही काव्यात्म व नितांत सुन्दर आशयाने परिपूर्ण अशी आढळतात. या नाटकांचे प्रयोग हे यक्षगानाच्या अंगाने करण्या-सारखे असले, तरी त्यांची बांधणी ही संस्कृत नाटकानुवर्ती अशी आहे. हे प्रतापसिंह, सरफोजी व शिवेन्द्र (दुसरा शिवाजी) यांच्या नाटकांत जाणवते. शहाजीराजांच्या नाटकात तामिळ व तेलगू भाषांतील संवाद आढळतात व 'पञ्च भाषाविलास' या नाटकांत पांच भाषांचा संगम साधला आहे. परंतु इतर नाटकांत असे क्वचितच दिसते. स्थानिक नटवर्गाला हे नाट्यप्रयोग करता यावेत, म्हणून कित्येक नाटकांच्या प्रती तेलगू भाषेत लिप्यंतर करून लिहिल्या आहेत. त्यांचा तपशील पुढील पृष्ठांत आढळेल. एका दृष्टीने पाहिले तर, तंजावरच्या भोसले राजांनी आपली मातृभाषा संपन्न करून इतर भाषाभगिनींची वाङ्मयसंपदा, आदरपूर्वक स्वतः निर्मिती करून स्थानिक साहित्यिकांकडून संवर्धित करविली हे इतिहासात दुर्मिळ दृश्य आहे, असे म्हणावेसे वाटते. राष्ट्रीय एकात्मतेचा हा वारसा अनुकरणीय आहे. यामुळेच तंजावरला, सरफोजीराजांची जयंती आजही मोठ्या थाटाने साजरी केली जाते.

## तंजावरी नाटकांच्या हस्तलिखित संहितांची तपशीलवार यादी

| बाड क्रमांक | ग्रंथनाम | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके | आकार व पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १७३७ | लक्ष्मीनारायण कल्याण .. | जीर्ण<br>हाताने बनविलेला कागद<br>पाने १८ | ओळी ८ ते ९<br>अक्षरे २७ ते २९<br>सुन्दर अक्षर.<br>९"×४", ग्रंथ २१३. |
| १७३८ | लक्ष्मीनारायण कल्याण .. | हाताने बनविलेला<br>पाने २० | ओळी ७<br>अक्षरे २७ ते २८<br>९"×४", ग्रंथ २१३. |
| १७३९ | लक्ष्मीनारायण कल्याण .. | हाताने बनविलेला<br>पाने ३३ | ओळी ६ ते ८<br>अक्षरे १५ ते १७<br>८"×४", ग्रंथ २१३. |
| १७४० | लक्ष्मीनारायण नाटक .. | हाताने बनविलेला ..<br>पाने ४६ | ओळी ८<br>अक्षरे १७ ते १९<br>८"×५", ग्रंथ ४०५. |
| १७१२ | गंगाकावेरी संवाद<br>(फाटकी प्रत) .. | हाताने बनविलेला कागद<br>पाने ३३ | ओळी ८ ते ९<br>अक्षरे १८ ते २०<br>८.५"×५",<br>ग्रंथ २८० (पूर्ण). |
| १७१३ | गंगाकावेरी संवाद .. | हाताने बनविलेला ..<br>पाने १५ | ओळी ७<br>अक्षरे २८ ते ३०<br>९"×४", ग्रंथ १८२. |
| १७१४ | गंगाकावेरी संवाद ..<br>(पाने कसरीने खाल्लेली) | हाताने बनविलेला कागद<br>जीर्ण<br>पाने १२ .. | ओळ ९ ते १०<br>अक्षरे ३७ ते ४०<br>९"×४", ग्रंथ १८२. |
| १७४१ | लक्ष्मी भूदेवी संवाद ..<br>(कसर लागलेली पोथी) | पाने २० | ओळी ९<br>अक्षरे ३१ ते ३५<br>९.५"×४" ग्रंथ ३८०. |

तपशीलवार यादी—चालू

| बाड क्रमांक | ग्रंथनाम | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके | आकार व पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १७२५ | पंचभाषा विलास | .. ३ ऱ्या पानापासून पाने १५ | ओळी ९ अक्षरे ३४ ते ३५ ९.७"×४", ग्रंथ ३२५. |
| २५८१ | मृत्युंजय चिरंजीव | .. ताडपत्रावर तेलगू लिपित लिहिलेले. पाने ४४. | ग्रंथ ३५०. |
| २५७३ | प्रभावती परिणय | .. ताडपत्रावर तेलगू लिपित लिहिलेले पाने ५२. | ग्रंथ ८१६. |
| २५६७ | सुभद्रा परिणय | ... ताडपत्रावर तेलगू लिपित लिहिलेले पाने ३८ | ग्रंथ ५०८. |
| २५७२ | सुभद्रा परिणय | | ग्रंथ ५०८. |
| २५७४ | सुभद्रा परिणय .. | पाने ५० .. | ग्रंथ ८०० |
| | | **राजे प्रतापसिंहकृत नाटके** | |
| १७०७ | उषा कल्याण | ... कागद गिरणीत बनविले-ला. पाने २१ | ओळी १० ते १२. अक्षरे ४० ते ४२. १२.५"×६.५", ग्रंथ ६७०. |
| २५७६ | उषा कल्याण | .. ताडपत्र, तेलगू लिपी .. पाने ७३ | ग्रंथ ४०० |
| १७२८ | प्रबोधचंद्रोदय | .. हाताने बनविलेला .. | ओळी ६ ते ७. अक्षरे २२ ते २४ ९.८"×४.३२", ग्रंथ २८०. |
| २५६७ | प्रबोधचंद्रोदय | .. तेलगू ताडपत्रावर पाने १०१ | तीन नाटके एकत्र. ग्रंथ १५००. |
| १७२९ | मायावती परिणय | हाताने बनविलेला पाने १०. | ओळी १० ते १२. अक्षरे ३३, ३४, १२.५"×६.२". |

## तपशीलवार यादी—चालू

| बाड क्रमांक<br>१ | ग्रंथनाम<br>२ | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके<br>३ | आकार व पृष्ठ क्रमांक<br>४ |
|---|---|---|---|
| १७३६ | लक्ष्मणा परिणय | .. ३ गिरणी कागद<br>२ हाताने बनवलेला<br>पाने ४. | .. ओळी १२.<br>अक्षरे २८ ते ३०.<br>१२"×६". |
| १७३० | मित्रविंदा परिणय | .. हाताने बनविलेला<br>पाने १२. | .. ओळी १२.<br>अक्षरे ४०, ४१<br>१४"×६"<br>ग्रंथ ३००. |
| २५७० | स्यमंतकोपाख्यान<br>अनसूया उपाख्यान. | .. ताडपत्रावर, तेंलगू लिपी<br>पाने ५३. | ग्रंथ ८२६ |
| १७०८ | कृष्णजनन | .. हाताने बनवलेला, पाने ९ | ओळी ११, १२<br>अक्षरे ३५ ते ४०<br>१४.३×६.५<br>ग्रंथ २२०. |
| १७२३ | ध्रुवचरित्र | .. हाताने बनवलेला<br>पाने १९. | ओळी १०<br>अक्षरे ३३ ते ३५.<br>१२.५×६<br>ग्रंथ ३६० |
| १७२७ | पार्वतीकल्याण | .. हाताने बनवलेला<br>पाने १३. | ओळी १२ ते १४<br>अक्षरे ४६ ते ४९<br>१४×६.५<br>ग्रंथ ५००. |
| २५७५ | पार्वतीकल्याण | .. ताडपत्रावर, तेलगू लिपी.<br>पाने ४२. | ग्रंथ ६७२. |
| | रुक्मांगद चरित्र | .. ताडपत्रावर, तेलगू<br>लिपी. | |
| १७२५ | पारिजातक नाटक | .. हाताने बनवलेला<br>पाने ९. .. | ओळी ९ ते ११<br>अक्षरे ३४ ते ३८.<br>१४.५"×६.५".<br>ग्रंथ ८३. |

**तपशीलवार यादी—चालू**

| बाड क्रमांक १ | ग्रंथनाम २ | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके ३ | आकार व पृष्ठ क्रमांक ४ |
|---|---|---|---|
| १७२६ | पारिजातापहरण नाटक | हाताने बनवलेला पाने ५. | ओळी १२ ते १४ अक्षरे ४२ ते ४४ १४"×६" ग्रंथ१ ५०. |
| १७४५ | श्री. कोरवंजी उर्फ जानकी सुखोल्लास. | | ग्रंथ ३७५. |
| २५८० | रुक्मिणी कल्याण | .. ताडपत्र: तेलगू लिपी पाने ४०. | ग्रंथ २५०. |
| १७४६ | सीता कल्याण | .. हाताने बनवलेला. पाने २४. | ओळी ११ ते १२ अक्षरे ३९ ते ४२ १४"×६.५" ग्रंथ ७६०. |
| २५७९ | सीता कल्याण | .. ताडपत्र; तेलगू लिपी पाने ७५. | ग्रंथ ४५०. |
| १७३२ | ययाती चरित्र | .. हाताने बनवलेला पाने २८. | ओळी १० ते ११ अक्षरे ३३, ३४ (अक्षर सुंदर) १२.५"×६", ग्रंथ ६२२ |
| | | **राजे शरभे द उर्फ सरफोजीकृत** | |
| १७२० | देवेन्द्र कोर्वंजी | .. हाताने बनवलेला पाने २७. | ओळी ८, ९ अक्षरे ४१ ते ४३ ११.५"+४.५", ग्रंथ ५१३. |
| १७२१ | देवेन्द्र कोर्वंजी | .. हाताने बनवलेला पृष्ठे ७८. | ओळी ८ अक्षरे २९ १२"×६.३" ग्रंथ ५१३. |

**तपशीलवार यादी—चालू**

| बाड क्रमांक १ | ग्रंथनाम २ | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके ३ | आकार व पृष्ठ क्रमांक ४ |
|---|---|---|---|
| १७२२ | देवेन्द्र कोर्वंजी | .. पाने ३२ | .. ओळी १४ अक्षरे ३० ते ३३ १४"×६.५" ग्रंथ ४५०. |
| १७३१ | मोहिनी महेश परिणय | १७९८ चा कागद पाने १२४ | ओळी ७ अक्षरे १९ ते २३ ९.५"×५.५" ग्रंथ ५५२. |
| १७१७ | गंगा विश्वेश्वर पारिणय | १८२२ चा कागद. पाने ३६ | ओळी १० अक्षरे ३६ ते ३८ १४"×५.५" ग्रंथ ४००. |
| १७१५ | गंगा विश्वेश्वर परिणय | हाताने बनवलेला पाने ७६ | .. ओळी १० अक्षरे २७ २८ ९.५"×५.५" ग्रंथ ४००. |
| १७१६ | गंगा विश्वेश्वर परिणय. | हाताने बनवलेला पाने ५५ | ओळी १३ अक्षरे २७, २८. ९.५"×५.५" ग्रंथ ४००. |
| १७१० | गणेश विजय (दोन अंकी) | .. Water Mark 1810 पृष्ठे ४४. | ओळी १० अक्षरे ४२ ते ४५ १४"×६" ग्रंथ ५५०. |
| १७९१ | गणेश विजय (दोन अंकी) | हाताने बनवलेला पृष्ठे ५६ | ओळी १० अक्षरे ३८ ते ३०. |
| १७०९ | गणेशलीलावर्णव | .. जुना जीर्ण कागद पृष्ठे १३८ | ओळी : ८ ते ९ अक्षरे ३५ ते ३८ १२.३"×४.५" ग्रंथ ८५०. |

तपशीलवार यादी—चालू

| बाड क्रमांक | ग्रंथनाम | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके | आकार व पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १७३४ | राधाकृष्ण विलास | .. हाताने बनवलेला कागद पृष्ठे ६० | ओळी २० अक्षरे २० ते २२ ११"×७" ग्रंथ ३६०. |
| २५७१ | मोहिनी महेश परिणय | .. ताडपत्रावर तेलगू लिपी पृष्ठे १६. | ग्रंथ २०६. |
| २५७८ | मीनाक्षीपरिणय | .. ताडपत्र; तेलगू लिपी पृष्ठे १७ | ग्रंथ २५०. |
| १७४३ | शिवराज्युपाख्यान | .. हाताने बनवलेला कागद पृष्ठे ३८ | .. ओळी १० अक्षरे २२ ते ३५ ९"×५.५" ग्रंथ ३००. |
| १७४४ | नूतन शिवरात्री | .. १८१८ चा गिरणीचा छाप | ओळी १० अक्षरे १९ ते ४१ १४"×६" ग्रंथ ३००. |

प्रतापसिंहकृत—प्रबोधचंद्रोदय

| | | | |
|---|---|---|---|
| २५६७ | (१) सुभद्रा कल्याण नाटक—शाहराजकृत (२) प्रबोध चंद्रोदय (३) शाकुंतल—एकोजीकृत. | ताडपत्रावर तेलगू लिपी पाने १२२ | ग्रंथ १५०० तीन नाटके एकत्र. |

एकेन्द्र-उर्फ एकोजीकृत

| | | | |
|---|---|---|---|
| | शाकुंतल | .. ताडपत्र तेलगू लिपी | |

तुळजेन्द्रकृत

| | | | |
|---|---|---|---|
| | कामलाम्बा त्यागेश | .. ताडपत्र तेलगू लिपी. | |

तपशीलवार यादी—समाप्त

| बाड क्रमांक १ | ग्रंथनाम २ | शाहराज उर्फ शहाजीकृत नाटके ३ | आकार व पृष्ठ क्रमांक ४ |
|---|---|---|---|
| | | **शिवेन्द्रकृत (शिवाजी)** | |
| २५७७ | नटेश विलास | .. ताडपत्र<br>तेलगू लिपी.<br>पृष्ठे ५७ | ग्रंथ ३५०. |
| | | **त्र्यंबक ज्योतिर्विदकृत** | |
| १७३३ | राजकन्या परिणय<br>(जीर्ण) | हाताने बनवलेला<br>कागद<br>पृष्ठे २८. | ओळी ८ ते ९<br>अक्षरे १२ ते १५<br>९.५"×४"<br>ग्रंथ २२४. |

प्रकरण १ ले

# तंजावरचे नायक व भोसले राजे : भोसले राजे यांची नाट्यनिर्मिती

प्राचीन काळी विंध्याद्रीपासून कन्याकुमारीपर्यंत असलेल्या भारताच्या प्रदेशास 'दक्षिणोपथ' असे म्हणत. या प्रदेशाचे तीन प्रमुख भाग चोल, पांडय आणि चेर(केरळ) असे होते. तेथे तीन वैभवसंपन्न हिंदू राज्ये अनेक शतके नांदत होती. मत्स्यपुराणात त्यांचा उल्लेख पुढील श्लोकात आढळतो:—

तेषां परे जनपदा दक्षिणापथवासिनः।
पांड्याश्च केरलाश्चैयव चोला: कुल्यास्तथैवच ।।

दक्षिण भारतात तामिळनाडू प्रांताच्या पूर्व किनाऱ्यावरील जो भाग आहे, त्याला प्राचीन काळी 'चौल' देश म्हणून ओळखले जाई. तंजावर प्रांतास अद्यापि तद्देशीय ग्रंथामध्ये 'चोलमंडलम्' असे म्हणतात. तंजावरचे प्राचीन नाव काय होते, त्याची निश्चित नोंद आढळत नसली तरी जुन्या कागदपत्रांत 'जंजाऊर' असा उल्लेख आढळतो. त्याचा अपभ्रंश होऊन 'चंदाऊर चंजावर चंदावर तंजावर' असा नामनिर्देश झाला असावा. असे इतिहासकारांचे मत आहे. मराठवाड्याच्या कागदपत्रामध्ये तंजावरचा उल्लेख 'चंदी चंदावर' असा आढळतो. 'चंदी' हे शिवाजीराजांनी घेतलेल्या सुप्रसिद्ध 'जिजी' किल्ल्याचे नाव असून त्याच्या लगतचा जो, आंता त्याला 'चंदीचंदावर' असे नाव पडले असावे. दक्षिणेतील सुप्रसिद्ध कावेरी नदी ह्या भागातून वहाते. या पवित्र नदीचे माहात्म्य 'कावेरी पुराणात' फार वर्णिले आहे. तसेच ते संत त्यागराज यांनी पुढे उधृत केलेल्या पदात केलेले आढळते उत्तर भारतात गंगा नदीला 'क गंगामाता' वा 'गंगामैय्या' म्हणून संबोधतात. तसेच दक्षिणेत विशेषत: तामिळ भाषेमध्ये कावेरी नदीला 'अ कावेरी अम्मा' 'कावेरीमाता' असे म्हणतात.

प्राचीन काळापासून तंजावर प्रात चोलनामक राज्यांच्या अधिपत्याखाली होता. त्याच्या संबंधीचा उल्लेख अशोककालीन शिलालेखामध्ये आढळतात परंतु वस्तुस्थितो अशी आहे की चोळ राजा राजराज (९८५) यांच्यापासून पुढील इतिहास उपलब्ध आहे. दहाव्या व अकराव्या शतकात तंजावर हीच त्यांची राजधानी होती. तंजावरचे सुप्रसिद्ध 'बृहदीश्वरांचे उत्कृष्ट मंदिर राजराजाने बांधले. राजराजाने (इसवी सन ९८५ ते १०१२) या शिवमंदिराच्या पूजा व निगराणीसाठी पुष्कळ द्रव्य ठेवले. त्याचा पुत्र राजेंद्र हाही पराक्रमी व विद्वान होता. या राजाने कावेरी नदीचे अनेक कालवे बांधले. कुंभकोणम शहराजवळील 'वीरकोलनारू' हा त्यातील मोठा कालवा होता. पित्याप्रमाणेच तो रसिक व गुणग्राही होता. या राजाने व अशाच या चोळराजांनी चौदाव्या शतकापर्यंत तंजावर प्रांतात राज्य केले. त्यांच्यानंतर नायक राजे सतराव्या शतकातील उत्तरार्धापर्यंत या राज्याचे सत्ताधिश होते. इ. स. १६७४–७५ मध्ये व्यंकोजी राजेभोसले यांच्याकडे ही राजसत्ता आली . तो इतिहास पुढे पाहू :—

## (१) सा रम्या नगरी तंजावूर

तंजावरचा परिसर हा सुपीक आणि समृद्ध आहे. तो रम्य वनश्रीने नटलेला आहे. कावेरी नदीच्या सान्निध्यामुळे हा भाग म्हणजे तामिळनाडूचे 'धान्याचे कोठार' म्हणून ओळखला जातो. ह्या नदीच्या तीरावर अनेक प्रसिद्ध मंदिरे असल्यामुळे त्यांना तीर्थक्षेत्राचे माहात्म्य प्राप्त झाले आहे. तंजावूर जिल्ह्यात अशी म्हणच आहे की, कावेरीचे तीर व सावेरीचे सूर हे ब्रह्मानंदोत्पादक आहेत. 'कावेरीतटस्थितं सावेरी रागनु तम् ।'[१] ही उक्ती आपल्याकडील संगीत माहात्म्याशी सुसंगतच आहे.

वीणावादनतत्त्वज्ञः श्रुतिजातिविशारदः ।
तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं प्रयच्छति ।।[२]

सुप्रसिद्ध संतकवी त्यागराज यांनी तंजावरचे व आसपासच्या सृष्टिसौंदर्याचे तसेच तीर्थक्षेत्रांचे वर्णन [३] पुढील काव्यात केले आहे :—

(असावेरी. 'सारि वेडलिन' आदि°).

१. सारि वेडलिन ई कावेरिनि जूडरे (पल्लवी)
वारि वीरनुचु जूडकता न (अनुपल्लवी)
व्वारिगाश्रीष्टमुल नोसंगुचु
टुरमुन नोक तावुन, गर्जतमी– (चरण)
करमोक तावुन निष्ठु करुण तो
निरतमुग नोक तावुन नडुचचु
वर कावेरि कन्यकामणि

२. वेडुकगा कोकिललु ग्रोयगनु
वेडुकगा रंगेशनि जूजि, मरि ई
रेडु जगमुलकु जीवनमैन
मूडु रेंडुनदि नाथुनि जूड.

३. राजराजेश्वरी यनि पोगडुचु
जूचि सुममुल धरामरगणमुलु
पूजलिरुगडल सेयग, त्यागराज–
सन्नुराल मुद्दग.

**अर्थ :**

१. पहा, ही कावेरी नदी, भेदभाव न करता सर्वांच्या इच्छाआकांशा पूर्ण करीत मोठ्या वैभवाने पलीकडे जात आहे. कुठे मोठ्या वेगाने, तर दुसरीकडे भयप्रद गर्जना करीत, तर (तिसऱ्या) कुठे शांतपणे मोठ्या मोहक गतीने चालली आहे.

२. कोकिळांच्या मधुर पंचमात श्रीरंगनाथाची पूजा करून चौदा भुवनांचा ईश जो पंचनदीश्वर, ती त्याच्याकडे येत आहे.

३. दोन्ही तीरांवर ब्राह्मण तिची पुष्पांनी पूजा करून तिला 'हे राजराजेश्वरी' अशी आळवणी करीत आहेत.

अशा या संपन्न आणि समृद्ध परिसरात नायक आणि भोसले राजांनी वाङ्मय, संगीत, नृत्य, नाटक, चित्रकला इत्यादी ललित कलांना उत्तेजन दिले. त्यांचे संगोपन, संवर्धन केले व करविले. स्वत: या साऱ्या कलांचा अभिज्ञतेने आस्वाद घेतला व क्रियाशील राहून त्यात मौलिक भर घातली. हा सारा इतिहास व त्याचा शोध अत्यंत आनंददायक ठरावा.

## (२) नायक राजांची कलाभिज्ञता

तालिकोटच्या लढाईत (इ. स. १५६५) विजयनगरचा पाडाव झाला. तेव्हा त्या साम्राज्यातील लहान लहान प्रांत स्वतंत्र झाले. तेथील सांस्कृतिक व कला केंद्र विजय-नगरहून तंजावरला वळले व स्थिरावले. सतराव्या शतकाच्या मध्याला प्रथम नायक राजे आणि नंतर मराठे राजे यांच्या कारकीर्दीत नाटच, नृत्य व दाक्षिणात्य संगीताची भरभराट झाली.

"श्री चोलदेशाभरणं चकास्ति तन्जापुरीति प्रथिताभिधाना,
रामानदीनर्तनरङ्गशाला पुरीदरी भूपरिणीहरीणाम्"

नायक राजवंशातील रघुनाथ नायक हा अष्टपैलू राजा होता[४]. तो दाक्षिणात्य संगीताचा तज्ज्ञ जाणकार, उत्तम वीणावादक, नवीन रागांचा प्रणेता असून 'संगीतसुधा' नामक संगीतविषयक ग्रंथ त्याने लिहिला. काव्य, नाटक, साहित्य व अलंकार यात त्याला विशेष रस होता. राजचूडामणी दीक्षितांनी आपल्या 'आनंदराघव' नाटकात त्याला 'प्रबंध परमेश्वर' या बिरुदाने गौरविले आहे. (प्रस्तावना) या राजाने तेलगू भाषेत अनेक ग्रंथ लिहिले. याच्या राजसभेत सुप्रसिद्ध विद्वान यज्ञनारायण दीक्षित, राजा चूडामणी दीक्षित व वेंकट मखी या विद्वानांबरोबरच रामभद्राम्बा व मधुरावाणी या विदुषी कवयित्री होत्या. मधुरावाणीने दरबारातील स्त्री-गायिकांचे गायनचातुर्य वर्णिले आहे. रघुनाथ नायक राजाने लिहिलेले 'वाल्मीकि-चरित्र' या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यात रेखाटलेल्या उर्वशीनृत्यात रागतालाचे बारकावे लेखकाचे संगीतज्ञान दर्शवितात, तर रंभानृत्यातील अष्टस्थायिभाव, अष्टरसभाव, वीस मजरेचे संचारी भाव यातील सूक्ष्मता व नृत्यशास्त्रातील गती प्रतीतीला आणतात. रंभानृत्याला स्त्री-वादकांनी तंबुरा, स्वरमंडल, मुखवीणा, किन्नरी, ताल व मांदळ (मृदंग) इत्यादी वाद्यवृंदांची साथ वर्णिली आहे. उर्वशीच्या चतुरंगी वीणावादनात राग, ठाय, गीत व प्रबंध यांचा उल्लेख आहे.

तंजावर हे तामिळ संस्कृतीचे प्राचीन स्थान नायक राजांच्या कारकीर्दीत तेलगू वाङ्मयाचे केंद्र बनले. विजयराघव नायकाने लिहिलेले 'रघुनाथनायकाभ्युदय' हे द्विपदा काव्य सरस व रमणीय आहे. त्यात त्याने रघुनाथ नायक राजाचा दिनक्रम सविस्तर वर्णिला आहे. तसेच राजवाडा, अंतर्गृहे, संगीत, नाटच व नृत्यशाला यांचे चित्रण केले आहे. रघुनाथ नायक राजाला 'भरतविद्याधुरंधर' व 'अभिनवभोज' या अर्थपूर्ण बिरुदांनी गौरविले आहे. 'रघुनाथविलास' नावाचे नृत्य राजाच्या समक्ष केले जाई.

विजयराघव नायक (इ.स. १६३३ ते १६७३) राजाच्या कारकीर्दीत त्याने स्वत: तेवीस नाटके लिहिली व पाच द्विपद काव्ये लिहिली. त्यांच्या 'प्रल्हाद चरितमु' 'पूतनाहरणमु' 'कालियामर्दन' 'विघ्ननारायणचरितम्' 'कृष्णविलासमु' इत्यादी नाटकांचे प्रयोग होत, असे म्हणतात. या नाटकांत केदारगौळा, शंकराभरण, नीलांबरी, सावेरी, कांभोजी, घंटारवमू, जयंतसेन, मध्यमावती, सौराष्ट्रम्, भूपाळ इत्यादी रागांची योजना केली आहे.

विजयराघव नायक राजाचे मन्नरगुडीचे श्री राजगोपालस्वामी हे दैवत होते. तो स्वत:ला 'मन्नरुदास' म्हणवीत असे. त्याची उपपत्नी रंगाजाम्मा हिने 'मन्नरुदास विलासम्' व 'उषापरिणयम्' ही यक्षगाने लिहिली.

नायक राजांच्या राज्यात सतत चाललेल्या राजकीय कलहांमुळे मदुरेच्या नायकांबरोबर झालेल्या लढाईत विजयराघव मृत्यू पावला. मदुरेच्या नायकाने नेमलेला अधिकारी अलगिरी स्वतंत्र वागू लागला. विजयराघवाचा पुत्र चेंगमलदास याला प्रस्थापित करण्यासाठी आलेल्या व्यंकोजी राजे यांनी तेथील अंतर्गत सुंदोपसुंदीला कंटाळून विजापूर सुलतानाच्या मदतीने स्वत: कारभार पाहण्यास सुरुवात केली. अशा रीतीने तंजावरला भोसले घराण्याची राजवट सुरू झाली. महाराष्ट्रात शिवाजी महाराजांनी विधीपूर्वक इ. स. १६७४ मध्ये राज्याभिषेक करून राजवस्त्रे स्वीकारली. त्याच्या मागोमाग इ. स. १६७५ मध्ये व्यंकोजी महाराजांनी तंजावर येथे मराठी राजसत्ता दृढमूल केली.

## (३) मराठी नाटकाची गंगोत्री

मराठी नाट्याची नांदी ही विष्णुदास भावे यांनी इ. स. १८४३ मध्ये गायिली आणि त्यामागील प्रेरणा सांगलीचे अधिपती अप्पासाहेब सांगलीकर यांची होती; परंतु सुप्रसिद्ध संशोधक वि. का. राजवाडे यांना तंजावर येथील रामदासी मठात 'लक्ष्मी-नारायणकल्याणनाटक', ह्या नावाच्या नाटकाचे हस्तलिखित सापडले. तेव्हा राजवाड्यांनी ते प्रकाशित केले व संशोधनाला एक नवा अक्षुण्ण मार्ग दाखविला.[१] या नाटकाचे लेखक शाहूराजे हे छत्रपती शिवाजी महाराजांचे सापत्न बंधू व्यंकोजी राजे यांचे चिरंजीव होत.

राजवाड्यांनी ही मौलिक रचना प्रकाशित केल्यावर विद्वानांचे लक्ष 'सरस्वती महाल' या तंजावर येथील ग्रंथालयातील पितृधनाकडे वेधले. त्या प्रेरणेतूनच नाट्य-शताब्दीच्या निमित्ताने 'मराठी रंगभूमीचा इतिहास', खंड १ ला, भाग-१' हा ग्रंथ अभिनव 'शारदोपासक मंडळ, पुणे' या संस्थेने पुरस्कृत केला. ह्या ग्रंथामध्ये डॉ. य. गं. लेले यांनी सरस्वती महाल ग्रंथालयातील मराठी नाटकांची माहिती दिली आहे; विशेषत: शाहूराजांच्या नाट्यरचनेचा विस्तृत परामर्श घेतला आहे. त्यामुळे संशोधकांचे लक्ष ह्या नाट्यसंपदेकडे वळले.

ह्या नाटकांचा शोध घेत असता अनेकांनी विविध प्रकारच्या शंका प्रदर्शित केल्या व त्याविषयीचे कुतूहल व्यक्त केले. ही नाटके ह्या राजांनीच लिहिली आहेत की त्यांच्या आश्रित कवींनी ?[८] ह्या रचनेला नाटक असे यथार्थपणे संबोधिता येईल का ? हे नाट्यवाङ्मय म्हणजे यक्षगान–भागवतमेळा यांचा मराठी अवतार आहे का ? ह्या प्रश्नांचा ऊहापोह यथावकाश होईल. तत्पूर्वी ह्या संदर्भात तंजावर येथील भोसले

राजघराण्याचा आवश्यक तो इतिहास, त्यांची सांस्कृतिक पार्श्वभूमी व त्यासंबंधीचे संदर्भ ह्यांचा परिचय अनिवार्य ठरतो.

## (४) तंजावरचे भोसले राजे

विजयनगर येथे कृष्णदेवराजा (इ. स. १५०९–१५३०) राज्य करीत असता, त्याचा मांडलिक विश्वनाथ नायक हा चोल आणि पांडय या प्रांतांचा राजा होता. कृष्णदेव-राजांच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ अच्युत ह्याने आपला साडू चेवप्पा नायक ह्याला तंजावर प्रांताचे अधिपत्य दिले. त्यानंतर त्याचा पुत्र रघुनाथ व त्याच्यानंतर रघुनाथाचा पुत्र विजयराघव ह्या नायक राजांनी इ. स. १६६० पर्यंत राज्य केले. ह्या राजांच्या कारकीर्दीत तेलगू व संस्कृत वाङ्मयाची विपुल निर्मिती झाली. ह्या नायक राजांनी स्वत: ग्रंथरचना केली. विद्वानांना आश्रय दिला व मोठा दानधर्म केला. शेवटचा नायक राजा विजयराघव ह्याच्या मुलीला मदुरेचा राजा चोक्कनाथ याने मागणी घातली. ती विजयराघवाने नाकारली. म्हणून चोक्कनाथाने त्याच्यावर स्वारी केली. या युद्धात विजयराघव व त्याचा पुत्र हे मारले गेले. तेव्हा चोक्कनाथाने अलगिरी नामक आपल्या हस्तकाला तंजावरच्या गादीवर बसविले. त्यावेळी विजय-राघवाचा कारस्थानी चिटणीस वेंकण्णा ह्याने बाह्यत: अलगिरीशी सलोख्याचे संबंध ठेवून त्याची चिटणिशी स्वीकारली. थोड्याच दिवसांत त्याने विजयराघवाचा दुसरा पुत्र चेंगमल ह्याला गादीवर बसविण्याचे प्रयत्न सुरू केले. वेंकण्णाने विजापूरच्या अदिलशहाकडे ह्या राजपुत्राला गादीवर बसविण्याची खटपट सुरू केली व मदत मागितली. त्यावेळी शहाजी भोसल्याचे पुत्र व्यंकोजी राजे (शिवाजी महाराजांचे सापत्न बंधू) बंगळूरचे जहागिरदार होते. त्यांनाच अदिलशाने ही कामगिरी सांगितली. व्यंकोजी राजे यांनी तंजावरास वेढा घालून ते हस्तगत केले. त्यामुळे अलगिरी पळून गेला. पुढे चेंगमलचा राज्याभिषेक झाला. परंतु वेंकण्णाच्या अंतस्थ कटकटीमुळे तो आर्यालूरल पळून गेला; आणि तंजावर प्रांत व्यंकोजींच्या हाती आला. वेंकण्णाने या वेळी व्यंकोजी राजांना मदत करून स्थिरपद केले. या कालावधीत वेंकण्णाचे स्वरूप व्यंकोजी राजांच्या ध्यानात आले व त्यांनी वेंकण्णाला शिक्षा द्यावयाचे ठरविले. या गोष्टीचा सुगावा लागताच वेंकण्णा पळून गेला. अशा रीतीने नायकांची राजवट संपली. विजयनगरचा राजा दुर्बल असल्यामुळे कोणाकडूनही प्रतिकार न होता विजयी व्यंकोजी राजे तंजावरचे राजे झाले. दक्षिणेत मराठे राजांची राजवट महाराष्ट्रातील शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या सुमारासच सुरू झाली. नायक राजांची कलाभिरुची मराठे राजांमध्येही होती. त्यांनी विद्या व कला यांचे संवर्धन केले, विद्वानांना उदार आश्रय दिला, अनेक भाषांवर प्रभुत्व मिळवून भाषाविषयक उदार धोरण ठेवले. त्यांनी दक्षतेने राज्यकारभार करून प्रजेला सुखी केले.

## (५) तंजावरचे मराठे राजे आणि वाङ्मय निर्मिती

बंगळूर येथे शहाजी भोसले ह्यांच्या परिवारात विद्वानांचा भरणा असे व ते त्यांचा उत्तम रीतीने परामर्श घेत. व्यंकोजी राजे स्वत: वाङ्मयात रस घेत असत आणि त्यांना संस्कृत व तेलगू उत्तम येत असे. त्यांनी तेलगू भाषेत द्विपद रामायण लिहिले

आणि त्यांची पत्नी दीपाबाई हिने परमार्थपर स्फुट रचना केली होती. व्यंकोजी राजांच्या कारकीर्दीत जयराम पिण्डे याने "पणलिपर्वतग्रहमाख्यान" हे संस्कृत काव्य शिवाजी राजांनी पन्हाळगड घेतला, त्यासंबंधी लिहिले व "राधामाधवविलास चम्पू" ऊर्फ 'शहाजी महाराज चरित्र' हाही ग्रंथ संस्कृतमध्ये गद्यपद्यात्मक लिहिला.

व्यंकोजी राजांचा मंत्री गंगाधर मखी व त्याचे तीनही पुत्र हे सर्व विद्वान होते. त्यांनी विविध प्रकारची ग्रंथरचना केली. किंबहुना तंजावरच्या मराठे राजांच्या कारकीर्दीत (इ. स. १६७६–१८५५) संस्कृत, मराठी, तेलगू आणि तामीळ भाषांमध्ये अनेक मौलिक ग्रंथ लिहिले व लिहविले गेले. हा काल म्हणजे विद्या व कला यांच्या वैभवशाली उत्कर्षाचा होता.[८]

व्यंकोजी राजे व दीपाम्बा यांचे पुत्र शाहराज इ. स. १६८४ मध्ये राज्यावर आले. शाहराज ऊर्फ शहाजी अत्यंत शूर, राजकार्यधुरंधर, रसिक, कलाभिज्ञ, अनेक भाषाविद, कवी व नाटककार होत. शिवाय ते विविध विषयांवर संस्कृत, मराठी, तेलगू, तामीळ व हिंदी या भाषांत ग्रंथ रचणारे संगीतज्ञ व नृत्यकलेचे जाणकार होते. म्हणून त्यांना 'दक्षिणेतील भोज' म्हणून गौरविले जाते. ते ललितकलांप्रमाणे युद्धकला व राजकारण ह्यांमध्ये अत्यंत निष्णात होते. त्यांच्या जीवनावर तत्कालीन व उत्तरकालीन अनेक विद्वान कवींनी अनेक काव्यग्रंथ व नाटके लिहिली आहेत. त्यावरून त्यांच्या अष्टपैलू व्यक्तित्वाची ओळख पटते.

**(६) शाहराजासंबंधी लिहिलेले संस्कृत ग्रंथ :**[९]

(१) **शाहेन्द्र विलास :** श्री. श्रीधर वेंकटेश यांनी चरित्रपर लिहिलेले महाकाव्य.

(२) **शृंगार मंजिरी शाहजीयम् :** पेरिअप्पा कवीने लिहिलेले शाहराजाच्या प्रेम-प्रकरणावरील नाटक.

(३) **शहाराजीय :** लक्ष्मण कवी (काशी) याने आपल्या या अलंकारशास्त्रावरील ग्रंथात उदाहरणे दिलेली कवने शहाजीराजांची स्तुतिस्तोत्रे आहेत.

(४) **शहाराज सभासरोवर्णिनी :** लक्ष्मण कवि (विश्वेश्वर शास्त्रीचे चिरंजीव) यांचे स्तुतिपर काव्य.

(५) **शहाराजनक्षत्रमाला :** नारायण याने लिहिलेले स्तुतिपर काव्य.

(६) **सुमतींद्रजयघोषणा :** सुमतींद्र याने लिहिलेली बिरुदावली, गाथा, अनंतर प्रसंग व चतुःश्लोक या नावाची पाच स्तुतीपर काव्ये.

(७) **शहाविलासगीत :** धुण्डिराज व्यासांनी लिहिलेली संगीतिका.

(८) **शहाराजाष्टपदी :** श्रीनिवास यांनी लिहिलेली संगीतिका.

(९) **शहाराजाष्टपदी :** कवी 'अनाम'. हे काव्य शहाजी राजांना नायक कल्पून गीतगोविंदाच्या धर्तीवर लिहिले आहे.

(१०) **कोसलभोसलीय :** शेषाचलपती यांनी राम आणि शहाजी राजांचे श्लिष्ट शब्दांनी चरित्र रंगविले आहे. याच कवीने शहाजी राजांचे चरित्र 'शहाराजविलासम्' हे तेलगूत लिहिले आहे.

(११) **धर्मविजय :** नल्लदीक्षित ऊर्फ भूमिनाथ यांनी शहाजी राजांचे हे चरित्र लिहिले असून शहाजी राजे ह्यांना 'अभिनव भोज' असे गौरविले आहे. हा कवी रामभद्र दीक्षितांचा गोत्रज व प्रिय शिष्य होता.

(१२) **भोसलेवंशावली :** गंगाधर कविकृत.

ही सारी संस्कृत काव्ये ख्यातनाम विद्वानांनी लिहिली आहेत. ह्या ग्रंथांतील शहाजींच्या वाङ्मयीन कर्तृत्वाच्या विपुल उल्लेखांवरून शहाजी राजे व भोसलेवंशीय इतर राजांबद्दल तत्सम विधानांवरून त्यांच्या वाङ्मय निर्मितीची कल्पना येते ; आणि काही संशोधकांच्या मनातील तंजावरच्या राजांनी लिहिलेल्या नाटकांबद्दलच्या शंकेला परस्पर छेद जातो. 'सर्वे गुणा: कान्चनमाश्रयन्ते' असा प्रकार वा कोणा कवींनी धनलोभास्तव किंवा राजकृपेस्तव आपली कलाकृती ह्या राजांच्या नाममुद्रेने लिहिली असावी, असा समज निरर्थक आहे.

याशिवाय मराठीमध्ये असलेले **'राजकन्या परिणय'**, तेलगूमध्ये बालकवी मुषन्ना यांनी लिहिलेले **'लीलावती शहाजीयमु'** आणि इतर नाटके शहाजींच्या जीवनावर लिहिली आहेत.

### (७) शहाजी राजे व समकालीन ग्रंथकार :

शहाजी राजांच्या कारकीर्दीत अनेक ग्रंथकार उदयाला आले. त्यांपैकी काही ग्रंथकार स्वयंप्रज्ञेने लेखन करीत होते. ग्रंथ लेखन व ग्रंथकार यांना शहाजी राजांकडून प्रेरणा मिळाली. हा काळ वाङ्मय निर्मितीच्या दृष्टीने अत्यंत संपन्न दिसतो. शहाजी राजांच्या दरबारात त्यांच्या वडिलांपासून मंत्रीपद चालविणारे बाबजीसुत गंगाधरावधारी मरवी हे व त्यांचे पुत्र नृसिंहराय, त्र्यंबकराय व भगवंतराय हे स्वत: वेदविद्येत पारंगत होते. त्यांनी अनेक यज्ञ केले व करविले. त्यांनी पंडितांना उदार आश्रय दिला. शहाजी राजांनी अनेक पंडितांचा सन्मान करून अग्रहार दिले. विशेषत: इ. स. १६९३ मध्ये त्यांनी पंचेचाळीस पंडित व कवी यांची 'सार्वमान्य' ता गौरवून तिरुविशनल्लूर हे गाव त्यांना इनाम दिले. त्या गावाचे त्यामुळे **'शहाजीराजपुरम्'** असे नामकरण झाले.

### (८) भोसले घराण्याचा संक्षिप्त इतिहास :

शहाजी राजांनी **श्रीलक्ष्मी–भूदेवी संवाद, हरिहर विलास, पंचभाषाविलास, श्रीलक्ष्मी-नारायण कल्याण, श्री गंगा-कावेरी संवाद, मृत्युंजय चिरंजीव, सुभद्रा कल्याण, प्रभावती परिणय, गोवर्धनोद्धारण** ही मराठी व **शंकर पल्लवी सेवा प्रबंधम्** व **विष्णु पल्लवी सेवा प्रबंधम्** ही उत्कृष्ट नृत्यनाटके तेलगूत लिहिली. शहाजी राजांना पुत्र नसल्यामुळे त्यांच्यानंतर त्यांचा धाकटा भाऊ सरफोजी व त्याच्या पश्चात तुकोजी (ह्यांचा उल्लेख 'तुळाजी' असा आढळतो) ह्यांनी राज्य केले. तुकोजी राजांना संस्कृत, फारशी, तेलगू व तामीळ या भाषा उत्तमप्रकारे अवगत होत्या. त्यांनी **'संगीतसारामृत'** आणि **'शिवकामसुंदरी परिणय'**, हे नाटक तेलगूत लिहिले. तुकोजी राजांच्यानंतर तंजावरच्या गादीवर आलेले एकोजी राजे फक्त एकच वर्ष गादीवर होते. त्यांनी **'कमलांबात्यागेश परिणय'** व **'शाकुंतल'** अशी मराठी नाटके लिहिली. शिवाय **'विघ्नेश्वरकल्याण'** हे तेलगू नाटक लिहिले.

इ. स. १७४९ मध्ये यथार्थनामा प्रतापसिंह हे तंजावरचे राजे झाले. ते शूर, बुद्धिमान आणि अत्यंत कर्तृत्ववान होते. तरीही दुर्दैवाने त्यांच्या कारकीर्दीतच ह्या राज्यावर इंग्रजांचे सावट पडले. प्रतापसिंहांना साहित्य आणि संगीत यांचे फार प्रेम होते. त्यांनीं **कृष्णजनन, ध्रुवचरित्र, पारिजातापहरण, पार्वतीकल्याण, प्रबोधचंद्रोदय मायावती परिणय, मित्रविंदा परिणय, लक्ष्मणापरिणयरूपक, उषाकल्याण, सीताकल्याण,** (तेलगु लिपी), **सुभद्राकल्याण** (तेलगु लिपी), **रुक्मिणीकल्याण** (तेलगु लिपी), **शाकुंतल** (तेलगु लिपी), **स्यमंतकोपाख्यान** (तेलगु लिपी), **ययातिचरित्र, रुक्मांगद-चरित्र, श्री. कोवंजो ऊर्फ जानकी सुखोल्लास, अनसूया उपाख्यान** ही नृत्यनाटके मराठीत लिहिली आहेत.

प्रतापसिंहांचे पुत्र तुळजाजी हे निपुत्रिक होते. म्हणून त्यांनी आपल्या कुळातील मालोजीचे भाऊ विठोजी ह्यांच्या वंशातील आठवा पुरुष सरफोजी ऊर्फ शरभेंद्र ह्यांस दत्तक घेतले. तुळजाजी मरण पावले त्यावेळी सरफोजी अल्पवयीन होते. म्हणून तुळजाजीनी आपला दूधभाऊ अमरसिंह ह्याला राज्यकारभार पाहण्याची विनंती केली होती ; परंतु अमरसिंहाने सरफोजीचे दत्तकविधान रद्द करून घेण्याचा प्रयत्न केला व इंग्रजांशी सख्य करण्याची खटपट केली. त्यांचे हे सारे प्रयत्न सरफोजी राजानी मोडून काढले व अधिकारग्रहण केले. शेवटी इ. स. १७९८ मध्ये इंग्रजांनी तंजावरचे राज्य ताब्यात घेतले आणि सरफोजी राजाना राज्याचे एक-पंचमांश उत्पन्न व काही तनखा ह्यावरच संतुष्ट रहावे लागले.

सरफोजी राजाना पौर्वात्य पद्धतीचे पांडित्य व रे. श्वार्त्झच्या हाताखाली पाश्चात्य विद्यांचे शिक्षण उत्तम प्रकारे मिळाले होते. त्याना इंग्रजीचे उत्तम ज्ञान होते; विद्या-व्यासंगात रती होती, संगीतनृत्यकलांत गती होती ; असे ते रसिकाग्रणी होते. त्यानी व त्यांच्यानंतर ह्या पदावर आलेल्या राजांनी उत्तमोत्तम ग्रंथ व मौलिक हस्तलिखिते खर्चाची तमा न करता संग्रहित केली व एक उत्कृष्ट ग्रंथालय संवर्धित केले. तेच 'सरस्वती महाल' हे ग्रंथालय होय.

सरफोजी राजांनी स्वत: अनेक मराठी नृत्यनाटके लिहिली. **गणेशलीलार्णव, गणेशविजय, गंगाविश्वेश्वरपरिणय, देवेन्द्रकोवंजी, मोहिनीमहेशपरिणय, शिवरात्र्युपाख्यान, मीनाक्षीपरिणय** (तेलगु लिपी), **सुभद्राकल्याण** (तेलगु लिपी) **व राधाकृष्ण विलास** ही होत. शरभेन्द्र राजांचे पुत्र शिवेन्द्र ऊर्फ शिवाजी यांनी **नटेशविलास** हे नाटक लिहिले.

तंजावरच्या ह्या राजांच्या आश्रितांनीही काही नाटचरचना केलेली आढळते. त्र्यंबक जोतिर्विद ह्याने शहाजी राजांच्या एका प्रेमप्रकरणाचे दर्शन **'राजकन्यापरिणय'** नाटकात कवीने घडविले. कोणी 'अनाम' ने **'श्रीकोरवंजी ऊर्फ जानकीसुखोल्लास'** लिहिले, असे म्हटले असले, तरी वस्तुत: ते प्रतापसिंह यांनी लिहिले आहे.

अशा रीतीने सरस्वती महालात मराठी नृत्यनाटकांची सुमारे अडतीस हस्तलिखिते आढळतात. त्यांत **लक्ष्मीनारायण कल्याण, पारिजातापहरण व सुभद्रा कल्याण** यांची प्रत्येकी चार व दोन-दोन हस्तलिखिते आढळतात. त्यांचा साकल्याने विचार पुढील प्रकरणांतून केला आहे.

संदर्भ टिपा

१. करिकलभमुखम् : Dikshitar.

२. याज्ञवल्क्यस्मृति : १११. ६, पृ. १४९.

३. The spiritual heritage of Tyagaraja—Shri Ramanuja Chari with introductory thesis by Dr. Raghavan, Mylapere, Madras.

४. संगीत सुधा : King Raghunath Nayak. Ed. P. S. Sundaram and Pt. Subranya Shastri.

५. Tanjore as a seat of Music : Dr. S. Seetha, Madras University, Madras- 5 (1981).

६. तत्रैव pp. 9.29 to 122.

७. संकीर्ण लेखसंग्रह (ग्रंथमाला) : वि. का. राजवाडे, १९०६.

८. मराठी रंगभूमीचा इतिहास : खंड १, भाग १ :—डॉ. य. गं. लेले, मॉडर्न बुक डेपो पुणे-२ १९४३.

९. 'ही नाटके पौराणिक असून ज्या राजांच्या नावावर ती मोडतात, त्यांनीच ही रचिली असतील, असे निश्चयपूर्वक म्हणता येत नाही. कोण्या आश्रित कवीने काव्य रचावे व ते यजमानाच्या नावे घालून आपण स्वतः 'नाम' शेषही उरूं नये, हा प्रकार सनातन आहे व तसे येथे झाले असणे असंभवनीय नाही. उलटपक्षी त्या त्या नृपवरांनी ही नाट्यरचना केलीच नसेल असेही म्हणवत नाही.'

—डॉ. शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी गद्य (प्रस्तावना) जानेवारी १९४९

१०. शाहेन्द्र विलास : श्रीधर वेंकटेश अय्यावल : Ed. Dr. Raghavan, T.M.S.S.M. Library, Tanjore, 1952.

११. राधामाधव विलासचंपू : जयराम पिण्डये—संपा. वि. का. राजवाडे चित्रशाळा छापखाना, पुणे (शके १८४४).

१२. शाहेन्द्र विलास :—तत्रैव.

१३. तत्रव

१४. Chola Temples, C. Sivarama Murti, Published by the Director General, Archaeological Survey of India, New Delhi, (1960).

१५. नाट्यकविता संग्रह : कै. विष्णुदास भावे. (१९८५)

१६. मराठी रंगभूमीचा इतिहास—श्री. ना. बनहट्टी, (१९५७)

१७. तंजावरचें राजघराणें : द. ब. पारसनीस, निर्णयसागर छापखाना, मुंबई ४, (१९१२).

प्रकरण २ रे

# तंजावरी नाटकांवरील भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा संस्कार

### तंजावरी नाटकातील पूर्वरंग

भरतमुनींच्या नाट्यशास्त्रानुसार नाट्यप्रयोगाचा आरंभ पूर्वरंगाने व्हावा, असे सूत्र आहे. पूर्वरंगाचे विस्तृत वर्णन पाचव्या अध्यायात केले आहे. त्याचे एकंदर वीस घटक सविस्तर सांगितले आहेत. त्यांतील नांदी, त्रिगत, शुष्कावकृष्टा (एक प्रकारची ध्रुवा) व प्ररोचना ह्यांचा आढाळ या नाटकांच्या आरंभी दृष्टोत्पत्तीस येतो.

### नांदी

भरतमुनींनी नांदी ही आठ किंवा बारा पदांनी सिद्ध व्हावी, असे सांगितले आहे. त्यांत सर्व देवतांना वंदन असते, द्विज व राजा यांचे शुभचिंतन व नाटककाराला सुयश मिळावे अशी विनंती असते. उदा.—

आशीर्वचनसंयुक्ता स्तुतिर्यस्मात्प्रयुज्यते ।
देवद्विजनृपादीनां तस्यान्नान्दीति संज्ञिता ।।

ह्या मंगलाचरणाचा हेतू कार्य/प्रयोग निर्विघ्नपणे पार पडावा, हाच असतो. इष्टदेवतेचे, काव्यस्फूर्ती देणाऱ्या शारदेचे व विघ्नहर्त्या गणेशाचे स्तवन या नाटकांत प्रायः आढळते. त्याचा हेतू योग्य वातावरणनिर्मिती व्हावी असाही असतो.

शाहराज ऊर्फ शहाजीराजांच्या तीन-चार नाटकांच्या सुरुवातीला पुढील श्लोक व पदे आढळतात. उदा.—**लक्ष्मी-भूदेवी संवाद** नाटकात पुढील स्तवन आढळते. त्याला 'तोडचम्' किंवा 'तोडेम्' असे उल्लेखिले आहे. 'तोडचम्' म्हणजे वंदन श्लोक म्हणजे एका अर्थी नांदीच !

(१) जयजलधि गंभीर । जय सुरुचिराकार ।।
जय सकल आधार । जय रघुवीर ।।
जय शामल शरीर । जय रूपजितभार ।।
जय असुर संहार । जय जय वीरा ।।

(२) शरणु शरणु जगद्विधायका । शरणु श्रीहरिसायका ।।
शरणु शरणु शुभप्रदायका । शरणु गिरिजानायका ।।

(३) महादेवाय शंकराय मंगलं । जय महनीय चरिताय मंगलं ।
कर्पूरगौररूपाय मंगलं । कल्याण चलचापाय मंगलं ।।

शहाजीराजांच्या '**लक्ष्मी-भूदेवी संवाद**', '**हरिहर विलास**', '**लक्ष्मीनारायण कल्याण**' या नाटकांत राम वा विष्णूच्या स्तुतीपर व '**गोवर्धनोद्धारण**' मध्ये शिवाच्या स्तुतीपर रचना, तर काही नाटकांत विष्णूच्या अवतारांतील एखादा अवतार व शिव या उभय दैवतांना नमन केलेले असते. त्यानंतर गणेश व सरस्वती यांना वंदन केलेले आढळते.

**श्लोक**

वन्दितो मी एकदंताचे पाय । अनेक दंत तो मज सहाय ।
हरितसे सर्व विघ्न उपाय । दया करितो मजवरी गणराय ।।

यानंतर सरस्वती मातेचे स्मरण पुढील श्लोकात आहे—

विश्ववंदा जननी सरस्वती । वीणा पुस्तक धरी दोनी हाती ।
वंदितो चरण तिचे ध्यानातें । दया करि ते मजवरी या जनाते ।।

या कवनात गणेश कृपेने सर्व विघ्ने टळावी व शारदेच्या कृपेने काव्यस्फूर्ती होऊन ललितमधुर साहित्यकृतीची निर्मिती व्हावी, ही इच्छा व्यक्त केली आहे.

राजे प्रतापसिंह व सरफोजी यांच्या नाट्यकृतींतही अशाच आशयाचे श्लोक आहेत. प्रतापसिंहाच्या '**ययाति चरित्र**' या नाटकात गणेशस्तवन असे केले असून —

विजयवैभव मंगलदायका । निजनाम्नादभुत सौख्यविधायका ।।
गजमुखा वरदा कविनायका । तुज नमो अजि सिद्धिविनायका ।।

सरस्वती स्तवन पुढीलप्रमाणे आहे—

आतां प्रार्थू वाग्धिष्ठान वाणी ।
ध्यातां जीतें धी प्रकाशानवाणी ।।
वीणा हस्तें वाजवी रम्य वाणी ।
नाना विद्या मूळ जे कीरवाणी ।।

त्यानंतर गुरु व महाविष्णूची प्रार्थना कवी करितो.

राजे सरफोजी यांच्या '**मोहिनी महेशपरिणय**' नाटकात दीर्घ संस्कृत रचनेत शंकरस्तवन दोन पदांत केले आहे —

(१) जय शैलजारमण जय कद्रुजाभरण ।
जय विद्रुतावरण जय जगत्कारण ।।

(२) शरणु शरणु गिरींद्रजायुत शरणु निर्जरसन्नुत ।
शरणु तूं शशिशेखरामृत शरणु नन्दिनिषेवित ।।

वर उद्धृत केलेली ईशस्तवनपर नांदी झाल्यावर भरतमुनींच्या वर्णनाप्रमाणे पूर्वरंग समाप्त झाल्यावर सूत्रधाराने पारिपार्श्वकासह रंगमंचावरून जावे व स्थापकाने प्रवेश करून रंगप्रसादन करावे. त्याने नाटककाराचे नाव व माहिती सांगून प्रस्तावना

करावी. अशी व्यवस्था आरंभी असावी; परंतु कालांतराने त्याचा संक्षेप होऊन सूत्रधारच स्थापकाचे कार्य करू लागला. नान्दीचे मधुर श्लोक म्हणून तेच रंग-प्रासादनपर समजून नाटककाराचे नाव व महती सूत्रधार सांगू लागला.

(२) **'शुष्कावकृष्टा'.**[१] शुष्कावकृष्टा म्हणजे ज्या देवतेच्या निमित्ताने यात्रेचा वा उत्सवाचा प्रसंग असतो, त्या देवतेची अथवा राजाची स्तुती या गीतात असते (ध्रुवा).

(३) **त्रिगत**

नाट्यशास्त्रातील पूर्वरंगाच्या या घटकात सूत्रधार, विदूषक व पारिपार्श्वक या तिघांत संभाषण चालते. त्यात विदूषक पुष्कळसे असंबद्ध व अर्थहीन बोलतो. या प्रकारची योजना कित्येक नाटकांत आढळते. प्रामुख्याने शहाजीराजांच्या **'लक्ष्मी-नारायण कल्याण'**, **'मृत्युंजय चिरंजीव'**, **'सुभद्रा कल्याण'** व **'गोवर्धनोद्धारण'** या नाटकांत सूत्रधार, कंचुकीराय विनोदी व पुजारी किंवा अर्चक यांच्या संभाषणात असंबद्धता, ग्राम्यता व अश्लीलता यांच्या मिश्रणातून विनोद साधलेला आढळतो. कित्येक ठिकाणी अश्लील व्यंजना, तर काही ठिकाणी उघडउघड अश्लील व बीभत्स संदर्भ यांची योजना आढळते. त्याची तुलना तमाशातील संपादणी करणारा व सोंगाड्या यांच्या प्रश्नोत्तरांशी वा सवाल-जबाबांशी होऊ शकते. त्या प्रश्नोत्तरांत जाणवणारा उत्स्फूर्तपणा, तिरकस व समयसूचक उत्तर देण्याचा हजरजबाबीपणा, फटकळपणा, निलाजरेपणा व प्रासंगिक विनोद पुढील संक्षेपात्मक उदाहरणात जाणवावा.

वर उल्लेखिलेल्या चारही नाटकांत थोड्याफार फरकाने सूत्रधार, कंचुकीराय विनोदी व पुजारी वा अर्चक यांच्यातील संभाषणे वाचताना कंचुकीराय विनोदी हा संस्कृत नाटकातील वृद्ध, अंतःपुराची व्यवस्था पाहणारा अधिकारी नसून, तो विदूषकच आहे, हे ध्यानात येते. उदा.—

"**सूत्रधार** : सभासिद्धी कशी करावी रे?

**कंचुकीराय** : पाणी बांधून, तोरणे शिंपून, केळीचा खांब तोडून, मांडव मुस्तैतकर करावा.

**सूत्रधार** : अरे तसा नव्हे रे वेड्या! पाणी शिंपून, तोरण बांधून, केळीचे खांब रोवावे म्हणून सांग रे."

अश्लील व बीभत्स संभाषणाची उदाहरणे 'लक्ष्मीनारायण कल्याण' या नाटकाच्या एका प्रतीत बरीच आढळतात. राजवाड्यांनी मुद्रित करवलेल्या प्रतीत ती प्रकाशित झालेली नाहीत. त्यातील उतारे या नाटकाच्या संदर्भात पुढे येतील. बानगीदाखल संभाषणातील एक-दोन प्रश्नोत्तरे :—

**सूत्रधार** : अरे काय रे थुंकितोस?

**कंचुकीराय** : पाण्याने नाम लाविलें तरि पघळोन जातें. थुंक्याने नाम लाविलें, तरि चिकटे असतें, याकरितां थुंकतो. अरे, तू कोण रे?

**सूत्रधार** : अरे मी भागवत रे!

कंचुकीराय : धगडीच्या, भिकारचोटा, भाग्यवंत जालास तरी असे काय रे ? चादर कोठें मंदिल कोठें ? पोरखट झगा कोठें ? तूं भाग्यवंत म्हणजे काय रे ?

अशाप्रकारे ग्राम्य शिव्या, अश्लील उल्लेख, शाब्दिक सामान्य कोट्या व असंबद्ध शब्दप्रयोग करून कंचुकीराय विनोदी (विदूषक) प्रेक्षकांची करमणूक करी.

(४) प्ररोचना

भरतमुनींच्या वर्गीकरणानुसार पूर्वरंगाचे हे शेवटचे अंग होय. यामध्ये नाटकाचा व नाटककाराचा परिचय असावा असे सांगितले आहे. परंतु मान्यवर संस्कृत नाटककारांनी येथेच विशिष्ट देवतेच्या उत्सवाच्या वा यात्रेच्या निमित्ताने नाटक केले जात आहे, याचा उल्लेख आवर्जून केलेला आढळतो. नाटककाराचे नाट्यगुण, नटसंचाचे प्राविण्य व प्रेक्षकांची चोखंदळ रसिकता यांचा गौरवही या स्थळीच करून प्रेक्षकांची मने नाट्यप्रयोगाला अनुकूल केली जातात.

कालिदास, भवभूती व श्रीहर्ष या सुप्रसिद्ध संस्कृत नाटककारांच्या नाटकांत आढळणाऱ्या आमुख, स्थापना, प्रस्तावना व प्ररोचनातील उल्लेखांसारखे नाट्यविषयक, प्रसंगविशेष व नाटककारविषयक गौरवोद्‌गार आढळतात. उदा. भवभूतीच्या '**मालती माधव**' नाटकात पुढील मजकूर आढळतो :—

'अतो यदस्माकमर्पितं प्रियसुहृदात्रभवता **भवभूतिनाम्ना** प्रकरणं **स्वकृतिमालतीमाधवं** नाम तदेव तत्रभवतः कालप्रियनाथस्य पुरतः प्रयोगेण प्रस्थापयितुमुद्यताः'

किंवा—

'अस्मत्स्वामिना श्रीहर्षदेवेनापूर्ववस्तुरचनालंकृतं. . .'

असे उल्लेख आढळतात, त्याच प्रकारचे उल्लेख या नाटकात आढळतात. प्रतापसिंहांच्या '**उषाकल्याण**' या नाट्यकृतीत नाटककार, त्याची थोरवी आणि नटवर्गाचे कौशल्य यांचे पुढील उल्लेख आहेत :—

"सूत्रधार : येथे श्री प्रतापस्वामीचा शारदोत्सव पाहावया कारणे सकलविद्याविशारद शारदानुग्रहीत थोर थोर पंडितमान्य मिळाले आहेत. तरी या सभेस उचित **उषा परिणयाख्य** मुख्य नाटक नाचवून यांचे अंतःकरण संतुष्ट करावे.

कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ?

श्लोक

प्रतापराम सद्‌भक्ती विभवोद्दाम जो महा ।<br>
प्रतापसिंह राजर्षि प्रणिता यासि तो पहा ।।

आणिकही याचा प्रभाव ऐक.
धर्माची तरि साळ आश्रित जना माहेर मायेपरी।
सौजन्याप्रति जन्मभूमि करुणा साकार हे नरीं।
भक्ताची तरि आणि मुक्ति जनक ज्ञानद्रुमा बीज ही।
देवब्राह्मण पालनैकपर जो देवेंद्र साक्षान्महीं।। १ ।।

अलंकृत यशोधनी निपुण तत्त्वसंशोधनी।
पटू खलनिषेधणी पुरावितां भल्यांची धणी।
रवुत्तमशिरोमणी सतत हेचि चिंतामणी।
नराधिप शिरोमणी सकल लोकचिंतामणी।। २ ।।

**पारिपार्श्वक,** सूत्रधरा, मलाही आतां सुचतें; परंतु हा अलभ्य योग मिळाला आहे. तेंच ऐक.

श्लोक

प्रगल्भाचे मूर्धामणी सकल हे सभ्य बरवे।
प्रमेयप्राद्युन्मीं परिणय मनोरम्य मिरवे।।
प्रबंधाचा कर्ता गुणनिधी प्रतापेंदु पटुही।
अम्ही नाट्यीं ऐसा अघटित नव्हे योगचि कही।।

या श्लोकत्रयांतून नाटककार राजे प्रतापसिंह यांचा राजा व नाटककार असाच गुणगौरव, प्रेक्षकांची प्रगल्भ व रसिकवृत्ती यांची वाखाणणी व स्वतःच्या अभिनया-विषयीचा रास्त अभिमान व्यक्त केला आहे. यातील शेवटचा श्लोक वाचताना पुढील काव्यपंक्तींचे स्मरण होते :—

श्रीहर्षो निपुणः कविः परिषदप्येषा गुणग्राहिणी।
लोके हारि च वत्सराजचरितं नाट्ये च दक्षा वयम्।
वस्त्वेकैकमपीह वांछितफलप्राप्तेः पदं किं पुन-
मद्भाग्योपचयादयं समुदितः सर्वो गुणानां गणः।। ५ ।।

प्रतापसिंहांच्याप्रमाणे राजे सरफोजी यांनी आपल्या **'श्री गणेशविजय'** नाटकात पुढील उताऱ्यात गायनकुशल नट, नाटककार व चोखंदळ प्रेक्षक यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे :—

गायनकुशल नटांविषयी असा श्लोक योजिला आहे—

नाना देशनिवास भूसुर महाविद्वांस हे राजती।
वीणा वेणू मृदंग टाळ बरवे मोचंगही वाजती।
जेथें गानकलाप्रवीण हरिखें गातां भले माजती।
त्या गानें सकलाप्सरा कुशल ते गंधर्वही लाजती।।

**सूत्रधार** : (नेपथ्यास पाहून) अरे पारिपार्श्वका येथे ये.

**पारिपार्श्वक** : जी, मी सिद्ध आहे, आज्ञा करावी.

**सूत्रधार** : अगा ये पारिपार्श्वका, सकलजन मन श्रवण, नयनानंद करण्याविषयी मी आज्ञापिजेलों.

**पारिपार्श्वक** : कोणाकडून ?

**सूत्रधार** : सभ्यांकडून.

**पारिपार्श्वक** : कोण ते सभासद ?

**सूत्रधार** : येथें श्रीमद्भोसलेकुलतिलक राजाधिराज श्रीशरभेंद्र महाराजे प्रतिवर्षी क्रियमाण गणेशमहोत्सव विलोकन संतोष भरभरीत चतुरवर मिळाले आहेत ते कैसे म्हणिजे.

**श्लोक**

काव्यालंकृती नीतीनाटक महा वेदांतवेत्ते भले।
तर्क व्याकरण श्रुतिस्मृति गणीं निष्णात जे चांगले ।।
सत्साहित्य कलानिधी परगुणां जे श्लाघिती की महा।
मात्सर्यादिक दोषहीन कुतुकें येथें मिळाले पहा ।।

आणि कैसे म्हणिजे.

**श्लोक**

वाचस्पतीहूनि विशेष वक्ते।
जे कीं चतुःषष्ठि कलेसि धर्ते।
कवी सुनेत्री लसताती पाही।
अत्यंत जे आवडती नृपाही ।।

ऐशांचा अलभ्य योग घडला आहे. यास्तव या सभेस उचित गणेशविजयाभिधान अभिनव नाटक नाचवून सभ्यांस रंजन करून आपणातें कृतार्थ करूं इच्छितो.

**पारिपार्श्वक** : कोण या रसाळ ग्रंथाचा निर्माता ?

**सूत्रधार** : अगा रे पारिपार्श्वका, त्वां ऐकिला नाहीं काय ? या कलियुगीं अति प्रख्यात भोंसलेवंश. ते परंपरा सांगतो ऐक.

**आर्या**

श्री शंभू एकोजी शरभोजी राज तो महासेन।
एक शिवाजीराजा नृपति भला रामचंद्र गुणसदन।
भीम महीपती एक क्षितिपति सुगुणी वराह एकोजी।
विख्यात ब्रह्माभिधनृप शाहूजी तसाचि अंबाजी।
परशु नृपवीर बाबा मालोजी शाहजी महाज्ञाता।
संभाजी तत्भ्राता भूप शिवाजी प्रचंड रिपुहर्ता।

तुक्कोजीचा तनय प्रतापसिंहेंद्रतज्जनित तनया।
तत्सुत तो तुळजेंद्र प्रथित महीपाल भव्य गुणसांद्र।।

**सूत्रधार** : अगा ये पारिपार्श्वका, बाबाजी राजाचे ज्येष्ठ पुत्र मालोजीराजे त्यापासून साहवे पुरुष तुळजा महाराजांनीं त्या बाबाजी राजाचे कनिष्ठ पुत्र विठोजी राजापासून आठवे पुरुष श्री शरभेंद्र महाराजांस स्वीकार करून घेतले, ते परंपराही सांगतो.

अशा पद्धतीने सरफोजीराजे यांनी आपला कुलवृत्तांत प्रत्येक नाटकात उलगडून सांगितला आहे. शहाजीराजांच्या नाटकात प्रस्तावना व प्ररोचना आढळत नाहीत; फक्त नांदी व त्रिगत आढळतात.

**(५) भरतवाक्य**

या सर्व नाटकांत नाट्यवस्तूचा शेवट भरतवाक्याने होतो. त्यामध्ये, नाटककाराचे नाव, पद्‌विशेष कुलदैवताचा नामनिर्देश व नाटकातील अंकसंख्या सांगितलेली दिसते. भरतवाक्य म्हणजे सर्वांचे क्षेमकल्याण इच्छिलेले असते. उदा. प्रतापसिंह राजे यांच्या '**उषा कल्याण**' या नाटकात पुढील भरतवाक्य आढळते व सामान्यत: तोच श्लोक त्यांच्या बहुतेक नाटकांत भरतवाक्य म्हणून आढळतो.

**श्लोक**

धर्मिष्ठासि कदा विपत्ति न लगो स्वप्नांतही येकदा।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदये सद्‌बोध लोकां तया।।
श्रीमद्रामपदारविंदयुगुलीं कल्याण भाग्यप्रदा।
जोडो भक्ति उदार ते अनुदिनीं स्वानंद राज्यास्पदा।।

शहाजीराजांच्या नाटकाचे भरतवाक्य पुढीलप्रमाणे आढळते ते भरतनाट्य या नृत्यप्रकाराच्या समाप्तीला असणाऱ्या 'मंगळं' सारखे असते, इष्ट देवतेकडे मागितलेल्या सर्वांचे कल्याण आशीर्वादासारखे असते.

**मंगळं**

मंदरधरास माधवास नंदकुमरास नरहरीस।
कंदर्पजनकास कमनीय रूपास सुंदर मूर्तिस सुगुणास।
शोभाने शोभनमे भोंसल शाहजि भूपतीस।
भासुर सुख साम्राज्य देणारास श्रीपति वल्लभास।
श्रुत जन पोषकास वासव पूजितास वासुदेवास
शोभाने शोभनमे।।

इति श्रीमत् भोंसल कुळ। शाह महाराज विरचितं। गोवर्धनोद्धारण विलास महानाटकं सकल रसिक विद्वज्जन प्रीतये। सकल श्रेयसे। श्री त्यागेश सांबशिव पूर्णानंदार्पणमस्तु।।

'**मीनाक्षी परिणय**'—या सरफोजी राजांच्या नाटचकृतीचा शेवट पुढील भरतवाक्याने होतो :—

**श्लोक**

वर्षात काळी बहु मेघराशी। होऊ सदा सस्थवती धरा ही।
असो तुला लोक समस्त राजी। होऊन कल्याण परंपरा जी।।
।। श्रीमस्तु ।।

श्री भोसलकुलकलशोदधिजनित कलानिधी श्री चंद्रमौळीश्वर प्रसादलब्ध चोळ-सिंहासन संवत्संतति सुविराजमान सार्वभौममहाराज छत्रपती भूलोकदेवेंद्र शरभेंद्र भूपाळ विरचित मीनाक्षी- परिणयाभिधानं नाटकं संपूर्णम्।

श्रीरामार्पणमस्तु। श्रीरामजयम्।

वरील विविध नाटककारांच्या नाटकांतील भरतवाक्ये व नाममुद्रा यांचे सविस्तर उतारे देण्यामागील हेतू स्पष्ट आहे. तंजावरी नाटकांतील नांदी व प्रस्तावना तसेच भरतवाक्य व ग्रंथकाराची नाममुद्रा देण्याची प्रथा ही अभिजात संस्कृत नाटकांच्या परंपरेशी अतूट नाते सांगणारी आहे, हे सप्रमाण सिद्ध व्हावे.

महाराष्ट्रातील दशावतारी खेळांमध्येही मंगलाचरण, ईशस्तवन, गणेशस्तुती नंतर गणेशागमन, शारदेची स्तुती व तिचे आगमन हा नांदीसदृश भाग व शेवटी भरत-वाक्यसदृश सर्वांचे अभीष्टचिंतन हे प्रकार रूढ आहेत.

## (६) संस्कृत नाटकांतील रचनाविशेष आणि तंजावरी नाटके :

संस्कृत नाटचकृतीतील नांदी, प्रस्तावना, प्ररोचना व भरतवाक्य एवढ्याच गोष्टींचा अनुकार तंजावरी नाटकांत नाही, तर नाटकाचा प्रारंभ करताना सूत्रधार एखाद्या ऋतूचे किंवा विशिष्ट कालाचे वर्णनात्मक द्वयर्थी श्लोक म्हणतो. त्यातील सूचक अर्थ लक्षात घेऊन नाटकातील पात्र त्या अनुरोधाने भाषण करीत प्रवेश करते. उदा. 'मुद्राराक्षस'[६] नाटकातील पहिल्या अंकात सूत्रधार व नटी यांचा संवाद चालू असता सूत्रधार म्हणतो —

क्रूरग्रहः : स केतुश्चंद्र संपूर्णमण्डलमिदानीम्।
अभिभवितुमिच्छति बलात्

**(नेपथ्ये)**

आः क एष : मयि स्थिते चन्द्रमभिवतुमिच्छति ?
रक्षत्येनं तु बुधयोगः।।

सूत्रधार चंद्रग्रहणाविषयी बोलत असता त्याचा अर्थ चंद्रगुप्ताचा पाडाव असा घेऊन कौटिल्य (चाणक्य) रागाने पडद्यातूनच संतापाने गर्जना करतो, 'मी जिवंत असता चंद्रगुप्ताच्या पराभवाची भाषा कोण बोलतोय ?'[१]

अशाच क्लृप्तीचा उपयोग काही तंजावरी नाटकांत आढळतो. सरफोजी राजांच्या 'गणेश विजय नाटक' या नाटकात सूत्रधार वर्षाऋतूचे वर्णन एका श्लोकात करतो–

नाटचक्रिया विलसते बहु नीलकंठी। हर्षोत्करे सरसचातक वेलकंठी,
संतोषुनी सुरमणी कलकंठकंठी। आलिंगिता सुदृढ त्या निजनाथ कंठी ।।
वर्षेनियां शरगणासि पर प्रतापा। वारोनियां विलसतो घनराज हा पां
विद्युत्सु भूषण विभूषित भव्यदेहीं। उंचावला जनसुखपत यासि पाहीं ।।

(नेपथ्यामध्ये) अहो फार संतोष, फार संतोष, इंद्र कोठें कोठें?

इंद्राचा सारथी मातली सूत्रधाराने केलेले वर्षाऋतूचे वर्णन ऐकून त्याला ते इंद्राचेच वर्णन वाटते व तो त्याचा शोध घेण्यासाठी येत रंगमंचावर प्रवेश करतो. नाटचवस्तूचा संबंध प्रस्तावनेशी असा अलगद जोडून दिलेला कित्येक नाटकांत आढळतो.

तंजावरी नाटकांचा रचनेच्या दृष्टीने विचार करता, त्यांतील बहुसंख्य नाटके एकांकी आहेत. प्रतापसिंहाचे '**प्रबोधचंद्रोदय**' व सरफोजी राजांची '**मोहिनी महेश परिणय**', '**गणेशलीलार्णव**', '**मीनाक्षी परिणय**' व '**देवेन्द्र कोवजी**' ही नाटके अनेक अंकी आहेत. त्यांत संस्कृत नाटकांत आढळणारे दोन अंकांच्या मध्ये प्रवेशक, विष्कंभक व मिश्रविष्कंभक यांचा अंतर्भाव नाही; परंतु ती तीन, चार, पाच वा सहा अंकांत विभागलेली आहेत.

## (७) तंजावरी नाटकांचे संविधानक

रामायण, महाभारत, भागवत, पुराणे व कथाकल्पतरू या ग्रंथांतील शिव, राम व कृष्ण या देवतांच्या व ध्रुव, रुक्मांगद, राधा इत्यादी ईश्वरभक्तांच्या जीवनावर आधारित कथांचे आयोजन ह्या नाटकांत प्रामुख्याने आढळते. संस्कृत नाटिकांपैकी **मालविकाग्निमित्र, रत्नावली, प्रियदर्शिका** इत्यादींमध्ये आढळणारी अंतःपुरातील लहानमोठी वादळे व त्या प्रकारचे संघर्ष, सवतीमत्सर इत्यादी विषय इथे आढळतात. ही बहुसंख्य नाटके विवाहनाटके (परिणय किंवा कल्याण नाटके) असल्यामुळे त्यांत नायक-नायिकांचे परस्परांवर असलेले उत्कट प्रेम, त्यात आलेली लहानमोठी विघ्ने, त्यामुळे दारुण विरहावस्था, दूतीने आणलेले निरोप, विघ्नांचा परिहार, वा कुठे लहानसे कपटनाटच व मीलनात होणारा गोड शेवट असे स्वरूप त्यांना प्राप्त झाले आहे. या नाटकांत कुठेही भावनांचा ताण नाही वा कोणत्याही स्वरूपाचा तीव्र संघर्ष नाही. दोन घटका निर्मल व निर्भेळ करमणूक हेच या नाटचप्रयोगांचे उद्दिष्ट दिसते. 'जनमनश्रवणनयन आनंद' द्यावा असे जे आपल्या नाटचारंभी म्हटले आहे, तोच हेतू या नाटच-सृष्टीमागे आहे, असे स्पष्ट होते. यासाठीच नाटचसंवादात सहज वाचता येण्याजोगे श्लोक, आर्या, वसंततिलका, शार्दूलविक्रीडित इत्यादी वृत्तबद्ध रचना यांची योजना आढळते. त्याबरोबरच शास्त्रीय संगीत, नृत्त व नृत्य आणि विविध रसपूर्ण अशी कथानके यांचा सुरेख संगम साधला आहे.

## संदर्भ टीपा

१. नाटचशास्त्र : भरत

२. रस-भाव-विचार : र. प. कंगले, महाराष्ट्र साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई-३२ (१९७४).

३. मालती माधव : भवभूति Ed. Prof. N. G. Suru, अंक पहिला

४. श्रीहर्ष.

५.

६. मुद्राराक्षस : अंक १–६.

७. मीनाक्षी (परिणय) कल्याण : शरभेन्द्र महाराज (हस्तलिखित).

## प्रकरण ३ रे

# संस्कृत नाटकातील रचनाविशेष आणि तंजावरी नाटके

### (१) तत्कालीन व पूर्वकालीन संस्कृत नाटके

तंजावरी नाटकांची कथावस्तू, व्यक्तिचित्रण, विशिष्ट प्रसंगवर्णने इत्यादींचा मागोवा घेताना तत्कालीन वा पूर्वकालीन संस्कृत नाटकांचा परामर्श आवश्यक ठरतो. विशेषतः **पार्वतीकल्याण, सीताकल्याण, ययाती चरित्र, शाकुंतल, प्रबोधचंद्रोदय,** इत्यादी नाटकांवर साक्षात व इतर नाटकांवर अप्रत्यक्ष रीत्या पूर्वसुरींचे संस्कार जागोजागी आढळतात. काही ठिकाणी आशयातील सादृश्य आढळते, तर काही ठिकाणी कल्पनाविलासातील सारखेपणा जाणवतो; उदा. रामभद्र दीक्षितांनी लिहिलेल्या '**जानकी परिणयम्**' नाटकात विश्वामित्र ऋषींचा शिष्य देवव्रत हा विश्वामित्रांच्या आश्रमाचे वर्णन पुढील शब्दांत करतो :—

शुंडाग्रेण सलीलमेष कलभो वक्रान्मृणालोज्ज्वलं
जृंभारंभविकस्वरान्मृगपतेर्दंष्ट्राकुरं कर्षति ।
एषा वत्सतरीच मातरि तृणान्यतुं गतायां क्वचित्
द्वीपिन्यावनकंदरस्थितिजुषः स्तन्यं पयश्चुपति ।।

या श्लोकाचा संस्कार राजे शरभेन्द्र ऊर्फ सरफोजी यांच्या **मोहिनीमहेशपरिणय** या नाटकातील तपोवनाच्या वर्णनावर प्रतिबिंबित झालेला आढळतो. उदा.—

हरिणशृंग तळीं हरि खाजवी ।
वदन तो हि मुख स्थिर दाखवी ।।
उरग मुंगुसयुग्म परस्परें ।
समुख खेळति उन्दिर मांजरें ।।

या दोहोंतील आशयसादृश्य उघडउघड जाणवते. त्या दृष्टीने विचार करण्यासाठी मध्ययुगीन नाटककार व नाटके यांचा परिचय स्थूलतः करून घेणे आवश्यक आहे. तेव्हा ज्या नाट्यकृतीचा संस्कार संभाव्य वाटतो त्यांचा परिचय उचितच ठरतो.

### (२) संस्कृत नाट्यसृष्टी

नीलकंठ दीक्षितांचे शिष्य रामभद्र दीक्षित यांनी संस्कृत भाषेत **जानकी परिणय** हे नाटक लिहिले. ते शृंगाररसप्रधान असून त्यात करुण व वीर हे रस अंगभूत आहेत.

(१) केरळचे राजे कुलशेखरवर्मन यांनी (दहाव्या शतकाचा उत्तरार्ध ते बाराव्या शतकाच्या पूर्वार्धातील असावेत) **तापती संवरण** हे सहा अंकी नाटक कुरुराजा 'संवरण' व सूर्यकन्या 'तापती' यांच्या प्रेमसंबंधावर रचले आहे. तापती ही वशिष्ठ ऋषींच्या सहाय्याने बारा वर्षे आश्रमात होती. प्रथम

प्रियकराचे स्वप्नात दर्शन, शिकारीला राजा निघाला असता झालेली भेट, विरहताप व भावनोत्कट अवस्था, मीलन, त्याग व शेवटी पुनर्भेट असा हा कथाभाग आहे. त्यात बराचसा दैवी व चमत्कारपूर्ण घटनांचा समावेश आहे.

(२) **सुभद्राधनंजय** हे त्याच राजाचे पाच अंकी नाटक आहे. कृष्णभगिनी सुभद्रा व अर्जुन यांची प्रेमकथा हा या नाटकाचा विषय आहे.

कवी रुद्रदेव याने **ययातिचरित्** हे नाटक लिहिले. या सात अंकी नाटकात ययाती व शर्मिष्ठा यांचे प्रेम व शेवटी देवयानीचे सांत्वन असा महाभारतातील कथाभाग आला आहे.

साहित्यशास्त्रकार विश्वनाथ (इ.स. १३१६) याचे **सौगन्धिकाहरण** हे नाटक व्यायोग स्वरूपाचे असून हनुमान व भीम यांचा संवाद १४५ श्लोकात व गद्यात असा आहे. द्रौपदीला हवे असलेले सुवर्णकमळ आणण्यासाठी भीम गेला आहे तेथे त्याची व हनुमानाची भेट होते व संवाद होतो.

वत्सराज हा, राजा परमार्दिदेव (इ. स. ११६३ ते १२०३) याचा प्रधान. याने अनेक प्रकारची नाटके लिहिली. त्यात **रुक्मिणीहरण** हे व्यायोग पद्धतीचे रूपक आहे.

महाकवी बाणभट्ट नव्हे वामनभट्ट बाण (सुमारे इ.स. १४०० च्या सुमारास) याचे **पार्वतीपरिणयम्** हे नाटक लिहिले.

अर्जुनदेवाची प्रशस्ती करण्यासाठी लिहिलेले नाटक **पारिजातमंजरी** मदन कवीने जिवंत राजाच्या स्तुतीपर लिहिले. गुजरातच्या चालुक्य राजाची कन्या 'पारिजात-सुंदरी' ही या नाटकाची नायिका गुजरात जिंकल्यावर अर्जुनदेवाची राणी झाली.

**पारिजातमंजरी** या नाटकाच्या धर्तीवर त्र्यंबक ज्योतिर्विद या कवीने **राजकन्या परिणय** हे नाटक शाहराजांना नायक व काश्मिरच्या राजकन्येला नायिका कल्पून रचले आहे.

### (३) पूर्वकालीन व समकालीन संस्कृत नाटकांचे तंजावरी नाटकांवरील संस्कार

प्रथमच उध्दृत केलेल्या **जानकीपरिणयम्**मधील श्लोकांचे प्रतिबिंब सरफोजी राजांच्या **मोहिनीमहेश** नाटकातील श्लोकांमध्ये आढळते. तसेच त्या नाटकातील **(जानकी परिणय)** कपटवेषाची कल्पना प्रतापसिंहाच्या **सीताकल्याण** नाटकात मूळ आशयासह आढळते सीतेच्या प्राप्तीसाठी रावण आतुर असतो. तेव्हा त्याचा एक सचिव विद्युज्जिव्ह त्याला. रामवेषात जाऊन सीतेला वश करावे, असे सुचवतो. तेव्हा रावण म्हणतो, 'साऱ्या त्रिभुवनावर माझी सत्ता! तो मी धरीन लघुनरार्थक सोंग खोटे' हे मला मृत्युपेक्षाही भयंकर वाटते. शेवटी, तो रामवेषाने विश्वामित्र ऋषींच्या आश्रमाभोवतीच्या बागेत फिरत असतो. त्यावेळी रामचंद्राला मोहित करण्यासाठी त्याची भगिनी शूर्पनखा सीतावेषाने तिथेच फिरत होती. तिच्याकडे मोहाने पहात असता, त्यांची मायावी रूपे गळून पडतात. तेव्हा ती दोघे लज्जित होतात व दुःखी होऊन परत जातात.

हा सारा नाट्यात्मक भाग संस्कृत नाटक **जानकी परिणय**मध्ये पाचव्या अंकात आहे. तो सारा तसाच प्रतापसिंहाने आपल्या नाटकात (**सीता कल्याण**) घेतला आहे. फक्त मूळ नाटकात रावण नसून त्याचा एक विराध नामक मंत्री सीतेला पळविण्यासाठी फिरत होता. प्रतापसिंहाने तेथे रावणाची योजना करून तो नाट्यांश अधिक नाट्यपूर्ण केला आहे.

प्रतापसिंह राजांच्या **पार्वतीकल्याण** या नाटकाचे संविधानक महाकवी कालिदासाच्या **कुमार संभव** या महाकाव्याच्या व सोळाव्या शतकातील वामन बाणभट्टाच्या **पार्वती परिणयम्** या नाटकाच्या आधारे लिहिले असावे, असे जाणवते. काही प्रसंग व व्यक्तिचित्रणे यात स्वाभाविकच फरक आहे. उदा. **पार्वती परिणय** या संस्कृत नाटकात इंद्राने मदनाला शिवाला प्रेममोहित करण्यासाठी पाचारण केले; तेव्हा आपल्याला कोणत्या कार्यासाठी निमंत्रित केले आहे, हेही न विचारता, मदन गर्वाने बढाई मारतो—

'दनुजो वा मनुजो वा मुनिरपि वा मुग्धचन्द्रचूडो वा।'[३]

पार्वती परिणय–अं. २

परंतु तत्काल त्याच्या लक्षात येते की, आपली वल्गना उचित नाही. तो म्हणतो–– 'अहमात्म प्रशंसा परवशः परमेश्वरमपि सामान्यवृत्त्या पर्यजीगणनम्'। (मी माझ्या आत्मस्तुतीत गढून जाऊन प्रत्यक्ष शिवशंकराला सामान्याप्रमाणे मानले ?)

प्रतापसिंहाच्या **पार्वतीकल्याण** नाटकात चितारलेला मदन नम्रपणे इंद्राला म्हणतो, शिवासारखा महायोगी ! त्याला मी माझ्या पुष्पधनुच्या नाजूक बाणांनी काय जिंकणार ?—

'तो माझ्या बालदंडाहुनि मृदु विशिखें जिंकवे केवि दिंडा'।

हे ऐकून इंद्र त्याला प्रेमाने थोपटतो व त्याचा आत्मविश्वास जागा करतो आणि त्या दुष्कर कार्यासाठी त्याला तयार करितो.

याच संस्कृत नाटकाच्या चौथ्या अंकात (आणि **कुमार संभवाच्या** पाचव्या सर्गात) अत्यंत दुर्घट तपश्चर्या करणाऱ्या पार्वतीची परीक्षा घेण्यासाठी वृद्ध ब्राह्मण वेषात महादेव येतो. मुद्दामच तो पार्वतीसमोर यथेच्छ शिवनिंदा करितो. पार्वतीला ती निंदा ऐकणे असह्य होते म्हणून ती रागावते व ती दुसरीकडे जायला निघते. तेव्हा महादेव प्रकट होऊन तिला दर्शन देतो. प्रतापसिंहांच्या नाटकात हा प्रसंग अधिक नाट्यपूर्ण उतरला आहे. वृद्ध ब्राह्मणरूपी शिव जेव्हा शिवनिंदा करितो, तेव्हा पार्वती क्रुद्ध होते. तेव्हा तो म्हणतो, 'तू माझ्याशी विवाह कर. मी त्या पुराणपुरुषापेक्षा अधिक चांगला आहे. वृद्ध च्यवन ऋषीबरोबर सुंदर राजकन्या सुकन्या हिने नाही का विवाह केला ? तसा तू कर'. तेव्हा क्रोधाविष्ट पार्वतीला पाहून शिव आपल्या खऱ्या स्वरूपात दर्शन देतो.

अशा रीतीने संस्कृत नाटकांचा प्रभाव भोसले राजांनी लिहिलेल्या मराठी नाटकांवर स्पष्टपणे जाणवतो. नाटकातील संविधानक, व्यक्तिचित्रण, संघर्ष व वातावरण इत्यादी

बाबतीत त्यांनी घेतलेले ऋण प्रकट होते. या ग्रंथातील दुसऱ्या प्रकरणात म्हटल्याप्रमाणे तंजावरच्या राजसभेत अनेक संस्कृतज्ञ विद्वान् असत. बहुतेक राजांना संस्कृत व इतर देशी भाषा चांगल्या अवगत होत्या. वाङ्मयाची चांगली जाण व साहित्य-निर्मितीची आवड होती. अनेक ललितकलांत त्यांना रती आणि गती होती. भोवतालच्या लोकजीवनाचे त्यांना भान होते. म्हणूनच भागवत मेळा, यक्षगान, कुचिपुडी थेरुकुथू (street play) मोहिनी अट्टम् इत्यादी इत्यादी भोवतालच्या नाट्यकलेचे रूपनिर्मितीच्या दृष्टीने स्वीकारले. शहाजी राजांच्या नाट्यसृष्टीत हे प्रामुख्याने जाणवते, तर प्रतापसिंह, सरफोजी व शिवाजी (दुसरा) यांची नाट्यनिर्मिती भरतप्रणीत नाट्य-शास्त्राच्या अंगाने जाणारी ठरावी.

संदर्भ टिपा

१. The Sanskrit Drama: A. B. Keith.
संस्कृत पंडित कीथ यांच्या मते वामनभट्ट बाण इ.स. १५०० च्या सुमारास होऊन गेला.

२. दशरूपक :

३. पार्वतीपरिणम : वामन बाणभट्ट

## प्रकरण ४ थे

# तंजावरची संगीत नृत्यनाटके पूर्वपीठिका व स्वरूप

### (१) भोसलेराजांची नाट्यकला

मराठी रंगभूमीची बीजे महाराष्ट्रात मध्ययुगापासून रूढ असलेल्या दशावतारी खेळ, ललिते, गोंधळ इत्यादी प्रकारांत आढळतात. रामदासांच्या दासबोधातील दशावतारी खेळ (दास. ६–८–११) करणाऱ्या नटाचे वर्णन ह्या दृष्टीने लक्षात येते. ह्या प्रकारचे प्रयोग वा खेळ हे धार्मिक भावनेतून व बहुश: धार्मिक सण वा उत्सव-प्रसंगी केले जात. त्यामुळे जनसामान्यांची करमणूक करता करता त्यांची भक्तिभावना जागृत होई, जोपासली जाई. त्यामुळे भक्तिपंथाचा उदय झाल्यावर भारताच्या निरनिराळ्या प्रांतांत अशा प्रकारचे उपक्रम सुरू झाले. त्या दृष्टीने त्या त्या प्रांतातील लोकजीवनातून गीत, नृत्य, लोकनाट्य, संगीत हे सिद्ध झाले. शहाजी राजांचे चिरंजीव व्यंकोजी आणि त्यांचे वंशज या भोसले राजांनी तंजावर येथे इ. स. १६७५–१८५५ पर्यन्त राज्य केले. ह्या राजांनी नायक राजांची परंपरा अनेक क्षेत्रांत चालविली. हे भोसलेराजे विद्वान, बहुश्रुत, व्यासंगी व कलाविद होते. त्यांना मराठी इतक्याच इतर दाक्षिणात्य भाषा — विशेषत: तेलगू आणि तामीळ — चांगल्या अवगत होत्या. त्यामुळे त्या भाषांतील वाङ्मयाचा संस्कार त्यांच्या कलाकृतींतून स्पष्ट दिसून येतो. त्या दृष्टीने त्यांनी लिहिलेल्या नृत्यनाटकांचा विचार करण्यापूर्वी दाक्षिणात्य नृत्यनाटकांच्या व त्यापूर्वी उपलब्ध असलेल्या परंपरेचा विचार प्रस्तुत ठरतो.

### (२) नृत्यनाट्याची परंपरा

राजशेखर (दहावे शतक) : ह्या नाटककाराने आपल्या **कर्पूर मंजरी**' ह्या नाटकाच्या प्रस्तावनेत असे नमूद केले आहे की, हे '**सट्टक**' आहे; ह्याचा नृत्यातून प्रयोग करावयाचा आहे. '**सट्टकं नाटयितव्यम्**'

**सट्टक** ह्या नृत्यनाटिकेत अंक वा प्रवेशक, विष्कंभक इत्यादी नाट्याला खंड पाडणारे काहीही नसते. त्याची भाषा प्राकृतच असते. ह्या माहितीत विश्वनाथाने आणखी नोंद केली आहे, आपल्या '**साहित्यदर्पण**' या ग्रंथात तो म्हणतो, **सट्टकात** अद्‌भुत रसात्मकता व भावनात्मकता ह्यांचे मिश्रण आढळते. नाटिकेप्रमाणेच **सट्टकात** राजाच्या अंत:पुरातील प्रेमप्रकरणाचे कथानक असते. राजा अंत:पुरात, संकटकाळात आश्रय घेतलेल्या गुप्तवेषधारी राजकन्येच्या प्रेमपाशात पडतो. प्रेमसाफल्यासाठी त्याने अनेक डावपेच लढवलेले असतात. तशाच एखाद्या प्रसंगी ज्येष्ठ राणी त्याला अवचित पकडते. मग तिचा रुसवा, दोन्ही प्रेमिकांची दयनीय स्थिती हा **सट्टकाचा**

नाटचपूर्ण भाग असतो. शेवटी ज्येष्ठ राणी राजाला क्षमा करते व विवाहाला संमती देते.

उपरूपकांपैकी **सट्टक** हा नाटचप्रकार दक्षिण भारतीय नृत्यनाटिकांचा पूर्वगामी असावा. 'सट्टकं प्राकृताशेषपाठ्यं स्याद् प्रवेशकम्'।

## (३) दक्षिण भारतीय नृत्यनाटच

दक्षिणेतील शिलालेखांमधून असे उल्लेख आढळतात की, तंजावरचा चोळवंशीय नृप राजराजा [२] ह्याने बृहदीश्वराच्या मंदिराशी संलग्न असलेल्या चारशे देवदासी ठेवल्या होत्या. देवालयाच्या चारही बाजूंच्या रस्त्यांवर त्यांना राहण्यासाठी विनामूल्य घरे दिली होती आणि देवालयाच्या उत्पन्नातील काही जमीन त्यांना चरितार्थासाठी म्हणून दिली होती. त्या जमिनीवर सारा आकारला जात नसे.

दक्षिण भारतात परंपरेने चालत असलेली सुरुवातीची नृत्यनाटचे म्हणजे **शिवलीला नाटचम्** ही होत. ही नाटके शिवासंबंधीच्या पौराणिक कथांवर आधारलेली असत. दहाव्या शतकातील शिलालेखातील उल्लेखांवरून इतरही धर्मपंथांच्या नृत्यनाटचांचा 'ब्रह्ममेळा' असा निर्देश आढळतो. पुढे वैष्णवांनी शैव संप्रदायावर मात केली. त्यामुळे ह्या नाटचप्रकारात नवनवीन कथा आल्या आणि नृत्यांची व नृत्य प्रकारांची वाढ झाली. विष्णूच्या दहा अवतारांतील कृष्ण व त्याची भगवद्गीता फारच लोकप्रिय झाली. त्यामुळे कृष्णजीवनावर अनेक नृत्यनाटचे कवींनी रचली. ह्या भक्तीसंप्रदायातील भक्तांना आंध्र प्रांतात भागवतुलू आणि कर्नाटकामध्ये भागवत म्हणतात. भक्तिपंथाचा प्रसार व प्रचार करण्यासाठी ह्या भक्तांनी कविता, पदे, संगीत, नृत्य व नाटक ह्या माध्यमांचा उपयोग केला. त्यातूनच आंध्रमध्ये कुचिपुडी, तर कर्नाटकात भागवत मेळा नाटक उदयाला आले. त्यांची कथावस्तू ही वैष्णवपंथी असे व भाषा प्रामुख्याने तेलगू असे.

परंपरेने सिद्धेंद्र योगी यांना नाटचाचे प्रवर्तक म्हणून ओळखतात. ते भगवान कृष्णाचे परमभक्त होते. भगवन्तांनी त्यांना एकदा दृष्टांत दिला आणि '**पारिजातापहरण**' ह्या कथावस्तूवर नाटक लिहिण्याचा आदेश दिला. नाटक लिहून झाल्यावर त्यांना प्रश्न पडला की ह्याचा प्रयोग कसा काय करावा? ह्या विवंचनेत असताना ते कुचेलपुरम् ह्या गावी आपल्या श्वशुरगृही आले. कृष्णातीरीच्या ह्या गावी अनेक कृष्णभक्त होते. त्यांनी मोठ्या उत्साहाने ते नाटक बसविले आणि दर वर्षी कृष्णाष्टमीला ते त्याचा प्रयोग करू लागले. हे नाटक धार्मिक समारंभाचे एक आवश्यक अंगच बनले. इ. स. १६७५ त गोवळकोंड्याचा नबाब अब्दुल हन ताहसीश ह्याने **पारिजातापहरण** हे कुचेलपुरम्च्या ब्राह्मणांनी बसविलेले नृत्यनाटच पाहिले आणि तो इतका खूष झाला की, कुचेलपुरम् हे गाव व त्याभोवतालची जमीन नृत्यनाटकातील कलावंतांना इनाम दिली व ही परंपरा जतन करा व टिकवा म्हणून सांगितले. तेथील हे कलावंत भरताचे नाटचशास्त्र, नंदिकेश्वराचे **अभिनयदर्पण** आणि जयाप्पा सेनानीचे **नृत्तरत्नावली** इत्यादी ग्रंथांचा परिश्रमपूर्वक अभ्यास करीत व त्यात प्राविण्य मिळवीत. आंध्र

प्रांतात तीन नृत्यप्रकार रूढ होते[१]. अभिजात शास्त्रीय पद्धतीचे व प्रवृत्तीचे असूनही हे सर्व परस्परांपासून भिन्न आणि पृथगात्म होते. ते तीन प्रकार म्हणजे ––

(१) भक्तिप्रवण देवदासी नृत्य.
(२) ब्राह्मणप्रणीत धार्मिक नृत्यनाट्ये – हीच अभिजात यक्षगाने.
(३) राजनर्तकींची नृत्ये.

देवदासींची नृत्ये देवालयांतील मूर्तीसमोर होत. त्यात भक्तिभावनेची व समर्पणाची वृत्ती असे. जयाप्पा सेनानी ह्या तेराव्या शतकातील वरंगळच्या काकतीयांच्या वंशातील ग्रंथकाराने आपल्या भूर्जपत्रावर लिहिलेल्या ग्रंथात वर्णन केलेली आराधना नृत्ये, ही देवदासींच्या नृत्यासारखीच आहेत. ह्या ग्रंथकाराने वर्णिलेले नृत्यातील सर्व बारकावे रामप्पा मंदिरातील शिल्पांत आढळतात.

देवालयाच्या मंडपात ब्राह्मण यक्षगानाचा प्रयोग करीत. यक्षगानाचे हे स्वरूप शिवलीलानाट्यम्‌च्या दहा प्रकारांतून निर्माण झालेल्या नाटकांतून सिद्ध झाले.

अशा प्रकारचे नृत्यनाट्य करणारे ब्रह्मवृंद कुचिपुडीहून निघून निरनिराळ्या प्रांतांत प्रवास करीत फिरत व जनसमुदायाचे मनोरंजन करीत. त्यांच्या नृत्यनाटकाचे संविधानक प्रामुख्याने **शिवपुराण, रामायण** आणि **महाभारतातील** असे. वैष्णवपंथाचा उदय झाल्यावर तेथील राजाचे आश्रित भागवतुलु (भागवत) तंजावरच्या नायक राजांच्या आश्रयाला गेले. त्यांचे संगीत, नृत्य व नाटक या कलांतील प्राविण्य पाहून अच्युतप्पा नायक (इ. स. १५६१–१६१४) ह्या राजाने त्यांची स्वतंत्र वसाहत वसविली. तिला अच्युतंपुरम्‌ असे नाव प्राप्त झाले. नायक राजांचे कलाप्रेम सर्वख्यात झाल्यामुळे कित्येक राजनर्तकीही तंजावरकडे आकृष्ट झाल्या. अशा रीतीने ह्या कालखंडात तंजावर हे ललितकलांचे माहेरघरच बनले.

व्यंकोजी राजे भोसले हे तंजावरच्या गादीवर आल्यावर त्यांनी नायकांचीच ही परंपरा चालू ठेविली. त्यांनी विद्वता व कलाभिवृद्धीला प्रोत्साहन दिले. व्यंकोजी राजांचे चिरंजीव शहाजी ह्यांना 'दक्षिणेचा भोज' असे संबोधिले जाई. त्यांनी आणि त्यांच्या वंशजांनी व आश्रितांनी जवळजवळ चाळीस नृत्यनाटके लिहिली. त्यांपैकी १०–१२ नृत्यनाटके प्रकाशित झाली आहेत. उर्वरित नाटके आता प्रकाशित होत आहेत. प्रकाशित नाटकांपैकी देवेन्द्रकोर्वंजी, मोहिनी महेश परिअय, पंच भाषामिलास क राधाकृष्ण विलास ही नाटके 'सरस्वती महल', गा ग्रंथालयामार्फत व प्रा. माया सरदेसाई यांनी मराठी रंगभूमीचा उषःकाल या ग्रंथात शहाजीराजांची पाच व उस्मानिया विद्यापीठाच्या संशोधन पत्रिकेत प्रतापसिंहराजांचे पारिजातापहरण पंचभाषा विलास (शाहाजी राजांचे ही नाटके प्रकाशित झाली.

## (४) तंजावरच्या नृत्य-नाटकांचे स्वरूप

ह्या नाटकांची सुरुवात संस्कृत नाटकातील नांदीसारख्याच ईश्वरस्तुतीपर गीतांनी होते. कुचिपुडी नृत्यातील 'जय जय' ह्या शब्दांनी सुरू होणाऱ्या ईश्वरपूजेच्या नृत्यासारखाच हा भाग आहे. त्यानंतर पात्रांचा प्रवेश होतो, तो त्या नृत्यातील 'जति'

म्हणजे 'नृत्त' ह्या प्रकाराने होतो. म्हणजे कृष्ण प्रवेश करितो ते सूत्रधार सुचवितो, ते कृष्णाच्या पदन्यासाचे **सोल्लुकुट्टू** म्हण – नृत्याचे लयबद्ध बोल बोलून —

'तं धिमि धिमित झनु धणतक तक धळांगु'
'किटतक धिरकिट धिमि झनु झनु तक धळांगु'
'तधिमितद्विताहत किटतक धीमुतहतक धळांगु तक झनु'
'तधिमितद्विताहत तक धिमि तथोंथोंगुतक धळांगु'

**—गोवर्धनोध्दारण नाटक.—**

हा नुसता नृत्याचा भाग कुचिपुडीतील व भरत नाटयातील 'जति' ह्या प्रकाराची आठवण करून देतो. ह्यांत फक्त लयबद्ध पदन्यास तालाच्या बोलावर केला जातो. दरुवु किंवा दरु म्हणजे गीते. ही नाटचरूप असतात. भरतमुनींच्या आदेशानुसार ह्यात आङ्गिक वाचिक व आहार्य अभिनय सात्विकात आविष्कृत होतो. ह्याला दाक्षिणात्य पद्धतीच्या रागतालांतील नृत्यानुकूल संगीताची साथ असते. त्यामुळे ही नाटके म्हणजे अभिजात गीतनृत्यमालिकाच वाटतात.

ह्या नाटकांचा काल इ. स. १६८४ ते १८५५ हा आहे. ह्या काळात महाराष्ट्रात बरीचशी स्वयंवर काव्ये लिहिली गेली. योगायोग असा की, तंजावरची ही नाटके बहुतांशी स्वयंवर-नाटके आहेत. **लक्ष्मी-नारायण कल्याण** (कल्याण म्हणजे तामिळभाषेत विवाह) **प्रभावती परिणय, पार्वती कल्याण, सीता कल्याण, उषा कल्याण, मायावती परिणय, मित्रविंदा परिणय, सुभद्रा कल्याण, रुक्मिणी कल्याण, मोहिनी-महेश परिणय, मीनाक्षी परिणय** इत्यादी. शेष नाटकांची संविधानके निरनिराळ्या देवदेवतांचे महात्म्य सांगणारी वा भक्तजनांची चरित्रे सांगणारी अशी आहेत.

ह्या नाटकांचा विचार करताना एक गोष्ट स्पष्टपणे जाणवते की, ही नाटके दाक्षिणात्य नृत्य-नाटय-संगीताचा संस्कार घेऊन मराठी रूपाने अवतरली. महाराष्ट्रातील तत्कालीन दशावतारी खेळांचे हे दाक्षिणात्य रूप नव्हे.

## (५) कोर्वंजी नाटके

तामीळ भाषेत 'कोर्वंजी' वा 'कुर्वन्जी' प्रकारच्या नृत्यासाठी लिहिलेली कविता व पदे आढळतात. असे दिसते की, सुमारे साडेतीनशे (इ. स. १६५७) वर्षांपूर्वी थिरुकुथु राजप्पा कवियार (कवि) यांनी अशा प्रकारच्या रचना प्रथम लिहिल्या. जवळजवळ तीसएक कुरवंजी अजूनही प्रचारात आहेत. कुत्रल वीरली मलाई, अलागर, चित्रांवाला आणि सरभोजी कुरवंजी असे कुरवंजीचे प्रकार प्रसिद्ध आहेत.

भरतनाटयम्च्या पद्धतीने कुरवंजी नृत्य केले जाते. त्यात निवडक नृत्य व अभिनय योजना उत्कृष्ट अडवु-जतींबरोबर केलेली असते. संगीत नाचऱ्या गतीचे, आकर्षक, गतिशील व श्रवणसुभग असते. ह्या प्रकारच्या नृत्यनाटकांचा विषय सामान्यतः एकच असतो. कुरव, कुरवी किंवा कुरवंजी म्हणजे बुरडीण किंवा कैकाडीण. ही भटकी जमात सुपे, टोपल्या विणून विकतात व माणसांचे हात व चेहरा पाहून भविष्य वर्तवितात.

शकुन सांगण्यात व भविष्य वर्तविण्यात ह्या स्त्रिया प्रवीण असतात. हस्तसामुद्रिकाबरोबरच त्यांचे वाक्पाटवही विशेष प्रभावी असावे असे दिसते.

सामान्यतः कुर्वंजी नाटकाचे कथानक असे असते : नायिका ही देवता, राजकन्या किंवा कुलीन श्रीमंत घराण्यातील कन्या असते. नायक हा देवस्वरूप किंवा देखणा व शूर राजपुत्र असतो. उत्सव प्रसंगी मिरवत जाताना नायिका त्याला पाहते व प्रथमदर्शनीच ती प्रेमातुर होते. ती विरहावस्थेत प्रियकराला निरोप पाठविण्यासाठी चेतन-अचेतनांना दूत होण्यासाठी विनवीत असते. तिला चंद्र, दाक्षिणात्य मलयनिलाची मंद झुळूक, ढग, फुले, वृक्ष, पक्षी व प्राणी इत्यादींना दूत होण्याची विनंती करताना पाहून कविकुलगुरु कालिदासाच्या उक्तीचे स्मरण व्हावे :

कामार्तो हि प्रकृतिकृपण: चेतनाचेतनेषु (मेघदूतम्).

परंतु या साऱ्यांची तिच्या दुःखाबद्दल (तिच्या मते) निर्विकार वृत्ती पाहून त्यांना ती दूषणे देते. एवढ्यात तिच्या मैत्रिणी येऊन तिच्या भोवती फेर धरून नृत्य करतात, त्या तिच्या विरहावस्थेचे कारण विचारतात :

'चिंता लागली तुझ्या चित्तास कां। चिंतारत्नसा बाप असतां'।। असे म्हणतात. **(जानकी सुखोल्लास)**.

त्यानंतर नायिका आपली प्रेमभावना व्यक्त करिते. त्यांना 'माझे मनोगत प्रियकराला कळवा,' म्हणून नायिका त्यांची मनधरणी करते. एवढ्यात राजवाड्याच्या दाराशी कुरव-स्त्री (बुरडीण) येते. ती आपण त्रिकालज्ञानी असून देवदेवतांचे, मानवांचे अचूक भविष्य कसे वर्तवले हे प्रौढीने सांगते. त्या निमित्ताने नाटककार तिच्या तोंडून देशातील निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांचे व नगरांचे वर्णन करतो. शेवटी नायिका आपले भविष्य विचारते. ती नायक-नायिकेच्या मीलनाचे भविष्य वर्तवते. नायिका तिचा आनंदाने अलंकार व उंची वस्त्रे देऊन सन्मान करते. एवढ्यात बुरूड येतो. तो शिकारी-फासेपारध्याच्या वेषात येतो. उच्च वस्त्रालंकारांनी मढलेल्या आपल्या बुरुडीणीला तो ओळखत नाही, थोडीशी विनोदी प्रश्नोत्तरे होतात व नंतर आनंदाने सर्वांचे अभिष्ट चिंतून ती जातात.

भरतनाट्यम्च्या पद्धतीने कुर्वंजी नाटकातील नृत्य केले जाते. कुर्वंजी स्त्रीच्या नृत्यांत निवडक नृत्य व अभिनय योजना उत्कृष्ट अडवुजतींबरोबर केलेली असते. त्यातील संगीत व नृत्य हे शास्त्रीय व उच्च प्रकारचे असते.

'सरभो(फो)जी कुरुवंजी' हा कुर्वंजी नृत्यनाट्यातील एक लोकप्रिय प्रकार आहे. सरफोजी **ऊर्फ** शरभेंद्र या राजाच्या लोकप्रियतेची साक्ष देणारेच प्रस्तुत कुर्वंजी वा कोर्वंजी पद्धतीने लिहिलेल्या तीन नृत्यनाटकांचा परामर्श घ्यायचा आहे. यथार्थनामा राजे प्रतापसिंह यांचे श्री. कोरवंजी **ऊर्फ** 'जानकी सुखोल्लास' व राजे शरभेंद्र (दुसरे) **ऊर्फ** सरफोजी यांची **देवेन्द्र कोर्वन्जी** व **श्री राधाकृष्ण विलास** ही ती नाटके होत.

वस्तुतः **राधाकृष्णविलास** या नाटकाचा अंतर्भाव 'कोर्वंजी' या नाट्यप्रकारात राजा सरफोजी वा कोणी अभ्यासक यांनी केलेला नाही; परंतु नाटकाची रचना बारकाव्याने तपासल्यावर 'कोर्वन्जी' पद्धतीचा आविष्कार त्यात आढळतो.

**(६) कोर्वन्जी नाटकाची वैशिष्ट्ये**

अत्यंत लोकप्रिय कुरुवंजी म्हणजे सरफोजी कुरुवंजी असे म्हटले जाते. या नृत्यनाट्याचा विषय असतो सरफोजी राजे. एक अत्यंत लावण्यवती मदनवल्ली नामक युवती सरफोजी राजांच्या प्रेमात पडते. ती अभिजात कुलोत्पन्न, कुलीन व कलावती असते. सद्गुणी सरफोजी राजांचे कलाप्रेम, संगीतातील रती, काव्यातील अभिज्ञता, नृत्यातील जाणकारी व गती इत्यादी सारे विशेष नायिका नृत्यांतून दाखविते. नंतर एक भविष्यवादिनी कुरवंजी स्त्री येते. ती नायिकेचे प्रेम सफल होईल अशी ग्वाही देते. प्रेमपूर्तीला अनुकूल असे वातावरण निर्माण करते. भरतनाट्यम्‌ला उपकारक अशी ही कथावस्तू नृत्यातील 'अभिनयम्'ला खूप वाव देणारी असल्यामुळे फार लोकप्रिय ठरली आहे. श्रेष्ठ नट आणि नटुवांनी (नटुवानरांनी) ही प्रथा जोपासली आहे. पांडनल्लूर मीनाक्षीसुंदरम् पिल्ले, रुक्मिणीदेवी, बालसरस्वती व मृणालिनी साराभाई इत्यादी श्रेष्ठ कलाकारांनी कुरुवंजी नृत्यनाटके सादर केली आहेत.

दक्षिणेतील नृत्यनाटकांची प्रेरणा जयदेवाच्या गीतगोविंदातून मिळाली असावी. नारायणतीर्थांची **कृष्णतरंगिणी** या ग्रंथाचा प्रभाव तत्कालीन कवींवर पडला. मेलाटटूरचे वेंकटराम भागवतार ह्यांनी **प्रल्हादचरित्रा**सारखी नृत्यनाटके लिहून भागवत मेळानाटक संप्रदाय संपन्न केला. त्यागराजांनी **प्रल्हादभक्तिविजय** आणि **नौकाचरित्र** ही संगीतमय नाटके भागवतमेळा पद्धतीनेच लिहिली. वर्णनात्मक गीते, संवादगीते, परिचयात्मक गीते व थोडेसे गद्य संवाद अशा तऱ्हेने लिहिली. गेली. ती गायिली गेली पण त्यांचे प्रयोग झाले नाहीत.

या उलट भोसले राजांनी लिहिलेल्या नाटकांचे व कोर्वन्जी प्रकारच्या नाटकांचे प्रयोग निरनिराळ्या देवतांच्या उत्सव प्रसंगी होत. त्यांतील कोर्वन्जी नाटकांचा परामर्श घ्यावयाचा आहे. या कुरवंजी वा कोर्वंजी पद्धतीने लिहिलेली तीन नृत्यनाटके येथे विचाराधीन आहेत. एक यथार्थनामाराजा प्रतापसिंह यांचे **कोरवंजी ऊर्फ जानकी सुखोल्लास** व दुसरे राजे शरभेंद्र **ऊर्फ** सरफोजी यांची **देवेन्द्र कोर्वंजी** आणि **श्रीराधाकृष्णविलास** ही **नाटके** होत.

तंजावरच्या भोसले घराण्यात प्रतापसिंह हे फार पराक्रमी, राजनीतिकुशल, विद्याव्यासंगी व कलाप्रेमी होते. त्यांनी इ.स. १७३९ ते इ.स. १७६३ पर्यन्त राज्य केले. दक्षिण भारताच्या इतिहासातील हा फार धामधुमीचा कालखंड होता. इंग्रज व फ्रेंच वसाहतींची सत्तास्पर्धा अत्यंत तीव्र झाली होती. इच्छा असो वा नसो, येथील राजांना त्यांच्यापैकी कोणाची तरी बाजू घेणे भाग पडत होते. शिवाय कर्नाटकाचा नवाब सादुल्लाखानाचा पुत्र दोस्तअली ह्यानेही इ. स. १७४० मध्ये स्वारी केली. प्रतापसिंहाच्या उज्ज्वल व यशस्वी संग्रामाचे वर्णन तत्कालीन कवी रामकृष्ण पंडित यांच्या **प्रातसिंहहेंद्र विजय प्रबंध,**[१] या ग्रंथात आढळते. ह्या राजाने आपले स्वातंत्र्य व महत्ता प्राणपणाने जपली. एवढ्या धामधुमीच्या राजवटीत राजा प्रतापसिंहांनी श्रेष्ठ दर्जाची नृत्यनाटके लिहून **कृष्णजनन, ध्रुवचरित्र, प्रबोधचंद्रोदय, सीताकल्याण, ययातिचरित्र, जानकी सुखोल्लास, पारिजातापहरण, मायावती परिणय, मित्रविंदापरिणय,**

**लक्ष्मणापरिणय, पार्वतीकल्याण, स्यमंतकोपाख्यान** ही यादीच त्यांतील विषयांची विविधता व विपुलता दाखविण्यास पुरेशी आहे.

### (७) जानकी सुखोल्लास

राजे प्रतापसिंह यांनी सीता स्वयंवर या विषयावर **सीताकल्याण** हे नाटक इतर विवाहनाटकांप्रमाणे लिहिले असूनही, पुन्हा त्या विषयावर कोरवंजी पद्धतीने '**जानकी सुखोल्लास**' ऊर्फ '**श्रीकोरवंजी नाटक**' लिहिले आहे. तंजावरी मराठी नाटकांतील हे पहिलेच कोरवंजी नाटक होय. एकाच विषयावर ही दोन नाटके लिहिण्यामागे दोन हेतू संभवतात. प्रतापसिंह हे परम रामभक्त होते. ते आपल्या नाटकांचा प्रयोग प्रताप-रामचंद्र महोत्सवाच्या वेळी करीत, असे त्यांतील प्रस्तावनेतील उल्लेखांवरून जाणवते. उदा.—

'प्रतापराम सद्‌भक्ती विभवोद्दाम जो महा।
प्रतापसिंह राजर्षि प्रणीता यासि तो पहा।।

या रामभक्तीमुळे रामजीवनावर दोन नाटके लिहून त्यांचा प्रयोग वेगवेगळ्या पद्धतीने सादर करण्याची सोय करून आपली कल्पकता दाखविली. शिवाय प्रस्तावनेत 'पारिपार्श्वका, तुझें चित्त परिणत होऊन श्रीराम भक्तिमार्गी लागलेसारखे दिसते ते जेविं दशरथ रायानें दशदिशा जिंकून अखंड साम्राज्यासाठी बैसुनि रामलक्ष्मणादि चौघां पुत्रांकडून सुख अनुभविले त्याप्रमाणे त्वांहि दशेंद्रियें जिंकून श्रीरामचंद्र सेवेस लावून अनन्यसाधारण सद्‌भाव भद्रासनारूढ होऊन चतुर्विध पुरषार्थयुक्त नित्यानंदन भोगिजेता ऐसें वाटते.'

भारतीय साहित्यशास्त्रकारांनी काव्याची प्रयोजनचिकित्सा करताना काव्यामुळे रसज्ञतेबरोबरच धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ साधले जावे, असे म्हटले आहे —

धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासु च।
प्रीतिं करोति कीर्तिं च सामुकाव्यनिबन्धनम्।।

भामह, काव्यालंकार; परि. १–२.

त्या विचाराचे महत्त्व प्रतापसिंहांना वाटत असावे. शिवाय कोरवंजी नाटकात नाटककाराला आपला व्यासंग, बहुश्रुतता व विविध विषयांवरील विविध प्रकारची माहिती दाखविण्याची सोय आहे. प्रतापसिंहानी असे म्हटले आहे.—

"जानकी आणि कैकाडीण यांच्या प्रश्नोत्तर-व्याजें. सकल इतिहास पुराण धर्म शास्त्रविस्मीत (विस्तरीत) कलिविडंबनपूर्वक. वर्णाश्रमधर्म अदि करुनि। गुरुशिष्यधर्म स्त्रीधर्म पुत्रधर्म यांचे वर्म समस्तांहि सर्वभास कळावयाकारणें नाटकरूप या ग्रंथांत निरोपिलें आहे."—

अशा तऱ्हेने नाटककाराला सामान्य प्रेक्षकांना नाटकरूपाने स्वधर्माचे महत्त्व पटवायचे होते; तसेच आपल्या देशातील तीर्थक्षेत्रे, देवदेवता, वेगवेगळे प्रदेश ह्यांचा परिचय

करून द्यावयाचा होता. हाच हेतू शरभेंद्र राजांच्या **देवेन्द्र कोर्वंजी** या नाटकात आढळतो. त्यांचे शिक्षण रे. श्वार्झ या पाश्चात्य विद्या पंडिताकडे झाल्यामुळे त्यांना जगातील पाचही खंडांचा, सुप्रसिद्ध शहरे, नद्या, पर्वत, इत्यादींचा भूगोल चांगला अवगत होता. म्हणून तो सारा भूगोल आपल्या प्रजेला सांगण्यासाठी **देवेन्द्र-कोर्वंजी** नाटक लिहिले असावे. पाच अंकांत विभागलेले ते नाटक म्हणजे बुरडीणीने आपण कोणते देश, नगरे, पर्वत इत्यादी ठिकाणी भ्रमण केले याची जंत्रीच आहे. सरफोजी राजांना भूगोलाचे समग्र अद्यावत (तत्कालीन) ज्ञान असल्यामुळे त्यातील स्थळांची नावे व वर्णन यथोचित आहे. या उलट प्रतापसिंहांचे ज्ञान पौराणिक ग्रंथांच्या आधारे घेतलेले असल्यामुळे **'जानकी सुखोल्लास'** या नाटकात देशांची नावे पुढीलप्रमाणे आढळतात :—

मागध मालव मैथिल माधुर मारवाड।
कुरुजंगिल अंग कलिंग त्रिलिंग बंगवाड ।।
बहु नागर कोंकण तंकण मंकण देश गोड।
सर्वा चांगट या वीण केरळ काश्मीर चोळ जेथें विप्र प्रौढ ।।

एकतर ही सारी देशनामे महाभारत व पौराणिक ग्रंथांत आढळणारी असून प्रतापसिंहाच्या काळी अर्वाचीन नावे बव्हंशी रूढ झालेली होती. शिवाय 'कोकण वंकण मंकण' या नावात अनुप्रास जुळवण्यासाठी 'कोकण' या प्रांताबरोबर 'वंकण मंकण' हा नामनिर्देश केला असावा. अशा उल्लेखांबरोबरच काही स्थानमाहात्म्य सांगणारे औचित्यपूर्ण उल्लेखही आढळतात. उदा. पंढरपूरचे क्षेत्रमहत्त्व निर्देशिताना—

साधी भक्ताची शिराणी तेथें देखिली वेदपुराणीं।
इटेवरी चंद्रभागातटीं विटेनासा उभा विठ्ठल तो सौख्यगाभा ।।
नीट पाहिला आत्मलाभा ।।

"भक्ताची आवड पुरी करण्यासाठी विटेवरी उभा असलेला विठ्ठल" या उद्गारात पंढरपूरचा सारा इतिहास जागा झाला आहे.

जानकीने कैकाडिणीला प्रश्न केला की, 'तूं त्रिभुवनात भ्रमण करतेस. तूं विशेष नवलाईचे काय काय पाहिलेस ?'[1]

ती म्हणते,—

पाषाणाची पांखरें उडता आई।
नीट आंखियानें देखियेलें माझ्या यांहि ।।
सकलकलापूर्ण इंदु सता तोंहि।
निज सखिये शुद्ध तोय तो सिंधु हाही ।।
हालाहल पिण्यापूर्वी चांगला गे
स्यां हराचा पाहिला गळा पांढरा गा ।।
बाळ मुकुंदाची भेटी जाली मार्गे।
आणि मार्कन्डेयाचि मुंजी ठावो लागे ।।

याप्रमाणे अद्भुतरम्य, कल्पक आणि सत्य, द्वापार व त्रेत युगांतील घटनांचे 'चक्षुः वै सत्यम्' रूप प्रत्यक्ष पाहिले असे सांगून शतानंदिनी कैकाडीण आपल्या भूतभविष्य व हस्तसामुद्रिक ज्ञानाबद्दल जानकी व तिच्या सख्या यांच्या मनात विश्वास निर्माण करिते. या कोरवंजी नाटकातील कैकाडीण ही सरफोजी राजांच्या **देवेन्द्र कोर्वन्जी** व **राधाकृष्ण विलास** नाटकातील कैकाडणीपेक्षा वृत्तीने फार प्रगल्भ व चतुर चितारली आहे. ती निरिच्छ व निःस्पृह आहे. जानकीने, सखी अनन्यभावना हिच्या-करवी तिला विचारले, 'तू कोणाकोणाला शकुन सांगितलास? कोणाचे भविष्य कथन केलेस?' तेव्हा शतानन्दिनी म्हणते, तप करणाऱ्या तरुण गौरीला, इंद्राणी शचीला, दमयंतीला, हात पाहून तिचे भविष्य सांगितले. आणखी कितीतरी स्त्रियांची सामुद्रिक चिन्हे पाहून मी भविष्य वर्तविले. तेव्हा कोणाकडून काय काय सन्मान व पारितोषिक मिळाले? असे विचारल्यावर कैकाडीण सांगते की, अंबेकडून ऐक्य अनुरागाचा अलंकार व मननाचा बळकट कडदोरा बांधला, त्याला रत्ने व रुणझुणणाऱ्या घागऱ्या लावल्या-मुळे त्यातून 'सोऽहं', 'सोऽहं' चा नाद निनादत असतो. इंद्राणीने तर झगझगणारी सत्त्वगुणाची चोळी दिली, तर लक्ष्मी माउलीने शुद्ध प्रामाणिक भावाचे मंगलसूत्र आणि ईशचरणी अवीट आवडीचे माणिक दिले. देवीने दयारूपी शरीर अर्पण केले. या अलंकारांनी नटलेली बुरडीण जेव्हा त्रिभुवनाच्या गोष्टी बोलते, तेव्हा ते साजरे वाटते; परंतु सरफोजींच्या कोर्वंजीमधील बुरडीण सूपभर मोत्ये व शिरमणी बक्षीस म्हणून घेते.

(१) कैकाडिणीं शिरमणी दे मोतें सूप भरूनि निज पाणी।

**राधाकृष्ण विलास, पृ. ११–१.**

(२) शकुन कथितां हार हिऱ्याचा, अरे बुरुडा।
समज शचीनें दिधला साचा॥

**देवेन्द्र कोर्वंजी, अं. ४, पृ. ६३.**

इंद्राणीकडून हिऱ्यांचा हार घेते, तेव्हा नाटक अगदी व्यावहारिक पातळीवर पोचते.

याशिवाय रचनेच्या दृष्टीने **जानकी सुखोल्लास** व **राधाकृष्णविलास** नाटकांत विविध पात्रांच्या तोंडी गद्य संवाद व पदे आढळतात, तर देवेन्द्र कोर्वंजी हे सर्व पद्यमय आहे. सारा भूगोल पद्यात सांगितला आहे.

### (८) नृत्यनाटकांतील संगीत

दक्षिण भारतात रूढ असलेल्या **यक्षगान, भागवतमेळा, कृष्णआट्टम, कुचिपुडी** इत्यादी नृत्यनाटके व नृत्ये यांत योजिलेले संगीत बव्हंशी दाक्षिणात्य पद्धतीचे शास्त्रीय किंवा रागदारीवर आधारलेले सुगम संगीत दिसते. त्यात प्रामुख्याने **शंकराभरण, बिलावल, पाडी केदारगौळा, आनंभैरवी, सौराष्ट्र, मोहन, हंसध्वनी, सूरटी, वृन्दावन सारंग, पूरिया, परजू, पुन्नागवराळी, पंतवराळी, नटकुरंजी** इत्यादी अनेक रागांची योजना भोसले राजांनी लिहिलेल्या नृत्यनाटकांत आढळते. बी. सुब्बाराव यांनी

लिहिलेल्या **रागनिधी** या ग्रंथाधारे पुढील राग वैशिष्टये व साम्ये दाखविली आहेत. परिचित हिंदुस्थानी रागांशी कर्नाटक पद्धतीच्या रागांचा ताळमेळ दर्शविल्याने त्यातील दोन ध्रुवांइतके वाटणारे अंतर कमी व्हावे, एवढयाच मर्यादित हेतूने वारंवार नाटकात येणाऱ्या काही रागांचे स्वरूप मूळ ग्रंथाबरहुकूम उद्‌धृत केले आहे.

### रागविलास (कर्नाटकी)

(१) **धीर शंकराभरण** .. स्वर स रि$_{२}$ ग$_{३}$ म$_{१}$ प ध$_{२}$ नि$_{३}$
**बिलावल** .. स रे ग म प ध नि

(२) **मायामालव गौळा** : स रि$_{१}$ ग$_{३}$ म$_{१}$ प ध$_{१}$ नि$_{३}$
**भैरव** : स रे ग म प ध् नि

(३) **केदारगौळा** .. **देस** रागाशी बहुतांशी मिळताजुळता. त्यामध्ये आरोह अवरोहात दोन्ही ठिकाणी 'नी' कोमल लागतो. **देसमल्हार**ला जवळचा असलेला हा राग आहे.

(४) **मोहन** .. **हिंदुस्थानी देशकार** आणि भूप यांना जवळचा. त्यात भूपला अधिक जवळचा होय.
स रि ग प ध सं – सं ध प ग रि स.

(५) **हंसध्वनी** .. रामस्वामी दिक्षितार यांनी रचलेला हा अत्यंत लोकप्रिय राग होता. २९ या मेलकर्ता धीर शंकराभरणाचा जन्य राग. **बिलावल** थाटाला जवळचा आहे.

(६) **सुरटी** .. जन्य राग हरिकांभोजी – २८ व्या मेलकर्त्याच्या **हिंदुस्थानी** खमाज थाटाचा होय. ओडव संपूर्ण
स रि म प नि सं — सं नि धप मग पम रि स.

(७) **नवरोजु** .. किंवा नवरोज हा पंचमात्य राग म्हणजे संचार प ते प. २९ व्या मेलकर्त्याचा धीर **शंकराभरणाचा** जन्य राग आहे.

(८) **आनंद भैरवी** .. लोकप्रिय राग. २० व्या मेलकर्त्यापासून जन्य. जनक नट भैरवी. दोन **गांधार**, दोन **धैवत** व दोन **निषाद** वापरतात.

(९) **सावेरी** .. फार प्रचारात. १५ व्या मेलकर्ता **मलयमालव** गौळापासून बनलेला व **हिंदुस्तानी भैरव** थाटाचा आहे. **आरोहात** ग व नी वर्ज्य.

(१०) **कापी** .. २२ व्या मेलकर्त्याचा – करहारप्रियाचा जन्य राग आहे.
**आरोह** : स रि$_{२}$ ग$_{२}$ म$_{१}$ प ध$_{२}$ नि$_{२}$ सं
**अवरोह** : सं नि$_{२}$ ध$_{२}$ प म$_{१}$ ग$_{२}$ म रि$_{२}$ स.

(११) **पूरिया** .. **हंसानंदी** या कर्नाटकी रागाशी साम्य जाणवते.

(१२) **परज किंवा परजु** .. १५ व्या मेलकर्त्याचा **मयमालव** गौळचा. **षाडव** संपूर्ण हिंदुस्तानी भैरव थाटाचा. रि वर्ज्य.
स ग$_{३}$ म$_{१}$ प ध$_{१}$ नि$_{३}$ सं
सं नि$_{३}$ ध$_{१}$ प म$_{१}$ ग$_{३}$ रि स.

(१३) **पाडी** .. १५ व्या मेलकर्त्याचा मयमालव गौळाचा.
**ओडव– –– षाडव राग.** ग, ध वर्ज्य.
**अरोहात** ग, ध वर्ज्य, **आवरोहात** ग वर्ज्य.
स रि् म प नि सं
सं नि प ध् प म रि स.

(१४) **पंतुवराळी** .. आता **कामवर्धिनी** ह्या नावाने ओळखला जातो. हा फार लोकप्रिय राग आहे. शुभ **पंतुवराळी** हे नाव अधिक प्रचलित आहे. **हिंदुस्तानी** तोडी थाटाचा. जुने नाव **रामक्रीया** हे होय.

(१५) **पुन्नागवराळी** .. ८ व्या **हनूमातोडी** मेलकर्त्याचा जन्य. **निषादान्त्य** राग. हिंदुस्तानी भैरवी थाटाचा.
नि$_{२}$ स रि$_{१}$ ग$_{२}$ म$_{१}$ प$_{१}$ ध$_{१}$ नि$_{२}$
नि$_{२}$ ध$_{१}$ प म$_{१}$ ग$_{२}$ रि$_{१}$ स नि$_{२}$

(१६) **वृंदावनी सारंग** .. कर्नाटक पद्धतीत दोन प्रकारचे **आरोह अवरोह** रूढ आहेत.
(१) स ग$_{२}$ रे$_{२}$ म$_{१}$ प नि$_{२}$ सं
स नि$_{२}$ प म$_{१}$ रि$_{२}$ ग$_{२}$ स.

हा २२ व्या मेलकर्त्यापासून **करहरप्रियापासून** (कापी थाटाचा).

(२) हिंदुस्तानी पद्धतीचा.
स ग रे म प नि स
सं नि प म रे ग स.

हा दक्षिणेत फारसा प्रचारात नाही.

(१७) मांजी .. हा राग हिंदुस्तानी पद्धतीत नाही. हा विसाव्या मेलकर्त्याचा-नट भैरवीचा जन्य राग थोडासा असावरी थाटाचा. दोन प्रकारचे आरोह अवरोह संभवतात.

(१) स रि$_{२}$ ग$_{२}$ म$_{१}$ प ध$_{२}$ नि$_{२}$ सं
सं नि$_{२}$ ध$_{१}$ प म$_{१}$ ग$_{२}$ रि$_{२}$ स.

(२) स रि ग् म प ध नि सं
सं नि ध प म प ग रि स.

(१८) नायकी .. खरहरप्रिया या २२ व्या मेलकर्त्याचा जन्य राग. हिंदुस्तानी काफी थाटाचा. आरोहात ग वर्ज्य.

स रि$_{२}$ म$_{१}$ प ध$_{२}$ नि$_{३}$ ध प सं
सं नि$_{२}$ ध$_{२}$ प म$_{१}$ रि$_{२}$ ग$_{२}$ रि$_{२}$ स

किंवा

सं नि$_{२}$ सं ध$_{२}$ प म$_{१}$ रि$_{१}$ ग$_{२}$ रि स.

(१९) नटकुरंजी .. फार लोकप्रिय व प्रमुख राग. हा २८ व्या मेलकमर्तं हरिकांभोजीचा जन्य (हिंदुस्तानी खमाज थाटाचा).

स रि$_{२}$ ग$_{३}$ म$_{१}$ नि$_{२}$ ध$_{२}$ नि$_{२}$ प ध$_{२}$ नि$_{२}$
प ध$_{२}$ नि$_{२}$ सं
सं नि$_{२}$ ध$_{२}$ म$_{२}$ ग$_{३}$ रि$_{२}$ स.

(२०) गेळिपंतूट .. १५ व्या मयमालवग्रौळा ह्या मेलकर्त्याचा जन्य. हिंदुस्तानी भैरव थाटाचा. दोन प्रकारचे आरोह अवरोह.

(१) स रि$_{१}$ ग$_{३}$ रि$_{१}$ म प ध$_{१}$ प नि$_{३}$ सं
सं नि$_{२}$ ध$_{१}$ पम$_{१}$ ग$_{३}$ रि$_{१}$ स.

(२) स रि$_{१}$ म$_{१}$ प नि$_{३}$ रि$_{१}$ सं
सं नि$_{३}$ ध$_{१}$ पम$_{१}$ ग$_{३}$ रि$_{१}$ स.

(२१) पूर्वी कल्याणी .. पुर्व कल्याणी किंवा पूरिसा कल्यणि हिंदुस्तानी पूर्व किंवा पूरिसा कल्याणी सारखाच.
५३ व्या मेलकार्ता गमनाश्रमाचा जन्य. हिंदुस्तानी मारवा थाटाचा.

स रि$_{१}$ ग$_{३}$ म$_{२}$ प ध$_{२}$ नि$_{३}$ ध$_{२}$ प सं
सं नि$_{३}$ ध$_{२}$ पम$_{२}$ ग$_{३}$ रि$_{१}$ स.

(२२) **देवगांधारी** : कर्नाटकातील एक लोकप्रिय राग. २९ व्या **धीरशंकराभरण** मेलकर्त्याचा जन्य. हिंदुस्तानी **बिलाबल** थाटाचा. हिंदुस्तानी संगीतात नाही.

स रि$_२$ म$_१$ प ध$_२$ सं किंवा स रि$_२$ म$_१$ प ध$_२$ नि$_३$ सं.

सं नि$_३$ ध$_२$ प म$_१$ ग$_३$ रि$_२$ स.

या रागांच्या योजनेमागे त्या त्या वेळच्या अभिनयाला पोषक असा भाव, वातावरण-निर्मिती, प्रसंगाला व मनोवृत्तीला उठाव आणणे हा हेतू असतो. तसेच काही रागांच्या योजनेमागे रूढी वा संकेत असतो. उदा. शंकर-महादेवाला **पंतुवराळी**, **रामाया** इत्यादी राग प्रिय आहेत अशी भाविकांची धारणा आहे. म्हणून त्याच्या-संबंधीच्या कथानकात या रागांतील पदांची योजना होते.

तंजावरच्या भोसले राजांना संगीताचे विशेष ज्ञान व भान होते, हे त्यांच्या नाटकांतील विविध रागांतील पदरचनेमुळे जाणवते. शाहराजकृत पदे व त्यांची स्वररचना दिलेली हस्तलिखिते सरस्वती महालात आहेत. तशीच संगीतानुकूल पदन्यास देऊन तालबद्ध तोडे (नृत्य) दिलेले आहेत. त्यामुळे नयनसुख, श्रवणसुभगता व मनाला सुखद संवेदना होतात. नाटक हे सर्व कलांचा सुंदर समन्वय करणारी कलाकृती होय, हे या नाटकांतून जाणवते.

टीप--

१. **कर्पुरमंजरी** : (प्रथमा जवनिका पृ. ३) Raj Shekhar Ed. Prof. N. G. Suru, Principal, Ruparel Colege, Bombay 16. (1960).
२. The Dance in India : Enakshi Bhavnani pp. 29, 79 80, Tarapore walas' Treasure House of books, Bombay 1, First edition 1965.
३. तत्रैव pp 56, 57.
४. The Dance in India : Enakshi Bhaxnani, p .D W Tsrapurwala Sons & Co, D N Road, Bombay—1
५. रामकृष्ण कवि पण्डित, प्रतापसिंह विजय प्रबंध: The SaraswatitMahal Series No 5. Tanjore
६. काव्यालंकार : भामह परि १–२.
७. Ragnidhi : A comparative study of Hindustani and Karnatic Ragas Vol. I to IV—B. Subba Rao, Published by Music Academy, Madras.
८. यक्षगान : शिवराम कारंत.—हिंदी अनुवाव–वी. व्ही. कारंत, १९७३

प्रकरण ५ वे

# तंजावरी नृत्यनाटकांचे वाङ्मयीन स्वरूप व चिकित्सा

## (१) सुखात्मिका : व्याख्या व कसोट्या

तंजावरची ही मराठी नाटके स्वरूपाने (form) हलक्या फुलक्या सुखात्मिका आहेत. सुखात्मिकेच्या व्याख्या विविध प्रकारच्या आढळतात; परंतु त्यांतील मर्म मात्र साऱ्यांनीच बव्हंशी सांगितलेले आढळते. उदा.

A comedy is a play, written in a kindly or humourous vein, in which the problems or difficulties of the characters are solved happily (of the chief characters)[1]

सुखात्मिकेचे दुसरे वैशिष्ट्य अर्नस्ट कॉसररने दिलेल्या लक्षणात आढळते.

'Great comedy is often filled with great bitterness; comic art possesses in the highest degree that faculty shared by all art sympathetic vision.

सुखात्मिकेची अगदी अलीकडेच अशी एक व्याख्या माझ्या वाचनात आली[३].

'Comedy is an amusing, relatively discountinuous action concerning success and failure in social relations and culminating in a judgement whereby the divine average' triumphs over the exceptional or peculiar. The movements toward success and failure are arranged in a pattern of inevitability and chance ; the freedom of the will is not stressed. The total work, therefore presents life as a product of natural law and erratic fortune.'

ह्या साऱ्या व्याख्यांतून सुखात्मिकेचे महत्त्वाचे घटक ध्यानात येतात ते असे :—

(१) सुखात्मिकेतील जीवनदर्शन हे खेळकरपणे घडविलेले असते.

(२) प्रमुख पात्रांच्या जीवनातील समस्या वा अडचणी लीलया दूर केलेल्या असतात.

(३) सत्प्रवृत्तींचा असत्यप्रवृत्तींवर विजय होताना दिसतो.

(४) वैयक्तिक, सामाजिक वा नैतिक विचारआचारांतील कृती-उक्तींतील विसंगती हास्योत्पादन करते.

(५) नाट्यकृतीतील घटनांचे दर्शन अपरिहार्यतेच्या घट्ट दुव्यांनी सुडौल रीत्या घडते.

(६) जीवन म्हणजे संमिश्र मनोभावना व लहरी नियती यांतून बनणारे बिनतोड रसायन.

काही समीक्षकांच्या मते परिणामकारक ठरणाऱ्या सुखात्मिका ह्या फार ढोबळ असतात ; परंतु हे तितकेसे खरे नाही. Oscar Wilde (ऑस्कर वाईल्ड) आपल्या The Importance of Being Earnest या नाटकाला A trivial comedy for serious people असे म्हटले आहे. त्या विधानाचा व्यत्यास करून दुसऱ्या काही समीक्षकांनी त्याच नाटकाला A serious play for trivial people असा विनोद केला आहे.

सुखात्मिकेत शोकनाट्याप्रमाणे जीवनदर्शन घडते, घडवले जाते. मानवी जीवनातील क्षणोक्षणी जाणवणारे वर्तन, वृत्तीतील बदल, विशिष्ट वर्गाच्या सवयी, लकबी, वैशिष्ट्यपूर्ण प्रतिक्रिया, अंतर्मनाचे सूक्ष्म स्पंदन जाणवून देणाऱ्या हालचाली यांचा आलेखच नाटककार काढतो. फरक एवढाच की, या साऱ्यांचा उपयोग तो अधिक गडद रंगात करतो. त्यांतील घटना, व्यक्ती, प्रसंग आणि भाषा ह्या साऱ्या घटकांचे स्वरूप स्थूलापासून सूक्ष्मापर्यंत अनेक पातळ्यांतून लहरत असते. त्यामुळे शाब्दिक कोटीपासून अनेकांगी व्यंजनेपर्यंत सर्व प्रकारचा विनोद त्यांत आढळतो. शोकनाट्यापेक्षा सुखात्मिका ही अधिक कालसापेक्ष असते.

सुखात्मिकेच्या अंतर्गत रचनेनुसार व आशयानुसार त्यांचे वर्गीकरण केले जाते.

## (२) विनोदाचे स्वरूप

कविकुलगुरु कालिदासाने म्हटले आहे : "नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्" नाटक हे विविध प्रवृत्तींच्या लोकांचे रंजन करीत असते ; त्यामुळे बहुसंख्य लोकांना प्रिय असणारा हास्यरस हा त्यातील अत्यावश्यक घटक ठरतो. हास्यरस हा वेगवेगळ्या पातळ्यांवर नाटकांत आविष्कृत होतो. सामान्य बुद्धीच्या प्रेक्षकांपासून विदग्ध सभ्यांपर्यंत सर्वांना साध्या स्मितापासून पोट धरधरून हसायला लावणारे विनोदाचे विविध विषय असतात. तंजावरी नाटकांत या बहुतेक प्रकारांचा आढळ दिसतो.

संस्कृत नाटकांत आढळणारा विदूषक हा विनोदनिर्मितीसाठी व नायकाला मित्रत्वाने मदत करण्यासाठी योजिला आहे. त्यासंबंधी अनेक संकेत आढळतात. तो ब्राह्मण असून त्याने वेदपठन न केल्यामुळे तो 'ब्रह्मबन्धु' (निरक्षर); त्याचे यज्ञोपवीत मद्यप्यांनी (नाटक : नागानन्द) तोडल्यामुळे त्याच्या ब्राह्मणत्वाबद्दलची शंका; बुद्धीने मंद असल्या-मुळे " 'सेना' 'वसंत' या शब्दांचा पदक्रम बदल" म्हटल्यावर स्वतःभोवती फिरतो, या साऱ्यातून त्याचे मनोवैगुण्य दाखविले जाते, तर त्यांची कुरुपता व माकडाशी केलेली तुलना, त्याचा खादाडपणा व गोड पक्वान्नांची आवड इत्यादी गोष्टींवर विनोदाची मदार असे.

तंजावरी नाटकांत 'विदूषक' या अभिधानाने पात्र रंगमंचावर येत नाही, परंतु दौवारिक, पुजारी, कंचुकी, गुंडोदर, भागवत, बाष्कळपंत, कुरूप म्हातारा ब्राह्मण काशीभट्ट, त्याची कुरूप बायको ब्राह्मणी, त्यांचा कुलक्षणी मुलगा अशा निरनिराळ्या भूमिकांतील पात्रे साध्या कोटीपासून मार्मिक विनोदापर्यंत विविध प्रकारचा विनोद करतात. त्यांच्या संभाषणातून धार्मिक, व सामाजिक जीवनातील विसंगती दाखवितात.

मार्मिक विनोदाबरोबर काही स्थळी बीभत्स, ग्राम्य, अश्लील शब्दांचा व अभिनयाचा उपयोग करून जनसामान्यांना हसविले असावे. स्थूल स्वरूपाच्या कोटया व अंगविक्षेप करून, उडया मारून उथळ स्वरूपाचा हास्यविनोद निर्माण केला असावा. उदा. **लक्ष्मी-भूदेवी संवाद** या नाटकाच्या सुरुवातीचा सूत्रधार व कंचुकी यांचा प्रवेश व संवाद :—

कंचुकी : पट्ट नामधारी । अट्टहास करी ।
काठी घेऊनि करी । कंचुक्याला सभांतरी ॥
विकटा बहु करी । विष्णुध्यान करी ।
सकलांस दूर करी । संतोषाने उडया मारी ॥

(हास्य)

सूत्रधार : आहो बाजी तुम्ही कोठून आलेत ?

कंचुकी : अरे पाजी कोणास म्हणतोस ? धगडीच्या, पाजी तूंच बापू.

**'गोवर्धनोद्धारण'** या नाटकात —

सूत्रधार : अरे काय रे थुंकतोस ?

कंचुकी : पाण्याने नाम (गंध) लाविले तरी पघळोन जातें. थुंक्याने नाम लाविले तरी चिकट असते. . . .

. . . . . . . .

कंचुकी : (आरशांत पहात) अरे, आरिसा पाहिला की त्यामध्ये माकडासारिखे आहे.

सूत्रधार : अरे माकड नव्हे रे. तुझे तोंड तसेच आहे.

. . . . . . . . .

सूत्रधार : सभा सिद्ध काय करावी रे ?

कंचुकी : पाणी बांधोन, तोरणे सिपडून, केळीचे खांब घालून, मांडव मुस्तैद करावे.

सूत्रधार : अरे तसे नव्हे रे वेडा, पाणी सिपडून, तोरणे बांधोन, केळीचे खांब रोवावे म्हणून सांग रे.

अशा संवादात शाब्दिक विनोद साधला आहे.

सूत्रधार : अरे आम्ही भागवत.

कंचुकी : अरे भिकारचोटा. भाग्यवंत तरी मंदील कोठे, चोखट झगा कोठें ?

कंचुकी : धगडीच्या हा कोण रे ? अंधकारासारखा दिसतो.

सूत्रधार : अरे हा मुट्टगार (मृदुंग वाजविणारा).

कंचुकी : अरे हा मुट्ट. शाबास. त्याच्या गळयात काय आहे ?

सूत्रधार : अरे तो मांदळ (मृदुंग).

कंचुकी : अरे हा आंधळा धगडीच्या येथे का आला आहे ?

ह्या विनोद विषयात भ्रष्टाचारी व अनीतिमान परंतु धार्मिक कृत्ये करणाऱ्या भ्रष्ट ब्राह्मणांचे चित्रण विविध कृतिउक्तीतून चितारले आहे.

**सूत्रधार** : अरे ब्राह्मी मुहूर्ती उठोन दहावे तासी स्नान करावें.

**पुजारी** : दहावे तासीं करावें म्हटले की त्याहून अगोधर सातवे तासी रात्रीच स्नान करून आलो. रात्री चित्रमुतुच्या घरास गेलो होतो. तीसी उपरि सुरत करता तिच्या अंगास घाम आला. त्या घामाने माझे आंग असकें भिजलें तेव्हां स्नान जालें. आता या हिंवामध्ये कोण स्नान करतो ? हे नदीच्या स्नानापरीस हे स्नान विशेष म्हणून तेथेंच स्नान करुन आलो.

संस्कृत नाटकांतील विदूषकांच्या कुरुपतेसंबंधी असलेले विनोदी उल्लेख या नाटकांतही आहेत. उदा.—

**कंचुकी** : आरसा पाहिला की त्यामध्ये माकडासारिखें आहे.

**सूत्रधार** : अरे माकड नव्हे रे. तुझें तोंड तसेंच आहे.

अशा प्रकारचा संस्कृत नाटकातील व स्थानिक विनोदाचा वारसा ह्या नाटकांनी घेतला आहे.

विदुषकाचा खादाडपणा हा संस्कृत नाटकातील विनोदाचा परिचित विषय आहे. **पार्वती कल्याण** या प्रतापसिंहाच्या नाटकात त्याचा मार्मिक उल्लेख पुढील संवादात आढळतो :—

**परमेश्वर** : तुला नेहमी पोटाचेंच ध्यान आहे. दुसरी चिंता नाही.

**गुंडोदर** : स्वामी, आपणास स्त्रीचे व्यसन. मला पोटाचे व्यसन. दोघांतही दोन्ही व्यसने समान. परंतु मी निज अवगुण झाकून परक्याला स्वामीसारिखा लटका उपदेश करीत नाही.

शाहराजांच्या **हरिहर बिलास** नाटकातील विनोद उच्च प्रतीचा प्रसंगनिष्ठ विनोद आहे. हरीचे मोहिनीरुपातील अद्वितीय, अनुपम सौंदर्य पाहून तपोवनातील ऋषी मोहित होऊन तिची प्रेमयाचना करू लागतात,

**ऋषी** : कमंडलु माझे घे । जगन्मोहिनी<br>तुझें अधरपान करूं दे गे । जगन्मोहिनी

तर हराच्या तरुण जोग्याचे वेषरूपाने सर्व ऋषि पत्नी मोहून त्याच्या मागे लागल्या. या प्रेमवेड्यांपासून सुटका करून घेण्यासाठी हर व हरी नारदाला युक्ती विचारतात. ह्या प्रसंगात मनुष्य स्वभावातील विकारवशतेचे व स्खनशीलतेचे सुंदर दर्शन घडते. तसेच अभिजात विनोदाचे प्रत्ययकारी स्वरूप जाणवते.

आणखी एका तऱ्हेचा विनोद **गंगा-कावेरी संवाद** व **लक्ष्मी-भूदेवी संवाद** या नाटकांत आढळतो.

सपत्नीमधील उच्चनीचतेबद्दल व विशेषतः पतीला कोणाबद्दल अधिक प्रेम व आदरभाव वाटतो ह्या परिचित विषयांतून निर्माण झालेला विनोद या दोन्ही नाटकांत

आढळतो. त्यामध्ये एकमेकींवर केलेले आरोप तत्कालीन जीवनातील संकेत दर्शवितात. उदा. :—

राणाने गंगा कावेरीस म्हणते—
काय भय नाही काय गे ।
परिहास करितेस फार मातलीस ।
मर्यादा टाकून मजसी चाळे करितेस ।।

तेव्हा कावेरी उत्तर देते—
वटवट करितेस काय । बाजारिणी वटवट करितेस काय ?
परपुरुष इच्छून परनिंदा करतेस । पर रत्नाकराची वनिता म्हणवितेस ।।

अशा प्रकारच्या त्यांनी एकमेकींच्या काढलेल्या उखाळ्यापाखाळ्या मोठ्या विनोद-पूर्ण आहेत.

लक्ष्मी-भूदेवी संवादांत **लक्ष्मीनारायण कल्याण** मधल्या विनोदाचा नमुना आहेच. गंगा-कावेरी संवादाप्रमाणे सवतींचे भांडण व त्यांतील एकमेकींचा अधिक्षेप आहे.

ह्याच नाटकात नारद व त्याचा शिष्य ह्यांच्या संवादात—

शिष्य : स्वामी, अविश्वासी लक्ष्मीस म्हणू नये. तुम्हांस म्हणावे.

नारद : आम्हांस कां रे ?

शिष्य : सांगतो ऐका. चाहाडास चोरास अविश्वासी म्हणावे. तुम्ही चाहाडचोर याकरिता तुम्हांस अविश्वासी म्हणावे.

नारद : अरे मूर्खा, ऐसे बोलों नये. उगलाच ऐस.

विनोदाचे स्वरूप व्यक्तीच्या मानसिक व बौद्धिक पातळीवर अवलंबून असते. जीवनात विविध प्रकारची विसंगती आढळते. ती नेमकी हेरून ती हास्यकारक रीतीने उचित समयी प्रकट करणे, कृतिउक्तींतील विसंगतीचा स्फोट करणे, हे भोवतालच्या जनसमुदायालाच नव्हे, तर प्रत्यक्ष विनोदविषय ठरणाऱ्या व्यक्तींनाही गमतीचे वाटते. तशा रीतीने ते उघड करणे हे श्रेष्ठ विनोदकाराचे उद्दिष्ट असते. विवेक व भावना या दोन्हींना आवाहन करून निर्मळ हास्य फुलविणारे प्रसंग प्रतापसिंह राजांच्या नाटकांत आढळतात. **उषाकल्याण** या नाटकाचा नायक अनिरुद्ध विदुषकाला—आपल्या मित्राला—आपली प्रिया उषा हिच्या आठवणींनी आपली विरहावस्था कशी दुस्सह झाली आहे, हे पुन्हापुन्हा सांगतो. तेव्हा विदूषक त्याला विचारतो, ‘तुला ती कुठे भेटली ?’

**अनिरुद्ध** : तिला मला स्वप्नामध्ये योग घडला ; परंतु गांव सींव नांव हे काहीचि मला ठावुकें नाही.

**विदूषक** : सख्या, तूं मोठा दैवाचा. जागरावस्थेंत उत्तम स्त्रिया भोगितोस. स्वप्नांतही उत्तम स्त्री भोगिली. दैव माझें जोरावर. जागृत दशेंत फार चांगल्या स्त्रियेचा सहवास मिळाला. स्वप्नात तरी दिव्य स्त्रीचा योग घडेल कीं

म्हणून चिंतिता प्रत्यही कुरुपीच स्वप्नात भेटते. त्या स्त्रियेचे रूप लक्षण सांगतो. ऐक—

वेखंडासम दंतपंक्ति विलसे नासासि सामान्यता।
धम्मिलाकृति निव्वपल्लव तशी तैसी धरी मान्यता ।।
डोळे पक्वपटोल दो कुच जिचे ते लंबलंबूधोपमा।
ऐसी बाईल ज्यासि होईल तरि रामाय तस्मै नमः ।।

आपल्या मित्राचा–अनिरुद्धाचा–मनस्ताप जरा कमी व्हावा व त्याचे मनोविनोदन व्हावे, म्हणून विदुषकाने सांगितलेली व्यथा ही साऱ्या जनसामान्याचीच व्यथा असते. पौराणिक कथांतून नारदमुनीसारख्या भगवद्‌भक्ताच्या अनेक कथा आहेत. त्रिभुवनात सहज संचार असल्यामुळे निरनिराळ्या स्थलकालव्यक्तींसंबंधी वार्ता देणे, कलह वा कलागत लावणे, मत्सर जागृत करणे व त्र्यस्थाप्रमाणे गंमत पाहाणे हा त्याचा स्थायिभाव आहे. तंजावरी नाटकांत बहुतेक ठिकाणी त्याचा उल्लेख **कलहप्रिय** या विशेषणासह केला जातो. **पार्वती-कल्याण** या नाटकात नारद हा शिव व विष्णू यांमध्ये भांडण लावून गंमत पहावी म्हणून हिमालयाला म्हणतो—

नारद : हिमालया, तुझे कन्यारत्न सुवर्ण जो श्रीहरी त्यासी मिळावे.

हिमालय : स्वामी, आपण बोलता ते यथार्थच. परंतु म्या परमेश्वरास कन्यारत्न समर्पावे ऐसें निर्धारिले आहे. कुमारीचा तैसा दृढनिश्चय आहे. यास्तव आपण दया करावी.

नारद : सदा चर्मकारी कुदेशाधिकारी। विराजेविधारी तनू जे विकारी ।।
विनहाप्रकारी जगद्विप्रकारी। रतवांतकारी न तूं अंगिकारी ।।

शिवाची न्यूने सांगणाऱ्या नारदाचा कुंभोदर या शिवगणाला राग येतो व तो शिवमहिमा सांगतो—

कुंभोदर : ईशेशान महेश ज्यास म्हणती वेदांत शास्त्रांतरी।
जो भूतेश उमापति पशुपती सर्वज्ञ संतां घरी ।।
कामारी आणि कालकाल त्रिपुद्वेष्टांधकारी महा।
अष्टाला शिवमूर्ति भूषण नव्हे कैसा परंज्योति हा ।।

शिवाचा हा गौरव ऐकूण नारद विष्णूचे महात्म्य सांगतो—

नारद : जो विश्वंभर विश्वरुपहि हृषीकेशः स्वभू श्रीहरी।
श्रीनारायण वासुदेव म्हणुनी अन्वर्थ नामें धरी ।।
साक्षी जो पुरुषोत्तमाख्य परता चित्तचेत्य वर्गाहुनी।
तोचि ब्रम्ह जगी नसेचि दुसरा उत्कृष्ट की त्याहुनी ।।

शिवगण व नारद यांच्या या वादातून दक्षिणेत शैव व वैष्णव यांच्या तीव्र भावनांचे चित्रण विनोदरूपाने वितंडवाद करवून दाखविले आहे. त्याचा शेवट हिमालयाच्या तोंडून करविला आहे. 'हरिहर दोघेहि येक'. 'जो करित भेद यहीं ते केवळ पापात्मक' असे स्पष्ट सांगून सामान्यांचे अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न केला आहे.

तंजावर मराठी भाषेचे व्याकरण व भाषाविशेष व्याकरण : तंजावरी नाटकांतील भाषेचे स्वरूप व्याकरणदृष्ट्या सोळाव्या—सतराव्या शतकातील मराठीच्या (महाराष्ट्रातील) वळणाचे सामान्यत: आढळते. काही प्रत्यय काही दाक्षिणात्या भाषांच्या लकबीची वाक्ये किंवा काही दाक्षिणात्या भाषांतील शद्व यांचा उपयोग केलेला दिसतो.

प्रथम पुरुषी एकवचनी सर्वनाम 'मी' चे द्वितियान्त व चतुर्थन्त रूप मज, मला आम्हांस आम्हांते असे व 'तू' चे 'तुज' तुम्हांस, तुम्हांते असे दिसते.

'मी' चे तृतीयान्त विभक्तीरूप 'म्यां' व 'तू' चे 'त्वा' 'तां' असे आढळते. पंचमन्त प्रत्यय ऊन हा बहुश: 'कन' शद्वयोगी अव्ययासारखा उपयोग आळढतो. 'आनंदेकन' 'संतोषेंऊन' याचा अर्थ आनंदे करून, संतोषे करून (संतोषाने) असा होतो. 'पासाव' हा पंचमीचा प्रत्यय 'पासून' ह्या अर्थी आढळतो.

मराठी बखरीत आढळणारा भविष्यदर्शक प्रत्यय 'ऊन' तशाच अर्थाने क्रियापदांना जोडलेला आढळतो. 'जाऊनजाऊ' या अर्थी 'करून' —'करू' इ. इ.

महाप्राण 'ह' चा उच्चार व्यंजनातून गाळण्याची प्रवृत्ती आढळते. म्हणाली—मणाली. झाला—जाला.

'य' 'व' चा उपयोग : वेळ—येळ; एक—येक; ओठ—वोठ. 'छ'—चा 'स'. छळ'—'सळ'.

'ळ' चा उपयोग 'ल' व 'ळ' या दोन्ही वर्णांसाठी अर्थभेद विचारात न घेता केलेला आढळतो. ही चक लेखनिकाची असण्याची शक्यता डावलता येत नाही.

## तंजावरी मराठीचे भाषाविशेष

(३) **दाक्षिणात्यांच्या मराठी भाषेतील वाक्प्रयोग**

प्रत्येक भाषिक दुसरी भाषा आपल्या भाषेप्रमाणे बोलतो. दाक्षिणात्यांनी मराठी भाषा बोलताना पुढील वाक्प्रयोग केलेले आहेत :—

'जे नाटक नाचवावे म्हणून योजिलें **की** तेंच नाटक नाचवावे म्हणवून सभ्यांचा नियोग झाला.'

**कोण की** आमच्या धण्यास निग्रह करून देवेंद्रास निजपद देणार ?

देवही **कायकी** यत्नप्रयत्नास लागले आहेत.

अद्यापि श्रीगुरु आले **नाहीत की म्हणउनि** चिंता करीत असतां.

पूर्वी गणपति व्रत **केल्याकरिता** त्याने पुत्र व्हावयानिमित्त.

अरे, तो **काय सांगितलें** रे ?

लक्ष्मी देवीस तरी कोप **आणिला की.**

'भालचंद्र' ऐवजी फालचंद्र.

'छ' व 'श' ऐवजी 'स'. छळ > सळ. शशि > ससी—'सशषां स:'. हेमचंद्र.

'त्वां' ऐवजी 'तां'.

**कोण की** या तपोवनीं बोलिल्यासारखें दिसतो. (**मोहिनी-महेश परिणय**).

शंकराला = शंकर + आला (**हरिहर विलास**).

गुंडोदराला = गुंडोदर + आला (तत्रैव).

कंचुक्याला = कंचुकी + आला (तत्रैव).

**स्वामिनी** निर्भयेंकरून बोलतो. (तत्रैव) स्वामीसी ; स्वामीसंगे.

शचीमुखीची वाक्य ऐकून (**प्रभावती परिणय**).

प्रभावती वाक्य आकर्णून आपल्याला तगाद लागली (प्रभावती परिणय).

**'संदर्भ टीप'**

1. Milton Mark : The enjoyment of Drama, F.S. Crofts and Co., New York-1940, pp. 131

2. William G. Macollom : The Divine Average, A view of Comedy The Press of Case Western Reserve University, Cleaveland, London 1971.

प्रकरण ६ वे

# तंजावरी नाटकांतील काव्य

(१) काव्य विचार

ही नाटके प्रामुख्याने पद्यात्मक असल्यामुळे त्यांतील काव्यस्वरूपाचा विचार आवश्यक ठरतो. ह्या पद्यात्मक स्वरूपातच नाट्यवस्तू ही आकारत असल्यामुळे ही पद्यरचना बहुतांशी कथनात्मक आहे. त्यांमुळे त्यातील काही पदे तर गद्यात्मकच वाटतात; परंतु सामान्यत: ही रचना सुगम व ओघवती भाषेत आहे. कथनाचा ओघ खंडित होणार नाही, अशी सुबोध पदे व श्लोक विविध रसांनी परिपूर्ण असे आढळतात. ही काव्ये अर्थालंकार व शद्बालंकारांनी सुशोभित झालेली दिसतात. उदा. '**मोहिनी महेश परिणय**' ह्या नाटकातील मोहिनीचे वर्णन—

(१) कंदलित आनंदें करून मंदमोहिनी वंदिताती सकलमुनिवृंद

(२) राजहंस गमना ते। राजीवोपमा नेत्री ते।
राजमुखी शोभता ते। रमारमणी ते।।
कलकंठी मृदुवचनी। कस्तूरीतिलक धरुनी।
अलिकुल नीलवेणी। अंबुजपाणी ते।।

'**सीता कल्याण**' ह्या नाटकातील चिमुकल्या रामाचे दर्शन दुक्यत्ययकारक आहे :—

चिमणें चापबाण सुंदर हाती पाठी चिमणा भाता।
बाण मंदिर चिमणा चाले सिंदुर तैसा।
वक्षि द्युमण्हितिसम सुमणिमंडित।
चिमणी माळच विमल झळकत।
काकपक्षधर कोवळा वेष पाकशासन मणि सावळा।
धाकटा भाऊ गुणागळा सवें ज्या कनकप्रभ लाभला।।

असे लोभसवाणें रामदर्शन येथें घडते.

'**उषाकल्याण**' नाटकात सातिकाचे वीरोचित भाषण **वीररसाचा** प्रत्यय आणून देणारे आहे :—

उडवुनी दनुजांची उत्तमांगें शरांनी।
भरिन नगर त्यांच्या शोणिताच्या पुरांनी।।
त्वरित करिन आता सत्यनाम पुरी हे।
निरखुन जन माझी संगरीं चातुरी हे।।

या तंजावरी नाटकांत शृंगार, वीर, हास्य आणि काही ठिकाणी अद्‌भुत रसात्मक रचना प्रेमविव्हल आहे. स्त्री, तिजसाठी केलेले अनेक विरहोपचार, विरहयातनांचे व भावस्थितीचे

वर्णन आणि मीलन ह्यांची चित्रे चांगली केली आहेत; त्यांचा गाभा संस्कृत काव्य नाटकांतील आहे तरीही हृद्य आहे.

उदा. **'सीताकल्याण'** ह्या नाटकात असा प्रसंग चितारला आहे. सीतेला स्वप्नात रामाने येऊन सांगितले, 'मीच तो अज, अनंत, ब्रह्म आणि तूंच माझी युगांयुगींची कांता'. हे ऐकल्यावर सीतेला धन्य वाटले, पण ती म्हणते रामाशी एकरूप व्हावेसे वाटताच 'पापिणी असंभावना' मनात डोकावली अन् तिने माझी बुद्धी चोरली की, हा राम तर दशरथकौसल्येचा पुत्र! हा कुठला अज आणि अनंत? तरीही राम डोळ्यांपुढून हलेना. जिकडे तिकडे तिला रामाचाच भास होऊ लागला.

तमालतरुतामसीरजनी त्या नभा तो यदा।
हिमांशु मुखी गोत्रानन्मणिही देखतें तोयदा।।
समागम गमे तदा रमण रामनामा युवा।
अभालहि पडेल तो विसर राम रामाजिवा।।

अशा ध्यासाने 'वेड लागले चित्ता। वेध दुसरा नाही.'

सीतेचे रूपवणन करिताना कवीची शब्दशक्ती विशेष प्रभावी होते.

सुंदरी जनकनंदिनी येते इंदीवराक्षी हे।
इंदिराचि गुणमंदिर जे सिंधुरगति सुखसिंधूच पाहे।
सिंदूरसीमंतीं सुंदर भरिलासे विद्रुमाधरतिवृंद जी पुढां
इंदुलावण्यनिंदक वदनारविंद जिचें स्वच्छांद नवोढा।।

प्रतापसिंह राजांच्या **'ययातिचरित्र'** नाटकात ययातीने देवयानीला पाहिले आणि त्याला तिच्याविना जीवन असह्य झाले. चंद्राला पाहून तो विदूषकाला (मित्राला) म्हणतो—

विषनिधी गर्मी होता विषकंठाचे शिरी वसे पाहे।
वासुकिचा सहवास रात्रीं दीसही तयामुळे आहे।।
गिळुनि उगविला जो राहूने पर्वकाळीं।
विखतरि यततूसी मांखले सर्व काळीं।।
दिसत जलजबिंबी यासाठीं श्यामरेखा।
इहामृग म्हणणें तें भ्रांति अत्यंत देखा।।

अशी विरहक्लान्त स्थिती वर्णिली आहे.

ह्याच नाटकात रागावलेल्या शुक्राचार्यांचे चित्र तर चित्रदर्शी व प्रत्ययकारी आहे. त्यातील शब्दांचा नाद, उच्चार 'चंड', 'अकांड तांडव', 'कल्पांत' अशा अन्वर्थक शब्दांत क्रोध भावनेचा आविष्कार होतो.

झाला चंड अकांडतांडव शिरीं विद्युल्लतापात कीं।
आला कल्पत अल्पकाल गतिनें कल्पांत उत्पात कीं।।
मोठा काम मनोरथार्णव यथा तत्थ्यस्वयें आटला।
येतां देखुनि शुक्र नाहुषमनी हा भाव पैं वाटला।।

ययातीने शर्मिष्ठेशी गांर्धवविवाह गुप्तपणे केल्याची वार्ता कळल्याबरोबर शुक्राचार्यांला रागाने येताना पाहून ययातीला तसे वाटले.

संस्कृत नाटकांत तपोवनाचे चित्रण करताना तपश्चर्या करणाऱ्या ऋषींच्या तप :— सामर्थ्यामुळे रानातील पशुपक्षी आपापले वैर विसरून प्रेमभावाने नांदताना आढळल्याचे वर्णन अनेक ठिकाणी आले आहे. उदा. शाकुंतलातील कण्वाश्रम, त्या वर्णनाप्रमाणेच—

शरभेंद्र उर्फ सरफोजी राजांच्या 'महेश-मोहिनी परिणय' यामधील हे तपोवन :—

हरिण शृंगतळें हरि खाजवी ।
वदन तोंहि स्थिर मुख स्थिर दाखवी ।
उरगमुंगुसयुग्म परस्परें
ससुख खेळती उंदिर मांजरें ।।

अशा सुगम भाषेतील अर्थपूर्ण काव्ये मनोहर वाटतात; तर काही ठिकाणी भवभूतीच्या[१] मालतीमाधवातील ध्वन्यनुकारी शब्दयोजनेची आठवण पुढील चूर्णिकेत होते. वर्णन जलक्रीडेचे आहे.

अतिविकटतर युगलघटित पदव्रततती मिळित
वहु विरपिवर शिखर पत दत्ति सुरभि विकच कुसुम
निचयगलदमित्तमधु मधुरतर मलयगिरिकुहर बलद निजचल
निजहृदय गजकुमुद कमलचय परिश्रिलित शिशिर तर वारिगोदावरी
माघारीं उतरुनी गौरीहर परस्परें प्रेमपुरस्सरें परिगृहीत
सुरासुरादिकीं स्त्रीपुरुषनिकर परिवाराबरोबरी चिरकांडीप्रभृति
वारिक्रीडासाधनभरें वदननयन हृदयोदरीं सुकुमारीं न कलेवरीं
सुभार धरुनि वारिभार करीत असता . . . .

अशी संस्कृतप्रचुर भाषा सरफोजीच्या 'मोहिनी महेश परिणयात' आढळते.

## (२) छंद विचार

तंजावरी नाटकांत संगीत, नृत्य व नाट्य यांचा त्रिवेणी संगम आहे. त्यांतील संगीत हे दाक्षिणात्य रागतालात गुंफलेले आहे. या नाटकांतील पद्यांश (ध्रुवा) हा 'दरू' ऊर्फ पदे व विविध वृत्ते यांनी संपन्न झाला आहे.

पद्याचा विचार करता 'अिति वृत्तं तु काव्यस्य शरीरं परिकीर्तितम्' वृत्त हे काव्यशरीर असते. त्यामुळे आशयाला रेखीवपणा येतो. प्रतिभावंत कवींनी आशयानुसार वृत्तांची योजना केलेली आढळते. कविकुलगुरु कालिदास याने 'मेघदूत' या आपल्या श्रेष्ठ खंडकाव्यात 'मंदाक्रांता' या वृत्ताची योजना केली आहे. विरहभावना व्यक्त करण्यासाठी मंदाक्रांता हे वृत्त अन्वर्थक ठरते, म्हणूनच कालिदासाने ह्या वृत्तात मेघदूत हे काव्य रचले. आशयानुवर्ती काव्यलेखनाला उचित रचनासौष्ठव लाभले, तर काव्य हृदयंगम होते. यासाठीच कवीला छंदःशास्त्रात गती असणे आवश्यक ठरते. निर्दोष काव्यरचना त्यामुळे शक्य होते.

तंजावरच्या भोसले राजांनी लिहिलेल्या मराठी नाटकांतील पद्यरचनेचा विचार येथे प्रस्तुत आहे. शाहराज ऊर्फ शहाजीराजांनी आपल्या नाट्यकृतींमध्ये पद्याचा बहुतांश 'दरू' ऊर्फ पदे विविध रागांत गुंफलेली आहेत. नाटकांच्या आरंभी गणेशवंदन, सरस्वतीप्रार्थना इत्यादी इष्ट देवतांचे आवाहन करताना भुजंगप्रयात, उपेंद्रवज्रा, अनुष्टुभ् यांची योजना केलेली आढळते.

वंदितो महद्‌भुत देवता। अर्धतनुश्री पुरुषार्थसंयुता।
एक पार्श्वं व्याघ्र चर्मान्यकनकांबरा। वाम पार्श्वं नीलकेश सव्य जटाधरा।

अशी अर्धसमवृत्तरचना[२] कुठे कुठे आढळते.

पंडित कवींनी मराठीत संस्कृताप्रमाणे महाकाव्य रचनेचा उद्योग केला. त्यांपैकी रघुनाथ पंडित, अनंत तनय, माधवस्वामी मेरुकवी, निरंजन माधव इत्यादी कवी तंजावर व आसपासच्या भागात काही काल वास्तव्य करून होते. त्यांनी आपल्या काव्यांत विविध वृत्तांचा, शब्दालंकार व अर्थालंकार यांचा उपयोग केला होता. त्यांच्या काव्याचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संस्कार राजे प्रतापसिंह व शरभेंद्र यांच्यावर झाला. त्याचा प्रत्यय त्यांच्या नाट्यकृतीतील पद्यांत जाणवतो. त्यांच्या नाट्यकृतीत रागदारी-तील पदे (दरू) आहेत. परंतु त्यांच्या बरोबरीने शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, दिंडी. वसंततिलका, कामदा, इंद्रवज्रा, मालिनी, द्रुतविलंबित इत्यादी वृत्तांचा उपयोग समर्थपणे केलेला आढळतो.

प्रतापसिंह राजांच्या '**पारिजात नाटक**' या ग्रंथात नाटककाराचा परिचय प्रेक्षकांना करून देण्यासाठी प्रस्तावनेत पुढील श्लोक शार्दूलविक्रीडित वृत्तात आला आहे :—

धैर्ये मेरुसमान वीर्य जलधि शौर्ये महेन्द्रापरी।
औदार्ये जणुं राजराज दुसरा सत्योक्ति धर्मापरी।।
सौंदर्ये सुमसायकासदृश हा शंभू दयेनें पहा।
तो जाणा नृपसिंह भोंसलमणि भूषाकृती राम हा।।

हे वर्णन वाचताना रघुनाथ पंडिताच्या '**दमयंती स्वयंवरा**'तील नळराजाचे वर्णन स्मरते :—

जो धैर्ये धरसा सहस्रकरसा तेजें तमा दूरसा।
जो रत्नाकरसा गभीर शिरसा भूपां यशें हारसा।।
ज्ञाता जो सरसावलाच सरसांमाझारी श्रृंगारसा।
शोभे तामरसाक्ष नळ रसानाथ स्तवूं फारसा।।

**रघुनाथ पंडित–दमयंती–स्वयंवर:**[३] १७

'**उषाकल्याण**' या नाटकात नाटकाची नायिका बाणासुराची कन्या उषा, प्रियसखी चित्रलेखा, हीस आपल्याला पडलेले स्वप्न सांगते, त्या वृत्तांताचा पुढील श्लोक —

पलंगी कुरंगी सुनेत्री स्वधामी। सुनिद्रासमुद्रांत मग्ना तदा मी।
स्वयें राहतां साहसी कांत पाही। सये पातला तांतडी त्याचे ठाई।।

या पद्यातील यमके व अनुप्रास यांची रंगत ही 'असा पक्षी लक्षी बहु विहगलक्षीं न मिळतां' किंवा 'न रंजे कारंजें, निरखुनि, फणीनें फणफणीं' या रघुनाथ पंडितांच्या[३] काव्यपंक्तीचे स्मरण करून देते.

शरभेन्द्र ऊर्फ सरफोजी राजे यांनीही आपल्या नाट्यकृतीत पदे (दरू) व विविध वृत्तात्मक रचना केली आहे. या दोघांनीही 'चूर्णिका' हा गद्यसदृश पद्यप्रकार यमकयुक्त योजिला आहे. भरतमुनी गद्याला चूर्ण (भ १५/३५) म्हणतात. पुढे गद्य टीकेला चूर्णी म्हणू लागले. नंतर विशिष्ट प्रकारच्या गद्यरचनेला 'चूर्णिका' म्हटले जाऊ लागले. हा पद्यप्रकार गद्यपद्यात्मक असतो. पेशवेकालीन कवी निरंजन माधव यांनी हा पद्यप्रकार 'सुभद्राचम्पू'[४] या काव्यात वापरला आहे.

संदर्भ टिपा

१. मालतीमाधव : भवभूति.

४. पी पी

२. छंदोरचना : मा. त्र्यं. पटवर्धन, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई-२ (१९३७).

३. दमयंती-स्वयंवर : रघुनाथ पंडित—संपा. अ. का. प्रियोळकर, पृ. .

४. सुभद्राचम्पू : निरंजन माधव.

प्रकरण ७ वे

# नाटककार शहाजीराजे

(इ. स. १६८४–१७१०)

## (१) शहाजीराजे–अभिनव भोज

छत्रपती शिवाजी महाराजांचे सावत्र बंधू व्यंकोजीराजे ह्यांनी नायक राजाचा पराभव करून इ. स. १६७४ त तंजावरचे राज्य घेतले; आणि इ. स. १६७६ त राज्याभिषेक केला. राज्याची व्यवस्था उत्तम प्रकारे लावून व्यंकोजीराजांनी दहा वर्षे राज्य केल्यावर आपले पुत्र शहाजी ह्यांच्या हाती राज्यकारभार (१६८४ साली) दिला.

शहाजीराजांचे राजकीय व वाङमयीन कर्तृत्व ह्यासंबंधी माहिती देणारी बहुविध साधने उपलब्ध आहेत. त्यामुळे त्यांच्या संपन्न व्यक्तित्वाचे यथार्थ दर्शन घडते. समकालीन व उत्तरकालीन पंडितांनी व कवींनी शहाजी व त्यांचे वंशज राजांची चरित्रे वा विशिष्ट प्रसंगावर रचलेल्या संस्कृत व मराठी ग्रंथांतून ह्या राजांची प्रतिमा आकारते. हे राजे रसिक आणि गुणग्राहक असल्यामुळे त्यांनी वाङमयीन व कलात्मक प्रवृत्ति जोपासल्या. कवि आणि विद्वान् ह्यांना आश्रय दिला. त्यांचे संस्कृत, तामिळ, तेलगू, मराठी व हिंदी ह्या भाषांवर प्रभुत्व होते. संगीत, नृत्य व नाटक ह्या कलांचे विशेष ज्ञान होते. त्यामुळे त्यांचे वाङमयीन कर्तृत्व विशेष महत्त्वाचे आहे. चोळ व नायक ह्या राजांनी आपल्या राजवटीत शिल्प, संगीत व नृत्य ह्या कलांचा विशेष पुरस्कार केला. त्याचा प्रत्यय चिदम्बरम् येथील नटराजाचे देवालय व तंजावरचे बृहदीश्वराचे मंदिर येथे येतो. नटराज मंदिराच्या गोपुराच्या खांबावर भरताच्या नाट्यशास्त्रात सांगितलेल्या नृत्याच्या १०८ मुद्रा कोरलेल्या आहेत, तर बृहदीश्वराच्या मंदिरात पहिल्या मजल्यावर ८१ मुद्रा आढळतात. कलेचे अभिजात स्वरूप असे जपले जोपासलेले आढळते. अशी ही तंजावरच्या आसमंतात रुजलेली परंपरा मराठे राजांनी समृद्ध केली. त्यात शहाजीराजांचे नाव क्रमाने व कर्तृत्वाने प्रथम घ्यावे लागते. नल्लदीक्षिताने आपल्या 'धर्म विजयचंम्पू' ह्या ग्रंथात शहाजीराजांना 'अभिनव भोज' म्हटले आहे, ते समर्पक वाटते.

## (२) शहाजीराजांचे ग्रंथकर्तृत्व

शहाजीराजांनी संस्कृतमध्ये **'चंद्रशेखर विलास'** हे नृत्यनाट्य, **'शब्दरत्नसमन्वय-कोश'** हा शब्दकोश व **'शब्दार्थसंग्रह'** कोश लिहिले. तेलगुमध्ये जवळजवळ एकवीस नृत्यनाटके व मराठीत आठ नृत्यनाटके रचिली आहेत. मराठी नाटकांची नावे :—

(१) **गंगा-कावेरी संवाद नाटक**
(२) **लक्ष्मी-भूदेवी संवाद नाटक**
(३) **लक्ष्मी-नारायण कल्याण**
(४) **गोवर्धनोद्धारण नाटक**

(५) पंचभाषाविलास नाटक
(६) हरिहरविलास नाटक
(७) सुभद्रापरिणय–दोन प्रती ; तेलगू लिपीमध्ये ; भाषा मराठी
(८) मृत्युंजय चिरंजीव
(९) विश्वातीत विलास (हिंदी भाषेत लिहिलेले)
(१०) राध बनसीधर विलास नाटक (हिंदी भाषेत लिहिलेली)

या नाटकांपैकी **'लक्ष्मीनारायण कल्याण'**, **'पंचभाषाविलास'** व **'सुभद्रापरिणय'** ही तीन विवाह नाटके आहेत; **'गंगा-कावेरी संवाद'** व **'लक्ष्मी-भूदेवी संवाद'** ही अनुक्रमे शिव व विष्णु यांच्या सपत्नीचे श्रेष्ठत्वाबद्दल झालेले संघर्ष; **'गोवर्धनोद्धारण'** हा कृष्णचरित्रातील कृष्णमाहात्म्यदर्शक प्रसंग; तर **'हरिहरविलास'** ह्या नाटकात शिव आणि विष्णु यांचे तुल्यबलत्व, **'मृत्युंजयचिरंजीव'** मध्ये शिवकृपेने चिरंजीव झालेला मार्कंडेय दाखविला आहे. आशयाच्या दृष्टीने ही स्थूल वर्गवारी करता येईल. ह्या नाटकांपैकी **'सुभद्रापरिणय'** ह्या नाटकाच्या क्रमांक ५५३[१] मध्ये कोणाही लेखकाचा नामनिर्देश नाही; परंतु क्रमांक २५७४[१] मध्ये प्रथम 'भोसले शाहराज भूपतीस मंगळ' असा उल्लेख आढळतो; नंतर 'इतिश्रीमत भोंसलकुल। शरफराज विरचित' असा शरभेंद्र राजाचा उल्लेख नाटककर्ता वा लेखक म्हणून येतो. सुरुवातीच्या मंगलाचरणातही 'सुभद्राकल्याण नाटक सरफोजीराजकृतं महाराष्ट्र भाषा लिख्यते' असा उल्लेख आढळतो. तरीही हे नाटक शहाजी राजांचेच असावे, असे अंतर्गत रचनेवरून निश्चित करता येते. ह्याच्या उलट **'सुभद्रापरिणया'** प्रमाणेच तेलगू लिपीत असलेले **'प्रभावतीपरिणय'** हे नाटक शरभेंद्र राजाचे असून सरस्वती महाल, ग्रंथालयाच्या मुद्रित ग्रंथसूचीमध्ये ते शहाजीराजांच्या नावावर घातल्याचे आढळते.

### (३) पल्लकी सेवा प्रबंधम्[२] व इतर तेलगू नाटके

शहाजीराजांनी अनेक मराठी व तेलगू नृत्यनाटके लिहिली. 'शंकर पल्लकी सेवा प्रबंधम्' व 'विष्णु पल्लकी सेवा प्रबंधम्' ही दोन तेलगू भाषेत शहाजीने लिहिलेली उत्कृष्ट नृत्यनाटके आहेत. त्यांतील **'शंकर पल्लकी'** चे प्रयोग उत्सवप्रसंगी, गेली दोनशे वर्षे तिरुवरुर, जि. तंजावर येथे होत आहेत. प्रयोगाच्या खर्चासाठी १० 'वेळी' (Velis) जमीन लावून दिली आहे.

ह्या नाटकाची भाषा प्रौढ तेलगू असून लेखकाची शब्दसंपदा संपन्न आहे. गाणी साधी व रसानुकूल आहेत. काही लोकगीतांचाही समावेश त्यात केला आहे. काही काहीतील अंत्य यमकांचा श्रवणसुभग उपयोग – 'लालि ललय्य लाली' (गीत १९) लक्षणीय आहे. शंकराला नेण्यासाठी आणलेल्या रत्नजडित, शृंगारलेल्या पालखीचे भरघोस आणि चित्रदर्शी वर्णन, पार्वतीच्या अलंकारांचे व रत्नांचे वर्णन राजवैभवाची साक्ष देणारे आहे. नाजुक भावभावना आणि उच्च विचारांचे दर्शन नाटकात घडते. ह्या नाटकात २२ दरू किंवा कथनगीते पदे, २१ श्लोक, १ चूर्णिका, ८ कांडपद्य, १ शीसपद्य, २ उत्पलमाला, ३ चंपकमाला, ४ द्विपदा, २ पद्ये आढळतात.

'तिरुवरुर' येथील मंदिरात कमलाम्बा ही ईशान्य दिशेला अभिमुखी होऊन ईश्वराची प्राप्ती व्हावी म्हणून प्रार्थना करीत असलेली दिसते.

नाटकाची सुरवात **गणेशस्तुतीने** होते. ईश्वराच्या विरहाने व्याकुल झालेली पार्वती आपल्या सख्यांना परमेश्वराला (दरबारात बसलेल्या) बोलावून आणण्याची विनंती करते. त्या परस्परांशी चर्चा करतात. मग गंगा, शंकराच्या हातातील मृग, साप, चंद्र यांपैकी कुणाच्यामार्फत निरोप पाठवावा ह्याविषयी विचार करून यांपैकी कोणीच योग्य नाही म्हणून त्या स्वतःच दोन गीतांमध्ये शंकराची स्तुती करून आपल्या मैत्रिणीची – पार्वतीची विनंती सांगतात. परमेश्वर पालखी सज्ज करावयास सांगतो व निघतो. पालखीच्या भोयांचे गीत हे साधे पण प्रसन्न गीत आहे. शंकर पोचतात. पार्वती अधिरतेने वाट पहाते. सर्व देव येतात. शंकराला वंदन करतात. 'पंतुवराळी' रागात मंगलगान म्हणतात. (Ed, P. Samamoorthy)

संप्रदायाप्रमाणे शंकराला पंतुवराळी, सदरी पान – तेवाराम आणि रामक्रिया (मध्ययुगीन) हे प्रिय राग आहेत. त्यात ४ पदे आहेत.

शहाजीराजांनी उपरोक्त तेलगू नाटकांशिवाय आणखी लिहिलेली नाटके याप्रमाणे आहेत : भक्तवत्सलविलास नाटकम्, पार्वतीपरिणयम्, रतिकल्याणम्, शचिपुरंदरनाटकम्, श्रीकृष्णविलासनाटकम्, रामपट्टाभिषेक, रुक्मिणी-सत्यभामासंवादम्, विघ्नेश्वर कल्याणम्, त्यागराजविनोदचित्रप्रबंधम्, सीताकल्याणम्, इत्यादी इत्यादी बावीस नाटके (लेखक त्यांना यक्षगाने म्हणतो) आहेत. असे साममूर्ती यांनी म्हटले आहे. शिवाय भक्तिपर पन्नास पदे, चोवीस, शृंगारपर एकशेतीन, वैराग्यपर नऊ, हास्यकारक चौदा अशी जवळजवळ नीतिपर दोनशेतीन पदे लिहिली आहेत.

तामीळमध्ये ज्या प्रकारची प्रबंधरचना केली जाते, त्याहून वेगळ्या प्रकारची रचना शहाजीराजांची आहे, असे तज्ज्ञांचे मत आहे. त्यांचे शंकरपल्लकी सेवा प्रबंधम्, विष्णुपल्लकी सेवा प्रबंधम्, पंचरात्र व शंकरकाली नटन वाद महानाटक किंवा त्यागराज विनोदचित्र हे चारही प्रबंध त्यांतील नाट्य, संगीत, नृत्य व साहित्य यांचा मनोज्ञ संगम असल्यामुळे लक्षणीय आहेत. चित्रनिबंध ही नाविन्यपूर्ण रचना आहे. त्यात अभिजात नृत्यसंगीतातील नवनवीन रूपांचा आविष्कार आढळतो. त्यागेशविनोद चित्र प्रबंध या नाटकाची कथावस्तू अशी आहे. भद्रकाली ही नायिका आपल्या श्रेष्ठ नृत्यनैपुण्याबद्दल अत्यंत गर्वाभिमानी असते. त्यागेशाला ती नृत्याचे आव्हान देते. तेव्हा श्वेतारण्यवासी त्यागेश नटराजाच्या रूपाने येऊन उत्कृष्ट नृत्य करून तिचा गर्वपरिहार करतो. या नाटकात भद्रकाली व त्यागेश यांचा देवनाट्य (नृत्य) राजनाट्य व देशनाट्य यासंबंधी वादविवाद व त्या निमित्ताने संगीत व साहित्याचे विविध प्रकार योजिले आहेत. त्यात विद्वतप्रश्नलीलादरू, भावलीलादरू, प्रबंधलीलादरू इत्यादी अनेक दरूंची संगीतमालाच गुंफली आहे. शहाजीराजे हे त्यागेशभक्त होते. त्यामुळे हा प्रबंध रचताना संगीत, नृत्य व नाट्यातील विविध प्रकारांचा कौशल्यपूर्ण उपयोग त्यांची व्युत्पन्नता विशद करतो.

शहाजीराजांनी संस्कृतमध्ये लिहिलेले संस्कृत नाटक 'चंद्रशेखर विलास नाटकम्' याचेही संविधानक, गद्य व संगीत व एकंदर स्वरूप त्यांच्या मराठी व तेलगू नाटकांसारखे आहे. त्यांनी ते 'यक्षगानात्मकम्' म्हटले आहे. त्यातील प्रस्तावना, मंगलाचरण, इष्ट देवतांची स्तुती, कंचुकी, त्याचे विनोदी भाषण, दरू, त्यांचे रागताल, नर्तनासाठी आलेल्या देवांगनांचे रूपवर्णन इत्यादी इत्यादी मराठी नाटकांप्रमाणेच आहे. भरतवाक्यप्राय 'मंगलम्' झाल्यावर स्वनाममुद्रा पुढीलप्रमाणे आहे : "इति श्रीमद्भोसलकुलाम्बुधिसुधाकर श्रीशाहराजविरचित चन्द्रशेखरविलासमहानाटक सकलरसिक विद्वज्जनप्रीतये सकलश्रेयसे श्रीत्यागेशसाम्ब शिवार्पणमस्तु"

त्यांच्या मराठी नाटकांप्रमाणे हेही एकांकी आहे. त्यातील संस्कृत भाषा सुगम व ओघवती आहे. त्याचे कथानक समुद्रमंथनातून आलेले हलाहल विष, सर्वांच्या कल्याणासाठी शंकराने प्राशन करून कंठात ठेवले, म्हणून त्याला 'नीलकंठ' नाव पडले. विषाची दाहकता कमी व्हावी म्हणून शंकराने चंद्रकोर माथ्यावर घेतली, म्हणून 'चंद्रशेखर' हे अर्थपूर्ण नाव प्रचारात आले.

## (४) नाटककार शहाजीराजे

शहाजीराजांच्या नाटकांतील मंगलाचरण व नाट्यपरिचय :

शहाजीराजांच्या संस्कृत, मराठी व हिंदी नाटकांतील मंगलाचरण सामान्यतः पुढीलप्रमाणे शंकरस्तुति किंवा शंकर विष्णुस्तुति करणाऱ्या पदस्वरूपात आढळते.

(राग नाट. ताल झंपा)

जय पार्वतीरमण । जय पन्नगाभरण ।।
जय सुरनुतचरण । जय दीनतरण ।।

.......... ..........

.......... ..........

जय भवानि सहाय । जय नमः शिवाय ।। जय जय ।।

पाच नाटकांत ह्या बारा चरणी पदाने किंवा काही नवीन चरणांच्या अंतर्भावाने केलेले आढळते; व तीन नाटकांत पुढील मंगलाचरण आढळते :

(राग नाट. ।। तोडेम् ।। ताल झंपा)

जयजयधि गंभीर । जय सुरुचिराकार ।
जय सफल आधार । जय रघुवीर ।।
जय शामल शरीर । जय रूपजितमार ।

........................

जय जानकी कलत्र । जय तारित गोत्र ।
........................
........................
जय करुणा विशाल । जय भक्तानुकूला ।। जय जय ।।

मंगलाचरणानंतर विघ्नहर्ता गणेश, कविप्रतिभाप्रेरक देवता सरस्वती, परमेश्वर आणि विष्णू यांची प्रार्थना संस्कृत व मराठी श्लोकबद्ध रचनेत आढळते. शहाजीराजांच्या आठही मराठी आणि संस्कृत व हिंदी नाटकांत ह्याच पद्धतीने प्रार्थना केलेली आढळते. प्रार्थनेनंतर श्रीगणेश नृत्य करीत रंगमंचावर येतो. ही प्रथा तामिळनाडमध्ये रूढ असलेल्या '**थेरुकुथू**' (वीथीनाटक) ह्या नृत्यनाटकांतून तंजावरच्या रंगभूमीवर आली असावी. कारण, दाक्षिणात्य नृत्य-नाटकांपैकी यक्षगान, कुचिपुडी वा इतर प्रकारांत गणेशपूजा वा स्तुति पडद्याआडच करतात; परंतु '**थेरुकुथू**' नृत्यनाटकात नट हत्तीची सोंड मुखावर चढवून नृत्य करीत येतो, सूत्रधार वा संगीतकार गीत म्हणतात. गणेश स्थानापन्न होतो व अर्चक पूजा करितो. 'थेरुकुथू' मध्ये सूत्रधाराला 'कट्टीकरण' म्हणतात. शहाजीराजांच्या नाटकात '**लक्ष्मी-भूदेवी संवाद**' मध्ये 'कटी' व 'सूत्रधार' दोन्ही शब्द योजिले आहेत.

## (५) सूत्रधार

शहाजीराजांच्या नाटकांतील सूत्रधार हा संस्कृत नाटकांतील सूत्रधाराप्रमाणे नाट्यवस्तूचा आणि नाटककाराचा परिचय करून देतो. प्रेक्षकांची स्तुति करितो. '**थेरुकुथू**'तील कट्टीकरण व '**यक्षगानां**'तील भागवत ह्यांचेच अनुकरण सूत्रधार करितो. त्यांच्याप्रमाणेच तो पात्रांशी संवाद करितो, निरनिराळ्या मनोभावनांचे सविस्तर वर्णन करितो. प्रत्येक पात्राचें आगमन व निर्गमन श्लोक वा पदद्वारा गाऊन सांगतो. पात्रांच्या नृत्याभिनयाच्या वेळी 'सोल्लुकुट्टु' म्हणजे नृत्ताचे बोल म्हणतो. निरनिराळे प्रवेश वा प्रसंग ह्यांतील दुवे जोडतो. नाटकांच्या नांदीपासून भरतवाक्यापर्यन्त सूत्रधार रंगमंचावर उभा राहून नाटकाचे दिग्दर्शन, संगीत, गद्यसंवाद व निरनिराळ्या प्रसंगी योग्य ती रसनिष्पत्ति कुशलतेने करीत असतो.

## (६) विदूषक आणि विनोद

सूत्रधाराच्या प्रास्ताविकानंतर, संस्कृत नाटकांत विनोदनिर्मितीसाठी योजिलेला व नायकाचा मित्र म्हणून उपस्थित असणारा विदूषक, तंजावरच्या नृत्यनाटकांत बहुरूपी संचार करताना आढळतो. तो निवेदक, निरोप्या व नोकर ह्या भूमिका करीत असतो. शिवाय देवालयांतील अर्चक, ज्योतिष पाहणारा, जन्मटिपण करणारा जोशी, खादाड, आगंतुक ब्राह्मण, बाष्कळपंत, चिन्नाचार्य व दोड्डाचार्य (चिन्न= लहान; दोड्ड=मोठा) वेड्यावाकड्या उड्या मारीत नाचत येणारा कंचुकीराय विनोदी, गुरुजनांविषयी अनादराने बोलणारे शिष्य इत्यादी अनेक पात्रे विनोदनिर्मितीसाठी योजिली आहेत. ह्या विनोदाचे स्वरूप विविध प्रकारचे आहे.

## (७) अनेकभाषाविद शहाजीराजे

शहाजीराजांना अनेक भाषा अवगत होत्या. मराठी ही मातृभाषा; संस्कृत ही अनेक कला व शास्त्रभांडाराची किल्लीच म्हणून त्या काळात तिच्या व्यासंगाची आवड; तेलगू ही त्या काळची सांस्कृतिक महत्त्व पावलेली भाषा; तामिळ ही

भोवतालच्या लोकांची भाषा व व्रज हिंदी ही उत्तरेशी दुवा जुळवणारी अशी भाषा; ह्या सर्व भाषांत ग्रंथरचना करण्याएवढी पारंगतता ह्या राजाजवळ होती. **'पंचभाषा-विलास'** हे नाटक त्या पाच भाषांत लिहिले आहे. ह्या नाटकाची कथावस्तू अशी— श्रीकृष्णावर अनुरक्त असलेल्या चार राजकन्या (१) कान्तिमती, द्रावीड राजकुमारी तामीळ भाषेत, (२) कलानिधी, आन्ध्र राजकुमारी तेलगु भाषेत, (३) कोकिलवाणी, महाराष्ट्र राजकुमारी मराठी भाषेत आणि (४) सरसशिखामणि, उत्तरदेश राजकुमारी हिंदी भाषेत ह्या आपली प्रेमभावना व्यक्त करतात. कृष्ण आणि सूत्रधार संस्कृतमध्ये बोलतात. सूत्रधार व चेलि हे सर्वभाषाविद असल्यामुळे ते त्या तरुणींच्या भावना कृष्णाला संस्कृत भाषेत निवेदन करतात. सर्व जणी 'संस्कृतभाश्रित्य' कृष्णदेवाची प्रार्थना करितात व त्यांचा कृष्णाशी विवाह होतो. ह्या नाटकाच्या शेवटी शहाजी-राजे आपला उल्लेख 'श्रीमत्सकलभाषा कवितानिर्वाहक भोंसलकुल शाहनायक विरचितं पञ्चाक्षरीरूपप्रचकारणं पञ्चवदन त्यागेशकृपया पञ्चभाषाविलासमहानाटकं' असा करितो. त्यांच्या **'श्रीलक्ष्मीनारायण कल्याण'** ह्या नाटकात चिन्नाचार्य व दोड्डाचार्य ह्यांचा सर्व संवाद तामिळ भाषेत आहे. **'मृत्युंजय चिरंजीव'** ह्या नाटकात मध्येच एखादे वाक्य तेलगूमध्ये आढळते. बहुतेक नाटकात शिव व गणेशस्तुतीपर श्लोक संस्कृतमध्ये आढळतात. **'चंद्रशेखरविलास'** हे नाटक संपूर्णपणे संस्कृत भाषेत आहे; तर **'विश्वातीत विलास'** आणि **'राधा बनसीधर विलास नाटक'** हीं नाटके हिंदीत आहेत. शहाजीराजे हेच हिंदी नाट्यसृष्टीचे जनक होत.

### (८) नाटकातील प्रमुख पात्रे

शहाजीराजांची ही सर्व नाटके आनंदपर्यवसायी आहेत. त्यांतील नायिकांचा प्रथम प्रवेश म्हणजे दर्शनीय शरीरसौंदर्याचे पुष्कळसे साचेबंद वर्णनच आढळते. उदा—.

राजहंसगमना ते । राजीवपत्र नेत्री ते ।
राजमुखी शोभते ते । सभामणी ते ।
कलकंठी मृदु वचन । कस्तुरि तिलक धरुनि ।
अलिकुल नीलवेणी । अंबुजपाणी ।।
जरि चोळी साडी नेसोनी । जवे बाजुबंद लेवुनि ।
वर कन्यकामणी वंदनीय जनी ।।
सादर शृंगार खाणी । सकल सौंदर्य वाणी ।
मोदें आली करिराजगमनी मोरावाणी ।।

दुसऱ्या गीतात —

इंदुमुखीचे स्तनइभकुंभ जानु ।
मंदगतीने जिंकिते मदहंसगामिनी ।
कलकंठी कंजना जिंकी कन्या नेत्रेऊन ।
अलि नीलवेणी जिंकी अमृत आपले अधराने ।।

ह्याच शब्दांनी लक्ष्मीचे चित्रण केलेले आढळते व ह्याच रीतीने विष्णुसमोर नृत्य करण्यासाठी बोलाविलेल्या नृत्यांगनांचे दर्शन घडते. फरक एवढाच त्यांचे कार्य 'नयन कटाक्ष विंधूनि मोहवी नवयुवा जनां' हें लेखकाच्या लक्षात असते. म्हणून—

मदनास्त्रदेवता त्या संगीत निपुणा। मंदराद्रि कुचोपमा त्या।
भूषणाच्या भूषण त्या भृंगारुनि भूमंडळीं शोभती त्या।

अशी त्यांची भलावण केलेली असते.

शिव, विष्णु, अर्जुन हे नायक आणि पार्वती, गंगा, कावेरी, लक्ष्मी, राधा, सुभद्रा या नायिका. ह्यांच्यासारख्या जनमानसांत वंदनीय असलेल्या पात्रांमुळे लेखक त्यांचा परिचय वा व्यक्तिचित्रण करण्यात शब्दव्यय करीत नाही. त्यांतील मुख्य रसपरिपोष करण्यातच तो रस घेतो. उदा. **'लक्ष्मीनारायण कयाण', 'पंचभाषाविलास', 'सुभद्रा-परिणय'** ह्या स्वयंवर नाटकांत नायकनायिकांची विरहावस्था व परस्परानुराग यांचेच चित्रण आढळते. **'लक्ष्मी-भूदेवी संवाद'** व **'गंगा-कावेरी संवाद'** ह्या नाटकांत सवतीमत्सर व एकमेकींच्या उखाळ्यापाखाळ्या काढणाऱ्या व पतीला मोठ्या शृंगा-पत्तींत आणणाऱ्या स्त्रियांचे चातुर्याने चित्रण केले आहे. **'गोवर्धनोद्धारण'** व **'मृत्युंजय चिरंजीव'** ह्या नाटकांत कृष्ण, व शंकराचे भक्तप्रेम व संकटमुक्त करण्याची आवड दाखविली आहे; तर **'हरिहरविलास'** ह्या नाटकांत शिवविष्णूंच्या ईर्षेच्या भावनेतून परिहास उत्पन्न झालेला दाखविला आहे. अशी ही सर्व नाटके म्हणजे संगीत, नृत्य व मनोरंजक कथा ह्यांचा संगम आहे. ह्या बहुतेक नाटकांत नारदाचे पात्र त्या त्या प्रसंगाची महत्ता वाढविणारे व हास्यविनोदाला रोचकता आणणारे ठरले आहे. ही सर्व नाटके म्हणजे दरूंची अर्थात गीतांची व नृत्यांची मालिकाच होत. प्रमुख पात्रे कर्नाटकी रागदारीच्या पार्श्वभूमीवर नृत्यांतून अभिनय व भावदर्शन घडवितात. इतर पात्रांच्या तोंडी श्लोक, वृत्तबद्ध रचना, चूर्णिका ह्या योजिल्या आहेत. त्यामुळे सबंध नाटक म्हणजे घटनांची मांडणी व विनोद हे गद्यात आणि भावनात्मक प्रतिक्रिया लयबद्ध संगीत नृत्यात अशा स्वरूपाचे जाणवते.

### (९) तंजावरी नाटकांतील जनसामान्य

तंजावरी नाटकांतील प्रमुख पात्रे सामान्यतः देव, देवत्व पावलेले अवतारी पुरुष किंवा पौराणिक व्यक्ती याच असतात. **'राजकन्या परिणय'** सारखे शहाजीराजांवरच लिहिलेले नाटक वगळल्यास ऐतिहासिक व्यक्तीही नाटकाचा विषय झालेली नाही. या देवतुल्य व्यक्तींचे आचारविचार, मनोभावना, विकार, वासना या मानवीच चितारल्या आहेत. त्यांच्या आवतीभोवती सामान्य माणसे या ना त्या रूपाने नाट्य-विषयाशी एकरूप झालेली आढळतात.

**'गंगा-कावेरी संवाद नाटक'** या नाटकात कावेरी नदीचे आगमन होताच तिच्या दर्शनासाठी चोळमंडळातील 'कुणबीजन निजोद्योगाकारणे येतात'.

'खोरी हाती घेउनि कुदली खाणून ......' असे रंगमंचावर शेतीची अवजारे घेऊन कुणबी – शेतकरी कावेरीला नमन करण्यासाठी प्रथम येतात. हे फार सयुक्तिक आहे

नंतर मंगलारती करण्यासाठी सुवासिनी, विद्वान व तडीतापसी भगवी वस्त्रे घालून व सर्वांगाला भस्म चर्चून येतात. नदीच्या पाण्यावर शेती अवलंबून असणाऱ्या शेतकऱ्यांपासून ते सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशांपर्यन्त लोकमाता नदी सर्वांना कशी पूज्य व आधारभूत वाटते. याचे हे मार्मिक दर्शन आहे. शिवाय रंगमंचावर आपले प्रतिनिधी आहेत, याचा जनसामान्यांना वाटणारा दिलासा आहे.

विनोदासाठी योजिलेले विदूषक, कंचुकीराय, म्हातारा ब्राह्मण, बाष्कळपंत, भिकाजी नाईक, गणदास, गुंडोदर इत्यादी अनेक रूपांनी परंतु एकाच हेतूने येणारे हे पात्र समाजातील सर्व परिचित असेच आहे; परंतु त्यात काही वेळा समाजातील पौरोहित्य करणाऱ्या अनाचारी, आचारभ्रष्ट, वेश्यागमनी व निर्लज्ज अशा ब्राह्मणाचे चित्र लोकांसमोर ठेवून विनोदाबरोबरच त्या वर्गाच्या अधःपातावर टीकाही प्रच्छन्नपणे केली आहे.

बरीचशी नाटके कल्याण-नाटके (विवाह) असल्यामुळे मुहूर्त निश्चित करण्यासाठी जोशी पंचांग घेऊन येताना दाखविला आहे. भविष्य वर्तविण्यासाठीही जोशी येतो व नायक किंवा नायिकेकडून इष्ट भविष्यकथनासाठी मोठी बिदागी घेऊन जातो. भविष्य सांगण्यासाठी पिंगळा – भविष्य व शकुन सांगणारा – याचीही योजना केलेली आढळते; परंतु भविष्य व शकून सांगून नायिकेला तिच्या विरहावस्थेत दिलासा देणारी खरी हितचिंतक म्हणजे कुरवंजी किंवा बुरुडीण, कैकाडीण ही होय. 'कै काय कै काय' म्हणत येणाऱ्या कैकाडीणीला मध्यवर्ती पात्र करून कोर्वंजी नाटके लिहिली गेली. पाठीवर मूल बांधून, हातात सुपे, टोपल्या घेऊन ही त्रिकालज्ञानी बुरडीण रंगमंचावर येते. व्याकुळ नायिकेला – मग ती इंद्राणी, लक्ष्मी, सीता, शिवकामसुंदरी यांपैकी कोणीही असो – ती नायक भेटीचे आनंददायी भविष्य सांगते व सूपभर मोत्ये, उंची वस्त्रालंकार घेऊन जाते. जोशी, पिंगळा, कैकाडीण यांवर एकनाथांची उत्कृष्ट भारुडे आहेत व त्यांत त्यांचे लोकजीवनातील कार्य बारकाव्याने वर्णिले आहे. त्यांच्या रूपकात्मक रचनेचा हेतू आध्यात्मिक असला, तरी त्यांतील समाजदर्शन अचूक आहे.

## (१०) 'राजकन्या परिणय[४]' नाटक

'शाहमहाराजाश्रित त्रियंबक जोतिर्विदें शाहमहाराजास संतोषाकारणें अंकित करूनि रचिलें' असे सुरवातीलाच नाटककाराने प्रस्तावनेत म्हटले आहे. या नाटकाचे संविधानक – चंद्रवंशाच्या काश्मीर देशच्या राजाच्या कन्येने त्यागराज रथोत्सवाच्या वेळी शाहराजांना पाहिले आणि तिचे त्यांच्यावर प्रेम बसले. ती अति सुंदर, काव्यकला निपुण, संगीतज्ञ, सुलक्षणी तर राजे रसिक, कलाभिज्ञ व शूर, फिरंग्यांची दाणादाण करणारे अवरंगशाहसुद्धा त्यांना भीतो, मोगल सैन्याला धाक लावणारे, सारे राजे अवनत होऊन स्वतः करभार आणून देणारे अशा राजावर राजकन्येचे मन जडले. हे कळताच तिचे मातापिता शाहराजांच्या अनुज्ञेने त्यांचा विवाहसोहळा मोठ्या थाटामाटाने साजरा करतात.

शहाजीराजांच्या आश्रित त्र्यंबक जोतिर्विद या कवीने त्यांच्यासमोर हे "वेषभाषा-श्रृंगारभूषितें नटन्त भावाभिनयें" करून दाखविले. शहाजीराजांची लोकप्रियता, त्यांचे चौफेर कर्तृत्व यांचा गौरवपूर्वक उल्लेख हे या नाटकातील महत्त्वाचे अंग व तदनुषंगाने एका सुंदरीचे प्रेमाकर्षण व पाणिग्रहण यांचे चित्रण आहे. शहाजीराजांचे रूप, रणगाजी व्यक्तित्व व वाङ्मय, संगीत, नृत्य या कलांचे क्रियाशील प्रेम यांचे राजकन्येच्या तोंडून केलेले वर्णन, राजकन्येचे लावण्य व कलाभिज्ञता, तिची विरहावस्था हे नाटकाचे केंद्रबिंदू आहेत. "नृपाल शाहजी करीं, धनुष्य बाणहि धरी, अरी वसुंधरीवरी, बहुत धाक वाहति"– अशी प्रासयुक्त, नादवती रचना नाटकात सर्वत्र आढळते.

### संदर्भ टिपा

१. दोन्ही प्रती क्र. ५५३ व क्र. २५७४ तेलगू लिपी वापरून मराठी लिहिलेल्या आहेत. त्यांचे लिप्यंतर मी करून घेतले.

२. Pallaki Seva Prabhandham : Telugu opera of Shahaji Maharajah. Ed. P. Samamoorthy, The Indian Music Publishing House, Madras.

३. 'चंद्रशेखर विलास नाटकम्'

४. 'राजकन्या परिणय' — (हस्तलिखित) त्रियंबक जोतिर्विद.

प्रकरण ८ वे

# राजे एकोजी यांचे 'शाकुंतल' व राजे तुळजाजी यांचे 'कमलाम्बात्यागेश'

## (१) राजे एकेन्द्र ऊर्फ एकोजी

शाहराज ऊर्फ शहाजी राजे यांच्या नंतर त्यांचे धाकटे बंधू सरफोजी गादीवर आले त्यांच्यानंतर तुकोजी ऊर्फ तुळजेन्द्र राजे तंजावरचे राजे झाले. त्यांचे पुत्र एकेन्द्र ऊर्फ एकोजी हे इ. स. १७३६ मध्ये गादीवर आले व एकच वर्ष राज्य केले. त्यांनी 'कमलाम्बात्यागेश परिणय' व 'शाकुंतल' ही दोन नाटके लिहिली.

भोसले घराण्याचे दैवत शिव आहे. तंजावरच्या राजांच्या कुलदैवताचे उल्लेख चंद्रमौलीश्वर, पंचनदीश्वर, त्यागराज, त्यागेश असे येतात. तंजावरपासून तीस-चाळीस मैलां-वर कावेरीतीरी महादेवपट्टण ऊर्फ तिरुवारूर गावी त्यागराजाचे मंदिर आहे. याच दैवताला अनुलक्षून कमलाम्बात्यागेश परिणय हे नाटक लिहिले आहे. हे नाटक नान्दी, मंगलाचरण इत्यादी इतर नाटकारंभी येणाऱ्या प्रास्ताविकाने सुरू न होता एकदम इंद्र म्हणतो,— 'त्यागेश्वरास घेऊन त्या स्थळी प्रतिष्ठा करा हो'. त्याप्रमाणे शुभ मुहुर्त पाहून मुचकुंद ऋषी त्यागेश्वराची प्राणप्रतिष्ठा करतात. दर्शनासाठी कमलाम्बा येते व भक्तिभावाने स्तोत्र म्हणते. तिच्या मनात त्यागेशाबद्दल प्रेमभावना निर्माण होऊन ती व्याकुळ होते. तिच्या सखी धवल वराहस्वामींना सांगून तिचा विवाह कल्याण मंडपात देव, ऋषी, गंधर्वांच्या समोर त्यागराजाबरोबर लावतात.

हे नाटक इतर नाटकांप्रमाणे भावदर्शन व पात्रपरिपोष याबाबतीत फारच उणे पडते. ते एकसंध न वाटता त्रुटित वाटते. वारंवार राजाला आशीर्वाद मागून कृत्रिम रीत्या कथाप्रवाह खंडित केलेला आढळतो.

## (२) शाकुंतल नाटक

इतर तंजावरी नाटकांप्रमाणे या नाटकाची सुरुवात कुलदेवता, विघ्नेश्वर यांच्या प्रार्थनेने होते. भोसले वंशाची उज्ज्वल परंपरा सांगून वसंतऋतूचे दोन संस्कृत श्लोकांत वर्णन केले आहे व दुष्यंतराजाच्या आगमनाची सूचना आहे. तो शिकारीसाठी हरिणाच्यामागे लागून आला असता, आश्रमातील शकुंतला त्याच्या दृष्टीस पडते. या नाटकाचे संविधानक कविकुलगुरु कालिदास यांच्या उत्कृष्ट नाट्यकृती अभिज्ञान शाकुंतलम्‌वरून घेतले आहे. परंतु वर दिलेल्या सुरुवातीवरूनच लक्षात येईल की, मुळात आश्रमातील वातावरण, शकुंतला व तिच्या मैत्रिणी यांचे स्वभावरेखन, त्यातील काव्यात्म भाषा याचा इथे मागमूस नाही. एकमेकांस पाहताच प्रेमाने विद्ध झालेला दुष्यंत व शकुंतला, यांची विरहावस्था व नंतर राजाने मुद्रिका देऊन केलेला गांधर्व-विवाह, पुत्रजन्म व शकुंतलेला दुष्यंताकडे शिष्यांनी पोचविणे व दुष्यंताने तिला न

ओळखणे असा क्रमाने नाट्यवस्तूचा विकास दाखविला आहे. दुष्यंत शकुंतलेला न ओळखून प्रश्न विचारीत असता नारद येतो व राजाचे समाधान करतो. नंतर राजा पुत्राचे नाव भरत ठेवून त्याचा गंधर्वकन्या सुकन्या हिच्याशी विवाह लावतो.

या नाटकात दरू विविध रागतालांत रचिले आहेत. श्लोक, अनुष्टुभ् छंदात व प्रासबद्ध चूर्णिका आहे.

---

**संदर्भ टिपा**

१. प्रतापसिंहेन्द्र विजय प्रबंध — रामकृष्ण कवि पण्डित,
Madras Government Oriental Series, Vol. VIII,
Poornachandrodaya Press, Tanjore.

२. यक्षगान भागवत नाटक.

प्रकरण ९ वे

# नाटककार राजे प्रतापसिंह

(इ. स. १७३९–१७६३)

## (१) यथार्थनामा राजे प्रतापसिंह

हे तंजावरच्या भोसले कुळातील सर्वार्थाने थोर कर्तबगार पुरुष होते. इ. स. १७३६ मध्ये व्यंकोजी (एकोजी) राजांचे नातू दुसरे एकोजी मृत्यू पावले व साऱ्या राज्यात अंदाधुंदी माजली. इ. स. १७३९ पर्यंत हे अराजक चालले. नंतर तत्कालीन मुत्सद्यांनी दृढ निश्चयाने शहाजी राजांचे कनिष्ठ बंधू तुळजाजी यांचे सुपुत्र प्रतापसिंह यांना गादीवर बसविले. आपल्या पित्याप्रमाणेच प्रतापसिंह हे शूर, रसिक व गुणी होते.

प्रतापसिंह गादीवर आले त्यावेळी दक्षिणेत महत्त्वाकांक्षी इंग्रज व फ्रेंच हे सत्ता काबीज करण्यासाठी धडपडत होते. कर्नाटकचा नवाब दोस्त अली हा प्रजेवर जुलूम करीत होता. समकालीन कवी रामकृष्ण याने 'प्रतापसिंहेन्द्र विजय प्रबंध'' या काव्यात दोस्त अलिखानाचा उद्दामपणा व प्रतापसिंहांनी त्याचा केलेला संपूर्ण नाश विस्ताराने चितारला आहे. इंग्रज व फ्रेंच यांच्याही हालचालींना त्यांनी पायबंद घातला. प्रताप-सिंहांच्या पराक्रमाची गाथाच 'प्रतापसिंहेन्द्र विजय प्रबंध' मध्ये गायिली आहे. त्यांचे व्यक्तित्व पुढील शब्दांत चित्रित केले आहे.—

रूपाने मदनावतार दुसरा भूपावळीचा तुरा ।
बापाहूनि गुणाढ्य फार न शिवे पापाचिया वागुरा ।
कोपातीत सदैव शांतहि बुधां जो पाळिता सद्गुणी ।
सोपानी शिवभक्तिच्या स्थित सदा सोपा भल्यां लागुनी ।।

स्वभावाने शांत, पराक्रमी, सद्गुणी, विद्वज्जनांचे चाहते व गुणग्राहक प्रतापसिंह प्रजाजनांमध्ये फार प्रिय होते. त्यांच्या पूर्वजांप्रमाणेच ते संस्कृत, तेलगू, तामीळ व मराठी भाषा व संगीत, साहित्य, नाट्यशास्त्र, नृत्य इ. कला यांमध्ये पारंगत होते. त्यांनी आपल्या नाटकांमध्ये आपल्या गुरूचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे :—

जो ब्रह्मवित्तम शिरोमणि पुण्यराशी ।
ऐसें वशीकृत सदाभहि जो वराशी ।
अद्वैत बोध सुखसागर पूर्ण सोमा ।
वंदू तया गुरुस जो धरि सेतु नामा ।।

सेतुस्वामी हे रामदासी पंथाचे होते. त्यांच्यामुळेच राजे रामभक्त झाले असावे. त्यांनी प्रत्येक नाटकात श्रीरामाचे महात्म्य विशेष गायिले आहे. 'सीता कल्याण' नाटक लिहिले असताही 'श्री कोर्वंजी ऊर्फ जानकी सुखोल्लास' हे त्याच आशयावर व

सद्‌गुणी, न्यायी, कर्तव्यकठोर राजा या नात्याने रामप्रभूचे स्तवन प्रतापसिंहांच्या नाटकांत आढळते.

सेतुस्वामींप्रमाणेच श्री दक्षिणामूर्तींचे उल्लेख त्यांच्या पुष्कळ नाटकांत आढळतात.

जीवेश द्वय येक चिच्छन अजि त्रैलोक्याते वेगळें ।
ऐसें वेदरहस्य सुचवुनि जो विज्ञान मुद्राबळें ।
मौनाची हरि शिष्य संशय तथा द्वैतात्मक स्फूर्तिला ।
वंदूं त्या गुरुमूर्तिला समरसें श्री दक्षिणामूर्तीला ।।

अद्वैती, दक्षिणामूर्तीनामक, विद्वान, शिष्यांच्या साऱ्या शंकांचे निरसन करून वेदरहस्य उलगडून दाखविणाऱ्या गुरूला प्रतापसिंहांनी मोठ्या आदराने वंदन केले आहे. प्रतापसिंह हे विद्या, कला व सांस्कृतिक जीवन यांत विशेष अभिज्ञतेने रस घेत. संस्कृत, मराठी, तेलगू इ. भाषांत ग्रंथनिर्मिती करीत व करवीत. त्यांची मुद्दुलपनी नामक तेलगू पत्नी मोठी विदुषी होती. तिने 'राधिकासांत्वनम्' व 'सप्तपदलु' अशी काव्ये लिहिली. त्यांनी स्वतः संस्कृत पंडिती वळणाची काव्ये लिहिली आहेत. धार्मिक वृत्तीने लिहिलेले ग्रंथ उमासंहिता, रामदिनचर्या, इंद्रियजय, इ. त्यांच्या धार्मिक श्रद्धांची साक्ष देतात. व्रतमाहात्म्य सांगणारे हरितालिका, ऋषिपंचमी, अनंतचतुर्दशी यासंबंधीच्या रचना त्यांनी केल्या; परंतु त्यांचे खरे लेखनकर्तृत्व त्यांच्या विपुल व विविध मराठी नाट्यरचनांत आढळते. या नाटकांची संविधानकें प्रामुख्याने भागवत, रामायण व महाभारत यांतील उपाख्यानांवर आधारलेली आहेत. कृष्ण मिश्र यांच्या 'प्रबोध चंद्रोदय' या संस्कृत नाटकाचा अनुवाद ही प्रतापसिंहांची वैशिष्ट्यपूर्ण निवड आहे.

## (२) मराठी नाट्यरचना

'प्रबोधचंद्रोदय' हे अनुवादित नाटक रूपकात्मक स्वरूपाचे आहे. त्यातील नायक विवेक आहे. मनातील सद्‌भावना ही सत्पक्षाला पूरक व विकार, वासना या असत्पक्षाला पोषक यांमधील संघर्ष हा नाट्यविषय आहे. या नाटकाची भाषांतरे व रूपांतरे भारतीय व पाश्चात्य भाषांत झालेली आहेत (पहा—परिशिष्ट) यावरून त्याची लोकप्रियता दिसते.

**बाकीची नाटके.**—सीताकल्याण, उषाकल्याण, पार्वतीकल्याण, रुक्मिणीकल्याण, मित्रविंदापरिणय, मायावती परिणया, लक्ष्मणा परिणय, प्रभावती कल्याण, श्री कोवंजी ऊर्फ जानकी सुखोल्लास, स्यमंतकोपाख्यान, अनुसूया उपाख्यान, ध्रुवचरित्र, ययाती चरित्र, रुक्मांगदचरित्र, पारिजातक नाटक व कृष्णजनन अशी आहेत. यातील निम्म्याहून अधिक विवाहनाटके आहेत; बाकीच्यांत ध्रुव व रुक्मांगद या भक्तांच्या ईश्वरनिष्ठेचे माहात्म्य आहे. अनसूया उपाख्यान हे पतिव्रतेची थोरवी सांगून सर्व स्त्रियांनी पतीची सेवा करावी हा उपदेश करणारे नाटक आहे. पारिजातक नाटक व ययाती चरित्र यांमध्ये सवती मत्सराचे दोन वेगळे नमुने हृद्य रीतीने रेखाटले आहेत.

या साऱ्या नाटकांचा साकल्याने विचार करता प्रतापसिंहांची संविधानकांची नाट्यानुकूल निवड, मांडणीचे कौशल्य, उत्तम काव्यरचना, प्रगल्भ विनोद, आणि नेमके स्वभाव दर्शन, घडविले आहे. काव्यशास्त्र व तत्त्वज्ञान यांची जाण आणि प्रौढ व पात्रानुकूल भाषा

या गुणांचा प्रत्यय या नाटकात येतो. नाट्यवस्तू निवडताना ज्यांत संघर्ष आहे—मग तो स्वभावजन्य, परिस्थितीजन्य वा विशिष्ट संकेतांतून निर्माण झालेला असो—त्यामुळे नाटकाची रंगत वाढते. आबालवृद्धांना नाट्यप्रयोग पाहताना उत्कंठा वाटावी, नृत्यसंगीताने मन उल्हसित व्हावे, नाट्यविषयांतील भावनिक आंदोलने जाणून विविध रसोत्कर्ष व्हावा अशीच नाट्यरचना प्रतापसिंहांनी केली.

### (३) नायक व नायिका

स्वतः प्रतापसिंह हे उत्तम योद्धे, कुशल सेनापती व विचार धुरंधर राजे होते. त्यांच्या नाटकांतील सूत्रधाराने केलेल्या त्यांच्या व्यक्तिदर्शनात पुढील वर्णन सतत आढळते :—

धैर्यें मेरुसमान वीर्यजलधि शौर्यें महेंद्रापरी ।
औदार्यें जणुं कर्णराज दुसरा सत्योक्ति धर्मापरी ।
सौंदर्यें सुमसायकासदृश्य हा शंभू दयेनें पहा ।
तो जाणा नृपसिंह भोसलमणी भूपाकृती राम हा ॥

या वर्णनाचा प्रत्यय त्यांच्या साऱ्या राजकीय कारकीर्दीत येतो. या त्यांच्या व्यक्तिमत्वाची व त्यांच्या रसिक, सहृदयत्वाची साक्ष त्यांनी निवडलेल्या नायकांमध्ये पटते. 'उषाकल्याण' चा अनिरुध्द, 'पार्वती-कल्याण' चा शिव इ. नायकांचे शौर्य, जीवनमूल्यांचा वेध, प्रेयसीबद्दलचे उत्कट प्रेम व कर्तव्यदक्षता या गुणसमुच्चयांचा आढळ त्यांच्यात होतो. तपोनिधी शिवाचे मोजक्या शब्दांत केलेले चित्रण—

' प्रभु जो स्वानंदसाम्राज्याचा विभूतिविभुषित ईश्वर
मस्तक जटाजूटामध्ये मिरवे । निस्तुल जान्हवी निर्मल बरवी ।
हस्तकीं साजत शूल पिनाक प्रशस्त ।'

अशा योगीश्वराने पार्वतीची निष्ठा पारखण्यासाठी वृद्ध ब्राह्मणवेषात येणे व स्वतःचीच निंदा करून तिचा मनोदय युक्तीने जाणून घेणे यात विलक्षण नाट्य आहे. वृद्ध ब्राह्मण म्हणतो—

अशन करि विषाचे, वस्त्र त्यासी दिशांचे । वहन तरि वृषाचे भूत्य भूतें पिशाच्चें ॥
कनक मणि कशाचे लागले कां अशाचे । तुजमनिं गिरिशाचे ध्यान मोठ्या पिशाचें ॥

'असा पिसाट शिव तुला योग्य वर नव्हे'.

हा सारा नाट्यात्म कथाभाग कविकुलगुरु कालिदासाच्या 'कुमार-संभव' या महाकाव्यातील आहे. सर्वसामान्य लोकांना अपरिचित असणारे असे संस्कृत वाङ्मयातील उत्कृष्ट कथांश प्रतापसिंहांनी आपल्या नाट्यवस्तूंसाठी निवडले आहेत. त्या कथांशात बदलही केले आहेत. कुमारसंभवातील मदनदहन व रतिविलाप हे अजोड प्रसंग करुणरसाचे उत्कृष्ट नमुने आहेत ; परंतु 'पार्वती कल्याण' नाटकात शंकराने मदनाचे दहन केल्यावर रती येऊन पार्वतीची प्रार्थना करते व चुडेदान मागते. तेव्हा पार्वती शिवाला शरण जाते, मदनाला जीवदान करावे अशी प्रार्थना करते. त्याप्रमाणे मन्मथ जिवंत होतो. ('द्वापरी रुक्मिणीचे पोटी जन्मून मन्मथ सांग होईल' असे म्हणून.)

असे मूळ कथेचे रूप बदललेले आढळते. बहुसंख्य नाटकांचे नायक हे देव वा देवत्व पावलेले रामकृष्णादी मानव असल्यामुळे त्यांचे रूपसौंदर्य वा गुणसौंदर्य हे एक गृहीत तत्त्वच आहे. तरीही या नायकांचे राग, लोभ, प्रीती, असूया या विकारांचे मनोज्ञ दर्शन नाटककाराने घडविले आहे.

उषा, अनसूया, देवयानी, शर्मिष्ठा, सीता, रुक्मिणी, पार्वती, प्रभावती या नायिकांचे व्यक्ति विशेष नाटककाराने कौशल्याने चितारले आहेत. 'उषाकल्याण' या नाटकात स्वप्नात प्रियकराने उपभोग घेतला, त्यामुळे आपल्या हातून व्यभिचाराचे पातक घडले या कल्पनेनें व्याकुळ झालेली उषा सखीला म्हणते,—

माय आणि निज बापा । काय सांगू या हो आता ।
बायांनो मी मोठ्या संतापा, पात्र जाहले ।।

तीच उषा, तिच्या मैत्रिणीने समजूत घालताच, मोठ्या तत्त्ववेत्त्याची भाषा बोलू लागते. अज्ञानाने जीवशिवाच्या अद्वैताची विस्मृती जशी वेदान्त श्रवणाने जावी, तसे तुझे झाले आहे.

ऐक्येंची शिव जीव नित्य असतां त्या नेणिवेच्याभरें ।
देहाद्यात्मक मी म्हणूनि भुरलें (ळें) जें पाडियेलें बरें ।
वेदांत श्रवणें क्षणेक हरतां तें लब्धलासें जसें ।
आत्मैकत्व सये त्वदीय वचनें स्वारस्य केलें तसें ।।

उषेच्या निष्पाप मनाची स्थिती अशा प्रौढ उपमेने स्पष्ट केली आहे.

## (४) काव्यरचना

प्रतापसिंहांच्या नाटकांत दरु (नाट्यगीते) विविध रागतालांत रचलेले आहेत. त्याबरोबरच शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, दिंडी, द्विपदा, आर्या, वसंततिलका इत्यादींची योजना श्लोक या नावाने केली आहे. शिवाय यमक प्रासबद्ध संस्कृतप्रचुर अशा चूर्णिकाही वापरल्या आहेत. प्रतापसिंहांच्या वृत्तबद्ध रचनेवर रघुनाथ पंडित व अनंततनय, या कवींच्या रचनेचा फार मोठा संस्कार आढळतो. 'उषाकल्याण' नाटकात अनिरुद्ध विदुषकाला उषेच्या स्मरणाने विद्ध होऊन तिचे सौंदर्यदर्शन घडवितो—

द्राक्षाक्षीर सुधामुधामधुरता यांचीच जेथें सजे ।
ते कोठें रदनावली विरचना चातुर्यमांदुस जे ।
ते कोठें अलिपीक रोचक सख्या जे रोख देते सुखा ।
ते कोठें तनु नित्यनूतन हि जें श्रृंगार रंगासिका ।।

या श्लोकातील कल्पना सौंदर्य व नादमाधुर्य श्रुतिगोचर आहे.

---

संदर्भ टिपा

१. प्रतापसिंहेन्द्र विजय प्रबंध : रामकृष्ण कवी पंडित कृत—Madras Government Oriental Series, VIII Poorna Chandrodaya Press, Tanjore.

प्रकरण १० वे

# नाटककार राजे शरभेन्द्र ऊर्फ सरफोजी

## (१) राजे सरफोजी यांची वंशावळ

राजे सरफोजी आपल्या साऱ्या नाटकांत आपली वंशावळ पुढील श्लोकांत देतात :—

> शाहजी गाजी। तज्जातिर्थे संभाजी दुजा शिवाजी कनिष्ठ एकोजी।
> तत्सुत तुक्कोजी नृप तत्तनय श्री. प्रतापसिंह गुणी ।।
> तत्सुत सद्‌गुणराशी श्री. तुलजेंद्र वीर भूपमणी ।।

प्रतापसिंह राजांचा पुत्र तुळजेंद्र ऊर्फ तुळजाजी गादीवर आला. तो निपुत्रिक असल्यामुळे त्याने आपल्या कुळातील म्हणजे बाबाजी राजाचे ज्येष्ठ पुत्र विठोजी त्यांच्या वंशातील आठवा पुरुष शरभेंद्र **ऊर्फ** शरफोजी वा सरफोजी ह्याला दत्तक घेतले. तुळजाजी मृत्यू पावले, त्यावेळी सरफोजी अल्पवयीन होते, म्हणून तुळजाजीने आपल्या अमरसिंह ह्या भावाला तो वयांत येईपर्यन्त राज्यकारभार पाहण्याची विनंती केली; परंतु अमरसिंहाने सरफोजीचे दत्तकविधान रद्द करून घेण्याची खटपट केली. त्यांचे हे प्रयत्न सरफोजीने इंग्रजांच्या मदतीने मोडून काढले. आपले शिक्षक रे. श्वार्त्झच्या मृत्यूनंतर अधिकारग्रहण केले; परंतु प्रतापसिंहांनंतर इंग्रजांचे हाती तंजावरचा बहुतांश कारभार गेलेला असल्यामुळे मर्यादित रक्कम व अधिकार यांवर त्यांना समाधान मानावे लागले.

## (२) शिक्षण

सरफोजींना विद्वत्तेचा व कलाप्रेमाचा वडिलोपार्जित वारसा मोठ्या प्रमाणात लाभला होता. त्यांचे पौर्वात्य पद्धतीचे शिक्षण उत्तम झाले होते. शिवाय त्यांचे शिक्षक मिशनरी रे. श्वार्त्झ यांच्याकडून पाश्चात्य विद्या व वाङ्मय यांचे ज्ञान झाले होते. त्यांना इंग्रजी भाषा चांगली अवगत होती. त्यामुळे त्यांच्या व्यासंगाचे क्षेत्र विस्तारले. त्यांना नृत्य, संगीत व नाटक यांची आवड, अभिज्ञता व निर्मितीक्षमता होती. त्यामुळे त्यांनी नृत्यानुकूल व संगीतानुकूल लिहिलेली पदे, नृत्याचे बोल व स्वरसंहिता यांचा मोठा संग्रह सरस्वती महाल ग्रंथालयात आढळतो. त्यांनी स्वतः ग्रंथनिर्मिती केली व दुर्मिळ ग्रंथांचा व हस्तलिखितांचा फार मोठा संग्रह करून **'सरस्वती महाल'** हे उत्तम प्रकारचे ग्रंथालय स्थापिले. दुर्मिळ ग्रंथ घेण्यासाठी त्यांनी खूप पैसा खर्च केला. त्यासंबंधी अनेक आख्यायिका लिहिल्या गेल्या आहेत व अजूनही सांगितल्या जातात. ज्ञानसंवर्धन व ज्ञानप्रसार हे त्यांच्या अनेक कृतीमागील हेतू होते.

(३) नाट्यलेखन

सरफोजींनी लिहिलेल्या नाटकांची हस्तलिखिते सरस्वती महालमध्ये आहेत[१]. त्यांतील फक्त '**देवेन्द्र-कोवंजी**' हे नाटक मद्रास शासनाने मुद्रित केले आहे. त्या हस्तलिखितांत काही नाटके देवनागरी लिपीत तर काही तेलगू लिपीत आहेत.—

(१) गणेशलीलार्णव
(२) श्रीगणेशविजय
(३) श्रीशिवरात्रि उपाख्यान
(४) श्रीगंगा-विश्वेश्वर परिणय
(५) मीनाक्षी (परिणय) कल्याण (तेलगू लिपीत लिहिलेले मराठी नाटक)
(६) मीनाक्षी (परिणय) कल्याण (तेलगू)
(७) मोहिनी-महेश परिणय
(८) राधाकृष्ण विलास
(९) देवेन्द्र कोवंजी

या साऱ्या नाटकांचा संकलित विचार करता असे आढळून येते की, '**सुभद्रा कल्याण**' हे नाटक सरफोजी राजांनी लिहिलेले नसून ते शाहराज यांचे आहे. त्याला तसा अंतर्गत पुरावा उपलब्ध आहे. बाकीच्या नाटकांतील '**श्रीगंगा-विश्वेश्वर परिणय**', '**मीनाक्षी कल्याण**' व **मोहिनी-महेश परिणय**' ही तीन नाटके इतर राजांनी लिहिलेल्या '**कल्याण (विवाह) नाटके**' या परंपरेतील आहेत. '**देवेन्द्र कोवंजी**' हे कोवंजी पद्धतीचे साऱ्या पृथ्वीची भौगोलिक माहिती देणारे नाटक आहे. कोवंजी नाट्यप्रकाराचा अभिनव पद्धतीने केलेला हा उपयोग आहे. '**राधाकृष्ण विलास**' या नाटकात संस्कृत, मराठी, तामिळ, गुजराथी व हिंदी या भाषांचा वापर संवादासाठी केला आहे.

'**गणेशलीलार्णव**' व '**श्रीगणेशविजय**' ही गणपती या देवतेवरील नाटके आहेत. त्यात पहिले म्हणजे '**गणेश लीलार्णव**' हे नाटक गणेशपुराण, क्रीडा खंड, उत्तरार्थ यातील कथेवर आधारित आहे, तर '**श्रीगणेशविजय**' हे '**गणेश विजय**' या गणेशयोगीन्द्राचार्यांच्या इ. स. १७९८ च्या सुमारास लिहिलेल्या ग्रंथांच्या आधारे (त्यातील सोळाव्या अध्यायातील एका कथेच्या आधारे) लिहिले आहे. भाद्रपदातील गणेशचतुर्थीला प्रयोग करण्यासाठी ही नाटके लिहिली, असा उल्लेख सूत्रधार सुरवातीलाच करतो.

(४) नाटकांची पृथगात्मता

तंजावरच्या इतर राजांनी लिहिलेल्या नाटकांहून सरफोजी राजांची नाटके रचना, भाषा व काव्य या दृष्टीने पृथगात्म जाणवतात. त्यांच्या नाट्यलेखनावर संस्कृत नाटकांचा अधिक खोलवर संस्कार जाणवतो. तंजावरी मराठी नाटके बव्हंशी एकांकी स्वरूपाची होती. प्रतापसिंहराजांनी अनुवादित केलेले '**प्रबोध-चंद्रोदय**' हे नाटक अनेक अंकात विभागलेले आहे. सरफोजीराजांची सारीच नाटके अनेक-बरीचशी पाच अंकात रचलेली आढळतात. प्रत्येक अंकाच्या शेवटी आपली नाममुद्रा गुंफलेली असते.

'गणेशलीलार्णव' नाटकाच्या शेवटी 'इतिश्री भोंसलकुलदुग्धसागर सुधाकर श्रीचंद्रमौलीश्वर प्रसादलब्ध चोळसिंहासन संततसंतती राजाधिराज महाराज छत्रपती देवेंद्र श्रीशरभेन्द्र भूपाल विरचित श्रीगणेशलीलार्णव नाटके पंचमोंक: ॥' म्हटले आहे.

सुरुवातीला नांदी व शेवटी भरतवाक्य या संस्कृत नाटकाच्या वैशिष्ट्यांचीच नव्हे, तर नांदीनंतर पूर्वरंगाची जरी सारी बारा अंगे उपयोजिली नसली, तरी त्यांतील बऱ्याच अंगांचा उपयोग तंजावरी नाटकांत आढळतो. नांदी म्हणून सूत्रधार बाजूला झाल्यावर स्थापक रंगमंचावर येई व त्रिगत, प्ररोचना आणि स्थापना तो सादर करी. त्यात नाटकाचा प्रस्ताव, प्रेक्षकांचे रसिकतेला व गुणग्राहकतेला आवाहन, नाटककाराचा परिचय व नाट्यवस्तूची सूचना या गोष्टींचा अंतर्भाव आढळतो. उदा. '**गंगाविश्वेश्वर परिणय**' या नाटकात नांदी, इष्टदेवता चंद्रमौलीश्वराचे स्तवन झाल्यावर नाट्यप्रस्ताव करणारा पुढील श्लोक आढळतो—

जो कैलास महीधरी गिरिसुतेसंगे सुखे राहिला।
भोळा केवळ भक्तवश्य अमरव्यूही सदा पूजिला ॥
टाकी कोपुनी पार्वतीसही नसे ज्यासारखा की भला।
श्रीगंगा गिरिजेसमेत शिव तो म्या मानसी पूजिला ॥

यातील पार्वतीपती विश्वेश्वर गंगेशी विवाह करणार आहे ही नाट्यवस्तू सूचित केली आहे.

संस्कृत नाटकांत राजे आणि अंत:पुरे यांच्या परिसरात वावरणारे चेट, चेटी, दास, राजमित्र विदूषक, राणी, राजकन्या व तिच्या सखी यांच्या परस्पर संभाषणातून होणारे नाट्यदर्शन व त्यांतील शृंगार, वीर, करुण या रसांना मिळालेली हास्यरसाची आनंदोत्पादक जोड यातून रंगलेली नाट्यरचना आढळते. तशीच बरीचशी तंजावरी नाटके प्राचीन नाटकांशी बरेच व आधुनिक सुखात्मिकांशी थोडेसे नाते सांगणारी आढळतात. त्या अर्थाने ' A comedy is a play, written in a kindly or humorous vein, in which the problems or difficulties of the chief characters are solved happily. ' हे तत्व त्यांना लागू पडते. सरफोजीराजांची '**विवाह नाटके**' या वर्गात पडतात. कृतककलह, थोडा रुसवाफुगवा, थोडी फसवणूक व शेवट सर्वांना आनंदकारक असा प्रकार आहे.

'**गणेशलीलार्णव**' व '**गणेशविजय**' या नाटकांत देवतेचे माहात्म्य सांगणाऱ्या पुराणकथांचा उपयोग केला आहे. अनेक दुष्ट असुरांनी गणेशाला नष्ट करण्याचे केलेले प्रयत्न गणेश आपल्या युक्तिबुद्धिसामर्थ्याने कसे उलटवितो ते दाखविले आहे. तंजावरी नाटके ही यक्षगान नाट्यपद्धतीने सादर केली जात. त्यामुळे त्यातील नृत्यपद्धतीने पुन्हा पुन्हा राक्षसांचे हल्ले परतविणारा गजानन व त्यांतील द्वंद्वे मनोरंजक वाटावी यात कोणते नवल? '**गणेशलीलार्णव**' नाटकात नारद प्रवेश करतो तो नृत्य करीत व तोंडाने 'सारीगमपधनीसा। सानिधपमगरेसा' ही सुरावली गात. इतरत्र नायक व नायिका यांचा प्रवेश हे नृत्याचे तोडे म्हणतच शास्त्रोक्त नृत्य करीत होतो. संगीत व नृत्य हे या नाटकांचे प्रधान अंग व अभिनय हा नृत्यातील मुद्रांनीच अभिव्यक्त होई. त्यामानाने गद्य भाषण हे फार अल्प आढळते.

## (५) भरतमुनींचे नाट्यशास्त्र व सरफोजींची नाटके

संस्कृत नाट्यशास्त्रातील कित्येक संकल्पना या नाटकांत आढळतात. रंगमंच, सात्विक, वाचिक व आहार्य अभिनय, नायक व नायिका यासंबंधीचे संकेत या संदर्भात सादृश्य आढळते. नाट्याच्या दृष्टीने आवश्यक अशा स्वगत, अपवार्य, आकाशभाषितम्, इत्यादी गोष्टींची योजना केलेली आढळते. तशाच संस्कृत नाटकांत वापरलेल्या क्लृप्त्या व संकेत यांचाही वापर केलेला आहे. नाट्यारंभी एकाद्या ऋतूचे कौशल्यपूर्ण दर्शन, विरही नायिकेला मैत्रिणींनी केलेले विरहोपचार, प्रेमविव्हल व्यक्तीचे साकल्याने केलेले वर्णन, वीररसाचा आविष्कार, शृंगाररसाचे नाजूक संसूचन, हास्यरसोत्पादक विदूषकाचा खादाडपणा, मर्कटचेष्टा व शाब्दिक कोट्या इत्यादी अनेक गोष्टींचे अनुकरण जाणवते. उदा. '**गणेशलीलार्णव**' या नाटकात तपोनिधी बृहस्पतींच्या आश्रमाचे वर्णन हे विश्वामित्र ऋषींच्या आश्रमासारखेच केले आहे. रामभद्र दीक्षितांच्या '**जानकी परिणय**' या लोकप्रिय नाटकातील पुढील श्लोकाशी सरफोजींचा श्लोक मिळताजुळता वाटतो—

> शुंडाग्रेण सलीलमेष कलभो वक्रान्मृणालोज्जलम् ।
> जंभारंभविकस्वरान्मृगपतेर्दंष्ट्राकुरं कर्षति ।।
> एषा वत्सतरी च मातरि तृणान्यत्तुं गलायां क्वचित् ।
> द्वीपिन्यावनकंदरस्थितिजुषः स्तन्यंपयश्चुषात ।।

या श्लोकाचा आशयच सरफोजींनी व्यक्त केला आहे.

> व्याघ्रीच्या स्तन्यपाना करिति कशि पहा वांसरें या वनांती ।
> अन्योन्ये क्रीडती रे नकुल भुजग ही लाधुनी वैरशांती ।
> शुंडादंडप्रमोदे कवळुनि बरवी कंधरा केसरीची ।
> लोळे निःशंक येथे कलभ नवल हे राहटी कीं मृगांची ।।

ऋषींच्या आश्रमातील निर्मलता व पावित्र्य यांमुळे पशुंचीही मने संस्कारित झाली हे वाचताना त्याचा पूर्वगामी संस्कृत श्लोक स्मरणात येतो.

## (६) भाषा

सरफोजीराजांच्या नाटकांची भाषा ही शाहराज व प्रतापसिंह यांच्या भाषेसारखी साधी, सहज व प्रसन्न नाही. ती संस्कृतप्रचुर, भारदस्त, नादवती व अलंकृत आहे. त्यांनी शब्दालंकार व अर्थालंकारांची मार्मिक योजना केली आहे. त्यांचे श्लोक व पदे ही अधिक रेखीव व सुरचित वाटतात. संस्कृत शब्दांची योजना अर्थमधुर व नादमधुर आहे, पण क्लिष्टतेचा लवलेश नाही, वृत्तांची व दरुंची निर्दोष विविधता आनंदकारक आहे.

## (७) व्यक्तिचित्रण

सरफोजीराजांच्या नाटकांतील व्यक्तींचे बोलणे, वागणे, इतरांच्या बाबतींतील प्रतिक्रिया या त्या व्यक्तीचे समाजातील स्थान, व्यक्तिगत स्वभाव व इतरांशी असलेले नाते यांमध्ये एक सुसंवाद व तोल आढळतो. गर्विष्ठ सिंदुरासुर, नाजूक विरहिणी

इंद्राणी, मदिरासक्त वक्रदंत, क्रोधाकुल विश्वेश्वर इत्यादी अनेक व्यक्ती आपापल्या वयक्तिक गुणदोषांनी नेटक्या रेखाटलेल्या दिसतात.

राजे सरफोजी हे विद्वान व्यासंगी होते. त्यांचे शिक्षण रे. श्वार्त्झ ह्या मिशनरीच्या देखरेखीखाली झाले. त्यामुळे ते बहुभाषाविद, रसिक, सुसंस्कृत होते. दुर्मिळ हस्तलिखिते जमविण्यासाठी त्यांनी आपल्या अंगावरचे बहुमोल अलंकार दिले. तंजावरचे 'सरस्वती महाल' हे ग्रंथालय असे सिद्ध झाले. त्यामुळे त्यांना दिगंत कीर्ती मिळाली. या गुणांबरोबर 'राजा' या पदवीला साजेसे अनेक गुण त्यांच्या अंगी होते. त्यांना अश्वपरीक्षा उत्तम होती. शिकारीत त्यांचा नेम अचूक असे. त्यांना खगोलशास्त्र, शारीरशास्त्र, नवनवीन यंत्रसामग्री, आयुर्वेद अशा विविध विषयांत रस होता व त्यांचा व्यासंगही होता. नाना प्रकारची नाणी, उत्तमोत्तम श्रेष्ठ कलावंतांच्या कलाकृती, विविध दुर्मिळ वस्तू यांचा संग्रह त्यांनी केला.

हिंदुस्तानात राजे सरफोजी यांनी पहिले मुद्रणालय[२] स्थापन केले. इ. स. १८०९–१० च्या सुमारास या छापखान्यात '**बालबोध मुक्तावली**' हे पुस्तक छापण्यात आले. त्याची प्रत ब्रिटिश म्युझियमच्या ग्रंथालयात आहे. ही प्रत सर अलेक्झांडर जॉन्स्टन यांना राजाने इ. स. १८१७ मध्ये भेट दिली होती. ती ३० जुलै १८२१ रोजी त्यांनी ब्रिटिश म्युझियमला नजर केली. पुस्तकात एक पत्र आहे. त्यात पुढील मजकूर आढळतो: 'The work was printed in the Raja's palace by his own printers who are all Brahmins. The woodcuts were made, the paper was manufactured and the book itself was bound in the palace (30–7–1821).

बिशप हेबर[३] दक्षिण भारतात प्रवास करीत असताना सरफोजी राजांना अनेकदा भेटले. त्यांच्या शब्दांत सरफोजींचे चौरस व्यक्तिमत्व जाणवते: " Upon his Lordship's admiring the Hall in which we were sitting, he showed considerable information on the subject of Architecture and the comparative excellencies and peculiarities of the Hindoo and Muslim styles. At parting he requested the Bishop to come again privately to see his library, museum and printing press. The Bishop, as we returned from the palace said, 'I have seen many crowned heads but not one whose deportment was more princely'....I should tell you that he is a strong built and very handsome middle aged man with eyes and nose like a fine hawk and very bushy gray mustachios; generally splendidly dressed but with no effeminacy of ornaments and looking and talking more like a favourite speciman of a French General than any other object of comparison that occurs to me." अन्यत्र बिशप, राजांची रे. श्वार्त्झबद्दलची कृतज्ञता व निष्ठा गौरवून त्यांच्या स्वधर्मप्रेमाची प्रशंसा करतो: 'The openness of his gratitude and reverance for his Christian Missionary (R. Schwartz) in the midst of his Brahmans and himself still constant in his own religion, is admirable.'

राज सरफोजी ८ मार्च १८३२ या दिवशी मृत्यू पावले. त्यांच्या मृत्युसमयी शिवाजी नावाचा एकच पुत्र जिवंत होता. हा नेहमी आजारी असायचा, असे बिशप हेबरने म्हटले आहे. याच्या कारकीर्दीत काही नाटके व काव्ये लिहिली गेली. त्याने एकच नाटक लिहिले— **'नटेश विलास'**. राजा ही नामधारी पदवी सरफोजींच्या मृत्युनंतर लोप पावली. हिंदुस्तानातील संस्थाने नामशेष करण्याच्या डलहौसीच्या धोरणामुळे राजाचे मानसन्मान व इतर मालमत्ता सर्व लुप्त झाले. शिवाजी राजा (दुसरा) इ. स. १८५५ मध्ये निवर्तला. आजचे तंजावर राजघराण्याचे वंशज हे शिवाजीरांनी दत्तक घेतलेल्या पुत्राचे वंशज होत.

संदर्भ टिपा—

१. मराठी रंगभूमीचा इतिहास : खंड-१, भाग-१, डॉ. य. गं लेले मॉडर्न बुक डेपो, पुणे–२, (१९८०).

२. भारतीय ग्रंथमुद्रण : बापूराव नाईक, कॅ. गो. गं. लिमये ट्रस्ट प्रकाशन, पुणे-४११ ०३० (१९८०).

३. The last days of Bishop Heber : Thomas Robinson, (Archdeacon of Madras) Madras; (1829).

प्रकरण ११ वे

# शिवेन्द्र ऊर्फ राजे शिवाजी (दुसरे)

(कारकीर्द इ. स. १८३३–१८५५)

शरभेंद्र ऊर्फ सरफोजी यांचे पुत्र शिवाजी आपल्या पित्यानंतर १८३३ मध्ये राज्यारूढ झाले. तंजावरच्या राजघराण्यातील हे शेवटचे राजे होत. ते विद्याव्यासंगी, अनेक भाषाविद व संगीतज्ञ होते. सरस्वती महाल ग्रंथालयासाठी त्यांनी बरेच द्रव्य खर्च केले. त्यांचे एक मराठी नाटक "नटेश बिलास" उपलब्ध आहे.

या नाटकाचा सारा घाट इतर तंजावरी नाटकांप्रमाणे असून ते दोन अंकात विभागले आहे. गुरूला वंदन करून —

तारु भवांबुधितां प्रति मुख्य सेतू।
वंदू भवत्पदयोग गुरुराम सेतू ।।

हे सेतुस्वामी कदाचित् तार्पसिंहांच्या गुरुपरंपरेतील असावेत. ("राजाधिराज श्रीशिवाजी महाराजे क्रियमाणे नव नवरात्रोत्सव" ह्या निमित्ताने नाटयप्रयोग योजिला आहे. रसिक श्रोते व कुशल नटसंच यांचा मेळ जमला आहे, असे कवी म्हणतो. नटेश हा परस्त्रीकडे आकर्षित झाल्यामुळे त्याची पत्नी शिवकामसुंदरी कष्टी झाली आहे. तिच्या सख्या अष्टसिद्धी नटेशाचा शोध घेत फिरताहेत, परंतु त्यांना तो सापडत नाही. नारदमुनी शोध घ्यायला जातात. नटेश क्रीडाशील वृत्तीने डमरू सुस्वर वाजवतो. तो ऐकून आश्रमवासी ऋषींच्या साऱ्या स्त्रिया येतात व नटेशाला पाहून मोहित होतात. त्या भ्रमामुळे नाकातले दागिने कानात व हातातले "कंकण्या ल्याली चरणी" अशी त्यांची स्थिती झाली. नटेश त्यांना यज्ञशाळेत घेऊन जातो. ऋषींना हे वर्तमान समजताच ते रागावून "हा कोण कापालिक ?" त्याला मारण्यासाठी मंत्रसामर्थ्याने वाघ, साप, राक्षस निर्मितात. नटेश त्यांना पराजित करून आनंदतांडव करतो.

नटेशाला शिवकामसुंदरीचे सारखे स्मरण होऊन तो विरहव्याकुळ होतो. "उन्हात गेल्या सावलीचे सुख अधिकसे वाटते" असे म्हणतो. कालिदासाच्या विक्रमोर्वशीय नाटकातील नायकाप्रमाणे तो कमल, इंदीवर, हंस, कोकिल, गज, सिंह इत्यादींना प्रियेचा ठावठिकाणा विचारतो. गरिमा विदूषकाला सांगते—"स्वस्त्री सुंदरी आणि सुमुखी असली तऱ्ही तिजहून परदारा बिदरी असली बरीच भासते हा पुरुष स्वभाव" शिवकामसुंदरी पिंगळा, जोशी, कैकाडीण यांना शकून विचारते. नटेश आल्यावर रुसून त्याला दार उघडीत नाही.

तूं गा कोण सशूल वैद्यग्रह जे जाणोनी जागा स्वयें।
स्थाणू मी न वदे तरु कही मी नीलकंठ प्रिये।
कित्तीकीं वर नीट मी पशुपती शिंगे न ते दीसती।
वा मी नायक वाक्य मान्य करि वो मी नायके संप्रती ।।

असे उत्तम श्लेष वक्रोक्तीचे उदाहरण कवीने रचले आहे. नटेश व शिवकामसुंदरी मनोमनी आनंदून आनंदतांडव करतात.

या नाटकात कथाभाग स्वल्प असला तरी नाटकाचा दृश्य व श्राव्य भाग फार बहारीचा वठला आहे.

## उपसंहार

तंजावरी नाटकांचा साकल्याने विचार करणे आवश्यक ठरते. महाराष्ट्रात सोळावे, सतरावे व अठराव्या शतकाचा पूर्वार्ध या कालखंडात पंडित कवी व आख्यानक कवी स्वयंवर काव्ये लिहीत होते. एकनाथ, रघुनाथ पंडित, सामराज, विठ्ठल, नागेश इत्यादी कवींची महाकाव्याच्या धर्तीवर लिहिलेली व आख्यानवजा दीर्घ कविता रुक्मिणी, सीता, दमयंती इत्यादींच्या स्वयंवरासंबंधी लिहिलेली आढळते; तर सामान्यत: इ. स. १७०० ते १८५५ या कालखंडात तंजावर येथील भोसले राजे व त्यांचे आश्रित यांनी पार्वती, सीता, रुक्मिणी, लक्ष्मी, मीनाक्षी, गंगा व मोहिनी इत्यादी देवता व सुभद्रा, उषा, मायावती, लक्ष्मणा, प्रभावती, मित्रविंदा, पंचकन्या (पाच प्रांतांच्या पाच राजकन्या) इत्यादी पुराणकालीन स्त्रिया यांच्या विवाहसोहळ्यावर नाटके लिहिली. त्यांतील काही नायक किंवा नायिका यांच्या जन्मापासून वृत्तांत सूत्ररूपाने दिला आहे व ते किंवा त्या तारुण्यात पदार्पण करून प्रेम, विरह, भेट व विवाह अशा क्रमाने नाटक रंगत जाते. तर बऱ्याच नाटकांत नायक वा नायिका तरुण असून एकमेकांच्या गुणसौंदर्याचे वर्णन ऐकून किंवा विशेष कर्तृत्वाचा बोलबाला झाल्यामुळे प्रेमात पडलेले आहेत. मातापित्याच्या संमतीने किंवा त्यांनीच पुढाकार घेऊन विवाह साजरा केलेला असतो, तर बाणासुराच्या उषेप्रमाणे शत्रुगटातील प्रियकर असल्यामुळे पित्याच्या नकळत गांधर्वविवाह केलेला असतो. या साऱ्या विवाह नाटकांत नाटच वेगवेगळ्या अंगाने फुलत असले तरी त्यांतील नायक व नायिका यांची चित्रणे काही अंशी ढोबळ व सांकेतिक वाटतात. संस्कृत नाटकांत नायिकेचे शारीरिक सौंदर्य बऱ्याच ठिकाणी त्याच त्या उपमेय उपमानांनी वर्णिलेले असते. तसेच तंजावरी मराठी नाटकांत एकेका नाटककाराची एक विशिष्ट पद्धतीची ती वर्णनशैली आढळते. स्त्रीच्या शरीरसौंदर्याचे वर्णन तिला 'स्त्रीरत्न' (रामामणी) बनवायला पुरेसे दिसते. एखादीच 'मीनाक्षी' (मीनाक्षी-परिणय : सरफोजीकृत) आपल्या शरसंधानाने साऱ्या दिक्पालांना पराजित करून प्रत्यक्ष सुंदरेश्वराला सामोरे यायला लावते. पहिल्या दृष्टिक्षेपातच ते एकमेकांवर अनुरक्त होतात व त्यांचा देववृंद व मुनिजन यांच्या उपस्थितीत विवाह होतो.

या विवाह नाटकांत नायक व नायिका यांना क्वचित् एकमेकांना भेटल्यानंतर परंतु बहुधा एकमेकांविषयी ऐकल्यापासूनच विरहकाल सुरू होतो. त्यांना जगणे असह्य होते. त्या प्रसंगाविषयींचे दरु वा पदे आणि विविध वृत्तांतील कविता त्यांनी विपुल लिहिली आहे. त्या रचनांतील निर्दोष वृत्तयोजना, सुश्लिष्ट रचना व भावानुरूप रागतालांतील संगीत लक्षणीय आहे.

नायक हा प्रामुख्याने वीरपुरुष, रसिक, मूल्यविवेक असणारा, विशिष्ट तत्त्वे पाळणारा व आकर्षक व्यक्तिमत्वाचा आढळतो. प्रेमासाठी कोणतेही साहस करायला तो तयार असतो. उदा. प्रतापसिंहकृत 'प्रभावती परिणय' या नाटकातील नायक प्रद्युम्न भद्रनटाच्या वेषात वज्रनाभ राक्षस राजाच्या राजधातीत येतो व त्याच्या कन्येशी---प्रभावतीबरोबर प्रेमालाप करतो. वज्रनाभाला हे कळल्यावर तो यादवांबरोबर युद्ध करतो. त्यात तो मारला जातो व या प्रेमी युगुलाचा विवाह होतो.

विवाहनाटकांशिवाय इतर विषयांवर नाटके आढळतात. त्यात **सवतीमत्सर** हा विषय गंगा-कावेरी संवाद, लक्ष्मी-भूदेवी संवाद, गंगाविश्वेवर परिणय, पंचभाषा विलास इत्यादी नाटकांत आला आहे. त्यातील संघर्ष खोचकपणे व चुरचुरीत शब्दांत रंगलेला आहे. नाटककारांनी आवडीने निवडलेला आणखी एक विषय म्हणजे भक्तमहिमा व भक्तीचे सामर्थ्य हा होय. ध्रुव, मार्कंडेय, रुक्मांगद, शिवभक्त इत्यादी भक्तांची परमेश्वरावर आत्यंतिक भक्ती आणि दृढ निश्चय असल्याचे आढळते.

या कथाविश्वाला उत्तम तालासुरांची संगीतरचना व नृत्य यांनी त्यातील आशय अधिक रम्य, सजग व प्रेक्षणीय होतो.

---



राजा शहाजी

(व्यंकोजी वडील पुत्र व तंजावरचा दुसरा राजा.)

भाग दुसरा

# शहाजीराजे यांची नाटके

## १. लक्ष्मीनारायण कल्याण नाटक

सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालयामध्ये या नाटकाच्या चार हस्तलिखित प्रती आहेत. शिवाय त्यातील एका प्रतीची नक्कल तंजावरमधीलच रामदासी मठात आहे. ती सुप्रसिद्ध संशोधक वि. का. राजवाडे यांनी १९०६ मध्ये प्रकाशित केली. ती सध्या दुर्मिळ झाल्यामुळे सोबत दिली आहे.

**संविधानक :** या एकांकी नाटकाचे कथासूत्र नाट्यात्मक आहे. विष्णुपुत्र ब्रह्मदेव त्यांना भेटायला येतात; व आपली खंत व्यक्त करतात. 'मायेविना पुत्र' असे म्हणतात. तो प्रवाद टाळण्यासाठी तुम्ही विवाह करावा असे विष्णूला सुचवितात. विष्णू म्हणतात, 'माझ्यायोग्य वधू दाखवा, म्हणजे मी विवाह करीन'. ब्रह्मदेव उद्यानात आलेली सागर-कन्या लक्ष्मी विष्णूंना दाखवितात. त्यांचा अनुकूल भाव पाहून लक्ष्मीला भेटून तिला विष्णूंचे दर्शन घडवितात. तेव्हा ती आनंदित होऊन म्हणते, 'चंद्र जिंकिला याचे मुखानें। सखि इंद्र जिंकिला याचे वैभवाने॥' परंतु ब्रह्मदेवाने तिला विचारताच ती कुलीन कन्येप्रमाणे म्हणते, 'आम्ही कन्या पित्याधीन!' तेव्हा विष्णूंच्या आज्ञेवरून समुद्रराजाला बोलावणे पाठवितात. समुद्रराजा हा वृत्तांत ऐकून आनंदाने सर्व देवगणां-समक्ष विवाह समारंभ विधिपूर्वक साजरा करतात.

**नाट्यरचना :** शहाजीराजांच्या सर्व नाटकांत नांदीमध्ये शिवस्तुती, गणेश व सरस्वती यांना वंदन व विष्णूस्तुतीपर श्लोक असतात. नंतर नृत्य करीत गणेश आल्यावर सूत्रधार अर्चकाला वा पुजाऱ्याला पूजा करण्यासाठी बोलावतो. पूजा आटोपल्यावर कंचुकीराय विनोदी सभासदांस विष्णूंच्या आगमनाची सूचना करण्यासाठी येतो. कंचुकीराय सूत्रधाराशी शाब्दिक कोट्या, शब्दांची उलटापालट वगैरे करून विनोद करतो. श्रीविष्णू येऊन स्थानापन्न झाल्यावर ते नृत्य पाहण्याची इच्छा व्यक्त करतात; म्हणून देवांगनांना पाचारण केले जाते. त्या उचित संगीतासह अभिनयपद गात नृत्य करतात. त्यांचा योग्य सन्मान केल्यावर विष्णू मल्लविद्या पाहण्यासाठी मल्लांना बोलवायला सांगतात. त्याप्रमाणे मल्ल आपला 'तमासा' दाखवितात. नाटकातील हे नृत्य व मल्लांची कुस्ती हा भाग तामिळ 'थेरुकुथु' (पथ नाटक–Street Play) या नाट्यप्रकारात रूढ होता. तो शहाजीराजांनी या नाटकात अंतर्भूत केला आहे.

नाटकातील पदे विविध रागतालांत बांधली आहेत. शहाजीराजांनी नाटकांखेरीज अनेक स्फुट पदे लिहिली आहेत. त्यांत परमेश्वराची, विशेषतः शिवस्तुतीपर असून काही वैयक्तिक भावभावना रंगविणारी आत्मनिष्ठ पदे आहेत. नाटकांतील पदे संगीतानुकूल, विशिष्ट व्यक्तिवर्णनात्मक व कथानकाला पोषक अशी आहेत. कथेचा ओघ खंडित न होता नाट्याला पूरक अशी आहेत. सल्लांदरू ऊर्फ सलामदरू ही पदे उपस्थित दैवताला व प्रेक्षकांना अभिवादन (सलाम) करणारी व अभिनयपदामध्ये नृत्याचे पदन्यास व त्याला पोषक संगीत असलेली आहेत.

## श्रीलक्ष्मीनारायण कल्याण

श्रीमहागणाधिपतये नमः ।। श्री सरस्वत्यै नमः ।। श्री गुरुपूर्णानंद गुरवे नमः ।। श्री त्यागसांबाय नमः ।। श्री लक्ष्मीनारायण नाटक लिख्यते ।। तदादौ ।। नांदी मंगलं ।।

(नाट राग. तोडेम्. झंपा तालं)

जयजयधि गंभीर ।। जय सुरूचिराकार ।।
जय सकल आधार ।। जय रघुवीर ।।
जय शामल शरीर ।। जय रूप जितमार ।।
जय असुर संहार ।। जय जय वीरा ।। १ ।।
जय अंबुज नेत्र जय इंदुनिमवक्र ।। जय पावन चरित्र ।।
जय सुचारित्र ।। जय जन जलज मित्र ।।
जय जानकी कलत्र ।। जय तारित गोत्र ।। जय नाम नाम पवित्र ।। २ ।।
जय दशरथ बाळ ।। जय कीर्ति विशाल ।।
जय करीनुत लोळ ।। जय सुशील ।।
जय शमित अरिजाल ।। जय शशि निभ भाळ ।।
जय करुणा विशाल ।। जय भक्तानुकूला ।। जय जय ।। ३ ।।

मंगळं : आदिताळ.

महादेव शंकराते मंगलं ।। जय महनीय चरिताय मंगलं ।।
कर्पूरगौररूपाते मंगलं कल्याणाचळ चापाते ।।
सर्पमाळ भूषणाते मंगलं ।। १ ।।
इंदुशेखराते इथमुखजनकाते ।। वंदित सुरवृंदाते मंगलं ।। २ ।।
पार्वती प्राणनाथाते ।। पाळित निज दासाते ।।
सर्वज्ञ महेशाते मंगलं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती नाटचारंभ करून लक्ष्मीनारायण कल्याण नाटक निर्विघ्न सिध्यर्थ सर्व जनांस संतोष होण्याकारणे सकल देवतांची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : वंदितो मी एकदंताचे पाये ।। अनेक दंत तो मज सहाये ।।
हरितसे सर्व विघ्न उपाये ।। दया करितो मजवरि गणराये ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती विघ्नेश्वराची प्रार्थना करून तद्नंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : विश्ववंदे जननी सरस्वती ।। वीणा पुस्तक धरि दोहि हातीं ।।
वंदितो तिचे चरण ध्यानातें ।। दया करिते मजवरी या जनातें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर श्री परमेश्वराची प्रार्थना करितो पहा.

श्लोक : वंदितों महद्भुत देवता ।। अर्धंजन श्री पुरुषार्थ संयुता ।। एक पार्श्वं व्याघ्र चर्मान्य कनकांबरा ।। वाम पार्श्व नीळकेश सव्य जटाधरा ।। १ ।।

श्लोक : सानंदगिरिजा युक्ता ।। सस्मितप्रिय भाषणः ।।
शिवः करोतु कल्याणं ।। चंद्रार्धशेखरः ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती परमेश्वराची प्रार्थना करून तद्‌नंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पहा.

श्लोक : नमो वेदैकवेद्याय ।। अवनी उद्धरणाय च ।।
आपदामपहर्ताय ।। वासुदेवाय मंगलं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती निर्विघ्न सकल कार्य सिध्यर्थे लक्ष्मीनारायण कल्याण नाटकातें आदिस भक्तें प्रार्थना केली असतां आनंदेकरून विघ्नराज नाट्य नृत्य करित येतो पहा.

दरुऊ : [ मातृका. राग पाडी. आदि ताळ. ]
संतोषें नृत्य करी ।। शमउनि विघ्नसारी ।।
दंति मुख आला देव दनुजसंहारी ।। १ ।।
सिंदुर माथ्यावरि ।। शशि कला शोभे बरी ।।
मंदमंद धार कपोळीं ।। मधुकर हारी ।। २ ।।
पाशांकुश परूशधारी ।। पाप संख्या सकल हारी ।।
मूषकवाहन मोदक करीं ।। ३ ।।
सर्वदा दया करी ।। सर्प शोभे दोंदावरि ।।
पार्वती शिव सुत पाहा रंगांतरीं ।। ४ ।।

सूत्रधार : (येणेरीती गणेश आल्यानंतर सूत्रधार बोलतो पहा.) अहो भागवत हो, विघ्नेश्वर येऊन फार उसीर जाला. अर्चकास बोलावून पूजा करि म्हणावें.

प्रत्युत्तर : बरें तैसेच बोलावितों.
अरे कोण आहे रे अर्चक पूजा करायाला येरे.

पुजारी : कांहो कांहो हाका मारिता हेंगे आलों. पूजारी देउं छी मुहेदि.

सूत्रधार : अरे स्नान संध्या केली नसतां देवास कैसा सिवतोस रे ?

पुजारी : अहो स्नान करून आलो हो.

सूत्रधार : अरे स्नान केव्हां केले रे ?

पुजारी : शास्त्र प्रकारे ब्राम्हणास केव्हां स्नान केव्हां करावें ?

सूत्रधार : अरे ब्राम्ही मुहूर्ती उठोन दाहावे तासीं स्नान करावें.

पुजारी : दहावें तासी करावें म्हटलें कीं त्याहून अगोधर सातवे तासी रात्रीच स्नान करून आलो.
रात्रीं चिनमुतूच्या घरास गेलों होतों. तीसीउपरि सुरत करितां तिच्या आंगास घाम आला. त्या घामाने माझे आंग असकें भिजळें तेव्हां स्नान जालें. आतां या हिंवामधें कोण स्नान करितो. हें नदीच्या स्नाना-परिस हे स्नान विशेष म्हणून तेथेच स्नान करून आलों.

**सूत्रधार** : बरे पूजा होऊं दे.

**पुजारी** : (पूजा विधान) विघ्नेश्वराय नमः ।। ध्यान आवाहनादि शोडशोपचार पूजां समर्पयामि ।। विघ्नेश्वराय नमः ।। नैवेद्यं समर्पयामि (म्हणून नैवेद्य खाणे).

**सूत्रधार** : अरे काय रे नैवेद्य खातोस ?

**पुजारी** : अरे मी देवाचा निजभक्त. देव भात खातो काय ? देवास हात मला भात! त्यासाठी मी खातों. असे मजबरि पारपत्यरि केले तरि मी पूजा करीत नाही. आम्ही जाऊन दिवाणास सांगतों.

**सूत्रधार** : अरे असें जाले तरि तुजवरि पारपत्य करीत नाही. तू जारे.

**पूजारी** : देव देवोत्तमा देवता सार्वभौमा ।। नृत्य गीत वाद्यमवधारया ।। गणेशाची पूजा जाली. आम्ही घरास जातों.

**सूत्रधार** : येणेरीती विघ्नेश्वर आल्यानंतर कथा यैसीजे—श्रीमन्नारायण जगदाधार निज सभेस आनंदेऊन येताति म्हणून सभासदांस सावध करायास कंचुकी येतो पहा.

दरुआ : [ मातृका. पासि पळंळ राग. आदिताळ. ]

पट्टेनामधारी ।। अट्टहास करी ।।
काठी घेऊनि करी ।। कंचुकी आला सभांतरी ।। १ ।।
सकळांस दूरकारी ।। संतोषाने उडचा मारी ।। २ ।।
(हातांत थुंकणे)

**सूत्रधार** : अरे काय रे थुंकितोस ?

**कंचुकीराय** : अरे पाण्याने नाम लाविलें तरि पघळोन जातें थुंक्यानें नाम लाविले तरि चिकट असतें त्यासाठी थुंकितों.

**सूत्रधार** : छी जारे वेडचा.
पट्टनाम धारी. (मूतणे)

**सूत्रधार** : अरे काय रे मूततोस ?

**कंचुकीराय** : तोंडास थुंका येत नाही, त्यासाठी मुततों.

**सूत्रधार** : छी जारे मूर्खा ! पट्टेनामधारी कंचुकी : अरे इकडे येरे. कांरे कांरे ?

**कंचुकीराय** : अरे बैस. अरे बैस म्हटले तरि बैसतोस. छी उठ. छी बरें बरें बैस. अरे माझे नाम बरें आहे काय ?

**सूत्रधार** : तुझे नाम बरें आहे रे.

**कंचुकीराय** : अरे बरें आहे काय ? शावास गधडीच्या बरें जा.

**सूत्रधार** : अरे वेडचा तूं नाम लावितोस तूं विष्णूभक्त. कांही ब्राह्मणास दक्षिणा देसील म्हणून आलोकी. अरे तुझें नाम पहायास बोलाविलें काय मूर्खा.

कंचुकीराय : धगडीच्या दक्षणा मागतोस ? मोटा ब्राह्मणाचा लेक वायां गेला ! अरे धगडीच्याला काय पुसावें ? आरसा आणि रे.

सूत्रधार : अरे हे गे आरिसा. (आरसा पाहोन वेडे वेडे चार करून उपोट घेऊन लोळणी घालावी)

सूत्रधार : अरे हे काय रे, भ्यालास ?

कंचुकीराय : अरे माझे मानेवरी डोई आहे की नाही रे ? माझ्या तोंडात जीभि आहे काय ?

सूत्रधार : अरे तुझे मानेवरि डोई हत्तीचे लेंडीसारखी आहे. तोंडात जीभ खेटरा-सारखी आहे. का रे भ्यालास ?

कंचुकीराय : आरसा पाहिला कीं त्यामध्यें मांकडासारिखें आहे.

सूत्रधार : अरे मांकड नव्हे रे. तुझे तोंड तसेंच आहे.

कंचुकीराय : अरे शाबास ! माझें तोंड मांकडासारिखें आहे. शाबास, माझा गडी शाबास. (दरूः पूर्व पंतू ।। काटी घेउनि करी ।।)

सूत्रधार : अरे ही काठी कशाला रे ?

कंचुकीराय : अरे हें काठी गांवची कुतरि हाकायास.

सूत्रधार : अरे हे काठी कोण्ही तऱ्हीं हिरोन नेली तरि कसें रे ?

कंचुकीराय : हे काठी गेली, तरि माझी काठी हाजीर आहे.

सूत्रधार : तुझी काठी कशाला रे ?

कंचुकीराय : अरे माझी काठी, तुझ्या गाडींत घालायाला. (विष्णु ध्यान करी)

सूत्रधार : अरे जीभ बाहेर काढून श्वान मैथुना सारिखें हे काय रे.

कंचुकीराय : अरे मी नारायणीचे ध्यान करिते वेळेस मला कशाला रे बोलवितोस ?

सूत्रधार : नारायणी कोण रे ?

कंचुकीराय : अरे नारायणी ठावकी नाही काय ? वसंतीच्या घरामधें आहें कीं नारायणी म्हणऊन काळी पोरि. तेगे तेच नारायणी !

सूत्रधार : अरे तिचे ध्यान केल्याने काय प्राप्त होते रे ?

कंचुकीराय : अरे तिचे ध्यान केल्याने सद्यः सुख प्राप्त. मग संयोग तीर्थ प्राप्ती होते

सूत्रधार : अरे तें संयोग तीर्थ करावें रे.

कंचुकीराय : तें संयोग तीर्थ जखंणाला देतों.

सूत्रधार : छी जारे वेडझवी !

कंचुकीराय : अरे दूर, शाबास !

सूत्रधार : अहो भागवत हो ! अम्ही हरि कीर्तन करिते वेळेस हा कोण की येऊन मधें उभा राहिला हे ? हा कोण आहे की विचारा.

प्रत्युत्तर : अवस्य विचारतों. अरे तू कोण रे ?

कंचुकीराय : अरे मला पुसतोस कीं तूं कोण रे ?

सूत्रधार : अरे आम्ही भागवत.

कंचुकीराय : अरे धगडीच्या, भिकार चाटा, भाग्यवंत जालास तरि असें काय रे ? चादर कोठें ? मंदील कोठें ? चोखट झगा कोठें ? तूं भाग्यवंत म्हणिजे काय रे ?

सूत्रधार : अरे आम्ही भाग्यवंत नव्हे दशावतारी.

कंचुकीराय : अरे धगडीच्या, तूं येकला आणि दशावतार म्हणिजे काय रे ?

सूत्रधार : अरे मी येकलाच दशावतारांचे सोंग घेत असतों.

कंचुकीराय : बरे दशा जाले तरि कोठें ?

सूत्रधार : अरे हे गे तरि !

कंचुकीराय : अरे गधडीच्या हे तरि.[1] शावास तरि झाली. बुरू[2] कोठे ?

सूत्रधार : हे गे हेच बुरू.

कंचुकीराय : अरे बुरू. शाबास ! बुरू झाली. हा कोण रे ?

सूत्रधार : हा नटुवा.

कंचुकीराय : अरे हा नटु. शाबास ! धगडीच्या, हा कोण रे ? अंधकारासारखा दिसतो.

सूत्रधार : अरे हा मुटगार !

कंचुकीराय : अरे हा मुटु. शाबास ! त्याच्या गळचांत काय घातले आहे ?

सूत्रधार : अरे तो मांदळ.

कंचुकीराय : अरे हा आंधळा धगडीच्या येथे कां आला आहे ?

सूत्रधार : अरे आंधळा नव्हे रे. मृदंग.

कंचुकीराय : अरे एक दंग पुरेना मीरदेंग. तरू बुरू नटु मुटु मीरदेंगा, शाबास !

सूत्रधार : अरे मला पुसिलें कि तूं कोणरे ?

कंचुकीराय : माझें नाव कंचुकीराय विनोदि. श्रीमन्नारायण जगदाधर. निज सभा शोभिवंत करायास येताति म्हणून सभासदांस सावध करायास मज पुढें पाठविलें. मी पुढें आलों.

---

१ तरि—एकतारी  २ बुरु—तंबोरा.

सूत्रधार : सभा कैसी सिध करावी रे ?
कंचुकीराय : पाणी बांधोन, तोरणे सिंपून, केळीचे खांब तोडून, मांडव मुस्तैद करावे.
सूत्रधार : अरे तैसें नव्हे रे, वेडया. पाणी सिंपडून, तोरणे बांधोन, केळीचे खांब रोवावे म्हणून सांग रे.
कंचुकीराय : अरे धगडीच्या, तसेंच.
सूत्रधार : अरे तां सांगिल्याप्रमाणे. सभा सिद्ध केली आहे. तूं जाऊन विष्णुस सांग.
सूत्रधार : येणेरीती कंचुकीराय विनोदी येऊन सभासदांस सावध केल्यानंतर श्रीमन्नारायण जगदाधार आपले निज सभेस येतात पहा.

श्लोक : सजलदूजलश्यामा सकल लोकाभिरामा ।।
सुरूचिर गुणधामा शत्रु संघास भीमा ।।
स्वजल जलजसोमा शांति मूर्ति हरिनामा ।।
सलळित गुण स्तोमा वंदितो सार्वभौमा ।। १ ।।

दरूऊ [मातृका. राग असावरी. आदिताल.]
भजारे जन हो देवादि देवा ।। भजारे जन हो ।।
चंदन घेऊन उटि ।। चक्रपाणी रत्ने मुकुटी ।।
मंदस्मित मुखभरि वीटि[1] ।। वंदितो देव कोटानु कोटीं ।।
अंगद भुज युगुल ।। आमौल्य कौस्तुभ गळां ।।
मंगलमय पुतळा शृंगारिला पहा डोळा ।। २ ।।
कासे पीतांबर पिवळा ।। कस्तुरि कपाळि टिळा ।।
दास जनास सकळां ।। आशा पुरवी वेळोवेळां ।। ३ ।।
मकर कुंडलें कानी ।। मदन जनक सारंगपाणी ।।
अकळंक गुण खाणी ।। आरूढे गरूड वाहनी ।। ४ ।।
(पूजारी हरिदास येऊन हास्य करणे.)

कंचुकीराय : देव देवोत्तमा देवता सार्वभौमा ।। अखिळांडकोटि ब्रह्मांडनायका ।। स्वामी, सभा सिद्ध केली आहे, बसावें.
विष्णु : अरे कंचुकी, नृत्य पहायाची वासना आहे. देवांगनास बोलावून घेऊन येरे.
कंचुकीराय : स्वामी आज्ञेप्रमाणे बोलावितो.
सूत्रधार : येणेरीती विष्णुचे आज्ञेप्रमाणे कंचुकी जाऊन देवांगनास बोलाविलें असता सभारंजन कौतुकासाटीं अप्सरा नृत्य दाखवायास येताति पाहा.

तेरश्लोकाळु ।। पीन स्तनी ते पिक भाषणी ते पद्माननाते ।।
पल्लवी धराते ।। नीळाळकांति नीरज पत्र नेत्री ।।
सुशोभते पहा सुरांगनाते ।। १ ।।
कस्तूरि टिळे लाविले ललाटीं ।। कापूरयुक्त मुख भरि वीटी ।।
नानाविधे भूषण (लेत) कोटी ।। सुशोभती पहा नेसूनि घाटी ।। २ ।।

[1] वीटि—विडा

दरुऊ : [ मातृका. राग आहरी. आदिताल. ]
देवांगना येताति पाहा ।। विष्णु सभेसि देवांगना येताति पाहा ।।
लेऊनि वस्ता सकळ लाऊनि कस्तूरि टिळा ।।
हाऊनि मुखभरि विडे ।। घेऊन जात आपले ।। १ ।।
चंदन चर्चूनि ऊटि ।। मंदगति कळकंठी ।।
मंद हास सुंदर दन पंक्ति ।। इंदुमुखी तनुकटि तटि ।। २ ।।
अकलंक निजरूपें ऊन ।। सकल जन मन मोहून ।।
न कळे याचे निज परिणाम ।। व्याकुळ करिती मुनिजन मन ।। ३ ।।

पुनर्दरूऊ : [ मातृका राग. केदार गौळा. आदिताळ ]
मंदइंसगमना त्या कुंदरदना इंदुमुखी शोभता त्या ।। १ ।।
नयन कटाक्ष बाण विधूनि मोहवी नवयुव जन मना ।। २ ।।
मदनास्त्रेदेवता त्या संगीत निपुणा ।। मंदाराद्रि कुचोपमा त्या ।। ३ ।।
भूषणाच्या भूषण त्या भृंगारूनि भूमंडळी शोभती त्या ।। ४ ।।
हर्षं करित सकल जन सभेसि आल्या आनंदें हरिण लोचना ।। ५ ।।

देवांगना : अरे कोण रे देवद्वारी आम्ही देवांगना आलो म्हणून सांग रे.

कंचुकीराय : बरें सांगोन येतों, येथं बसा. स्वामीच्या आज्ञेप्रमाणे देवांगना आल्या आहेत.

विष्णू : बरे, बोलाऊन आणिरे.

कंचुकीराय : स्वामीने तुम्हास बोलाविलें. चला.
वच्चिदेवांगनळु दडंपट्टी कूर्चुंडेदि. (तेलगू भाषेत नाट्याभिनय सूचना)
(खांगनांनी येऊन नमस्कार करून बसणे.)

कंचुकीराय : अरे ऊठ झंविळीस. येथेऊन बसायास आलीस ? नाच गे.
(सळांबरू) : जय जळदनिभशरीर ।। जय जळनिधि गंभीर ।।
जय असुर कुळ संहार ।। जय आदि मत्स्यावतार ।।
नीसरि ररिसा मगागरि रिसा ।।
गमपद्धपा पमगामापागनीसरिरसि सनि ।।
रिसानिद्धपा सानिधपा ।। मधपा पमगा ।।
मगा गरिसा ।। सळ्ळामु सळ्ळामुरे ।। देवादि देव सळामु ।। २० ।।
(आहरी राग. अनिभय पद. आदिताळ)
मन माझे मोहलें त्यास पाहा सखी ये मन माझें मोहलें त्यास ।।
मदन जनकास ।। अनंग ताप न सोसे देहास ।। आणी तूं आतां ।। १ ।।
मन कर आळिंगू इछितात ।। कमळनेत्र अनिमिष पाहतात ।।
वरस्तन उजृंभतात ।। आणी तू आतां ।। २ ।।
तरुणी अधरामृत भरतात ।। मनि नाही विसरते त्यांस ।।
आणि तूं आतां ।। ३ ।।

कधी येइल दया त्यास ।। करील माझें मन उल्हास ।।
आधि अलिंगन दें म्हण तूं त्यास ।। आणि तं आतां ।। ४ ।।
माझी बाधा विनवी त्यास ।। माझ्या प्राणनाथास ।।
आजि या म्हणे रमयास ।। आणि तूं आतां ।। ५ ।।

( आदिताळ).

अणीकेचे वचन : आणि जागे सखी तूं आता ।। मज राहवेना ।।
अनंग ताप करितो मजला ।। मनी कित्ती धैर्य धरावें ।।
माझी बाधा सांगेल कोण मदन गोपाळास ।। १ ।।
मलयानील बहु बाधा करी मज सखीये ।।
मधुकर झंकार निवारी ।। सकळितांगि लौकरि ।।
चंद्रकिरण भय निवारीं ।। १ ।।
सरस शृंगार मज काशास पतिवांचून ।।
साजेना मज या देहास ।। वर प्रीतीने ये म्हण ।।
वासुदेवास मजसी रमवायास ।। २ ।।

**विष्णु** : अरे कंचुकी, देवांगनास दाहा साडचा, वीस चादरा, दहा हजार चक्रे देऊन वाटे लावून जेठचांस बोलाऊन आणि.

**कंचुकीराय** : स्वामी बहुत बरें. अवस्य स्वामीचे आज्ञेप्रमाणें बोलावितों.

**सूत्रधार** : येणेरीती विष्णूचे आज्ञेवरून कंचुकीने मल्ल पाचारिले असतां आपल पराक्रम दाखवायास येतात पहा.

दरूऊ : [ मातुका. राग भैरवी. त्रिवड ताल ]
तांबडे मातींत ताळीम करून ।। तांबडी वीळि रूमाल बांधून ।।
खांब अंतर पगडी फीरून ।। काच्चा कमरेस घट्टि बांधोन ।।
मल्ल आले सभेसि मल्ल आले ।।

**जेठी** : स्वामीच्या देवद्वारीं कोण रे ? आम्ही जेठी आलों म्हणून सांग रे !

**कंचुकीराय** : बरें, सांगोन येतों, येथे बसा. स्वामी जेठी आले.

**विष्णु** : बरें येऊं दे.

**कंचुकीराय** : कोण रे जेठी हे ? स्वामीने बोलाविलें चला—

**जेठ्यांची बोलणी** : स्वामी विज्यापुलीदी आगरें भागानगर. असका मुलुक फिरोन आलों. आम्हा बराबरि कोण्ही जेठी नाही. स्वामीचे सभेस आलो स्वामीने च्यारि जोडी सोडून तमासा पहावा. आ छ छ छ.
जेट्टि वाणलु गदहुलाडे वोकरि कोकरूतळळु पगळ गोट्टगोनि ।।
बहुमानं ती सुकोनि ।। जेट्टिवाणु पोय्येदि ।।

**सूत्रधार** : येणेरीती महाविष्णु सभेंत बसले असतां तदनंतर कथा ऐसिजे. विष्णु सभेस ब्रह्मा अकस्मात येतो पहा.

दरूऊ : [ मातृका. कंटु शाय म्यार गादे. राग मध्यमावति. आदिताळ ]
ब्रह्माआला विष्णुसभेसि विचार करित ब्रह्माआला ।।
जपमाळा हाती धरी ।। जय हरिचें स्मरण करी ।।
कपाळीं गोपिचंदन धारी ।। कमळासन कमंडळ करी ।। १ ।।
च्यार मुख स्फुट म्हने ।। च्यारि वेद एक समयाने ।।
वारिजासन वेगेऊन वंदित हरिचरण ।। २ ।।
देवद्वारीं कोण रे ? मी ब्रह्मा: आलों म्हणून विनंती करा.

कंचुकीराय : बरें, स्वामीस सांगोन येतों. स्वामी ब्रह्मा आला आहे.

विष्णु : बरें, येऊं दे.

कंचुकीराय : चला स्वामीनें तुम्हास बोलाविलें.
(एकमेकांना गुद्दे मारणे, डोक्यावर डोके आपटणे इ. प्रकार करून सन्मान करून झाल्यावर मल्लानी जाणे.)

सूत्रधार : येणेरीती ब्रह्मा येऊन विष्णुस विनऊन नमस्कार करून बोलतो पहा. शान्ता कारं ।। श्लोक म्हणोन.

सूत्रधार : येणेरीती नमस्कार केला त्या ब्रह्मास पाहोन विष्णु बोलतो पहा.

विष्णु : कुमार चिरंजीव निज उद्योग टाकून येथें यायास कारण काय ? सचिंतसें तुझें मुख दिसतें. यास कारण काय ?

ब्रह्मा : सर्व जनांत अपवाद एक निर्माण जाला. हें आयकोन न सोसवतां स्वामीपासीं येऊन त्याचा परिहार करावा म्हणून आलों. अभय दिधल्या बोलेन.

विष्णु : बरें, भीऊ नको सांग.

दरूऊ : [ मातृका. राग पंतुवराळी. अटताळ. ]
अभय मज दिधल्यां ।। अंतस्तें सांगेन विष्णु देवा ।।
आजि शुभ कार्य सिद्ध करी शुभो दयकरी विष्णु देवा ।। १ ।।
माये विना पुत्र मज म्हणतात जन विष्णु देवा ।।
आजि काय यास उपाय करावा स्या बापा विष्णु देवा ।। २ ।।
विनंती ऐक बरी विवाह सिद्धि करीं विष्णु देवा ।।
आजि मज माझें स्वस्थ करी ।। माझी माय दाखवि हरि विष्णु देवा ।।

सूत्रधार : येणेरीती ब्रह्मदेवाचे वचन आयकोन विष्णु बोलतो पहा.

दरूऊ : [ मातृका. राग-आदिताळ. ]
उत्तम गोष्टि सांगितली तां चतुर्मुखा ।।
मज उचितसें मानलें बहु चतुर्मुखा ।। १ ।।
माझें मनी असेंच होतें चतुर्मुखा ।।
माझ्या महत्वा योग्य स्त्री नाही म्हणुन होतों चतुर्मुखा ।। २ ।।

वय रूप गुण युक्त असल्यां चतुर्मुखा ।।
अवस्य विवाह करीन मी तिसीं चतुर्मुखा ।। ३ ।।

ब्रह्मा : अवस्य, तुम्ही संमत झालेत तेंच पुरे. तुम्ही जैसी इच्छिता तैसीच तुम्हा योग्य स्त्री, अम्हा योग्य माता मी पाहोन आलों आहें. तुम्ही पाहोन मानळचां करा.

विष्णु : तां पाहिलें असेल तें उचित उत्तम असेल. तथापि तूं पहा म्हणतोस तरि अवस्य दाखवि. चल पाहें.

ब्रह्मा : अवस्य, स्वामी चलावें. कन्येस मी दाखवितों. स्वामीनें पहावें.

सूत्रधार : येणेरीती विष्णु ब्रह्मा कन्येस पहायास चालिले पहा.

दरूऊ : [ मातृका. राग रेव गुप्ती. अटताळ. चापु. ]

वारिजासने आनंदें वासुदेवा सहित मंद ।। सरसाक्षीस गोविंद ।।
सादर पाहूं आले लोक वंद्य ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती विष्णु ब्रह्मा अन्येस पहायासा आल्यानंतर कथा उसिजे. समुद्रराज कन्या लक्ष्मीदेवी सखीसह वर्तमान, संतोषेंऊन उद्यान वनास येतो पहा.

श्लोक : लेऊनि जडित सर्व भूषणे नेसुनि कनकमय वसने ।।
इंदुजिकी आनन कांतीऊन ।। सिंधुकन्या येते की कारणें ।। १ ।।
सखिजन समुदाय घेऊन ।। लक्ष्मीकन्या सादर संतोषाने ।।
वन शोभिवंत कराया कारणे ।। मंद येते मद गजगती करूने ।। २ ।।

दरूऊ : [ मातृका. राग. अटताळ. ]

कंदळित आनंद करूने मंद मंद ।।
लक्ष्मी वंदिताति सकल सखिजन वारबृंदे । १ ।।
सकल शृंगार करूनि सादर सागरकन्या ।।
येतसे अकलंक सौंदर्य रूप अखिल मान्या ।। २ ।।
चंदन कर्पूर कस्तुरि चर्चुनि ऊटि घेउनि ।।
इंदुवदना मंदहास मुख येद्धाळ वीटि ।। ३ ।।

दरूऊ : [ मातृका. राग. आदिताळा. ]

राजहंस गमनाते ।। राजीव पत्र नेत्री ते ।।
राज मुखी शोभते ते ।। समा मणि ते ।। १ ।।
कळकंठी मृदु वचन ।। कस्तुरि तिलक धरूनि ।।
अलिकुल नीळवेणी अंबुज पाणी ।। २ ।।
जरि चोळी साडी नेसोनि ।। जवे बाजुबंद लेऊनि ।।
वर कन्य कामणि वंदनीय जनी ।। ३ ।।
सादर श्रृंगार खाणी ।। सकल सौंदर्य वाणि ।।
मोदें आली करि राज गमनी मोर वाणी ।। ४ ।।

**सूत्रधार** : येणेरीती लक्ष्मीदेवी सखीसह वर्तमान उचित रम्य प्रदेशीं संतोषें येऊन बसली, ते पाहोन ब्रह्मा विष्णूस दाखवितो पहा.

**ब्रह्म** : म्या सांगीतली ते कन्या सखी मधें. मदनसायकसी दिसते तेगे तेच. लक्ष्मी या नामांकित समुद्रराज कन्या ते हेच.

**विष्णु** : तां पाहिली सांगीतले तेव्हाच: म्यां म्हतले कीं, तां पाहिली असेल ते उचित उत्तम असेल. तथापि अतां पाहातां, तां सांगीतल्यापेक्षाही यौवन रूप गुणाधिक हे स्त्री रत्न आहे.

**सूत्रधार** : येणेरीती ब्रह्माने विष्णूस लक्ष्मीदेवीचें रूप दाखविलें, तें पाहोन विष्णु वर्णिता पाहा.

**दरूऊ** : [ मातृका. राग आहरी. आदिताळ. ]

अकलंक आहे रूप कन्या अपूर्व आहे ।।
सकल लोक ते ईची सरि कोण स्त्री आहे ।।
इंदु मुखिचे स्तनइभकुंभ जानु ।।
मंद गतीनें जिकिते मदहस गामिनी ।।
कळकंठी कंजनाजिकी कन्या नेत्रेऊन ।।
अलि नीळवेणी जिकी अमृत आपले अधरानें ।। २ ।।
इला पहिलें आतां माझे मन एक क्षण ।।
आलस्य करू तूं नको अतित्वरा करी अंबुजासन ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती विष्णुल क्ष्मीचें रूप वर्णन विरहबाधा अधिक होऊन, मागती बोलतो पहा.

**दरूऊ** : [ मातृका. राग. आदिताळ. [

माझ्याने न राहवे एक क्षण ।। हरिलेंसेविनें मन ।।
तुझें यत्नऊन लौकरि तू करीं हंस छटन ।। धृ ।।
काम बाण मज अनुक्षण ।। पीडितात बहु सोम किरण तपन समान ।।
ताविती मज हेसा परि द्रवतें मन ।। काय मी करूं ।।
रामसाणि कधि भेटेल रहस्यें मज येऊन ।। १ ।।
मलयानिळ प्रल्यानिळ परि उपद्रव करी ।।
मलयज चंदन ताप करी ।। न राहे क्षणभरि ।।
अलिकुळ झंकार निवारी ।। किती मी सोसूं सळळित साहेना वीटिभरि ।।
धीर धरूं कित्ती म्हणून भेटेल केव्हा नारी मणी मजसीं येऊन ।।
करीन केव्हा वारिजासना तीचें अधर पान बहु संतोषानें ।।
सार येऊन काम क्रीडा सादर कधी तिसी करीन ।।
माझ्याने न राहवे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती विष्णूचें वचन आयकोन ब्रह्मा बोलतो पहा.

**ब्रह्म** : कशास इतकी चिंता करिता स्वामी. तुम्हास मानली इतक्या उपरि लग्न सिद्धि लौकरि होयसी मी जाऊन यत्न करितों.

विष्णु : अवस्य, याहून काय पाहिजे. विलंब न करितां, बोलल्याप्रमाणे शीघ्र जाऊन कार्य सिद्धि करून ये.

सूत्रधार : येणेरीती विष्णुची आज्ञा घेऊन, ब्राह्म कन्येसी बोलायास येतो पहा.

दरूऊ : [ मातृका. राग. आदिताळ. ]

अति संतोषेऊन आला वारिजासन ।।
मतिमंतन्येचें मन घ्या या कारणे ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती ब्रह्मा लक्ष्मीपासीं गेल्यानंतर कथा ऐसिजा. विष्णूचा विवाह होतो म्हणून आयकोन. वडे पोळचा घारगे यथेष्ट मिळेल म्हणून ब्राह्मण येतो पाहा.

दरूऊ : [ मातृका. राग. आदिताळ. ]

पट्टे वर्धन लाऊन पंचांग घेऊन काठी टेंकीत बोचरा काशीभट्ट लवोन ।।

ब्राम्हण : अरे भोळचा माधोकन्या, इकडे येरे निर्भाग्या. अरे सकाळी उठोन कोठें गेला होतास रे ?

मुलगा : बाबाजी मी सकाळी उठोन वसंतीच्या घरास गेलों होतों. तेथें जाऊन पंचांग सांगितले. तेथें श्राद्ध जालें. मला दक्षणा अर्द्रा फल्लम् दिधला.

ब्राम्हण : अरे अप्पा तो अर्धा फल्लम् काय केला रे ?

मुलगा : अरे बापाजी, तो आज गोविंदीस देऊन, एकदां काम केलें.

ब्राम्हण : अरें कसें काम केले रे ?

मुलगा : असें असें केलें. चिन्नवान्निकी शिक्षे शेशेदि. (मुलाला शिक्षा करणे) अरे अन्नार्थी इकडे ये. तुझी माय कोठे रे ?

मुलगा : माझी माय आतां येईल. येथे बसा.

सूत्रधार : येणेरीती ब्राम्हण आल्यानंतर ब्राम्हणाची बाइल सुवासिनो येते पहा.

[ दरूऊ : मातृका. राग. आदिताळ. ]

वांकडे बोंचरे दांतवाकून चालते ते ।।
खोवित काठी कोण्हे बोल बोलते ।। १ ।।

सूत्रधार : आउजी नमस्कार करितों.

म्हातारी : अरे तूं कोण रे ? कोठून आलास ? अरे कोण रे ? आपा ? येथें माझा दादला आला ? त्यास धुंडीत मीच आले.

सूत्रधार : बरें तुझा दादला तेथें आहे जा.

अन्नार्थी : अंमा आलीस काय ? आमचा बाप येथें आला आहे ?

म्हतारी : अरे आप्पा ये रे ये रे.

मुलगा : आई भूक लागते गे.

म्हातारी : अरे आप्पा हे गे; हे पोळी घे. तूं खा.

मुलगा : अगे आई, पोळी कोठुन आणिली गे ? त्यांत काय गं केंस आहे.

म्हातारी : कृष्णभट्टाच्या घरास गेले होते. त्याने समाराधना केली. तेथें जाऊन तुज कारणे इतकी पोळी आणिली. तुझा बाप कोठें आहे तो दाखवि रे.

मुलगा : अगे आई ! आमचा बाप हं गे बसला आहे.

ब्राम्हण : अगे कोण गे आलीस काय ? विष्णूचा विवाह मुहूर्तास आणीक दोनि घडी लागेल इतक्यात अन्नछत्रास जाऊन येऊं या.

सूत्रधार : येणेरीती ब्राम्हण, ब्राम्हणाची बाइल आल्यानंतर कथा ऐसीजे. ब्रह्मा दूरून येतां पाहोन, सखी कन्येसीं बोलते पहा.

सखि : समुद्रराज कन्या त्रैलोक्य पितामहा कधीं येणार नव्हे, तो आजि इकडे येतो. काय आश्चर्य आहे हे न कळे. उठा, यास सामारे चला. नमस्कार करि.

सूत्रधार : येणेरीती ब्रह्मास सामोरे जाऊन, लक्ष्मीदेवी नमस्कार करून बोलते पहा.

[दरूऊ : मातृका. पड्चूतनशायके. राग गुंम कांबोदि. आदिताळ]
वंदितें तुझे पाय लोक पितामह वंदितें दुझे पाय ।।

ब्रह्म द. : वंदितो म्हणिजे काये तूं माझी माये वंदन म्हणिजे काय ?

लक्ष्मी द. : आश्चर्य हें काय न कळे आम्हा आश्चर्य हें काय ?

ब्रह्म द. : आश्चर्य नव्हे माये परिण इळपिता. आश्चर्य नव्हे माये.

लक्ष्मी द. : कोण पिता कोठें आहे तूं मज सांगें कोण पिता कोठें आहे ?

ब्रह्म द. : कोण म्हणता हें कौतुक हें विष्णु तो पाहा कोण म्हणतां हें ? कौतुक हें.

लक्ष्मी द. : येथें येया हेतु काये हें सांगा आम्हा येथें येया हेतु काये ?

ब्रह्म द. : येथें येया हेतु हा माये पाणिग्रहण तुमचें येथें येया हेतु हा माये.

सूत्रधार : येणेरीती ब्रह्मानें विष्णूस दाखविलें त्यास पाहून लक्ष्मीदेवी लज्जानम्र मुखी होऊन सखी आडळ पाळीतें पाहोन ब्रह्मा बोलता जाला.

ब्रह्म : कां लाजतां ? तुमचे अंतःकरणीचा हेतु काय असेल तो सांगा. तसेंच करूं.

लक्ष्मी : हें आम्हासीं कशास बोलता ? आम्ही कन्या पित्याधीन. जें बोलणें तें त्यांसीं बोला. त्यांच्या चित्त्यास येईल त्यास देतील.

ब्रह्म : अवस्य, हें वर्तमान विष्णूस सांगून त्यांचे आज्ञेने समुद्रराजास बोलाऊन त्यास या कार्यास अनुकूल करून घेऊन येतों.

लक्ष्मी : अवस्य, तसेंच करा.

सूत्रधार : येणेरीती ब्रह्म लक्ष्मीची आज्ञा घेऊन विष्णुसमीप गेल्यानंतर कथा ऐसीजे. लक्ष्मीचें विष्णूस सादर पाहून. तदेक अंत:करण होऊन मदन बाधेस वस्य होऊन विरह अभिनययिते पहा.

[ राग. विरह पदं. आदि ताला. ]

सर्वाधिक पहा सर्वातिशय सखी ।।
सर्वाधिक पहा सर्वातिशया ।। १ ।।
चंद्र जिंकिला याचे मुखाने ।। सखि इंद्र जिंकिला याचे वैभवाने ।। २ ।।
नेत्र जिंकि याचे शतपत्र कोटि ।। सखि गात्र जिंकि याचे मेघ शतकोटी
मदन वोवाळवा याचे रूपावरि सखि ।।
कदनें जिकीतसे हा सर्व असुर ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीस विरहबाधा अधिक होऊन, मागती सखीस पाहोन लक्ष्मीदेवी बोलते पहा.

[ राग असावेरि. सिरहपदं. आदिताल. ]

मन माझें तदधिन जालें सय्ये ।। रूप पाहतांच तन्रोमोद्गय जाला ।।
ताळ स्तन उजृंभतात पाहा ।। मन. ।। १ ।।
सरस सळळाप करणें कधीं त्याचें मी वर अधरामृतपान वामाक्षी करिन कधी
उत्तम पुष्पसार हार कडीं तुरे सादरें मी देईन कधी ।। मन. ।। २ ।।
त्याला दया येईल कधी येऊन येथें मला जवळि बोलाऊन माझे
स्तन धरिल कधी ।। बाळे वीडे दे म्हणेल कधी जडीत ऊंच माळाचा
टिळा लावून मोदेऊन असो कधीं ।। मन माझे. ।। ३ ।।
माया उपजेल त्यास कधीं पुष्पाची शय्या करूनि वास सदनी
शमविल विरहबाधा कधीं ।। नयें मदन क्रीडा करिल कधीं ।।
आलिंगुन काया सुख पाऊन ।। कांक्षित लाभ होइल कधी ।। मन. ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीदेवी विरह अभिनीत असतां तदनंतर कथा ऐसिजे. पूर्वोक्त रीतीने लक्ष्मीपासील वृत्तांत सर्वही विष्णूपासीं सांगता जाला.

ब्रह्मा : तात गेल्या कार्याची अनुकुलता करून आलों. परंतु त्या लक्ष्मीने आपल्या पित्याची आज्ञा पाहिजे ऐसें म्हतलें आहे. हा वृत्तांत तुम्हास सांगोन, तुमचे आज्ञेवरून समुद्रराजास येथेच बोलाऊन या कार्यास अनुकुलता करून लग्नसिद्धि करावी म्हणुन आलों.

विष्णु : अवस्य, तसेंच करा.

ब्रह्मा : अरे कंचुकि, समुद्रराजापासीं जाऊन विष्णूने ब्रह्माने तुम्हास कार्यानिमित्त बोलें म्हणुन शीघ्र जाऊन बोलाऊन घेऊन ये.

कंचुकी : अवस्य, स्वामीचे आज्ञेप्रमाणे तसेंच करितों.

सूत्रधार : येणेरीती ब्रंह्याचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन समुद्रराजास बोलाविलें असतां संतोषेंऊन समुद्रराज विष्णु दर्शनास येतो पहा.

[ दरूऊ : मातृका. राग शंकर भरणा. अटताळ. ]

सकल रत्न अपहारा ।। सादरें घेउनि आला ।।
अकलंक सिंधु राजा ।। मकरकेतन पिता महा विष्णुच्या दर्शना एक मनेऊन घ्यात यशश्वी अपांपति अज ।।

**समुद्रराज** : देवदेवोत्तमा, देवाता सार्वभौमा अखिळांड कोटि ब्रह्मांडनायका. स्वामी मज बोलाविलें आज्ञेप्रमाणे मी आलों. जे आज्ञा करणे असेल ते करा.

**विष्णु** : सर्वही ब्रह्मास सांगितले आहे. तो सांगेल तैसे वर्तनुक करा.

**ब्रह्मा** : समुद्रराजा स्वामीस काय पुसता ? स्वामीचे आज्ञेने सर्वही मी सांगतों. तुमची कन्या लक्ष्मीदेवि तीच्या पाणिग्रहणाचा स्वामीनें अंगीकार केला आहे. त्यास तुम्ही संमत होऊन लग्नसिद्धि महोत्सवाचा अंगीकार करा.

**सूत्रधार** : येणेरीती ब्रह्याचें वचन आयकोन समुद्रराज संतोषेऊन बोलतो पहा.

[ दरूऊ : मातृका. राग. अटताल. ]

ऐकिलें तुमचें वचन ।। असे गोड अमृताहून ।।
काय वर्णू याचे गुण ।। कामना पुरली माझी जान ।।
धन्य जालों ।। धन्य जालों धन्य जालो धन्य जालो या जनात ।।
कन्या नारायणा देणें ।। काय मन संतोषातें ।। धन्य ।। १ ।।
जामात जाला नारायण ।। जन्म माझे सफल जाण ।।
अमोल्य रत्न कन्यादान ।। आतां कमलासन करीन ।। धन्य जालो ।। २ ।।

**ब्रह्मा** : समुद्रराजा, तुम्हास उचित ते तुम्ही बोलिलेत. तें आयकोन अम्हास फार संतोष जाला. सकल देवांस, ऋषीस, येथेच बोलाऊन लग्नसिद्धि महोत्सब आतां सुमुहूर्त करा.

**समुद्रराज** : अवस्य, तसेंच करतों.

**ब्रह्मा** : अरे कंचुकी, विष्णुच्या विवाहा कारणे ब्रह्याने पाचारिलें म्हणून बृहस्पतीस बोलावून घेऊन ये.

**सूत्रधार** : येणेरीती विष्णुच्या विवाहानिमित्त ब्रह्याने पाचारिलें असतां बृहस्पती आनंदेऊन येतो पहा.

[ दरूऊ : मातृका. गोपाळ रामा. काबी. अटताल. ]

कमलासने बोलाविलें कमलाळे विवाहाला ।।
अमळात्म गुरु आला हरिच्या दर्शनाला ।।
बृहस्पति आला देवगुरु ।।

**बृहस्पति** : देवद्वारीं कोणा रे ? आम्ही बृहस्पति आलों म्हणून सांगोन येरे.

**कंचुकी** : स्वामी, बृहस्पति आला.

**विष्णु** : बरें, येऊं दे.

**कंचुकी** : स्वामि बोलावितातित चला.

ब्रह्मा : बृहस्पति, या बसा.

बृहस्पति : नमस्कार स्वामी, बसतों.

ब्रह्मा : अरे कंचुकी, स्वामीचें वऱ्हाड होतें यांस वऱ्हाडी येतात त्यास सकल सामग्री सिद्ध करायाला, बाष्कळपंतास बोलाऊन आणि.

कंचुकी : बरें, बोलावितों.

ब्रह्मा : ऐका बृहस्पती, मी जाऊन सकल देवांस, ऋषीस, बोलाऊन आणीतों.
तुम्ही कासी भट्ट मिळोन गणितार्थ पहा.
बृहस्पतिन्नि काशी भट्टनु पोत्तळानुचूदि.

सूत्रधार : येणेरीती विष्णूच्या विवाहानिमित्त सकल सामग्री सिद्ध करायासा ब्रंह्याने बाष्कळपंतास बोलाविलें असतां बाष्कळपंत येतो पहा.

दरूऊ : [मातृका. कोंचे कत्तेळु मीरू. राग असावेरि. अटताल.]
पंत येताति पहा ।। बाष्कळपंत येताति पहा ।। धृ. ।।
पोळ्या खाऊनि सोळा ।। पोटावरि हात फिरविला ।।
काळे मैसिचा टिळा ।। कपाळीं मुद्रा लाविला ।। पंत ।। १ ।।
कानी लेखणी खोऊन ।। कागद हाति घेऊन ।।
कान भरि कुंडक्या घालून ।। कारबार आला आपन ।। २ ।।

पंतुळ वचत : हें काय हो काय. हे काय. धगडीच्या या कारबारास कोण्ही दिकूच नाही की. धगडीचे हजार मिळोन. धगडीचे उगेच गुल्ली करिताति. हें गुल्लि काय पुसोन ये नाग्या.

पिल्लं भट : स्वामी पुसोन येतों. स्वामी पुसोन आलों. हरिकथा करिताति.

पंतुळ वचन : अरे धगडीच्या चाल हरिकथा काय ते. धगडीच्या बोलावी येथें.

पिल्लं भट : अरे कोण रे ? भागवत हो. पंत बोलाविताति या.

सूत्रधार : नमस्कार स्वामी.

पंतुळ वचन : जळाला तुमचा नमस्कार. धगडीच्या गांडुहो. इतकेजण मिळोन काय रे येथे गुल्ली करिता ?

सूत्रधार : नाही स्वामी आम्ही हरिकीर्तन करितों.

पंतुळ वचन : धगडीचे हो, तुम्ही हरि कीर्तन केले तरि करा. हे दोघेजण कोळितें घेऊन कां रे उभे राहिले आहेत ?

सूत्रधार : स्वामी ते दिवटे उजियडासाठी ठेविले आहेत.

पंतुळ वचन : धगडीच्या दिवाणीचें तेल असकें खराब केले. असे धगडीचे नाही तरी काय. याला असक्याला दूरि करून यांचा मुबादळा कामासाठीं ठेवितों. दिसोडि माती तऱ्ही वाहतील. याला जा म्हणावें. तो पहा. धगडीच्या वेगळवार अझुण आला नाही.

पिल्लं भट : हेगे स्वामी वेगळवार आला आहे.

**पंतुळ** : बोलावि धगडीच्याला.

**बेगवार** : इदि गो स्वामी वस्तनी. (महाराज, हा पहा मी आलो.)

**पंतुळ** : धगडीच्यास मारा. काय रे.

**बेगळ** : स्वामी नी अंमा गोविंदमनु पिळुचुकोरं मंटिरे. पिल्लुचुको वच्चिनानु. दोवळो वस्तुंदि. दोवळो चिल्लर चातनु विशेष गानुकोकताकळु तलेंदु पांतचीर टुको वस्तुदि.

**पंतुळ** : अरे अरे. जुने लुगडें नेसून येते. अरे नाग्या घरांत जाऊन तो पीतांबर आहे कीं तो आणून तिला दे.

**पिल्लं** : स्वामी पीतांबर तिला दिल्हा तरि घरांमधें बायका काय नेसतील ?

**पंतुळ** : घरांमधें झंवतातिं काय ? त्याला काय लवडा नेसतील ?

**पिल्लं** : बरें स्वामी नेऊन देतों.

**पंतुळ** : अरे त्या आच्यार्याला बोलावि धगडीच्याला.

**पिल्लं** : स्वामी बरे ! आचारी कोण रे ? पंत बोलावितातिं या.

१ **आचार्य** : यलो तीर्था पंतरू करूतारंथे. अल्ली होग बेकु. शीघ्र बारो. कानडी भाषेत

**आचार्य** : अहो पंत बोलावितात. तिथे जायचे आहे. चला लौकर.

२ **चिक्काचार्य** : येनैय्या स्नान यळ्ळी संध्यावंदन वेळ्ळा शौचादि कर्म गळील्लेंद मुंजोने हांगे होग बेकु.

**चिक्काचार्य** : अहो, स्नान कुठे करायचे ? शौच, स्नानसंध्या वंदनासारखी नित्यकर्मे केल्याशिवायच तसेच जायचे का ?

३ **दोडाचार्य** : स्नान संध्या वंदन माडिकोंडु होगोणा.

**दोडाचार्य** : स्नानसंध्या करून जाऊ या.

४ **चिका** : हांगे माडिरि.

**चिक्काचार्य** : ठीक आहे. तसेच करू या.

५ **दोडाचार्य** : येळानानु इळिळ स्नान माडथेनु. चिकवेंकी यळ्ळी इत्याळी करूकोंडु बा.

**दोडाचार्य** : अहो, मी स्नान इथेच करतो. ती चिक्कवेंकी कुठे आहे ? तिला इकडे बोलावा.

६ **चिक्का** : अय्याह्ये वळ्ळेधु. करूकोंडु बरथेने. चिक्कवेंकि आचार्य करथोर बारे मुंडेमोची मधळे.

६ **चिक्काचार्य** : बरे, बोलावतो, चिक्कवेंकी ! आचार्य बोलावीत आहेत. ये इकडे रांडे.

७ **चिक्कवेंकी** : येने आचार्यरू बंदारे. बेन्नायलु. नानु बरथेने.

**चिक्कवेंकी** : काय हो, आचार्य आले का? बरे झाले मी ही येतेच.

८ **चिक्का** : अय्या चिक्कवेंकि बंदळु अदेनैया. अळी चिकवेंकि शौच माडि कोंडि दळु नानु. अळि होगि बाग्गिनोडिदेनु. अवळिगे केळिगे निमबाइदांघे बोंदुबाइ इदे. वोळिगे निम मूगि-हांगे वोंददे. निमगड्डाहांगे कूदळु इदे. अदेनैया.

चिक्काचार्य : ही चिक्कवेंकी आली. तिने तिकडे शौच केले, तेव्हा मी चोरून पाहिले. तुम्हांला जसे खायला तोंड आहे, तसेच तिलाही आहे. तुमच्यासारखेच तिलाही नाक आहे. तुमच्या दाढीप्रमाणे तिच्या गुह्य भागावर केंस आहेत, नाही का ?

९ दोडा. : यळोहुच बोडी गंडा. नीनोडिदिये, अवळळ्ळो.

दोडाचार्य : अरे गाढवा, भोसडीच्या, तिला तसे पाहून आलास, होय ?

१० चिक्का : इदगो बंदळु. नमस्कार माडि. मुंडमोचि मगळे. नमस्कार माडे.

चिक्काचार्य : ती पहा. ती आली. नमस्कार करा. त्या रांडेचीला नमस्कार करा.

११ दोडा. : गंगास्नानफल सिद्धिरस्सु. येळे चिक्कवेंकि स्नान वायते.

दोडाचार्य : तुला गंगास्नानाचे फळ मिळो. चिक्कवेंकी, काय ग तुझे स्नान झाले का?

१२ चिक्कवेंकी : स्नान इनु माडळिळा.

चिक्कवेंकी : अजून मी स्नान केले नाही.

१३ दोडा. : शौचा स्नान यावागे आयलु आगे स्नान वायतु. पुराण श्रवण माडिरि. यळो तीर्था पुराण हेळो.

दोडाचार्य : माझे शौच स्नान इत्यादी केव्हाच झाले. चला पुराण श्रवण करा. अहो दोडाचार्य पुराण सांगा.

१४ चिकाचार्य : बर्बुरवृक्ष मूळेलु जपकुर्यात्स्तते स्तथा कृमिकंटक पीडायां जायते श्री हरिप्रिया अंदुहेळिद्दोरे ह्यांगे यंदरे बर्बूर वृक्ष दळ्ळि कुळक तुकोंडु जप माडबेकु अटुहेळिद्दारे माडि देर क्रिमि कंट कपी डायां वोंटु मुळ्ळु कुंडी वळिगे होगिदरे इपत्तसाविरवरसा अवरिगे वैकुंठ दळ्ळि वास आगंद हेळिद्दारे मुद्रा योग विधिः शंख चक्र गदा मुद्रा धार येत्यापनाशनं रूप यौवन भाग्यंचल म्यते नात्र संशयः ॥ १ ॥ अंदहेळिद्दारे मुद्रा प्रयोग ह्यांग माड बेकंदरे ॥ ग्रहस्तरिगे यरडु भुज दळ्ळि यरडु मुद्रे प्रयोग माडबेकु ॥ चिक्कवरि गे होट्टे मेळे वोंटु मुद्रा हाकबेकु ॥ केळे चिकवेंकि निमथा विधवरि गे ॥ ऐद मुद्रा प्रयोग माड बेकुंया हेळिद्दारे ॥ अदुह्योगे प्रयोग माड बेकंधरे ॥ यदिळे यरड मुद्रे हाकबेकु ॥ ईतोडेले वोंदु मुद्रे आतोडेले वोंदु मुद्रे हाकबेकु ॥ आगदा मुद्रे ऊंठेळ्ळा अदुवोळगे प्रयोग माडबेकु ॥ माडिदरे वोळगे ऊंटादा पाप गळ्ळेळा वेळगे होरट होगोदु अंद हेळीधारे ॥

चिक्काचार्य : बाभुळवृक्षाच्या खाली बसून जप करावा. तेथे जे कृमिकंटक असतात, त्यामुळे होणाऱ्या पीडेने (त्रस्त) त्रास झालेल्या भक्ताबद्दल ईश्वराला प्रेम वाटते. बाभळीचा एक काटा पार्श्वभागी टोंचला तर भक्ताला वीस हजार वर्षे वैकुंठवास घडतो. पापनाशासाठी शंखचक्रगदा यांच्या मुद्रा धारण केल्या तर रूप, यौवन व भाग्य लाभते यांत संशय नाही असा मुद्रा योग विधी आहे.

मुद्राविधी या प्रमाणे करावयाचा असतो. गृहस्थाला दोन दंडांवर दोन मुद्रा द्यावयाच्या (उठवायच्या). लहान मुलाला पोटावर एक

लावायची. अग चिक्कवेंकी, ऐक. तुझ्यासारख्या विधवेला पाच मुद्रा-प्रयोग करावयाचे असे म्हटले आहे. ते कसे तर मांड्यांवर दोन मुद्रा म्हणजे एका एका मांडीवर एक एक ! आणखी एक मुद्रा आत लावायची असे केल्याने आत घडलेले पातक ते सकाळी नाहीसे होते, असे सांगितले आहे.

१५ चिकवे : वोळेदु आचार्यरे हांगे माडिरि. (संयोगं शेशेदि.) (तेलगूत अभिनय सूचना आचार्यांच्या जवळ जाणे)

चिक्कवेंकी : बरे आहे आचार्य. तसेच करा.

पंतळु : कोण हो आचारी ? पंत बोलाविताति या.

१६ आचार्य : येनैय्या यातके करूतीरी.

आचर्य : काय हो, कशाला बोलाविता ?

पंतळु : अहो हे गोविंदी आली आहे तो देवाचा नैवेद्य आहे की. तो तिला द्या.

१७ आचार्य : येनैय्या इंथा अन्याय ऊंटे. देवरिगे नैवेद्य इल्लायेनु इल्ला. सुंमगें नैवेद्य कोंडदरे. ह्यांगे कोडबेकु.

आचार्य : आचार्य.—(कानडी भाषेत) हा काय हो अन्याय ? देवाला नैवेद्य केला नाही, काही नाही. नुसता नैवेद्य द्या म्हटले तर कसा द्यायचा ?

पंतळु : नैवेद्य नाहीतरि चोंट गेली. ते देवपूजा पागेमधें ठेऊन. तें घर खाली करून तिला द्या.

१८ आचार्य : आहावळेदु. नानु होगि वरथेने. यळो तीर्था मुंडे मगळुकेडिस्तनेळो. नैवेद्य मंदरे येनु मुंड मोचिगे कोदंदरे येनु. इथा पापऊंटे.

: ठीक आहे. आम्ही जाऊन येतो. चल रांडेच्ये, नैवेद्य हिला द्यायचा म्हणजे आहे काय? एवढे पाप कुठेतरी असेल का ?

१९ चिन. : नीउहांगे चिकवेंकि मेळेबिदु सावथीरे. हांगे अवनिगेनु.

चिन्नाचार्य : जा तुम्ही, चिक्कवेंकींवर पडा, मरा ! तिला काय होणार आहे ?

पंतळु : देवद्वारी कोण रे ? आम्ही आलों म्हणून सांगरे.

कंचुकी : स्वामी बाष्कळपंत आले आहेत.

विष्णु : बरें येऊं दे रे.

कंचुकी : अहो पंतो तुम्हाला बोलाविलें चला.

विष्णु : ब्रह्माने सांगीतलेप्रमाणे सामग्री सिद्ध करा.

पंतुळ : स्वामी आज्ञा ! जातों. अरे नाग्या ! या कनकपिल्यास बोलाऊन सकळ सामग्री सिद्ध करा म्हणावें.

पिळ. : अरे ताय वोळी कनकपिले. रोयनु सोल्लु कोरारसी मेकियळिद अंपि स्वामीकि कल्याण मागदंदु सकळ सामग्रीय अळपिचि अरमने बासिळळे. तानेका नकोंडिरू.

कनक. : नळदया अपडिये शेइरेनु.

सूत्रधार : येणेरीती बाष्कळपंत येऊन सकळ सामग्री सिद्ध केल्यानंतर. विष्णुच्या विवाहानिमित्य ब्रह्माने पाचारिले असतां उत्साहेंऊन देवेंद्र येतो पहा.

दरूऊ : [ मातृका. राग रामकळी. आदिताळ ]

ऐरावतावरि बैसोन अखिल देवगण घेऊन ।।
वीर आला असुर जिकुन ।। देवेंद्र संतोषाने ।।
नारायण विवाहा कारणे ।।

कंचुकी : स्वामी, देवेंद्र आला आहे.

विष्णु : बरें येऊं दे.

कंचुकी : चला स्वामी, देव वाट पाहतांति.

सूत्रधार : येणेरीती देवेंद्र आल्यानंतर, विष्णूने आपल्या विवाहानिमित्य पार्वती परमेश्वराचें ध्यान केलें असतां उत्साहेऊन विष्णूच्या विवाहानिमित्त पार्वती परमेश्वर येताती पहा.

[ दरूऊ : मातृका. राग भूपाळं. अटताळ. ]

देव आला विष्णु विवाहा देवता सार्वभौम पाहा ।।
भावेकरून इच्छित उत्साह ।। भक्तवत्सल श्री महादेव आला ।। १ ।।
।। कर्पुर गौ तनुकरूणाद्रि चित्तेंकन ।। सर्पमाळा भूषण ।।
सादर गौरीसीं शान ।। २ ।।
।। वृषभावरि बैसुन ।। वेदैक गम्य आला आपन ।।
भोगि पतिभूषण भोंसळ शाहदेव त्रिलोचन ।। ३ ।। देव आला ।।

ब्रम्ह. : ऐका स्वामी महादेव आले. समोर जाऊन बोलाऊन आणावें.
२० (विष्णु इदूरगापोई पिळुचुको वश्चिकूचूड पेटुऊनेदि.)

२० : तेलगूत नाटय सूचना–विष्णूने सामोरे जाऊन महादेवाला बोलावून आणून बसविणे.

सूत्रधार : येणेरीती सकल देव ऋषि आल्यानंतर ब्रह्मा समुद्रराजासीं बोलतो पहा.

ब्रह्मा : समुद्रराजा सकल देव ऋषी आले की. आतां कन्येस बोलाऊन सुमुहूर्त करा.

समुद्रराजा : अवस्य, तसेंच करितों. अरे कंचुकी. या शृंगार वनीं पहिलील रम्य प्रदेशीं, सखी सह वर्तमान, कन्या मणि क्रीडा करित होति. सखीस सांगोन कन्येस बोलाऊन आणि.

कंचुकी : अवस्य सांगा काय आज्ञा कराल तैसेंच करितों.

सूत्रधार : येणेरीती राजसमुद्राचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन सखीस सांगोन लक्ष्मीदेवीस बोलाविले असतां लक्ष्मीदेवी संतोषेऊन पित्यासमीप येते पहा.

[ दरूऊ : मातृका. राग रामकळि. आदिताळ. ]

अळिकुल नीलवेणी अंबुज पाणी ।। कलकंठि हरिराणि ।।
कल्याणालि संतोषाने ।।

२१(लक्ष्मीदेवि वच्चि समुद्रराजकु नमस्कारं शेशेदि ।।)

(तेलगूत नाटयसूचना : लक्ष्मीदेवी येऊन समुद्रराजाला नमस्कार करते.)

समुद्रराज : ऐका ब्रह्मा कशास विलंब करिता ? कन्या आली कीं लग्न करा.

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीदेवि आल्यानंतर सकल देव ऋषीश्वर लक्ष्मीनारायणास विवाह करितात पाहा.

।। मंगलाष्टकें ।।

कावेरी यमुना नदीच सरयू गोदावरि नर्मदा ।।
सिंधूर्वेगवती सुवर्णमकरि श्रीताम्रपर्णी शुभा ।।
गांगेद्योसरितश्च बिल्व पनसा अश्वत्छ मंदारका ।।
कस्तूरी धनसार कुंकुम रसा कुर्वंतुया मंगलं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीचे पाणिग्रहण नारायणाने केलें तें पाहोन सकल देवऋषी पाहोन नारद किनर किंपुरुष आनंदेकुन मंगळें गातातिं पाहा.

जल मंगलं ।। शुभ मंगलं ।। मंगलं मंगलाकार मूर्त्तीस ।।
मंगलं विशाल कीर्त्तीस ।। मंगलं निजभक्त पाळनैक प्रीतीस ।।
मंगलं पांडव सारथीस ।। जय मंगलं शुभ मंगलं ।। १ ।।
मंगलं जयशील लक्ष्मीकांतास ।। मंगलं लोकवन चरितास ।।
मंगलं सुरमुनी जन वृंद वंदिरास ।।
मंगलं महाविष्णु अधि देवतास ।। जय. ।। २।।
मंगलं खगपति वर विवाहास ।। मंगलं श्यामल देहास ।।
मंगलं श्रीवैकुंठ वरगेहास ।। मंगलं नित्योत्सवास ।।
जय मंगलं शुभ मंगलं ।। ३ ।।

श्री लक्ष्मी नारायण कल्याणं संपूर्ण ।। श्री त्याग सांबशिव परिपूर्ण सच्चिदानंदार्पणमस्तु ।।

इति श्रीमद्‌भोसळ कुल शाहमहाराज विरचित श्री लक्ष्मी नारायण कल्याण महानाटकं ।। सकल रसिक विद्वज्जन प्रीतये ।। सकल श्रेयसे ।। त्यागेशार्पणमस्तु ।।

शुभमस्तु ।। मंगलानिभवंतु ।।

## २. गोवर्धनोध्दारण नाटक

या नाटकाची दोन हस्तलिखिते सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालयात आहेत. गोवर्धनोध्दारण ही कथा मुळात भागवत पुराण (भा. पु. १०.२४–२७ अ.) विष्णुपुराण (५.१०–१२) व ब्रह्मवैवर्त पुराणात (४.२१) आलेली आहे ती कृष्णाची भक्तरक्षणाची तत्परता व बलदंडांचे गर्वहरण ह्या मुख्य बिंदूंवर केंद्रित आहे. गोकुळात दरवर्षी इंद्रोत्सव साजरा होत असे. तो कृष्णदेवांनी एका वर्षी करू दिला नाही. म्हणून इंद्र रागावला. त्याने दगडासारख्या गारा व संततधार पाऊस पाडायला सुरवात केली. अतिशय मोठ्या पाऊसपाण्यात गोकुळातील गोप व गाईंची खिल्लारे हे जीवनमृत्युच्या संकटात असताना त्यांनी गोवर्धन पर्वताची व कृष्णाची पूजा केली. तेव्हा कृष्णदेवांनी गोवर्धन पर्वत उचलून सर्वांचे रक्षण केले. ते पाहून इंद्र कृष्णदेवांना नम्र होऊन भेटायला आले. तेव्हा कृष्ण म्हणाले, तू इंद्र, मी उपेंद्र! तू चमत्कार केलास, म्हणून मी अचलाला (पर्वताला) उचलून चमत्कार दाखवला.

या नाटकात कृष्णदेवांच्या गोकुळातील खोडचा, त्यानी केलेले चमत्कार व त्याचे दैवी व्यक्तित्व यांचे दर्शन घडते. यातील कृष्ण प्रवेशाच्या वेळचे पद्न्यासाचे बोल (नृत्त) व नाटकातील विविध रागांतील संगीत इतर नाटकांप्रमाणेच रमणीय असून नेत्रकर्णांना व मनाला सुखविणारे आहे.

# गोवर्धनोद्धारण

श्री महागणाधिपतये नमः ।। श्री सरस्वत्यै नमः ।। श्री पूर्णानंद गुरवे नमः ।। महाराष्ट्र भाषेने ।। गोवर्धनोद्धारण विलास नाटकं लिख्यते ।। तदादौ नांदी मंगळा चरणं लिख्यते ।।

(नाटक रागं. तोडेम्. झंपा ताळं)

जय पार्वती रमण ।। जय पंनगाभरण ।। जय सुरान्नत चरण ।। जय दीनतरणा ।। जय अखिलनुत चरण ।। जय अनंगा हरण ।। जय असुर संहरण ।। जय दुरित शमन ।। जय जया ।। १ ।। जय रविशशिनेत्र ।। जय राजराज मित्र ।। जय नाम पवित्र ।। जय सुचारित्र ।। जय मुनीकृत स्तोत्र ।। जय कर्पूर गात्र ।। जय सदावस गोत्र ।। जय सुंदर वक्रा ।। जय जया ।। २ ।। जय नारदादि गेय ।। जय भक्त विधेय ।। जय गिरिजाअर्धकाय ।। जय अमर राया ।। जय शमित अरिमाया ।। जय शुभोत्कर्षध्येय ।। जय भवानी सहाय ।। जय नमः शिवाया ।। जय जया ।। ३ ।।

**मंगलं** : महालक्ष्मी वल्लभाय मंगळं ।। नित्य महनीय चरिताय मंगळं ।।
राजीव लोचनाय राकेंदु वदनाय ।। आजि जित दैतेय मंगळं ।।
महालक्ष्मी वल्लभाय मंगळं ।। १ ।।
शरणागत रक्षाय ।। शमितारि पक्षाय ।।
करुणार्द्रैक चित्ताय ।। मंगळं ।। २ ।।
सुरमुनि वंदिताय ।। सुचरितैक गम्याय ।।
परिहृत दुरिताय मंगळं ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती नाट्यारंभ करून सुकविरचित, गोवर्धनोद्धारण विलास नाटक निर्विघ्न सिद्ध व्हावी म्हणून, कवि इष्ट देवतांची स्तुति करितो पहा.

**श्लोक** : वंदितो मी एकदंताचे पाये ।। अनेक दंत तो मज सहाय ।।
हरितसे सर्व विघ्न उपायें ।। दया करितो सुप्रसन्न गणराये ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पहा.

**श्लोक** : विश्ववंदे जननी सरस्वती । वीणा पुस्तक धरि दोनि हाती ।।
वंदितो तिचे चरण ध्यानातें । दया करि ते मजवरि या जनातें ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर श्री परमेश्वराची प्रार्थना करितो पहा.

**श्लोक** : वंदितो महद्भूत दैवता ।। अर्धतनुश्री पुरुषार्थ संयुता ।।
एक पार्श्व व्याघ्र चर्मान्य कनकां बरा ।।
वाम पार्श्व नीळ केश सव्य जटाधरा ।। १ ।।

**श्लोक** : सानंद गिरिजायुक्ता सस्मित प्रिय भाषणा ।।
शिवः करोतु कल्याणं चंद्रार्ध कृत शेखरः ।। १ ।।

**सूत्रधारण** : येणेरीती श्री परमेश्वराची प्रार्थना केल्यानंतर श्री महाविष्णूची प्रार्थना करितो पहा.

श्लोक : नमो वेदैक वेद्याय ।। अवनी उद्धरणायच ।।
आपदाम पहर्त्तार्थ वासुदेवाय मंगळं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती सकळ देवतांची प्रार्थना करून, त्यानंतर गोवर्धनोद्धारण विलास नाटकांत, भक्ते निजभक्तीऊन वाङ्माधुर्य, अर्थपुष्टी कारणे, प्रार्थना केली असतां विघ्नराज संतोषेंऊन, नाटरंगी नृत्य करित येतो पहा.

दरूऊ : (मातृका राग पाडी. आदि ताळ)

संतोषें नृत्य करी ।। शमऊनि विघ्नसारी दंति मुख आला ।।
देव दनुज संहारी ।। १ ।।
सेंदुर माथ्यावरि ।। शशिकळा शोभेवरी ।। मंदमंद धार कपोळी ।।
मधुकर हारी ।। २ ।।
पाशांकुश परुशधारी ।। पाप सकळ हारी ।।
मूषक वाहन मोदक करी ।। ३ ।।
सर्वदा दयाकरी ।। सर्प शोभे दोंदावरि ।।
पार्वती शिवसुत पहा रंगांतरी ।। ४ ।।

सूत्रधार : अहो भागवत हो ! विघ्नेश्वर येऊन उसीर जाला. पूजा करावयास बोलावा.

प्रत्युत्तरं : बरं बोलावितों.

सूत्रधार : कोण रे अर्चक ? विघ्नेश्वर येऊन उसीर जाला. पूजा करायाला.

अर्चक : अवस्य पूजा करितों. परिचारक आला नाही. परिचारकास बोलावा, पूजा करितों.

सूत्रधार : बरं त्यास बोलावितों तू पूजा करायाला जारे.

अर्चक : अरे परिचारका ! पूजासामग्री असकी आणिली काय रे ?

परि : (मुक्यासारिखें चार करणे)

अर्चक : विघ्नेश्वराय नमः ।। ध्यायामि आवाहयामि ।। आसनं समर्पयामि ।। पाद्यं समर्पयामि ।। अर्घ्यं समर्पयामि ।। स्नानं ।। आचमनीय वस्त्रं गंधं पुष्पं ।। धूपादि शोडशोपचार पूजां समर्पयामि ।। नैवेद्य कल्पयामि ।। विघ्नेश्वराय नमः ।। नृत्यगीतं वाद्यमवधारया ।।

अर्चक : विघ्नेश्वराची पूजा जाली, आम्ही घरास जाऊन येतों, बरे जा.

सूत्रधार : येणेरीती सकळ विघ्न निवारण करायास विघ्नेश्वर आल्यानंतर, गोवर्धनोद्धारण विलास नाटकांत प्रथम पात्र प्रवेश. ऐसा जो. वसुदेव निज सभेस येतो म्हणून, सभासदांस सावध करायास कंचुकी येतो पहा.

दरूऊ : (मातृका. राग. आदि ताळ)

पट्टनाम धारी ।। अट्टहास करी ।। काठी घेउनि करी ।। कंचुकी आला सभांतरी ।। विकट बहुत करी ।। विष्णु ध्यान करी ।। सकळांस दूरि करी ।। संतोषाने उडियामारी ।। २ ।। पट्टनाम धारी ।। चेतुळो उमुसुकोनेदि ।।

**सूत्रधार ।।** : अरे काय रे थुंकितोस ?

**कंचुकी ।।** : पाण्याने नाम लाविलें तरि पघळोन जातें, थुंक्याने नाम लाविलें तरि चिकट असते, यांकरितां थुंकितों.

**सूत्रधार ।।** : छी जारे वेडी.

**पट्टनाम** : उच्चपोस कोनेदि.

**सूत्रधार ।।** : अरे कायरे मूततोस ?

**कंचुकी ।।** : तोंडास थुंका येत नाही, त्यासाठी मुततों.

**सूत्रधार ।।** : छी जारे वेडी.

**पट्टनाम** : अरे इकडे येरे.

**सूत्रधार ।।** : कां रे कां रे ?

**कंचुकी ।।** : अरे बैस. अरे बैस म्हटले तरि बसतोस. छी ऊठ. बरे बैस बैस. अरे माझे नाम बरें आहे.

**सूत्रधार ।।** : अरे तुझें नाम बरें आहे रे.

**कंचुकी ।।** : अरे बुरें, हां शाबास ! धगडीच्या बरें.

**सूत्रधार ।।** : अरे वेडी, तूं नाम लावितोस, तूं विष्णु भक्त, कांही ब्राम्हणांस दक्षणा देसील म्हणून अलोंकी. अरे तुझें नाम पहावयास बोलाविले काय मूर्खा.

**कंचुकी ।।** : धगडीचा दक्षिणा मागतो ! मोठा ब्राम्हणाचा लेंक वायां गेला. अरे या धगडीच्याळा काय पुसावें आरसा घेऊन येरे.

**सूत्रधार ।।** : अरे हे गेरे आरिसा. अद्दूचि वेळ वेळे तन्नुकोनि, वेरि वेरि चेष्टेळु सेसेदि. (आरसा हातात घेऊन जीभ बाहेर काढून वेडावणे.)

**सूत्रधार ।।** : अरे कां भ्यालास ?

**कंचुकी ।।** : अरे माझ्या गळ्यावरि डोई आहे. माझ्या तोंडात जीभी आहे. काय रे !

**सूत्रधार ।।** : अरे तुझ्या गळ्यावरि डोई हत्तीच्या लेंडासारिखी आहे. तोंडात जीभ खेटरासारिखी आहे. कां रे भ्यालास ?

**कंचुकी ।।** : अरे आरिसा पाहिला कीं त्यामधें माकडासारिखे आहे.

**सूत्रधार ।।** : अरे तें माकड नव्हे रे. तुझें तोंड तसेंच आहे.

**कंचुकी ।।** : अरे शाबास, माझें तोंड मांकडासारखें आहे, शाबास ! (काठी घेउनि करि)

**सूत्रधार ।।** : अरे हे काठी कशाला रे ?

कंचुकी : अरे, काठी गांविची कुतरी हाकायाला.
सूत्रधार : अरे हे काठी कोण्हीतऱ्हीं हिरोन नेलीतरि कसें रे ?
कंचुकी : ते काठी गेली तरि माझी काठी हाजीर आहे.
सूत्रधार : तुझी काठी कशाला रे ?
कंचुकी : माझी काठी तुझ्या गांडीत घालायाला. (विष्णु ध्यान करी.)
सूत्रधार : अरे, जीभ बाहेर काढून श्वानमैथुनासारखे हे काय रे ?
कंचुकी : अरे मी नारायणीचे ध्यान करितेवेळेस कां रे बोलावितोस ?
सूत्रधार : नारायणी कोण रे ?
कंचुकी : नारायणी ठाउकी नाही ? वसंतीच्या घरामध्ये आहे की. नारायणी म्हणून काळी पोरि. ते नारायणी ठावकी नाही ?
सूत्रधार : अरे तिचे ध्यान केल्याने काय प्राप्त होते रे ?
कंचुकी : अरे तिचे ध्यान केल्याने सद्यः सुखप्राप्ती, मग संयोग तीर्थ प्राप्त होते.
सूत्रधार : अरे तें संयोग तीर्थ करितोस रे ?
कंचुकी : हे संयोग तीर्थ जखंणाला देतों.
सूत्रधार : छी जारे वेडझंवी !
कंचुकी : अरे दूर शाबास !
सूत्रधार : अहो, भागवत हो, अम्ही हरिकीर्तन करिते वेळे, हा कोणकी येऊन मधे उभा राहिला आहे ? हा कोण आहे कीं विचारा !
प्रत्युत्तर : अवस्थ विचारतो ! अरे तूं कोण रे ?
कंचुकी : अरे मला पुसतोस कीं तू कोण रे ?
सूत्रधार : अरे मी भागवत रे.
कंचुकी : धगडीच्या भिकारचोंटा भाग्यवंत जालास तरि असें काय रे ? चादर कोठें मंदील कोठें, चोखट झगा कोठे ? तूं भाग्यवंत म्हणिजे काय रे ?
सूत्रधार : अरे मी भाग्यवंत नव्हे रे. दशावतारी.
कंचुकी : अरे धगडीच्या तूं एकला आहेस. दशावतार म्हणिजे काय रे ?
सूत्रधार : अरे मी एकलाच दाहा अवतारांचे सोंग घेत असतों.
कंचुकी : बरें दश जाळें तरि कोठे ?
सूत्रधार : अरे हेगे तर.
कंचुकी : अरे धगडीच्या तरि काय रे ? बरे शाबास ! तरि झाली. बुरु कोठे रे ?
सूत्रधार : हेगे हेच बुरू.
कंचुकी : अरे हे बुरू ? शाबास बुरू झाली. हा कोण रे ?

सूत्रधार : नटवा.

कंचुकी : अरे हा नट्ट ? शाबास ! धगडीच्या हा कोण रे, अंधकारासारखा ?

सूत्रधार : अरे मुटगार.

कंचुकी : अरे हा मुट्ट ? शाबास ! ते गळयात काय घातले आहे ?

सूत्रधार : अरे तो मांदळ ! अरे हा आंधळा धगडीचा येथें कां आला आहे ?

सूत्रधार : अरे हा आंधळा नव्हे, मृदंग.

कंचुकी : अरे येकदंग पुरेना मीरदेंग. तरू बुरू मृदु मिरदेंग. शाबास !

सूत्रधार : अरे मला पुसिलें कीं. तूं कोण रे ?

कंचुकी : माझे नाम कंचुकीराय विनोदि वसुदेव निज सभेस येताति म्हणून सभासदास सावध करायास मी आलों.

सूत्रधार : सभा सिद्ध काय करावी रे ?

कंचुकी : पाणी बांधोन, तोरणें सिंपडून, केळीचे खांब घालून, मांडव मुस्तैद करावे.

सूत्रधार : अरे तसें नव्हे रे वेडी ? पाणी सिंपडून, तोरणे बांधोन, केळीचे खांब रोवावे म्हणून सांग रे.

कंचुकी : धगडीच्या तसेंच.

सूत्रधार : अरे तां सांगीतल्याप्रमाणे सभा सिद्ध केली आहे. तू जाऊन वसुदेवास सांग, बरें मी जातों.

सूत्रधार : येणेरीती कंचुकी येऊन, सभासदांस सावध केल्यानंतर वसुदेव निज सभेस येतो पहा,

[ दरुऊ : मातृका. राग. अटताळ. ]

सुंदर वसुदेव येतसे । किरीट शोभे सिरावरि ।।
केयूर कटकभारी । सरस कुंडलें कानेभरि ।।
संतोषें ढाल तरवारघारी ।।

कंचुकी : नजर दौलत सभा सिध केली आहे. बसावे.

सूत्रधार : येणेरीती वसुदेव निज सभेस आल्यानंतर, बसुदेवाचे सभेस नंद येतो पाहा.

[ दारुऊ : राग. मातृका. आदि ताल, ]

मंदहास करी आंगी चंदन ऊटिधारी नंद आला सभांतरी ।
आजि आनंद गति चाले बरी ।।

नंद : कोण रे कंचुकी ? आम्हीं आलों म्हणून सांग रे.

कंचुकी : बरें सांगोन येतों बसा.

कंचुकी : स्वामी नंद आला आहे.

वसुदेव : बरें येऊं दे.

कंचुकी : चला, खासे बोलावितात.

वसुदेव : अरे कंचुकी, कासीभट्टास बोलाऊन आणि रे.

कंचुकी : बरें स्वामी, सांगीतली आज्ञा तसेंच करितों.

सूत्रधार : येणेरीती वसुदेवाचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन कासीभट्टास बोलाविले असतां, कासीभट्ट येतो पहा.

दरूऊ : [ राग. मातृका. आदि ताळ. ]

पट्टवर्धन लाऊन। पंचांग घेऊन ॥
काठी टेंकित बोंचरा काशीभट्ट आला लवोन ॥

काशीभट्ट : अरे राजद्वारी कोण रे? काशीभट्ट आला म्हणून सांग रे. काशीभट्ट वसुदेवुणिचूचि आशिर्वाद शेशेदि. तारण नाम संवत्सर. कार्तिक मास चतुर्दशी अंगारक वार. चतुर्दशी पंचेताळीस घटका, श्रवण नक्षत्र वीस घटका, गंडनाम योग तीस घटका, उपरांतिक आजि कल्याणी नाही, उद्यां इंद्रपूजा आहे. प्रतिवर्ष करित असतां कीं, सकल सामग्री सिद्ध करून सकलजनास बोलाऊन, पाहाटे इंद्रपूजेस चलावे.

वसुदेव : अवस्य तसेंच करितों. आइकें नंदा! उद्यां इंद्र महोत्सव म्हणून काशीभट्टें येऊन सांगीतलें. इंद्रपूजा करायाला, सकलजनास ताकीद करून, सकल सामग्री घेऊन या म्हणून, बोलाऊन धाडा.

नंदु० : अवस्य, तसेंच करितों.

नंदन : अरे कंचुकी, उद्या इंद्रपूजा करायाला यशोदा देवीस सूनेसहित बोलाऊन आणि रे.

कंचुकी : अवस्य स्वामी बोलाऊन घेऊन येतों.

सूत्रधार : येणेरीती इंद्रपूजा करायाला सूनेसहित यशोदा देवी येते पहा.

दरूऊ : [ मातृका. राग आहरी. आदि ताल. ]

यशोदा देवि येताति पहा । सूनेसहित यशोदा देवि येतात पहा ॥
अकलंक तीचे निजरूप ॥ सकालाभरण लेऊन यशोदा देवी ॥ १ ॥
वस्त्र अमोल्य नेसुन गोवारि पूजाया कारणे ॥ २ ॥

पुनर्दरू : [ मातृका. राग केदार गौळा. आदि ताल. ]

मंद हंसगमना त्या कुंदरदना । इंदुमुखि शोभती त्या ॥ १ ॥
नयनकटाक्ष बाणे विंधून । मोहवि नवयुग जनमन ॥ २ ॥
मदनास्त्र देवता त्या । संगीत निपुणा । मंदराद्रि कुचोपम त्या ॥ ३ ॥
भूषणाचें भूषण त्या श्रृंगारून । भूमंडळीं शोभता त्या ॥ ४ ॥
हर्षे करित सकल जना । यशोदा देवि आनंदे हरिण लोचना ॥ ५ ॥

सूत्रधार : येणेरीती यशोदा देवी आल्यानंतर गोपवृद्ध जन येताति पहा.

दरूऊ : [ मातृका. राग कानडा. अटताळ. ]

काळि कांबळि पांघरून ।। काठी हाती घेऊन ।।
भाळि नाम लाऊन ।। बहु संतोषे आले गोपवृद्ध जन ।।

गोपाल : अरे, कोण रे देवद्वारीं ? आम्ही गोपवृद्ध जन आलों म्हणून सांग रे ?

कंचुकी : बरें सांगोन येतों. इंद्रपूजेस काय काय आणिलें रे ?

गोपाल : दही, दूध, तूप आणिलें.

कंचुकी : आइकें वसुदेवा, गोपवृद्ध जन आला आहे.

वसु० : बरें येऊं दे.

सूत्रधार : येणेरीती गोपवृद्ध आल्यानंतर, गोप वृद्ध स्त्रिया येताति पहा.

दरूऊ : [ मातृका. राग पूर्वी. आदि ताल. ]

मंदगतिऊने मलिन वस्त्र धरून । इंदुधवल दहिं घेऊन ।।
इंद्रपूजे कारणे । गोपवृद्धा येताति पहा ।। ध्रु ।। सकल तुम्ही ।।
गोपवृद्ध स्त्री वचन । ऐका गोपाल हो । ताकाचें पडघें दह्याचे मडकें ।।
लोणी अवघें आणिलें वसुदेवास सांगून इंद्रपूजेस चलावें ।।

सूत्रधार : येणेरीती गोपवृद्ध स्त्री आल्यानंतर, इंद्रपूजे कारणे गोपकन्या येताति पहा.

दरूऊ : [ मातृका. राग आहरी. अटताल. ]

कंदलित आनंदऊने मंदमंद गोपकन्या
वंदिताति सकल सखि जन वारवृंदे ।। १ ।।
सकल श्रृंगार करूनि सादर सरस नयना येत रे ।
अकलंक सौंदर्य रूप अखिल मान्या ।। २ ।।
चंदन कर्पुर कस्तुरि चर्चुनि । ऊटी घेउनि ऊटि ।
इंदु वदना मंदहास येव्हाळ वीटी ।। ३ ।।

पुनर्दरूऊ : [ मातृका. राग. आदिताल. ]

राजहंसगमना ते राजीव पत्रि नेत्री ते ।
राजमुखी शोभताते रामामणि तें ।। १ ।।
कळकंठी मृदु वचना । कस्तूरीतिलक धरूनि ।
अळिकुल नीलवेणि अंबुज पाणी ।। २ ।।
जरि चोळीसाडी नेसून । जवे बाजुबंद लेऊन ।
वरकन्य कामणी वंदनीय जनी ।। ३ ।।

गोपकन्यका : अरे कंचुकी, गोपकन्यका आल्या म्हणून नंदास सांगोन येरे.

कंचुकी : बरें सांगोन येतों. येथें बसा. स्वामी, गोपकन्यका येऊन बसल्या आहेत.

नंद : बरें येऊं द्या.

कंचुकी : नंद तुम्हास बोलवितो. चला गोपकन्यका हो.

नंद : अरे कंचुकी, गोपकन्यका आल्या आहेत कीं सकल सामग्री सिद्ध करायास बाष्कळपंतास घेउन ये रे.

कंचुकी : बरे स्वामी, बोलाऊन आणितों.

सूत्रधार : येणेरीती नंदाचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन बाष्कळपंतास बोलाविलें असतां बाष्कळपंत येतो पहा.

दरूऊ : [ मातृका. कोंच कत्यला वीरू., राग असावेरी. अटताल. ]
पंत येताति पहा । बाष्कळपंत येताति पहा ।। धृ ।।
पोळचा खाऊन सोळा । पोटावरि हात फिरविला ।।
काळे मैसीचा टिळा । कपाळी मुद्रा लाविल्या ।। पंत ।। १ ।।
कानि लेखणि खोऊन । कागद हाति घेऊन ।।
काभरी कुडक्या घालून । कारबारास आला आपन ।। पंत ।। २ ।।

पंतुल : कोण रे कंचुकी, आम्ही आलो म्हणून नंदास सांगोन येरे.

कंचुकी : बरें बसा, सांगोन येतों. स्वामी बाष्कळपंत आले आहेत.

नंद : बरें येऊं दे.

कंचुकी : चला राजश्री, खाशांनी पाचारिले. (पंतुळ वच्ची सलामु सेसेदि) (नमस्कार करतो).

नंद : आयका पंतो, उदई इंद्रपूजा करायास सकल सामग्री सिद्ध करा.

पंत : अवस्य, स्वामीचे आज्ञेप्रमाणे सिद्ध करितों.
(पंत बाहेर येऊन, कारबारास बसोन सामग्री आणायाचा यत्न करणे)

सूत्रधार : येणेरीती बाष्कळपंत येऊन सकल सामग्री सिद्ध केलयानंतर, कासीभट्टाची बाइल, आपला दादला अगोधर आला म्हणून म्हतारी सवासिण येते पहा.

दरूऊ : [ मातृका. राग. आदि ताळ. ]
वांकडे बोंचरे दांत वांकुनि चालते ते खोकित । काठी हाती खोळ बोल बोलत । मुसळि माटकु ।।

म्हैतारी : अरे कोण रे अपा, माझी काठी धरून वाट दाखवी रे । अरे या दान्होटचामधें कोणरे माझा म्हतारा दादला आला कीं येथें आहे कीं त्यापासीं मला नेऊन सोडि रे.

कंचुकी : तुझा दादला वाडचामध्यें आहे तेथें जा.

म्हतारी : अहोणहो, कोठें अहा हो ?

**कासीभट्ट** : अरे कोण गे, इकडे ये बैस.

**सूत्रधार** : आवाजी, नमस्कार.

**म्हतारी** : अरे अपा कोण रे ? कृष्णभट्टाचा लेंक नव्हे तूं. बरा आहेस ?

**मुस.** : अगे आतां कोणासीं बोलों नको गे. फटकाळ रांडे.

**नंद** : अरे कंचुकी, सकल जन आले काय रे ?

**कंचुकी** : स्वामी बलभद्र कृष्ण दोघे मात्र आले नाहीत. वरकड अवघे आले.

**नंद** : आयका गोपाल हो. आम्ही अगोधर जाऊन पूजा करित असूं. मग बलरामकृष्ण येतील. आम्ही जाऊं चला.

**गोपाल** : अवस्य, दिवस विलंब होतो. जाऊं चला.

**सूत्रधार** : येणेरीती नंद वसुदेव सकल गोपजन मिळोन इंद्रापूजा करावयास चालिले पहा.

[ दरुऊ : मातृका. राग पंतुवराली. आदि ताल. ]
नंद वसुदेव आनंदेऊन सकल जन मंद मंद सत्कंद पूजेस आले ।।

**कासीभट्ट** : अहो नंद गोपाल हो ! सकल जन येऊन, ते पूजा सामग्री आणून, पूजा करा.

**सूत्रधार** : येणेरीती सकल जन येऊन इंद्रपूजा करितात पहा.
इंद्रपूजा विधान । इंद्राय नमः । ध्यायामि आवाह्यामि । आसनार्घ्यं पाद्यादि सर्वोपचारान् समर्पयामि ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकल जन मिळोन इंद्रपूजा करीत असतां, कृष्ण-बलराम सकल गोपालसहित संतोषेंऊन येताति पहा.

[ **दरुऊ** : मातृका. राग आहरी. अटताल ]
नंद नंदन आनंदऊने । मंद मंद गतीने कुंदरदन शोभे ।।
इंदुवदन शुभे तंधिमि धिमित झनु धणतक तक धळांगु म्हणुन ।।
गोविंद येतो पहा गोविंद ।। १ ।।
संतोष मानुन मानत बहु । सादर मुरली वाजून ।।
कांत जन मदन संतोषें नृत्य करी । झंतरि किटतक धरिकिट धिमिझुन झनुतक ।।
धळांगु म्हणुन ।। गोविंद येतो पहा ।। २ ।।

[ **पुनर्दरुऊ** : मातृका. राग आहरी. आदिताल ] .
कनक भूषण लेऊन ।। कटि पीतांबर धरून ।।
मनसिज जनक आतां मंद मंद ।। जनऊऊतत्त देहिकिट झंतरित्तहृत्त इ-थंनु
घण घण तद्धिताहृत तकधिमि ।। ताथेकित तक ।।
धळांगु म्हणून येतो पाहा कृष्ण येतो ।। १ ।।
सुंदर मुख अरविंद शोभित पहा ।। नंद नंदन गोविंद आता ।।

तधिमितद्धित्ताहतकिटतक ।। धीनुतहततक ।। धळांगु तक झनु ।।
तधिमितद्धिताहत तकधिमि तथों थों गुतक धळांगु म्हणुन ।।
येतो पहा ।। २ ।।

**कृष्ण :** अरे पेंध्या वाडघांत जाय. हे म्हतारे मिळोन काय करितात पाहोन ये.

**गोपाल :** स्वामी पाहोन येतों. गोपाल ऊळु पोइ चूचि वच्चेदि. (गोपाळ पाहून परत येतो) स्वामी पाहोन आलों. इंद्रपूजा करितात.

**सूत्रधार :** येणेरीती गोपालाचे वचन आयकोन कृष्ण जाऊन सकल गोपांसीं बोलतो पहा.

**कृष्ण :** आयका नाग गोप सुंदर गोप तुम्ही अवघे मिळोन काय करितारे ?

**गोपाल :** आइका कृष्णा, आम्ही प्रतिवर्षि इंद्रपूजा करित असतों. येणेऊन पर्जन्य पडतो. सस्यतृणाभिवृद्धि होते. याकरितां आम्ही इंद्रपूजा करितों.

**सूत्रधार :** येणेरीती सकळ गोपालांचे वचन आयकोन कृष्ण बोलतो पहा.

[ **दरुऊ :** मातृका. राग मुरारी. आदि ताल. ]

इंद्राची आम्हास गरज काय ।। इंद्राची पूजा तुम्ही करिता काय ।। १ ।।
पर्जन्य वर्षून जीवन देतों ।। पर्यन्यऊन अवनी सस्यतृण देते ।। २ ।।
गोवर्धन पूजा करा तुम्ही ।।गोवधनावरि।। आमच्या गाई चरताती ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीती कृष्णाचे वचन आयकोन सकल गोपाल मिळोन आपणांत आपण बोलतात पहा.

**गोपाल :** ऐका गोपाल हो ! हा वेडा पोर. डोंगराची पूजा करा म्हणुन बोलतो. याचे बोलणे काय आयकाल ? मी सांगतो ऐका.

[ **दरु :** राग गौरि पंतु. आदिताल ]

बाळचाचे बोलें काय ऐकता ।। आमचे घरिचें दहिदुध चोरितां ।।
आम्हा परिस बहु शाहणा वायां गेला ।। १ ।।
घरिं पोरि धरि ।। ज्यासि त्यासि हा झगडा करी ।। बाळ ।। १ ।।
आजन्मापासून हा लबाड ।। आजन्मापासून नवनीत चोर ।। बाळ ।। २ ।।
सर्वदा करितो दुर्वृत्तपण ।। सकल चालोंद्या इंद्रपूजन ।। बाळ ।। ३ ।।

**कृष्ण :** अरे गोपाल हो, तुम्ही असके मिळोन काय बोललेत रे ?

**सूत्रधार :** येणेरीती कृष्णास पाहोन सकल गोपाळ मिळोन बोलताति पहा.

[ **दरु :** राग ।। आदि ताल ]

ऐके कृष्णा तूं राहे उगा ।। आजि आमचि पूजा यथा प्रकार चालों दे ।।
आतां ।। पुनः इंद्रपूजा ।।

**सूत्रधार :** येणेरीती सकल गोपवृद जन मिळोन, कृष्णास द्धिकारून, यथा प्रकार पूजां करित असतां, कृष्ण गोपालांसीं बोलतो पहा.

**कृष्ण** : आडका गोपाल हो ! हे असके फार मातले आहेत. हे पूजा असकी लूटारे. पुजासग्री अंतानुकोळळ पेट्टेदि.

**गोपाल** : अहो कृष्णस्वामी, पूजा सामग्री असकी लुटून खाऊन आलों. आम्हास काय आज्ञा सांगणे ते सांगा.

**कृष्ण** : सांगतो ऐका रे गोपाल हो.

**सूत्रधार** : येणेरीती सकळ गोपाल मिळोन, पूजा सारी लुटून खादल्यानंतर कृष्ण गोपालास पाहोन बोलतो पहा.

[ राग : शंकर भरणा आदि ताळ ]

मंद गमनेस आणि तूं पेंध्या ।। राम गोपांच्या कन्येला ।।
मंद गमनीस आणि तूं पळला ।। धृ ।।
सुंदरीस कुमारी सुकुमारी ।। बृंदांतरी ते पिकवाणिस धरी ।। १ ।।
उचलूनि आणि तूं वडज्या ।। नागा गोपाचें कन्येला ।।
उचलूनि आणि तूं वडज्या ।। कुचपीनकजधन ।।
शुचिमनधन रूचि जाने ।। २ ।।
सुंद कन्येस आणि तूं वाकडवा ।। बोहडुन आतां ।।
सुंद कन्येस आणि तूं बांकडचा ।। इंदु बदना कुंदरदना मंद गमना ।।
बहु मधुरा धरीस ।। ३ ।।

**कृष्ण** : अरे पेंध्या, वडज्या अरे बांकडचा, तुम्ही जाऊन त्या गोपिकांस धरून आणारे.
गोपाळु हळु पोइ. पडुचुळ पद्धको वच्चेदि.

**सूत्रधार** : येणेरीती कृष्णाने पूजा सारी लूटून, कन्यांस धरून नेलें तें पाहोन, सकळ वृद्ध गोपाल मिळोन, अपणांत आपण बोलतात पहा.

[ दरूऊ : राग आदिताल ]

पूजा सारी नासिली ।। शिव शिवा पोरानि ।।
फुलें सारि विखरिलीं ।। शिव शिवा ।।
नवनित खाऊन गेले ।। शिव शिवा ।।
पोरानी नवयौवन पोरी नेल्या ।। शिव शिवा ।।
फळें सारि लूटूनि नेलीं ।। शिव शिवा ।।
पोरानी फळारं दहिंदुधाचे केले ।। शिव शिवा ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकळ गोप वृद्ध मिळोन, आपणांत आपण बोलत असतां, तदनंतर कथा ऐसिजे. कृष्णाने धरून नेल्या त्या गोपकन्या कृष्णास पाहोन बोलतात पाहा.

[ दरुऊ : मातृका. नन्नेटिकिपोमांनरे. राग पंतुवराळी. आदि ताल ]

धरूनि कां आम्हा आणिलें ।। सांगू तूं कृष्णा ।। धरूनि कां ।। धृ ।।
तरुण आमुचे पती ।। तत्काळ कोण करिती ।। धरू कां ।। १ ।।

वेणीत तुम्ही विशाल माहरे चला म्हणुन ।। जाणून फजीती करीत ।।
विषेध केला नानाविध विनोद करित ।। बलात्कारें ।।
कंदुक म्हणुन आमुचे ।। घन स्तन धराया कां येता ।।
मंदहास करून दृढ धरिता ।। अधरांस पाहून ।।
सुंदर बिंबफळ म्हणुन डखता ।। मुख पाहुन अरविंद म्हणुन चुंबन देता ।।
परकीया आम्ही ।। २ ।।
सरस कपोळ पाहुन आरसा आमचा दे म्हणता ।।
धर म्हणुनि कंठि नखक्षत करिता ।। नको म्हतल्यां ।।
तरसा बहुकोप करिता ।। बारांवारी विरसपण प्रकट करिता ।।
काय करावें ।। धरूनिकां ।। ३ ।।

सूत्रधार ।। : येणेरीती गोपिकांचें वचन आयकोन , कृष्ण बोलतो पाहा.
आशया पूर्वेद्य रात्रौ ।।

[ राग धन्याश्री. आदिताल ]

इंद्रपूजा करायालो उपेंद्र सोडून ।। चंद्रवदना हो तुम्ही ।।
चंदन कुटिलाऊन ।। इंद्रपूजा ।। १ ।।
[१] वासवैसोकाय थोर ।। वनि त्या एक अहिल्येचा जार ।।
वासुदेव मी बहुत थोर ।। वर अखिल गोप वनिता जार ।।
नेत्र त्याचे कामधर ।। निश्चयेंसि असतां हजार ।।
नेत्रे धाहिले मी कोटि कामधर ।।
निर्मळात्माम बहुत थोर ।। २ ।।
पूजा त्याची करून फल काय ।। पुरंदर तुम्हास देईल काय ।।
पूजा आमची केल्या सद्यः फल होइल ।।
पूजिलां त्यास पंचबाण सहाय ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती कृष्ण गोपकन्यांसी बोलोन, बलात्कारें पदर धरून, वोढून, सरस संलाप करित असतां, कृष्णास पाहोन गोपकन्यका बोलतात पहा.
पदरिननंटराऊरा ।।

[ राग. अटताळ ]

पदर आमुचे धरूं नको रे ।। गोपाळ कृष्णा ।। पदर ।। धृ ।।
पदर आमुचे धरूं नको ।। बलात्कारे वोढु नको ।।
सदय विडे देऊं नको ।। सरस सरलाप करूं नको ।। १ ।।
फुलांचे हार गळचांत घालितो ।। उत्फुल्ल कमळ नयन भेडसावितो ।
जाळ करूनि अबिर लावितो ।। जाऊं नको म्हणुन मना करितो ।। २ ।।
चंदन लावितां स्तन धरितो ।। चांदण्यात आम्हां वोढुनि नेतो ।।
मंद बोल गलबला करूं नको ।। मदनपूजा करूं दे म्हणतो ।। ३ ।।

---

१. वासवैसा—वासव (इंद्र) ऐसा

**सूत्रधार :** येणेरीती कृष्ण गोपकन्यांसीं मिळोन, सरस सल्लाप करित असतां, त्यास पाहून गोपकन्या धि:कारून बोलिल्या तें वचन आयकोन कृष्ण बोलतो पहा.

[ राग सोरट. आदि ताल ]

म्हतलें माझें ऐका गे ।। आतां ऐकागे ।। इतका काय कोप करिता ।।
म्हतलें ।। धृ ।।
मजवरि कोप आला असल्यां ।। माझें भुज पाशें बांधा ।। १ ।।
बोलिलों म्हने कोप आळा असल्यां ।। बाला हो अधरिक्षत करा ।। २ ।।
कर धरिला म्हने कोप आलासल्यां ।। करजाक्षत मज करा ।। ३ ।।
कपट आचरलों म्हन कोप आलासेल ।। उपरि झेपडून करा ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरीती कृष्णाचे वचन आयकोन गोपकन्यका आपणांत आपण बोलतात पाहा.

[ दरुऊ : भूपाळ राग. आदि ताल ]

चंद्रवदने ये जव जाक्षाचा गर्व ।। सांद्रे तूं हरि आतां सत्वर सखिये ।।
**अन्य कन्यका :** हरिमध्यें तूं आतां करि वरदाचा गर्व ।।
परि परि उपाय करून ।। परिहर करि वेंगी ।।
**अन्य कन्यका :** भास्वच्छरीर कांति ।। भासुर नील मेघाचा गर्व ।।
शाश्वत तूं दुरि करी ।। सकळ जनांत आतां ।।

**सूत्रधार :** येणेरीती कृष्णाने गोपकन्यांसीं मिळोन सरस सल्लाप करित असतां तदनंतर कथा ऐसिजे. सकल गोपाल मिळोन आपणांत आपण बोलतात पाहा.

**गोळ्ळवाणू :** आयका गोपाळ हो ! कृष्णाने आमची पूजा सारी लुटून, पोरींस धरून नेलें की ! तो कोठें आहे की धुंडून कन्या बोलाऊन आणूया !

**सूत्रधार :** येणेरीती सकल गोपालं मिळोन आपल्या कन्या सोडवायास येताति पहा.

[ दरुऊ : राग पंकवराळी. आदि ताल ]

मुसळें टोणपे घेऊन मुखें कोपाविष्ट होऊन ।। सासरे भावे भावे जै दादला ।।
सकल मिळून आले ।। कन्यांस सोडायाला ।। १ ।।
वेगेंऊन कन्या सोडायाला ।।

**सूत्रधार :** येणेरीती सकळ गोपाल येऊन कृष्णास हाऊनें देऊन, गोपकन्यांस पाहोन, गोपवृद्ध स्त्रीया बोलतात पाहा.

[ दरुऊ : राग ।। आदि ताल ]

मंदगमने तूज धरून तेथें ।। नंदानंदने तुज काय केले ।।
हरिमध्ये तूं धरूंन्नेलें तेथें ।। हरिने तेजला काय केलें ।। १ ।।
चंद्रवदने तुज धरून्नेले उपद्रव तेथें तुजला काय केलें ।।

**गोपकन्या :** तेथील फजीती काय सांगावी !

गोळ्ळवाण् : आयका गोपाल हो ! कृष्णाने आमच्या कन्यांस सान्यांस मानभंग केला. त्यास काशीभट्टास बोलाऊन आणून प्रायश्चित्त करावें.
धृत शोच विधि ।।

सूत्रधार : येणेरीती सकळ गोपाल मिळोन धृत शौच प्रायश्चित्त करीत असतां तदनंतर कथा ऐसिजे. इंद्रपूजा सारी उपेंद्राने केली ते पाहोन इंद्रास कोप येऊन शिळाधारीं पर्जन्य वर्षता पाहा.

गोळ्ळवाण् : अरे राम गोपा अरे नंद गोपा ! अरे सुंदर गोपा ! अरे काय करावें या पावसास ! या पावसांत भिजतों की. यास काय विचार.

सूत्रधार : येणेरीती बोलिले गोपालांचे वचन आयकोन, अवघे विचारून, आपणात आपण बोलतात पाहा.

गोळ्ळवाण् : ऐका गोपाल हो ! कृष्णाने इंद्रपूजा विघात केली. तें पाहोन इंद्र शिळाधारीं वर्षतो. यास विचार कैसा म्हणाल तरि. आम्हा अवघ्यांस श्रेष्टनंद त्यास सरण जाऊं.

सूत्रधार : येणेरीती सकल गोपाल मिळोन नंदासी बोलतात पाहा.

(राग ।। आदि ताल)

नंद आम्ही काय करावें तुझ्या नंदाने इंद्रपूजन हों न दिल्ही ।।
भिजतों बहु पीडतों ।। कांबळि वस्त्रें सारी भिजलीं ।।
काय करूं कोठें आसरा नाहीं भीजतो ।। १ ।।
वीजा बहु कडकडितात ।। विशेष स्त्रिया भिऊन पळतात ।। २ ।।
गाई म्हैसी सेळचा भिजतात ।। गळचास गळा लाऊन कांपतात ।। ३ ।।
एकास एक नवल खत ।। एकाच्या स्त्रिया एकास कंवटाळितात ।। ४ ।।
घन घोर अंधकार पडला हे जन कोणास कोण न दिसे ।। ६ ।। भीजतों ।।

सूत्रधार : येणेरीती सकल गोपाल मिळोन बोलिले ते वचन आयकोन, नंद प्रत्युत्तर बोलतो पहा.

नंद : ऐका गोपाल हो ! या पावसाचें निवारण माझ्याने होय ना. तुम्ही अम्ही मिळोन वसुदेवास शरण जाऊं चला.

गोळ्ळवाण् : अहो गोपाल हो ! अम्हास अवघ्यांस श्रेष्ट म्हणुन यास शरण आलों. हा आम्हाबराबरी आपण येईन म्हणतो. हें यापासीं एक दुधाचें मडकें देऊन चला म्हणावें.

सूत्रधार : येणेरीती सकल गोपाल नंद मिळोन वसुदेवास शरण येतात पाहा.

(राग आदि ताल)

भिवत सारें भीऊन येताति आजि जन सारे ।। अभय मागायास ।।

सूत्रधार : येणेरीती सकल गोपालसहित नंद येऊन वसुदेवास पाहोन बोलतााति पहा.

(राग ।। आदि ताळ)

वसुदेव आम्ही या पावसास काय करावें आतां ।।
वासव कोपोम बहु पीडिताहो ।।
उपाय यास तूं कांही तऱ्हीं सांग तूं आता आम्हास ।।
उपद्रव वेगळ करि आम्हांस आता ।।

**सूत्रधार** : येणेरीती बोलिल्या नंद गोपालांस पाहोन नंद बोलतो पाहा.

**वसुदेव** : आयका गोपाल हो ! या पावसाचे निवारण माझ्याने होइना. तुम्हा बरावरी येऊन हा उपद्रव अनुभवितों. तुम्ही आम्ही मिळोन, कृष्णापासीं जाऊन त्याकरितां हा उपद्रव झालां त्यास शरण जाऊं चला. तोच निवारण करिल.

**गोळ्ळा** : ऐका वसुदेवा, कृष्णाकरिता हा उपद्रव आला. कृष्णाने आमचे घरिचे दहीं दुध चोरून नेलें. आमच्या कन्यांस धरून नेले. आमची इंद्रपूजाही विध्वंस केली. याकरितां हा उपद्रव झाला. आतां आम्हास त्याचे हातीं बोपून देता काय ?

**वसुदेव** : ऐका गोपाल हो ! त्याहून आम्हास गति कोण आहे ? त्यासच शरण जाऊं. तोच उपद्रव निवारण करील.

**सूत्रधार** : येणेरीती सकल गोपाळ नंद-वसुदेव मिळोन कृष्णास शरण येतात पाहा.

[ **परिक्रम दरूऊ** : आदि ताल ]

इंद्रास भीऊन उपेंद्रास शरण आले ।। सांद्र सकल जन सत्वर अभय इच्छून ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकल गोपाल नंद-वसुदेव मिळोन, कृष्णास पाहोन बोलतात पाहा.

(राग रामकळी. आदि ताल)

दुरित अलि निवारीं ।। दनुजारी कृष्णा ।।
बाल वृद्धें भिजतात बहु भीऊन लपतात ।।
काळ भय निवारी बाळ मुरारी ।। १ ।। दुरि.
शिळाधारी वर्षताशितें बहु कांपतो जलद गर्जताति ।।
फार जगदाधारा ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकल गोपाल मिळोन बोलिले तें वचन आयकोन, कृष्ण गोपालास पाहोन प्रत्येक बोलतात पाहा.

(राग भूपाळ. अटताल)

गोपाल हो तुम्ही गोकुळां तिलगोक्षिर दधि घृत मज द्या ।।
सोपस्कारें खाउन मी ।। सुख तुम्हास करीन ।।

**गोळ्ळा** : गोप शिरोमणि गोकुळांतिला ।। गोक्षीर दहि घृत सारें घ्या ।।
आपदा आमची गाई-म्हसींची वारून ।। अभय आजि द्या ।।
शरण आलों ।।

कृष्ण : गोपवृद्ध हो, अखिल तुमच्या गोपकन्यका मज द्या. कांप तुमचे निवारिन. कन्येसीं क्रीडा करून.

गोळस्त्री : कन्या सकळा घेवा आतां. कन्या आमच्या तुजधीन. मान्यें आम्हा अभय देऊन महा धृष्टिभय निवारी. शरण आलों ।।

कृष्ण : अगे गोप कन्यका हो ! पहिलें म्हकसी गे ! स्तन धरू नका. अधरपान घेऊ नका. वेणी बोढू नका (म्हखळें)? कीं आतां कसे ?

गो. क. : ऐका स्वामी तुम्हा वेगळि आम्हास गति कोण आहे ? तुम्हीच गति.

कृष्ण : अगे मीं काय मागीतलें तें द्याल काय ?

गोपक. : अवस्य देऊ स्वामी.

कृष्ण : व पूववत्. सुंदरि होऊच गिरि तुमचे सुख धरून अभ्यास करूं द्या. मंद्राद्रि उचळुनि आतां महत्सुख तुम्हास करीन भीऊं नका.

गोपिक. : कुच धरा स्वामी अधरपान घ्या, कच धरून कपोळीं चुंबन द्या. अचळ उचलुनि अभय द्या आम्हा. अनंत रति करा कृष्णा. शरण आलों.

सूत्रधार : येणेरीती कृष्ण सकल गोपाल गोपिकन्यांचें वचन आयकोन सकल जनांस रक्षण करायास कृपा करून, अचल उचलावयास सकल गोपाल सहित कृष्ण येतो पहा.

(राग आदि ताल)

संतोष सकल जनास संतोष द्याया कारणे ।। संतत भक्तवत्सल ।।
सादर गिरिपासीं आला ।।

कृष्ण : ऐका गोपाल हो ! सकल जन मिळोन गोवर्धनाची पूजा करा.

गोळ्ळ : बरें स्वामी, तसीच गोवर्धनाची पूजा करितों.
(गोवर्धन पूजा विधानं)

गोळ्ळ : ऐका गोपाल हो ! गोवर्धन पूजा झाली कीं. आता कृष्णाची पूजा करूं या.

(प्रत्युतर:) अवस्य तसीच पूजा करूं चला.

(कृष्ण पूजा विधानं ।। श्री कृष्णाय नम: ।। कमळा नाथाय नम: ।।)

सूत्रधार : येणेरीती सकल गोपाल मिळोन कृष्णाची पूजा केल्यानंतर नंदानंद आनंदेऊन गोविंद मंदराद्रि उचलितो पाहा.
कृष्णडु कोंडयर्त्तदिः

सूत्रधार : येणेरीती कृष्ण सकल गोपालांस पाहोन बोलतो पाहा.

चध्धु : ऐका गोपाल हो ! तुम्ही भीऊ नका, याच्या आसरा या.

सूत्रधार : येणेरीती सकल गोपाल गोवर्धनाच्या आसऱ्यांत येऊन सुख पावोन आपणात आपण बोलतात पाहा.

(राग आदि ताल)

धन्य आजि सुदिन ।। आम्हा सकळां जना ।। धध्य आजि सुदिन ।। धृ ।।
आमचा स्वामि अच्युत असतां ।।
आम्हास भय कोणाचें नाही अवनीवरि निसिदिनी ।। १ ।।
इंद्राचा गर्व सारा उपेंद्राने दूरि केला ।।
साद्र दया प्रकट केली सकळावरि ।। २ ।।
कोण वर्णिला याची महिमा ।। कोणास न कळे आम्हा ।।
दानव वैऱ्याची महिमा फार ऐका सार ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीती कृष्णाने अचल उचलून सकल जनांस अभय दिल्हें, तें पाहोन किन्नर किं पुरुष, शिळावृष्टि राहऊन पुष्पवृष्टि करितात पाहा.

(राग भैरव. अटताल)

देव किन्नर कि पुरुष देव कि नंदनावरि ।।
देव तरु पुष्प सारीं दीन दयाळावरि वर्षति सार्दरि ।।

**सूत्रधार :** येणेरीती देव किन्नर किं पुरुष, पुष्पवृष्टि केल्यानंतर सकल गोपाल कृष्णाचे स्तोत्र करितात पाहा.

(राग देशाक्षी. अटताल)

क्षमा करा अपराध काय जाणो तुमची महिमा ।।
काय केल्यां न कळे आम्हा ।।
मायापाशापासून ।। ममतेने सोडवी आम्हा ।। क्षमा ।। १ ।।
सर्वत्र परिपूर्ण स्वामि तूज बाल म्हणुन ।। गर्वऊन बोलिहें तें ।।
सर्वेशा दया करा ।। क्षमा ।। २ ।।
क्षीराब्धिशयना तुज क्षीर दंही चोर म्हनु म्हतले ।।
सारासार न जाणतां सदय आज्ञाने म्हतल्यां ।। क्षमा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीती इंद्राने अतिवृष्टि केली त्यास उपेंद्राने वेगळा उपाय केला. ते आयकोन, लज्जाक्रांत होऊन देवेंद्र उपेंद्रास शरण येतो पहा.

(राग आदि ताल)

ऐरावतावरि बैसोन ।। अखिल देवगण घेउन ।।
धीर आला असुर जिंकुन ।। देवेंद्र तो संतोषाने ।।
उपेंद्रासि बोलाया कारणे ।।

**सूत्रधार :** येणेरीती इंद्र येऊन कृष्णास नमस्कार करून बोलतो पाहा.

**इंद्र :** ऐका स्वामी. तुमचि महिमा न कळतां हा अपराध केला. हा अपराध क्षमा करून दया करावी स्वामी.

कृष्ण : ऐकें इंद्रा. तुम्ही विनोदें करून अतिवृष्टि करून सकल जनांस उपद्रव करून एक चमत्कार दाखविला. त्यास आम्ही अचल उचलून सकल जनांस रक्षण करून एक चमत्कार दाखविला. तुम्ही इंद्र आम्ही उपेंद्र. तुम्ही आम्ही एकच आहों.

सूत्रधार : येणेरीती सकल जन, देवेंद्र, कृष्णाचे बोलणे आयकोन, कृष्णांस पाहोन स्तोत्र करितात पाहा.

(राग भूपाळी. अटताल)

शरणु अति वृष्टि हरणा ।। शरणु अखिल दानव शमना ।।
शरणु भवसागर तरणा ।। शरणु श्री रमणा ।। शरणु शरणु ।। १ ।।
शरणु कालिय गर्वदमना ।। शरणु ।। शकट प्रभंजना ।।
शरणु धेनुका सुर मथना ।। शरणु कंस हरण ।। २ ।।
शरणु पूतना शोषणा ।। शरणु चाणुरमल्लमर्दना ।।
शरणु शत्रुंजय नागमर्दन ।। शरणु शिशुपाल हरणा ।। ३ ।।
शरणु पांडव शारथे ।। शरणु पांचालि वस्त्रवर्दन ते ।।
शरणु बाणासुर मर्दनाते ।। शरणु मदन जनक ते ।। ४ ।।
शरणु अखिल शरण्याते ।। शरणु आपद्धारणाते ।।
शरणु नतजत पोषकाते ।। शरणु सज्जन दयाते ।। ५ ।।
शरणु शाहराज संनुताते ।। शरणु त्यागेशा मित्रा ते ।।
शरणु अखिल पोषकाते ।। शरणु गोवर्धनोद्धरणाते ।। ६ ।।

दरूऊ : येणेरीती सकल जन स्तोत्र करितां त्यांस पाहोन कृष्ण बोलतो पाहा.

(राग देव गंधर्व. अटताल)

सकल तूम्ही आतां सरस वचन ऐका ।।
अकलंक हृदयाने अहर्निश सुख पावा ।। १ ।।
सतत माझें भजन सतत तूम्ही करा ।।
वितत सकल संपदा विशेष तुम्हास देईन ।। २ ।।
अति वृष्टिभ आतां अखिल म्या निवारिलें ।।
मति मंतहो तुमचें ममतेने रक्षण केले ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती कृष्णाचे वचन आयकोन सकल जन बोलतात पाहा.

(राग रामकळी. आदि ताल)

साह्य आम्हास तूं असतां कृष्ण ।।
सकळ आम्हास भय कोणाचे काय कृष्णा ।।
तुझ्या साह्ये अर्जुनास जय आला कृष्णा ।।
तुझें साह्ये द्रौपदी राहिली कृष्णा ।। २ ।।
तुझें साह्येने मजेंद्र जिवें वांचला कृष्णा ।।
तुझे दयेने आम्हां सुख पावलोकृष्णा ।। ३ ।।
नित्य ध्यान पूजा करितों तूझी कृष्णा नित्य आम्हावरी दया करी कृष्णा ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरीती कृष्ण गोवर्धनोध्दरण करून सकळ जनास रक्षिले. ते पाहोन सकळ देव. ऋषीश्वर किन्नर किं पुरुष नारद तुंबर संतोषेऊन मंगळें गातातति पहा.

**मंगळं :** मंदर धरास माधवास ।। नंद कुमरास नरहरीस ।।
कंदर्प जनकास कमनीय रूपास ।। सुंदर मूर्तिस सुगुणास ।। १ ।।
शोभाने शोभनमे ।। भोंसळ शाहजि भीपतीस ।।
भासुर सुख साम्राज्य देणारास ।। श्रीपति वळ्ळभास ।।
श्रूत जन पोषकास ।। वासव पूजितास वासुदेवास ।।
शोभाने शोभनमे ।। २ ।।
इति श्रीमत् भोंसळ कुळ ।। शाह महाराज विरचितं ।। गोवर्धनोध्दारण विलास महानाटकं ।। सकळ रसिक विव्दज्जन प्रीतये ।। सकळ श्रेयसे ।। श्री त्यागेश सांबशिव पूर्णानंदार्पणमस्तु ।।

---

# ३. सुभद्रा परिणय

सुभद्रा-अर्जुन विवाहकथेतील नाट्यरसिक शहाजीराजांनी हेरले आणि त्यांनी हे रेखीव, रंगतदार नाटक लिहिले. त्यातील अर्जुनाने मायावी यती बनून येणे (वेषधारी संन्यासी), कृष्णाने तरुण संन्याशाबद्दल मुद्दामच शंका घेणे, आग्रही बलरामाने तरुण सुभद्रेला त्या संन्याशाच्या सेवेला ठेवण्याचा बेत करणे, कृष्णाने वरकरणी विरोध करणे व कृष्णाच्या खोडकर, विनोदी व चतुर व्यक्तिचित्रणाने नाट्यप्रसंगांना मिळणारे परिमाण ही सारी या नाटकाची बलस्थाने आहेत. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या 'सौभद्र' नाटकात या सर्व गोष्टी आढळतात, हा केवळ योगायोग नव्हे. बेळगावात असताना त्यांचा या नाटकाशी परिचय झाला असावा. या नाटकातील नाट्यगुण व रंजनमूल्य हे कालातीत आहे.

इतर नाटकांप्रमाणे या नाटकात कुठेही शहाजीराजांची नाममुद्रा नाही. तरीही यातील नांदी, कंचुकीराय विनोदी यांचे वर्णन (पट्ट नामधारी. . .) सुभद्रेचे वर्णन (राजहंसगमना ते राजीवपत्रनेमा ते) इत्यादी त्यांच्या इतर नाटकांत आढळणारीच आहेत. म्हणून हे नाटक त्यांचेच आहे.

लीलाशुक. —सुभद्रेजवळ मनोविनोदनासाठी लीलाशुक आहे. लीला + शुक असा त्याचा विग्रह आहे. संस्कृत काव्यात नायिकेच्या हाती लीलाकमल असल्याचे अनेक उल्लेख आढळतात. लीला म्हणजे क्रीडा. हातातील त्या कमलाचा उपयोग प्रियकराला संकेत देण्यासाठी, मनातील भावना लपविण्यासाठी किंवा हाताला गुंतवण्यासाठी, प्रसंगी चाळा म्हणून कमल असायचे. शुक-पोपट हा नायिकेने एकांतात केलेले हितगुज, प्रियकराला सांगणारा वा निरोप पोचविणारा असतो. मुख्यत: त्याच्याशी बोलण्याच्या मिषाने नायिका आपले मनोगत बोलू शकते.

अर्जुन व सुभद्रा एकमेकांची प्रश्नोत्तरे लीलाशुकाला संबोधून बोलतात. सुभद्रेने संन्यास वेषधारी अर्जुनाला ओळखिले. हे गुपित रुक्मिणी-सत्यभामा यांना सांगताच त्या कृष्णाला बोलावणे पाठवितात. मग विवाहसोहळा साजरा करतात.

# सुभद्रा परिणय

गुरुभ्यो नमः । जय पार्वतीरमण । जय जानकी रमण । जय अंतकदमन । जय मधुसूदन । जय त्रिपुर संहरण ।। जय वेद्धोधरण । जय अखिल नतचरण । जय जनाभरण ।। १ ।। जय रविशशी नेत्र । जय अखिल नुतिपात्र । जय पावन चरित्र । जय जगन्मित्र । जय नंदिवरवाह । जय अंडजावाह । जय नित्य सोत्साह । जय शमितदाह ।। २ ।। मंगलं ।। महालक्ष्मीवल्लभाय मंगलं, नित्य महनीय चरिताय मंगलं । राजीवलोचनाय । राकेन्दु वदनाय । अजिजित दैत्याय मंगलं ।। शरणागत रक्षाय । शमतारिपक्षाय । करुणार्द्रैक चित्ताय मंगलं ।।

सूत्रधार : येणेरिती नाट्यारंभ करून सुकविविरचित सुभद्रा परिणय नाटक विर्विघ्न सिद्धी व्हावी म्हणून कवि इष्टदेवता पार्थना करितो पाहा.

श्लोक : वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यासमप्रभ ।
अविघ्न कुरु मे देव । सर्वकार्येषु सर्वदा ।।

सूत्रधार : येणेंरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : या कुंदेन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता ।
या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ।।
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता ।
सा मां पातु सरस्वमी भगवती निःशेषजाड्यापहा ।।

सूत्रधार : येणेरिती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशम् ।
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम् ।।
लक्ष्मीकान्तं शुभगनयनं योगिभिर्ज्ञानगम्यम् ।
वन्दे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ।।

सूत्रधार : येणेंरिती परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : गंगातरंगकणशीकरशीतलानि ।
विद्याधराध्युषितचारुशिलातलानी ।।
स्थानानि किं हिमवतः प्रलयं गतानि ।
यत्सावमानपर पिण्डरता मनुष्याः ।।

सूत्रधार : येणेरिती सर्व देवता प्रार्थना केल्यानंतर **सुभद्रा परिणय** नाटकांत भक्तीनें युक्त भक्ती करून वाङ्माधुर्यार्थ पुष्टि कारणे प्रार्थना केली असतां तद्नंतर विघ्नेश्वर नाटचरंगी नृत्य करित येतो पहा.

मातृका : [ रागं पाडि. आदिताल. ]

संतोषे नृत्य करी शमवूनी विघ्ने हरी।
दंतीमुख आला देव दनुजा संहारी ।।
पाशांकुश परशु धरी, पापसंखे सकल हरी।
मुषक वाहन मोदक करी ।। २ ।।
सर्वदा दया करी । सर्प शोभे दोंदावरी।
पार्वती शिवसुत पाहे रंगांतरीं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती विनायक येऊन सकल विघ्न निवारण केल्यानंतर कथा ऐशीजे. बळभद्रराव निजसभेसि येतो म्हणून सभासदांस सावधान करावयास कंचुकीराय विनोदि येतो पहा.

(दरू) पट्टनाम धारी । अट्टहास करी ।।
काठी घेवुनि करी । कंचुकी आला सभांतरी ।। १ ।।
विकट बहुत करी । विष्णु ध्यान करी ।।
सकलाते दूर करी ।। संतोषाने बुडे मारी ।।

सूत्रधार : येणेरीती कंचुकीराय विनोदी येऊन सभास्थांना वंदन करून हें वर्तमान जाऊन बलरामास सांगितले तें आयिकून बलराम सभेस येतो पाहा.

(दरू) रत्नमुकुट धरून रणमीय।
भूषण लेवून रत्न सानुधैर्य रेवतीरमण यादव सहिता येतो ।।
कासिवस्त्र धरुनियां करि हल धरुनियां।
फाललोचन भक्त बलराम येतो पहा ।।
बसले असतां तद्नंतर कथा अइशिजे

सूत्रधार : येणेरीती बलराम येऊन सभेंत
बलरामाचे भेटीसि कृष्ण येतो पहा.

(दरू) कृष्ण येतो । सभे श्रीकृष्ण येतो । घननीळसमवर्णो करुणारस पूर्णा ।।
वनमाला धरितो । वनि त्या (वनिता) मोहनाकारी ।। १ ।।
सुंदर वेष धरून चंदन अंगी लावून नंदगोपकुमार नवनीत चोर ।। २ ।।
येतो पाहा । कृष्ण येतो पाहा ।।
कनक भूषण लेवून कटि पीतांबर धरून ।
मनसिजाजनक अति मंद हास करून ।।
कुकुतत्त दोहि किट झंत्ताविता हत्त जेणु ।
धण धण ताद्धिद तो ह किटातकतद्धळांथु ।
तकतळांगु म्हणुन गोपाळ येतो पाहा ।। २ ।।
सुंदर मुख अरविंद शोभते पाहा मंदरधरसम मनोहर नंदनंदन गोविंद आतां–तधिमितधित कणकिट्तकुतत्तोंकिटतक तळांगुतक तळांगु म्हणून येतो पहा कृष्ण येतो पहा.

सूत्रधार : येणेरीती आल्या कृष्णास पाहून बलराम बोलतो पाहा.

(दरू) कृष्णा काय केले विलंब । कृष्णा काइ केलें ।।
यादवतिलक मज येवून याम येक झाला यितुका वेळा ।
मायिबाप भोविलें कीं अथवा मनोहर वस्तु पाहिली कायि सांग ।। २ ।।
कधीं नाहीं तो संतोष आजि । मुखाने तुजला श्रीवल्लभा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीति बलभद्राचें बोलणें ऐकून कृष्ण प्रत्युत्तर बोलतो पाहा.

**कृष्ण :** स्वामीने ऐसें पुशिलें तर सांगतो अयिका स्वामि,
भामिनी जनपांचाल भासुरांग कामपाला. सकल तीर्थ स्नान करूनि सकल देवस्थल शंबूनें सकल भूप्रदक्षिणा करून संन्यासि येक आला. अकस्मात् बहुत मुनी पाहिले म्या बहुत योगी पाहिल्या म्या महित, गुण यासारखे महिमादिक कोठें नाहिं. या मुनीचे दर्शन घ्यावे. या मुनीची शेवा करावी, कामपाल हे ह्यापासून कल्याण कारण होयील.

**बलभद्र :** बरें तसेंचि जावूं.
येणेरीती बलरामास कृष्ण पाचारिलें असतां बलरामही संन्याशाचे दर्शनास जायास उद्युवत असतां तदनंतर कथा ऐसीजे.
संन्यासि वनांत येवून बसले असतां तदनंतर कृष्ण-बलराम संन्यासीचे भेटीस चालिले पाहा.
(दरू) मतिमंत बलराम माधवसहित माया यतिदर्शनाकारणे येतात पहा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति कृष्ण-बलराम येऊन संन्यासीस नमस्कार करून बोलतो पाहा.
(दरू) शरणु शरणु मुनिनायका ।। शरणु सौभाग्यदायका ।।
शरणु शरणु विधेयका रक्ष । शरणु सकल जनगेयका ।।
जयजय योगीश सतत अम्ही पाहि सतत अम्हां पाहि ।
दया करून तुमि आले धन्य झालों आम्ही ।।
जन्म आजि सफल झालें सदन पवित्र झालें ।
सन्मुनि तुमचे दर्शन सकल शुभावेळे ।।
दि ते ।। २ ।।
स्वामि तुमी कोठूनि आलां ते सकल कलानिधी, मजला वृत्तांत असेल तुमी सांगा.

**सूत्रधार :** येणेरीति बोलिल्या बलराम कृष्णानें पाहून मायायति बोलतो पाहा.

**यति :** बळराम कृष्ण तुम्हां मी सांगतों हें आयिका. बरें ये प्रकार माझे सकल वृत्तांत.
(दरू) धर्मचि चिंतन करितो मी ।। सर्व अहर्निशी धरणी ।। वर द्विज राजा वंश माझे भीमाशी पूजन करितों ।। मी सर्वदा ।।
विमल हरीचे ठायीं सुमनोरथ माझा।। ३ ।।
सकलसंगरहित मानस माझे ।
जन मजला योगी किरीटि म्हणति ।। ४ ।।
सकल तीर्थाते देखून संतोषे करूनि ।।
तुम्हासी पाहाया आलो ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति या संन्यासीचे वचन आयिकून बलराम बोलतो पहा.

(दरूऊ) स्वामीचे वचन ऐकूनि संतोष पावलों मनीं ।।
कामितार्थ फल होयीसी करुणा करावी मजवरी ।।
भूतल सर्व फिरून जातां श्रम फार पावलासी ।।
भूतल सर्व फिरून जाता श्रम आहे तुम्ही चातुर्मास्या
येथें करून सकला अम्हास भलारे कीजे ।।

सूत्रधार : येणेरीति बलभद्रानी प्रार्थना केली असतां मायासंन्यासी बोलतो ऐका.

(दरूऊ) संन्यासी आम्ही ग (घ) री तो सर्वदा राहू नये ।।
परंतु कंदमुळे खाऊन वनवास सदा करावें ।।

सूत्रधार : येणेरीति मायांसंन्यासीचें वचन आयिकून बलभद्र बोलतो पाहा.

(दरूऊ) उपवन आहे रम्य वुचित फलभरित ।।
जपतप करायास स्थळ आहे दया कीजो ।।

सूत्रधार : येणेरीति बलभद्राचें वचन आयोकोन मायासंन्यासी संमत होवून बोलतो पाहा. जैसें तुम्ही बोलिला आहांत तैसेंच संमत. आम्हां त्या वनिंवरति विशेष संतोष करून.

सूत्रधार : येणेरिति बलभद्रानें वुपवनास संन्यासी नेण्यासाठी अंगिकार करवून कृष्णास पाहून बलभद्रास वुचितार्थ बोलतो पाहा.

दरूऊ : [ मातृका. राग कांबोदि. आदि ताल. ]

सरसिजलोचन सांगतो आयिका । सरस माझे वचन अेक ।। १ ।।
कदि नाहीं पाहिले । आयिशा योगीस ।।
नविनती वनिता भोगी । यास मी ठेवावें शृंगार वनी ।।
याची सेवा करावी निशिदिनीं ।।

सूत्रधार : येणेरिति बलभद्राचे वचन अइकून कृष्ण बोलतो पाहा.

दरूऊ : काय म्हणतां विचार काये करितां माया मनाची
असती जोगी मन त्याचे विषय भोगी ।। १ ।।
सुंदरि आर्या सुभद्रा, सुरुचिर बाला ।।
इंदुवदना येतिजाति, यतिला योग्य नव्हे वसति ।। २ ।।
वनिता पाहिल्या सकलांचे मन होते चंचल ।।
मुनि विश्वामित्र व्यास, मुख्य चरित्र कळुनि असितां ।।

सूत्रधार : येणेरिति कृष्णाचे वचन अैकून बलभद्र बोलतो पाहा.

(दरूऊ) : सकल संग परित्याग प्रकट करि । याचे सर्वदा दूषूं नये नंदनंदना ।। १ ।।
अकलंक वेष असल्या सकलंक मन होते ।।
अैसे मजला भासतें रेवतीरमणा ।। २ ।।

मेरू चंचल झाल्या धीर चंचल न होते ।।
मात्र असमअंगर कारण कृष्ण ।। ३ ।।

**कृष्ण दरू :** थोर तुम्ही सकल विचार तुम्हांसी ठाऊक
तुम्हासी मना आलें ते करा । बोल नाही मजवरी ।।

**सूत्रधार :** येणेरिति कृष्ण-बलराम विचार केल्यानंतर योगीश्वराची सांगाते घेऊन वुपवनासी येतात पाहा.

(दरूऊ) : बलभद्र सहित कृष्णभक्ति करून उपवनासी
मलिनरहित मायामौनि येतात पाहा ।।

**सूत्रधार :** येणेरिति संन्याशासी शृंगारवनासी आणून बलभद्र कृष्णाला पाहून बोलतो पाहा.

(दरूऊ) सुभद्रेसी येथें ठेवावें आयिका कृष्णा सुरुचिर मुनिसेवेसी ।। १ ।।
दैवतोत्सव कारणे, जाणें आम्हांसी देवता पूजन अगत्य असे ।। २ ।।
सुयतिच्या शेवेला सुभद्रा योग्य, वयगुण रूप तिचे भाग्य ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिति बलभद्राचे वचन अैकून कृष्ण बोलतो पहा.

(दरूऊ) : मुनीनें काय मोहुन केले, बलरामा ।।
तुम्हि मुनिमायोसि वश्य काय झाला बलरामा ।। १ ।।
मुनि आणुन घरीं ठेविल्या नको म्हणत,
अमुची सुभद्रेसी ठेव म्हणतां बलराम ।। २ ।।
जोग्यापरीं मूली ठेवणें नव्हे वुचित,
अैसे जोगी मायावादी विषयभोगी असतो बलराम ।। ३ ।।
मजवरी बोला सर्वदा तुम्हि ठेवूं नका आतां ।।
मज कळल्यासारखे सर्व म्यां सांगितलें ।। ४ ।।

**बलराम :** आयिक कृष्णा तूं बाळ ।। तुज काय कळेल ।।
ते मायामुनिसारखे ।। यासी पाहतोस कशास ।।
इतुक्या संशयासी गरज नाही ।। अवश्य मुनिसी ठेवूं ये ।।

**कृष्ण :** मज सुचलें तें मी सांगितले, यितुक्याउपर तुमची इच्छा.

**सूत्रधार :** येणेरिति कृष्ण बलराम संन्याशास पाहून बोलतात पाहा.

**वचन :** आयिका स्वामी हे वन तपश्चर्येसी योग्य आहे. चातुर्मास्या येथेंची करावें. आमी स्वामिची सेवा करावी तर आज रैवतकोत्सवाकारणें जाणें आवश्यक आहे. आमुची बहिण सुभद्रा कन्येस तुमच्या सेवेकारणे ठेवून जातो. पाहिजे ते पदार्थ सुभद्रा आणून देईल. सेवा करीत असेल, तुमी तपश्चर्या करीत असा. उत्सवासी जाऊन शीघ्र येतो.
अवश्य तसेंच करूं.

**सूत्रधार :** येणेरिती कृष्ण बलराम संन्याशाशीं बोलून सकल यादवसहित येक रम्य प्रदेशी बैसून संन्याशाच्या सेवाकारणें सुभद्रेस पाचारिलें असतां सुभद्रा येते पाहा.

दरु : सकळ सौदर्यादिक स्वरूप आहे । येक । मकरकेतन शुक ।।
मंजुभाषण कन्यका ।।
पाहणार जन मोहती । परिमल गुणवती ।।
मोहिनी हे त्रिजगती । मोहिताहे गजगति ।। २ ।।
सकलंकार करूनि । चदन अंगा लावुनि ।।
अकलंक गुणखाणी । अलिकुल नीलवेणी ।। ३ ।।

परिपूर्ण चंद्रवदना, येते पाहा, क्षामित कुंदरदन ।।
सुरुचिरजीवित मदन सुभद्राकन्याशोभत लक्षण सदना ।। १ ।।
कनकांगी शुकवाणी हंसगामिनी कमनीय नीलवेणीवनजाक्षि ।
वनितामणी घनस्तनीं वंदनीय सर्वजनी ।। २ ।।
सकलाभरण लेवुनी । चंपकनासा द्वंशकंव्यकामणि
मकरकेतन मानिनी निंदितासे महनीय्य रूपखाणी (गुणी) ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्रा येऊन कृष्ण बलभद्रास नमस्कार केला. कन्येसी पाहून बलभद्र बोलतो पाहा.

बलराम : अइक सुभद्र, अमुचा पुण्यपरिपाक असतां मोठा यतीश्वर आला हे. ते चातुर्मास्या येथेंच करील. चार महिने सावधानपणे त्याची सेवा करीतल्यांनीं सांगितल्याप्रमाणे वर्तमान करीत सुखरूप अैस. तुझे सकल कल्याण प्राप्तीकर होयील. आम्ही दैवतोत्सव करून शीघ्र येतो. ।।

सूत्रधार : येणेरिती बलभद्राचे वचन अैकून कृष्ण बोलतो पाहा.

कृष्ण : सत्यवाणी सरस्वती ।। तथास्तु ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्रेसी बुद्धिवाद सांगून कृष्ण बलभद्र रेवतकोत्सवासी गेल्यानंतर कथा संविधान अइसीजे. सुभद्रा संन्याशाचे सेवेकारणें येते पाहा.

(दरूऊ)
संदर रूपवती सुभद्रा येते पाहा ।। मंदगजगतीने
मौनी शेवेकारणें येते पाहा ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्रा येवून यतिश्वरासी नमस्कार करिते पाहा.

(दरूऊ)
शरण शरणु योगींद्रा । शरणु शरणु मौनिचंद्रा ।।
शरणु वंदितो पेन्द्रा । शरणु शरणु गुणचंद्रा ।।

सूत्रधर : येणेरिती नमस्कार केली ते सुभद्रेसी पाहून माया संन्यासी बोलतो पाहा.

संन्यासी : (दरूऊ) विजय कल्याणभिवृद्धीरस्तु ।।
गजयान वर बुद्धि तुजे सतत अस्तु ।।

सूत्रधार : येणेरिती आशीर्वाद केला अइश्या संन्याशास पाहून सुभद्रा बोलती पाहा.

सुभद्रा : (दरूऊ) स्वामी कोठून आलेत् । स्वामी कोठुन आले तुमी ।।
स्थळे कोणती पाहिली । भूमी सकल पाहिले काय ।।
पूर्वचरिता सांग तो ।। १ ।।
बहुत मुनि स्या पाहिले । वर परमसद्गुणशील ते ।
महनीय गुणस्वरूप । नाही पाहिले तुमच्यासारखें ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्रेने पुशित असतां यतीश्वर बोलतो पाहा.

यती । (दरूऊ) काशी काळहस्ती जेजुरी । नाशिका त्र्यिंबक पाहिले ।
कोसल कौशिक सौत्वीरादिक । कुरुर्जर देश पाहिले ।
कुंतलमंजुळ लाट देशकुंद मथुरा चोळ देश संतत कांची मध्यप्रदेश ।
सर्वही पाहून आलो असें मी ।।

सूत्रधार : येणेरिति माया संन्याशाचें वचन अैकून सुभद्रा प्रत्युत्तर बोलते पहा.

सुभद्रा : (दरूऊ) अनघा विनंति करितें ।।
अयिक तुम्हांस मनिं भय न धरितां मुनिवरचंद्रा ।।
दिवस फार झाले देवेंद्रन्नन्दन अवनी फिरायासी ।।
जावून आला नाहि आतां । अनधा ।। ३ ।।
अमलशील कोठें आहे कीं तो सांगा कमनीय ।।
किरिटीनीस करुणांबुधि पाहिलें काय ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्रेने पुसत असतां सुभद्रासी पाहून यतीश्वर बोलतो पाहा.

यती : सुभद्रे, अर्जुन कोठें आहे कीं म्हणून पुसलीस, त्याची चिन्हें सांगितल्यास त्यास ओळखून सांगेन.

सूत्रधार : येणेरिती यतीश्वराने पुसलेउपरी सुभद्रा सांगते पाहा.

सुभद्रा : (दरूऊ) धनानीळ वर्ण त्याचा । अइका स्वामी ।।
कमळासारखे नेत्र त्याचे । अइका स्वामी ।।
वनजावैरीसम त्याचें वदन सुशोभताहे ।। १ ।।
विशाल वुर असा त्याचा अइका स्वामी ।।
विविध वर्णनीय रूप तो, अइका स्वामी ।।
असमशर समान तो, अवनीवरी विराजितो ।। २ ।।
मजला मेहुणा तो गावास्वामी होता ।।
अइका स्वामी, मदनारीस पूजितो देवा ।।
गजपति रूपलावण्य ठेवा । कार्मुक विद्या प्रभाव ।।

सूत्रधार : येणेरिति सुभद्राचे वचन अैकून यतीश्वर बोलतो पाहा.

यती : (दरूऊ) इतुकी पुसतीस कारण काय ।।
सतत त्यास तूं सादर सारसाक्षी । अर्जुना नाही ।।
पुलकित देह पाहून पूर्ण चंद्रमुखि होऊन ।
सललित भाषणाने संतोषचित्त करून. ।।

मंदहास करून । मंजुळ भाव करून ।।
कुंदनिभ् मदने । कुसुमशर जीवने ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती माया संन्यासिचे वचन अैकून सुभद्रा बोलते पाहा.

सुभद्रा : (दरू) आयिका हो स्वामी । अमरराजनंदन
अमुचे वुपू याचे तनुजा कमलात्पतेजां सवर्ण
महा फिराया जावून बहुत दिवस झाले ।।
न दया त्या अर्जुना ये । कौरव काय ।। २ ।।
आता कोठे आहे कीं तो । अजून काय करितो ।।
असेल हे मज न कळें । स्वेतवाहन ।।

सूत्रधार : येणेरिती सुभद्राचे वचन अैकून माया संन्यासी बोलतो पाहा.

संन्यासी : बरें झालें की, हे कोण तो महान होतो, आतां कळलें. तो आमुचा मित्र व्हावा. त्याने अम्ही सकल भूप्रदक्षिणा केली. सकल तीर्था नमिलें. आता मी येथें आलो, तो गोकर्ण क्षेत्र यात्रा करून यायास गेला. चौ दिवसांमध्ये येयील. तुझी त्याची भेटी होयील. अता मध्यान्ह झाले. लिंगपूजना विलंब होतो. सामग्री घेवून ये.

सुभद्रा : पूजासामग्री काय काय आणावें सांगा स्वामी रिषी.

संन्यासी : सामग्री सांगतो अैक मोहनांगी.
(दरू) सामग्री अैशी तू आणि नव मोहनांगी ।
सामग्री सरस अलिपानरहित जलजात ।
कुसुमाणि परभृतस्वादरहित ।
पक्ववाणी बिंबाधरी ।। सामग्री ।।
नवकनक कलशा दोनी ।।
नवधार वुत्तमांणि आणि ।
नव आरक्त पोळि आणी ।। २ ।।
नव मधुर शर्करा आणी ।
नव धूप दिपा आणी ।।
नव तांबूल चंदन आणि ।।
नव मंगळार्ति आणी ।।
नवनीतसमाभाषणी ।। सामग्री ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती माया संन्याशी वचन अैकून सुभद्रा बोलती पाहा.

सुभद्रा : आयिका स्वामी तुम्ही सांगितल्याप्रमाणें पूजा सामग्री सिद्ध आहे. तुम्ही शिवपूजा करा.

सूत्रधार : येणेरिती सुभद्रेनें सकल सामग्री दिली असतां; मायासंन्याशी लिंगपूजा करीत असता, सुभद्रा संन्यासीस पाहून, हा संन्याशी नव्हे, अर्जुनसा दिसतो म्हणून लीलाशूकास पाहून बोलते पाहा.

सुभद्रा : (दरू) अर्जुनापरि दिसतो हा लीलाशुका । आयिके ।।
अर्जुनाची चिन्हे यास आहेत । लीलाशुका ।। १ ।।
आजानुबाहू शोभताती पाहा । लीलाशुका ।।
नवराजीवदलनेत्र पाही। लीलाशुका ।। २ ।।
घननीलसम वर्ण पाहा । लीलाशुका ।।
चापकार्मुक गुणांकित कर पाहा लीलाशुका ।। ३ ।।
वर विशाल वर पाहा लीलाशुका ।।
याचे शर पाठीवरी ढळती पाहा । लीलाशुका ।।
यांस मी अर्जुन म्हणता लाजतें । लीलाशुका ।।
याचे मनद्रव नर्महास्याने सांगे । लीलाशुका ।।

संन्यासी : न अर्जुन म्हणती । लीलाशुका । मी अर्जुन व्हावें म्हणून (?)
यिशि सांगतो । लीलाशुका ।।
नीलवर्ण सोरे अर्जुन होते काय । लीलाशुका ।।
पाहा निपुणता या कन्यांची । लीलाशुका ।। २ ।।
अर्जुन जोगी कशास होईल । लीलाशुका ।।
त्याचे अगणित स्त्रिया (वय) राज्य असतां । लीलाशुका ।। ३ ।।

सूत्रधार: येणेरीति मायासंन्यासी शुकासी बोलिला ते आयिकोन सुभद्रा संन्यासीस पाहून बोलती पाहा.

सुभद्रा : आयिका वो स्वामी, मजसे वंचन कशासि करिता ? अर्जुनावेगळे पाठीवर तीळ असी खावी असो पाहतो की, जो निश्चय केला तो यथार्थ आहे. तुम्हि लपवूं नका । यथार्थ सांगा.

संन्यासी : (दरू) चंद्रमुखी गातो आइका ।। यिन्द्रतनुज मी हिमकर वंशज ।।
सांद्रगणाकर संगर विजय मी ।। वगरमणि शिवेले मयाकारणेंसे ।।
अमित माया करून यतिवेष धरलो ।।
अमुचे मनोरथ आजि तूं पुरवी ।। लोकीं तुज सकलकल्याण होयील ।। १ ।।
विजनि होंवन पाहा रजनीमुख समया ।।
तुज यौवन संपूर्ण बोल तूं ।।
भुजगवेणि हे लाज त्यजि झडकरी तूं ।।
सजणी कधी अइसा समय सांपडेना ।। चंद्र ।। २ ।।

सूत्रधारः : येणेरीति अर्जुन जो बोलिला ते ऐकून सूभद्रा लज्जेकरून प्रत्युत्तर न देतां असतां अर्जुन सुभद्रेसी पाहून, विनोद करितो पाहा.

अर्जुन : (दरू) विरहबाधा बहुत जाहली परवश शरीर आहे ।
सरस अधरपान दे घे माझे ।। १ ।।
लाजसि कशासी मजशि । ललित बोले मजसि ।।
राजमूखि आलिंगन दे संतोषे करून ।।
राजमूखि आलिंगन दे ।। तुज भेद नाहीं ।।

तूं कशासी लाजसी हे । मज सांग तूं कुच धरूं दे गजनामिनी ।।
मज सांग तूं तुझा संकोच दूर होऊं दे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति अर्जुन बलात्कार करून स्तन धरायासी आला. (ते पाहून सुभद्रा लाजून पलिकडे गेली असतां अर्जुनासी विरह अधिक होवून विरह अभिनीतो पाहा.)

अर्जुन : दरू काये करूं विरह मजला सोसवेना ।।
हरहर कामिनीही वश्य नाहि झाली मजला ।।
कीरत जाव मि बैसुन बाधिताहे शरीर ।।
मारशर मजे मारिताहे क्रूर हृदया ।। २ ।।
सीतकर होवुन मज हा जातवेदासा भासतो ।।
जूत कोकिल गीत मज अति भीति करितें ।। ३ ।।
मलय मारुत बाधिताहे मजला फार हरहर ।।
ललित शुकसल्लापकर्णी शल्य आहे ।।
मज तिजेसी भेटवाया महींत कोणी नाहिं रें ।।
भुजग वेणीसि रमेन कैसा पुण्यहीन ।।

सूत्रधार : येणेरीति अर्जुन विरह अभिनीत असतां त्या समयीं सुभद्रा अर्जुनाजवळी नाहीं. त्याकारणें विरह अभिनीते पहा.

सुभद्रा : (दरू) कां येथें आलें मी अर्जुनापासून ।।
काम अधिक झाला मजला काय ते धीर धरुनि मजला प्रयोजन ।।
काम अधिक बाधितो ।। १ ।।
त्याचें वचन ना ऐकतां आलें मी । त्याला वश्य नाहिं झालें ।।
त्याचें अधरपान म्या केलें नाहीं । त्याला आलिंगलें नाहीं ।।
विरहांबुधि तरुं मी कैसी । परवश झालें अंग मजला ।।
सखिजनहि जवळ नाहि । मन माझे चंचल होते हे फार ।।
जन कोणि पाहिलें कीं ।।

सूत्रधार : येणेरीति सुभद्रा विरह अभिनीत असतां त्या समयीं रुक्मिणी, सत्यभामा सुभद्रा आली नाही म्हणून विचाराया कारणें उपवनास येतात पाहा.

(दरू) मंदशीत आनंद करून मंद मंदा रुक्मिणी ।।
वंदिताति सकलसखिजनवारवृंदें ।।
सकल श्रृंगार करुनि सादर सारसनयना येतसे ।।
अकलंका सौंदर्यरूप अखिल मान्ये।।
चंदनाकर्पूर कस्तूरि चर्चुनि वुटि वेवूनि ।।
इंदुवदना मंद हासमुख येलां लालविही ।।

(दरू) राजहंसगमना ते राजीवपत्रनेत्रा ते ।।
राजमुखी शोभता ते रामा रमणी ते ।।

कलकंठी मृदुवजनी कस्तूरि तिलक धरुनि ।।
अलिफुल वेणी अंबुजपाणि ।।

**सूत्रधार :** येणेरीति रुक्मिणी सत्यभामा येवून सुभद्रेशी बोलताती पाहा.

**रुक्मिणी :** (दरू) काय उशीर झाला तुमि सांगा वहिनी ।।
(चकित) चेकिता होवुन तुमि चौकडें पाहतां विकलमानसा तुम्ही ।।
विविधविकार बोलाविलासे बोलत नाहीस ।।
काल विलंबन कां लागला ।। २ ।।
मुखकांनीं तुझि बहु म्लान झाली ।।
सखीजन कोणही समीप नाहि ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती रुक्मिणी सत्यभामाचे वचन अैकून सुभद्रेने प्रत्युत्तर बोलते पाहा.

**सुभद्रा :** आयिका वहिनी ! मायासंन्यासाचि सेवा मला करा म्हणिले की, त्या प्रकारे सेवा करीत असता अर्जुनेची मायासंन्याशि रूप धरून आहे. तो मजसी बलात्कार करून विनोद करायासी आला. मी लाजून येथे पळून आलें.

**सुत्रधार :** येणेरिती सुभद्राचें बोलने अैकून रुक्मिणी सत्यभामानें कृष्णास बोलाविले. कृष्ण येतो पाहा.
रुक्मिणी सत्यभामासहित नंदनंदन मत्तेभयान सुभद्रासहित कल्याण-कारणें श्रीकृष्ण येतो पाहा, अर्जुनाजवळी.

**सूत्रधार :** येणेरिती कृष्ण, रुक्मिणी, सत्यभामा सहित होवून सुभद्रेसवें घेवून विवाहा कारणे अर्जुनाजवळी येत असता कथा अैशीजे ! देवेंद्रानें दिव्य दृष्टीने आपलें लेकास वराढी म्हणून कळून देवेंद्र येतो पाहा.

(दरु) अरावतावरि बैसुनि अखिल देव घेवून धीर आला असुरा
जिंकुन देवेंद्र तो संतोषान ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवेंद्र आल्यानंतर अर्जुनासी सुभद्रेस विवाह करिताती पाहा.

**सूत्रधार :** येणेरिती विवाहसमयीं किन्नर किंपुरुष मंगल गातात पाहा.
मंदर धरासे माधवासे अर्जुन विवाह कारणे अति आदरणे ।।

---

## ४. गंगा कावेरी संवाद नाटक

सरस्वती महाल ग्रंथसंग्रहालयात या नाटकाच्या तीन प्रती उपलब्ध आहेत. यातील कथानक भारताला ललामभूत असलेली गंगा व दक्षिण भारताला सुजल, सुफलित करणारी मोठी नदी कावेरी यांच्यातील सवती मत्सरावर आधारलेले आहे. दोन्ही सागर पत्नी ! त्यांच्यातील उच्चनीचभाव जागृत होऊन सामान्य स्त्रीप्रमाणे एकमेकींना अद्वातद्वा बोलतात, एकमेकींची वर्मे व न्यूने उच्चारून पाणउतारा करतात. शेवटी सागर पंचनदीश्वर (शंकर) या तंजावरात असलेल्या महादेवरूपाची प्रार्थना करतो. पंचनदीश्वर प्रकट होऊन आशीर्वाद देतो. तरीही गंगा व कावेरी ' दोघींमध्ये श्रेष्ठ कोण ' असे पंचनदीश्वराला विचारतात. तो म्हणतो—

" समान तुम्ही दोघीजणी सत्यकन्यगंगे ।
उत्तर जन उद्धराया गंगे उत्तम तूं तेथें ।।
दक्षिण जन रक्षायास दाक्षिण्याने आम्हां द्राक्षरस कावेरी ।।

शहाजीराजांची कल्पकता व कल्पनाशक्ती यांचा उत्कृष्ट संगम या नाटकात आढळतो. कावेरी नदीच्या आगमनाबरोबर कुणबी शेतकरी आपली शतीची अवजारे घेऊन उद्योगासाठी येतात. सुवासिनी मंगल आरती करायला येतात. विद्वान् तात्त्विक विचार ' को हं, कस्त्वं ' इत्यादी विचारांत गढून जातात. संन्यासी, तापसी दर्शनाला येतात.

कावेरी सुंदरीचे रूपवर्णन नदीच्या समर्पक वर्णनाने खुलले आहे.

'चक्रस्तनितरंगत्रिवल्ली शैवल रोमावळी.
आवर्त गंभीर नाभिसैकत श्रोणी सरता ।।

अशा उचित शब्दांत केले आहे. तंजावरवासियांचे कावेरीमातेबद्दलचे प्रेम व रास्त अभिमान (Local patriotism) या नाटकात अन्वर्थक वाटतो जाणवतो.

# श्री गंगा कावेरी संवाद नाटक

श्री गुरुभ्यो नमः । जय पार्वती रमण ।
जय मनोभवहरण । जय भुजंगाभरण ।
जय शरणा । जय जान्हवीधरण ।
जय जितांतः करण । जय सरोरुहचरण ।
जय जगत्करण । जय जया । सकल जगदाधार ।
सादित धराभार । मकरांक मदहार ।
मंकलाकार विकट रिपु संहार । विदृतभणिगणहार ।
सुकृतिजन मंदार । शोभन विहारा ।। १ ।।
साधुजन परिपाल । सर्वज्ञ शुभ लील ।
बाधित हित जाल । भक्तानुकुल ।।
माधुर्यगुणलोल । क्रोध निर्जित काल ।
गुणगण विशाल । जय जया ।। २ ।।

शरणु शरणु श्री वसुदेवनंदन ।
शरणु चरणानन सनंदन ।
शरणु सुरकृतनंदन ।।
मधुर भाषण महिततीषण ।
मदविरोधि विशेषण ।

बुध विभूषण । भूतपोषण । भुजबलानुत दूषण ।। २ ।।
बुद्धता घट्टण । प्रभंजनयोगिहृदयनिरंजन ।
सिद्धचारण मुख्यरजन,. . . . .हरिमुरभंजन ।। ३ ।।
दिव्यभक्त समूह सादर देवतामरसोदरा ।
पार्वती हृदय शंकर भवहर क्षेमंकर ।। ४ ।।

महादेवेशाय ते मंगलं जय मंदाकिनी च जय मंगलं ।।
भानु कोटीप्रभाय भक्तसंरक्षकाय मीनसतीनाथाय मंगलं ।। १ ।।
चंद्रावतंसाय चतुराननसव्याय मंदारवासाय मंगलं ।। २ ।।
निगमंत देव्याय निष्कलंकरूपाय मकरध्वजभंगाय मंगलं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती नाट्यारंभ करून तद्नंतर गंगा-कावेरी नाटकांत आदिभक्तें निजभक्तें करून इष्टदेवतांची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : वंदितो मी एकदंताचे पाये ।
अनेक दंत तो मज सहाये ।
हरितसे सर्व विघ्न उपाय ।
दया करितो सुप्रसन्नगणाराय ।।

सूत्रधार : येणेरीती विनायकाची प्रार्थना करून तद्नंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

श्री गंगा कावेरी संवाद नाटक

श्लोक : विश्ववंदे जननी सरस्वती
वीणा पुस्तक धरी दोनि हाती ।
वंदितो चरण तिचे ध्यानातें
दया करिते मजवरि या जनातें ।।

**सूत्रधार** : येणेंरीती सरस्वतीची प्रार्थना करून परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

**श्लोक** : वंदितो महाददभुत दैवता
अर्धतनु स्त्रीपुरुषार्थ संयुता ।
येक पार्श्वं व्याघ्रचर्मान्यिकनकांबरा
वामपार्श्वं नीलकेशसव्यजटाधरा ।।

श्लोक : सानंदगिरिजायुक्त सस्मित-प्रियभाषणः
शिवः करोतु कल्याणं चंद्रार्धकृतशेखरः ।।

**सूत्रधार** : येणेंरिती परमेश्वराची प्रार्थना करून तद्‌नंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पाहा.

**श्लोक** : नमो वेदैकवेद्याय अवन्युद्धरणाय च
आपदामपहर्ताय वायुदेवाय मंगलं ।।

**सूत्रधार** : येणरिती सकल देवतांची प्रार्थना करून सुकवि रचित "गंगा कावेरी संवाद" या रंगभूमीस नाटच करी. हे निर्विघ्न करून भक्ति निजभक्ते करून वाङ्माधुर्यार्थ पुष्टिकारणें प्रार्थना केली असता आतंरें करून विघ्नराज नाटचरंगीं नृत्य करित एतो पाहा. (प्रवेश गणराजाचा).

**दरूऊ** : संतोषें नृत्य करी शमवुनी विघ्ने सारी ।।
दंतिमुख आला देव दनुज संव्हारी ।। १ ।।
सिंदूर माथ्यावरी शशिकला शोभे बरी ।।
मंदमंद धार कपोलीं मधुकरहारी ।। २ ।।
पाशांकुश परशुधारी पायस घे सकलहारि ।।
मोषक वाहन मोद करी ।। ३ ।।
सर्वदा दया करी सर्प शोभे दोंदावरी ।।
पार्वतीशिवसुत पहा रंगांतरीं ।। ४ ।।

**सूत्रधार** : येणेंरिती विघ्नेश्वर आल्यानंतर सुकवि रचित गंगा कावेरी संवाद नाटकांत कथा ऐसीजे.
समुद्रराज निजसभेस ऐतो म्हणून सभास्थानास सावध कराया कारणें कंचुकीराय विनोदी येतो पाहा.

**दरूऊ** : पट्टेनामधारी । अट्टाहास करी । काठी घेउनि करी कंचुक्याला सभांतरी ।
विकटा बहुत करी विबुध्यान करी ।।
सकलांस दूर करी संतोषानें उडया मारी ।।

**सूत्रधार** : येणेरिती कंचुकी येऊन सभासिद्धी केल्यानंतर सभा शोभिवंत करायासि रत्नाकर सभास्थल अलंकारभूषित होऊन निजसभेस येतो पाहा.

**दरू :** सकल रत्नाकर सादर सभेसि आला ।।
अकलंक सिंधूराजा मकर कच्छपादि ।
महनीया जंतु रक्षित यक मनें संतोषातें ।
यशस्वी अपांपति आला ।।

**सूत्रधार :** येणेरिती समुद्रराज निजसभेस आल्यानंतर कथा ऐसीजे. सह्याद्रिकुमारीस—सकल पापक्षालिणी, सकल लोकपावनी, सकल जीवन सामर्थ्यें करून, चौंल देशांत विहार करायासि एते म्हणून निजोद्योगें तत्पर जाग्रत असावा म्हणून सांगून सावध करायास चंडवाता नामांकित द्वारपाल येतो पाहा.

**दरू :** चंडवात येतो पाहा द्वारपाल ।।
चंडवंत येतो चोलमंडलजनसंतोषाला ।।
खंडित तरुसिखर दंडित मेरूमंडल ।।
कावेरी तोय परिपूर्ण कामित देया येते म्हणुन भावेकुन भजा म्हणुन ।।
बहुजनांसि सांगत ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेंरिती चंडवात येऊन निजोद्योगें तत्पर केले, हे जाऊन कावेरीमातेस सांगितले, ते आइकून संतोषचित्तें करून करुणारसपरिपूर्ण चोलमंडल रथावरि दयेनें पुनीत करायास सह्याचल कोमारीस सकललोकपावनी कावेरी अंबा एते पाहा.

**दरू :** सकलापावनी जननी एते सह्याकन्या ।।
सतत सकलजन रक्षायास मीनलोचना ।।
जलजामुखी अलिकुंतल ।।
(सभासिद्धी केल्यानंतर सभा शोभिवंत करायासि रत्नाकर सभास्थळ अलंकार भूषिते होऊन निज सभेस येतो पाहा).
अलिकुंतलदर कंठीतुंग ।।
चक्रस्तनितरंगत्रिवल्लि शैवल रोमावली ।।
आवर्त गंभीर नाभिसैकत श्रोणि सरस ।।
अनुपम कदलिस्तंभोरुशतपत्र पाद ।। १ ।।

**दरू :** चोल मंडल भरणास कलाग्रहार शोभित सुशील गुणा ।।
भोलासे चंपक सुमाभरणा ।।
अखिल जीवन भुवनैक सांवनीय गुणा ।। १ ।।
द्विजराज हंसमंडिता दिनपालक दिविषदामुद जनका ।।
निजकुल भलशानि विशालरूप निरुपम रत्नाकर मेखला ।।

**सूत्रधार :** येणेरिती कावेरीमाता आल्यानंतर कावेरीमातेच्या दर्शनास चोलमंडलांतील कुणबीजन आपले आपले निजोद्योगाकारणे येताति पहा.

**दरू :** खोरी हातीं घेउनि कुदली के
खाणून येरिकरैकडु वा म्हणुन येताति कुणबी त्वरेने ।।

**सूत्रधार :** येणेरिती कुणबी येऊन आपला निजोद्योग करित असतां तद्नंतर कथा ऐसीजे. कावेरीमातेचे दर्शनास सुवासिनी मंगलार्ती घेऊन येताति पहा. सुवासिनी येताती

पहा मंगलार्ती घेऊन, गंधकस्तूरि घेऊन, सुगंध पुष्पाक्षता घेऊन, गंध द्वीपावर यान कावेरी.

सूत्रधार : येणेरिती सुवासिनी आल्यानंतर चोलमंडलातील विद्वांस पूर्णकुंभ घेऊन कावेरी-मातेचे दर्शनास येताति पाहा.

दरू : विद्वांस येताति पहा.
विद्याखिल परिपूर्ण तद्वस्तु निधानज्ञान
तर्याकुन (?) जननिदर्शन
गंधाक्षत लावून गंभीर पुस्तक घेऊन
प्रबंधविचार करित बहु विश्व कं. किं म्हणत ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती विद्वांस आल्यानंतर संन्यासी तपोधन कावेरीमातेचे दर्शनास येताति पहा.

दरू : दंडकमंडलु धरुन मुंडित मुंड येतिजन ।।
खडेंदुशेखर ध्यान करुन काविवस्तें धरुन ।।
विभूति या या लावून विमल निष्कपट मने ।।
विभुतत्त्वज्ञ तपोधन विश्ववंद्य येताती जाण ।।

सूत्रधार : येणेरिती संन्यासी आल्यानंतर सकल जन मिळून कावेरीमातेस नमस्कार करून स्तोत्र करिताति पहा.

दरू : जगज्जननी पाहि जगज्जननी ।।
नगराज सह्याकुमारी नवपक्वबिंबाधरी ।। १ ।।
पीतपयोधरगलित पृथुतरंगवलियुक्ते ।।
पानयोग्य पयसा भूरिबहुप्रज तृष्णहरी ।।
कंकण विराजमान कमनीय निजांकगत ।।
पंकजमुख संतान परिपालय नित्यकल्याणी ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती स्तोत्र करून सुवासिनी मंगलार्ती करिताति पहा.

दरू : जयमंगलं शुभमंगलं मंगलं मरुद्विध मंगलं
सह्यसुते मंगलं चोलभूपालनीते ।।
मंगलं जननी ते मंगलं पावनी ते
मंगलं तापत्रय भंजनी ते ।। १ ।।
विकचकमलनेत्री विश्ववंद्यचारित्री ।।
सकल सुंदरगात्री सह्यपुत्री ।। २ ।।
प्रकट स्तुतिपात्री परिपूर्ण दुवत्रि ।
अकलंक नाम पतिची अखिल स्तोत्रि ।।
नित्य कल्याणि ते निगमैक वेद्यते ।
सत्यस्वरूपिणि ते सकल जननि ते ।।
भृत्यजन पालिनि ते पृथु मुददायिनि ते
अत्यंत शुभदेते अंब पाहि मे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकल जन मंगलार्ती करीत असता तद्नंतर कथा ऐसीजे. ब्रह्मलोकींहून नारद कावेरीमातेचे दर्शनास येतो पहा.

**दरू** : नारद येतो पहा ।।
वीणा वाजऊन विश्वजन मोहून
तान सुस्वर तदेक मन
गान विविध गाऊन ध्यान करून,
कावेरी दर्शनास
कांति शुभ्र बरी कटीं व्याघ्रचर्म धरी
शांति स्वरूप जटाधारी,
संतोषानें हरि सादर स्मरण करी,
अंतःकरणी बरी अखिल विद्या धरी ।।

**सूत्रधार** : येणेरीती नारद येऊन कावेरीमातेस नमस्कार करून स्तोत्र करितो पहा.

**दरू** : शरणु शरणु पापहारी शरणु सह्यकुमारी ।
शरणु चोल देशविहारी शरणु जननि कावेरी ।।
शरणु शरणु अघनाशनि शरणु अखिल दुःख शोषणी ।
शरणु शत्रुभयमोचनि शरणु सर्व जनपावनि ।।

**सूत्रधार** : येणेरीती नारद येऊन स्तोत्र केल्यानंतर नारदास पाहून कावेरीमाता बोलते पहा.

**कावेरी** : कां नारदा! कोठून आलास ? येथे यायास कारण काय, हें सांग.

**नारद** : आईक कावेरीमाते, मी गंगेपासी गेलो होतो. गंगेने मज पाहून पुसों लागली, आईक नारदा, तूं सर्वत्र संचार करितोस कीं, मजसमान पतितास पावन करायास, सकलजनास अभीष्ट देयास, सकल पाप दूर करायास मजसमान कोण्ही नाहीं म्हणून सांगितलें. तेव्हां म्यां प्रत्युत्तर दिल्हे. निर्भये-करून बोललो, समुद्रराजास सहस्र नदी स्त्रिया आहेत. त्यांत तुम्हांसमान दक्षिण देशामध्यें चोल विहारिणी, अखिल पापविमोचिनी, सकल पतितपावनी, जनज्जननी सह्याचलकुमारी कावेरीमाता आहे, म्हणून सांगितलें. तें आइकून मजसमान शतसहस्र आहेत म्हणून कैसे बोल्लास ? कावेरीस सांग जा म्हटलें. हें सांगयाकारणें संतोषें मी याला.

**सूत्रधार** : येणेरीती नारदाची वचन आइकून कावेरीमाता प्रत्युत्तर बोलते पहा.

**कावेरी** : आईक नारदा, हें व्यर्थ बोल्ल्याचें प्रयोजन काय ? आम्ही समुद्रराजापासी जातो. जान्हवी ते येईल कीं तेथें समई तीचे मा. . . . . .चा प्रभाव मग तुलाच कळेल.

**सूत्रधार** : येणेरीती कावेरी नारदास बोल्ल्यानंतर कावेरी समुद्रराज दर्शनास येते पाहा.

**दरूवु** : आलंकुन नीलवेणी अंबुजरललोचनी ।
कलकंठि शुकवाणी कमनीय कल्याणी ।।
कावेरी येते अतिसत्वर पहा ।।

सूत्रधार : येणेरीती कावेरी येऊन समुद्रराजासमीप बसली अस्तां तद्नंतर कथा ऐसीजे. जगन्माता सकल लोकपावनी, त्रिलोक रक्षकी, जन्हुकुमारी गंगाभवानी एते पाहा.

दरू : सुरहमलातसारखे सुमनोल्लासें ।
येतसे सरस भरिता जन्हुकन्या सतत फलदा ।।
पावनी निजाश्रित रक्षणीपार निरुपमचरिता ।
कामितार्थद सुरलोकवास कमनीय गुणसुंदरी ।।
भूमिपरी ईस अच्युतभूरि अनिले ।।

दरू : पतित पावनी येते पदकैवल्यदायिनी ।
अति तिहारिणी अखिल जननी ।।
कलिकलुषमोचनी काशीपुरवासिनी ।।
ललितगुणशालिनी तरंग शोभिनी ।।

सूत्रधार : येणेरीती जगज्जननी सकल लोक पावनी अखिल कलुषमोचनी जन्हुकुमारी, शंकरजटाजूट विहारिणी गंगाभवानी आली, तो समुद्रराजाने कावेरीचे उपचार होतस्तां ते पाहून मनीं न सहतां, कोपविल्फुल्लत होऊन कावेरीमातेस पाहून गंगामाता बोल्ली पाहा.

दरू : काय भय नाही काय गे । जाये ऊठ येथून जळनिधीपासून ।।
काय गे भय नाहीं काय गे । फार थोरी लाऊन *भलीस ।।
डंब करून । कुंभारणीसारखी सर्वदा तूं ।।
सारे स्तन दाखवितेस । सवति माझे ।। १ ।।
वर उपचार घेतां आतां । जलधीस दुर्बोध करितां ।।
परिहास करितेस । फार मातलीस ।।
मर्यादा टाकून । मजसीं चाळे करितेस ।। २ ।।
सारी माझी पावेन म्हणतेस । सतत जलनिधिस वश्य करीतीस ।।
शरीर विसरलीस । सह्याद्रीचे पोरी ।।
बरें बरें तुज बहु बुद्धि शिकवितें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेंरिती गंगाभवानीचे वचन आयिकतां कावेरीमाता बोल्ली पाहा.

दरू : [पुराग असावेरी. आदिताल]
वटवट करितेस काय । बाजारिणी वटवट करितेस काय ।।
परपुरुष इच्छून । परनिंदा करतेस ।।
वर रत्नाकराची । वनिता म्हणवितेस ।। वटवट ।। १ ।।
कोणाचे कमंडळीं राहतेस । कोणाचे पाय धूतेस ।।
कोणाचे जटे लपतेस । कोणास येथें प्रिय म्हणतेस ।। २ ।।
तिला इतकी लाज न धरितां । तिन्ही लोक धुंडित फिरतेस कलह कंटकी ।।
काळीचे सवती ।। कां गे माझी बराबरी करिसेस ।। वटवट ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती कावेरीचे वचन ऐकून गंगाभवानी कोपें करून बोल्ली पहा.

दरू : मर्यादा कैंची तुज मर्यादा कैंची तुज ।। मध्ये परपुरुषांस छन ।।
तिर्यक् बहुमुख होउन तिलमात्र ।। लज्जाभय नाही ।।
फलफल बोलतीस बहुनिंदा करितेस ।।
बल तुझे दांत घशांत घालीन ।। वरी शिक्षा तुज करीन ।।
जीवन स्थिर नाही तुझें ।।
जीवनाद बाढूदाराल्या भूवरी तुझी गणना काई ।।
भूरीं तू परती जाये ।।

**सूत्रधार :** येणेरिती गंगाभवानीचे ऐकून रत्नाकर दोघींचा कलह वारावा म्हणून गंगेसी सांत्वनवचन बोलतो पहा.

दरू : मंदाकिनी तुज उचित नव्हे । मर्यादाहीनासी बोलणे ।।
सुंदरी तुजहून कोण थोर । सुरधुनि तूं मज जीवनास धार ।। १ ।।
उणें बोलिली धाकटी म्हणुनि मनीं । उणें मानू नको तूं त्रिपथगामिनी ।।
जनीं सकळांत तुज गंभीर कोण । जनपावन करावयास जाण ।। २ ।।
दीन पोषण निशिदिन । सदा दिविचर तोषण तुजाधीन ।।
मन ध्यान जीवन माझें तूं म्हणुन । मनीं म्यां निश्चय केलास जाण ।। ३ ।।
सकल पापक्षालिनी ,पतित पावनी । आतां सकलाभीष्ट दायिनी सर्वज्ञ गंगे ।।
अकळंकरूप शालिनी गुणोत्तुंगे । आतां ऐके माझे वचन झगडूं नको गे ।। ४ ।।
(फारसी)

**सूत्रधार :** येणेरीती रत्नाकर जन्हुसुतेचें स्तोत्र केलें तेणें कावेरीमाता कोपाविष्ट होऊन रत्नाकरास निंदून बोलली पहा.

दरू : [ राग काफी ताल आदि ]
कळलें तुझें ज्ञान कळलें । सकळ गरळखाणी ।।
सतत तुझे उदरीं वन्हि । मकरजडसंगति गुण ।।
मंद बुद्धि कपटि मन ।। कळलें ।। १ ।।
वर जीवन सर्वत्र घेतोस वारंवारी याचना करितोस ।।
घर धन क्षार जीवन देतोस । अवतार न जाणसे ।। कळले ।। २ ।।
सतत तुज शिऊं नये । सारपाना योग्य नव्हे ।।
अतुलित रत्न अंध करितोस । अल्प तृण शिरसा वाहतो ।। कळले ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रीती कावेरीचें कोपवचन आइकून रत्नाकर सांत्वनपर वचन बोलतो तो पहा.

दरू : कोप काय करितेस । कावेरकन्या कोप कां करतेस ।। १ ।।
कोप कां करतेस । कोमलांगी मजवरी
धनपावनी संतत धनपावती संतत जनजीवन दायिनी ।। १ ।
मज कां निंदितेस सह्यपुत्री । माझा अन्याय काय असे ।।
तुजसमान कोण थोर । तूं सकलां आधार ।। २ ।।
गंगेचे बोलणें उद्धट । गर्विता वचना ऐसा मान ।। ३ ।।
वनित्या पहिल्या सकलांचे मन होते चंचल ।
मुनि विश्वामित्र व्यास मुख्य चरित्र कळूं न ऐसें ।।

**सूत्रधार :** येणेरीती रत्नाकर कवेरकन्येचे स्तोत्र केले ते वचन ऐकून गंगाभवानी दोघांस निंदून बोलली पहा.

**दरूऊ :** कपटी मिळविली तुम्ही दोघेजन ।
विधिनें चतुरपण घनसाचनेने हो जीवन ।
मिळविते कठिन मन तूं इजपासून घेतोन् ।
जनांत महत्त्व किती वागवितोस ।
जल्लो तुझें जीवन संतत जळतोस ।
जीवन संतत स्थिर नाहीं यास ।
जीवन सर्वदा रुचि नाहीं ।
देव अपने बहु पारखे ।
देव दोनि युग्म मिळविले सरखें ।
संतत हें रंध्रान्वेषण सर्वदा तुज दुर्जनसंगति ।
सतिपति तुम्हास वर्णू मी किति ।
सवती तुज सोडिन मी काय मागती ।

**सूत्रधार :** येणेरीती दोघांस निंदून जन्हुकन्या, कावेरकन्या परस्पर संवाद करितात पहा.
(दरूऊ) :

**कावेरी :** राजकन्या मी सर्वांगसुंदरी । राक्षसी मज निंदितेस ।
भूजन इतके असून । भूरि भिकारी मुनीस सुभळलीस ।।

**गंगा :** सकललोकपावनीं मी । सकळ दुरित हारिणी मी ।
विकलांगी दिनत्रय तुज शिरूं नये । विशेष तुझे प्रथमागमनीं ।।

**कावेरी :** पतिव्रता मी जाण पति असे मज आधीन ।।
पतीस वंचून तू परपतीसी संसार करितेस ।।

**गंगा :** भुवनत्रये कळुष मी दूरि करितें । भूजना संतोष करितें ।।
भुवन कर्दमित करितेस तूं । भूतळीं पुनः तोंड दाखवितेस ।।

**सूत्रधार :** येणेरीती जन्हुकवेरकन्या परस्पर कलह करितातिः आपली गोष्टी नाही आइकली, म्हणून रत्नाकर श्री काशीविश्वेश्वररूप पंचनंदीश्वरास स्तोत्र करून तूंच गति मज कलहसंकट निवारा म्हणून वंदितो पहा.

**दरूऊ :** वंदितसे तुझे पाय दे वरद वांछित मज दे ।
कल्याणाचल कोदंडधार कल्याणी मनोहर ।।
नागभूषण नंदीवाहन नररुंडमाल्यधारा ।।
रुद्राक्षमालधर भस्मलिप्तशरीर रुद्र त्र्यंबकदेव ।।

**सूत्रधार :** येणेरीती मागतां स्तोत्र करितो पहा ।।
(मृदुंगाचे बोल)

**दरूऊ :** अंतकांतक पाहि मां ।
अंतकांतक पाहि माम् ।
अखिल लोकार्तिहरा ।। १ ।।
नागचर्माम्बिरा देवादिदेवा नागेंद्रकेयूर नागस्य जनकनगजाप्राणनायक ।
कर्पूर गौर दीनदयाला । कंजाक्षशर ।।
द. . . . . . कंसव्हार । तरुणेंदुकलाधार ।।
वासक्षद्रिसंनुता हेमाद्रिचाप ।
वासुदेव सेविता ।
भोसले कुल शाहेंद्र पूजिता कलंकावतंसा ।।

**सूत्रधार :** येणेरीती रत्नाकर अत्यंत भक्तीनें स्तोत्र केलें तें आइकून दीनार्तिहर भक्तवत्सल प्रणतद्रुम परिपालक पंचनदीश्वर गिरिजासमेत होऊन येतो पहा.

**श्लोक :** करी त्रिशूल डमरु पिनाक धरी शशी
कलो शुशोभ जटावरी ।
उटि घेऊनि अमूल्य भूषण धरी आनंद
आदि देव येक . . . . . . . . . .

**दरूऊ :** शंकराला सभेसि भवभयनिवारी ।
भवभुजंग कुंडलधारी । आनंद करी सेवीती जन अति सादरी ।। १ ।।
शरणागताचे भय हारी शशिकलाजळावरी ।
शूलडमरुधारी । काम गर्व अपरस्परी ।।
आरुढ वृषभावरी . . . . . . . . . .
कारुण्यनिधि रुद्राक्षधारी कौतुक . . . . . पुरहरी ।।

**सूत्रधार :** येणेरीती परमेश्वराची आज्ञा झाली ते पाहून रत्नाकर स्तोत्र करितो पहा.

**दरूऊ :** चंद्रशेखर भुजग केयूर सकल भयहर त्रिपुर संहार ।
सांद्र दयाकर गरल कंधर सांब शिव सतत सस्मान् पाहि पाहि ।। २ ।।
शाहजी अभीष्टदायक । शर्व गिरिजा प्राणनायक ।
विहंगराज तुरंग नायक विश्वहित सततमस्मान् पाहि पाहि ।।

**सूत्रधार :** येणेरीती रत्नाकर बोलल्यानंतर गंगाकावेरी परमेश्वरास आपले तारतम्य पुसताती पहा.

**दरूऊ :** दोघांत लहान थोर कोण सांगा तुम्ही ।
सतत अम्हांमध्यें सहज तारतम्य भाव ।
वितत विचारून सांग विश्वेशा पंचनदीशा ।।

**सूत्रधार :** येणरीती गंगाकावेरीचे वचन ऐकून परमेश्वर बोलतो पहा.

**दरूऊ :** समान तुम्ही दोघीजणी सह्यकन्यगंगे ।
उतरा जन उद्धाराया गंगे उत्तम तूं तेथें ।
उत्तरोत्तर ठेविलें । दक्ष तूं म्हणून

दक्षिण जन रक्षायास दाक्षिण्याने आम्ही द्राक्षरस कावेरी ।।
त्याग विश्वेश देवपंचनदनागभूषणमि नाम भेट यक ।। ३ ।।

परमेश्वर : आइका ! जन्हुकवेरकन्या, तुम्ही दोघी समान ! न्यूनाधिक्य मानूं नका. उत्तरस्तादिजना तूं पावन करायास जान्हवी तुझें असे काशीविश्वेश्वर अभिदानरूपापासी ठेऊन घेतलें. दक्षणास्तांजन पुनीत करायास, कवेरकन्या, तुझे अचें पंचनदीश्वराख्यानायासी ठीऊन घेतलें. पंचनदीश्वरास काशीविश्वे-श्वरास अभेद जाणा. जन्हुकवेरकन्यास अभेद जाणा.

सूत्रधार : येणेरीती जन्हुकवेरकन्यास सेव करून परमेश्वर रत्नाकरास संतोषी केलें तें पाहून नारदकिन्नरकिंपुरुष मंगल गातातित पहा.

महेंद्रशाहराजाय मंगलं.

---

## ५. लक्ष्मी भूदेवी संवाद नाटक

सरस्वती महाल, तंजावर या ग्रंथसंग्रहालयात या नाटकाचे हस्तलिखित आहे. या नाटकाचे कथानक लक्ष्मी आणि भूदेवी म्हणजे पृथ्वी या दोन विष्णुपत्न्यांच्या सवती-मत्सरावर आधारित आहे. ह्या विषयातच नाट्य असल्यामुळे शहाजीराजांचे हे नाटक फारच रंगतदार झाले आहे. त्यांच्या इतर नाटकांप्रमाणे हेही एकांकीच आहे.

तंजावरच्या कित्येक पौराणिक नाटकांत नारदाला 'कलहप्रिय नारद' असाच विशेषण विशेष्य प्रयोग केला आहे. या नाटकात नारद भूदेवीला विष्णुसमवेत बसलेली पाहतो. विष्णूची आज्ञा घेऊन तसाच लक्ष्मीच्या दर्शनाला जातो. तिला मत्सर वाटावा, म्हणून 'भूदेवी विष्णुजवळ तुझ्या जागी बसली आहे' असे सांगतो. लक्ष्मी क्रोधाविष्ट होते. संतापाने ती विष्णुकडे येऊन भूदेवीला आपल्या स्थानी बसलेली पाहते व तिला दुरुत्तरे करते. तेव्हा भूदेवीही तिला अद्वातद्वा बोलते व उखाळ्यापाखाळ्या काढते. नारदमुनी हा प्रकार पाहत असताना त्यांचा शिष्य व त्यांची निंदानालस्ती करतो. अशी चहाडखोर पणाबद्दल प्रेक्षकांची दुहेरी करमणूक नाटककाराने मोठ्या कल्पकतेने केली आहे.

विष्णु भूदेवीच्या समर्थनार्थ बोलल्यामुळे लक्ष्मी रागावून निघून जाते. विष्णूला तिचा विरह सहन होत नाही. म्हणून लक्ष्मीप्राप्तीसाठी विष्णु शंकराची तपश्चर्या करतो. शंकर प्रसन्न होऊन शंकर लक्ष्मीला आणवितो व तिचा विष्णूसी विवाह करून देतो. सर्व स्त्रीवर्गाला त्या निमित्ताने उपदेश केला आहे.

(पद) सासू-सासऱ्यांस सहसा निंदू नये । सर्वथाज्ञा भंग करू नये ।
भासूर देखाव्यासी बोलों नये । सती हे धर्मजाण ।।
अति भाषण अति हास करू नये । अन्य जन दृष्टी पाहूं नये ।
अति कोपअनृत बोलूं नये । अनुक्षण अमंगळ राहूं नये ।।
पतिस परुस करूं नये । पतिसी वंचना करूं नये ।
पतिवेगळें दैवत पुजूं नये । पतिभक्ती टाकूं नये ।।

लक्ष्मी-भूदेवीला परस्पर भांडू नका, असे सांगून शंकराने विष्णुलाही पत्नींचे कौतुक करावे, नव वस्त्राभरणे द्यावी असा उपदेश केला.

# लक्ष्मी-भूदेवी संवाद नाटक

श्री गुरुभ्यो नमः ।।

जय जळधि गंभीर ।। जय सुरुचिराकार ।।
जय सकल आधार ।। जय रघुवीर ।।
जय शामल शरीर ।। जय रूपजितभार ।।
जय असुर संहार ।। जय जय वीरा ।। १ ।।
जय अंबुज नेत्र ।। जय इंद्रनिभ वक्र ।।
जय पावन चरित्र ।। जय जनजळज मित्र ।।
जय जानकी कळत्र ।। जय तारित गोत्र ।।
जय नाम पवित्र ।। २ ।।
जय दशरथ बाळ ।। जय कीर्ति विशाळ ।।
जय कविनुति लोळ ।। जय जय सुशीळ ।।
जय शमित अरिजाळ ।। जय शशिनिभफाळ ।। (फाळ = भाल)
जय करुणा विशाल ।। जय भक्तानुकूल ।। ३ ।।
शरणु शरणु ।। शरणु शरणु जगद्विधायक ।।
शरणु श्रीहरिसायका ।। शरणु शरणु शुभप्रदायका ।।
शरणु गिरिजानायका ।। १ ।।
मधुर भाषण० ।। महित तोषण० ।।
मद विरोधि विशोषण० ।। बुध विभूषण० ।
भूतपोषण० ।। भूज बळाहत दूषण० ।। २ ।।
निजपदास्तुतपूनिवासर ।। निखिल दिविजाग्रेसर ।।
रजनिरमण कलाबिभासुर ।। विजित मत्तनहासुर ।। ३ ।।
सर्वसंभृत चरण किंकर ।। गर्वितारि भयंकर ।।
पार्वती हृदयेश शंकर ।। भयहर क्षेमंकरा ।। ४ ।।

महादेवाय शंकराय मंगलं ।। जय महनीयचरिताय मंगलं ।।
कर्पूरगौर रूपाय मंगलं ।। कल्याण चल चापाय० ।। सर्पमाळ भूषणाय ।। १ ।।
इंदुशेखराय० ।। इभमुखजनकाय० । वंदित सुरवृंदाय० ।।
पार्वती प्राणनाथाय० ।। पालित निजदासाय० ।। सर्वज्ञ महेशाय मंगलं ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती नाट्यारंभ करून लक्ष्मी भूदेवी संवाद नाटकं निर्विघ्न सिध्यर्थ, सर्व जनसंतोष होया कारणें, सकल देवता प्रार्थना करितो पहा.

**श्लोक :** वंदितो मी एकदंताचे पाय । अनेक दंत तो मज सहाय ।
हरितसे सर्व विघ्न उपाय । दया करितो मजवरि गणराय । १ ।

**सूत्रधार** : येणेरीती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पहा.

**श्लोक :** विश्ववंदा जननी सरस्वती । वीणा पुस्तक धरी दोनी हाती ।
वंदितों चरण तिचे ध्यानातें । दया करिते मजवरि या जनाते । १ ।

सूत्रधार : येणेरीती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पहा.

श्लोक : वंदितो महदद्भुत दैवता । अर्ध तनू स्त्रीपुरुषार्थ संयुता ।
एक पार्श्वे व्याघ्रचर्मान्य कनकांबरा । वामपार्श्वे नीलकेश सव्य जटाधरा ।।
सानंद गिरिजायुक्त सस्मित प्रिय भाषणः ।।
शिवः करोतु कल्याणं चंद्रार्धकृत शेखरः ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती परमेश्वराची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पहा.
नमो वेदैक वेद्याय अवन्युद्धरणायच ।
आपदामपहर्ताय वासुदेवाय मंगलं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती सकळ देवता प्रार्थना करून. लक्ष्मी-भूदेवि संवाद नाटक, आदिभक्ते निजभक्ते करून, प्रार्थना केली असता, आनंदे करून विघ्नेश्वर नृत्य करित येतो पहा.

दरूऊ : [ पाडि राग. आदिताल ]

संतोषें नृत्य करी शमवुनि विघ्न सारी ।
दंतिमुख आला देव दनुजसंहारी ।। १ ।।
सिंदुर माथ्यावरी । शशिकळा शोभे बरी ।
मंद मदधार कपोळीं । मधुकर हारी ।। २ ।।
पाशांकुश परशुधारी । पापसंघ सकळ हारी ।
मूषक वाहन मोदक करीं ।। ३ ।।
सर्वदा दया करी । सर्प शोभे दोंदावरी ।
पार्वती शिवसुत पाहा रंगांतरीं ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरीती विघ्नेश्वर येऊन लक्ष्मी-भूदेवी नाटकाची विघ्ने सकल दूर केली. अन्तर कथा ऐसीजे. महाविष्णु निजसभेसि येताति, म्हणून सभास्ता सावध कराया कारणें कंचुकीराय विनोदी येतो पहा.

दरूऊ : [ सौराष्ट्र. आदि ताल ]

पट्टे नामधारी । अट्टहास करी ।
काठी घेऊनि करीं । [1]कंचुक्याला सभांतरीं ।। १ ।।
विकटा बहु करी । विष्णुध्यान करी ।
सकलांस दूर करी । संतोषानें उडघा मारी ।। २ ।। (हास्य) ।। छं ।।

सूत्रधार : अहो आइका हो भागवत, आम्ही नृत्य करितो. या रंगभूमीमध्यें हा कोण विकार स्वरूप घेऊन उभाठाकला आहे ? कोणे देशींहून आला, कोण्या कार्यास आला हे यास विचारा हो.

सूत्रधार : बहु बरें विचारतों. अहो बाजी तुम्ही कोठून आलेत ?

कंचुकी : अरे पाजी कोणास म्हणतोस रे ? धगडीच्या पाजी तूंच बापू.

सूत्रधार : अहो आइका हो भागवत हो. बाजी म्हणटलें तरि शिव्या देता हे.

[1] कंचुकी + आला

सूत्रधार : अहो तो मूर्ख आहे. त्यास बाजी कशास म्हणतां ? तूं कोठोनि आलास रे म्हणा.
कंचुकी : माझ्या लेंका आधींच असें म्हणों नये.
सूत्रधार : बरें चुकलों. तूं कोठून आलास सांग रे ?
कंचुकी : तुम्ही कोण आहा रे ?
सूत्रधार : आम्ही मुनिजन आहों रे.
कंचुकी : अरे, मुनिजन आहां तरि काविंची वस्त्रें पांघरून अरण्यांत असावे. येथे कुत्र्या-सारखें वरडत तूं कां उभा ठाकलास रे ?
सूत्रधार : अरे वरडत नाहीं. हरिकथा करितों रे.
कंचुकी : अरे धगडीचे हा, हरकत कराल तरि मारून तुमची कमर तोडितों.
सूत्रधार : हरकत नाहीं रे. नाच करितों रे.
कंचुकी : अरे धगडीचे हो, भाताचा नाश करितां काय रे ?
सूत्रधार : अरे भाताचा नाश नव्हे रें. महाराजसाहेबांचे सभेस नृत्य करितों रे.
कंचुकी : बरें रे तूं नृत्य करितोस. हे अवघे उभे ठाकले ते कोण आहेत रे ?
सूत्रधार : हा नटुवा हे.
कंचुकी : अरे बाटुवा जाला तरि सराफाजवळि असावा, येथें का आणिला रे ?
सूत्रधार : अरे बाटुवा नव्हे रे. हा नाचवणार रे. नटुवा आहे.
कंचुकी : अरे याच्या हातांत नरोट्वा कां आहेत रे ?
सूत्रधार : अरे नरोट्वा नव्हेत रे. टाळ आहे रे.
कंचुकी : हा टाळु काय करावा रे ?
सूत्रधार : वाजवावे.
कंचुकी : बरें वाजिवारे. हा कोण रे ?
सूत्रधार : हा पखावाजी आहे.
कंचुकी : पखाल्याचा बईल की खुळ्ळुगा रे ?
सूत्रधार : अरे खुळ्ळुगा नव्हे, बैल नव्हे, माणूस आहे रे.
कंचुकी : अरे धगडीचे हो, माणसावरी पखाल कां लादली आहे रे ?
सूत्रधार : अरे पखाल नव्हे रे. मांदळ आहे रे.
कंचुकी : मांदळ काय करावा रे ?
सूत्रधार : वाजवावा.
कंचुकी : बरें वाजिवुरे. हा कोणु रे ?
सूत्रधार : हा सारंगी वाजवणार.

कंचुकी : बरें वाजिवेरे. हा कोणु रे ?

सूत्रधार : मुरलि वाजवणार.

कंचुकी : बरें वाजिवु. तुम्हास इतकें काम कायि रे ?

सूत्रधार : होइ रे ! आम्हांस हेंच काम.

कंचुकी : अरे धगडीचे हो, तुम्ही भात नासे खरेंच.

सूत्रधार : अहो आइका हो भागवत, हा धगडीचा वेडा आहे. आम्ही एक सांगतो, आपण एक समजतो.

सूत्रधार : यास तूं कोण आहेस इतकेंच विचारा हो.

सूत्रधार : अरे हें औधें (अवघे) राहूं दे, तूं कोण आहेस सांग रे.

कंचुकी : अरे धगडीच्या, च्यान्ही कोण चहुंकडे, मजला काय पुस्तोस रे ?

सूत्रधार : अरे कोन नव्हेत, तुझें पूर्वोत्तर काय सांग रे.

कंचुकी : अरे वेडया, माझे लेका, पूर्वपश्चिम तुजला कळेना काय रे ?

सूत्रधार : अरे पूर्वपश्चिम नव्हे रे. तूं येथें कशाला आलास सांग रे.

कंचुकी : अरे महाविष्णु निजसभेसी येताति, म्हणून सभास्तांस सावध कराया मी आलों आहें.

सूत्रधार : सभासिद्धी काय करावी रे ?

कंचुकी : अरे नवरत्नखचित मण्डप सिद्ध करा. झाडूनझुडून जमखाने, तिवाशा आंथरा. सिंहासन मांडा. कांदे आंबाडी याची भाजी भाकरी तयार असो द्या.

सूत्रधार : अरे कांदे भाकरी भाजी कशास रे ?

कंचुकी : अरे महाविष्णु सभेस बस्तील मी बंकांत जेवित बसेन.

सूत्रधार : अरे तो सांगितल्याप्रमाणे सर्वसिद्धि करितो. तूं जाऊन महाविष्णुस बोलावून आणि.

कटिवचन : बरे बोलाउनाणितो.[२]

सूत्रधार : येणेरीती कंचुकी येऊन सभास्तांस (सभासदांस) सावध केल्यानंतर महाविष्णु निजसभेस येतो पहा.

[ दरूऊ : सावरी . आदि ]

भजा रे जन हो देवादिदेव चंदनाची घेउनि उटि चक्रपाणि रत्नमुकुटी ।।  
मंदस्मित मुखभरवीर्डी वंदिति देव कोटयानुकोटी ।। १ ।।  
अंगद भुजयुगळ । अमूल्य कौस्तुभ गळा ।  
मंगलमय पुतळा । श्रिंगारीला पहा डोळा ।। २ ।।  
मकर कुंडलें कानीं । मदन जनक शार्ङ्गपाणी ।

अकलंक गुण खाणी । आरुढ गरुड वाहनी ।। ३ ।।
कासे पितांबर पीवळा । कस्तूरी कपाळी टिळा ।
दासजनासी सकळा । आशा पूर्वी वेळोवेळा ।। ४ ।।

कटिवचन : स्वामि सभा सिद्धि केली. येथें बसा.

सूत्रधार : येणेरीती महाविष्णु सभेस आल्यानंतर भूमिदेवी विष्णूचे दर्शनास येते पहा.

दरूऊ : गुम्म कांबोदि ।।

भूमिदेवी येते पहा । भूवन जननी ।
भूमि : सरस श्रिंगार करूनि । सकल सौंदर्याची खाणी ।
वरमत्ते इभगामिनी ।। १ ।।
कनक कलश स्तनी । कमनीय पल्लव पाणि ।
घनअलि नीलवेणी । गांभीर्य पृथुल श्रोणी ।। २ ।।
शीतकर सम वदन । सिंह मध्य कुंदरदन ।
भूत धात्रि गुण सदन । भरि वर्धित मदन ।। ३ ।।

दरूऊ : (मध्यमावती . आदिताल )

मंद हंसगमनाते । कुंद रदन । बिंदु मुखी शोभतात ।। १ ।।
नयन कटाक्ष बाण । विंधुनि' मुहवि नव युव जनमने ।। २ ।।
मदनास्त्र देवता ते । संगीत निपुण । मंदराद्रि कुचोपमाने ।। ३ ।।
भूषणाचे भूषण ते । श्रिंगारुनि भूमंडली शोभते ते ।।

सूत्रधार : येणेरीती भूमि देवि येवून महाविष्णूचे सव्यपार्श्वी लक्ष्मीदेवी बसाया ते स्थानी बैसली. अनन्तर कथा ऐसीजे, विष्णुदर्शनास नारद येतो पहा.

दरूऊ : नादरामक्रिया । शाप्पु ।

नारद येतो पहा । विष्णुदर्शनास विणा वाजवून ।
विश्वजन मोहून । तानसुस्वराने ।
वदेक मन गान विविध गाऊन । ध्यान करून विष्णु देव दर्शनास ।। १ ।।
कांति शुभ्र बरी । कटि व्याघ्रचर्मांबरी । शांतस्वरूप । जटाधारी ।
संतोष हरी सादर स्मरण करी । बहु अखिल विधाधरी ।। २ ।।

नारद : अरे बंकांत कोण रे ? मी आलों म्हणून सांग रे.

कंचुकी : तूं येथें बैस. मी सांगून येतो.
स्वामी मी आलों.

विष्णू : अरे तूं कशाला आलास ? तुला कोणी बोलाविलें जा रे !

कंचुकी : छी जा रे ! तुला कोणें बोलाविलें ?

नारद : अरे तूं काय सांगितले रे ?

कंचुकी : स्वामी मी आलों म्हणून सांगितले.

नारद : तसें नव्हे रें. देवलोकीहून नारद आले म्हणून सांग.

**कंचुकी** : स्वामी, देवलोकीहून नारळ आलें.

**विष्णू** : अरे नारळ कशाला ? तूं फोडून खा रे.

**नारद** : अरे मारितोस काय रे ?

**कंचुकी** : महाविष्णुनें तुला फोडून खा म्हणून सांगितलें रे.

**नारद** : काय सांगितलें रे ?

**कंचुकी** : देवलोकीहून नारळ आलें म्हणून सांगितले रें.

**नारद** : अरे असें नव्हे रे. मुनि आले म्हणून सांग रे.

**कंचुकी** : अरे तूं राक्षस काय रे ?

**नारद** : अरे तसें नव्हे रे. तुमचा नातू ब्रह्माचा लेक, कलहप्रिय नारद आला.

**विष्णू** : बरें येऊ दे.

**सूत्रधार** : येणेरीती नारद येऊन महाविष्णुस नमस्कार करून बोलतो पहा.

**श्लोक ।।** : शान्ताकारं ...... (विष्णुस्तुती करितो).

**सूत्रधार** : येणेरीती नमस्कार केल्या नारदास पाहून विष्णू बोलतो पहा.

**विष्णू** : नारदा येथे यायास कारण काय ?

**नारद** : तुमचे दर्शनास बहुत दिवस झाले तेणे करून सकल पापक्षय याकरितां आलों.

**विष्णू** : बरें तसेच येउन नित्य दर्शन घेत जा.

**नारद** : स्वामीचे दर्शन जालें. भूमिदेवीचे दर्शन जालें. तुमची आज्ञा जाल्याने लक्ष्मीचें दर्शन घेऊन तिज समागमें तुमचे दर्शनास येईन.

**विष्णू** : अवश्य तसेंच करा.

**सूत्रधार** : येणेरीती महाविष्णुची आज्ञा घेऊन आपल्यास कळह लावायास हा समय म्हणून लक्ष्मीचे स्थानी भूदेवी बसली हा वृत्तांत लक्ष्मीस सांगून तीस ईस कलह लावावा म्हणून संतोषाने नारद चालले पहा.

[ **दरूऊ** : नारद चाल्ले पहा । ]

**सूत्रधार** : येणेरीती नारद जाऊन लक्ष्मीचे स्थानि भूमिदेवि बसली म्हणून सांगितलें. ते बचन आइकून लक्ष्मीदेवी कोपाविष्कृत होऊन विष्णुदर्शनास लक्ष्मी देवी येते पहा.

[ **दरूऊ** : आहरी. अटताळ ]

कदळित आनंदेकूने मंदमंद लक्ष्मी वहिताते सकळ सुरमुनिवर वृंद ।। १ ।।
चंदन कर्पूर कस्तूरि चर्चुन । उटि घेउनि ।
इंदुवदन मंदहास मुखी । येल्हालविटी ।। २ ।।
सकल श्रृंगार करुनि । सादर सागरकन्या । येतसे ।
अकलंक सौंदर्यरुप । अखिलमान्या ।। ३ ।।

[ दरूऊ : नादरामक्रिया । आदि । ]
राजहंसगमना ते । राजीवपत्र नेत्र । तेज मुखी शोभताते । रमामणी ते ।। १ ।।
कलकंठी मृदुवसनी । कस्तूरिटिलक धरुनि ।
अळी कुळनील वेणी । अंबुजपाणी ।। २ ।।
जरी चोली साडी नेसुनि । जेवे बाजुबंद लेवुनि ।
वरकन्यका मणि वदनी येत ।। ३ ।।

नारद : अरे शिष्या लक्ष्मीदेवीस तरी बोलावून आणिले. आता आमचा चमत्कार पहा. कैसे कौतुक होतें आतां !

शिष्य : होय स्वामी तुमचें कुचोद्य कौतुक पाहाया कारणें तुमचा मी शिष्य झालों.

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीदेवी महाविष्णू समीप आली तों आपले स्थानी सव्यपार्श्वी भूदेवी बसलीसे पाहून कोपाविष्कृत होऊन बोलते पहा.

[ दरूऊ : सारंग. अटताल ]
कैसे भय नाहीं । सांग माझे सवती ।
ऐसे माझे स्थलीं । आतां बैसलीस ।
मज पुढें तूं कैसी गे । बैसलीसि गे ।
मर्यादा किंचित न मानित ।। १ ।।
प्रीतिपात्र झालीस तरी तूं । माझे स्थानीं बसूं नको ।
प्रियाचे शिरावरी जाऊन बैस ।। २ ।।

शिष्य : हें काय स्वामी, लक्ष्मीदेवी भूदेवीस शिरावरि बैस म्हणते.

नारद : अरे लाडकी बाईल झालीस तरी शिरावरि बैस. आपले स्थळीं बैसो नको म्हणते.

शिष्य : स्वामी, विष्णुची बाईल लाडकी, मी तुमचा शिष्य लाडका. मजला तुम्ही डोईवर बसवा. तुम्हांसंगे चालून माझे पाय दुःखताती.

नारद : अरे मूर्खा, ऐसें बोलों नये रे. उगलाच ऐस.

नारद : होय, लक्ष्मी तू बोललीस ते सत्य. मागेपुढे न पाहता, मनी भय न मानितां, मतिहीन तूं बैसलीस कैसी ?

नारद : अरे शिष्या, लक्ष्मी देवीस तरि कोप आणिला की. आता भूदेवीस कोप आण चला.

शिष्य : अवश्य. चला स्वामी.

नारद : आइक भूमिदेवी, लक्ष्मी म्हणिजे काय ? तुम्हांस निखंदून बोलणें म्हणिजे कायि ? तुम्हांसही अमाळसा कोप येऊं द्या.

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीचे वचन आइकून भूमिदेवीस कोप येऊन बोलते पहा.

[ दरूऊ : नायकी कानडा. अटताल ]

भूमिदेवी : कोण थोर तूं जागे । मजसीं बोलायास ।
दीननाथें हातीं धरिले तो थोर । क्षणभंगुर तूं ।

नीच मूढप्रिया तूं। क्षण तूं कोठें नाही स्थिर ।। १ ।।
निजस्वभाव तुज पापप्रिय सतत। नीच जड संगति गुण ।। २ ।।
कांताज्ञा परिपालन। मुख्य धर्म पतिव्रतांस। कांताज्ञेनें बैसलें मी गे ।। ३ ।।
जे पतिव्रता आहेत पतिची आज्ञा मोडीत नाहींत।
सेवक स्वामीची आज्ञा मोडीत नाहींत।
शिष्य गुरुची आज्ञा मोडीत नाहींत।
ऐसी नीति आहे। तुमचें म्हटलें परिछिन्न आइकत नाहीं ।।

नारद : आइक लक्ष्मी, भूदेवीने तुम्हास बहु निंदिले. आतां तुमचा पराक्रम कांही दाखवा.

लक्ष्मी : बरें पहातैस नारदा.

नारद : बहु बरें अम्मा निमिषास निमिष लागेना तसें पाहातों.

शिष्य : आइका स्वामी. निमिषास निमिष लागेना तसें पाहातां की. इलूसा हिंग डोळयात घालून घेऊन पाहातसा. तुम्ही लक्ष्मी-भूदेवीचा तमासा पाहा. मी तुमचा तमासा पाहीन.

गुरु : अरे मूर्खा ऐसें बोलों नये रे. उगलाच ऐस.

सूत्रधार : येणेंरिती भूदेवीचे वचन आइकून लक्ष्मी बोलते पहा.

दरू० : नायकी कानडा। आदि

लक्ष्मी : मर्यादाहीन काय बोललीस। कार्याकार्य विचार नाहीं।
काय गे काय गे काय गे। करताली कितीकांस।
कोमला लाटी कितिकांसी। स्वतः मधुरा धरि कितिकांस वाहतेस ।। १ ।।
सरस चोळ देश कितिकांस। सतत मध्यदेशि कितिकांस।
वर सर्वांगी कितिकांस वाहतेस ।। २ ।।
जारिणी तुजे स्वभाव। जन तुझें वल्लभ व्हावें।
भूरि तारतम्याने नासे। बोलतीस ।। ३ ।।

नारद : होय. लक्ष्मीदेवि, तूं सांगतेस ते सत्य. तुम्हास मर्यादाहीन सवति मिळाली. मजला मर्यादाहीन शिष्य मिळाला.

शिष्य : आइका स्वामी कधीं तुमची मर्यादा चुकलो होतो? कधीं तुम्हांस तोंडावरी मारिलें होतें की काय? तुम्ही मला मर्यादाहीन कां म्हणता?

नारद : अरे तुजसी बोलने जैसा गोवरि धोंडा टाकून सितोडे घ्यावे. तो न्याय आहे.

शिष्य : तरि कां गू खात उगलेच असा स्वामी.

सूत्रधार : येणेरिती लक्ष्मीदेविचे वचन ऐकून भूमिदेव बोलते पहा.

दरू० :

भूमिदेवी : जडधिपुत्री। तोंड काय करितेस। घडिघडी आत्मदोष लोपवितेस।
गर्वे परनिंदा करितेस। परमाप्त वंचूस कलह कारण तूंच।
पापिणी पितापुत्री वैर करणार तूंच वर मानभंग करणार तूंच।
वैर सर्वत्र करणार तूंच ।। १ ।।

सरस साधूज्ञानास तूं दूर। सरस्वती स्वीकृतीस तूं दूर।
परमहंस योग्यास तूं दूर। परलोक साधकांस तूं दूर ॥

शिष्य : हे काय स्वामी भूदेवि योगियांस लक्ष्मी बहु दूर म्हणे ते.

नारद : अरे लक्ष्मीचे गुण भूमिदेवी सांगते ते आइकतोस कीं याकरितां लक्ष्मीस योगी अंगिकार करित नाहीत.

शिष्य : स्वामी तुमच्या गुणापरीस लक्ष्मीचे गुण बरे आहेत कीं! तुमचे सर्वही दुर्गुणच आहेत. याकरितां तुम्हाजवळी राहात नाही. लक्ष्मीजवळी जातो. तुम्हाजवळी राहिल्याचे फल. आंगास राख लाऊन, कातडें पांघरून असावें लागतें. लक्ष्मीजवळ असल्यानें सकल भाग्य आहे. याकरितां तुमचे गुण माझ्या मनास येत नाहींत. मी लक्ष्मीजवळी जातों.

नारद : अरे मूर्खा तुला काय कळे. उगलास ऐस. परनिंदका पाप्यास तूं आप्त. परद्रोही मतिहीनास तूं आप्त. परपीडक दुर्जनास तूं आप्त. पंकिल माणसास तूं आप्त.

सूत्रधार : येणेरिती भूदेवीचे वचन आइकून. लक्ष्मी बोलते पहा.

दरू० : सारंग ॥ अटताल ॥

लक्ष्मी : लाज नाहीं तूं जा गे परती। सकळ चराचर ॥
सर्व कुच्छित तुजवरि करिता। फुकट बैस रम आहेस ॥ १ ॥
कितिकांस माजवितेस। कितिकांस क्षण वश्य होतेस ॥
किती जनाचे हातीं लत्ता खातेस ॥ २ ॥
जीवमात्रापासून लात मारून घेतेस। जितके तितके तुजवरि थुंकताति ॥ ३ ॥

नारद : आई लक्ष्मी, भूदेवीचे पूर्वोक्त याकरितां विचारूनि ठेविलें होतें कीं काय?

लक्ष्मी : यास इतकें विचारणें कां लागलें नारदा? इचे गुण इतकेही प्रसिद्धच आहेत.

नारद : हो सत्य बोलिलां.

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीचे वचन आइकून भूमिदेवि बोलते पाहा.

दरू० :

भूमि० : सर्वसह मी जा गे। गर्व हाच नको गे तुजला ॥
जनक तुझा जळधि सह जन्म तुझा कलंकी।
नयन तुझा अंश हीनाग्र बहिण सर्व निंद्य ॥ जाणे असूने ॥ १ ॥
वर फार तुज मधुप स्थान ॥ वंश भव विद्य चार।
गरळ तुझें सहचार। गर्वित वचन बोलूं नको फार ॥ २ ॥
सतत विषम दृष्टि तुझी ॥ सर्वत्र अस्थिर तूं ॥
अति अविश्वास। निदान तूं ॥
अखिल निंद्य तोंड दाखवूं नको ॥ ३ ॥

शिष्य : ऐका स्वामी भूदेवि अविश्वासी कोणास म्हणते.

नारद : लक्ष्मीस म्हणते रे.

शिष्य : स्वामी अविश्वासी लक्ष्मीस म्हणू नये. तुम्हांस म्हणावें.

नांरद : आम्हांस कां रे!

शिष्य : स्वामी सांगतो ऐका. चाहाडास. चोरास अविश्वासी म्हणावे. तुम्ही चाहाड चोर याकरितां तुम्हांस अविश्वासी म्हणावें.

नारद : अरे मूर्खा ऐसें बोलों नये. उगलाच ऐस.

सूत्रधार : येणेरीती भूमिदेवीचे वचन आइकून लक्ष्मीदेवि महाविष्णुस पाहून बोलते पहा.

लक्ष्मी : दरू० : जना पुढें मज इणें निंदिलें। तन कशाला मन कशाला जनार्दन ।। १ ।।
धनत नाहीं मानिलें इणें। धन कशाला धन कशाला प्राणनाथ ।। २ ।।
इनें मज निंदिलें आतां। मन कशाला दान कशाला प्राणनाथ ।। ३ ।।
मानहीन झालें मी। गान कशाला। बान कशाला। जीवितेश ।। ४ ।।
हे सवति बरावरी करते। हास कशाला बास कशाला। पंकजाक्षा ।। ५ ।।
वासुदेवा तुजपुढें निंदिलें। आश कशाला ग्रास कशाला। पद्मनाभ ।। ६ ।।

शिष्य : स्वामी लक्ष्मी बोलते तें पहा तुम्हास.

नारद : अरे मूर्खा, आम्हास पाप कशाचे रे! त्यांचा ग्रह त्यांस भोगितो.

शिष्य : स्वामी तुम्हांपरीस आणिक कोणी ग्रह आहे कीं काय?

नारद : अरे मूर्खा, ऐसें बोलो नये रे.

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीदेवी महाविष्णूस बोल्ली ते पाहून लक्ष्मीसी भूदेवि बोलते पहा.

भूदेवी : दरू० : हरिसी अंतरंग काय लक्ष्मी। हरिसारखे तुज किती गे ।। लक्ष्मी ।।
हरीच मज अनन्य गति गे। तुज वाद कारण काय गे लक्ष्मी ।।
मजपुढें न राहसी जाय गे। सतत गर्व अंतःकरणीं ।। लक्ष्मी ।।
विनित बुद्धि माझी ।। आइक गे ।।

शिष्य : आइका स्वामी, लक्ष्मीस बोलायास अधिकार नाहींसा केला कीं तुम्हीं. तुमचे संगति दोष, मजला कोठें लागले म्हणून माझा जीव भितो.

नारद : अरे मूर्खा, गुरूचा संगतिदोष मानिताती कोठें?

शिष्य : स्वामी, गुरु क्रियाभ्रष्ट असिला तरि त्याचे संगदोष लागेल कीं ना?

नारद : अरे, गुरु कैसा तऱ्ही असो, तुझी क्रिया शुद्ध असो दे रे.

शिष्य : स्वामी, माझी क्रिया शुद्ध आहे, म्हणून तुम्हांस बुद्धि शिकवितों रे.

नारद : अरे नष्टा, वेडावांकडें बोलतोस, याकरितां मजला फार राग येतो. आतां उगलास ऐस, नाहीतरी तोंडावरी मारितों.

शिष्य : स्वामी, मजलाही तुम्हावरही फार राग येतो. स्वामिनी कुचोद्य न करितां उगलेंच राहावें. नाहीं तरी या कृष्णांजिनानें तुमच्या डोईच्या जटा झाडितों.

नारद : अरे तूं मूर्ख आहेस. तुजसी काय बोलावें.

सूत्रधार : येणेरीती आपण विष्णूसी बोलिले. विष्णूने प्रत्युत्तर नाहीं दिल्हें. मध्यें भूदेवीनें विशेष निंदा केली, याकरितां कोपाविष्कृत होऊन दोघांस पाहून निंदून बोलते पहा.

लक्ष्मी : दरू० : सलगीनें बोलतीस सवती तुज तोंड कां गे ।
बलुत्याज[1] पुढें तुझें गे । बुद्धि शिकवीन मी गे ।। १ ।।
यास त्वां मिळून करावें काय । यास तुज बुद्धि शिकविते पाहे ।।
जाणून मौन उगीच राहा गे । मनीं समजून पाहा गें ।। २ ।।
निज बुद्धि नाहीं तुम्हां । निरंतर शिकवू तुम्हां ।।
तुज लाज नाहीं गे ।। भूमि उगी राहे निकामी ।। ३ ।।

शिष्य : स्वामी, लक्ष्मी निज बुद्धि नाहीं म्हणतें तें कोणास ?

नारद : अरे विष्णूस, भूमिदेवीस म्हणते.

शिष्य : स्वामि, लक्ष्मी यौढी गोष्ट सत्य बोलते.

नारद : ते कैसे सांग रे.

शिष्य : स्वामी चहाडखोरसे सर्वत्रांस कल्लें आहे. तुमचे गुण ऐसे असून तुमची गोष्ट आइकून आपल्यांत आपण भांडताती. बुद्धि नाहीं हें खरेंच.

नारद : अरे मूर्खा, ते आपल्यातापण भाण्डताती. तूं मजसी कां भांडतोस ?

सूत्रधार : येणेरीती लक्ष्मीनें दोघांस निंदून बोलली, ते पाहून भूमिदेवी सकोप येऊन बोलते पहा.

भूमि : दरू० : काय बोलतीस लक्ष्मी । ऐसें काय बोलतीस ।।
भंड वचन बोलों नको गे । तोंडावरि देईन दांत पाडिन गे ।।
दांडगी तूं गे । दण्डसाध्य गे ।। १ ।।
चण्ड शासन माझें जाण गे । चंडित न पुरे येथून जा गे ।।
खंडित म्हणे गे । दंडिन तुज गे ।। २ ।।
तुज इतुकें तोंड कां गे । आजि शिकवीन बुद्धि मी गे ।।
सहज आइक गे ।। ३ ।।

शिष्य : स्वामि, भूमिदेवी तोंडावरी देऊन दांत पाडिन म्हणते, ते तुम्हास की कोणास ?

नारद : अरे नष्टा आम्हास कशास म्हणतील रे ?

शिष्य : स्वामी, तुम्हांसच म्हणते. चाहडी सांगून लक्ष्मीस भांडावयास आणिलें कीं. हे गोष्टी भूमिदेवीस कळली तरी तुमचे दांत पाडिल्यावेगळे सोडील कीं काय ?

नारद : अरे मूर्खा, ऐसें बोलों नये. उगलाच ऐस.

सूत्रधार : येणेरीती भूमिदेवीचें वचन आइकून लक्ष्मीदेवि बोलते पहा.

**लक्ष्मी : रूद :** सतत गर्वित वचन तुज कां गे । सवति उगी राहा गे ।।
वसुमति अन्य घनपासुन गर्भ धरितेस । मर्यादाहीने जा गे आतां ।। १ ।।
जारिणी तूं म्हणून । विष्णुनें दिशि दिशि ।।
जन रक्षण ठेविलें । सप्तवारिधी खण्ड करोन त्यामध्ये वाचाले ।।
सरसिं भूधर तुज वाहिले । ऐसें असून दारुण मन वेगळें ।।
तुज जानें ।। २ ।।
घन विकार जड शरीर । तुझें कामिनी रूप नव्हे गे ।।
निरत वनीं तुझें शरीर । तुज भार झाला म्हणून ।।
वर गिरधर दिल्हे गे ।।
ते न पुरत फणि गज उभे केले गे तुजसमान वनिता ।।
पाहिली नाही नाहीं गे । आता ।। ३ ।।
इतकें बंह कष्ट केले असून आणि इतुक्यांस वंचुन गे ।।
बहु वितत निशिदिनी । लाज टाकुनि पुरी विटपांस वाहतीस गे ।।
याकरितां मतिहीने शिला वाहतीस गे ।। जळो जिणें ।।
इतकीं कां मातलीस गे ।। ४ ।।

**नारद :** आई लक्ष्मी, आम्हांस बहु संतोष झाला.

**लक्ष्मी :** तो कैसा सांग नारदा.

**नारद :** आजि तुम्हां दोघींचेही पूर्वोत्त कळलें आम्हा.

**शिष्य :** स्वामि तुम्हांपरिस मजला बहु संतोष झाला.

**नारद :** तुजला कैसा संतोष झाला रे.

**शिष्य :** स्वामि, लक्ष्मीदेवी भूदेवीचें पूर्वोक्त कळले. तुमचेंही पूर्वोक्त कळलें.

**नारद :** आमचें पूर्वोत्तर तुज कैसें कळलें रे.

**शिष्य :** स्वामि सांगतो आइका. लक्ष्मी भूदेविचा वाद आला. याकरितां त्यांचे पूर्वोक्त कळलें. त्यांस तुम्हीं कलह लाविला. यावरून बहु कुचोद्य पात्र तुम्हीं म्हणून कल्लें.

**नारद :** अरे मूर्खा, ऐसें बोलों नये.

**सूत्रधार :** येणेरीती लक्ष्मीचे वचन आइकून भूदेवीस कोप येऊन परस्पर प्रत्युत्तर बोलताति पहा.

**भूमि : दरू :** चंचला तूं । अचंचला मी । विरिंचि जनकास वंचन करितेस ।। १ ।।
वंचुनि विष्णुप्रपंच जनास तूं । पंचपातकी अचंचला म्हणवितेस ।। २ ।।
मान नाहीं अनुमान कशास तुज मानव निंदिते ।
दानवि निजांगें ।। ३ ।।
दानविद्या सुख । गान मज करितां । जाण तूं मजचीन
तुज गर्व काई ।। ४ ।।
अक्षया जन रक्षितें मी । विचक्षण रत्नकुक्षि । सदा जाण ।।

राक्षसि किति दक्षसि बोलतेस । भक्षित सर्वांस ।
रक्षणास मी गे ।। ५ ।।

सूत्रधार : येणेरिती भूमिदेवी लक्ष्मीदेवि परस्पर कलह करित अस्तां भूमिदेवीचा कैवार घेऊन महाविष्णू लक्ष्मीदेवीसी बोलताति पहा.

दरू० : कलहकंठी कां गे कलह करितेस । हळुहळु मर्यादाहीन ।। आम्हां निन्दितेस ।
नीच गति जन्म तुज ।। नीच संगति तुज ।
तूं चंचळ विश्वासले तुज कोणहि जन ।।सतत वाचाळे सर्वत्र तुज वंचक ।
मना अति संकोच मानून राहे कुटिल जना ।। १ ।।
सतत ईस निन्दितेस ।। सारे पावन म्हणतीस ।।
वितत निर्लज्जे परती ।। वेडी तूं जाय बहु मतिहीने धरणि निंद्ये ।।
मर्यादा काय आता ।। अति बुद्धि तूज शिकवून ।
आम्हां फल काय ।। २ ।।
अणुमात्रा विचार नाहीं । अन्य जन भय नाही ।।
अनुदिन वाद करितेस । भविनिशि सांग जन मध्ये वसुमति थोर ।।
जग म्हणते जागे सदा । घनतेने आम्ही मानिली ।
घनत तुज कां गे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति महाविष्णुचे वचन आइकून लक्ष्मीस कोप येऊन बोलते पहा.

दरू० : पंतुंवराळी आदि ।।

लक्ष्मी : आटी विषाचर तूं । बुधा रिते सरसा ।।
आदरें मज शनादरें बोधा भूमीनें केलें । भूधर विकारमुख ।।
भूषण धात्र भीषण अइका । जननिंदक निज जनय नायक मधूप ।।
चंचल हरि चंचला । जनार्दन मातुल संहार वल्लवी ।।
जार नवनीत चोर । आइका ।।१।।
तुझें मुख पाहूं नये ।। तुजसी बोलणे काय ।।
तुझी रे संगति नीच रे । मज रहणे नाहीं ।।
तुजपासीं इतक्यावरि मज ।। सत्य रे नाहीं तुज सत्य रे आइक ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिति लक्ष्मीस कोप येऊन महाविष्णुवरि रुसून गेली. अनन्तर कथा ऐसिजे. विष्णु लक्ष्मीचा विरह न सहतां द्वारपालासी बोलतो पाहा.

विष्णु : आइक विकटांग. विनोदेकून आणीयेक गोष्ठि बोललो. ते आइकून लक्ष्मीदेवी रुसूनि गेली. तीस धुंडून बोलाऊन आणा.

विकटांग : बहुत बरें स्वामीची आज्ञा. सर्वत्र धुंडून बोलाऊन आणितो.

दरू० : जनपद पाहिले म्या जनार्दना । निखिल घेनवन पाहिले म्या जनार्दना ।।

सूत्रधार : येणेरिती विकटांग सकत पृथ्वीवरील विष्णु स्थले धुंडोन अत्यंत श्रम पावोन विष्णुपासी येऊन बोलतो पहा.

**दरू०** : विष्णु स्थले पाहिली म्या सारी ।
विष्णु स्थली कोठें नाही राया ।
श्रीरंस्थल, कांचीपुर श्रीनाथ शेषाचल ।। १ ।।
आदिवराह तिरुवाल्लर । अनंतशयन ।। २ ।।
वडे, जगन्नाथ दर्श शयन द्वारकापुर ।। ३ ।।
चंपकारण्य अहोबल्ल नारसिंह । सरस गजेंद्रमोक्ष ।। ४ ।।
गोकुल वृंदावन मधुर । कोमल अलुघरी ।५ ।।
तिरु क्रमण मग तिरु कवपुर । नव तिरुपति कुंभकोण ।। ६ ।।
तिरुवरंगं आदिरंगं । तिरु वल्लरु ।। ७ ।।
पावक नरसिंह । उग्रनारसिंह । पल्लिकोंडस्वामि ।। ८ ।।

**सूत्रधार** : येणे रीति विष्णु स्थलें सर्व धुंडिली. लक्ष्मी देवी तेथें नाही म्हणून. विरहाधिक्य होऊनि महाविष्णू विरह अभिनयतो पहा.

**दरू०** : किति धीर धरूं । काय करूं । किंचिन्नाही स्फुरत कयान करून ।।
क्षण युग गण होताति जाण । क्षण क्षण विरह न सोसे ।। १ ।।
अन्नपाणी सुख न सोसे तनि । अति व्याकुळ होतो मनि ।। २ ।।
चंद्र मदन मलयानिल्ला । चंदन कस्तुरि दूर करी ।। ३ ।।

**नारद** :

**विष्णु** :

**सूत्रधार** : येणेरिती विष्णु आणिक विरह अभिनयितो पहा.

**दरू०** : रेकगुपी आदि
माझ्याने न राहावे एक क्षण । हरिलेंसे तिने मन ।।
तू करि हे संघट्टन । कामबाण मज अनुक्षण पीडिताति बहु ।।
सोमकिरण तपन समान । ताविति मज ।।
हिमालयापरि द्रवते मन । काय मी करूं ।।
रमामणि कधी भेटेल । रहस्य मजसी येऊन ।। १ ।।
मलयानिल प्रलयानिलपरी । उपद्रव करीत ।।
मलयाज चंदन तापकरी । न राहे क्षणभरि ।।
अलि कुल लप्तब्कार निवारी । किती मी सोसू ।।
सललित तांबूल । सहे न पिटी भरि ।। २ ।।
धीर धरून किती म्हणून । भेटल केव्हा ।।
नारीमणि मजसी येऊन । करील केव्हा ।।
वारीनाक्षि तिचे अधरपान । बहु संतोषाने ।।
सार घेऊन काम क्रीडा सादर तिसी करीन ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती महाविष्णु आणीक विरह अभिनयतो पहा.

दरू० : सानंद कधी पाहीन गाढालिंगुनें ।। सानंद कधी पाहिन जलनिधि कन्येस ।।
बोलेनेंबालेंदु ।। फालेसें कांचन ।।
चेलेसे कमनीय ।। शीलसें लक्ष्मसे ।। १ ।।
श्रीसें सुंदर मंद । हाससे कमलापुरी ।।
वाससे पालित । दाससे लक्ष्मीस ।।

सूत्रधार : महाविष्णुचे वचन आइकून नारद दिव्यज्ञाने लक्ष्मीदेवी आहेत ते स्थली जाणून विष्णुसी बोलतो पाहा.

नारद : स्वामियास काय विचार लागला, ती पाहूनालो सांगतो आइका. चोल मंडळीं श्रीवाच्छ म्हणून महास्थळ आहे. तेथे वाच्छेश्वर संन्निधि लक्ष्मीदेवि आहे. तेथे चला परमेश्वराची प्रार्थना करा. प्रसन्न होऊन लक्ष्मीचे तुमचे कल्याण करील

विष्णु : अवश्य चला.

सूत्रधार : येणेरिती नारद वचन आइकून महाविष्णु श्री वाच्छेश्वर दर्शनास येतो पहा.

दरू० : रे गुक्षि ।। अटताल ।।
श्री वांछीस येतो । श्री महाविष्णू ।।
श्री वल्लभ नारद । श्री देवीस धुंडायास ।।

सूत्रधार : येणे रिती वाटेस येता विष्णू पक्ष्यांस भृंगांस लक्ष्मी कोठे पाहिली काय म्हणून पुसतो पहा.

दरू० : अलि हो तुम्ही पाहिले काय । अलिनीळवेणीस तुम्हीं ।।
कळहंस हो पाहिलें काय कलहंसयानास ।। १ ।।
कोकिळ हो पाहिलें काय । कोकिळवाणीस तुम्ही ।।
कोक हो तुम्ही पाहिले काय । कोकस्तनीस ।। २ ।।
किर हो पाहिलें काय । किरवाणीस तुम्ही ।।
सारस हो पाहिलें काय । सारसनेत्रीस ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती विष्णू येऊन, आपण बलात्कार केल्या प्राप्ति होईनासे कळून, श्री सांबशिव श्रीवांच्छेश्वरास उद्देशून तप करिती पहा.

दरू० : शंकर लोक व शंकर पालित । किंकर तुज प्रियंकर पावो ।।

दरू० : शिवशिवाने । शिव पावाने । हरहर । शिव शिव पावे ।।
माता तूं माजी । पिता तूं देवदेव ।
भ्राता तूं । गुरु तूं । दाता तूं ।। १ ।। हर हर शिव पावे ।।

सूत्रधार : येणेरिती महाविष्णूनें येकाग्रचित्त अत्यंत भक्तीने तप केलें. त्याच्या भक्तीस मानवून, वृषभारुढ होऊन, पार्वती परमेश्वर येतातिं पहा.

भूपाळी : दरू० : भूपजळी अट ।
देव आला विष्णु विवाहा । देव आला तो सार्वभौम पहा ।।
भावे कन करू । इच्छित उत्साह भक्तवत्सल श्रीमहा ।।
कर्पूर गौर तान । करुणार्द्र चित्ते करून ।।

सर्प भालभूषण ।। सादर गौरीश ईशाने ।।
वेगे करून वृषभावरि बैसून ।। वेदैक गम्य आला आपुन ।।
भोगपति भूषण ।। भोसल कुळशाह त्रिलोचन ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रत्यक्ष आल्या परमेश्वरास पाहून, महाविष्णू नमस्कार करितो पहा.

**चूर्णिका :** जय जय गंगोत्तुंगतरंग विजृंभण ।। विराजित जटाजूट ।।
हृत काळकूट ।। जय जय रंगद्दंगा पतंग ।। तयानंगद्विराजमान ।।
कर्पूर कस्तुरि विटंब ।। शितासित देहभागा ।। भूष्तिनागा ।।
जय जय पुरंदरारविंद भवादि वृंदारक वृंदवन्दित पारारविंद ।।
नित्ये महानंद ।। जय जय शैवपूजा धुरंधर ।। मृकण्डुतनय दुरित-
हरण ।। चरण शरण शमितशमन ।। जय जय सकळ चराचर-
भयंकर त्रिपुरदैत्य हरण ।। चंद्ररेखाभरण ।। भक्तमानसवशंकर
पालितकिंकर ।। शाहनृपक्षेमंकर ।। शंकरा मां पाहि ।।
नमस्ते नमस्ते नमस्ते ।।

**सूत्रधार :** येणे रिती नमस्कार करून, महाविष्णू स्तोत्र करितो पहा.

**दरू ।। :** (भूपाल)

चंद्रसेखर भुजंगकेयुर ।। सकल भय हर त्रिपुर संहार ।।
सांद्र दयाकर ।। गरल कंधर ।। सांबसदाशिव नतमस्मान ।।
पल्लवी ।। पाहिपाही ।। १ ।।
शहजिराजा भीष्टदायक ।। शर्वगिरिजा प्राण नायक ।।
विहङ्ग राज तुरंग नायक ।। विश्वहित सतत मर श्वानू ।।

**सूत्रधार :** येणेरिती स्तोत्र केल्या विष्णूस पाहून परमेश्वर बोलताती पहा.

**ईश्वर :** आइक महाविष्णू, पूर्वी त्वां भूमिदेवीसी मिळून लक्ष्मीदेवीस अपमान केला. याकरितां ते रुसून येथे आम्हांपासी आली. आम्ही ठेऊन घेतली. आता तुम्ही लक्ष्मीस धुण्डित येथें आलेत. अत्यंत भक्तीने आम्हांस उद्देशून तप आणि स्तोत्र केले. याकरितां आम्हांस अत्यंत संतोष झाला. लक्ष्मीस बोलावून येथें तिचें तुमचे कल्याण करितों.

**विष्णू :** स्वामीची आज्ञा तथास्तु.

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वर निजकिंकिरास पाहून बोलतो पहा.

**ईश्वर :** आईक गुंडोदर, महाविष्णूच्या विवाहाकारणे लक्ष्मीदेवीस बोलाऊनि आणी.

**गुंडोदर :** बहुत बरें, आता बोलाऊन आणितो.

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वर आज्ञेवरून गुंडोदरे लक्ष्मीदेवीस बोलाविलें असतां लक्ष्मीदेवी येतें पाहा.

**दरू :** अलिनील वेणी ।। अंबुजपाणी ।। कलकंठी शुकवाणी ।।
कमनीय कल्याणी ।। लक्ष्मीदेवी येते पाहा ।।

**सूत्रधार :** येणेरिती लक्ष्मीदेवी आली. तीस पाहून परमेश्वर बुद्धि शिकवितो पहा.

[ दरू : भूपाल — शापु ]

सासू सांसऱ्यांस सहसा निंदू नये ।। सर्वथाज्ञा भंग करूं नये ।।
भासूर देखाव्यासीं बोलों नये ।। पापजनसंगति करूं नये ।।
सती हे धर्मजाण ।। १ ।।
अति भाषण अति हास करूं नये ।। अन्य जन दुष्टी पाहूं नये ।।
अति कोप अनृत बोलूंनये ।। अनुक्षण अमंगळ राहूं नये ।। २ ।।
पतिसी परूख करूं नये ।। पतिसी वंचना करूं नये ।।
पतिवेगळें दैवत पुजूं नये ।। पतिभक्ति टाकूं नये ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती परमेश्वर लक्ष्मीदेवीस बुद्धि शिकऊन भूदेवीचा लक्ष्मीदेवीची कलहवाराया कारणें दोवींस बुद्धि सिकवितो पहा.

दरू : सतत बुद्धि ऐका गे ।। लक्ष्मीभूमि ।। परस्पर भांडू नका गे ।।
पतिभक्ति टाकू नका ।। वर सति धर्म ऐका ।। वंचना करू नका ।। १ ।।
पतीच मुख्य दैवत ।। पतीच जीवन सतत ।।
सवते पति वेगली नाही जाण ।। २ ।।
क्षीरोदन न्यावें ।। इक्षुरसस्वाद न्यायें ।। समरातिल तैलन्याये ।।
सदा मिळून असा ।। ३ ।।

लक्ष्मी : वरें, तैसेच करितों.

भूदेवी :

सूत्रधार : येणेरीती परमेश्वरें दोधीस बुद्धि सिकवुनी महाविष्णुस पाहुनि बोलतो पहा.

दरू ।। : सतत महाविष्णू सादर ऐक ।। विनत सतीजन वेडी जाण ।।
दक्षणनायक ।। अकक्षणा स्त्रियाचें भक्षभोज्य विशेष द्यावें ।।
दाक्षिण्यानें सद् अक्षय भूषणवास ।। पक्षीयान देऊन रक्षण करावे ।। १ ।।
बालक दोधी ।। या बालबुध्या ।। यांचे लालन करणें उचित तुम्हा ।।
नील मेघश्यामपालन करुन ।। काम केल्ली सुख अनुभवा ।।
गिरिधरमुद आम्हा ।। २ ।।

विष्णु : बरें, तसेंच करितों.

सूत्रधार : येणेरीती परमेश्वर लक्ष्मीस, नारायणास, भूदेविस बुद्धि सिकवून, परमेश्वर यांचा विवाह करावा म्हणून, मनीं चिंतून निजकिंकरास पाहून देवेंद्रादि देवतांस बोलावया आज्ञा करितो पाहा.

परमेश्वर : आइक गुंडोदरा, लक्ष्मी भूदेवि महाविष्णूचें कल्याण करणें आहे. यासाठी देवेंद्रादि देवतांस बोलाऊन आणि.

गुंडोदर : बरें, स्वामीची आज्ञा. आतां बोलाऊन आणितो.

सूत्रधार : येणेरीती परमेश्वराज्ञेवरून, गुंडोदरे बोलाविलें असतां, देवेंद्र सानंद येतो पहा.

[ दरू : (रामकलि) ]

ऐरावतावरि बैसुनि ।। अखिल देवगण घेउनि ।।
वीर आला असुराचिकोन ।। देवेंद्राला संतोषाने ।।
महाविष्णू विवाहा कारणें ।। अति संतोषानें ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती विष्णुचे विवाहानिमित्त ब्रह्मदेव सानंद येतो पहा.

दरू : ब्रह्मो आला विष्णुविवाहास ।। अति संतोषानें ।।
जपमाळ हाती धरी ।। जय हरीचे स्मरण करी ।।
कपाळी गोपिचंदन ।। कमलासन कमंडल करीं ।। १ ।।
चारी मुखस्फुटे मुने ।। वेद ज्यारी येक समयानें ।।
वारिजास न वेग करू ।। वंदित हरिचरण ।।
मंगळाकाष्ठकालु ।। कावेरी यमुना नदीच सरयू गोदावरी नर्मदा ।।
सिंधुर्वेगवती सुवर्ण मुखरी श्री ताम्रपर्णी शुभा ।।
गंगा धारसरिनस्य बिल्व पनसा अश्वत्छ मंदारका ।।
कस्तुरि धज सार कुंकुम रसा कुर्वंतुवा मंगलं ।।
श्रीमत्पंकज लोचनस्य कमला श्रीवामदेव स्वयं ।।
शैलाधीश कुमारिका सुरगुरुपाकायुतः पावकाः ।।
राजीवाप्त तश्च नैऋतिमति पादोनिधि नापति ।।
वायुर्वैश्रवणो दयासु खरा ।। कुर्वेतु वा मंगलं ।।

**सूत्रधार :** येणेरीती सकल देवगण आल्यानंतर लक्ष्मीभूमिदेवीचे पाणिग्रहण नारायणाने केले ते पाहून, सकल देवगण नारद किंकर किंपुरुष मंगल गाताति पहा.

**मंगलं :** जय मंगलं शुभ मंगलं । मंगल मंगलाकार मूर्तीस ।।
मंगल विशाल नेत्रास
मंगल निजभक्तपालनैक प्रीतीस । मंगल पाण्डव सारथीस ।।
जग मंगलं ।। १ ।।
मंगल जय लक्ष्मीकान्तास । मंगल लोकपावनी चरितांस ।
मंगल सुरमुनिजनवृंदवंन्दितांस ।। मंगल महाविष्णु आदि देवतांस ।। २ ।।
मंगल खगपति देवास ।। मंगल श्यामलदेहास । मंगल श्री वैकुण्ठवागेहास ।।
मंगल दिव्योत्सवास ।। जय मंगलं ।। ३ ।।

श्री शिवार्पणमस्तु ।। लक्ष्मीभूदेवीसंवाद नाटकं संपूर्ण ।।

---

# ६. हरिहर विलास

'हरिहर विलास' या एकांकी नाटकाच्या तीन हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत. नान्दी व प्रस्तावना झाल्यावर शिवशंकर प्रवेश करतात त्यांच्या दर्शनाला नारदमुनी येऊन नमस्कार करतो. शंकर त्याला त्रैलोक्यातील वृत्त विचारतात तेव्हा 'मोहिनीच्या रूपाने सर्व जग मी मोहून टाकले' असे विष्णू म्हणत होते. हे वृत्त ऐकताच शंकर ईर्षेने म्हणाले, 'अरे! तरुण जोग्याचे रूप घेऊन मीही सर्वांना मोहित करीन'. नारदाने परत जाऊन विष्णूंना हे सांगितले. त्यानंतर विष्णूने अतिसुंदर मोहिनी रूप धारण केले. तिला पाहाताच ध्यान तपस्या करणारे ऋषिमुनी सर्व भान विसरून तिच्यामागे धावले. म्हणून ती अदृश्य झाली. सर्व मुनी एकमेकांनाच भ्रमिष्टपणे आलिंगन देऊ लागले. आपली चूक कळताच सारे कष्टी झाले. तेवढ्यात शंकर तरुण जोग्याच्या तेजस्वी रूपात प्रकट झाले. त्यांना पाहून ऋषिपत्न्या मोहून गेल्या व त्यांच्यामागे धावल्या. तेव्हा शंकरांनी नारदाला मोहिनीची भेट घडविण्यास सांगितले. मोहिनी त्या तरुण जोग्याला पहाताच मोहित झाली. तिला विरहताप होऊ लागला. तेव्हा नारदाने त्यांना त्यांच्या प्रतिज्ञेचे स्मरण दिले. तरीही मोहिनी आणि योगी परस्परांवर अनुरक्त झाले. त्यांच्या पुत्राचे हरिहर असे नामकरण करण्यासाठी सर्व देव व ऋषी आले.

या नाटकात सर्वत्र प्रसन्न नर्मविनोद आढळतो. कथानकातील चमत्कृतीमुळे नाटकाची रंजकता वाढली आहे. विष्णूंच्या मोहिनीरूपाला तपस्वी ऋषीही भुललेले पाहून नारदाने आपले मन विचलित होऊ नये, यासाठी विष्णूजवळ वर मागितला. यातील नारदाचे सावध चातुर्य त्याच्या व्यक्तिचित्रणातला एक वेगळाच पैलू दाखविते. ह्या नाटकाची लोकप्रियता उचितच होती.



# हरिहर विलास

श्री गुरूभ्यो नमः श्रुभमस्तु ।। जय पार्वती रमण ।। जय वन्नगाभरण ।।
जय सुरानत चरण ।। जय दीनतारण ।। जय अखिलनुत चरण ।।
जय अनंगाहरण ।। जय असुरही संहारणा ।। जय दुरित शमन ।। १ ।।
जयरविशशिनेत्र ।। जय राज राज मित्र ।। जय नाम पवित्र ।।
जय सुचरित्र ।। जय मुनिकृत स्तोत्र ।। जय कर्पुरगात्र ।।
जय सदावास गोत्र ।। जय सुंदर वक्रा ।। २ ।।
जय नारदादिगेय ।। जय भक्त विधेय ।। जय गिरिजार्धकाय ।।
जय सुकृतिनिकाय ।। जय शमित अरिमाय ।। जय श्रुभोक्त रूपधेय ।।
जय भवानीसहाय ।। जय नमः शिवाय ।। जय जय ।। ३ ।।

शरणु शरणु ।। शरणु शरणु जगव्दिधायका शरणु श्री हरिसायका ।।
शरणु शरणु श्रुभप्रदायक ।। शरणु गिरिजा नायक ।। १ ।।
वारूणासुर मदविदारूणाघनिवारणा ।। चारणास्कत भुवन कारण साधु शुभद विचारणा ।। २ ।।
शर्वसंभृत चरणा किंकर गर्वितारि अभयकर ।।
पार्वती हृदयेश शंकर भवहरक्षेमंकरा ।। ३ ।।

(मंगल) महालक्ष्मी वल्लभाय मंगलं ।। जय महनीय चरिताय मंगलं ।।
राजीव लोचनाय राकेंदुवदनाय ।। आजीजित दैत्याय मंगलं ।। १ ।।
सुरमुनि वंदिताय सुचरितैकागम्याय ।। पर हृतदुरिताय मंगलं ।। २ ।।
शरणागत रक्षाय ।। शमितारि पक्षाय ।। करूणाद्रेकचिताय मंगलं ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती नाटचारंभ करून. हरिहर विलास नाटक सुकवि चरित या रंग भूमिस नाटच करितो. यास निर्विघ्न सिद्धिस इष्ट देवची प्रार्थन करितो पाहा.

(श्लोक) वंदितो मी येकदंताचे पाय । अनेक दंत तो मज सहाय ।।
हरितसे सर्व विघ्न उपाय । दया करितो सुप्रसन्न गणराय ।।

**सूत्रधार** : येणेरीती विनायकाची प्रार्थना करून, तदनंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) विश्ववंदे जननी सरस्वती । वीणा पुस्तक धरी दोनि हाती ।।
वंदितो चरण तीचे ध्यानातें । दया करिते मजवरि या जनाते ।।

**सूत्रधार** : येणेरीती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) वंदितो मद्भुत दैवता । अर्धतनु स्त्री पुरुषार्थ संयता ।।
व्याघ्रचर्म येक पार्श्वकनकांबरा । वामपार्श्वनीलकेश सव्यजटाभरा ।।

(श्लोक) सानंद गिरिजा युक्ता। सस्मित प्रियभाषणा।
शिवः करोतु कल्याणं। चंद्रार्धकृतशेखरा ।।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वराची प्रार्थना केल्यानंतर महा विष्णुची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) नमो वेदैक वेद्याय। अवनी उध्दरणायच ।।
आपदामपहर्ताय वासुदेवाय मंगलं ।।

सूत्रधार : येणेरिती सकल देवांची प्रार्थना केल्यानंतर कवि वाक्य बोलतो पाहा.

(श्लोक) अल्प मतीनें मी बहु साहस करितों ।। हरि हर चरित्र वरा रचितों ।।
अति प्रसिद्ध अपार त्याचे। वर्णनाय करवेल काय म्हणें ।। १ ।।

सूत्रधार : तथापि यथामतीनें हरिहराचे दयेनें, त्यांनी प्रेरिले म्हणून गुणवर्णन चरित्रा रचिलें असे. यास निर्विघ्न सिध्यर्थ वाङ्मयमाधुयार्थ पुष्टिकारणें, भक्तें निज भक्ती करून प्रार्थना केली अस्ता आनंदे करून नाटचरंगीं विघ्नराज नृत्य करित येतो पाहा.

(दरूक) संतोषें नृत्यकरी शमवुनि विघ्नें सारी। दंतीमुख देव आला दनुसंहारी ।। १ ।।
सिंदूर माथ्यावरी ।। शशिकला शोभेवरी ।।
मंद मद धार कपोलीं मधुकर हारी ।। २ ।।
पाशांकुश परशुधारी। पाप संघ सकल हारी ।।
मूषक वाहन मोदक करीं ।। ३ ।।
सर्वदा दया करी। सर्प शोभे दोंदावरी ।।
पार्वती शिवसुत पाहे रंगावरी ।।

सूत्रधार : येणेरिती विघ्नेश्वर आल्यानंतर कथा ऐसीजे. श्री भवानी शंकर निज सभेस येताति, म्हणुन सभास्थास सावध करायास गुंडोदर येतो पाहा.

(दरू) विभूति रूद्राक्षधारी। विविध उडचा मारी ।।
विभू शंभूचें ध्यान करी। विशेष अट्टाहास करी ।। १ ।।
भूलि अलीसे भारीं भूषण रुद्राधारी। गुल्लीस दूरिकरी गुंडोदराला सभांतरीं

सूत्रधार : येणेरिती गुंडोदर येऊन सभा सिद्धि केल्यानंतर भवानी शंकर निजसभेस आनदेकरून येताति पाहा.

(दरू) शंकराला सभेसि। शंकराला ।। भव भय सकल निवारी ।।
भव भुजंग कुंडल धारी। शिव अति आनंद कारी। सेविन्ती जन अति सादरी ।। १ ।।
शरणागताचें भय हारी। शशिकला जटावारी ।।
करि शूल डमरुधारी। काम गर्व अपहारी ।। २ ।।
आरूढ वृषभावरी। अंगराग भस्म धारी ।।
करूणानिधि रुद्राक्षधारी। कौतुक त्रिपुरहारी ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वर आल्यानंतर कथा ऐसीजे. इंद्रादि देवतांनी आपण चिंतिले कार्य सिद्धि करून ये, म्हणून पाठविलें याकरतां नारद शंभुदर्शनास येतो पाहा.

(दरू) नारद येतो पाहा। शंभु दर्शनाला। नारद येतो पाहा।।
वीणा वाजउन विश्वजन मोहुन तान सुस्वरानें तदेक मनें गान विविध गाउन। ध्यान करून महादेव दर्शन।।
कांति शुभ्रवरी कटीं व्याघ्र चर्मधारी। शांति स्वरूप जटी धरी।
संतोषानें हरि स्मरण करी। अंतःकरणीं बरी।
अखिल विद्या धरी।। २।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद येऊन परमेश्वरास नमस्कार केल्यानंतर, नारदास बोलतां पाहून परमेश्वर बोलतो पाहा.

**परमेश्वर:** कां नारदा कोठून आलास? विशेष काय समाचार तो सांग.

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वराचे वचन ऐकून नारद बोलतो पाहा.

(दरू) विष्णु सभेहून मी आलो सांब शिवा।
अति विशेष समाचार सांगतो आइका सांब शिवा।। १।।
सर्व जन समुदायातें विष्णु सभेस बैसुन असे बोलिला सांब शिवा।। २।।
मोहनीनें त्रैलोक्य म्हणून म्हटले सांबशिवा। माझे मोहिनी रूपासि वश्य। म्हणतो सांब वाचा।। ३।।

**परमेश्वर:** ऐक नारदा, विष्णुस इतका मोहिनी रूपाचा गर्व असिल्या, अवश्य मोहिनी रूप घेऊन या म्हणा. आम्हीही सुंदर तरूण जोग्याचें रूप घेऊन येतो. कोण कोणास मोहवितो तें पाहूं म्हणउन सांग.

**नारद :** अवश्य सांगतो. आज्ञा तसेंच करितों.

**सूत्रधार :** येणेरिती नारद परमेश्वराची आज्ञा घेऊन विष्णु दर्शनास येतो पाहा.

(दरू) चंद्रशेखराची आज्ञा चक्रधरा सांगायाला मंदयानें नारद मुनींद्र आला।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद परमेश्वराची आज्ञा घेऊन विष्णु दर्शनास येत असतां तदनंतर कथा ऐसिजे.
श्रीमन्नानारायण जगदाधार सभेसि येताति म्हणुन समस्तांस सावध करायास कंचुकिराय विनोदि येतो पाहा.

(दरू) पट्टनाभ धरी अट्टहास करी। काठी घेउनि करी।।
कंचुक्याला सभांतरी।। १।।
विकटा बहुत करी। विष्णु ध्यान करी।।
सकलांस दूरिकरी। संतोषाने उड्यामारी।। ३।।

**सूत्रधार :** येणेरीती कंचुकी येऊन समास्तांस सावध केल्यानंतर श्री मन्नारायण जगदाधार सकल अलंकार भूषित होऊन संतोषें करून निज सभा शोभिवंत कराया कारणे येताति पाहा.

(श्लोक) सजलजलदशामा सर्व लोकाभिरामा। सुरूचिर गुण धामा शत्रु सघासु भीमा ।।
स्वजन जलजसोमा शांति मूर्ति हरिनामा ।। सुललित गुण धामा वंदिता सार्वभौमा ।।

(दरूऊ) भजारे जनहो देवादि देव ।। चंदनाची घेऊन ऊटी ।।
चक्रपाणी रत्न मुकुटीं ।। मंदस्ति मुखभर वीडी ।।
वंदिती देव कोटयानुकोटी ।। १ ।।
अंगज भुज युगला ।। अमूल्य कौस्तुभ गळां ।।
मंगलमय पुतळा ।। श्रिंगरिला पाहा डोलां ।। २ ।।
कासे पीतांबर पिवळा ।। कस्तूरिचा कपाली टिला ।।
दास जनासि सकला ।। आशा पुरवी वेळोवेळा ।। ३ ।।
मकर कुंडल कानीं ।। मदन जनक सारंगपाणी ।।
अकलंक गुणखाणी ।। आरूढ गरूड वाहनी ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती विष्णु सभेस आल्यानंतर कथा ऐसीजे. नारद येऊन विष्णूस नमस्कार करितो पाहा.

श्लोक : शांताकारं भुजगश० ।।

विष्णु : आईक नारदा, अति त्वरेनें संतोषें करून आलास. विशेष काय तो समाचार सांग.

नारद : स्वामि, शंकराचे सभेस गेलो होतो. तेथें प्रसंग त्या केला जे तुमच्या जगन्मोहिनी रूपास सर्व जन वश्य होतील. म्हणोन त्यां सांगितलें तें अइकून परमेश्वरें मज आज्ञा केली, जे विष्णूचें मोहिनी रूप विशेष काय मी पात्र माहेन वरकड ! अस्के मोहतील काय म्हणऊन परमेश्वरें सांग म्हणऊन आज्ञा केली. ते सांगाया कारणें संतोषें करून आलों.

सूत्रधार : (येणेरिती नारदाचे वचन अइकून महाविष्णु बोलतो पाहा).

(दरूऊ) मज वश्य नाही ते कोण पाहा नारदा ।।
सहज माझें सुंदर मोहिनी रूप सकलांस भुलवी म्हणे ।। १ ।।
पाहेल त्याचे हरी नमन मजला जो पाचारिल त्यास
विघरवीन देह स्पर्श करील त्यास ध्यानस्थ बसवीन
देवमुनी माझे त्या गणनेस नाही जाण ।। २ ।।

सूत्रधार : आईका नारदा, अवश्य परमेश्वरास सुंदर तरूण्या जोग्याचे रूप घेऊन या म्हणावें. आम्ही ही मोहिनी रूप धरून येतो. मग कौतुक पाहूं.

नारद : स्वामी मज यैक वर दिल्हा पाहिजे. तुमचे जगन्मोहिनी रूपास सर्व जन वश्य होतील. तेव्हा मज मोहौन होय एसा वर दिधला पाहिजे.

विष्णु : अवश्य तसेच होईल.

सूत्रधार : येणेरिती नारदास आज्ञा देऊन विष्णु मोहिनी रूप धरावयास निजवासास चालिला पाहा.

**(दरूऊ) :** आनंद डोले गजगज चाले आवास भुवनास.

**सूत्रधार :** येणेरिती विष्णु निज आवासास जाऊन अखिल जनांसि मन वश्य करून अति सुंदर तरूण रूप धरून, मोहिनी येते सादर आनंद करून.

**(दरूऊ) :**
कंदलित आनंदे करून मंद मोहिनी ।।
वंदिताति सकल सकल सुरमुनीवृंदा ।। १ ।।
सकल श्रृंगार करूनि सादर ।। सरस नयन ।।
अकलंक सौंदर्य रूप अखिलमान्या ।। २ ।।
चंदन कर्पूर कस्तूरि चर्चूनी वूटि घेऊनि ।।
इंदु वदन मंद हास मुख यल्हास वीटी ।। ३ ।।

**(दरूऊ) :**
हरिणाक्षी येते पाहा ।।
हंसगति चाले जगन्मोहिनी ।। चोली जरी साडी नेसूनि ।।
संतोषी ते येते जगन्मोहिनी ।।
वदन चंद्रने वरकुच युगुलें जगन्मोहिनी ।।
करि मदन बाधा सर्व मननशीलासे जगन्मोहिनी ।। २ ।।
धर चरित स्मित ते ।। दर्शनीय रूपाने जगन्मोहिनी ।।
पाहा हरीते सकल मन अद्भूत गुणानें जगन्मोहिनी ।। ३ ।।

**(दरूऊ) :**
राजहंसगमनाते ।। राजीव पत्रा नेत्रीते ।।
राज मुखी शोभताते रमामणी ते ।। १ ।।
कल कंठी मृदुवच मी कस्तूरी तिलक धरूनी ।।
अलिकुल नीलवेणी यांबुज पाणी ।। २ ।।
जरी चोली साडी नेसूनी जवे बाजूबंध लेवूनी ।।
वर कन्यकामणि वंदनीय जनी ।। ३ ।।
सादर श्रृंगार वाणी ।। सकल सौंदर्य खाणी ।।
मोद अली करी राजगमनी ।। मोरवानी ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मोहिनी रूप येता तपोवनांतील ऋषीश्वर तपश्चर्या टाकून मोहिनी बरोबरी येऊन मोहिनीसीं बल्ले (बोलले) पहा.

**(दरूऊ) :** कमंडल माझें घे जगन्मोहिनी ।।
आता कनककुचकुंभ धरूं दे जगन्मोहिनी ।। १ ।।
मधुर फलें घे गे जगन्मोहिनी ।।
तुझें अधरपाने करूं दे जगन्मोहिनी ।। २ ।।
जपमाला माझी हे घे गे जगन्मोहिनी ।।
मज झडकरी आलिंगन दे जगन्मोहिनी ।। ३ ।।
कृष्णाजिन मज हे घे गे जगन्मोहिनी ।।
कृपा करूनी गुह्य दाखवी जगन्मोहिनी ।। ४ ।।
अजमार्जित तप घे माझें जगन्मोहिनी ।।
आतां अंगीकाय कदा करू जगन्मोहिनी ।। ५ ।।

सूत्रधार : येणेरिती मोहिनीस रूर्षीश्वर पीडितातिं म्हणऊन, त्याच्या दृष्टीस अदृश्य झाली. ते पाहोन ऋषीश्वर येकास येक आलिंगन देऊन परस्परें झाडास आलिंगन करून, मोहिनीस धुंडित फिरताति पाहा.

सूत्रधार : येणेरिती मोहिनी न दिसतां तपोवनांतील रूषीश्वर धुंडुन कष्टी होऊन येकीकडें बसिलें तद्नंतर कथा हेसीजे. मोहिनी आल्याचें वृत्तांत नारदाने जावून परमेश्वरास सांगितले. परमेश्वर आइकून सुंदर तरूण जोग्याचे रूप घेऊन येतो पाहा.

श्लोक : करीं त्रिशूल पिनाक डमरू धरी ।। शशिकला सुशोभे जटावरीं ।।
उटि घेऊन अमूल्य भूषण धरी ।। आनंदे आदि देव येतो शुभ करी ।।

(दरूऊ) : देव येतो पाहा ।। श्री महादेव येतो पाहा ।।
सुंदर रूप घेऊन त्रिशूल हाती धरून ।।
मंद आनंद करून धिमिविकट तक धलांगु म्हणून ।। १ ।।
गरल नील कंधर गज चर्मांबर सरस गुण सागर ।।
झनु झनु धण तरु धलांगु म्हणून ।। २ ।।
रूप सुंदर पाहून रूषिपत्नी आल्या मोहुन ।।
आपण हांसून आदि देवा धिमि धिमिकिट म्हणून ।। ३ ।।
अंगरागा भस्मधारी अकलंक चंद्र कला जटाधारी ।।
तुंग तांडव करितो गिट किट्ट धलांगु म्हणून ।। ४ ।।

(दरूऊ) : शिव येतो सांब शिव येतो ।।
शिव येतो सकल भूतसिधगणसवें घेऊन ।।
नाटच करित नाग भूषण ।। १ ।।
फालाग्नि लोचनानें भस्म केला मदन यानें ।।
काल तर्जिला वाम पादानें ।।
कांक्षित फल दे कल्याण मूर्तिनें ।। २ ।।
मोहिनीसि आजि मोहवीन मौदनैसी ।।
इच्छा धरून सहज आपली लीला करून ।।
सानंद मंद गति करून ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वर येतां तपोवनांतील रूषीपत्नी आपलाले भर्तार टाकून. परमेश्वराचें सुंदर रूप पाहोन, तदेक मन होऊन श्रृंगारलीला बोलताति पाहा.

(दरूऊ) : सरसें निंबे दोन्ही शंकर उपहरतें ।।
करयुग घेऊन करी अंगीकार तूं ।। १ ।।
मधुर बिंब फल माझे अंगिकारूनि ।।
सुदेहानें अधिक सुरूचियाची पाव्हिजे ।। २ ।।
चल पत्र जिकिले त्यानेच कवाक्य वारांगना ।।
सललित दयाने सादर घेवे म्हणून ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती रूषीपत्नीची वचने अइकून परमेश्वर नारदासी बोलतो पहा.

**ईश्वर** : आइक नादरा ! हे ऋषी पत्नी म्हणिजे काइ ? याहि आपलाले भर्तार टाकून आम्हा माघें येऊन अमच्या सुंदर रूपासी पाहून ह्या वश्य झाल्या. तसीच तसीच मोहिनीस दाखेवी तीसही ऐसच वश्य करितो.

**नारद** : स्वामि मी निर्भय करून बोलतों. ऋषी पत्नीस मोहिनीस समान पहातो कीं काय ? मोहिनीचें रूप पाहिल्या उपरि तुमचे धैर्य कोठें जाईल कीं हें न कळे. मज आज्ञा दिधल्यानें मोहिनी आली की नाही हे पाहून येतो.

**परमेश्वर** : अवश्य जावून ये बेगी.

**सूत्रधार** : येणेरिती परमेश्वरावी आज्ञा घेऊन नारद मोहिनीपासी येतो पाहा.

**(दरूऊ)** :
सार गान गाऊं लागला ।। संतोषें वीणा वाजविला ।।
नारद वेगी चालिला ।। नव मोहिनी पहायाला ।।

**सूत्रधार** : येणेरिती नारद येऊन मोहिनीसीं बोलतो पाहा.

**नारद** : आइका स्वामी. महेश्वर पूर्वोक्त रितीनें येऊन रम्य प्रदेशी बैसुन तुम्हास पाहून ये म्हणून मज पाठविलें. या करिता पाहावयास आलों.

**मोहिनी** : अइक नारदा. आम्हास येवुन बहुत उसीर झाला. परमेश्वर कोठें आहे दाखेवि.

**नारद** : उठा चला, परमेश्वर तेने पाहा.

**सूत्रधार** : येणेरिती नारदाने मोहिनीस परमेश्वरास दाखविले. मोहिनी परमेश्वरास पाहून वर्मिते पहा.

**(दरूऊ)** :
मुखे चंद्रा जिंकिले ।। जटावरी सुख करी सर्व जनासि ।।
पाहा नारदा श्रुमोदयाचे कर्पूराद्रिवरी ।। १ ।।
सुंदर याचे रूप पाहून सुंदरपणाचा गर्व टाकून
कंदर्प अंगीकारिलें अनंगपणे पाहा नारदा
काय वर्णु याचे गुण सकल चराचर मोहुन
सौंदर्य रूपाधिकानें ।। दृदयानें पाहा नारदा ।।
अति सादर आनंदे खुणें ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीचे वचन अइकून नारद बोलतो पाहा.

**नारद** : परमेश्वराचें वर्णन कोणाच्यानें वर्णवेल ? त्याचे तत्व तुम्हासच कलेल. आणखीस काय प्राप्ती आहे ? तुम्ही म्हणून इखकें वार्णिलें. हे ऐकून मी धन्य झालो.

**सूत्रधार** : येणेरिती नारदाचे वचन अइकुन, मोहिनी अपलें निज रूप विसरून परमेश्वराचें सुंदर रूपास पाहून तदेक मन होऊन विरहावस्था अभिनयते पाहा.

**(दरूऊ)** :
जन्म व्यर्थ याचे संगा वाचून ।। श्री करिकुंभाचे गरूवा हारी ।।
कनक कलशापरी सरस येऊन दोहि करी । सादर स्तन न धरी तारी ।। १ ।।
अमूल्य माणिक्य आरक्त सार ।।
अमृताहून मधुर कामळ धरी दंतावरी ।।
गोडीने क्षतम करी तरि ।। २ ।।

संुदर कनकालतिकाहुन शोभे देह तटीव समान ।
इंदु धर हें सौंदर्य इछुन ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीचे वचन आयिकून नारद बोलतो पाहा.

**नारद** : तुम्ही काय बोलता ते अइकुन मज आश्चर्य वाटतें. तुम्ही मजसि प्रतिज्ञा केली की क्षणभर मोहिनी रूप धरून अपले मायेनें सौंदर्याने परमेश्वरास क्षणामध्यें मोहवीन. अइशि प्रतिज्ञा करून येथें आलां. इतक्यात तें विसरून परमेश्वरास मोह व्हावा, तें येकीकडे राहून तुम्ही त्यास मोहिलें भेडसावायास आलो तां आपणच भ्याला, हा न्याय आता येथें झाला हें मोठें कौतुक आहें.

**सूत्रधार** : येणेरिती नारदाचे वचन अइकुन मोहिनी नारदासी बोलते पहा.

**मोहिनी** : आइक नारदा. अम्ही सहज सौंदर्य पाहोन वर्णिलें इतकेंच. परंतु आम्ही त्यास मोहिलें काय तुझे मन पहायास बोल्लें. तें सत्य मानून भ्रमलास काय ? परमेश्वर मज पाहेल तेव्हां तुझी भ्रांति जाईल.

**नारद** : हे वचनचापल्य परमेश्वर दूर अस्तां बरें दिस्तें. समीप आल्या उपरि जे अवस्था आहे ते कल्लीच आहे. तथापि तुम्ही बोलता, म्हणोन मान्य करितो. तुम्ही क्षणभरी येथें बसा. मी परमेश्वरा समीप जाऊन तुम्ही आलांत, तें वृत्तांत सांगून तुमची परमेश्वराची भेटि करितो.

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनी नारद बोलत अस्ता रूषीश्वर पूर्वोक्त रितीने येऊन बोलताति पाहा.

**रूषी** : मोहिनी कोठे रे ?

**मोहिनी** : आइक नारदा. हे रूषीश्वर मोहुन आले आहेत. यांचा मोह दूरिं होयसा करि.

**नारद** : अवश्य तुमची आज्ञा. या ऋषीश्वराच्या स्त्रिया परमेश्वरास मोहुन येथें आल्या आहेत. त्यां पासी यांस नेऊन सोडितो. यांच्या नेत्रांस यांच्या स्त्रिया तुम्हापेक्षाही सुंदरसा दिसेल, हे आपल्या बाइल्यांस घेऊन जाति ऐसा वर द्या.

**मोहिनी** : अवश्य तसेंच होईल.

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीची आज्ञा घेऊन नारद ऋषीश्वरांसी बोलतो पाहा.

**नारद** : अगा रूषीश्वर हो तुम्ही ये येके मोहिनीस इतके जण मोहुन आहा, हे कोणाचे वांटे येऊन पावते. व्यर्थ ईची आशा धरून कशास आहात ? तुम्हास प्रति मनुष्यास येकेक मोहिनी पेक्षाही सुंदर मी देतो, मज बरोबर या.

**रिषु** : आइका नारदा. अवश्य याहून काय पाहिजे आमची आशा पूर्ति होयसि करा.

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीची आज्ञा घेऊन मुनीश्वरांस सवें घेऊन नारद परमेश्वरा समीप येतो पाहा.

**(दरूऊ)** : नारद चालला नागभूषण दर्शनासि साऱ्या रूषीश्वरांसि.

**सूत्रधार** : येणेरिती नारद परमेश्वरासमीप गेल्यानंतर मोहिनीनें परमेश्वरास सादर पाहून तदेक अंतःकरण होउन मदन बाधेस वश्य होऊन विराहावस्था अभिनयातें पाहा.

**(दरू ०):** मन माझें मोह सागरीं मग्न जालें ये अवसरी ।।
वन कोनें उदारी ।। बर नादाविना माझें ।।
कामवाण पीडा करि काय करूं मी बिचारी ।।
सोमकिरण तापकारी ।। सोसूं किती वारंवारी ।। २ ।।
गराला मिश्रित आला गर्वित होऊन मलयानील ।।
सरस दिल येक वेळांस मी धाग्नीहून अधिक झाला ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद आल्या अगोधर रूषी पत्नी परमेश्वरासमीप जाऊन श्रृंगार लीला बोलताति पाहा.

**(दरू ०):** वंदिते तुझे पाय सांबशिवा रहस्य वर दक्षण भारि रमया ये सांबशिवा ।। १ ।।
कर्पूर गौर देहाने सांबशिवा । मज करूणा करून आलिंगन दे सांबशिवा ।। २ ।।
मधुर वचन माझें आइक सांबशिवा । तुजे अधरपान दे आतां सांबशिवा ।। ३ ।।
पिनाक धरितोस त्या करानें सांबशिवा । माझे पीनस्तन धरि तूं आता सांबशिवा ।।

**सूत्रधार :** येणेरिती रिषि पत्नीची वचनें आइकून परमेश्वर बोलतो पाहा.

**(दरू ०):** परकीया तुम्ही होऊन परवश्या । वरभर्म नव्हेसा जन वामांगीं मन ।। १ ।।
परात्पर तुज जाणून परमेश्वर तूज वश्य होऊन सरस संग इच्छून सार आलं जन ।।
मुनीस कलल्यां कोप करितीला ।। मुहुर्मुहु तुम्हास मारितील जन व्यर्थ पूजीती करितील ।।
जन निंदिले निंदोत् जपशील मारिल्यां मारोत् ।।
तन्मन इछून द्याना ।। तत्वें करून असतो ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती रिषि पत्नी परमेश्वर बोलत असतां नारद येऊन परमेश्वरासी बोलतो पाहा.

**नारद :** आइका स्वामी मज मोहिनीसमीप पाठउन तुम्ही या ऋषि पत्नीसी सरस सल्लाप काय करिता.

**परमेश्वर :** नारदा आम्ही सरसल्लाप करित नाही यास तूं समजाऊन वाटे लावि.

**नारद :** अवश्य स्वामीची आज्ञा. अगोधरीच उपाय करून यांच्या भर्तारास बराबरी आणिलें आहे. याच्या नेत्रास यांचे भर्तार तुम्हा पेक्षाही सुंदरसे दिसेत ऐसा वर द्या.

**परमेश्वर :** अवश्य तसेच होईल.

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वराची आज्ञा घेऊन नारद रूषी पत्नीसी बोलतो पाहा.

**नारद :** आईका रूषी पत्नी हो तुम्ही या येकाशी इतक्या जणी मोहून पल काय तुम्हास प्रत्येक येगलालेयाहून सुंदर मी देतों चला.

**रुषी पत्नी :** अवश्य द्या.

**नारद :** अहो रूषीश्वर हो तुम्हा अस्वन्यांस मोहिनी पावली की तुम्ही निज आवासास चला.

**सूत्रधार :** येणेरिती ऋषीस रूषि पत्नीस नारदे परस्परें दर्शन केलें तेव्हा परमेश्वराचे वर प्रभावें करून रिषाच्या दृष्टीस मोहिनी पेक्षाही अपल्या स्त्रिया सुंदर दिसों लागल्यां ऋषी पत्नीच्या दृष्टीस आपले भर्तार परमेश्वराहून सुंदर दिसों लागले. तें पाहून परस्पर मोहुन आपले निज आवासास गेल्यानंतर कथा ऐसीजे नारद येऊन परमेश्वरासीं बोलतो पाहा.

**नारद :** स्वामीचे आज्ञेप्रमाणें ऋषीस रूषी पत्नींस भेटि करून वाटे लाविलें.

**परमेश्वर :** आइका नारदा त्यांस वाटे लाविलें बरें केलें. तूं मोहिनीस पाहायास गेला होतास की मोहिनी कोठें आहे दाखेवि.

**नारद :** उठा चला मोहिनी ते ते गे पाहा.

**सूत्रधार :** येणेरिती नारदें मोहिनीस दाखविलें तीस पाहून परमेश्वर वर्णितो पाहा.

**(दरू ०):** काय वर्णू इचें रूप सुंदर ।
काय वर्णू ईचे काम जनक रूप देय सर्व जनधिक मनोल्लास ।। १ ।।
चंद्र उदय रूल ईचे मुख चंद्र पाहून लाजला सांद्र ।
कलंक रूप जाणुन या पाले समय केश दुर्दिनी लपाले पाहा नारदा ।। २ ।।
नील निभीत केश सादर पाहून निरजनुतनु कोपे ।
आलि सर्व लपालीसशीखित आणी घे उरले ते फिरताति बनांत ।। ३ ।।
पाहून ईचे नेत्र सभयें जइ पंक लपाली शत पत्रें आहो आश्चर्य पाहा ।
अद्यापि हरीण अगणित फिरताते पलाले करि कुंभ स्थलि स्तन पाहून करि ।।
बहु तृण घाली सरसिरूह रोषें सभयें विकास पावले साम्य न पाहती ।
हेम कलशचकोरिं ।। ५ ।।
तनुकटि सुंदर पाहून नेत्र तरूणीचे हरिवारें मनि भय
मानुनि गिरि गुहांतरि मंद मंद संचार करि केसरी ।। ६ ।।
मंद गति ईची पाहून लाजिले ते मदगज हंस जन
सुंदर मधुर गान भयानें सुस्वरा कोकिलाचे गले काले झाले ।।

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वरा मोहिनीस पाहून वर्णुन विरहावस्था अधीक होऊन मग त्या नारदासि बोलतो पाहा ।।

**(दरू ०):** याचे तत्व सांग तूं मज नारदा इंदु किंवा अरविंद ।
किंवा मुखर वृंद किंवा मुख चंद्र हे न कले आम्हा ।। १ ।।
कमला किंवा अति विमला मीन किंवा कुसुम शर वाण किंवा अमल नेत्र ईचे ।। २
कनक कलश किंवा अनघ कुसुम गछ्छ घन कमल कोशा कीं स्तन युग
सुशोभते ।। ३ ।।
चपला किंवा अति चपलवार किंवा तपले हेमकांचीर्की अपरूप नारि रत्न ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मोहिनीचे रूप पाहुन परमेश्वर मागुती नारदास बोलतो पाहा.

**(दरू ०):** नाहीतर जन्म व्यर्थ ईवीण नारदा ।
सरस तीक्ष्ण नगदाही ईचे नगदाहि असल्यांचें सार्थक ईचे कुच ग्रहण ।।
करयु हृदयईचे आलिंगुन कांक्षित सुख पावावें ।। १ ।।

माणिक्य निभ दंताचे सार्थक मधुर धरिं क्षत करण ।
आणिचे वोष्ठानें चुंबन देऊन अमृतपान करणे ।। २ ।।
सरस सल्लाप ईशी करावेसा हृदयी रमावें ।
वर देह जन्म सफल जन वेचिर सुख भोगावे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनी मातया जगति दिसस्तां परमेश्वर मागुती नारदासी बोलतो पाहा.

**(दरू ०)**: तन्मय मज दिसतें पाहा नारदा वनी सर्वत्र ते दिसे वरतें पाहतां ते दिसे ।
जनी सर्वत्र ते दिसे जगन्मोहिनी सत्यसे ।। १ ।।
चंचला चाले ते चल चपल सुंदर ते बोल बोल संचर रहित चराचर ।
केलें सर्व कर्णी वाग्द्वारिं बिंबले ।। २ ।।
या मनासि भ्रांति असे ईचे तत्व कसे असे ।
काम बाण पाडितसे काय करूं ते दाखवि आम्हासि ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनी लता मंठपास गेली ते पाहून मागुती परमेश्वर नारदासि बोलतो पाहा.

**दरू** : हे येकाश्चर्य पाहा हो ।। याचें तत्व सांग तूं मज नारदा ।।
सरस स्तन तीचे पाहून सादर धरीन म्हतों तो वर घनमंडलि वीजेसारिखे ।
वर युवति पाहत न दिसे ।। १ ।।
अधर तीचे सुंदर पाहून मधुरपान करिन म्हतों तों सुख स्वप्नी ।
सामौज्य केले सारिखें सुख बोधितसें दिसे ।। २ ।।
सुंदर नारी मी हें पाहून सुख भोगीन म्हणतों तों ।
पींदु अरसा तेक रात्रि पाहिलें इछिछे दिवसा दिसे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीचे रूप पाहुन वश्य होऊन विरहावस्था अधिक होउन परमेश्वर पक्ष्यांस पुसतो पहा.

**(दरू ०)**: कोकिल कुल हो मोहिनीस तुम्हीं पाहिलें सांगा ।।
श्री कर चंदन हो नारी मणि तुम्ही कोठें पाली सांगा ।। १ ।।
मधुर हो सारस नेत्री तुम्ही मज कोठें सांगा
मधुमास मालती युवती रत्न कोठें सांगा ।। २ ।।
सादर पुसतो श्रुक हो सुंदर कोठें सत्वर साग स्वाद आंग्रेहो ।।
तरुणी मणि कोठें स्व बुद्धिनें सांगा ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती परमेश्वर पक्षांस वृक्षांस पुसत मोहिनीस पुसत जात असतां तिकडून मोहिनी परमेश्वरास न देखतां पक्ष्यास सरकुन पुसते पाहा.

**(दरू ०)**: किती धीर धरू मी आता सांगा पक्षी हो ।
अति यादरें देऊन अलिंगन देईल केव्हां ।।
तासा सांगरे शकुन संतोषानें दया करून ।
सदे येथे येऊन सादर सरस बोलेल केंव्हां ।। १ ।।
क्षण येक युग समानजातसे मज मन मोहिलें त्यानें सांग भारद्वाजा ।
सनय येथें येऊन सरस स्तन धरील केव्हा ।। २ ।।

विरह् बाधा मज सांग त्यास जाउनि तुम्ही विनवा ।
अति याधार ना धसे शुक सारिका हो ।।
करूणा करूजा मज वरी कांते इतके केव्हां रमयासें ।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वर तिकडून पक्षि वृक्षांस पुसत येत अस्तां इकडून मोहिनी परमेश्वरास न देखतां पक्ष्यांस पुसतस्तां परमेश्वर मोहिनीस पाहून बोलतो पाहा.

(दरूक) : बेगीनें ये म्हणे काय तूं बोल न बोलसी ।।
आतां ये बेगी म्हणे हांसून विनोदान करिसी ।। १ ।।
रूसलीस कायीगे मजसी रूप सुंदरी ।
असी अपराध केला तो आजि सांग सुंदरी ।। २ ।।
अंगीकार माझा करून आदर ये म्हणे ।
माझें तुंगास्तन आलिंगुन तूं रम आपणें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वराचे वचन अयिकून मोहिनी बोलते पाहा.

(दरूक) : देव देव मी धन्य झालों दीनानाथा ।
मजला पावलासे याहून संतोष पार आता ।। १ ।।
निमिष येक तुजविण न रहे निगम वेद्या ।
सर्वदा अमल हृयीं येकांत करणी रमन तुजसी । ३ ।।

सूत्रधार : येणेरिती मोहिनी परमेश्वर सरस सल्लाप करिताति पाहा.

(दरूक) : कंदुक स्तन धरूं दे कर युगानें । कंदुक स्तन धरि तूं आतां ।।
करणेंनें अधरपान दे तुं मज । अधरपान हे गैघे मज अति आदरानें ।।
मधुर वचनें ये म्हणुन मज दे गाढ आलिंगन ।
आलिंगन आतां तूं घे अन्य कार्यसज्ञादे ।
चाल वेगी रमये जाऊं चंद्रशेखर मेरूवरि ।। ६ ।।

सूत्रधार : येंणेरिती मोहिनी परमेश्वर सम्मत होऊन मेरूवरि क्रीडा करासा चालिली पाहा.

(दरूऊ) : सादर क्रीडा करणें सम्मत दोघें होऊन ।।
आदरें चालिले संतोषानें मोहिनी शंकर ।।

सूत्रधार : येणेरिती मोहिनी शंकर क्रीडेस गेल्यानंतर कथा ऐसीजे नारद आपण चिंतिले कार्य झालें म्हणोन इंद्रादि देवतांस संतोष सांगायास येतो पहा.

(दरूऊ) : इंद्रादि देवतांस इछिलें कार्य झालें सांगायास नारद मंद येतो पहा.

सूत्रधार : येणेरिती नारद गेल्यानंतर परमेश्वर मोहिनी अनेकाल क्रीडा करतां कथा ऐसीजे. मोहिनी गर्हार होऊन पुत्रोत्पत्ति झाल्यानंतर लेंकरू घेउन बालांतीण येते पाहा.

(दरू ०): बाल हाती घेऊन फाळीं पट्ट बांधुन पाला निंबाचे घेऊन ।
बालांतिण आली संतोषानें ।। १ ।।

हलेद सर्वांगा लाऊन हर्ष सर्व रक्षा बांधून ।
तिलक काजल कालें लाऊन देह धवलाली वेडें घेऊन ।। २ ।।
हीरवीं कांकणें लेऊन हिरवी साडी चोली लेऊन ।
सिरसां सटवी देवी देवीस बंदुन सीघ्र आली नाम करणा कारणें ।।

**सूत्रधार** : येणेरिती पुत्रास हरिहर नामें नाम करण करायास इंद्रादि देव रूषी गणें येताति पाहा.

**(दरू ०)**: इंद्र ब्रम्हदि देव इंदु सूर्याग्नि सहीत सांद्र ।
अखिल देव गण संतोषें आले नाम करणा कारणें ।
हरिहर पुत्रोत्सव पाहाया कारणें अति आदरानें ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती हरिहर पुत्र नामकरण केलें तें पाहोन सकल देव रूषीश्वर नारद किंन्नर किंपुरूसें मंगलें मंगलें गाइली.

ऐसी मंगलं । जय जय शंकर श्रूल पाण ते ।।
जय जय सुंदर जगन्मोहिनी ते । जय जय चंद्र मौलिते
जय जय मंगल कर मूर्ति ते ।। १ ।।
जय जयदेवता सार्व भौमाते । जय जय जगदावास चरिता ते ।।
जय जय त्रिपुराजित धीगाते । जय जय वेदोद्धरते ।। २ ।।
जय जय भोंसले कुल शाहादेवाते । जय जय धनुज जीताते ।।
जय जय काल संहार ते । जय जया दशमुख शमनाते ।। ३ ।।
जय जय हरिहर नाम ते । जय जय अभेद रूपाते ।।
जय जय अनादि ब्रम्हाते । जय जया शाश्वत जोति ते ।। ४ ।।
जय जया जगन्नाटक सूत्रधाराते । जय जय सर्वातर्यामिते ।।
जय जय आनंद कंद ते । जय जया अखिल श्रेष्ठ ते ।।
इति श्री हरिहर विलास नाटकं संपूर्ण मस्तु ।।

---

# ७. मृत्युंजय चिरंजीव

या नाटकाची प्रत तेलगू लिपीत लिहिलेली आहे. याचे कथानक भृकुंड ऋषी व त्यांची पत्नी मरुद्वती यांना शंकराच्या कृपेने पुत्र झाला. त्याचे नाव मार्कंडेय ठेवले. भृकुंडी ऋषी शंकर भक्त होते. मुलगा अल्पायुषी आहे हे जाणून ते तपश्चर्या करीत होते. मार्कंडेयाला सोळावे वर्ष लागताच मातापिता व्याकुळ झाले. तेव्हा मार्कंडेय त्यांची आज्ञा घेऊन शिवदर्शनाला गेला. शहाजी महाराज स्वतः शंकरभक्त होते. त्यांनी भारतातील साऱ्या शिवक्षेत्रांचे स्तोत्र मार्कंडेयाच्या तोंडी घातले आहे. काशी विश्वेश्वर, केदारनाथ, त्र्यंबकेश्वर, अरुणाचलेश, चिदंबरेश, पशुपतिनाथ, मीनाक्षी सुंदरेश्वर, बृहदीश्वर, त्यागेश (भोंसल शाहेंद्र देवता) इत्यादी मंदिरांत शिवदर्शन घेऊन मार्कंडेय शिवस्वरूप झाला. त्यामुळे यमकिंकर त्याची मृत्यूची वेळ आलेली असून स्पर्श न करता भिऊन पळून गेले. नंतर यमराज गर्वाने येतो. परंतु शंकर भक्त रक्षणासाठी यमाचा संहार करणार तोच भूमिदेवी शिवस्तुती करून यमाला प्राणदान देवविते,

शिवभक्तीचा महिमा गाणारे हे भक्तिप्रधान नाटक आहे, भृकुंड ऋषी व मरुद्वती पुत्र मृत्यूच्या भयाने पीडलेली हा करुण रसात्मक प्रसंग, यमकिंकर काळचा वेषात राक्षसी हावभाव करीत प्रवेश करतात तो भयानक, शिवलिंगातून शंकर प्रकट होतो तो अद्‌भूत रस व शेवटी सर्व देव, ऋषिगण, मानव 'मंगळं' गातात तो शांतरस अशी या नाटकाची विविध रसात्मक रचना आहे.

ही कथा पद्मपुराण (३३) अग्निपुराण (२०.१०) विष्णुपुराण (११०.३) नारद पुराण (१.४) भागवत (४.१) मत्स्यपुराण (१८५.२०) आढळते.

# मृत्युंजय चिरंजीव

श्रीगणेशाय नमः ।। गुरूपूर्णानंदाय नमः ।। महाराष्ट्रं ।। मृत्यूजय चीरंजीव नाटकं लिख्यते ।। तदादौ मंगळा चरणं ।। तोडेंम् ।। नाटरागं ।। झंपे ताळं ।।

जय पार्वति रमण ।। जय पन्नागा भरण जय सुरांनत चरण ।।
जय दीन तरण ।। जय अखिळनुत चरण ।। जय अनंगा हरण ।।
जय असुर सहरण ।। जय डरित शमना ।। १ ।।
जय रवि शशिनेत्र ।। जय राज राज मित्र ।।
जय नाम पवित्र ।। जय सुचारित्र ।।
जय मुनिकृत स्तोत्र ।। जय कर्पूर गात्र ।।
जय सदावस गोत्र ।। जय सुंदर वक्रा ।। २ ।।
जय नारदादिगेय जय भक्त विधेय ।।
जय गिरिज अर्द्ध काय ।। जय अमर राया ।। ३ ।।
जय शमित हरिमाय ।। जय शुभोत्कर्ष धेय ।।
जय भवानी सहाय ।। जय नमःशिवाया जय जया ।। ४ ।।

**(मंगळं)** : महालक्ष्मी वळ्ळभाय मंगळं ।। जय महनीय चरिताय मंगळं ।। धृ ।।
राजीव लोचनाय ।। राकेंडु वदनाय आजि जित दैत्याय मंगळं ।। १ ।।
शरणागत रक्षाय ।। शमितारि पक्षाय ।।
करूणो द्रेक चित्माय मंगळं ।। २ ।।
सुरमुनि वंदिताय ।। सुचारितैक गम्याय ।।
परिहृत दुरिताय मंगळं ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती नाट्यारंभ करून मृत्युंजय चीरंजीव नाटक निर्विघ्नाकरणे इष्ट देवता प्रार्थना करितों पहा.

**(श्लोक)** : वंदितो मी एक दंताचे पाये ।। अनेक दंत तो मज सहाय ।।
हरितसे सर्व विघ्नउपाय, दया करितो मजवरि गणराये ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्या नंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पहा.

**(श्लोक)** : विश्व वंदे जननी सरस्वती वीणा पुस्तकें धरी दोहिं हातीं ।।
वंदितो तिचें चरण ध्यानातें ।। दया करीते मजवरि या जनातें ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पहा.

**(श्लोक)** : वंदितों महद्दाभुत दैवता ।। अर्द्धतनु श्री पुरुषार्थ संयुता ।।
एक पार्श्वं व्याघ्र चर्मान्य कनकांबरा वाम पार्श्वं नीळकेश सव्य जटाभरा ।।

**श्लोक** : सानंद गिरि जायुक्ता सस्मित प्रिय भाषणा ।।
शिवः करोतु कल्याणं ।। चंद्रार्द्ध कृत शेखराः ।।

**सूत्रधार** : येणेरिती परमेश्वराचें स्तोत्र केल्यानंतर महा विष्णुची प्रार्थना करिता पहा.

(श्लोक) : नमो वैदैक वेद्याय अवनी उद्धरणायच। आपदाम पहर्ता वासुदेवाय मंगळं ।।

सूत्रधार : येणेरिती सकळ देवतांची प्रार्थना करून मृत्युंजय चिरंजीव नाटकांत भक्तें निजभक्तीकूने वाक्यांधुयार्थ पुष्टी कारणे प्रार्थना केली असतां तद्नंतर विघ्नराज नाट्यरंगी संतोषेकून नृत्य करितो पहा.

(दरूऊ) : मातृका. राग पाडी।
आदि ताळ संतोषे नृत्य करी ।। शमोनि विश्वसारी
दंतिमुख आळा देव दनुज संहारी ।। १ ।।
सिंदूर माथ्यावरी ।। शशिकळा शोभेवरी
मंदामाद धारक पोळीं ।। मधुकर हरी ।। २ ।।
पाशांकुश परूश धारी पाप संख्या सकळ हरी
मूषिक वाहन मोदक करीं ।। ३ ।।
सर्वदा दया करी ।। सर्प शोभे दोंदावरि ।।
पार्वति शिवसुत पहा रंगातरि ।। ४ ।।

सूत्रधार : अहो भागवत हो. विघ्नेश्वर आला कीं. पूजा करायाला. अर्च्चकास बोलावा.

प्रत्यु० : अवश्य बोलावितों.

सूत्रधार : अरे कोण आहे रे ! अर्चक पूजा करायाला येरे.

अर्चक : कांही बोलाविता हे गे आलों.

सूत्रधार : अरे वेडचा विश्नेश्वर येऊन फार उसिर जाला कि लौकरि स्नान करून पूजा करिरे.

पूजारी : स्नान करून आलों म्हणुनच देवास सिऊन पूजा करितों.

सूत्रधार : अरे वेड झवी. स्नान संध्या केली नसतां स्नान केळे म्हणतोस. केव्हा स्नान केळेरे.

अर्चक : रात्रीं गोविंदाच्या घरास गेलों होतों तिसीं उपरि सुरत करितां तिच्या आंगास घाम आला. त्या घामानें माझें आंग असकें असकें भिजले. तेव्हांच स्नान जालें. आतां या हिवामध्यें कोण आंघोळि करितो. या नदीचे स्नाना परिस तें स्नान विशेष हें मनुष्य निर्माण हें ब्रह्मयाचें निर्माण त्या साटीं तेथेंच स्नान करून आलों.

सूत्रधार : बरें पूजा करिरे.

पूजा : ध्यायामि आळाहयामि आसनं समर्पयामि स्नानं समर्पयामि वस्त्रं गंधं अक्षता पुष्पाणि समर्पयामि. पुष्पानंतर शष्पं.

सूत्रधार : अरे मूर्खा शष्प म्हणिजे काय रे.

अर्चक : ठाऊकें नाही. शष्पं बाळ तृण घासं. म्हणून निघंटा मधें आहें की शष्पं म्हटळे तरि दूर्वाचे नाव. तुम्ही गणेशाळा दूर्वा वाहता कीं नाहीं मीं शष्पें वाहतों.

सूत्रधार : बरें जारे वेडचा. विघ्नेश्वराय नमः. नैवेद्य समर्पयामि. नैवेद्यं तिनेदि.

**सूत्रधार** : काय रे नैवेद्य खातोस.

**अर्चक** : मी देवाचा निज भक्त. देव केळे खातो काय नाही कीं त्यासाठीं देवास हात मला भात. त्या साठीं खातों ऐसें पार पत्य केले तरि आम्ही पूजा करीत नाही. आम्ही जाऊन पंतास सांगतो.

**सूत्रधार** : अरे असें झाळें तरि तुजवरि पार पत्त्य करीत नाही तू जारे. जयजय देव देवोत्तमा देवता सार्व भौमा. नृत्त गीत वाद्य मवधारय.

**अर्चक** : पूजा जाली आम्ही घरास जातों.

**सूत्रधार** : येणेरिती विघ्नेश्वर येऊन. सकळ विघ्ने निवारण करून गेल्यानंतर मृत्युंजय चिरंजीव नाटकांत प्रथम पात्र प्रवेश ऐसा जो मृकुंड महामुनीश्वर अपणास तप करायास उत्तम रम्य स्थळ पाहून या म्हणून शिष्यास पाठविले असतां या करितां येतो पाहा.

**(दरूऊ)** : (मातृका. कांबी राग. अटताळ)
विभूति आंगि लाऊन विभू शिव स्मरण करून ।।
शुभ्र रूद्राक्ष माळ धरून सुमति आळा हांसुन ।। १ ।।

**सूत्रधार** : ऐका हो भागवत हो आम्ही नाटच करितों ये रंग भूमीत हा कोण कीं मध्यें येऊन उभा राहिला हे. यास पुसा .

**प्रत्यु०** : अवश्य तैसेच पुसतो.

**सूत्रधार** : अरे अरे. तूं कोण रे.

**सुमति** : तूं कोण रे पुसायास.

**सूत्रधार** : अरे बाबा आम्ही नाटच करितों त्या स्थळास तूं कोण यायास या करितां पूसतों.

**सूमति** : मी मृगूंड महा मुनीश्वराचा शिष्य. माझे नाम सुमति. आमच्या गुरूने आपणास तप करायास उत्तम स्थळ पाहून या म्हणून पाठविले या करितांच मी आलों.

**सूत्रधार** : बरें बाबा तसेंच स्थळ पाहून जाऊन सांग.

**सूत्रधार** : येणेरिती मृकुंड महामुनीश्वयाचा शिष्य सुमति येऊन उत्तम स्थळ पाहोन मृगुंड महामुनीश्वरास जाऊन सांगीतले तें वर्तमान आयकोन मृकुंड महामुनीश्वर पत्नीस सह तपोवनास पहा.

**(दरूऊ)** : (मातृका. राग. अटताळ)
जटा मुगुट धरून जलजाक्षिसह मौनि अपन कटि व्याघ्र चर्म धरून
कमनीय मृकुंड आळा संतोषानें ।।
कमंडलु घेऊन करीं दंड धरून अमळ रुद्राक्ष माळा घालून
अखिळांगी विभूति लावून ।।

**सुमति** : स्वामी स्थळ पाहून आळों हें उत्तम स्थळ तप करायास. येथेच तप करा.

**सूत्रधार :** येणेरिती मृकुंड महामुनीश्वर पत्नी सहीत येऊन तपश्चर्या करीत असतां तदनंतर कथा ऐसीजे. मृकुंड महामुनीश्वराची बाइल मरूद्वतिने आपणास संतान नाही म्हणून मनांत क्लेश वाटून मृकुंड महामुनीश्वरास पाहून बोलते पहा.

(दरूऊ) ।। मातृका ।। रागं ।। आदि ताळ ।।

कांता जन्म कशास रोका स्वामी कांता जन्म कशास ।।
संतानाहिन जन्म व्यर्थ सतत पितु ऋण ग्रस्त । संताप पावते मानस कांता० ।।
मळलिप्त शरीराने ममतेने येऊन माते स्तन्य दे म्हणुन बळें पाठीवरि पडून बगलेतुन डोई घालुन बळें स्तन्य पान दिळहा वीन ।। १ ।।
क्षणभरि रांगते क्षणामध्ये अठकळते क्षणभरि रोदन करिते क्षण ।
ते खद खद हांसते । क्षण बोवडें बोळते । क्षण सांबाळुन खेळवितां ।। कांता ।। २ ।।
पाई घागऱ्या वाळे पदकें सरि वाघनखें गळां बाहु शेभे तोळबंद ताईत ।
डोईस मोतियाची टोपी ।। डोळां काजळा कानी कुडक्या वाळया ।
आई म्हणुन अळंकार न करितां ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती बोलोन मरूद्वतीनें अंतःकरणास परम क्लेश वाटताति म्हणुन न साहतां । मागतीं बोळते पहा.

(दरूऊ) ।। मातृका ।। मोसमायगदवे ।। रागं आहरि आदि ताळ ।।

असून फळ काय । स्त्रि पुरुष असूनि फळ काय ।।
असून फळ काय अवनीवरि ।। भासुर पुत्र असळ्यावांचुन ।।
सुमरहिता मालतिपरि शुकर वनापरी ।
कमळरहित सरोवरापरी कमळ वेरि रहित रावी परी ।। १ ।।
फळरहित वनरुहापरि प्राणरहित देहापरी जळरहित ।
वर नदीपरी ज्वाळ शोभित दीप रहित घरापरीं ।। २ ।।
घन मणिरहित हारा परिं । घन रहित जनापरि दिनकर रूचि
रहित दिवसा परि ।। दिव्य संतानरहित जगति वरि
असोन फळ काय ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती बोलिली मरूद्वतीचें वचन आयकोन मृकुंड महामुनी पत्नीसीं बोलतो पहा.

(दरूऊ) ।। मातृका ।। (ळेमातमामौवा गोपाळु) रागं अटताळ ।।

संतान रहित जन्म व्यर्थ म्हणुन त्वां म्हतळें ।
सत्य तें मानळें संताना परीस सतां नेऊन संतोष ।।
संतास फळ जन्मास सतत असे ।। तपोवन फिरळ्याचे फळ ।
धर्माचरणाचे फळ, महादान केळयाचें फळ, स्नान संध्या केळ्याचे फळ,

तनय असणे वेदाध्ययन करून विचित्र ज्ञान संपादून, विविध यज्ञ करून,
मोह देवता प्रार्थून योग साक्षात्कार पाहोन, मुख्य संतान पावनें ।।
चंद्र वदने ।। २ ।।

मरू० : ऐका स्वामी ये गोष्टीची तुम्हास चिंता आहे. मजही परम क्लेश वाटताति. यास काय उपाय करावा सांगा स्वामी.

सूत्रधार : येणेरिती मरूद्वतीचे वचन आयकोन मृकुंड महामुनीश्वर बोलतो पहा.

दरूऊ ।। मातृका ।। रागं ।। आदि ताळ ।।
शरण जाऊं शिवास तो संतान देइल आम्हास ।
ऐकें प्रिये । शरण जाऊं ।। धृ ।।
दिनदयपर करूणासागर । दिगंबर पुरहर गान ळोळ, शंकरा वाचून
अम्हास गति कोण आहे ऐकें ।। १ ।।
गंगाधर गिरिजार्ध शरीर गजचर्मांबरधर ।।
तुंग त्रिशळ डमरूधर धर्जटि त्रिनयन ऐकें ।।
नीळकंठ निर्मळ रूप । निखिळाति हर भवास बाळेंदु,
शेखर भाळ्ळोचन भव भय मोचन ऐकें प्रिये ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती स्त्री पुरुष बोळोन परमेश्वरास उद्देशून निर्मळांतः करणें तप करित असतां पहा. मृकुंड महामुनीश्वरूडु. आसमाळु पेट्टैदि. अंकुद शिष्यळु हास्यंचेसेदि.

सूत्रधार : येणेरिती मृकुंड महामुनीश्वर तप करित असतां त्याच्या तपास मानून श्रीपरमेश्वर संतोषेकुन वृषभवाहनारूढ होऊन मृकुंड महामुनीश्वरास वर द्यायास सांबशिव प्रत्यक्ष होऊन येतो पाहा.

श्लोक जटा मृकुंड मंडित कटिळसद्दिपेंद्राजिनं । प्रसन्न वदनांबुजं फण्फिणत्स्फुर मंडळं ।।
त्रिशूळ डमरू दृहं त्रिपुर दैत्य गर्वाहं । भजामि गिरिजा पति भय निवारणं शंकर।।

दरूऊ ।। मातृका ।। राग शंकर भरण ।। आदि ताळ ।।
शंकर आळा सभेस शंकर आळा । भव भय सकळ निवारी ।।
भव भुजंग कुंडळ धारी । शिव अति आनंदकरी ।।
सेवित जन अति सादरी ।। १ ।।
शरणांगतांचे भय हरी । शशिकळा जटेवरि ।।
कर शूळ डमरू धारी । काम गर्व अपहरि ।। २ ।।
आरूढ वृषभावरि । अगराग भस्म धारी ।।
कारूण्य निधि रूद्राक्षा धारी । कौतुकें त्रिपुरहरी ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वर प्रत्यक्ष जाळा त्यास पाहून मृकुंड महामुनीश्वर पत्नीसहित साष्टांग नमस्कार करून परमेश्वराचें स्तोत्र करिता पहा.

दरूऊ ।। मातृका ।। रागं आदि ताळं ।।
वंदितसे तुझे पायरे वर द्या वांछित मज दे कळचाणी मनोहरा वंदितसे ।। १ ।।

नाग भूषणनंदि वाहन नररुंडमाळधर ।। रुद्राक्ष माळधर भस्मळिप्त शरीर ।।
रुद्र त्रियंबक देव ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती मृकुंड नमस्कार केला तो पाहोन परमेश्वर संतोषेकुन बोलतो पहा.

परमेश्वर : आइक मृकुंड मुनी. तुझ्या तपास मानलों. प्रसन्न झालों असें काय मागतोस ते माग.

मृकुंड : श्रीसांबशिवा तुमचे दयेने सकळ श्रेय प्राप्ती आहे. राक पुत्र संतानाची इच्छा आहे. तेव्हडी दया केळियाने पितृ ऋणासून मुक्त होईन. संतान जनित सुख अनुभवायासी इच्छा आहे. तुमच्या दयेने इच्छा पूर्ति व्हावी.

मरू ।। : आइक मृकुंड मुनी. शंभर वर्षे आयुष्याचा मूढकुळ पांसन पाहिजे कीं, सोळा वर्षे आयुष्येचा सकळ विद्या पारंगत सकळ धर्म स्थापक कुळतिळक पाहिजे कीं हें सांग तोच देऊं.

मृकुंड : अवश्य स्वामी तसेंच पत्नीसीं विचार करून बोळतों.

सूत्रधार : येणेरिती मृकुंड महामुनि पत्नीसी कोणता पुत्र मागों म्हणून विचारते पहा.

दरूऊ ।। मातृका ।। राग ।। आदि ताळ ।।
तुज कोणता मागावा स्या सांग प्रीये ।
आतां शतायु अथवा षोडशायु सांग प्रिये ।।

मरू. : दरूऊ ।।
अचिरायु गुणवैत असळचा आम्हा नका स्वामी ।
अति चिरायु अगुण असळचां आम्हा माग ।।

मृकुंड : दरूऊ ।।
कुळपांसन सुत सहस्त्र असून काय प्रिये ।
कुळ तिळक एक असळचां भूषण आहे ।।

मरू : दरूऊ ।।
संतान झाळें तरि पुरे संतोष आम्हास स्वामी ।
सतत तुमचा विचार तुम्ही जाना ।।

सूत्रधार : येणेरिती स्त्री पुरुष विचार करून मृकुंड महामुनी श्रीपरमेश्वरांसी बोलतो पहा.

दरूऊ ।। मातृका ।। राग काबी अटताळ ।।
सत्पुत्र मज देवा । गुण संपन्न सुसीळ देवा ।।
वित्पन्न सज्जन मान्य देव वेद शास्त्र पुराण वेत्ता ।। १ ।।
शम दमादि गुणशीळ । सदा शैव भक्तैक ळोळ ।।
विमल सत्य वचनपाळ देवाह्य विश्वजन अनुकूळ ।। २ ।।
स्नान संध्या जप करी । सदा जननी जनक तापहारी ।।
दान धर्म आचारी । रोसा तनय दे मज त्रिपुरारी ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मृकुंडाचे वचन आयकोन सांब सदाशिव त्यावरि कृपा करून वर देतो पहा.

**दरूऊ ।। मातृका ।।　　राग काबी ।।　　आदि ताळ ।।**

देतों संतोषें तुज । मृकुंड देतों संतोषे तुज ।।
देतों संतोषें तुज दिनकर समतेज । भूत दया समाज ।।
भूवनैक वंद्य तनुज ।। १ ।।
कुळ पवित्र करी । गुरूजन संतोष करिसा ।।
फळ सद्‌वर्मा चरीसा । कुळ तिळक पुत्र रोसा देतों संतोषें ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीसांबसदाशिव मृकुंड मुनीस वर देऊन आपल्या निज आवाजास चाळिला पहा.

**दरूऊ ।। मातृका ।।　　राग ।।　　आदि ताळ ।।**

भक्त वत्सल सक्त चित्त । भक्तावरि दया करून ।।
भुवन भजाया चाळिला ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वर येऊन मृकुंड महामुनीश्वरास वर देऊन निज आवासास चाळिळ्यानंतर कथा ऐसी जें. परमेश्वराच्या वराचा प्रभाव. मरूद्वती गरोदर होऊन कष्टी होते पहा. हास्यं.

**मरू. :** अरे कोणरे सुमती. काय की कष्ट होताति. सुईणीला बोलाऊन घेऊन येरे.

**सुमती :** बरें बाई बोलावितों.

**सूत्रधार :** येणेरिती सुमतीनें सुइणीस बोळाविळे असतां. सुईण येते पहा.

**दरूऊ ।। मातृका ।।　　राग ।।　　आदि ताळ ।।**

बांकडे बोचरे दांत वाकित चाळत येते खोकित काठी हातीं खोळ बोळ बोळते ।।

**सुईण :** कोण रे आपा बरें आहे काय. तूं दोडयाचा लेक नव्हेस.

**सूत्रधार :** आवाजी तूं कौण मळा पुसतेस.

**सुईण :** अरे आपा. मी सुइण. मरूद्वती कोनी निघाला कारणें कष्टी होते म्हणून बोळाविलें कीं त्या कारणें आलें.

**सूत्रधार :** बरें मरूद्वतीकडे जा.

**सुईण :** काय गे मरूद्वती कसें वाटतें.

**मरू. :** अगें आई पोट दुखतें. बरें वाटत नाही.

**सुईण :** अरे सुमती. मरूद्वती फार कष्टी होते. प्रसूति काळ आहे. राख घेऊन ये. येरंडेल घेऊन ये. निंबाचा पाला घेऊन ये.

**सुमती :** अवघें आणिळें. सावधान पहा.

**सुईण :** अगे लेकरूं दिसतें अमाळशी कुंथ. उखळावर बैस. अमासी चाल. अमासी वोणवी हो म्हणिजे लेकरूं नीट येईल.

**मरू. :** अगे आई मी काय करूं गे. जीव कासाविस होतो.

सुईण : अगे स्या किती सांगीतलें की दादळया पासीं निजूं नको जरि त्या पासी नीजायास जातीनास्त तरि रोके कां होतें? बरें, आतां कुंथ, लेकरू बाहेर आले पुत्र/जाला मृकुंडमुनी तुम्हास पुत्र जाला.

मकुंड : सुमती परमेश्वर दयेने पुत्र जाळा पहा. साकर घेऊन येऊन वाटिरे. येणेरिती मृकुंड महामुनीश्वरास पुत्रोत्सव जाला असतां लेकरास घेऊन बाळांतीण येते पहा.

दरूऊ : (मातृका राग आदिताळ)

बाळ हाती घेऊन भाळि पटा बांधुन पाळा निंबाचा घेऊन बाळंतिण आली संतोषाने ॥१॥

हळदि सर्वान्गा लाऊन हरूषें रक्षा सर्वधून ॥
तिळक काजळ काळें ळेऊन ॥ देह ध्द धवळाळी वीडे घेऊन ॥ २ ॥
हिरवीं कांकणे लेऊन ॥ हिरवी साडि चोळि ळेऊन ॥
शिरसासटी देवीस वंदुन ॥ शीघ्र आळी नाम करणा कारणे ॥ ३ ॥

मृकुंड : अरे सुमती! परमेश्वराचे वर प्रभावाने पुत्र झाळा कीं नामकरण करायास आमचे पुरोहित काशीभट्टास बोळाऊन आणिरे.

सुमती : बरें स्वामी, आज्ञेप्रमाणे बोळाऊन आणितों.

सूत्रधार : येणेरिती मरूद्वती लेकरास घेऊन आळ्यानंतर लेंकरास नामकरण करायास मृकुंड ऋषीचें अज्ञेवरून सुमतीकुने जोशास बोळाविले असतां जोशी येतो पहा.

दरूऊ : (मातृका रागं आदिताळ)

पट्टे वर्द्धन लाऊन ॥ पंचांग घेऊन ॥
काठीं टेंकित बोचरा काशी पट्ट आळा लऊन ॥ १ ॥

जोसी : नमस्कार! उत्तरोत्तराभि वृद्धिरस्तु. काय हो मृकुंड महामुनी, तुम्हास पुत्र झाला काय? बरें त्यास वेळ कोण मुहूर्त काय हे सकळ असिकें पाहिजे सांगा.

मृकुंड : साइंकाळीं गोधूळि लग्नी. पुत्रोत्पत्ति जाळी.

काशी : परमेश्वराचे वर प्रसादें ळेकरू जाळें त्यास पहाणें काही ळागत नाहीं. बरेंच आहे! नामकरण मात्र करावें. तुमचें नांव मृकुंड कीं. त्याचें नाम मार्कंडेय ठेवावें.

सूत्रधार : (येणेरिती उपाध्या ऋषि संमते नामकरण केल्यानंतर मृकुंड मरूद्वती पुत्र सुख अन्डभवीत असतां दिन प्रतिदिन मार्कंडेयास जाउळोपनयनादि कर्म करून असतां तदनंतर कथा ऐसीजे). मार्कंडेयास पंधरा वर्षे होऊन सोळावं चालते म्हणौन मृकुंड मुनी मरूद्वती चिंतायुक्त होऊन तनयास घेऊन तपोवसास येताति पहा.

दरूऊ : (मातृका राग आदिताळ)

तनयास सवें घेऊन ॥ अनुपद चिंता करितां मुनी मृकुंड व्याकुळ मने वनितेसह येतो ॥

**सूत्रधार :** येणेरिती मृकुंड मरूद्वती मार्कंडेयास घेऊन तपोवनात येऊन, तनयास पाहून चिंताक्रांत होऊन असतां मरूद्वती देवीस उद्देशून बाळास रक्षी म्हणऊन बोलते पहा.

**दरूऊ :** (मातृका राग आदिताळ)
बाळास रक्षी तूं देवि शर्वाणी ।। सोळावें वर्ष चालतें जननी ।। १ ।।
काळ भय शीघ्र निवारी भवानी ।। काय करूं यास सांग नीलवेणी ।। २ ।।
भवजनित संताप दूरिकरी शंकरी बाळेंदु शेखरी गौरी ।। ३ ।।
अव माझ्या तनया लौकरि भुवनेश्वरी ।। अखंड आयुष्य दे ईश्वरी ।। ४ ।।
आयुरभिवृद्धि दे तनया आनंद वल्ली ।। अंतक भयहर मरकत वल्ली ।। ५ ।।
मायातील रूप पावशिवकाम वल्ली ।। मानसभय निवाअभिराम वल्ली ।। ६ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मरुद्वती बोळतां आयकोन मृकुंड महामुनी बाळास रक्षी म्हणून परमेश्वराचें स्मरण करून बोळतो पहा.

**दरूऊ :** (मातृका राग अटताळ)
सुत संरक्षण करिं झडकरि चंद्रशेखरा
क्षण सुत न पाहतां राहवेना मजकून सांबशिवा ।। १ ।।
सोळावें वर्ष सपीप उरळें नीळकंठधरा ।।
आता बाळा शतायु दे तूं लौकरि त्रिपुरांतका ।। २ ।।
सतत विचार व्याकुळ मन माझें पार्वतीशा
सांगा सत्वर विचार यास मज भाललोचना ।। ३ ।।
तुजविण गति अन्यत्र नाही नागभूषणा
देवा मज या संकटा पासून सोडवी देव देवा ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मृकुंड मरूद्वती पार्वती परमेश्वरास उद्देशून बोलिल्यानंतर मरूद्वती चिंता न साहतां सकळ जनास पाहोन बोलते पहा.

**दरूऊ :** (मातृका राग आहरी अट ताळ)
काय करूं किति मी धीर धरूं आता ।।
सांगा बाई काम सुंदर सुता सोळावें वर्ष चालतें आतां ।। १ ।।
संतान नसतां सकळ जनास एक दुःख असतां संतान होऊन विछित झाली ते ।।
दुःख न कोणास ।। २ ।।
कोण सत्वरि येऊन रक्षिल माझ्या बाळास ।।
कोण माझा संताप हारिल सकळ जनांत ।। ३ ।।
न कळता आम्ही तुला सांबशिवा उगाच नको आतां तें दुःख आम्हास
अनुभववेना कोण तऱ्हीचा विचार कांही सांगा आम्हा लौकरि कोणता ।।
वो उपाव यास करूनि आता ।।५।।

**सूत्रधार :** येणेरिती मृकुंड मरूद्वती चिंताक्रांत होऊन तनयास पाहोन बोलताति पहा.

दरूऊ : (मातृका राग आदिताळ)
तुज सारिखा निधि कधीं पाहों ।। आम्ही हतभाग्य ।।
तुज सारिखा निधि कधी पाहों ।।
भजतोस आम्हास निशिदिन बहु भक्तीकुने बाळ तुजसारिखा ।। धृ ।।

मृकुंड : (दरूऊ)
वेद शास्त्र मग मी कोणास सांगू ।। आईक बाळा ।।
विविध विद्या कोणास मी सांगू ।। आईक बाळा ।।
मोह योगाभ्यास जप मुदु मुदु मी कोणास सांगो ।।
कोण मज माते म्हणुन पाचारील ।। आईक बाळा ।।
कोण आम्हा वृद्धांची सेवा करील ? आई बाळा ।।
कोण निज गुणे संतोष करील ?
कोण आमुचे तापत्रय हारिल ? तुज सारिखें ।। ३ ।।

सूत्रणार : येणेरिती माता पिता चिंताक्रांत होऊन आपणास पाहून बोलतातिं, क्लेश पावतातिं, हे पाहोन मार्कंडेय मातापित्यासी बोलतो पहा.

दरूऊ : (मातृका राग ताळ) (पाळ जळधि लोपल).
मंचघातमृत्यु इतका विचार हेतु काय ।।
इतुकें का मुख तुमचें म्लान आहे ।।
इतके दिस नाही तो विचार काये ।।
सांग माये बापा सांग माये ।। १ ।।
मजकडे पाहोन कष्टि कां होता ।।
माझा काय अन्याय सांगा तो आतां ।।
माझे मी प्रायश्चित्त करीन आतां ।।
माझे माता पिता माझी माता ।।

सूत्रधार : येणेरिती मार्कंडेयाचे वचन आयकोन माता पिता अंतःकरणी क्लेश पावोन बोलतातिं पहा.

दरूऊ : (मातृका रागं आदिताळ)
बाळा तुझा अन्याय काय बहु आमुचा अन्याय ।।
नीललोहितास आम्ही निश्चित चिरंजीव पुत्र नाही मागितला
वेदांत इवान पावोन विद्या तुझी पाहोन ।। सादर सद्‌गुण पाहोन ।।
सहृदयेने मोद तुज खेळत पाहून ।। खेद पावतें अंतःकरण ।।
आदि देवदत्त आऊर्दाय पाहोन ।। अंतःकरण चंचळ होतें ।।

सूत्रधार : येणेरिती गुरूजन बोलणे आयकोन मार्कंडेय बोलतो पहा.

दरूऊ : (मातृका (आशेकोडांदं उन्मेलाशे०) रागं आदिताळ)
चिंता कशास तुम्हां चिंता कशास ।। चिंता कशास तुम्हा ।।
चित्तीं संतोषें असा ।। तुम्हास जो प्रसन्न जाला तो मज विसरेळ काय ।।
ब्रह्मेंद्र वंदित शिव बाळा ।। विसरेल काय ।। १ ।।

एकाच्या अदृष्टास एक धणी आहे काय ।।
पाकशासनादि वंद्य परमेश्वर मज साह्य आहे ।। २ ।।
शिवपूजा करीन ।। शिव मंत्र जपेन ।।
शिव ध्यान सदा करीन ।। शिव मज कल्याण करील ।। ३ ।।
काळाचें मज भय काय ।। काळ म्हणताति कोठें आहे ।।
काळकंठ महेश माझे कामित कुळदैवत आहे ।।

**माक.** : आयका माय बापा हो. तुम्ही कशास चिंता करिता! तुम्हास जो प्रसन्न जाला त्यास मी प्रसन्न करीन. त्यापासून आयुरभिवृद्धि मागोन घेईन. तुमची आज्ञा जाळिल्यानें शिवदर्शनास जातों.

**मृकुंड** : दीर्घायुष्यमस्तु! बरें शिवदर्शनास जाऊन ये.

**सूत्रधार** : येणेरिती मार्कंडेय माता पित्याची आज्ञा घेऊन शिवदर्शनास येतो पहा.

दरूऊ : (मातृका रागं आदि ताळ)
इंदुशेखळ पादारविंद पूजा करायाला ।।
मद याने मुनि मृकुंड नंदन आनंद युक्त चालिला ।।

**सूत्रधार** : येणेरिती मार्कंडेय शिवस्थळ सेवनास जातां आधी काशीस येऊन विश्वेश्वराचे स्तोत्र करितो पहा.

दरूऊ : (मातृका रागं अटताळ)
वासवादि निर्जरार्चित देव देव ।। काशि विश्वेश पाहिमा ।। १ ।।
वेद प्रतीपाद्य शंकरा पुरहर केदारेश पाहि पाहि मा ।। २ ।।
कुंभसंभवादि पूजिता ।। भोंसळ नाथ शंभु महादेव पाहिमां ।। ३ ।।
अंबिका नाथ राकेश ।। नाशिक त्रियंबककेश पाहि पाहिमां ।। ४ ।।
काळकूटभयनिवारण पार्वतीश ।। काळ हस्तीश पाहिमां ।। ५ ।।
लोकनाथ चंद्रशेखर ।। देव देव येकांनाथ ।। ६ ।।
करूणाकर कामित फलदा भूतेश अरुणाचळेश पाहिमां ।। ७ ।।
अंबर केश शिक्कामि रमणा ।। आर्तिहर चिदंबरेश पाहि पाहिमां ।। ८ ।।
ब्रह्मादि देव सेविता बटुक नाथ ।। ब्रह्म पूरीश पाहिमां ।। ९ ।।
देव मुनीगणनि सेविता पशुपतीश ।। देव श्वेतवनेश पाहिमां ।। १० ।।
हृद्य जनित रोग मोचना ।। भवतरण वैद्यलिंग पाहि पाहिमां ।। ११ ।।
काय क्लेश सकळ मोचना कामहरण मयूरनाथ पाहि० ।। १२ ।।
मध्य आद्य अंतरहित ।। नीळ लोहित मध्यार्जुनेशा पाहि० ।। १३ ।।
जंभारि वरदायका कृतिवास कुंभेश उमेश पाहि पाहिमां ।। १४ ।।
पंचवक्र पापमोचना विष्णु वल्लभ पंचनदीश पाहिमां ।। १५ ।।
कंजलोचन पूजिता ।। आनंदवल्लीश तंजपूरी पाहिमां ।। १६ ।।
गुह गणेश चरित्र मोहिता ।। दीन दयाळ बृहतीश पाहि पाहिमां ।। १७ ।।
शबरारि दर्प भंजना उमारमण जंबुळिका पाहि पाहिमां ।। १८ ।।
गोत्रारि संसेविता विश्वनाथ मातृभूतेश पाहिमां ।। १९ ।।

किंकर आर्तिहरणा शर्वाणी रमण शंकर नारायण पाहिमां ।। २० ।।
वर्द्धिता धर्म सकळ विरूपाक्ष अर्द्धनारीश पाहिमां ।। २१ ।।
इंदु कळे जटा शोभिता मीनाक्षिनाथ सुंदरेश पाहि० ।। २२ ।।
राम पूजित पाद पंकजा ।। वामदेव रामलिंग नाथ पाहिमां ।। २३ ।।
भेदाभेद रहिता आदि देववेदनेश पाहिमां ।। २४ ।।
भोंसळ शाहेंद्र दैवता भोगि भूषईश त्यागेश पाहिमां ।। २५ ।।
विमर्दितारिसमूहा गंगाधर अमृत घटेश पाहिमां ।। २६ ।।

सूत्रधार : येणेरिती मार्कंडेय सकळ देव स्थळ सेऊन, भक्तीने येकांत करणें अमृत घटेश्वराची पूजा करितो पहा.

दरूऊ : (मातृका राग संकराभरण त्रिपुट ताळ)
पावें शिव मज तूं ।। येक्षणी पाव शिव मज तूं ।।
बाळ मी मजला बाळेंदुशेखरा ।। पाळि तूं पर्वतबालिके नायका ।। १ ।।
करूणा सागर कमनीय गंगाधर ।। कामितफळदीश्वर कंदर्प दर्प हरी ।। २ ।।
शरण आलों तुज शमिव भय माझें शशिजटा विराजे ।।
शंकर सत्वर राजे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती मार्कंडेय परमेश्वराची पूजा करून पंचाक्षर जप करून शिव स्तोत्र शिव ध्यान शिवैक निष्ठ होऊन असतां अनेक दिवस झाल्यानंतर कथा संविधान ऐसीजे. चित्रगुप्ताने मार्कंडेयास सोळा वर्षे झाली म्हणून यम धर्मराजास सांगितलें, तें आयकोन यम किंकरास आज्ञा केली कीं मार्कन्डेयास घेऊन ये. म्हणऊन यम किंकर मार्कंन्डेयास घेऊन जायास येताति पहा.

दरूऊ : (मातृका राग आदि ताळ)
काळि आंगसारी ।। काळें वस्त्र धारीं ।।
काळें विकृत स्वरूप ।। करीं पाशधारी ।।
अट्टहास करिती अखिल जन भेडसाविति ।।
भट्ट यमाचे धांवती ।। बहु वेगें येताति ।।

यमकिंकर : अरे अकटा, अरे विकटा, अरे शकटा, अरे मर्कटा! मार्कन्डेय कोठे रे? ह हां हां हूं अरे हे गेरे, मार्कन्डेय अरे इकडे येरे.

सूत्रधार : येणेरिती मयकिंकर. अरे मार्कन्टेया तुझें आयु प्रमाण जाळें. यम धर्म राजें तुजला घेऊन या म्हणऊन आम्हां पाठविलें आहे. तूं चाल आम्हा बराबरी.

मार्कन्डेय : आयकारे यम किंकर हो! मी शिव भक्त. तुम्ही मला शिवायास अधिकार नाही. तुम्हास तुझ्या यमास गांडगुडगे देऊन वाटे लावितील. छी जारे.

सूत्रधार : येणेरिती मार्कन्डेयाची शिवपूजा सामर्थ्यापुढें तपोबळापुढें समीप न जातां आपणांत आपण यम किंकर बोलताति पहा.

दरूऊ : मातृका ।। राग घंटाख ।। झंपे ताळ ।।
जवळियाचे जावेना ।। ज्वळन परि तावितो जवळियाचे कैसे जावें विकटा ।।
जवळि याचे कैसें जावें ।। १ ।। आणिक येकाचे वचन ।।

दरूऊ : पाश हातिचे गळताति ।। प्राण थरथरां कांपताति ।।
पाशे कैसे आम्ही घाळावे अकटा ।। पाशे कैसे आम्ही घाळावे ।। २ ।।
आणिक येकाचा

दरूऊ : कधी रोसें नाही पाहिले ।। कोवून हें विपरीत आळें ।।
काळ कूटा सारिखें बाळ शकटा ।। काळकूटा सारिखें बाळ ।। ३ ।।
आणिक येक

दरूऊ : पळान आम्ही जाऊं ।। प्रकट यमास सांगो ।।
पळतां पुरे झाळें म्हणुन मर्कटा पळतांपुरे झाळें ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती यम किंकरास मर्कन्डेया समीप न जातां भीऊन परतुन यमापासीं जाऊन वृत्तांत सांगता यम आयकोन कोंप क्रांत होऊन मार्कन्डेयास नेयास आग्रहेंकुन यम येतो पहा.

दरूऊ : मातृका ।। राग ।। अटताळ ।।
यम येतो पहा ।। वैवस्वत यम येतो पहा ।।
काळरूपेंकुन करीं दंडा धरून ।। काळ मेघपरिं गर्जून ।।
काळ पाश घेऊन काळें वस्त्र ळेऊन ।। काळ महिषारूढ होऊन यम येतो पहा.

यम : अरे शकटा. अरे विकटा. हा बाळ मार्कन्डेय कोठे रे.

किंकर : स्वामी हे गे बसळा आहें. तो गे तोच मार्कन्डेय.

सूत्रधार : येणेरिती यम येऊन निश्चित जप करित बसळा असतां त्या मार्कन्डेयास पाहून यम बोळतो पहा.

दरूऊ : मातृका ।। राग ।। अटताळ ।।
नये म्हणतोस नये म्हणतोस नये म्हणतोस म्हणिजे काय भय माझे न मानितां बहु धीटपण आहे ।। धृ ।।
डोळे झांकुन पुटपुट करितोस ।। डोंगरा सारिखा अचळ बसतोस ।।
काळ मी मज नेणेस काळकंठ पूजीतोस ।। नये म्हणतोस ।। १ ।।
कित्ती स्नान केल्याने किती संध्या केळचाने किती ध्यान केळचाने किती लपसिळ मज पुढें ।। २ ।।
मज पाशास अगोचर काय ।। माझी आज्ञा मोडित कोण आहे ।।
मज पुढें पळसि म्हणिजे काय ।। मज दाढेस पारणे तूं आहेस ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती यमाचे वचन आयकोन मार्कन्डेय धिक्कारून यमासीं बोळतो पहा.

दरूऊ : मातृका ।। रागं अटताळ ।।
मज कोणाचे भय काये ।। मज स्वामि शिव आहे ।।
तुज इतुका गर्व काय ।। तूं मूळा परता जाये ।। १ ।।
तुझें मुख पाहोनये ।। तुजसीं बोळणे काय ।।

तुझ्या स्पर्शी स्नान आहे ।। तूं चंडाळा येथूनि जायें ।।२ ।।
शिव पूजा मी करितों शिव ध्यान मी करितों ।।
शिव स्तोत्र मी पढतों ।। शिव शिवा तूं येथें का आळास ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती मार्कन्डेयाचे वचन आयकोन यम कोप क्रांत होऊन बोकतो पहा.

दरूऊ : मातृका ।। राग ।। आदिताळ ।।

सकळ विश्व मज भीत आहे पोरा ।
सहसा मज न भीतां बोळतोस काय ।। १ ।।

**मार्कन्डेय** : विश्वातीताची दया मजवरि आहे ।।
जाय वेडझंवी तुझ्याने माझें होणें काय ।। २ ।।

**यमद०** : मज पूढें गर्व तूं मागती बोळतोस काय ।।
क्षणाते माझे दाढे तुज रगडूं काय ।। ३ ।।

**मार्कन्डेय** : दाढा तूझ्या माझा स्वामि पाडिल पाहे ।।
आतां दर्प तूं करूनको उगळा जायें ।। ४ ।।

**यमद०** : कां मुनि पोरा इतुका मातळास आतां काळदंड तुजळा मारितसें ।। ५ ।।

**मार्कन्डेय** : मज मारणार ऐसा कोण आहे सदा मज रक्षित सांबशिव पाहे ।। ६ ।।

**सूत्रधार** : येणेरीती मार्कन्डेयाचे वचन आयकोन यमास क्रोध उठून हाती पाश घेऊन आतां तुळा मारितों म्हणतां. मार्कन्डेय भीऊन ळिगास कवंटाळून धरिळें तें पाहून यम बोळतो पहा.

दरूऊ : मातृका ।। राग ।। अटता ।।

कोणाच्या पाठिसीं पडसीळ आतां ।। कोठे तूं पळसीळ ।।
कोण तुज मज पासून सोडवीळ ।। कोण तुज पाठिसीं घाळूं पहातो ।। १ ।।
सांह्य तुज जो करीळ आतां सहज मी त्यास धरीन ।।
बाहुबळ प्रकट करीन ।। बहुधा पाशें एका दोघांस धरीन ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीती बोळोन यमाने मार्कन्डेयास लिंगास एकसमयावच्छेदें पाश घाळून वोढित असतां परमेश्वरास पाहून मार्कन्डेय बोळतो पहा.

दरूऊ : मातृका ।। जीवणूना ।। रागं आदिताळ ।।

शिव शिव पाव शिवा पाव शिवा पाव ।।
हर हर हर हर शिव शिवा पाव ।। धृ ।।
माता तूं मज पिता तूं देव देव भ्राता तूं गुरू तूं दाता तूं ।। १ ।।
मज बाधा होइल ते माझी मी सोसिन देवा ।।
तुज बाधा कशास मज करितां ।। २ ।।
अभय मज देऊन अंतक संव्हार आतां देवा शुभ दया प्रकट करि ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती मार्कन्डेयाचा प्रताप आयकोन यम अमर्यादा करितो ते पाहोन मार्कन्डेयास रक्षावयास यमास सिक्षायास श्रीसांबशिव लिंगातून प्रकट होतो पहा (अदरूकेम्दु काल्येदि).

संफुल्ल शतपत्रजात्रा नेत्रा ।। संपूर्ण चंद्रमंडल
समानवक्ता नवपद्म कोश कंदुक करि कुंभगिरीवर ।।
समान ।। लसमानवक्षोज गुगळा शंबर पुकर घृतकंबु
सुंदर गळा अरूण पल्लवा धरा ।। काटीजितव
सुंधरा नीलाभ्रानीभवेणि कोकीलवाणी
सकल सद्‌गुण सौंदर्य भाग्या ।। तुज योग्या ।।
तिचे सौंदर्यातिशय काय वर्णू मी काय वर्णू ।।

**सूत्रधार :** येणेरीती दनर्मसखाचे वचन ऐकून दुष्यंत राजा पंचबाणवश्य होवून शकुंतला जवळी येतो पाहा.

(सौराष्ट्र. आदि)

वीर हा भारकडूनि विवश चित्त होवूनि
दुष्यंत नृप शिरोमणी ।।
येतो शकुंतला यिच्छून ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंत महाराजा येतो पाहूनि, लाजूनि शकुंतला कन्या वृक्ष आसरा घेवून असता तीचे मन कळून दुष्यंत महाराजासी राजोपचार करून सखीजन बोलतो पाहा.

(पंतुवराळी. आदि)

**सखीजन :** सुदिन झाले आजी कल्याण झाले ।।
नृपशिखामणी तुज पाहता (आल्पाला)? ।। १ ।।
भानुबिंब पाहुनि पद्मिनीस परि ।।
चंद्रबिंब पाहूनी कुमुदिनीस परि ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरीती सखी वचन ऐकून विदुषक बोलतो पाहा.

**विदूषक : चूर्णिका :** ऐका सखीजना हो महाराज दुष्यंत शकुंतला काया मिळाल्याने हे वधूवर संतोषूनें कोंदणरत्नापरि, चंद्र चंद्रिके परि, डवुण महेश्वरापरि, लक्ष्मीनारायण परि, वाणी हिरण्यगर्भापरि, शशी पुरंदरापरि, सीता रामचंद्रापरि, रुक्मिणी कृष्णदेवापरि, रती मन्मथापरि, सतत संतान सौभाग्य साम्राज्यादी सौख्य अनुभवित असतील.

**स. व. :** तुझे कल्याण वचन हे वाङनिश्चया निश्चये.

**सूत्रधार :** येणेरीती बोलून सखीजन शकुंतले प्रति बोलता पाहा.

(शापु चिलुका)

**सखीजन :** ऐके बायि शकुंतले, झाले तुझे मनोरथ सफले ।।
आजी दैव अनूकूलें, झाले अम्हा संतोष झालें ।। १ ।।
दुष्यंत तुला योग्य ।। तूं दुष्यंत राजासि योग्य ।।
वरिल्या या नृपतीसें ।। तुं आनंद होयील आम्हासी ।।

**सूत्रधार :** येणेरीती सखिजन वदून पुष्पापचय व्याजे सखीजन निघाले. विदूषकही भोजन व्याजी निघाला. त्या समयीं वुभयतां येकांतां असतां दुष्यंतमहाराज शंकुतलेप्रति बोलतो पहा.

[आहारी कडुंक. आदि]

**दुष्यंत :** लाजतेससी मज पाहूनि कमलानयनी ।।
मुख माझे चंद्रबिंबा हे । तुज नेत्र चकोर हे ।।
मधुराधरा सुधा मज दे । ममतेने आलिंगना दे ।।
तुजला वश्य होयिने । तुज वचन मी ऐकीन ।। ३ ।।
मजशी मिळूनी राहे । उचित गांधर्वा विवाहे ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंताचे वचन ऐकन शकुंतला लज्जावती होवून बोलते पाहा.

[मोहन शापु सवती कोलचुड]

**शकुंतला :** जनपाल तूं मज वचन ऐकिल्यानें अनुमान नाहि ।।
तुज वश्य होयीन । दुष्यंत ऐकतो मानीनी तुज
शुभ वचने, अनुमान न करी मज पाणीग्रहणें ।। १ ।।
मज तनयासी तू राज्य दिल्यानें
संतोषाने मी तुजसी रूचेन ।।
दुष्यंत सरस मुद्रिका गेता करी ।।
तूं शकुंतले मज दया करी ।।
सरस गंधर्व कल्याण करूनी
मजसी मिला तुम्ही नृप शीरोमणी ।।२ ।।

**दुष्यंत :** मदन लीला करूनी मदवति लौकरी ।।
आजी सुदिन झाला ऐका तूं नारी ।। ३।।

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंत महाराजा शकुंतले मुद्रिका देवून गंधर्वविवाह करून घेऊन सपरिवार पटट्णासी गेल्यानंतरे. तदनंतर कथा संविधान ऐसोजे. शकुंतला गरवार होवून येते पाहा.

(आदि)

हंस गमन चालती ।। पूर्ण चंद्र सारिखे मुखे शोभती ।।
कुचकुंभ येगादि सती मधुप युक्त ।। नव पद्म कोश रीती ।।
तनु शोभे घागे कडूनि ।। कोकिलवाणी नाजूक वस्त्र लेवूनि ।। १ ।।

येणेरीती शकुंतला आल्यानंतर प्रसव समया सूयिणिसि बलावू म्हणतो. सूयिण येते पाहा.

लेकरे कडे घेऊनि । निंबाचे ढाळा घेवूनि
काठी हाती घेवुनि । आली सुयीणि धावूनी ।। १।।

येणेरीती शकुंतलेसी पूत्त झाल्यानंतर लग्न पहायासी जोशास बोलावू म्हणता रंग जोशी येतो पाहा.

पट्टे काठी हाती घेऊनि। कपाली गंध लावूनी ।।
पंचाग हाती घेवुनी ।। आला सुबब जोशी संतोषुनि ।।

येणेरीती जोशी येवुनि जातक पाहिल्यानंतर पुत्त घेऊन बाळंतीनी काश्यपमुनिजवळि येतो पाहा.

बाळ हाती घेवुनि क्षीर भरितस्तनी हिरवी चोळी
साडी नेसुनी येते पाहा ।। बाळंतीनी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती शकुंतलानंतर काश्यपमुनि ज्ञानदृष्टीने सकल वृत्तांत समजवून शकुंतलेसी पाहून बोलतो पाहा.

**काश्यापमुनि : श्लोक :** शूरस्य सल्य संचस्य दुष्यंतस्य यशस्विनः ।। १ ।।
भार्या देव कृपया धन्यात्व हि शकुंतले ।। २।।

ऐक शकुंतले दैवेछेने दुष्यंत महाराज तुझा पुरुष झाला. पुत्रही तूं पुजला. अम्हांसी आनंद झाला. पुत्र घेऊन पतीकडे जाऊन सौभाग्यवती होवून सकल साम्राज्यसुख अनुभवविता पतीचे सेवा करित सुखरुपी ऐस, म्हणुन आशिर्वाद करून जातक करून, सर्वदमन म्हणून नामकरण करून पाच वर्षे झाल्यानंतर पुत्रासहित शकुंतला दुष्यंत महाराजाजवळि येते पाहा.

**दरू :** [ गीट्टी. आदि ]
सत्पुत्र संग घेवूनि संतोषाचीत्ती होवुनि
आपले पतीस यीच्छूनी आली भामीनी ।।

**सूत्रधार :** येणेरीती शकुंतलासहित सर्वदमन शकुंतलेसी पाठविता तीस आणून शिष्याने दुष्यंत महाराजासी पाहून बोलतात पाहा.

**शिष्य : श्लोक :** बालोये पुत्र भार्ययंतो शकुंतला राजन
रक्षसूभार्यी मागता काश्यपाज्ञा या ।।

येणेरीती शकुंतलेसी पोचून शिष्य निज आश्रमासि चालिले. तद्नंतर दुष्यंत महाराज अद्भूत पाहून शकुंतलेसी पाहून बोलतो पाहा.

(पंतु वराळि)

**दुष्यंत :** कोण तूं सांग ।। मधु करकेशि कोकिलवाणी ।।
तुज का निमित्त कोठूनी आलेसी कमललोचनी
कधी न पाहीले ।। पति कोण सांग बालेदुपले ।।

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंत राजाचे वचन ऐकून लज्जेकडून नम्र मुखी होवूनी शकुंतला भामिनी बोलते पाहा.

**शकूंतला :** मी लागेत नीलांबरी ।। अदएक हो महाराज काय
सांगू मी तुं हे सर्वज्ञ होवूनि पुसता तुं कोण म्हणूनी ।।

कार्या बांधावराज। म्हणताते गोष्टीसहज विसरला
तुम्हीं काजें ।। साक्षीयांसी रीती राज ।।
हरिण पाठी लागूनी । तु मी आश्रमा येवुनि ।।
भरवसा मज देवुनि । रमला कीं नृपमणि ।। २ ।।
तूंच माझा पति मीच तुझी युवती
तुजविन ना मज जगती नाही रे वेगळी ती ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरीती शकुंतलेचे वचन ऐकून दुष्यंत राजा बोलतो पाहा.

**दुष्यंत :** ऐके सुंदरी धनेचा असल्याने धनिकापाशी जा. कामेच्छा असल्याने कामुकापाशीच जा. चंद्र-सूर्य, वंशराजे परस्त्री परधन आशा करिना. वुगा जागे.

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंत राजाचे वचन ऐकून शकुंतला बोलते पाहा.

(चंटा रव)

**शकुंतला :** आदीसत्य सोडूनि नये ।। दुष्यंत राजा
सत्याकडूनी की सकल कल्याण विजय
आता तु मी मज सोडील्या ने ।।
मी तुम्हां सोडिना ।। मी तुमची मुद्रा
पाहुनि करी दया नीती कळूनि ।।

**सूत्रधार :** येणेरीती दुष्यंत महाराज शकुंतला परस्पर विवाद करीत असता अकस्मात नारद येतो पहा.

( मोहनं शापु )

नारायण हरी नारायण हरि म्हणता
महती वीण वाजवीत आला ।। नारद मुनि गाता ।।

**सूत्रधार :** येणेरीती नारद येवून दुष्यंतसी आशिर्वाद करून बोलतो पाहा. ऐक दुष्यंत महाराजा, महा पतिव्रता परम पावनी आली नील कुंतला, शकुंतला हे तुज भार्या, हा बालक तुझा पुत्र. या अर्थी संशय नाही. अंगीकार करा हो.

येणे रिती नारद वदतां महामुनि दर्शन प्रभावेकडून पूर्वस्मरण येवून दुष्यंत बोलतो पहा.

**दुष्यंत :** ऐका नारदमुनि चंद्रा अप्रत्यक्ष झाली गोष्टी अंगिकारिल्या या बालकासी जनासी तथ्य वाढेन या करीता परिहार केला. इतक्यावरि तुंचे वचन प्रमाणे वर्तूस्वामी.

**नारद :** अनुपम रूपवति गंधर्व कन्या अनुकूल करून आणिली सुकन्ये सी बाळासी विवाह करुनी सुखी असा हो.

सूत्रधार : येणेरीती नारद दुष्यंत महाराजा अंगीकार करून शकुंतलास अंतःपुरासी पाठवून सर्वदमन कुमारासी नामकरण वुपनयनादिक करायासाठी पुरोहितासी बलावा म्हणता पुरोहित येतो पाहा.

( दरूवु । आदि )

वेदशास्त्र पुराण वेत्ता पुरोहित आला
अतित्वरित आखिला शिष्यसहीत ।।

सूत्रधार : येणेरीती पुरोहित आल्यानंतर दुष्यंत महाराज पुत्रास भरत म्हणून नाम ठेवून वुपनयनादीक करून पुत्रास विवाह कराया कारणें गंधर्वकन्या सुकन्यासी बलाविता सुकन्या येते पाहा.

आदीबाला ।। येते सुकन्या पाहा ।। सौदर्यगेह ।
हेमसमान देहा । राजहंस गामिनी ।।
कोकील वाणी राजीवदल नयन ।।

येणेरीती सुकन्या आल्यानंतर कनक दळी स्थंभा नारी केळ नवपल्लव तोरणाकंचित्तविता न सकलजन बांधव समेत कल्याण मंटपी, नवरत्न पीठीं वधूवरासी बसवूनि विवाह करिते त्या समयीं. शोभे न गान कराया साठी सुवासिनी जनास बलावितां सुवासिनीजन येतात पाहा.

( सौराष्ट्र आदि )

चोळी लुगडे नेसूनि कपाळी कुंकू लावूनी
बगल्या लेकरूं घेवुनि । आल्या सुवासिन्या मिळूनि ।।

येणेरीती सुवासिनी जन आल्यानंतर भरत सुकन्यावि महोत्सव समयीं गंधर्व मंगल गातात पाहा.

( आदि चतुरासी )

भरत सुकन्येसी सतत सद्गुरुप सदनासी सरसीज लोचनासी ।।
शोभने नित्य दीपाबा तनया सी मंगळं ।
सज्जन धरासि सुंदर रूपवतासि येकेंन्द विनुतासि मंगळं ।।
दुष्ट जन निग्रहासि शिष्ठजन
पालकासि महनीय चरितासि मंगळं ।। २ ।।
भोसल कुलजासि ।। भोग देवेंद्रासि चोळ भूपालासि ।।

इतिश्री महभोसल कुल कुलशा बोधी सुधाकर तुळज महाराजन प्रिय नंदनंदन श्रीमर्दकम महाराज पुरंदरेण प्रियसेवकेन श्रीगिरीजा शारदा- बा कटाक्ष लब्घ चतुर्विद्य कविता निर्वाहकेन विरचितं शाकुंतलं नाम नाटकमिदं सतत संतान सौभाग्यरोग्यायुष्याभिवृद्धी विजय सकल साम्रांज्य लाभपुत्रपौत्राभि वृद्धि शौर्य धैर्यगांभीर्य सत्कीर्ति भाग्य- समुदयमेकेन्द्र तुळजेन्द्रयोर्ददातु पश्यताः श्रुण्वतांच ।

## २. तुळजेन्द्र राजेकृत कमला बात्यागेश नाटक

श्री त्यागराज कमलांबा परिणय नाटक ।।
त्यागेश्वरास घेवून त्यास्थळीं प्रतिष्ठा कराहो ।।

सूत्रधार : येणेरीती इंद्राचे वचन ऐकून मुचुकुंद पुरंदराचे आज्ञावरून सोमस्कंदास घेवूनि कमलापुरास येतो पहा.

दरु० : [केदार गौळ आदि]

इन्द्रास मुचुकुंद येतो पहा सफुल्ल हल्लीक परिसळ कर्पूर मिळीत तरूणींदुचूडामणी त्यागराजास घेऊनि. ।।

सूत्रधार : येणेरीती मुकूंद येऊनि शुभ लग्न पाहूनि त्यागेश्वर प्रतिष्ठा केल्यानंतरे त्यागेश्वर दर्शनासाठी कमलांबा येते पाहा.

दरु० : [आहरी ।। आदि]

कमलांबा आली जननी कमल नयनी
कमलदळ नयनी त्यागेश दर्शन यिछूनि
संतोषे हंसे गामिनी ।। १ ।।
मधूर कोकिलवाणी ।। मधुपसन्निभवेणि ।।
भोसल कुल पोषिणी ।। श्याम नित्य कल्याणी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती कमलांबा येऊन सोमस्कंदपादारविंदी वंदन करूनिस्तोत्र करिते पाहा.

द्वि० : जय भक्त मंदार जयशुभाकार ।। जयजगदाधार
फणीहार शंकरपरमेश ।। चंद्रावतं सपंकज
भवनतु पाही त्यागेश ।। शरणगतत्राण
शैलजा रमणा करीदया मजवरी धनत्यागराज ।।
कमलांबेची भक्ती पाहून त्यागेश्वर वर्नितो पाहा.

सूत्रधार : येणे रिती स्तोत्र करिता किती चतुरवंती हे पहा अभी.
हृदयकमलामध्ये माझा भवती इच्छिति ।।
सरसधनस्तन गजकुंभ सारिखे स्वरस अधर
बिंब अमृत सारिखे ।। सरस बोलणे तीचे
सकळमत्त सारिखे सरस स्वरुप तिचे पार्वतीसारिखे ।। १ ।।

दरु० : (कांबोदि. आदि)

कमलांबा त्यागेशा से मंगळ नित्य कर्पूरगौरासे मंगळं ।। अ ।।
येकेन्द्र पूजिता सतुळजेन्द्र पालकास कल्याणदायकास मंगळं ।। १ ।।
कारुण्य सागरास सद्गुणवंतास महनीय्य त्यागेशास मंगळे ।। ३ ।।
कल्याणी

द्वि० : अक्षे कर गुणवंतजि तनु देवेंद्र संसेव्य
तुळजेन्द्र सन्नुत दुरित भयहर करी दया मजवरी धन त्यागराज ।।
नाद्यंते सूत्रधाराचे वचन एका हो भागवत हो

महागणाधीपतये नमः

दरु० : (नाठरागं–रूपकं)

जय जय श्रीत्यागेश जय जय गौरीशा जय भोसल
कुलपाला जय कीर्ती विशाला जय सदगुणा शूरा
जय मंगळ शीला ।। १ ।।
येकेन्द्रार्चितपादन तुळजा दिविनुत श्रृतजन सुर भूज श्रीत्यागराज ।। ३ ।।

दरु० : (सौराष्ठा त्रिपुट)

शरणु शरणु शुभदायक शरणगौरी
शरणु भोसल वंशपाला शरणु श्रीपति नायक ।।
शरणु शरणु ।। बाल शशीधरनी नील कंदर
निगम गोचर शंकर फाल लोचन भय विमोचन
देवय पूजित श्री इ.
गणपति आला श्रित जनपाला पाहुनि मजला संतोष झाला
दीन दयाला सद्गुण लीला घन शुभ लीला गजमुख
सकल विघ्न हरणाय निवारण केल्यानंतर कथा ऐशीजे
देवेन्द्र सभेप्रति एतील म्हणून शरभु महाराज तनु ज राजहंस बिका विरचित कमलांबा त्यागेश्वर परीणय नाठकीर्निर्विघ्न हो कारणें सम्यासी सावध करावया कारणे विजयवंत
विजयवंत सभेप्रिति येतो ।।
विजयवंत कपाळी गंध लावूनि काठी धरूनि सोन्याची
टोपी घालूनि जयवंत येऊन सभाश्रृंगार केल्यानंतर देवेन्द्र निज सभेशिये तो पाहा.

(शंकरभरणं आदिताल)
येतो पाहा. स्वर्न भूषणे लेऊनि सकल देवानी मिळूनी
हातीवज्रायुध घेऊनि आयिरावत बोलतो पाहा ।।
सकल शुभ प्रद ब्रम्हादिक पदासी ही सोडूनि । त्यागेश्वरास द्या
म्हणून कशासाठी मागीतलास सांग
येणेरीति इन्द्र बोलती–मुचुकंद बोलतो पाहा.

**चूर्निका :** ऐका हो देवता सार्वभौम–सुत्रामा वा सर वल्लभ कुलप्रदीप नवीन पंचसायकरूप सद्गुण कलाप–समर दीलीप भोसले कुलकलशांभोधी पूर्ण शशांक येकेन्द्र तन मकम हा राज जनक शाह राज शरमराजन्य सोदर दीपाविका गर्भशुक्ती मुक्ता फळतलज मही पाल पालीत चोल मंडली–सकळ पुण्यस्थळ शिरोमणी

कमला पुरस्थली, पराशक्ति कमलाम्बां देवि दृढ भक्तीने त्यागेश्वरास प्रतिष्ठा केलिया त्यागेश्वर प्रत्यक्ष होऊनि त्याष राज शक्तीस लग्न करूनी तुळजेन्द्र, येकेन्द्रास, संतान सौभाग्य सकल सांब्राज्य दीप त्या रोग्य दृढगात्र दीर्घायुष्य देऊनि इष्ट देवत होऊनि सर्वदा प्रति पालन करावे. म्हणून सोमास्कंदास वर मागितली.

इंद्र : अयिक मुचुकुंद तसेच होयील. राजहंसांबिका राम कुमारांबिका श्रीमल्तु जानवा घ्यबिकान अजि सुदिन कनक वसंत त्या.
येणे रीति त्यागेश्वर कमलांबाची श्रिंगार वर्निल्या नंतर कमलांबा त्यागेश्वराचे सरस सौंदर्यातिशय पाहूनि–सर जीवन परिवृत होऊनि श्रृंगार वनास येऊनि आप्त सखीस पाहूनि बोलतो पाहा.

(आहिरी.–अटतालं)

विरह आतां सोसवे नकी–खाणी–मदन विंधितो मज कुसुमबाणी ।।
मधूप वेंणी ।। १ ।। सरस चंद्रतावितो चंद्रवदन–मज मधुप रव विरह
करितो कुंदरदन ।। २ ।। मलय मारूत ताप करितो मंजुळ वाणी
अता मत्त कोकील दावितो भय, पद्मपाणी ।।

येणे रीति सखीशी बोलूनि विरह न साहता मग ती बोलते पाहा.

(सावेरी.–आदिल)

सांग गे सजणी–सरस शुभ वाणी श्री त्यागेशा येऊनि मजवरी दया करूनि कधी मजला लगीन–करील चंद्रवदने ।।

येणेरीति कमला देवि विरह न सहतअस्ता देवीची प्राण सखी पाहूनि वरी महादेव येऊनि प्रसन्न धवळ वराह स्वामीशी कमलादेवि वृत्तांत ऐकूनि धवल वराह. श्रीभवानी पती श्रीलक्ष्मी पति श्रीमहागणपती, श्रीरेणुका श्री. चंद्रमौळिश्वर पार्वती देवी श्रीखंडेरादि इष्टदेवत कुल देवत प्रसाद शाश्वत आहे ते भोसल वंशवर्नि तो पाहा.

चूर्निका : श्रीमद्भो सकलकुल मणि येकेन्द्र सुतशाह महाराज शरम महाराज सहोदर दीपाविका गर्भाब्धि सुधार तुळजा महाराज कुलपत्नी कुमारांबिकानंदन श्रीएक महाराज विरचित कमलांबीका त्यागराज परिणये–सकल श्रेयसे संतान सौभाग्य सकल साम्राज्य विजयारोग्य दीर्घायुष भि वृद्धिकर सकल कल्याण प्रद आचंद्र तारक असे. या नाटकी इष्ट देवताची प्रार्थना करितो पाहा.

आत्मांत्वं गीरिजापतिः परिकरा प्राणाश्शरीरं गृहंपूजा ते विषयोप भोग रचना. निद्रासमाधी स्थितीःसंचारःपदयो प्रदिक्षिणविधीः स्तोत्ताणि सर्वागिरीः यधत्कर्मक रोमि तत्तदखिलं शंभो तवाराधना (श्री शंकराचार्यकृतं मानसपूजा)
येणे रिती इष्टदेवताची प्रार्थना केल्यानंतर विघ्नेश्वर प्रार्थना करितो पाहा.

सर्व विघ्नं हरं देवं शंकरा नंद वर्धनं ।।
शुभस्तेयो प्रदातारं वंदेहं गणनायकं ।।

येणे रिती विघ्नेश्वराची स्तुति करितां प्रत्यक्ष येता समोर धवल वराह स्वामि येतो पाहा.

दरु : (कुरुमे मोदं. आदि)

धवल वराह येतो प्रसन्न धवल वराह येतो ।।
मणि मय कुंडल कानी शोभतां मुनिजन
निर्जर संस्तुति करितां ।।

येणे रिती प्रसन्न धवल वराह स्वामी सामोर येऊन
राजाधिराज त्यागराजास पाहून स्तोत्र करितो पाहा.

दरु० : (बिलहारी.–चापु)

हर हर शंभोचंद्रकलाधर पालय देव नित्यं ।। गौरीमनो स्वामीस
धवती करितां त्यागेश्वर संतोषूनि तुलजेन्द्र ऐकेन्द्रा स संतान
सौभाग्य दिर्घायुष्य दे या कारणे ।।
धवल वराह स्वामी नु प्रत्यक्ष येतो पाहा ।।

दरु० : (सारंग.–आदि)

त्यागेश आला संतोषाने त्यागेशा आला ।।
सकळ देवगण सेवितां नंदिवाहनावरी भैसूनि ।। १ ।।
भोसल कुल पालका नित्य सरेल श्रेयोदायक
एकेन्द्र सन्नुत तुलजेन्द्र पूजित इन्द्रानुज नायक त्यागनायक ।। २ ।।

येणे रिती त्यागेश्वर प्रहृद गंगा जटाधर एकेन्द्र परिणालक तुळजेन्द्र सन्नुत इंन्द्रादि पूजित त्यागेशपालयेनमां. श्रीशंकर ।। १ ।।

नागेंन्द्र भूषण नंदिवाहन सकल सन्मुनि पालकशाहेन्द्र
सन्नुत कुरमलज पूजित भोसल कुलपालक वरदा ।। सोमस्कंद ।। ३ ।।

येणे रिती प्रसन्न वराहस्वामी स्तोत्र करून रत्नसिंव्हासनासी बसले असतां त्यागेश्वर दर्शनासाठी नारदमहामुनि येतो पाहा.

दरु० : (मोहनं.–चापु)

हर हर चंद्रकलाधर म्हणुनी मनी ध्यान करित ।।
सुरमुनि नारद आला संतोषें सुरूचिर वीणा वादन करीत ।। १ ।।

येणे रिती नारद येऊन त्यागेश्वरास वंदन करून स्तोत्र करून. त्यागराजास पाहून बोलतो पाहा.

(कांबोदि.–आदि)

दया कर गंगाधर गौरीमनोहर सुंदर त्यागेश्वर ।।
तुजवरी मोहुनि कालंब जननी आहे कल्याण कराकरूणासागर ।। १ ।।

येणे रिती नारद बोलतस्सा प्रसन्नाधवल वराह मूर्ति त्यागेश्वराशी बोलतो पाहा.

(अनुष्ठुप)

वर तूं होवया गौरी करिते तप श्रीपुरा त्या कन्यकास
कल्याण करूं घे शिवा तूं लौकरी ।।

येणे रीति प्रसन्न धवल वराह स्वामीचे वचन ऐकून त्यागेश्वर, बोलतो पाहा.

त्यागे० : ऐका हो धवळ वराह मूर्ति तसे च् कल्याण करून--येयीन--नारदासी धाडून सकळ.
देवास सकळ ऋषीश्वरास बलावून पाठिवा.

येणे रीति त्यागेश्वराचे वचन ऐकून धवळ वराह मूर्ति नारदास पाठवितो. नारद मुखे त्यागेश्वर कमल बिका परिणय ऐकूनि संतोष करूनि लक्ष्मी सहित महाविष्णु येतो पाहा.

दरु० : (सुरट.–आदि)
आदि विष्णु संतोषाने आला लक्ष्मीसहित येकेन्द्र सन्नुत गरूडवाहनावरी बैसूनि
वुरी कौस्तुभमणि शोभतां करी शंख चक्र विराजिता ।। १ ।।

येणे रीति आदि विष्णु आला नंतर ब्रह्मण्ण गणपति मिळूनि येतात पहा.

येणे रीति महाविष्णु आल्यानंतर कमलांबा त्यागेश्वर परिणय महोत्सव पाहाया कारणे सरस्वती सहित ब्रम्हदेव येतो पाहा.

(कापी आदि)

ब्रम्हदेव आला वाणी सहित ब्रम्हदेव आला ।। सरस हंस ।।
वाहनी संतोषे बंसूनि आज सुदिन म्हणुनि त्यागेश भेठि यिच्छूनि ।।

येणे रीति सरस्वती सहित ब्रम्हदेव आल्यानंतर शचीसहित इंन्द्र येतो पाहा.

(शंकर भरणं)

आला देवेन्द्र पहा ।। सकळ देवाशी मीळवूनि ऐरावत वरी
बैसूनि त्यागेश लग्नी यीच्छूनि संतोष दृश्ये येवूनि ।।

येणे रीति शचीसमवेत इन्द्र आल्यानंतर ब्रहस्पती येतो पाहा.

(भैरवं. चापू)
आला ब्रहस्पती संतोषूनि सकल शिष्याशी मिळूनि
सरस शकुन पाहूनि त्यागेश दर्शनि यिच्छूनि ।।

येणे रीति ब्रहस्पती आल्यानंतर सकल ऋषीश्वरास बलावा म्हणता सकळ ऋषीश्वर शिष्य समेत येतात पाहा.

(शापु. शंकरा भरणं)
ऋषीश्वर येतात संतोष ।। विभूति ऋषि लावूनि ।।
वलकल नेसूनि शिष्याशी मिळूनि शिभजन करूनि ।।

येणे रीति सकळ ऋषिश्वर येवून त्यागेश्वरास वंदूनि स्तोत्र करितात पाहा.

(येरूकलका बोंदि. आदि)
त्यागेशा आम्हावरी करूणा करा लौकरी ।।
शरणा गत पालका भवभय हार भक्त पालक देव ।।

येणे रीति सकल ऋषि स्तोत्र करून असतां सकल ऋषी पत्नीस बालावा म्हणता सकल ऋषिपत्नी येतात पाहा.

(सौराष्ट्र. शापु)

ऋषीपत्नी मिळूनि आज सुदिन म्हणुनी
त्यागेशास लग्न म्हणूनि आल्यासंतोषि करूनि ।।

येणे रीति ऋषिपत्नी आल्यानंतर प्रसन्न धवल वराह मूर्ति कल्याण मुहुर्त पाहूनि बहिणी कमलांबिकेस बलाव म्हणूनि सखीस पाठवितां कमलांबा देवी सकलश्रृंगार वती होवुनि सखी समेत महादेव पट्टणास येते पाहा.

(आहारि. आदि)

कमलांबी आली जननी पूर्व सारिखे

येणे रीति कमलांबा आल्यानंतर प्रसन्न धवल वराह मूर्ति संतुष्टाचित्त होवूनि सकल देवासी मिळूनि ब्रम्हा ब्रहस्पती स बलावूनि हरिद्रा कुंकुम गंध फळ पुष्प इत्यादिक शोभन द्रव्य आणून त्यागेश्वरास प्रार्थना करून कल्यांण मंडपी नवरत्न खचित कांचन पीठी कमलांबा सहित त्यागेश्वरास सुस्थिर करूनि लग्न करिता पाहा.

लग्नसमयी तुंबरु तुंबुरु नारद सकल गंधर्व मिळूनि शोभन गातात पाहा.

शोभा ने शोभाने श्री त्यागाधिराजाने कमलांबा मनोहरासी
श्री ऐकन्द्र विनुतासे तुळजेन्द्र पूजितासे ।।

येणेरिति कमलांबेचे त्यागेश्वरासी लग्न झाल्यानतरे देव सभा बसले अस्तां सकल गंधर्व रंभावूर्वशीनृत्य करितात पहा.

(बेगड. अट)

श्रीविश्वेशास भजतो श्रीचंद्रमौळीश्वर शंकरास मनी भजतो ।।
गौरी मनोहर गंगाजठा धर ।। भोसल कुलदेव शंभु महादेव वासे ।। १ ।।
श्री तुळजमहाराजेन्द्र पालक श्रीयेकेन्द्रवर दायक शंकरासे भज ।। २ ।।
गिरिजा नायक संतान दायक शरभेन्द्र पालक ।।
जिंकुनि सत्कीर्ति पावूनि आलासी परम शौर्यनि भूवर
परमांग पेंतिकरीने ।।

येणेरीति इन्द्राचे वचन सागर कर्पूर गौर सारदेव विहार सज्जीवाधार हल्लाक मालीशालं कृत विष्णु वल्लभ निजभक्त वत्सल देव गोभीन्द्र भूधिश.

येणेरिति मुचुकुंद राजा त्यागेश्वरास मागतां देवेन्द्र बोलतो पाहा.

आयिक मुचुकंद, जनभेशी येवून रक्त सिम्हासनी बैसोनी अस्ता
सकल राक्षसास जिंकूनी जय पावून मुचुकुंत चक्रवर्ती

(सौराष्ट्र. आदि)

सकल दैत्या जिंकूनि संतोष चित्त होवूनि मुचुकुंदराज
मणि येतो पाहा जय पावूनि ।। १ ।।

देवेन्द्रास वंदन करितां देवेन्द्र संतोषुनि मुचुकुंद राजास पाहून बोलतो पाहा.

द्वि पालंक विश्वेशास । भजतो श्री पद्मोसल कुलैक महाराज
तनूज राजहंसा बिका नंदन ।।

विरचित कमलांबा त्यागराज परिणय नाटकी सकल देव ब्राह्मणाचे वचने फळश्रुति ऐसीजे. ऐकेन्द्र तुळजेंद्र राजहंसाबिका राम कुमांराबिका

बिका हे सकल संतान सौभाग्य सकल साम्रांज्य धिपत्या रोग्य दृढ
गात्र दीर्घायुष्यवंत होवूनी सकळ बंधु जन सहित जन आश्रित जन
विधाजन तो पाळ करूनि त्यागेश्वर
कमलांबिका प्रसादाने कुलदेवता प्रसन्नता शाश्वतेनेन सकल लक्ष्मी
कटाक्षेन भुवनीवरी आचंद्रतारकसा राज्य करीतील शुभमस्तु ।।

श्री विनायकायनमः ।।

।। संपूर्ण ।।

---



तंजावरचा राजा प्रतापसिंह

(कारकीर्द इ. स. १७४०–१७६३.)

# प्रतापसिंहकृत परिणय नाटके



## १. सीताकल्याण

सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात रामभद्र दीक्षित या कवीने लिहिलेले 'जानकी परिणयम्' हे फार लोकप्रिय नाटक होते. प्रतापसिंह राजे यांनी हे नाटक त्यांच्या आधारे 'सीताकल्याण' हे नाटक लिहिले. यात राम व लक्ष्मण हे विश्वामित्राच्या यज्ञरक्षणार्थ जातात आणि राक्षसांचा संहार करतात. स्वप्नामध्ये राम सीतेला 'तू माझी पत्नी होशील' असे सांगतो. जनकराजाने सीतेचे स्वयंवर योजिले. त्याला विश्वामित्र ऋषी रामाला घेऊन जातात. राम शिवधनुष्य मोडून स्वयंवरातील पण जिंकतो. नंतर रामचंद्र सीतेबरोबर आणि लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांचा उर्मिला, मांडवी व श्रुतकीर्ती या कन्यांबरोबर विवाह संपन्न होतो.

या नाटकात श्रृंगार रसाबरोबरच वीर आणि अद्भुत रसांचा परिपोष केला आहे. विश्वामित्र दशरथाकडे रामाला यज्ञरक्षणार्थ पाठवा म्हणाल्यावर वत्सल पिता दशरथ राम अजून लहान आहे, असे म्हणतो—

हा माझा बाळ भोळा अजि अझुणि तिला मागतो आज्य गोळा।
युद्धाच्या ज्या न मोला विदित न भरली आणि वर्षेहि सोळा।
तो रक्षोवृंद होटो वधिल रणि कसा जे करू विश्व गोळा।
शक्त स्वामी न बोला मम जीव उगला की दयेने बोला।।

अनेक अर्थपूर्ण पदे व श्लोक यांनी प्रसंग रंजक झाले आहेत. सीतेच्या सौंदर्याने मोहित झालेला रावण रामाच्या वेषात येतो व शूर्पणखा रामावर भाळल्यामुळे सीतेचा वेष घेऊन येते. ते समोरासमोर येताच मायावी रूपे ओळखून लज्जित होतात. हे कपट-नाटक नाट्यपूर्ण आहे.

नाटकाची भाषा संस्कृतप्रचुर आहे, परंतु दुर्बोध नाही, काही अपवाद सोडता नाट्यवस्तूला पोषकच झाली आहे.

यथार्थनामा प्रतापसिंह हे तंजावरच्या भोसले राजघराण्यात सर्वार्थाने कर्तृत्ववान होते. इ. स. १७३६ मध्ये व्यंकोजी राजांचे नातू एकेन्द्र उर्फ एकोजी (दुसरा) निपुत्रिक मृत्यू पावले व तंजावर राज्यात अंदाधुंदी माजली होती. तत्कालीन मुत्सद्यांनी एकोजींची पत्नी सुजानबाई ही राज्यकारभार चालविण्यास योग्य आहे असे पाहून त्यांना गादीवर बसविले. त्या उदार, सद्गुणी व चतुर होत्या त्यांनी तीन वर्षे राज्य केले. तोच कोणी सवाई शहाजी, नावाचा तोतया मतलबी किल्लेदाराच्या सहाय्याने 'काट राजा' या नावाने गादीवर बसला. पण त्याच्या तोतयेगिरीची खात्री पटून त्याला सत्तेवरून दूर केले. अराजकाची व तंजावरमधील संकटग्रस्त परिस्थितीची जाणीव होऊन तेथील मल्हारजी गाडेराव, नानाजी जगताप व अनप्पा शेडगे या मातबर सरदारांनी तुकोजींच्या पुत्रांपैकी प्रतापसिंह यांची राजेपदी निवड केली. (इ. स. १७३९). त्यांची कारकीर्द इ. स., ७४०

मध्ये सुरू झाली. त्यांनी तेवीस वर्षे जबाबदारीने उत्तम राज्य केले. त्याच्या कारकीर्दीच्या सुरवातीला तंजावरच्या भोवताली इंग्रज, फ्रेंच व कर्नाटकचा नबाब दोस्त अलीखान यांनी सत्ताभिलाषेने प्रतापसिंहाच्या राज्यातील प्रजेला नाना प्रकारे उपद्रव द्यायला लागले. विशेषतः मुसलमानांनी देवधर्माची केलेली विटंबना 'प्रतापसिंहेंद्र विजय प्रबंध' या समकालीन ग्रंथात रामकृष्ण कवी पंडित यांनी केली आहे.

फत्तर म्हणती देवा काफर ब्राह्मणासी ।
इतर गणिति हिंदू तुल्यतेनें तृणांसी ।।

वितरिति धनधान्ये पंचमांकी फकिरा ।
सतत करिति ऐसा पातकांचा जाकीरा ।। १५ ।।

धर्म व न्याय या दोन्ही बाबतीत त्रस्त झालेल्या प्रजेला प्रतापसिंहाने साताराचे छत्रपती व पेशवे यांच्या मदतीने शत्रूंचा पराभव करून निर्भय केले. 'केले निर्भय चोळमंडळ अरि दंडुनि जेणे स्वतः' त्यांना अनेक वेळा युद्धावर जावे लागले. शेजारच्या शत्रुराजांच्या कटकटी सतत चालू असत. तरीही त्यांनी वाङ्मय व कला यांच्या निर्मितीकडे व जोपासनेकडे विशेष लक्ष पुरविले. त्यांनी अनेक संस्कृत भाषेत ग्रंथ लिहिले. धार्मिक वृत्तीने उमासंहिता, हरितालिका, ऋषीपंचमी, अनंत चतुर्दशी यांसारखे व्रतमाहात्य सांगणारे ग्रंथ आहेत.

प्रतापसिंहानी लिहिलेली मराठी नाटके लक्षणीय आहेत. संख्येने विपुल असून त्यांतील बरीचशी गुणवत्तेनेही उल्लेखनीय आहेत. त्यांच्या नाट्यसंहिता प्रामुख्याने रामायण, महाभारत, भागवत व पुराणे या ग्रंथातील कथाभागांवर आहेत. कथानकांच्या निवडीत त्यांना अभिप्रेत असलेल्या विविध रसांचा आविष्कार करणारी आख्याने त्यांच्या नाट्यकृतीत आढळतात.

**नाटकांचे वर्गीकरण :**

(१) कल्याण (विवाह) किंवा परिणय नाटके ही संख्येने अधिक आहेत. प्रतापसिंहाच्या विवाह नाटकाची अनुक्रमे ग्रंथनामे अशी आहेत––सीताकल्याण, रुक्मिणी कल्याण, पार्वती-कल्याण, श्री कोर्वंजी उर्फ जानकी सुखोल्लास, मित्रविंदा परिणय, मायावती परिणय, प्रभावती परिणय, उषाकल्याण व लक्ष्मणा परिणय ही होत. या सर्व नाटकांत तरुण नायिकेला नायकाचे वाटणारे आकर्षण, त्याच्या ऐकलेल्या शौर्याच्या व सद्गुणांच्या कथांमुळे नायिकेच्या मनात प्रेमभावना उमलते; त्यांची भेट होऊन मार्गातील अडचणीवर मात केली जाते व शेवटी विवाहसोहळा साजरा होतो.

राजे प्रतापसिंह रामभक्त होते. कदाचित त्यामुळेच त्यांनी सीतास्वयंवरावर दोन नाटके लिहिली. एक सीताकल्याण व दुसरे श्री. कोर्वंजी उर्फ जानकी सुखोल्लास हे होय. दुसरे नाटक सूचित केल्याप्रमाणे कोर्वंजी पद्धतीचे आहे. त्या प्रकाराचा ऊहापोह मागेच ह्या ग्रंथात केला आहे. (पृष्ठ २७–२९).

## रुक्मिणी कल्याण नाटक

भागवत पुराणातील सुप्रसिद्ध रुक्मिणी स्वयंवर आख्यानावर महानुभाव कवी नरेंद्रापासून एकनाथ, सामाराज ३, अनेक कवींनी स्वयंवर काव्ये लिहिली. त्या कथींतील नाट्य जाणवून प्रतापसिंहानी तरुणांच्या भावभावनांचे चित्रण विविध राग व विविध वृत्ते व तेलगू कल्याणातील द्विपदा हे वृत्त यांची कल्पकतेने योजना केली आहे. रुक्मिणीची सखी चारुमती व रुक्मिणीसारख्या कपट करू इच्छिणाऱ्या बंधूची सहाय्यका विपरीत भावना अशी अर्थपूर्ण नावे या व इतर नाटकांत सर्वत्र आढळतात. रुक्मिणीच्या तोंडी घातलेले संयत शब्द 'सखे, स्त्रीजन्म मोठा फटकळ ! (कठीण) मनाजोगा वल्लभ मिळाला तरीच खरे ? असे अन्वर्थक शब्द व्यक्तींची पृथकात्मकता स्पष्ट करतात. श्रवणमधुर प्रास व यमकांनी परिपूर्ण असून अर्थपूर्ण असून अर्थपूर्ण श्लोक रसिकाला आनंदित करतात.

मी धारधर तू अचंचल विजू मी चंद्र तूं चंद्रिका ।
मी वारा तूं अभंग लहरी मी शंभू तू अंबिका ।।

कृष्णाने आपले व रुक्मिणीचे अभिन्न व एकरूप स्वरूप या शब्दांनी वर्णिले, या राज्याच्या बहुतेक नाटकांतील काव्य 'दमयंती स्वयंवरकर्त्या रघुनाथ पंडितांचा संस्कार घेऊन आलेला जाणवतो.

## पार्वती कल्याण नाटक

या नाटकाच्या संविधानक कवि कालिदासकृत 'कुमार संभव' या काव्याच्या तिसरा व चौथा सर्ग आणि वामन वाणभट्टाचे (सोळावे शतक) 'पार्वती परिणय' हे नाटक यांचे हात धरून आहे. त्या ग्रंथांचे ऋण घेऊनही त्याला आपल्या कल्पकतेचा चमकदारपणा वहाल करण्याची चतुराई प्रतापसिंहात आहे, हे मान्य करावे लागते. (cf पृ. २२) हिमालय पत्नी मेना हिची अपत्यमुख पहायची अतुरता, 'देवीला लहान मुल होऊ नये हे सांगण्यामागील रहस्य, पार्वतीच्या शिवप्रेमाची अथांगता, मदन दहनानंतरचा रतीचा शोक. इ. अनेक परिचित परंतु नित्य नवे वाटपणारे स्त्रीमनाने विविध मनो व्यापार यांचे दर्शन मनोज्ञ आहे.

शिव हे भोसल्यांचे दैवत. तंजावरच्या परिसरांतील अनेक शिवमंरांचा—बृहदिदीश्वर, पंचनदीश्वर, नटेश किंवा नटेश्वर, त्यागेश, चंद्रमौलीश्वर अशा अनेक मंदिरांचे उल्लेख या राजांच्या ग्रंथात आढळतात.

## मित्रविंदा परिणय नाटक

प्रतापसिंहानी संस्कृत भाषेतून अनुवादित केलेले 'प्रबोध चंद्रोदय' या नाटकात मुळाप्रमाणे सहा अंकी आहे. ५०१ बाकीची आहेत. यां साऱ्या नाटकांत भाषा संस्कृतप्रचर व भारदस्त आहे. विशेषतः त्यांतील चूर्णिका दीर्घ सामासिक शब्द कठोर व्यंजनयुक्त 'ष्ट कार' 'ण्यकार' 'उकारयुक्त' व जोडाक्षरांनी अशा आहेत, त्या वाचीत असताना गौडी रीतीचा काव्यात साक्षात्कार होतो. उदा. श्रीमच्चतुर्भूज मत्तमुख

प्रमुख बहिःमुख हारक मुकुट तटचघटित चि रत्न रत्न निता प्रभापुंज मंजरी रंजित, इ. नादयुक्त अनुप्रास साधत शब्दांचा धबधबा आढळतो. कृष्ण मित्रविंदेचे स्मरण करताना पाहून विदुषक म्हणतो, 'तुजला कामाचे व्यसन जडले मोठे'। कृष्ण व अवन्तिराज राजाची कन्या मित्रविंदा हे परस्परांवर अनुरक्त असता तिचे मातापिता तिला सुयोधनाला द्यावी, असा विचार करतात, परंतु कृष्णाचे शौर्य, समयसूचकता व तारतम्य हे स्वयंवरा-करता आलेल्या राज्यात विचार केला. आणि मित्रवंदेच्या इच्छेप्रमाणे तिचे कृष्णदेवांशी विवाह होतो.

## मायावती परिणय

एकदा रुक्मिणी कृष्णाला म्हणते मला एक पुत्ररत्न हवे तेव्हा तो तिला शिवाची आराधना करायला सांगतो. त्याप्रमाणे शंकराच्या प्रसादामुळे पुत्र होतो तो प्रद्युम्न येय त्याच्यावर शंबरासुराची कन्या मायावती ही आसक्त होते परंतु तिची सखी चित्रांगी हिच्या साह्याने प्रद्युम्न भेटल्यावर त्याला आपल्या पित्याची अनुकुलता विवाहाला नसेल कारण तू कृष्णपुत्र आहेस. हे कळल्यावर प्रद्युम्न शंबरासुराला युद्धात मारतो. तेव्हां रुक्मिणीसह कृष्ण येतो; आणि प्रद्युम्न-मायावतीचा विवाह होतो.

या नाटकातील 'चित्रांगी' ही मायावतीची सखी उपहरण या आख्यानातील चित्रांगदा या उषेच्या मैत्रणीसारखीच चितारली आहे. उषेचा दैत्यपिता बाणासुर तसाच, शंबरासुर यांचे व्यक्तिदर्शन घडविले आहे.

## लक्ष्मणा परिणय नाटक

हे अपूर्ण नाटक कोर्वजी पद्धतीचे आहे, असे सुरवातीला म्हटले आहे पण संहिता हाती नसल्यामुळे त्याचे स्वरुप तपासता येत नाही. नायिका लक्ष्मणा हिच्या सौंदर्याचे वर्णन व्यतिरेक अलंकाराचा सुरेख वापर केला आहे.

२. भक्तिपर व चरित्रविषयक नाटके.

प्रतापसिंहानी जीवननिष्ठा जपणाऱ्या श्रेष्ठ भक्तांच्या जीवनकथा आपल्या नाटयकतींत गुंफल्या आहेत. भक्तशिरोमणी ध्रुव, रुक्मांगद, अनुसूया यांच्या चरित्रांवर नाटके लिहिली. या कथा सर्व परिचित अशाच आहेत. तरीही त्यांतील नाटय जिवंत आहे.

## ध्रुवचरित्र नाटक

(१) ध्रुव चरित्र नाटक : भागवतांतील ध्रुव कथा ही हरिदासांनी कीर्तनातून फार लोकप्रिय केली होती; परंतु अनंततनय या कवींचे ध्रुवाख्यान त्यातील औझवती व सुगम शैलीमुळे आबालवृद्धांच्या तोंडी बसले होते तीच कथा इथे नाटयरूप घेते. उत्तानपाद राजाच्या सुरुची व सुनीती या दोन पत्नी होत्या. त्यांना दोघीनाही मुलगे होते. पण लाडक्या राणीला सुनीतीचा व तिच्या मुलाचा ध्रुवाचा राग असे तिने ध्रुवाला अपमान करायला राजाला भाग पाडले. त्यामुळे ध्रुवाने अढळ पद मिळविण्या-साठी कठीण तपश्चर्या केली व तो ध्रवतारा म्हणन अढळ झाला. विष्णू त्याच्या

तपश्चर्येने संतुष्ट झाले. त्याला अढळपद दिले. या नाटकात भक्त कथेप्रमाणे सवतीमत्सराची ही कथा आहे या दुहेरी कथेला रोचकता येते ती एका बालकाने अपमानावर एवढी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त करावी व आपल्या इच्छेप्रमाणे दुर्धर प्रयत्नांने ईश्वराला अंकित करावे यामुळे साऱ्या सूत्रात विविध पातळ्यांवरील संघर्ष मनोवेधक ठरतो.

### रुक्मानंद चरित्र नाटक

(२) महाराष्ट्रातील मध्ययुगीन कवींनी 'एकादशीमहात्म्य' या व अशाच शीर्षकाने एकादशीव्रताचा महिमा गायिला आहे. व्रताचे स्वरुप, आचार त्याचे यमनियम सांगून त्यापासून प्राप्त होणारे पुण्य याचे चित्रण रुक्मानंद याच्या कथेद्वारे केलेले आढळते. हे व्रत विष्णू व त्यामुळे विठ्ठल ह्या देवतांच्या आराधनेसाठी केले जाते. म्हणून वारकरी संप्रदायात याला फार महत्त्व आहे. भागवत पुराणातील कथेतील रुक्मांगद राजाने आपण एकादशी व्रत करून प्रजेलाही ते करायला लावले आणि त्या व्रताचा भंग करण्याचा देवांचा प्रयत्न सफल होऊ दिला नाही. हा आशय या नाटकामध्ये अंतर्भूत आहे.

रुक्मांगदाचे व त्याच्या प्रजेचे पुण्यबळ एकादशीव्रतामुळे एवढे वाढले की त्याच्या राज्यातील सर्व मानव मृत्यूनंतर विष्णुलोकी जात. म्हणून राजाचा व्रतभंग करण्यासाठी देवांनी एक कपटी सुंदरी पाठविली. राजा तिच्या मोहपाशात पूर्णतया सापडला. तेव्हा तिने त्याचा व्रतभंग करण्याचा अतीयत्न केला; परंतु राजा जेव्हा तिच्या इच्छेप्रमाणे वागेना तेव्हा तिने राजाच्या पुत्राचा शिरच्छेद व्हावा अशी मागणी केली. राजा कष्टाने त्याप्रमाणे करणार, तोच भगवान् विष्णूंनी आपल्या भक्तांचे सत्त्व राखले. या कथेतील नाट्य, भक्त महिमा व विविध रसात्मकता यांचा कौशल्यपूर्ण अविष्कार नाटककाराने केला आहे.

### अनसूया उपाख्यान नाटक

दत्त या दैवताचा अवतार, अनसूयेच्या पातिव्रत्याचा श्रेष्ठ आदर्श व तिचे अलौकिक चरित्र यांचा नाट्यमय आलेख या नाटकात आढळतो. ब्रह्मा, विष्णु व महेश या देवत्रयांना अनसूयेने नग्न होऊन स्नान घालावे, अशी त्यांची इच्छा ऐकून अत्रिमुनी चिंतामग्न होतात.

'काय करू संकटा या कटकटा। काय करूं आता जायेची ॥
लाज हे जावयासी आली।'

असे त्यांना संकट जाणवत असता, अनसूया दृढनिश्चयाने शांतपणे ते मान्य करते व आपल्या सामर्थ्याचा प्रत्यक्ष प्रत्यय येतो अनसूयेचा आत्मविश्वास–' सागरासी मही कुलभुनी मागुती स्थापीन मी।' या साऱ्या नाट्यप्रसंगातील उचित चित्रण मनोज्ञ वाटते. या भक्तचरित्रातील विविध रसांना सहाय्यभूत होणारा अद्‌भूतरस संवादांतून व काव्यांतून परिणामकारक वाटतो.

### कृष्णजन नाटक

भक्ति संप्रदायात नवविधा भक्तीचे प्रकार सांगितले आहेत. परमेश्वराच्या अवतारा-संबंधी, त्याच्या बाललीला, त्याने केलेले विक्रम व भक्तजनांचे संरक्षण या संबंधी

पुनपुनः स्मरण, संकीर्तन करणे व करविणे हा भक्तीचाच अविभाज्य घटक आहे. कृष्णजनन नाटकात कृष्णजन्म व त्यांचे गोकुळातील बाळगोपाळांबरोबर क्रीडा करणे हा भाग आला आहे. शहाजीराजांच्या 'मृत्युंजय चिरंजीव' व प्रतापसिंहाच्या या नाटकात दाई (सुईण) येऊन बाळंतपण करणे व जोशी येऊन त्याने मुलाची जन्मकुंडली मांडणे इ. भाग येतो. जनसामन्यांचा असा रंगमंचावर सहभाग आढळतो.

### ययाति चरित्र नाटक

ही महाभारतातील सुप्रसिद्ध कथा ह्या नाटकाची कथावस्तू आहे. अनेक संगतिमक खंड काव्याचा विषय होण्यासारखी दीर्घकथा सुरवातीपासून मांडली आहे. संजीवनी विद्या ही संपादण्यासाठी कचाने शुक्राचार्यांकडे येणे, देवयानीचे प्रेम सवश्र होणे, मृत्युसंकटातून कचाची मुक्तता, परस्परांनी एकमेकांना दिलेले शाप, देवयानी–शर्मिष्ठा कलह, देवयानी-ययाती विवाह, शर्मिष्ठेचे दासीपण, ययाति-शर्मिष्ठा गंधर्वविवाह, देवयानीचा सवतीमत्सर, शुक्राचार्यांनी ययातीला दिलेला शाप व उःशाप, पुरूचा स्वार्थत्याग व या साऱ्यांची जीवनपरिणती एवढा मोठा भाग या नाटकात आला आहे. त्यामुळे हे विवाह किंवा परिणय नाटक व सवतीमत्सर अशा दोन्ही प्रकारात येणारे नाटक आहे. यांतील कच, शुक्राचार्य व देवयानी यांचे व्यक्तिचित्रण उत्तम चितारले आहे.

### पापारिजातक किंवा पारिजापाहरण नाटक

रुक्मिणी व सत्यभामा या कृष्णपत्नीमध्ये कलहप्रिय (नाटकातील विशेषण) नारद कळलावे. स्वर्गीय पारिजातकाचे फूल कृष्णाला देऊन, त्याने ते रुक्मिणीला दिले हे वृत्त सत्यभामेला नारद तात्काळ सांगून तिला मत्सरग्रस्त करतो. ही सर्वपरिचित कथा फारच कुशलतेने प्रतापसिंहाने नाट्यरूप देऊन एक रंगतदार नाटक रंगमंचावर सादर केले. यातील कृष्ण व सत्यभामा यांच्यातील संवाद फारच रोचक वठले आहेत.

### स्यमंतकोपाख्यान नाटक

भागवत पुराणातील कृष्णावर स्वयंतक रत्नाची चोरी केल्याचा आळ येतो व त्याचा जांबुवतीशी विवाह व चोरीच्या खोटा आरोपाचे निराकरण ही कथा या नाटकाचे संविधानक आहे.

### प्रबोधचंद्रोदय

प्रबोधचंद्रोदय हे कृष्ण मिश्र यांनी लिहिलेले संस्कृत नाटक आहे. हे एक रुपक नाटक आहे.

'An allegory is distungueshed from a metaphor by being longer sustained and more fully carried out in its details and from an analogy by the fact that the one appeals to the imagination and the other to the reason'—Encyclopaedia Brittanica Vol I pp 645

हे नाटक आध्यात्मिक आहे. यात तीन प्रकारची पात्रे आढळतात.---

(१) रुपक पात्रे : (१) विवेक, वस्तुविचार, क्षमा, संतोष, श्रद्धा, शान्ति, मति, करुणा, मैत्री, पुरुष.

(२) महामोह, काम, क्रोध, लोभ, हिंसा, तृष्णा, दम्भ, अहंकार, रति मिथ्यादृष्टि. विश्रामावती, मन, विष्णुभक्ती, सरस्वती, उपनिषद् संकल्प, वैराग्य, निदिध्यासन आणि प्रबोध.

(२) प्ररूप पात्रे : चार्वाक, भिक्षु, क्षपणक, कापालिक, वट व शिष्य

(३) सामान्य पात्रे :--सूत्रधार, परिपार्श्वक, सारथी, प्रतिहारी व दौवारिक त्यात सत्पक्ष पात्रे पहिली दहा आहेत. बाकीच्यातील नंतरची दहा असत्पक्षाची आहेत. शेवटचेसात सत्पाक्षाला पूरक आहेत तर चार्वक, भिक्षू क्षपणक व कापलिक ही असत्पक्षाला सहाय्यक आहेत.

भारतीय भाषाभगिनींच्या वाङ्मयाचा तपास घेता, ह्या नाटकाचा अनुवाद अनेक भाषांत झाल्याचा पुरावा आढळतो.

(१) तामीळ : वेंकटराम वेंकटेश भट्टी पुटकोट्टे यांनी अनुवाद केला. प्रकाशन १९११

(२) तेलगू : नदिमल्लमा आणि घन्टसिंगभा ह्या दोघांनी प्रबोधचंद्रोदय नाटकाचा अनुवाद प्रबंधकाव्यात केला.

(३) मल्याळी : साहित्य मल्याळीमध्ये ह्या नाटकाचे तीन अनुवाद झाले असे केरळ साहित्यचरितात म्हटले आहे.

(१) कुक्कुमपल्ली रामनपिल्ले ह्यानी केला (१८४६-१९१२)

(२) शंकुश्ष्णिमेनन (१८९३) मध्ये केला.

(३) सी. ए. नानुवैया शास्त्रीनी तिसरा अनुवाद केला. (१८५०-१९१३).

२. (२) तेलगू--- नदिमल्लमा आणि घन्टसिंगमा ह्या दोघांनी अबोधचंद्रोदय नाटकाचा अनुवाद प्रबंधकाव्यात केला.

(३) मल्याळी– मल्याळीमध्ये ह्या नाटकाचे तीन अनुवाद झाले असे केरळ साहित्यचरितात म्हटले आहे.

(१) कुम्मम्पल्ली रामनपिल्ले ह्यांनी केला. (१८४६-१९१२)

(२) शंकुण्णिमेनन (१८९३) मध्ये केला.

(३) सी. एन. एनानुवैया शास्त्रीनी तिसरा अनुवाद केला. (१८५०-१९१३)

(४) बंगाली–श्री. विश्वनाथ न्याय रत्न ह्यांनी १८३९ मध्ये केला हे बंगालीतील पहिले अनुवादित नाटक होय. (प्रकाशन १८७१).

(५) फारशी—डॉ. सोमनाथ गुप्त ह्यांच्या 'हिंदी नाटक साहित्य का इतिहास' ह्या ग्रंथावरून असे दिसते की, मुन्शी कन्वासीदास ह्यांनी ह्या नाटकाचा अनुवाद 'गुलजारे हाल' ह्या नावाने शहाजहानच्या कारकीर्दीत केला. (३) बलीराम साधूने केला. तो हिंदी नाटकांना प्रेरक ठरला आहे.

(६) गुरुमुखी :-ज्ञानदास साधू ह्यांनी १७८९ मध्ये ह्या लिपित रचना केली.

(७) इंग्रजी :—जे. टेलर ह्यांचा अनुवाद प्रसिद्ध आहे. १८११. फ्रेंच.

French :—G. Deveze कृत Le Lever de La Lune de Counaissance.

Russian :—Kovalevsky यांनी प्रबोधचंदोदय या नावानेच केला.

Danish :—(Dutch) T. W. Boissevain ने केला.— Maansopgang der out Waking.

German :—(1) The Goldstucker ने Die Gubert des Begriffs.

(2) Dr. Bernhard Hirzel, Zurich—Erkenntrisnon. danfgang.

# श्री सीताकल्याण नाटक

।। श्री गणेशाय नमः ।।

नाटचारंभ करून सीताकल्याण नाटक सुकविरचित या रंग भूमित नाटच करितों या करितां सकल सभेस आनंद व्हावया सांटिं कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : विजय वैभव मंगल दायका ।। निजजनाद्भुत सौख्यविधायका ।।
गज मुखावरदावक विनायका ।। तुज नमो अजि सिद्धि विनायका ।। १ ।।

सूत्रधार : यापरि विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीचि स्तुति करितो पाहा.

श्लोक : आतां प्रार्थु वागधिष्टान वाणी ।। ध्यातां जीतेंधी प्रकाशान वाणी ।।
वीणाहस्तें वाजवी रम्यवाणी ।। नाना विद्यामूल जे किर वाणी ।। २ ।।

सूत्रधार : ऐसे भारतीचें स्तवन केल्यानंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : सत्य ज्ञान सुखैक सारजलधी गंभीर जो शोभला ।।
प्रत्यग्रूप अरूपमान निखिलाधिष्ठान कर्ताभला ।। मोहातें हरूनी स्वधामीव तरी जो भेदखेदातुरा ।। तो हा सद्गुण धाम राम नमिला श्री देशिकांचा तुरा ।। ३ ।।

सूत्रधार : या परि महाविष्णुचे स्तोत्र केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : जीवेशद्वययेकचिद्धन अचिल यी लोकयतें वेगलें ।।
ऐसे वेदरहस्य सुचवुनि जो विज्ञान मुद्राबले ।। मौनेंचि हरि शिष्य संशय तया द्वैतात्मक स्पूःतिला ।। वंदु त्या गुरुमूर्तिला समरसें श्री दक्षिणा मूर्तिला ।। ४ ।।

सूत्रधार : या प्रकारे सकल देवता प्रार्थना केल्यानंतर नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पाहा.

श्लोक : जनकसुतेचा नाहो जनक अजाचाहि कां म्हणो नाहो ।।
सासुचा पतिदेवो तो सुखसांम्राज्य आमुतें देवो ।। ५ ।।

वचन : येथें श्री प्रतापरामचंद्र महोत्सव बिलोकनार्थ सकल विद्वज्जन मीनले आहेत ते कैशे म्हणशील तर.

श्लोक : गुरु कलाधर आणि कवि अरे । वसति येक चिते विविविं बरे ।।
सकल येथील सभ्य भले महा । गुरु कलाधर आणि कवि पहा ।। १ ।।

तरि या सभ्यास अनुरूप अपरूप नाटक नाचुन रंजवावें. परंतु ते सुचत नाही. विसरलास काय महाराष्ट्र भाषा, ग्रंथित जानकी परिणयाख्य नाटक-रत्नाला तू म्हणुसि इतर नाटकाहून यांत अतिशय काय तरि तेचि ऐक.

श्लोक : जीवन्मुक्ति इनाम नामीवतरी उच्चारितां पामरा ।
ज्याचें श्रीपद पद्म पूज्यपरम ब्रम्हादिकां सांमरा ।।
जो कां पूर्णरस स्वरूप म्हणुनि आम्नाय बोलेगिरा ।
तो जेथें प्रतिपाद्य ग्रंथ न कसा हा दिव्य काव्यीं हिरा ।। १ ।।

श्लोक : क्षणभंगुर शृंगार ।। प्राकृतांचा असंशये ।।
अजरामर शृंगारधाम किं राम हा स्वये ।। करूणेचा तरि पूर्ण वरूणालय साजिरा ।
वीराग्रणी असे कोण श्री रामाविण दूसरा ।। १ ।।

**श्लोक :** विचित्र सृष्टी रचना चातुर्यास्तव राघवीं।
अत्यद्भुत रसव्यक्ती आहे निश्चित आघवि ।। १ ।।

**वचन :** यास्तव तदिय महिमा प्रकाशक नाटक उत्तम म्हणून सांगावें कायें. कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ?

**श्लोक :** प्रतापराम सद्भक्ती विभवोद्दाम जो महा ।।
प्रतापसिंह राजर्षि प्रणीता यासि तो पहा ।। १ ।।

**श्लोक :** पुण्याचि तरि साल सद्गुणतती गण्या न ज्याची कथा।
अन्या जेथर्वससमृध्त विनयें अन्यादृशी संपदा ।।
जन्या जेथुनी पूर्ण पै सुजनता संन्यायनिष्टाग्रणी।
धन्यात्माधरि जो हृदबुजि धरा कन्या असूचा धणी ।। १ ।।
ग्रंथ कर्ता प्रतापेंद्र चातुर्य निधी भाविक। प्रमेयवस्तु उद्दाम जानकी राम भावुक ।।
भरताग्रज कारूण्यें अम्ही भरत दर्शनी ।। पद्नाटक सामग्री समग्र मिनली क्षणी ।। १ ।।

**वचन :** पारिपार्श्वका तुझें चित्त परिणत होऊन श्रीरामभक्ती मार्गि लागलें सारिखे दिसतें तें जेविं दशरथ रायानें दशदिशा जिंकून अखंड सांम्राज्यासनिं बैसूनि राम लक्ष्मणादि चौघा पुत्रांकडून सुख अनुभविजेलें त्या प्रमाणें त्वांहि दशेंद्रियें जिंकून श्रीरामचंद्र सेवेस लाऊन अनन्य साधारण सद्भाव भद्रासनारूढ होऊन चतुर्विध पुरुषार्थ प्रयुक्त नित्यानंद भोगिजेता अैसे वाटतें.

**सूत्रधार :** अैसे संवदतां सुमंत्रा समवेत दशरथ महाराज येतो पाहा.

**दरू :** ( रा० सु० )
दशशत भानुकुलोत्तम येतो ।। दशरथ भुमि पति दशदिकू प्रांतहि लंघुनि ज्याची ।। पसरली कीर्तिलता अति जगतिं ।।
तामर साक्षन तामर तरू जो तामस प्रकृति सदूर अहो महा ।।
ज्या महानिप गुणाब्धि पासुनि रामचंद्र तो संभावला पाहा ।।
श्री मदयोध्यापुर पाल करण भीम सुकृत शाली बहु परिसा
धीसदग्रणीसचिव गुणी निशिमसुमंत्र बसे ज्यासरिसा ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रधानासि दशरथ महाराज आल्यानंतर त्यातें विलोकून सुमंत बोलतो पाहा.

**वचन :** अगाये राजेंद्र तुजसमान भाग्याचा कोणहि नाहि. ज्याचे पोटीं श्रीरामचंद्रासारिखे अपूर्व रत्न प्रगट जाले तेंचि ऐक.

**श्लोक :** रूपाने स्मरतात सद्गुणगणा कूपारसामादिकी ।।
सुपाई पटु सर्व पूर्विल भल्या भूपाहुनि आणिखि ।।
जो फार द्विज देवभक्त अथवा सोफा दयेचाचिया ।।
रोपातें खुडि दर्शनांचि असुखा रोपाख्य मोहाचिया ।।

छंद : सुचिर काल स्या साधिलें तपा। सचिवता तुझि लाभलों नृपा ।।
प्रचूर चिद्घनानंदसाजटि। अचुक राम हा देखतों दिलि ठी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सुमंत्रानें राम स्वामीचा महिमा वर्णिता तों यदृछेनें तात दर्शनार्थ लक्ष्मणासहित रामचंद्र येतोहत पाहा.

दरु : रामचंद्र पहा ।। येतो प्रतापरामचंद्र पाहा ।। रामचंद्रनिरामयाद्भुत धाम सद्गुण धाम सुखधन पुंजीकृत पुण्य अगलें रघु पुंगवाचे जो चांगले मुंजी वेष्ठनज्येचें शोभले ज्याशी मंजुल कटितटी ते भलें स्वरण कंज युगलि झलं-झलित शुभ मंजिरामररंजन प्रभु ।। १ ।। चिमणें-चाप बाण सुंदर हातीं पाठीं चिमणा भाता बाण मंदिर चिमणा चाले जैसा सिंधुर तैसे गमन करीं कंबु कंधर ।। वक्षि द्युमणि शतसम सुमणि मंडित चिमणि मालचि विमल झलकत ।। ३ ।। काकपक्षधर कोवला वेष पाकशासन मणि सावला ।। धाकटा भावु गुणागलासवें ज्या कनक प्रभला गला सद्या जो कटाक्ष विलोकनें भवशोक सकलहिं मोकला करिं ।। ३ ।।

सूत्रधार : येणे रिती लक्ष्मण सहित श्रीरामचंद्रे येऊन स्वजनकाचे चरणाविंद वंदितां सुमंत बोलतो पाहा

श्लोक : रमाविरिंचि दिक्पति हिमांशुइंद्रगीष्पति जयाचिया पदाप्रति जयार्थ नित्य वंदिति ।। अजात रूपहिं सदा अजात्मजाचि या पदा ।। प्रमाण सारितो पाहा जनांत धन्य भूप हा ।। १ ।।

वचन : तैसीच कौसल्या जननींहिं मोटी धन्य जगज्जनकानेंहिं जीचें स्तन्यपान केले.

सूत्रधार : ऐसे सुमंतानें कौसल्या देवीस स्तवितां उन्मनी सखीशीं ते येते पाहा.

दरु : तुंग मंगला बुधि येते पुण्य संगिनी गुण गणवति ।।
अंगजतात जननी दशरथ नृपपुंगव वर निज अंगना सुदति ।।
इंदिरेश द्वंनिर्द्वंद्व योगिंद्र ।। वंदनीय चरण कमल तो निज ।।
नंदन सुर रमण म्हणुनि सुखमय ।। सिंधु तपोहत अदिति सदृशसति ।।

सूत्रधार : येणे रिती कौसल्या देवी येऊन दिव्य ज्ञानानें समजुन उन्मनीसिं बोलते पाहा.

दरु : (सुरटि)
देवता सार्वभौम हाच कीं येक ।। जिवलग निज साजणी ।। हे वरकड सारे देव वंदावेचि अवतार हिं होती भुवन पति हरिचेच रमणी सांग ऐसा ठसा सारसाक्षि कोठेंहिं चांग निरखिला काय ।। पाहतां पांग दृष्टीचा फिटे धांग तनूचि तुटे आंग हें आनंदमय ।। चांग भांग करूनि संतोषें आणि ।। आंगणि नटतील किं मुक्तीहिं ।। म्हणऊनि अगयी हें घन पघलुनि मन नगणि आणिका सुगुण सागर निगम सन्नुत जगनगासि प्रगट कनकाचि रघुकुलाग्रणि ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती आत्मारामं सुख समुद्रांत कौसल्या देवी पोहत असतां तो येकायेकीच वीणारव मिश्रित भगवतगुण कीर्तन कानीं पडतां हे काय म्हणून चौहुंकडे विलोकितां नारद येतो पाहा.

**दरु :** ( शाहना )

नारद मुनि येतो पाहा ।। गुणवारिधिश्रेष्ठ महा ।।
सरस जटाजूट शिरीं धरित स्फटिक हार उरिं ।।
स्वरित वल्लकी करीं स्मरत मुखें रामहरी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती नारद मुनी येतांच त्यास अभिमुख जाऊन दशरथ महारायानें यथोक्त पूजा केल्यानंतर तो रामस्वामीस विलोकून बोलतो पाहा.

**श्लोक :** अंतर्बाह्य हिं माखिलें समस्सें मुक्ति सदा चाखिलें ।।
प्रेमानें निज आंखिलें करुनि जे भक्ति मनीं राखिलें ।।
ध्यानीं संतत रेखिले मुनिजनें संवेद्य वेदेंखिलें ।।
जीवाहुनि लेखिलें मधुर स्या ते ब्रह्म हें देखिलें ।। १ ।।

**दरु :** ( राग सावेरि )

दशरूप धरणार देवदेवाचि ।। दैवें हे देखिली मुर्ति ।। मीन रुपें निगम जीणें उद्धरीयेले ।। निगत नुत ते श्रीमूर्तिहेचि ।। क्षोणिकूर्मा कृति जे नित्य धरि पाठिंस गिरिवन ते श्री मूर्तिहचि ।। दानव कनकाक्षदारूनी महीदाटे जिघृत जीणें ते श्रीमूर्तिहेचि ।। श्री नरहरि वेणें जीणें हिरण्याची घेतली बली ते श्रीमूर्तिहेचि ।। पातालि बलि तो घातला जीणें ते वामनाकृति श्रीमूर्तिहेचि ।। पातकि क्षत्रिय घातित जीणें भृगु जातरूपें श्रीमूर्ति हेचि ।। यातु धान वृंदयावरि निवटिल मुनि निमित्त श्री मूर्तिहेचि ।। गौतम सती करील पूत श्री पदांवुज रजकणें श्रीमूर्तिहेचि ।। २ ।।
गोपविग्र हे जीणें तो परि हरि जेल जगति भर ते श्रीमूर्तिहेचि ।। जे पियुष किं गोपिकानयाचे सुखकर ते श्री मूर्तिहेचि ।। पापी दैत्य भुलऊं स्थापिल कुमत ते बुद्ध रूपे श्रीमूर्ति हेचि ।। कापूनि काढिल कल्लिक वेषें तुरूकाकलि अति श्रीमूर्तिहेचि ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेंरिती रामस्वामीचे स्तवन करून कौसल्या देवीस विलोकून पुन्हा बोलतो पाहा.

**दरु :** (राग घंटा )

उदरते नमि तुझें सुदति अमये ।। उदित जामाजि गुण उदधि आनंदमय ।। उन्नय चरणेंचि हे त्रिभुवनें मोजि कीं प्रभुवरें ज्या जगत्प्रभवमुलें विभुसि जेणें तयाविसि भरहिं असुनिया निधृत नवमास घननिभनतु लागिभलें ।। १ ।। रोमरंध्रहि भिजंड हे महोदधिसात ।। ज्या मखक्रोड जन्मिन पुरलें तो महा पुरुष सामावला ।। जेथें (चिव्धोमतिलिचापूर्ण)? सोम अद्भुत असें ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती कौसल्या देवीस देवऋषीनें स्तवन करून वसिष्ठ महामुनिचें भाग्य काय म्हणुन वर्णु त्याला राम स्वामीचे पौरोहित्यहि लाभलें ऐसें संवदता वसिष्ठ येतो पाहा.

**दरू :** पुण्यशील हीरजलजजन्य सुत भला ।।ग ण्य थोर मुनि माजि वर्णनीय प्रभाव आला ।।

सूत्रधार : येणे रिती वसिष्ठ येऊन नारदाचे आगमन कार्य विचारितां तो बोलतो पाहा.

छंद : कलहरूप भक्षणाविना तलतलुनि म्या पाक शासना ।। हर्लुचि याकरितां बोलिला कसें फलितगा तुझें भाग्यकि असे ।।

वचन : याप्रमाणे देवेन्द्राने सांगतां मद्‌भाग्योदय हेतु म्या विचारितां त्याने प्रत्युत्तर दिलें कि दशरथ महाराज मंदिरी कलह मूल येक मूल जन्मलें आहे. तेथें जाऊनि ऐस विश्वामित्र मुनिसवें तें निधान बाहेरी निघातां तात्कालिक तुला सुंठी साखर मिळेल पुढे चारि दिवस लोटल्यानंतर जैशी भेंडाळी लागल तैसें सावकाश खाजें मिळेल. ऐसें देवराजें सांगतांच मनोवेगासहित मार्गे घालून येथें पावलों.

सूत्रधार : येणे रीति नारदानें स्ववर्तमान सांगतां तो विश्वामित्र मुनि येतो पाहा.

दरु : (राग सावेरी)

कौशिकाख्य तो मुनिकुल केसरी येतो पाहा कोशलवहु अपर भुवन कार्य करणी जासतो हा तपूनि तप अपार ज्यानिपुण बरें पहिलें नपर प्राण ब्रम्हण पण अपण पूर्ण साधियलें ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीति विश्वामित्र मुनिनें येऊन बंक नायकास सांगितलें कि अरे मी आलों तें वर्तमान शीघ्र दशरथ रायास निवेदि. तें मुनिवाक्य ऐकून द्वैवारिक राज सन्निधानि येऊन वृत्तांत निरोपितो पाहा.

दरु : (राग कांबोदी ।।)

महनीकिर्ति आला मुनिराज ऐसा ।। माथा ज्याचे जटाभार तेथें करूनि
या भार नाथा बोलें गोड फार खगसंभार तो कैसा ।। १ ।।
गमतो चरितें विश्वमित्र ।। नामतरि धरि विश्वामित्र ।।
राम आणि ते सौमित्र ।। ज्या प्रियमित्र दुसरा तैसा ।। २ ।।

सूत्रधार : ऐसें दैवारिकाचें वाक्य ऐकतांच दशरथ रायानें कौशिका समोर जाऊन यथोक्त पुजून विनयपूर्वक बोलिजलें पाहा.

शीस पद्य ।। बालतां शेत दैवेंचि तेथें जसा ।।
बोलुनि मेघ तो वर्षतो हे ।। माल मता बहुमान रिक्त किं ।।
चालितां मेदिनी चांगला हे ।। कौलकांता स्थलि मूल वृध्दा जसें ।।
श्रूलपाणी दयेसाच होये ।। मालमूढा गळां चालिकिं वास्वता भालुनि मुक्ति
पैं भाग येथें आपुलें तेंविकिं आजि येणें हें पाहा जाहलें हर्षकेणें ।। तापगले
पलुनि तीव्र भेणें ।। व्यापलें सौख्य सर्वत्र तेणें ।।

दरु : (राग यरुकुल कांबोदि)

धन्य दिन आजिचा पुण्य राशि जगन्मान्य तुं आलासि मंदिराशि ।।
सफल झालें जननसपरि करकुल भलें ।। स्वपदि निश्चित अजि सत्य ठेलें ।।
अपर सूर्यापरि अपुलि या दर्शनें ।। सपदि हृत्तम गाळ सकलहि गेलें ।। १ ।।
कोश पंचक सगट कोश धन धान्य दल ।। कोसलामिध मुदित कौशिक हा
देश तुजचि असुंदेशिकाधेयिगा देशिकाधिप असंदेह सौख्यावहा ।। २ ।।

**सूत्रधार :** या प्रकारें दशरथ रायानें नित्यपूर्वक सर्वस्वहि आपुलें आहे अभिष्ठार्थ सांगून माझें जन्म सफल करावें म्हणुन अनुवदतां विश्वामित्र उत्तर देतो पाहा.

**दरु :** राग ( ब्याडगी )

सोडुनि येका आत्मारामां दुसरी तें जोडी। झोडीच नको राम रामा बात्य विषयीं गोडी। नाहींच मनीं थोडीहि सार्व भौमा ।। धृ ।।
मंदिरें माडचा आणि सोफे' पर्णकुटीचे बृदेचि असती आम्हा सोपे ।। माथां भर्जरी। मंदील जटाजूट सुंदर नित्य थोपे ।। १ ।। मुक्ताध्व निरता अम्हाला रे।। स्फटिक रूद्राक्ष मुक्तारत्नाचे हार सारे।। बैसलों योग युक्तोवेराग्याचिये तक्तावरीच बारे ।। २ ।। चतुरंग सैन्य स्थानिं स्वयें, संनघ्र असे चतुरासाधनच तेष्ठय अष्टैश्वयचि अतुल झुलती हती अति मात्र दानान्वयें ।। ३ ।। अष्टांग यमनियहमादिक योगाचि तेचि अष्ट प्रधान गुणाधिक संतत ब्रम्हनिष्ठा राणिशिनर श्रेष्ठारमतों ऐका ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणे रीति विश्वामित्राचें वाक्य ऐकून दशरथ बोलतो पाहा.

**वचन :** स्वामी कोणत्या कार्यासाठीं आपण रामस्वामीची अपेक्षा धरितां ते मज प्रति सांगून कृतार्थ करावें.

**सूत्रधार :** येणे रीति दशरथ रायाचें वाक्य ऐकून कौशिक उत्तर देतो पाहा.

**श्लोक :** जिज्ञासा असिली तरि परिसगा प्राज्ञासमाचार हा।
यज्ञारंभण मांडितांति अजि म्या अज्ञान सांटे महा।
विध्नातें रचंयेति राक्षस सुशीलध्नात याते रणीं।
भग्नांगा करूं राजयारघुवरा आज्ञापिजे येक्षणि ।।

**दरु :** ( राग कल्याणी )

गैकरित्नाशी गुणधामा माझें ऐक वृत्त जगदभिरामा ।।
अनु. ।। ऐकुनियातें वोखदहिं शीघ्रैं तुं करीं देउनि श्रीरामा ।।
प. ।। श्रवण मनन ध्यान जे पांहे तीनिते वन्हि प्टउनि पाहें ।।
अविवेक पश्रु तेथें अरपुं जातां येती अवशेधुं राक्षस लवलांहे ।। १ ।।
हिंसक तो ताटकानीच तम मांसल अविद्यामानीच ।।
ध्वंसु यज्ञ धांवे ।। धिगतीचा सुत संशय लक्षण मारिच ।। २ ।।
विपरीत निश्चयसुबाहु ।। तोंहिं आपण येवोनी दृढ बाहु ।।
उपजतो जातो या उपलाचिकरिवरी अपरिमित वृष्टिकशी साहु ।। ३ ।।
अंगलग हे तो जीवाचे असत्संग लक्षण दशग्रीवाचे ।। भंगतील रणरंगी परि नृप पुंगवाकरि राघवाचे ।। ४ ।।

**सूत्रधार :** येण रिती विश्वामित्राने वर्तमान सांगता दशरथ उत्तर देतो पाहा.

**वचन :** स्वामी पूर्वी आपण कोणकीं मोघम राक्षस यज्ञान विघ्न करिताहेत म्हणुन सांगतांच सैन्यासहित येऊन मीच त्यास संहरीण म्हणत होतों. रावणाकडील ते मारीच सुबाहु राक्षस ऐसे बोलतांच माझें हातपाय गळालें. तेथें राम स्वामीस त्यावरि भांडायास धाडणे कैचें। हें पर चें लेकुरूं तेंचि ऐका।

श्लोक : हा माझा बाल भोळा अजि अझुणि तिला मागतो आज्यं गोळा।
यद्धाच्या ज्या न मोल। विदित न भरली आणि वर्षेहि सोळा।।
तो रक्षो वृंद हो टोलावधिल। रणि कसा जे करूं विघ्व गोळा।
शक्त स्वामी जन चोला मम जीव उगला किं दयेंने बोला।।

सूत्रधार : येणे रिती दशरथ रायानें रामस्वामी धाकुटा याला थोर थोर राक्षसरणीं अजिक ऐसें म्हणतां कौशिक उत्तर देतो पाहा.

श्लोक : तमाच्या त्या राशिशम विजशि सानीच दिवटी।
अघाच्या किं कोटीलघु हिं हरि हें नाम निवटी।।
वघी किं सिंहाचें पिलु शिरूनिमत्ते भजवंटी।
तत्मारक्षो बृंदा गिलिल शिश्रु तुझा रणवटीं।। १।।

वचन : याचा महत्प्रभाव भले त्यास कलेना तेंचि अंक।।

दरु : ( राग आहरि )

देहमि असंदेह चिंताणारा राम कसा समजे। गेहदाराध नमोहिं गुंतणारा राम कसा समजे।। १।। वासरनिशि भेदवास नैक परा राम कसा समजे ज्यास नसत्सहवास अज्ञान रांराम कसा समजे।। २।। सौम्य पणासह-साम्य योग दुरा राम कसा समजे ग्राम्य भोग अति रम्य भावणारा राम कसा समजे।। ३।। सात्विक जीनधर्म साधन विमुखां राम कसा समजे।। ४।।

सूत्रधार : येणे रिती विश्वामित्रांचें वाक्य ऐकुन आपुल्या गरजे साटि हा फुस लावुन राम स्वामीस राक्षसाचे हाती वोपीन म्हणतो त्यासाठि निदाक्षिण्यें निषेध करावा. हे निर्धारून दशरथ राज प्रत्युत्तर देतो पाहा.

दरु : ( मोहन )

राम नदे सीहा मुनिनाथा आत्माराम दे मी हा।।
प. ।। स्वामिया नमितसें पाय हे महानुभाव आजि आतां।।
अनु प. ।। साठी हजार वर्षे लोटल्यावरी ज्या साठीं करूनि साहस कोटी सुम होजापोटीं मझिया सौख्य पेटी जन्मला वोजा।। गोठींव लावण्याची जो ठिक मूर्ति माझा।। १।। मीन न बांचे पथसाहिन सर्वथा जैसा।। किंनरा हेचि रहित प्राणे तनुचाठसा वीण राघवा तैसे जीणें आमुचें परिसा कोण्हि सांगोपरि कोंदणपाणी साहसा।। २।।

सूत्रधार : येणे रिती दशरथ रायाने राक्षसाचें भय धरून राम स्वामीस देत नाही म्हणून खंडित उत्तर देता पुन्हा कौशिक बोलतो पाहा.

वचन : राया या तुझ्या नंदनाचा प्रभाव तुला ठाऊक नाही. कोणास अवगत आहे म्हणशील तरी सांगतो ऐक.

श्लोक : अहं वे झिमहात्मानं रामं सत्य पराक्रमं
वसिष्टोपि महा ते जायेचे मेतपसिस्थिताः।। १।।
यापरि वसिष्ठांदिका सही अल्प स्वल्प कळते।।

सूत्रधार : येणे रिती विश्वामित्र संवदतां वसिष्ठ येतो पाहा.

दरु : ( पुण्यशील )
यापरि वसिष्ठ आल्यानंतर त्यासही विलोकून दशरथा प्रति कौशिक बोलतो पाहा.

दरु : ( शहाना )

कोण राघवाचा मपहमा जाणेसा आहे ।। ब्रम्हेशानादिक सुरवर सारे ।।
वानिती ज्या नरोत्तमा ।।
अ. ।। जगतीश्वरा तपोवनिं ।। अगणित नित्य तप तें तपोनि ।।
प्रगटचिलेशानुभाव तो मनि ।। योगींद्र जाणे मी दुर्गम म्हणुनि ।। १ ।।
ज्वलित ब्रम्ह तेजें महा ।। सलिलज जन्म पुत्र किं हा ।।
कलित प्रबोधें तापस पोहा ।। जाणता काहीं या दिव्य देहा ।। २ ।।
निगम जेथें माघारले विगलित गर्वतर्क हिं फिरलें ।।
अगदि हिंसनकादिक तेथकले निगदिति जें रूप न कले न कलें ।। ३ ।।

**वचन :** तु म्हणशील कि सर्वदा मला राम स्वामीचा सहवास आहे ऐसे असतां याचा महिमा ठाऊक नाहीं.

**श्लोक :** धीनेत्र ज्याचे अति चारूशीला ।। किं पात्र ते नेविण चालिशीला
सूक्ष्माक्षराचे परि सार्वभौमा ।। देखेन तो नीट हृदिस्थ रामा ।।
निरंतर निधीवरी नृपति नांदतांहि जनें ।। परंतु तनयादिठी
निरखिजे विना अंजने ।। प्रबोध विमलां जनाविण निरंजना राघवा
तसानर न जाण तो असुनि संनिधि आघवा ।। २ ।।
निकट वसुनि पद्माचे तटाकिं चिखोला अनुभवि परि तो किं भेक
माति चिखोला ।। अलिगण असुनी हिं दूरशेवी परागा कलत प्रभुत
साहा आत्म निष्ठापरागा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती विश्वामित्रानें बहुतां प्रकारें रामस्वामीचें स्वरूप कोणास कलेना अजरामर म्हणून सांगतां ही पुत्रवात्सल्पबद्ध दशरथ रायानें यज्ञरक्षा आणि राक्षस शिक्षा या दोन्ही कार्यासाटी कोदंडदीक्षा गुरुस परिछिन्न देत नाहीं ऐसे वदतां कोपायमान कौशिक बोलतो पाहा.

**श्लोक :** स्पप्ना भीतरी दत्तदानहि हरिश्चंद्रें मला कौशिका ।।
केले सत्यचि धर्म सूक्ष्म पुसुनि आपुल्या देशिका ।।
खंडूनि निज मांसतें शिबि नृपें श्पेनाशि दिल्हें बरें ।।
रक्षू सत्य दिल्या स्वअस्थिहि दधिचिनें महेंद्रा त्वरें ।। १ ।।

**वचन :** या प्रकारे थोर थोरांनी सत्य वाक्य परिपालनार्थ स्वंस्व प्राणपर्यंतहि दिल्हें त्वाहि त्याहुनि अधिक मला गौरविलें तेचि ऐक ।।

**श्लोक :** नास्तीत्युत्तर लक्षणा मज भल्यादुस्तासि देऊनितां । अस्ताद्रि उदयाचलावधि यशाविस्तारिलें तत्वता ।।१।। स्वस्ति क्षेम असो तुतें दशरथा प्रस्तूत सन्मानसा । स्वस्थाना प्रति जातसें फिरूनियां निस्तोष आलों तसा ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती रागानें गरगरा डोले फिरवून मुखाने मृदु गोष्टी बोलुन विश्वामित्र मुनीनें चारि पावले दूर जातांच भूकंपादिक उत्पात निर्माण झाले तें विलोकून वसिष्ट बोलतो पाहा.

(श्लोक) ज्याच्या तेजा परंपराचि न जगि जणू लोपति कोटिशंपा ।
विश्वाच्या शीघ्र संपा करिल शिखि जसा जालि तो शुष्ककुंपा ।।
पाहे भूहेसकंपा घडलि धरूनियां सर्व धूतानु कंपा ।
याचीच प्रीति संपादणि करितनुजा देऊनिया आलिपा ।। १ ।।

वचन : तूं म्हणशील विश्वाचा संहार करायास विश्वामित्रास सामर्थ्य असलें तर राक्षस मारायास्तव राम स्वामीस कां मागते तरि यांचे उत्तर ऐक.

(छंद) निपटुं राक्षसांदक्ष हातया ।। तवसुता यशश्रीहिं द्यावया ।।
सवन रक्षणाचा मिसें यया ।। अवनि वल्लभा इछि न्यावया ।। १ ।।

(श्लोक) संकल्पेंचि विचित्र विश्व विरचुं विश्वंभरू शक्तांकि ।।
अस्ताहिं परि अष्टधा प्रकृतिचि अस्थाजसि त्यांनीं किं ।।
तैसा राक्षस शिक्षणिं क्षमचि हा अक्षम्य शोईन्वयें ।।
कीर्ति श्रीतव नंदनादि वितरूं गात त्सात्ध इच्छी स्वयें ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती हितावह पुरोहिताचे वाक्य अैकून दशरथ रायानें श्रीराम लक्ष्मणास कौशिकाचे हातीं समर्पून प्रणाम करून त्याचा आशीर्वाद मकुटावर ठेऊन नित्यानंद मंदिरी आल्यानंतर उभयता राजकुमार नारद मुनि या समवेत कौशिकानें सिद्धाश्रमाचि वाट धरितां मार्गि बध्दांजलि रघुराज त्या प्रति बोलतो पाहा.

(श्लोक) कोणाचि गिर्द झाडी दिसत मुनिवरा पैल हे फार गाढी ।।
आळ्यानें वस्त्र धाडी गिरि शिखरि तसा घोषही तो गडाडी
वारा वृक्षांस पाडी पलति पशु मृगें कां भीऊनी उरांडी ।।
मांसदेहांसि काढी न ठिउनि पुसिल्यां माजि तो अर्धकाडी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती रामस्वामीनें वृत्तांत विचारितां विश्वामित्र प्रत्युत्तर देतो पाहा.

(श्लोक) सुकेंतु कन्या या अति विषमठा यां धरूनिगा ।।
असे जिचि काया विकृत रघुराया असुमगा ।।
जियेचा तो दायादकित्रि जगदा यास करणीं ।।
पटु मोटा मायावि हिं प्रथित मारीच म्हणुनि ।। १ ।।

**वचन** : बहुतेक तेच ताटका आम्हावरी चालुनि येते जणु त्यास्तवच हे श्वापद पलताहेत वाराहिं सुटला हे तीच्याच अट्टाहासाचा हा घोष यास संशय नाहिं.

सूत्रधार : अैसें उभयतां बोलत असतां ताटका येते पाहा.

(श्लोक) हस्तीचिनृकपालकं कणतती अन्योन्य संघवृतां
विस्तारे ध्वनी दिक्तीहिं जणु महा भाडें वळें फुटतां ।।

बस्तांचि हिरवि शिरेंचि घालिजतां जीच्या मुखी नेटकाम
स्तानक्षतज प्रवाह सुटला ते हे अली ताटका ।। १ ।।

दरु : ( आठाणा )
ताटका येते पाहा ।। तामशीण अति पापिणी खाटकाहुनिहि मन जीचें खोटें लोक संतापिती ।। दाढा थाराबल्यारूधिरें दांत तिखट शूला परी गाढाधकाराउनिहि गौर वर्ण बरी काढावासुरहि समरीं काढिती न टीकुनी पुढारीं ताडताड उडताचि उंचताडिचे झाडापरी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती ताटका येतांच कौशिक रामस्वामीस पाहून बोलतो

(श्लोक) पैठुनिया जिणें खाटकांचें परि आटिकेली जगव्धाटि केची बरी ताटका
हे अशी छांटुनि बालाका वाट कां पाहशी बांटिका कादिकां ।।

सूत्रधार : येणे रिती विश्वामित्राने अज्ञापितां स्त्रीवध शंकेने उगेंच राहतां तो भाव समजून पुन्हा कौशिक मुनि बोलतो पाहा.

(श्लोक) वक्रमार्गानुगा शक्तविद्वेषीणी शुक्रमातापुराचक्र हस्तें जनीं ।
विक्रमें मारिली त्याक्रमें तुं बरी प्रक्रिया हे सुहृच्चक्ररक्षुं धरीं ।।

सूत्र : येणे रितीं विश्वामित्रानें घे घे म्हणताच रामस्वामी लावितांच ते विलोकून नारद बोलतो पाहा.

(श्लोक) घ्यावया ताटका जीवचापीशरा लाविताचि जगज्जीवनें दुर्धरा ।
लांव हे शून्यता पावली जागरें मावलें स्वतिपचि माव जैशीत्वरें ।।

सूत्रधार : येणें रिती ताटकेचा संहार रामस्वामीनें करितां त्याप्रति कौशिक मुनि संतोषनें बोलतो.

दरु : ( चूर्णिका )
अगाये परिपूर्णानंद सिंधु आत्माराम आकर्णा कृष्ट कोदंड दंड निसृतकांड रूप कुठार खंडित प्रचंड ताटका रामा ।। निज सौंदर्य संदोह सिंधु बिंदुबंदी कृत: कंदर्प बृंदवृंदारकाभिरमा ।। दुष्टजण पिष्टी करण प्रयुक्त अभिव्यक्त संतोषे भवशोकादि रामा ।।
तुज दिव्यास्त्रमंत्र प्रदान पात्र करावया इच्छितो ।।

सूत्रधार : (रामा । श्लोक)
आज्ञावाक्य प्रमाण आपुलें प्राज्ञावेद समान सांगे गुणज्ञा मंत्र विधान माझें विज्ञापनें हें जाण अैकुनि ।।

सूत्रधार : येणे रिती श्रीरामाचे विनऊन अस्त्रमंत्र ग्रहणार्थ सिद्ध होता पुन्हा नारद बोलतो पाहा.

(श्लोक) निश्वासि श्रुति ज्याचियां निपजल्या विश्वंभरूं तो असा ।
विश्वासे अति अस्त्रमंत्र ग्रहणावीराणी पांसका ।।
विश्वामित्र मुनीस वोडवी जगद्विश्रामकर्ण स्वयें ।
विश्वाभीतरि धन्य हाचि गमतो विद्यानिधी निश्चयें ।।

सूत्रधार : येणे रिती नारद मुनी संवदंता रामस्वामिनें अस्त्रमंत्र ग्रहण करितां तें सकलहि प्रत्यक्ष होऊन देवादि देवा आपण स्मरतांच शेवेसि सिद्ध असतो म्हणून दशरथीचा निरोप घेउन जाता येथून सिद्धाश्रम किती दूर आहे या प्रमाणें रघूत्तमानें पुसतां कौशिक मुनि प्रत्योतर देतो पाहा.

(श्लोक) ज्या आश्रमिं घडत शाश्वत मोक्ष सिद्धी। तो सिद्ध आश्रम म्हणुनि जगप्रसिद्धी ।। तो हा नृदेहचि अगा शरचापपाणी येथेंचि राहुनि वरी निज मोक्ष प्राणि ।। १ ।।
जो तुं हृदिस्थ हरिता सकळ श्रमासी ।। आलासिया म्हणवुनि शुभ अश्रमासी हा जाहला विमल आश्रमसत्य नामा। नाही तरी निरय भौमचि जाण रामा ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती कौशिकानें बोलतां तों ने पथ्यांत जयत्यति बलोरामो लक्ष्मण श्वमहाबलः ऐसा शब्द होतांच तें काय म्हणून आत्मारामानें पुसतां हे सिद्धाश्रमवासी मुनिजन आपल्या दर्शनार्थ आले या प्रकारें मुनीश्वरानें प्रत्योत्तर देतां मुनिगण आले पाहा.

दरु : (व्यागडा)
भावशुद्ध सदैवलसदनु भाव मंडित आगले पावले
सिद्धाश्रमनिवासि ते पावन रुषिराज पैं भले ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सिद्धाश्रमवासी मुनिनी जगवंद्य रामस्वामी कृत वंदनाप्रति पात्र होउन आनंदानें स्वानुभव बोलिजोता पाहा.

दरु : रामरूपी मन पैठलें अहो ।। आपदेशिं मूल मी पणाचें पिसें आपण होऊन सूटलें ।। १ ।। ध्यान पथिं तथा ज्ञान पथि हिं शीण मानुनियां वीटलें ।। गण ठकाराचे ठायीं ठायीं दिसें ।। भान दुजे सत्य खुंटलें ।। ३ ।। ठेवणें आपलें केवल पूर्वीचें ।। दैव योगें अम्हा भेटलें ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रिती सिद्ध श्रमवासि मुनिजनांचे वास्तवस्तवन श्रवण करून संतुष्ट हृदयानें रामस्वामीनें निःशंक आपण दीक्षाधरावि राक्षसाचा उपद्रव वारून यज्ञ सिद्धी करितों ऐसें विनवितां कौशिकानें यज्ञ आरंभितां मारिचादि-रक्षोगण आले पाहा.

दरु : (वृंदावन सारंगा)
रक्षोगण येताति हे पाहा ।। दक्ष सुबाहु मारीचादि ।।
रूधिराचा पाऊस रौद्र पाडिताचिरूधुनि बाणि दाटदिशादहा ।।

सूत्रधार : येणे रिती यज्ञ विघ्नकारक मारीच सुबाहु प्रमुख राक्षसास विलोकून रामस्वामी लक्ष्मणासी बोलतो पाहा.

(छंद) निरखीं लक्ष्मणाया तुधान हे। त्वरित पातले अंबरी स्वये ।।
करूं मुनीचिया यज्ञ नाशनार्शरिं विदारितों यापलाशना ।।

सूत्रधार : येणे रिती मानवोत्तमें श्रीरामानें बोलून मानवास्त्रचापीं योजितांच नारद मुनि नाचत इतर रुषिश्वरास पाहून बोलतो पाहा.

(श्लोक) काम मारीच जो श्रमकुंनिश्चयें ।। रामबाणे अघग्राम विद्ध स्वयें ।।
या महागाढ दुस्ताम साव्धिमला । भीम तो मगन दुर्ग्रामणी जाहला ।।

दरु : बाहु खंडूनिसुबाहुलोलविला ।। बाहूंनरेंवीररायें महा ।। १ ।।
दाणादाण सारेराण भरी जाहले कोण पहत शेषखेदे आहा ।।

सूत्रधार : येणे रिती नारद मुनीनें वर्तमान निवेदिता विसर्वेघ्न यज्ञ समाप्त होताच विश्वामित्र संतोषाने रामस्वामीस आशीर्वाद देतो पाहा.

(छंद) त्रिजगगपीडिते राक्षसाग्रणी । निजविलेजिहिं हेरणांगणि ।।
विजय धामते क्षेम सर्वदा । भुज तुझे असोत प्रियवंदा ।।

सूत्रधार : विश्वामित्राचे वाक्य ऐकून उत्तर देतो पाहा.

(श्लोक) परिग्रहें चि सूर्याचे अरूणें भंगिजे तमा अनुग्रहें तसें या म्यां जिंकिलें राक्षसोत्तमा ।।

वचन : आणिखि अेक स्वामीस पुसतों तें काय म्हणाल तरी जनक राजधानीस आपले चरणराज पवित्र करणार म्हणून गुणगुण ऐकली, तरीं शिष्य वर्गासिंहि बरोबरी न्यावें.

सूत्रधार : रामस्वामीचे वक्तव्य ऐकून विश्वामित्र बोलतो.

वचन : रामस्वामी तैसेची घडो, परंतु तुं आतां श्रमिल जाला आहेस या सिद्धाश्रमीं विश्रांति घेऊन उदयीक जाऊं. (ऐसे बोलून उभयता कुमारासि चारि पाऊलें मार्ग क्रमितां तो येकायेकीं रामस्वामी चरण निकटीं विद्युल्लता झलकल्या प्रमाणे कांति फांकतां नारदादि मुनीश्वरानीं भयें मागें सरतां तों 'हे राम तुभ्यं नमः' म्हणून कामिनी मधुर स्वर कानी पडतां नारदमुनी बोलतो पाहा.)

(श्लोक) जांबूनदास मनिची अति दिव्य वानी । देखूनियां मुख कला शशि खेद मानी ।।
ऐशी वधू तव पदांबुजरजें शिला हे । झाली मुनींद्र रमणी रमते तुला हे ।।

सूत्रधार : अहल्या.

(छंद) कमल लोचना कंबुधरा नमितसें तुला श्रीमनोहरा ।।
अमित माझि या शाप दुस्तमां शमविलें तुवां देवसत्तमा ।।

सूत्रधार : येणे रिती अहल्यानें स्तवन करून पति निकट पावल्यानंतर स्वानंद मंदिरी रामस्वामी प्रवेशल्यावरि शृंगारोद्यानी विहारार्थ जानकी येते पाहा.

दरु : (अहेरी)

सुंदरी जनक नंदिनीं येते इंदिव राक्षी हे ।।
इंदिराचि गुणमंदिर जे सिंधुर गती सुख सिंधूच्च पाहें ।।
सिंदूर सिमंती सुंदर भरिलासे बिंदु प्रायमरी बृंद जी पुढां
इंदु लावण्यवि निंदक वदनार विंदजिचें स्वछंदत्नवोढा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती वैदेहि येऊन शुद्ध भावनासखीशी बोलते पाहा.

(श्लोक) श्रीमद्दाशरथीचिया सुचरिता ज्ञाते महा तापसी ।।
आनंदे करूनि समस्त भरूनि गातां स्वतातापशी ।।
कानीं ऐकुनिया मनीं न पें म्या मानिनी माडिलां ।।
ध्यानीं बिंबली मूर्ति तेचि दुसरी चिंता सखी सांडितां ।। १ ।।

(श्लोक) वामाक्षी नवलाव ऐक सपनी रामाख्य तोची सये ।।
कामासक्त घडूनि नूतन घन श्यामाभिराम स्वयें ।।
तो माझे कुचमंडली स्वकर जें सोमार चुंपातला ।।
या मागें सरतांहि याच न पथि त्या मागुती रातला ।।

वचन : तो प्रार्थना प्रकारहि सांगते ऐक.

दरु : (पुंनागवराली)
सरसी का वो मागें सरसीरू हायत सरस नेत्री चारूहासिनी अनुसर शीघ्र मज सर्वथा धरूनियां सरणि कृपेची विलासिनी ।।
सामान्य मी नव्हें सामजेंद्र गमने सामरासुर जगत्स्वामि किं परि प्रेमभावें तुझ्या हे मांगि पघलुनि कामा तिन्य आतां हें मागतों सखि ।। १ ।।
माझी तूं अनन्य भाज होसी। मनामाजि किंतु न धरीं मानिनी साजणी परी रंभा माज न करीं तनुमाज विरतिरस हे जगन्मोहिनि ।

सूत्रधार : या प्रमाणें वल्लभानें मोघमें स्वमहिमा वर्णिता तूं चंद्र किं उपेंद्र किं म्हणुन म्या नीट विचारितां त्यानें प्रत्युत्तर दिलें तें ऐक.

(श्लोक) परिस सजणि माझा सासर क्षीरसिंधु ।। चरण कमली यावो जन्मली दिव्य सिंधु सरसिजशर धाता दोघहिं पुत्र साचे। विरचित चरिताचे म्या जगत्ख्यात सांचे ।

दरु : नित्यानंद निधी मी तोचि पूर्णानंदनिधी मी तोचि ।।
नाभीसरोरूहनाली फिरला शंभर वर्षे सांग विधी मी तोचि ।। १ ।।
दचराचर जग रचना करि जो न चुकत पूर्विल नीट विधि ।। २ ।।
परता प्रकृतीस परमात्माकिं तरूणि जो करूणांबुनिधि ।। ३ ।।
येणेरीति तव्दाक्य ऐकून मी बोलिलें जरी आपणें नित्यानंद निधि तरीं क्षणिक सुख प्रार्थना अनुचित तेंचि ऐक.

(श्लोक) मागेल भीक धनदप्रभु काय येरां। लागेल उत्कट तृषा अजि काय नीरा। लोक प्रकाशन करू रवि दीपकासी। तो केंवि इछिल सदा जग जो प्रकाशी ।। १ ।।

वचन : या प्रकारें म्या पेंचून विचारितां वल्लभानें उत्तर दिलें कीं मज विषय — संसर्गय युक्त अणुमात्र सुख नाहिं परंतु ज्यानीं अनन्य साधारण प्रेम भक्ती केली, त्यास विकिला गेलों असो जन्मांतरीं तां माझें आराधन केलें ते रीण फेडावया तुझ्या लगामीं लागलों तो प्रकार ऐक.

**श्लोक :** वेदवतीच्या रूपें जन्मांतरिं तां तपासि कि जेले ।।
**(आर्या)** हे दैत्य वरूं तूतें त्यास्तव येणें यथार्थ म्या केलें ।। १ ।।

**वचन :** किंबहुना अनादि सिध्द तुं माझि अंतुरी मी तुझा कांत तेचि पूर्वोत्तर ऐक.

**(श्लोक)** मी श्रीयज्ञ वराहमूर्ति सखिये तूं भुजग धारिणी ।।
मी साक्षान्नर केसरी समज तूं लक्ष्मी मनोहारिणी ।।
मी तों भार्गवराम तुंचि हरिणी नारीसमूहत्तोमा ।।
विष्णुचा अवतार पूर्ण तर मी तूं लोक मातारमा ।।

**वचन :** या प्रमाणे जिवलगाचें वाक्य ऐकून म्या समरसें आत्मारामासि रमावें म्हणुन निर्धारितां पापिणी असंभावनेनें येऊन माझि बुद्धी चोरिली कि हा दशरथांपासून कौसल्लेचे पोटीं जन्मला। यास परब्रह्मत्व कैचें? हें तद्वाक्य ऐकतांच मी तटस्थ राहिलें इतक्यांत तो प्राणश दूऱ्हावला. सवेचि जागी झालें तदारभ्य चित्तवृत्तीचा प्रकार ऐका.

**(श्लोक)** तमालतरूतामसीरजनि त्यानभाततोयदा ।।
हिमांशुमुखीगोत्रभिन्मणिहिं देखतेंतोयता ।। समागतगमेतदारमण
रामनामायुवा ।। अमालहि पडेल तो विसर राम रामाजिवा ।।

**(दरु)** तेव्हां पासुन त्याचा जीवा लागला ध्यास ।। केव्हां देखनदिठी हे वाढतसे आस ।। वेडें लागले चित्ता ।। वेध दुसरा नाहिं ।। भेडसावितां कोण्ही भेंहिनवटे काहिं ।। गोड भोजन पान थोरचि न गमे पाहिं ।। वोढी वियोगाचि थोडी साहवेनाहिं ।। १ ।।

**वचन :** आणिक एक चोज ऐक ! हा वल्लभ ऐक देश म्हणावा तरि सर्व व्यापक वेगळा म्हणावा तरि आत्म स्वरूपी ! ऐसें असतां म्या काय करावें तोंचि ऐक ।।

**(दरु)** करूं काय मी सांग कमलाक्षी आतां ।। पल्लवी ।। स्वरूप रूप असूनि वरन लगेच हातां फिरूनि सर्वत्र ठाके दूरिहिं तोसरूं जातां ।। १ ।।
हुडकितां बाहेरी हृदयीं उभाराहे ।। दृढव्दैतवाहिं धरितां फडके तो शीघ्र पांहे ।। २ ।। काम संसर्ग ज्या कामा नये सर्वथा ।। आत्मकाम ने विण परि स्वामि ने भेठे स्वतां ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रीति जानकीचे वचन ऐकून सखी प्रत्युत्तर देते पाहा.

**वचन :** या स्वप्नाचा भाव पहतां पुरुषोत्तमचि तुझें पाणिग्रहण करील, यास संशय नाही मोटी अदृष्टचि तूं तेंचि ऐक.

**दरु :** दैवाचि तूंचि ऐक जानकी ऐक ।। कुवलय नीलतो नवरा जोडतो भुवन पति अनायासें ।। १ ।। सुरूचिर ज्यासम सुरूचि नसे तो ।। वीर तुला वांछित आहे ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रीति सखीचे वचन ऐकून जानकी बोलते पाहा.

(श्लोक) शिखिवरि पडतांचि धार मोटी घृताचि। धरि मगज वाढायाशि तो तो शीघ्रैताचि।। त्वदुदितवचना ज्ये सिक्त रूपें घृताचि।। समसखि वरि कामाग्नी तसा उग्रताचि ।।

वचन : आधींच मन्मथ बाधा दुःसह होती विशेषा कारें प्रियगुण वर्णितांच पुन्हा तन्मय चित्त होउन योग ज्वराचा उपद्रव फार झाला ।। इतःपर माझ्यानें पलमात्रहिं राहवेना, (अद्यापि कांत कां येईना म्हणुन जानकी सखीप्रति बोलते पाहा.)

दरु : येणाक्षि प्राणाचा धणी येनाकां अझुणी ।।
मी न साहुं सकेची मींनांकाचि जाचणी ।।
सृंगार रसासहिं सृंगार जो कापाहिं ।।
रंगले जेथें अंतरंग तो वीरांगणी ।। १ ।।
रूप ज्याचें अपरूप देखूनि साचें स्त्रीपण वांछिति ते तापसींहि साजणि ।। २ ।।
कोटि कामाचि दुणी कोटि ज्यापुढे गुणी कोटीर रसिकाचा जो ठी कचाप पाणी ।। ३ ।।

(श्लोक) वसंत कुसुमाकर ज्वर विनाशकारि स्वयें ।।
तथैव जगती मध्यें प्रथित पूर्ण चंद्रोदये ।।
अहो अजि दुन्हावतां सदय रामचंद्रे पियें ।।
स्मर ज्वर विवर्धक प्रगट जाहले हे सये ।।

सूत्रधार : येणे रीति सखीसी सीता देवि संवदतां तों तिसऱ्या मनुष्याचा संचार झालासा वाटला तें कोण म्हणून विलोकितां शूर्पनखी येते पाहा.

दरु : पतवराळि ।।
श्रूर्पनखी येत महादर्पाचि गुहा ।। दर्पक नारी रूप समर्पक वेषें पाहा ।।१।।

सूत्रधार : येणे रीति येणार शूर्पनखीस विलोकून जानकी निजसखीस पुसते पाहा.

दरु : राग मोहन ।।
सुदती कोणकी हे येते तुज विदित असे काय —।। हे गजगति जैश्यापरि ।। मउ चांगले मेणतें वरींकिं गुप्त तरवार खडतर भीतरि ।। सांग जीचें बाहेरि। तो गमे त्या परि बोंगल अंतरि मांगा सम भारी सांगवो लौकरी।।

सूत्रधार : येणे रीति जानकी संवदता शूर्पनखी स्वस्थली बोलती झाली किं अग्रजानें मज जानकी पासी पाठविलें दैवाधिन तेहि उद्यानिं आली आहे म्हणुन जानकीपाशी येऊन बोलते पाहा.

(श्लोक) यानवोद्यानदेशा नवद्या सये। कोण श्रृगारसी नेणवेतें स्वयें।।
मानवी सर्वथा तुं नव्हेसी परी। मानसिं निश्चयो बाणलायापरि।। १ ।।
पर्वे चंद्राननें पर्वताची सुता शर्व कांता किं तूं सर्वथा ते स्वता ऊर्वशी हें गमे खर्व रूपेंचि जें स्ववंधू अंगुली पर्वशा अन्यतें ।।

सूत्रधार : येणे रीति शूर्पनखीचे विचारितां जानकीनें सखीचें मुख विलोकितां ते उत्तर देते पाहा.

**(छंद)** जनक नंदिनी जे सुजाण किं। म्हणति सर्वहि जीस जानकी ।।
अनुपमान ते हे आयोनिजा। अनि अपेक्षितें रामशूभूजा ।।

**सूत्रधारः** येणे रिती शुद्ध भावनेंचें उत्तर अैकून रावण पक्ष धरून शूर्पनखीं सीता देवीसीच बोलते पाहा.

**(श्लोक)** लंका नाम परि समुद्र परिधालंकार युक्तजनि ।। संकाळात्रि दिवा कर प्रभा हंकार विध्वंसिनी ।। टंकारे धनुचाच जी करि धनातंकार्ह लोकत्रया ।। रंका सोडुनि राघवा वलध तुं अंकावरी त्याचिया ।। १ ।। सीहतीव बुध वृंदी घातला शक्रबंदी ।। स्तविक विजन बंदी भाट तैसा प्रबंदि ।। प्रणत सतत नंदीवाह पादारविंदी न पडुनि नरछंदी तो पतीत्वेंचि वंदी ।।

**दरु :** ।। शंकराभरण ।।
सजणीवरी त्या रजनीच रेशाला ।। रजनीश मुखीहित सांगते तुज ।। रजहिं न धरूनि संशयाला ।। अनु प. ।। सुरदंतावळ दंत प्रहारीं अणी ।। हरिचक्रे हरि हय वज्रें भारी ।। तरूणि पडिली जेथें दाटवणाचि हरित्वरित वलध त्या दशमुख उरावरी ।। १ ।।
पट्ट भ्रष्ट केला जेणे भुजबलें ।। त्रिदश रमणहिं संयुत निजदलें ।।
सुदति चर्तुदश भुजनैश्वर्य भलें ।। सदनि जयाचे उततें आगलें ।।

**सूत्रधार :** येणे रिती शूर्पनखी बोलता जानकीनें क्रोध तिजकडे पाहून यीस समर्पक उत्तर दे म्हणून शुद्धभावनेस खुणावितां ते उत्तर देते पाहा.

**(दरु)** वामदेवहि देवकाय रामनामहि नाम काय। कामधेनुहि धेनु काय। कामिनि परिसहिं गोटा काय ।।

**(पल्लच)** मानव काय तैसा मानिनि रामहिं ।। १ ।। मंदाकिनीहिं सरिता काय मंदारहि तो पादप काय नंदात्मजहिं गोवल काय नंदन वनहिं अरण्य काय ।। २ ।। कनकाचलहि पर्वत काय जनक राजहिं राजाकाय जनकहि केवल माणुस काय सनक योगीहिं योगी काय ।। ३ ।।

**वचन :** तैसा श्रीराम मनुष्य नव्हेच बाह्यदृष्टीनें नररूप भासल्या हि नरवानर योनि प्रभवहि कितियेक निरतिशय सामर्थ्यवंत आहेत त्या प्रमाणेच हा दाशरथीं वीरकुलाग्रणी म्हणून समजते सामर्थ्यवंत नर वानर कोण म्हणसील तरी सांगते अैक ।।

**(श्लोक)** नरावतारें जनि कार्तवीर्ये। किं वालिनेहि ल्पवगें स्ववीर्ये केलें ।। महत्कर्म तुलाहिं ठावें। या लागि झांकूनि मुखा उठावें ।।

**सूत्रधार :** येणे रिती शुद्ध भावनेनें समर्पक उत्तर देतांच शूर्पनखी विरामून राम स्वामीचे कल्याण गुण अैकतां तन्मय चित्त होऊन गूढाभिलाषें जनक उद्यानि रामहिं नित्य विहार कराया कारणें येतों कीं काय असे वैदेहिस पुसतां तिणें मौनेचि शिरःकंप करितां तेथूना पैलिकडे जाऊन योचना केली जे सर्वथा 'स्वहितमाचरणीयं' म्हणउन थोर थोर बोलिले आहेत तरिं या

उद्यानीच जानकीचा वेष धरून संचारल्या राम येथें येतांच सीतासारूप्यास्त मला भुलून वशवर्ति होईल. तत्प्रयुक्त माझ्या जन्माचे साफल्य घडेल. यास अंत:पुरवर दूतीचें सोंग घेऊन जानकीस कांही प्रबल भय दावून येथून काढावे. म्हणुन त्या दूतीच्या वेषानें येऊन तुजसाटीं रावणानें जनकराज राजधानीस वेढा घातला. हे देवि यास्तव त्वां शीघ्र अंत:पुरास चलावें या प्रकारें दुर्बोध करितां सखीशीं जानकी वातोत्धूत कदली परि थरथरां कापत चारी पावलें जातां पुढें ते येक विचित्र स्त्री विलोकून कोणकीं हे दिव्य नारीमणी येते म्हणून मनांत आलोचना करितां तों योगमाया येते पाहा.

(श्लोक) : नीलोत्पल प्रतिम सुंदर देहवानी ।। आरक्त दीर्घ नयनद्वय कोण वानी ।। कौमोदकी जलज नंदक चक्र अैशी ।। शस्त्रे जिच्या झलकती करि चारिंकैशीं ।।

दरु : येते योगमाया पाहा ।। येथेंचि सुंदरी महासीते पाशीं आनंदावहपर माया पाहा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती योगमाया येऊन आप आपणांत बोलती झाली, कीं पुरुषोत्तमानें मज येथें पाठविलें जें योग मायेत्वां मैथीली समीप असून असूयालू दुष्ट राक्षसानीं इष्ट जनांचे सोंग धरून तीचे प्रलोभन केल्यानेहिं ते मर्म नीट सांगून चित्त चांचल्य निवारावें. रक्षो गणाचें माया स्तंभ नाहिं करावें. तरि हे जानकी देवी सखीसी भयोत्कंपितरी भासते, मी समीप जाऊन भय निरसावे अैसे संवदतां तीणें वैदेही निकट येतां तीशी विलोकून 'तूं कोण' म्हणून जानकीनें पुसतां ते उत्तर देते पाहा.

(श्लोक) : व्यापून देव असतां सखि या त्रिलोक ।। जीचेनि आवृतन हृदय घडेची लोका ।। ते मी प्रसिद्ध हरिचि निजयोग माया ।। आलें हरूं निशिचरेंद्र समस्त माया ।।

वचन : सखे, प्रस्तुत भय हेतू नसतां तुं कोठें जातेसि सांग ?

सूत्रधार : येणे रिती तद्वाक्य अैकून जानकीने कृत्रिम शुर्पनखेचें कृत्य सांगता हांसत योगमाया बोलते पाहा.

वचन : ते सर्वहि शूर्पनखीचीच माव आणिक हि येथें कौतुक होणार आहें. क्षणमात्र येथें राहून विलोकावें.

सूत्रधार : येणे रिती योगमायेचें वाक्य अैकून वैदेही बोलते पाहा.

वचन : सखे हे उद्यान भूमिका माझें संचार स्थल म्हणुन राक्षसास अवगत झालें कदाचित् पापात्मा रावणहि वेष पालटून मजसाटि येथें आल्याने येईल यास्तव येथें निमिष मात्र राहणे युक्त नव्हे.

सूत्रधार : येणे रिती जानकी बोलतां योगमाया बोलते पाहा.

(श्लोक) : अपूनिहि वनी इथे दशमुखादिकां महिल्ये । अदृश्य घडशी स्वयें अपुलिया प्रभावान्वयें । तुतें परि असंशयें दिसतिल त्वरें पापियें ।। अनिष्ट कर ते सये म्हणुनि या स्थली बैसयें ।।

**सूत्रधार :** येणे रिती योगमायाने आश्वासितां विश्वास मानून मैथिलीनें तेथें स्थिरतां तों नेपथ्यांतून नूपुरांचा झणत्कार उठतां कोणकि अपूर्व स्त्री रत्न असेल म्हणून वैदेहीनें तीकतां तो मायिक जानकीचा वेष धरून शूर्पनखी येते पाहा.

**(श्लोक):** जानचा वेषकी धरूनि आली राक्षसेंद्राची भगिनी ।।
सान सीतद्रूप साहस कारिणी मानवती पाप मार्गानुसारिणी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती शूर्पनखी येऊन स्वस्थली बोलती झाली कीं, जनक उद्यानीं राम विहारार्थ येतो, म्हणून सांगितले होते तरि येथें चहुकडें पाहावें अैसें निर्धारिता योगमाया प्रभावे तीची कृत्रिमता जाणून जानकी बोलते पाहा.

**(श्लोक):** वोंडबरी परम मोहक राक्षसाची । हे वेष मामक धरूनि यथार्थ साचि ।।
प्रत्यक्ष शूर्पकरजा कसि शीघ्र आली ।।
माझी हिद्दति अति संशय पात्र झाली ।।

**सूत्रधार :** येणे रिती सखीशी संवादून बहुतेक रावण हिं कृत्रिम रामवेषे मजसाटी येथे येईल काय म्हणून जानकीनें तर्कितां तिच्या सत्य संकल्प महिमेनें मायिक रामरूप धरून विद्युज्जित्कटासी मिळूनि रावण येतो पाहा.

**दरु :** ।। बिलहरी ।।
परमकाम संगपरतो दशानन स्मरत वैदेहिला हो ।।
असुनि राघवाच्या सरस सोंगासि तैं करि राजगति आला देवार्दन ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती रावणानें येऊन चिंताक्रांत होऊन दीर्घश्वास टाकितांच त्याप्रति विद्यूज्जित्वद बोलतो पाहा.

**(श्लोक):** मंदोदरी सदृश रूप जाया –।। बृदा दारकेंद्र मद मर्द्दन पुत्र जाया ।। त्या तुज कां जडलि केवल थोर चिंता ।। हेतू विना मज कथीं अति शौर्यवंता ।।

**सूत्रधार :** येणे रिती विद्युज्जित्वदाचे वाक्य अैकून रावण बोलतो पाहा.

**(श्लोक) :** सीतांशुपति मान नासरस जे सितामिधान धरी ।। सीताद्रूप्पजियेस युक्त भुवनातांता असी सुंदरी ।। मी ता ता तद लाभचि ज्वर गुणें किं तापलों निर्भरीं ।। शीतां गें तरि होति हे घडलियां पीता धरा स्या जरी ।।

**वचन :** आणीक मला येक दुख आहे तेचि अेक ।।

**(श्लोक):** जो मी सुरासुर विमर्दन मर्दगाजी । पौलत्स्ययितंदन पराक्रम सिंधु आजि ।।
तो मी धरी लधुनरार्थक सोंग खोटें । वाटे तनु पतन याहुनि युक्त मोटें ।।

**सूत्रधार :** येणे रिती रावणाचें वाक्य अैकून जानकी गुप्त बोलते पाहा.

**(श्लोक) :** तनुपतन तुला ते वाटल्या गोड दुष्टा। न करूनि उशिरासि रावणा पाप् पुष्टा ।। त्यजि निज तनु आता उब्दाटा मोहजुष्टा । घडेल तरि त्रिलोकीं सत्य अत्यंत तुष्ठा ।।

**सूत्रधार :** या परि जानकी बोलत असतां रावण विद्युज्जिम्हासि बोलतो पाहा.

वचन : या मध्येही मन्मथ मला लोकातीत बाधा करितो तेंचि अैक ।।

(छंद) : स्वरिपु भक्त मी यासटीं जणु। शरिं निजि बरि विंधुनि तनु ।
करित मांरतो आरपार किं। त्वरित पावबि दुःख पारकिं।।

सूत्रधार : रावणाचे वाक्य अैकून जानकी बोलते पाहा.

(छंद) : मनसिजाचि या मार्गणीं तुझी । तनुबिदारल्या पापिया अजि ।। घन तरोत्सवें वाटितें सिता। धर्नाहिं अर्पितें ब्राम्हणस्वता ।।

वचन : तरी देवाने तुझा सेवट करावा किं.

सूत्रधार : येणे रिती जानकी संवदता विद्युज्जिम्ह रावणासि बोलतो पाहा.

वचन : अगा ये स्वामी या राम वेषाने त्वां उद्यानिं संचार करित असता यद्दछेनें जानकी येईल तेव्हा तुला पाहून राक्षात रामचि भाऊन वश्य होईल.

सूत्रधार : येणे रिती तद्वाक्य अैकून रावण बोलतो पाहा.

वचन : बरें प्रधाना, तुझें वाक्य प्रमाण. मी येथचि राहतें. त्वां विश्वामित्राश्रमिं जाऊन येथील वर्तलें बर्तमान मला शीघ्र सांगावें.

सूत्रधार : येणे रिती दशग्रीव बोलतांच जी आज्ञा म्हणून त्यानें निघतांच राम वेषधर रावणानें बिलोकून जानकी योगमायेशी बोलते पाहा.

वचन : सखे, तुझ्या प्रसादे थोर प्रमाद चुकला. नाहीं तरी हे रामसारूप देखून चिता डामाडोल होतें.

सूत्रधार : अैसे तद्वाक्य अैकून येरी म्हणाली जे अवो जननी तुज न कलेसा भाव काय आहे आकार साम्य असल्याहिं परिपूर्णानंद प्रयुक्त रामस्वामीचे वदनार विंदि जो विकास त्याचा लेशहिं येथें नाहिं तें सांगतें अैक म्हणून योगमाया बोलते पाहा.

सीसपद्य : कीरबोले नरासारिखे शब्दपरि।। कीर अर्थज्ञाता जेविं नाहिं।। दारू मध्ये शशी कोरिल्यां तेथें तच्चारूकाति नसें जेंवि कांहि।। भारकि चिंत्रिचे भासल्यां तद्रूप शूरतेलानतेथार पाहिं।। सारूप्य दुर्जनिं साधूचें धरिल्याहिं ।। चरित्र ते नये चोखवायी रामवेषा प्रति रावणातें।। तामसें धरिल्याहिं तेवियानें।। ते मनोरम्य किं थोर ताले।। यामध्ये नसतीच हे सुशीले।।

सूत्रधार : येणे रिती योगमायेचें वचन अैकून जानकी बोलते पाहा.

वचन : त्यास्तवेंच माझ्या अंतःकारणास हिं उल्लास बाटत नाहिं तेंचि अैक।।

(छंद) : अगायि दृष्ट जो अैद्रजालिकें।। उगवल्या शशी तो अलोलिकें।। कुमुद काननें किं विकस्वरे।। समुदि काय हो होतिल त्वरे।।

सूत्रधार : येणे रिती सीता सखिशी संवदतां तो रावण हलु हलु उद्यानिं फिरतां येकायेकीं नुपूरा चारूणझुणाट कानीं पडतांत त्प्रयुक्तचहुंकडे बिलोकितां तो वदेही वेषधर स्वभगिनीस दुरून देखून आनंदाने बोलतो पाहा.

दरु : ॥ राग काफि ॥

सुंदर हे ललना कोणीकं इंदुमुखी कलेना ॥ गौरतनु अति गोरटी ते कशी भास हेमचि बावन्न कशी जणु ॥ १ ॥

दर्शन लाभें दृष्टी निवाली आजीच दसरा आणि दिवाली ॥ २ ॥

**सूत्रधार :** येणे रिती रावणाने संवदता निकट जातां शूर्पनखी मायामय रामवेषधर अग्रजास विलोकून अधोमुखी लज्जेनें पदरसावरून तेथेच तटस्थ राहतां समीप येऊन रावण बोलतो पाहा.

दरु : ॥ राग पुन्नागवराली ॥

राजसें आनंद झाले आझुणि कंपघलसिन चंद्रमुखि बाले ॥

लाजते जि भुजयुगलिं सज्जपरिरंभण ॥ माजवि नित्य सुख वेलोवेले ॥ १ ॥

तपनकुल तिलक गुणराशि राम मी विपुलांस दुर्जय परासि सपदिपरि कामशीर जर्जरीत जाहलो । अपण कां तरूणि नदयेशी येशी ॥ २ ॥

चतुरपण आपलें सारें वेचुनि ॥ चतुराननें बुद्धिसारें ॥

सुतनु तुझि नीर्मिली अतुल हे नीश्चिती ॥ कीति वंदु सौंदर्य वारंवार ॥

**सूत्रधार :** येणे रिती रावणाचे वाक्य अैकून शूर्पनखी बोलते पाहा.

दरु : ॥ जुंजावती ॥

लोकेशा निज लोचनें पांहे ॥ सुकृत कृत्य जाहलें लवलांहे ॥

**(प.)** ॥ जे कामकोटी संकाश मनोहर ॥ अपली तनु पुर्ण देखती पाहें ॥

**(अ.)** ॥ जकोटी युगशी दीर्घ आहांकि लोटकि लोटलि तुझविण घटिकामोटी ॥ भेटी अपार पूर्व पुण्यास्तव वाटे घडली मानि पोटी ॥ १ ॥

जों जों रसिका जीवलगा रे राजस तव मुख सजण्या लक्षितां झणि विधि पुष्पबाणि स्मर ना जाचणि सोसेगा रक्षि ॥ २ ॥

**(श्लोक):** प्राणेशा मज भांडुनि वशकरूं चंडाल रंडासुते ॥ पौलत्ये भगिनीस धाडुनि दिल्हें होतें आतां नीरूतें ॥ अव्हेरूनि तियेस विदत्कट महाकाम ज्वरें होऊनि ॥ तुझी वाट पहात नीट फिरलें मी वल्लभा या वनिं ॥ चकोर तृष्णावसरीच जैसा ॥ पूर्णेदुकांता उगवे अपैसा ॥ झाला तुझा योग तसाचि साचा ॥ २ ॥

**सूत्रधार :** शूर्पनखीचें वाक्य अैकून जानकी स्वस्थली बोलते पाहा.

**(श्लोक):** उजेड आतांचि पडेल याचा ॥

**सूत्रधार :** जानकी बोलत असतां रावण शूर्पनखीसी वदतो पाहा.

**(श्लोक):** गाळी प्रदान जितुकें करिशील कोडें ॥ पापात्मका दशमुखातितुकें हिं थोडें ॥ नेऊ सकेत हरिचा निज भाग कोल्हा ॥

**सूत्रधार :** रावणाचें वाक्य अैकून शुद्ध भावना स्वस्थलीं बोलते पाहा.

**(श्लोक):** शाबाश धन्य वदलासि यथार्थ बोला ॥

**सूत्रधार :** येणे रिती शुद्ध भाव बोलत असतां रावण शूर्पनखीशी बोलतो पाहा.

(श्लोक): क्रिडुं मंदर कंदरिं अनुदिनीं आनंदुनि नंदनि कुंजि कुंजर गामिनी तरुतलीं मंदाकिनी जीवनिं ।। लंकेश्वर्यं तुझेंचि वंदिलपदा मंदोदरी आदरें ।।

सूत्रधार: येणे रिती कृत्रिम राम जानकी वेषधर बहिण भावंडे अन्योन्य रंगात मिळून संवदता जानकी बोलते पाहा.

(श्लोक): मूढ दानेणशि यावरि घडत ते पैजार पट्टीत्वरे ।।

सूत्रधार: अैसे जानकीनें संवदता तो रावणाचा डावा डोळा लवतच काय कि येथून उच्चाटनास कारण निर्माण जालेंसें दिसतें अैशि योजना करून चंहुकडे पाहतां तों मायामय विद्युज्जिम्ह येतो पाहा.

दरु: ।। राग कल्याणी ।।

वेगें येतो हा विद्युज्जिम्ह --।। धापा दापुनि धांवत केवल ।। कांपत थर थर कृत्रिम पाहा ।। १ ।।

सूत्रधार: मायिक विद्युज्जिम्ह येऊन स्वस्थलीं बोलिला कि योग मायेनें मज आज्ञापिलें जें आगाये प्रियवंदा कृत्रिम रामवेषातें धरून जानकीस वंचावे म्हणून येथील त्यास त्वां मायिक विद्युत्कटाचे सोंग धरून कांही भे दाखऊन पळवावे असे संवदत समीप येतां दशग्रीवानें यथार्थ विद्युज्जित्कटाच आला हें निर्धारून शीघ्र का धांवत येतोस म्हणुन पुसतां तो उत्तर देतो पाहा.

(श्लोक) केले ठार कुठार संप्रहरणें ते कोटिशा निर्दयें ।। जेणें क्षत्रिय मित्र पुत्र सहित त्रिसप्तवार स्वयें ।। किं जेणे हत आणि वीर्य सदना त्या कार्तवीर्यार्जुना येतो कौशिक शासनें तुज धरूं तो राम वीरा जुना ।।

सूत्रधार: येणे रिती कृत्रिम विद्युज्जितकट याचि गोष्टी अैकतांच दशग्रीवानें स्वभगिनी उचलून कडेवरि घेऊन पळतां शुद्धभावना जानकी प्रति बोलते पाहा.

(छंद) निरखि राक्षसाध्यक्ष हा हा कसा ।। त्वरित घेउनि आपुलि स्वसा करितसें सखे तो पलायना भरित भी भरें माजि या मना ।।

सूत्रधार: येणे रिती शुद्धभावना बोलतां तों रावणानें परशुराम भयें चहुंकडे भयें चहुंकडे विलोकित खुरी घेतां दुरून कोण कि येतो म्हणुन शूर्पनखीस दाखवितां विद्युज्जित्कट येऊन रावणाप्रति बोलतो पाहा.

वचन: अगाये राक्षसेंद्रा जानकी सारखें स्त्री रत्न हस्तगत जाल्यावरी स्वस्थ असावे कि ते सोडून कोणाचा भयानें पळतोस ।।

सूत्रधार: अैसे त्यानें पुसतां रावण उत्तर देतो पाहा.

वचन: अरे हें विनोद करणें पुरें आतां तांच येऊन कि उव्दासन केले तेंचि अैक ।।

(श्लोक) येतो भार्गव रामकिं तुज धरूं तो कौशिकाज्ञोतरें येथें राहू नको इत:पर नृपा लंकेस जायीं त्वरें ।। अैसे अद्य निरोपुनि पुनरपि कां नेणसा पूससी ।।

सूत्रधार: रावणाचे वाक्य अैकून विद्युजिम्ह बोलतो पाहा.

**(श्लोक)** आलों नाहिंच मी न त्कटेकिमपि गाठावें मला मानसिं ।।

**वचन :** माझें आगमन कारण पुससील तरी त्वां जानकी पासीं संविधानार्थ शूर्पनखी पाठविलें होतें किं ते फिरुन लंकेस आली नाही येथें तरी असेल कीं काय म्हणून पाहावें आणि विश्वामित्र मुनि रामलक्ष्मणासहित मिथिलेस जाणार आहे. त्यानें वैदेही मनुजार्भकास द्यावी, हे सारी दोरी जनकासी लाविलीसें आडळलें तें हिं वर्तमान या पायास श्रुत करावें यास्तव मनोवेगासहि मार्गे घालून दशकंधरा, आलो. सत्वर येथें मी समाचार असा बरा.

**सूत्रधार :** अैसे विद्युज्जिव्हत्कटाचे वाक्य अैकून माझे कडेवरि बसली हे शूर्पनखा होयील किं म्हणून आलोचना करितां तो योगमायेनें बहिण भावंडास अन्योन्य वंचना न कळावयास प्रेरावया कारणें जे तामसीविद्या ते आकर्षितां यथास्थित अग्रजास विलोकून शूर्पनखा लज्जेनें मार्गे सरतां रावण धिगि धिगि म्हणुन द्युज्जित्कटासिं बोलतो पाहा.

**(छंद)** धरूनि राघवा कारहिं भला। परम सुंदरी जानकी मला ।। परि न लाभलि प्राण्यावरि। त्वरित सोडितों जाण अंतरी ।। बहिण हे नव्हे थोर पापिणि विहित मारणें यीसि येक्षणीं ।।

**वचन :** तुं म्हणशील यीला मारायास निमित्त काय तरि इणें जानकी वेष धरिल्या-स्तव म्हणणें मी असंमंध गोष्टी बोलिलो.

**सूत्रधार :** अैसे रावणाचे वाक्य अैकून विद्युज्जित्कटा बोलतो पाहा.

**(छंद)** बहुत वेधुनि राघवि मने ।। स्वहित साधिलें राजया जिणें ।।

**वचन :** इतःपर जनक मंदिरास चलावें. तेथें शैव धनुष्य भंगून जानकीस धरू ये.

**सूत्रधार :** अैसे विद्युज्जित्कटाचें वाक्य अैकून रावण तेथून निघाल्यानंतर हे वर्तमान स्वजनकास सांगावे म्हणून वैदेहिनें स्वमंदिरास येतां जनक राज येतो पाहा.

**दरु :** ।। राग भैरवी ।।

जनकराज येतो पाहा ।। (पल्लवी) ।। जनक जो सीतेचा योगी सनकस नंदन तुल्य रूप हा ।।

(अनु.) ।। साजत मस्तकिं मकुट सरस तो सहज सिद्ध समभावाचा ।।
राजस तामस प्रकृति रहित जो रचित राजस वेष जयाचा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सचिवा समवेत जनक राज येऊन प्रधाना, 'वैदेहि उपवर जाली आहे इतःपर ठिविता नये तरि सकल राजासहिं बलाऊन घालावें' जी आज्ञा प्रमाण म्हणून तेणें देशोदेशीं चार पाठवितां तों.

**(श्लोक)** वाद्य ध्वनि पसरला सकलादि गतिं ।। कोंदाटलें रज अनंत अनंत पंथी ।।
ना ना परी फडकती शतशा निशानें ।।

**सूत्रधार :** येणे रिती सर्वहिं बिलोकून जनक रायानें हें कौतुक म्हणून विचारितां प्रधान उत्तर देतो पाहा.

(श्लोक) आले वरेंद्र अवघे जणू निश्चयानें ।। १ ।।

सूत्रधार : या परि प्रधानाचें वाक्य अैकून जनकराज बोलिलां जें प्रधाना, अभिमुख जाऊन अलंकृत या या दिव्य सभेस समस्तहि राजे आणावें।

हें प्रभु वांक्य अैकून तेणें उपचार पूर्वक बलावितां ते समस्तहि येताहेत पाहा.

दरु : ।। बिलाऊ ।।

श्रृंगार करूनि स्मर रंगात मिलुनि ।। (पल्लवी) ।। तुंग बलाचे जणूसंघ अमरोपमान ।। धिग धिग नृप धिग धिग नृप अंगवंग कलिंग भृति आलेजनक बाले वरूं सुशीले येकवेले ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सकल राजमंडित आल्यानंतर नेपथ्यांस येकचि कोलाहल जाला तो काय म्हणून शोध घेतां बंक नायकाने रावण आला म्हणून सांगतां रावण येतो पाहा.

दरु : दश कंधर दुर्धर तो आला असितजलदकाला ।। (पल्लव) ।। दशननिचय आणि दाढा ज्याच्या ।। दिसति बहुत रविकराला ।।
अनु. ।। तरूसि असति जैसा सरल शाखा आपैशा ।। परम लंबित तैशा ।। शरधुखेटक असि आणितो मर घोर कुंतमुख मृत आयुधगणि निरखुनि नृप मंडलि तेवीं क्षणि सरसावित श्मश्रू मसिसम काला ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती दशानन येतांच सकल राज मंडलि सगट सामोरी जाऊन बलाऊन आणितां यज्ञ विलोकनार्थ गाधेय मुनिस पाचारिलें होतें तो अद्यापि कां आला अैसे अपल्या ठाकिं विचारितां उभयता दाशरथी नारदा सगट कौशिक येतो पाहा.

दरु : ।। कल्याणी ।।

गाधेय मुनि आला गंभीर भला ।। (पल्लव) ।। साधु मूर्धामणि जो साधुं निज कार्याला ।। (अनु.) ।। श्री रघुपति आणि सौमित्र गुण खाणि धीरकार्मुं पाणि धाकुटा वीराग्रणी ।। सारग्राहि जो गुणि नारद नामा मुनि ।। तोषें यासी मिळूनि थोर जो ऋषिचे गुणि ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती कौशिक मुनि येतांच विदेहरायानें त्यास अभिमुख जाऊन समस्त उपचारिं पूजून उन्नतासनिं बैसवुनि रामलक्ष्मणास पाहून अत्यंत आनंद पाऊन त्यांचें वर्त्तमान विचारितो पाहा.

दरु : ।। सौराष्ट ।।

कवणाचे हे कुमार पहा ।। (पल्लवी) ।। अवतीर्णचि जणु अश्विनि देवकिं। अवनिवरि मन मोहन महा ।।
(अनु.) ।। पुंडरीक भी लोचन जाचे ।। पुंगव समजे विक्रम राशि ।।
कुंडली शसशव्दय भुजहिं ।। कुंठक केवल शत्रु बलाशि ।। १ ।।
तपन शशी परि या देशासि ।। अपण शोभविति जे कां मोटे ।।
व्दिप राजोप मगमन जयाचे, अपरिमेय सग्दुण गण सांटे ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती जनक राजाचें वाक्य अैकून कौशिक मुनि प्रत्युतर देतो पाहा.

**(छंद)** सशस्त्वाप जे दिव्य शोभति दशरथात्मज श्रेष्ठ अति ।।
निशिचरांयायूथमर्दनिं ।। निशित बिद्य जें ख्यात या जनिं ।।
वधिलि ताटका ते सुबाहुसिं ।। अधमजे सदासक्रिया पुशि ।।
पदरजें शिला गौतमांगना वधुनि जाहलि याचि या पुन्हा ।।

**सूत्रधार :** येणे रिती मुनि वाक्य अैकून रामस्वामीचा सौंदर्यातिशयहिं विलोकन धनुर्भंग प्रति ज्ञान स्तितरि तात्कालिक यास कन्या रत्न समर्पितों अैसे चिंतुन कार्मुक आणाया कारणें सचिवास आज्ञापितां ते घेऊन येताहेत पाहा.

**दरू :** येतें शैवधुनु हें कसें श्यासुर येथेंचि घडघड चक्र नांदे घेती सारे नृपलाता हाणूनियां जे तंव देखुनिं खेदें ।। १ ।। आखंडलादिक जें खंडू न सकिति श्रीखंड परशूचें शस्त्र भलें लोखंड पेटित अखंड स्थापूनि श्रीखंड चंदनि पूजियेलें ।। २ ।। मंजुषाचि जेणें मंडित ते बल पुंज असंख्यात वीर महा कुंजरसें अति कुंथत वोदुनि रंजीस जाहले नीट पहा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रीति सभा मध्यभागिं धनुष्य वोढून आणितांच सकल कौतुक विलोकनार्थ जनक रायानें जानकीस प्रज्ञा नामक दूती कडून बलाऊन पाठवितां ते येते पाहा.

**दरू :** (राग असावेरी)

सीता चंपक सरीसी तामरसे क्षण सीतां सुवदन पुनीत येते पाहा ।।
कंठीरव मध्यम कंठी ।। ठेउनि प्राणकंठी जे वेले कंबु कंठी ।। राम विरहा वीर हा ।। २ ।। रामा भूषा जणु अपरामा सुगुण गणाभिरामा चिंतित मनीं रघुरामा येतसे पाहा ।।

**सूत्रधार :** येणे रीति जानकी आल्यानंतर प्रज्ञावतीशि बोलते पाहा.

**वचन :** अवो सखे, अंतःपुर चर दूतीनें मला वृत्तांत सांगीतला जो शैव कार्मुक भंगील त्यानें माझें पाणिग्रहण करावे। ऐशी तातानें प्रतिज्ञा केली आहे. त्यासाटिं सर्व राजे तथा राक्षसेन्द्र आला आहे तरी माझा निर्धार तुज सांगते ऐक.

**(श्लोक)** माथां व्योम पडो तनु व्यय घडो पृथ्वी समुद्रिं बुडो ।। हा सारा बिगडोनि लोक झगडों किं तात कोपें माताहि दवडो ।। मनिं नर अवडे मी तीस लज्जा झडो ।। श्रीरामा वीण डोल दें न दुसऱ्या तुझ्या मनिं हें जडों ।।

**दरू :** (घंटारव)

गोडिलागली चित्ता सोडिना ध्यास ।। बहु वोढिता बाद्र विषयिं — वोरमणि सर्वथा ।। (अनु.) ।।
निंदोना तरि जनवृंद समस्त हिं ।। वंदों मातें प्रेमें सुंदरी पाहा ।।
इंदुनिभानन कंदर्पाहूनि या सुंदर परिसुख संदोहन सुटे हा ।। १ ।।

(छंद) जनक राज हा सर्वथा नव्हे ।। जनक आपुला निश्चयें सये ।।
घनकले बरा त्या सुकोमला। कनक भेन अपिच जै मला ।।

सूत्रधार : येणे रीति जानकीचें वचन ऐकून प्रज्ञावती उत्तर देते पाहा.

वचन : सीता देवि, रामस्वामिहिं कौशिका बरोबरी आले आहेत. त्याचेंहि दर्शन आतांच होईल.

सूत्रधार : येणे रिती संवदतां सभा मंडपी येतां तों शुद्ध भावना जानकी प्रति समस्त राजास दाखवीत बोलते पाहा.

(श्लोक) धुलीतसे महीपति बलिष्ट हे सखे। अति गर्लुनि अंतरी किति।। तलीं पाहा विलोकिति नये म्हणुनि। मागुति नयें निरोप मागती।। भयें नरेंद्र ते किति सये स्वनेत्र झांकिति। जलादि भोचनामिसें निलाजिरे अध:शिसें।। जलाल भूप हे किती बलावितां हिं निष्टति।। मनुष्य राज हे किती धनुष्य नाव लौकिती।। तनुसकंप जाहली सुनेत्रि नीट न्याहलि। कितेक पार्थिवां भला यथेष्ट घाम सुटला।। स्वजीभिनें पाहा सखी अजस्त्र होंट चाटिती।। ५।। मिशास ताव देतकिं निशाचरेंद्र घातकी। पिशाचसा उभा असे खुशाल देख राजसे।। ६।।

सूत्रधार : येणे रीति शुद्ध भावना बोलून पुन्हा राम लक्ष्मणास दाखवीत सीता देवीसी बोलते पाहा.

श्लोक : समीप कौशिकाचि ये अमित्र मर्दुन स्वयें ।।
प्रकृप्त जो विराजतो ककुस्थ वंश राजतो ।।
पाहावया तया पहा स्मरासहिं अति स्पृहा ।।
न्याहलितांच जो पुरे ताहान भुकहिं भ्रुरे सुचारु डाविया करिं प्रचंड चाप जो धरी ।।
व्दितीय हस्तकिं शरां अजती व शोभवि बरा ।।

सूत्रधार : येणे रीती प्रज्ञा सखीचें संमतीने विश्रुध्र भावनेनें रामस्वामीस दाखवितांच जानकी बोलते पाहा ।।

दरु : हुशनी ।।

जोड नाहीं श्रीरामासि त्रिभुवनि हुडकुनि पाहतां ।।
होड लालुनि बोलतें मी पूढती तुज नीट पाहा ।।
हुप धरुनिया आले शैव चाप भंगार्थ वेगालाले कैशे ।।
भूप थोर थोर बाले मुखीं यांचे ते पहा नसतीं चरघुपति श्री पदांबुज लेश ताले ।। १ ।। कंबु चक्रपाणि दुसरा भासतसे अंबुजेक्षण हा बरा वाटे निंबलोण सारूंचतुर देहाचें ही बिंबले मनि हेंच रूपसुनि तं बिनि विसरुनि विसरा ।। २ ।।

सूत्रधार : येणे रीति जानकी सखीसी संवदतां तो निशाचरेन्द्र जनक राया प्रति बोलतो पाहा.

**दरु :** कोण आहे जोड जाण मला जगिं (पल्ल.)
कोण आहे मत्तुल घोर प्रतापी भला (अनु.)
कैलासाद्रि झेलिला कि कंदुकसा अवलीला ।। कैलारवदेवमेलाकरानि यार्माहिला ।।

**वचन :** ऐसा मी जो पराक्रमी तो हें कार्मुक भगिनांकिं यास्तव उगेंच जाकिस द्यावें ।।

**सूत्रधार :** येणे रिती रावणानें स्वविक्रम वाखाणितां जनकराज उत्तर देतो पाहा.

**वचन :** राक्षसेंद्रां, अपुले निरतिशय सामर्थ्य तैसेच परंतु माझि प्रतिज्ञा सिद्धिस नेणें उचित.

**सूत्रधार :** येणे रिती हे तव्दाक्य अैकून रावण धनुष्याजवली येतांच जानकी प्रति बोलते पाहा.

**वचन :** सखे रावणाने हे चाप मोडिल्याने हिं मी त्यास वरीत नाही माझा प्राणेश वेगलाच आहे तेंचि अैक.

**(दरु)** तोचि माझा प्राणपती ग रघुपति नरपति मंडलि निरखिं शोभतो निरूपम धरि अति वो रघुपति ।। १ ।। तरूमध्ये मंदार तें विसाजे किं तारागणि चंद्रसति अवो रघुपति ।। २ ।। मृडंकोदंडि गुण चढवो ना चढवो अढळ हे दृढमति अवो रघुपति ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सीतेचें वाक्य अैकून सखी बोलते पाहा.

**वचन :** जानकी देवि तुं बोलिलीस तें सच्यच राम स्वामीस रावणास महदंतर आहे तेंचि अैक.

**(दरु)** राम आणि घोर रूप रावणासि तैसे भामिनि अंतर आहे फार यासि ।।
पायस आणि ते कांजि तुल्य कायिं हंसवायास दोघेहि समकेंवि बायि ।। १ ।।
कायसें कौस्तुम गोटे तुल्य लौकिं हेम अयस समान कैशि अवलोकिं ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सखी सीतादेवी संवदता रावण धनुष्य अवलीलेने उचलूं जातां तें न हालतां आप आपणांत बोलतो पाहा.

**(श्लोक)** कैलाख त्रिदशां जिहिं रमणहि पैं लाविली कि फलि ।। शैलाधीशाहिं झेलिला निज भुजें कैलास शुमंडली । वीसाहिं करि या धनु उचलितां ती साहस्रें या क्षणि ।। ज्ञासा पात्राचि जाहलों गमतसें दुस्साध्य हें तों मनिं ।।

**सूत्रधार :** येणे रिती बोलून होट चाऊन विशति बाहुनिहिं शेवचाप उभें करितांच इतः पार धनुष्य मोडिल हें निर्धारून वैदेहिनें देहाशा सोडितां नारदमुनि निकट येऊन समाधान करितो पाहा.

**दरु : ।। राग परजु ।।**

चिंता न करि आहा हा आई दांत घाशिच आतां पडतो पातकी रावण किं हा ।। १ ।। मृडचापिं गुणा चढअुं जातां जडमतिचें मुख पाहा अयि ।। २ ।।

(श्लोक) डोलती तरू जसे पवमाने ।। तोल जाऊन तशाच प्रमाणे । खातसें निरखि रावण झोले ।। मात मात्रपरि उद्धट बोले ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारद मुनि संवदता रावणानें शैव कार्मुक प्रयत्नाने उचे करितांच तत्भार न राहतां मागे तोल जाऊनि उरावरि चाप पडूनि धापा दाटतां जानकी प्रति सखी बोलते पाहा.

(दरु) दैव चितुनि अयि जानकी अंक ।।

सूत्रधार : येणे रिती सखीनें जानकीस स्तवितां आपुली प्रतिज्ञा मिथ्या झाली म्हणून जनक कष्टी होतो पाहा.

(श्लोक) आले रावण मुख्य राक्षस तथा भूपाल सारे पहा ।। कोण्ही हें धनु वोढिलें लवविलें नाहींच हें किं अहा ।। केलें व्यर्थचि या पणा अपण म्या नेणूनि मोहान्वये ।। जाली सर्वहि निश्चयात्मक अतां निर्वीर्य उर्वीस्वयें ।।

सूत्रधार : येणे रिती जनक रायानें बोलतां विश्वामित्र त्यास उत्तर देतो पाहा.

(श्लोक) वीरादि वीर रघु पुंगव चापपाणी । अस्ता कशी ध दवली तुज हे कुराणी ।।

सूत्राधर : विश्वामित्राचे वाक्य अैकून जनक राज बोलतो पाहा.
तोलिनजे सुरतथा असुरा मनुष्या हा बाल केंवि उचलील तथा धनुष्या

सूत्रधार : येणे रिती राजवाक्य अैकून कौशिक राम स्वामी प्रति बोलतो पाहा.

(चूर्णिका): अगाये निखिल जन मनोहरा रघुराया अंतकांतकशरासन भारभरें वक्षस्तट स्फोटन प्रयुक्त कृतांत आतिक गंतु कामा दशकंधराया ।। धनुष्य काहडन पाणदान देऊन लाजवाया ।। प्रचंड वेतंड शुंडाहत इक्षुकांडापरि निजदोर्दंडखंड परद्दड कोदंड खंडन सर्वदिशा मंडलि अखंडित किर्ति गाजवाया । इंदिरा रूप जनकनंदिनी मनोरथ परि पूर्णकरायावत्सा उठावें उठावें ।।

(श्लोक) जैसा खंड करिकरें झडकरीं त्या इक्षुं कांडाकरि ।। तैसा या स्वकरिनतां सुख करीं भंगी धनु लौकरी ।। सीताख्यासु वरिष्ठ दिव्य नवरी जे तीस गावावरी ।। वत्सा शीघ्र वरीं यशें अजि बरी सरी त्रिलोकीं भरीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती विश्वामित्रानें बोलतां रामस्वामीने धनुष्यासमीप येऊन लीलेनें उचलून रावणास जीवदान देतां तो नारद मुनि संभ्यास पाहूनि बोलतो पाहा.

(दरु) येकचि लोकिं या झाली गडबड ते पाहा ।। त्र्यंबक धनुषि अंबुज-नयनें किं बलियें गुण चढवितां ।। कांविटसें मध्ये मोडलें कडकड हें पहा ।। १ ।। घोषदिगंति घोर पसरतां तों शतशागिरी शिखरें ।। कोसलती तजि कैशी धडधड हे पहा ।। २ ।। अवलोका नभि अवघे सुर वर आवडीनें वर्षुनि सुमनिं ।। स्तविति आत्मारामा भावें धडधड हे पाहा ।। ३ ।।

सूत्रधार : येणे रिती रामस्वामीनें धनुष्य भंगिता जानकीनें त्यांचे कंबुकंधरि स्वर्णांवुज माळ घालितां विश्वामित्र बोलतो पाहा.

(श्लोक) लिलारंगे दशरथ सुतें भंगितां शैवचापा।
लज्जा किर्तिजनकतनया कन्यका तिनि जापां॥
तेथें नाथा हुडकति दुजी ते दिगंती रिघाली।
आद्या भूपांवरि तिसरी ते राघवा माळ घाली॥ १॥

**सूत्रधार :** येणे रिती लज्जेचें पाणिग्रहण करून रावण तथा सर्व राजेही निघाल्यानंतर विधुक्त विचियुक्त कन्यादान करावें म्हणून जनकानें प्रार्थिता तेणें तातांझेची अडताला घालितां दशरथ महारायास पाचारायास चार पाष्ठवितां भरत शत्रुघ्न वसिष्ठांशि येतो पहा.

(दरु०) दशशत भानुकुलोत्तम येतो दशरथ भूमिपति।
शिष्ट धुरीण वसिष्ठ प्रताप विसिष्ठ भरत शत्रुघ्न बरोबरी।
इष्ट मित्र जनि वेष्टित केवळ तुष्ट हृदय तो मानवकेसरी॥ १॥

**सूत्रधार :** येणे रिती दशरथ महाराज येतांच जनक रायानें सामोर जावुन बलावुन आणिल्यानंतर रामलक्ष्मणानि साष्टांग प्रमाण घालितांच दशरथ राया निकटिं राम लक्ष्मण भरत शत्रुघ्नास पाहून विश्वामित्र बोलतो पाहा.

(दरु०) भाग धेय थोर राघवशार्दुला।
कोण तुझें वानि महा भाग कुमार हे आघवेच पाहिं गुण खाणी।
प्रणवा पासुनि या प्रकट झाले जशे जाण वेद चारि तसे तनुजहिं अपले अनुपम केवल पुण्यचारि॥ १॥
आसुर रवि शशिभार्गव गुरू कि दीप्तरूप भारीकिं वाहे वासुदेवादिक सुरसत्त महेव्यूहचारि॥ २॥
पुरुष रत्न हे पुरुषार्थ कि राया। मूर्तिमंत चौल आलेनर वेषतवपोटी निरूपम नेणो मोक्ष अवघे॥ ३॥

**सूत्रधार :** विश्वामित्र संमतीनें शतानंद बोलतो पहा.

**वचन :** जनक राया उर्मिला कन्या कुशध्वजाच्या मांडवि श्रुत कीर्ति या तीघि जणी लक्ष्मण भरत शत्रुघ्नास दिल्याने, उत्तम कौशिक मुनिचें अंतःकरणी आहें.

**सूत्रधार :** येणे रीती शतानंदाचे वाक्य ऐकून आज्ञा प्रमाण म्हणून जनक रायानें तिघीस बलावुं पाठवितां ते येताहेत पहा.

(दरु०) उर्मिला मांडवि श्रुतकीर्ति तीघि उत्तम अति श्रुतकीर्ति धर्मपरा आल्या-अवलोका ज्या दर्शनीया माज्जि या लोका.

**सूत्रधार :** येणे रीति तिघीहिं आल्यानंतर जनक रायानें जोशीस बलावितां जोशी येतो पहा.

(दरु०) येणेरीती जोशी आल्यानंतर श्रीराम लक्ष्मण भरत शत्रुघ्न चौघासहिं विवाह मोहोत्सव वर्चला पहा. यापरि विवाह महोत्सव झाल्यानंतर श्री रामचंद्रास विलोकन भक्तवृंद करारविंद जोडून विनविती पहा.

श्लोक : धर्मिष्ठास कदा विपत्ति न लगो स्वप्नांत हिं येकदा।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदये सद्‌बोध लोकां सदा ।।
श्रीमद्रामपदारविंद युगलीं कल्याण भाग्य प्रदा ।।
जोडों भक्ति उदार ते अनुदिनी स्वानंद राज्यास्पदा ।।
या परि प्रार्थितां त्यांचे मनोरथ पुरवुन निजपरिवारा सभेत श्री प्रताप रामचंद्र नित्यानंद मंदिरास आले पहा.

श्री मालोजि नरेंद्र नंदन भला शाहेंद्र नामाथिला।
पुण्यश्लोक म्हणूनि लोक निगदि ज्याला प्रपंचांतिला ।।
त्याचा पुत्रकास चरित्र जगतीं येकेंद्रभाग्यागला।
त्या पासुनि शिव स्वरूप तुजला राजेन्द्र जो जन्मला ।। २ ।।
प्रताप सिंहेन्द्र कुमार त्याचा।
जो अंश श्री विष्णु जगत्पित्याचा ।।
उमासतीचि सुकृतैकराशी कल्पद्रुजाच्या नतुलें कराशी।
जो कां त्रिवर्ण गुरूचि अपंरूपकाशी ।।
आधार थोर आजि आत्मनिरूप काशी।
केलें पहा निरूपमाद्‌भुत रूपकाशी।
तेणेचि जानकी रघुत्तम भावुकाशि ।।

**।। श्री रामार्पणमस्तु ।।**

---

## २. श्रीरुक्मिणी कल्याण

श्रीरस्तु । अविघ्नमस्तु । शुभंमस्तु ।

श्रीगणेशाय नमः ।। वक्षीं जो धरी वल्लभेस निजशामलासही आणिखीं ।।
अक्षीण द्युति सासराच्या मिरवे बक्षस्थळीं जानकी ।।
शिक्षुनी नृपराक्षसैक विधिनें जेणें समुद्राहिली ।।
लक्ष्मीरूपिणी रुक्मिणी मति बरी हे तत्पदीं वाहिली ।।

**सूत्रधार :** अरे पारिपार्श्वका, येथें सर्व लोकाभिराम श्री प्रतापरामावतार महोत्सव पाहावयाकारणे, वेदशास्त्रनिपुणी, विदितवेद्यपुण्यलोक चतुरलोक मीनले आहेत. तर्हि सरसभक्तिज्ञानरसप्रदान, नवरसालंकार नाटकाभिनयेनें यांचे हृदयनयनसहित आनंदभरित करावें.

**पारि० :** अरे सूत्रधारा, या प्रगल्भ सभ्यास रंजनानुरूपें अपरूप नायक दिसला नाहीं.

**सूत्रधार :** अरे परिपार्श्वका, विसरलास काय हें रुक्मिणी परिणयाख्य मुख्य नाटकाला ?

**पारि० :** अरे सूत्रधारा या दिव्य ग्रंथाचा कोण कर्ता,

**सूत्रधार :** (श्लोक) प्रतापराम आणि याचा प्रभाव ऐका ।।
ज्ञाता जो जनकासमान सरा. दाता ज्याहुनी ।
त्राता आश्रित मंडळीस अपुल्या तातापरि सद्‌गुणी ।
पाताळी कलिकल्मषास ढकली पाताद्विजोचो जेनी ।
माता तातही दैव सद्‌गुरुजी या वातात्मजाच्या धणी ।।

(श्लोक) अळंकृत यशोधनी निपुण तत्त्वसंशोधनी ।
पटू खिल निषेधनीं पुरवितां भल्याची धणी ।।
रघू त्तमशिरोमणी सतत हेंचि चिंतामणी ।
नराधिप शिरोमणी सकळलोक चिंतामणी ।।

**पारि० :** सूत्रधारा मलाही हें आता सुचलें. परंतु हा अलभ्य योग मिळाला तेंचि ऐक.

(श्लोक) प्रगल्भाचे मूर्धामणि सकल हे सखे जेतव्ये ।
प्रमेय श्रीदेवी परिणय मनोरंज म्या मिरवे ।।
प्रबंधाचा कर्ता गुणनिधी प्रतापेंद्र पटु ही ।
आम्ही नाटे यैसा अघटित नव्हे योगचि कहीं ।।

**सूत्रधार :** (श्लोक) वनूश्रित माधवायोग जैसा ।
वसन्तोदये साधिला आपसा ।।
तसा रुक्मिणीयादवा नित्यमुक्ता ।
सुदेव द्विजें योजिला योगयुक्ता ।।

**सूत्रधार** : येणेरीति सूचविता सुदेव ब्राम्हणाला बिमळचित्त नामक मैत्रासहित येतो पाहा.

**दरु० : सावेरी ।।**

आला विप्र गुणी सुदेव हा । आनंदे भरुनि । जपत मुखें साम्दावें हरिहर जप माळही करें फिरवीत वरिवर ।। मिरवित काशिमणीमय कुंडले बहि पुंड्रहि भाळीं दंड ते । भ्रांतिरुती मध्यें नाही रुतला शांतीचा तरी शाश्वत पुतळाच ।।२।। श्रम तें करी जो सर्व बरोबरी । विमळचित्त तो मैत्र बरोबरी ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणे रीति सुदेव ब्राम्हण येऊन विमळचित्त मैत्रास अवलोकून बोलतो पाहा.

**सुदेव** : अगा ये मैत्रा, मजवरी रुक्मिणी देवी अनुगॆह केला तो काय म्हणून वर्णिला जे सिद्धकार्यही साध्यसें दाखवून येथें योजितें तेंचि ऐका.

(श्लोक): अनन्य जे शिरवीसी प्रभाते ।
ज्योत्स्ना शशीसी अथवा कुभात्ये ।।
अभिन्न जे तेवीच् कृष्णजीसी ।
वियोग नाहीं अतएव जीसी ।।

(गद्य) : असें असतां विश्वरेषणन्यायें. विवाह कार्य करणें स्यां पूर्णराशी परिमळ समर्पिल्यापरी. की, कल्पतरुशी कलिपतार्थ प्रधान शक्ती कलिपल्यापरी कीं. सुधासमुद्राशीं मधुरता दीधल्यापरी. कीं चराचर विधायक चतुराननाते. सृष्टिरचनाचातुर्य वितरल्यापरी वैदर्भीवचन संदर्भ निवेदन द्वारा. द्वारकारमण जगदाधारा. श्री रुक्मिणीशीं योग करणें द्विरुक्तसें भासतें.

दरु० (छं) : परिमल जगीं कीर्ती यावया । धरूनि अंतरी फार ते तया ।।
सुरुचिरांग ने सिद्धिकार्य हें । करवुनि इच्छिते मत्करें आहें ।।

**वचन** : तरी आज्ञेप्रमाणे. देवीचा निरोप, वासुदेवास निरोपावया आलो.

**सूत्रधार** : येणे रितीं मैत्रासी बोलून हृदयसरोजी, सुदेव देवाचें ध्यान क्षणभरी करितां थोर चोज वर्तलेंसी.

ध्यान क्षणभरी करितां थोर चोण वर्तलेंसी ।।
जो लागला सतत भक्तिनि या लगामीं ।
ध्याता चितीस्थित पुढें विहगेंद्र गामी ।।
हे आठवाचि सरिसा प्रभु आठवा जी ।
येऊ सभे वदित सद्गुण सांठवा जी ।।

**वचन** : येणेरीति भगवंत निजसखेस येवया उद्युक्त होताचि. सभ्यांस सावध कराया कारणे कंचुकी येतो पाहा.

**(दरु)** : परजू शापू ।।
पचंगी भाऊनि बरी । पगडी गुंडाळुनी शिरीं ।।
पंच्चू धरूनि नेत्र करीं । कंचुकी ते लौकरी ।। येत पाहा.

ब.द. : नीलांबरी ।।
छेडूनि विरक्तीचे भेटी ।। चित्त चपळ हेलावुनि घ्यानाचे देठीं ।।
दृढ भक्ती दिधल्या भेटी । दृष्टीसी दुर्लभ कीं ज्याची भेटी ।। १ ।।
तो हरी डोळे भरूनि । विश्वमोहन पाहतो हर्ष करोनि ।।
सोहळे काय याहुनि हाते । हो हणीं मोहाब्धि ठेलो पोहुनि ।। २ ।।
इतर राज्यापाशीं असणार कंचुकी त्यास केवळ दुहीचा सुकाळ ।।
धन्य मी कंचुकी एका तुल्या ।।
धर्मिष्ट तो हेती एकूण एका ।।
पुण्याशी नाहींचि लेखा । वाक्या अन्यथा नोहेचि हेतव देखा ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति कंचुकी येऊन आपली प्रतिष्ठा वर्णून सभ्यांस सावधान केल्यानंतर श्रीकृष्णस्वामी येतात पाहा.

दरू : (हुशानी. आदिताल)
येतो पुरुष पहा सव्विसावा । चेतोधामवासी श्रियेचा विसावा ।।
मस्तकीं किरीट झळाली । सरा कस्तुरी रेखली कपाळीं ।।
विलसे कौस्तुभ मणि वक्षस्थळीं । परवस्तु वस्तुता जो परमात्मा वनमाळी ।। १ ।।
सुंदरपणचि या रीती त्या कंदर्पासहि धिक्कारति ।।
पूर्णानंद संदोहचि श्रीमूर्ती । घडे संदर्शनें भक्ताची सर्वाभीष्ट पूसी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति श्रीकृष्णस्वामी येऊन सुदेवास नमस्कार करून विनयाने बोलतो पाहा.

दरू : (घंटारवं)
धन्य झालो मी सुदेवा धरणीदेवा ।।
धन्य झालो भुवनी मान्यता साम्री सदेवा ।।
देवो मी नेणचि आन द्विजाग्रेसरीसमान । श्रीवत्स येथे प्रमाण ।।
दर्शला जाण । हे वेदरासी पावन जीवाचे जीवन ।। १ ।।
संदुर्शनेंची द्विजाचें संचितानंत पातकवृंद ध्वंसति मनुजाचे ।।
वंदनार्चनें मंदिरिं कल्याण आणी ।। सुंदर मोक्षणाचे ।।

सूत्रधार : येणेरीति वासुदेवाचे वाक्य ऐकून सुदेव विनयपूर्वक बोलतो पाहा.

दरू : (काची. आदिताल)
आजिचा धन्य दिवस वासुदेवा ।। किती ।।
राजिवाक्षा वासुमुखे देवा । कान्तात्वन्मुखेंदु पाहता ।।
पुण्यराशी झाली । तान्हेल्या तृप्ती या नेत्रचकोह्यराशी ।। १ ।।
नित्य श्री वांछेल तुझा नित्ययामा । मी सत्य आलों स्वामी साधु याचि कामा ।।

सूत्रधार : येणेरीति सुदेवाचें वाक्य ऐकून कृष्ण बोलतात.

दरू : (सुरटी. शा०)
जान्हवीचें शीत तोयें । जाण जैसें प्राप्त हो या ।
तान्हेल्यासी दैवसहायें तसा झाला न्याय ।। १ ।।
दरिद्रासी निधि लाहे । परि तप्ता कीं छाया हे ।
तारु जसें बुडणारा पाहे । तसा झाला न्याय ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति कृष्णस्वामीचे वचन ऐकून सुदेव बोलतो पहा.

दरू : (घंटाखं. शापु)

संकल्प तुझा प्रमाण । सत्य संघाननें अनुमान ।।
रंकापरि रुकि जाण । चैद्यरंगीं मीनल्या हे वोशाचे राणा ।। १ ।।
देवीचे तुजवरि चित्त । आहे जी विलुब्ध प्रयवित्त ।।
देवानुकीचें दुरुविक्त स तोही पावला शेवटी जी प्रायश्चित्त ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति श्रीकृष्णस्वामी परस्पर संवाद करू स्वस्थानाप्रती येतां झाले. तदनंतर कोपयुक्त सर्पापरि श्वास टाकीत रुक्मी येतो पाहा.

शंकरा भरण आदिताल
आला तो निंदा करीत कृष्णाशी ।। गुणि ।।
शीलाप्रदानासहिता रुक्मिगिरी परी धीरकार्मुक विभूषित हरवीर
रुक्मिणीचा सहोदर । रुक्मी नाम धरणारा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति रुक्मी येऊन प्रधानास पाहून श्रीकृष्णास निंदितो पाहा.

(भैरवी. अटताळ)

लोकातीत याचे ऐकावें चरित्र तें कान भरून कुड ।
एका बापाचा तो हेकाड न्हव्हे । हे काय दूषण थोडे ।।
शंखासुरें अविशंका ना तावदे शंखपाणी हा मुरारी ।
शंकरात्प झाला । संकटिं त्या मीन अतीव श्रीवत्स भारी ।। २ ।।
भ्यासुर दानवि त्या सुरवृंदे ही । ज्या समया सिंधुमध्ये त्या ।
कासाव होवुनि वास वानूजते । हा सर्व भूगोल धरियेला पाठी ।। ३ ।।
सकळां करु क्षामछ सकळ धरा जिव्हा ।
प्रकट तळीं नेउन पाहिली डुकररूपें त्याचे तुकडे करून
तें सुकर भूदंष्ट्राग्रे वाहिले ।। ४ ।।
वरि वरि करितां प्रल्हादें करिता उपद्रव परम रोषेंचि हिरण्या ।।
नरहरी वेषा या हरिनें तयाचें ।।
चिरले पोट निष्कारुण्यें । दाता बलि येणे पाताळीं घातला ।।
वाताशन जेथें घोरं माताही मारिली हातानें आपल्या ।।
हातामसि ऐसा घोरा ।। ६ ।।
मानव अति देवाची निंदा केली ते न साहता ।।
(विदर्भरायाच्या चित्तानुसार प्रधान बोलतो पाहा ।।)

दरू : येरुकुल कांबोदि ।।

निंदू नको अरविंदलाक्षा । इंदीवर निळा ।।
सुंदर जगदानंदन या श्री नंद सुताच्या लीला ।।
सुशीला देवकी आणि वसुदेव पशुपसुते ।।
देवक मन आण हें ।।
केवळ पूर्णचि देव घनानंदसे वधी समजो ही । नमो हे ।। २ ।।

तारक समजगील अवतार समस्त उतार चडण कांहीं ।।
तारतम्या मनीं धार विलो सर्व धार जे नीचर पाहे ।।
आत्मक्रोहि जी । धर्म गिळोनि अधर्म वाढविता ।।
उत्कट सळजिव्हा । शर्मद तै दिव्य जन्म हा आदरी ।।
मर्म हें समज देवा सुदेवा ।। ४ ।।
मच्छसुकर आणि कच्छपहि होता । स्वच्छंदे मुरारी ।।
स्वच्छपणापरी विच्छिति नाहीच हा निश्चय भारी अवधारी ।। ५ ।।
नवरी रुक्मिणीदेवी वरी दूसरीया । आवरी व्यर्थ चितावा ।।
नवरा तिचा दिव्य नवघननीळाची । न वदतसे मी वावं । हा भाव ।। ६ ।।

**सूत्रधार :** येणेरीति प्रधानाचे वाक्य ऐकून पुन्हा रुक्मी श्रीकृष्णाची निंदा करितो पहा.

**दरु :** (अठाणा. अटताल)

देवकी तनय दिवा अरे कैसा देवकी हा सचिवा ।।
पायीं चालतेचि । गायास चारितें ।।
कायील सोडुनि धोरी ।।
ऐक आणखी साई दहिं दूध खाईल कां करुनि चोरी ।। १ ।।
वाईट बोलणं । आईचे सोसूनी साहिल कां पाद्य भारी ।।
ठायीं ठायीं लंपंडायीं खेळल कां है (इतके) हित्के विचारीं ।।
बटिकं भोजेंद्राची फकाळ (फलौल) कुब्जाही ।।
शतबनी भोगिली पाहें । कटकट त्रैलोक्य नट बेष यासम ।।
बटवाल कोण तो आहे ।। ३ ।।
आटविलो वधू ती घाट प्रजांतिल दाटुनि येणिआ ।। हा हें ।।
फाटिवे ऐशाचि खाट सामाडिरि । वाट तसें चोज पाहे ।। ४ ।।
घरुट घाणी आगा धरुनि आल्या ज्याच्या ।।
झरति जवा रागावे ।। परम अनाचार परहि नेणतीचें ।।
हरहराशाच्याचें ना ।। ५ ।।
असशिलु पावावयास स्वामपेक्षा घोर म्हणून तुझ्या मते भ्रम फार ।।
आहे परंतु त्या उभयतामध्ये महादंत घर आहे ।।

**व. :** बरे प्रधाना तुजसी बोलून काय प्रयोजन? विश्वमोहिली विपरीत भावना माझी. आवडती आहे की. तिला रुक्मिणीजवळ पाठवून काळ्या गोवळाचे ठायीं अरुचि उपजवितो पाहा.

**सूत्रधार :** येणें रीति बोलून रुक्मि प्रधानासहित निघता झाला. तदनंतर कथा विषयी चारुमती अनन्यभावना या दोघी जणी सख्यांशी रुक्मिणीदेवी येते पाहा.

**दरु :** (गोळिपंतु ।।)

रुक्मिणीदेवी अशी येते पाहा ।। रुक्मवणन् सज्जशी
रुक्मिणीदेवी दिव्य रूपवती सखीशी ।। मूदराखडीशी ।।
पाठीं कुळेवेणी ।। मुदित मुखिदरी ।। नानाविध तेणी ।।
उदधिकन्याचे काय गुणश्रेणी ।। उतरली भूलोकीं सुखाची केणीं ।। १ ।।

सुंदरपण वृद्धी व्हावया मोठी ।।
कंदर्प जन्म इच्छि जीच्या पोटी ।।
इंदुमुखी सर्वलावण्याची पेटी ।।
अशी मंदमंद गजघाटी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति रुक्मिणी देवी आल्यानंतर तिशीं चारुमती सखी बोलते पाहा.

दरु : (आनंद भैरवी. आदिताल)

सोमाहुनिही फार चांगलें कामिनी तुझें ।
कोमाइते कां मुली आंग तें ।।
व्योम चिंतेचे कोमलांगी ।। वरी ।
कोसळतेसें हे मज गमतापे की सकलें ।। १ ।।
आगाइ वदनाब्जिहून । लागो पाटपे निधित कां निश्वास ऊन ।।
सांगे सर्वही झगटली निज मनीं ।। झणि बहु चिंता तगबग
नयनीं ।। तूझी पाहून ।। २ ।।
वेगळिमशिश सदा विमानस दुःखे वेगवत्तरतां वदावीं ।।
आनंदसौधीं वेद्यवीन निवेद पूर्ते करी ।।
हे घडी चिंतारेघ पुसावी ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति चारुमती सखीनें विचारितांच रुक्मिणी प्रत्यत्तर देते पाहा.

वा. : सखे, स्त्रीजन्म मोठा फटकळ. मनाजोगा वल्लभ मिळाला तरींच खरें. नाहीतरी कांही समाधान वाटत नाहीं.

सूत्रधार : येणेरीति देवीचे वचन अैकून चारुमती बोलते पाहा.

श्लोक : स्त्रीरत्न तूं रुक्मिणी निश्चयेंसी ।। सुवर्ण तो कृष्णनिधी दयेसी ।।
दोघां सहि योग घडा (डो) स्वभासा ।। सखे स्वतःसिद्ध अनन्य भावे ।।

सूत्रधार : येणेरीति चारुमतीचें वचन अैकून रुक्मिणी बोलते पाहा.

श्लोक : जो स्वाज्यास्वानंद समुदशि करलवासें पूनीता ।। ब्रम्ही व्रौनः ।।

दरु : सौख्यविभवा चाली वदे हे त्रयीं ।। आणि श्रीगुण सुंदिराजं पतसे ।।
शेवो जयाति धिरोवि शाकौ ?।। सखे खरकंधरा रुचा ।। ज्यातेंचि जगसुंदरा ।।

दरु : (राग सावेरी. अटताल)

अप्राप्य कृष्ण खला असा मला ।। साक्षीभूत हीन मोक्ष पदापरी ।।
भिक्षुकासी कोटिलक्ष धनापरी । राक्षसाची दया दाक्षिण्याचे परी ।।
अक्षिशून्या वस्तू वीक्षणाचे परी ।। १ ।।
तनु मी भावना तत्त्वज्ञानापारिगि ।।
अनुपम नीत नरा अश्वमेधावरी ।।
अनयपथ रान लपा अचल राज्यापरी ।।
विनय विहीनासी विमल यशापरी ।। २ ।।
तमस प्रकृतिशि रामभक्ती परी ।।

कामिनी रहितासी कामसुखापरी ।।
वामपंथियास्वगन् साम्राज्याचे परी ।।
वामलोचने घनश्याम मनोहरी ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीति रुक्मिणीदेवीचे वचन ऐकून चारुमति बोलते.

**वचन** : सखे श्रीकृष्ण आत्माराम पूर्ण काम येथें संदेह नाहीं. ऐसाहीं अनन्यभक्तीनें लभ्य होतो. परंतु विपरीत भावनेचा मात्र सहवास कामा नये.

**सूत्रधार** : येणेरीति चारुमति रुक्मिणीदेवी संवाद करितां, विकल्प रुक्मिणी पाठविले ते विपरीत भावना येते पाहा.

**दरू** : (सौराष्ट्र. आदिताल)
कपटाची मूर्ती सुंदरी ।। कविची सोदरी ।।
विपरीत भाव नावु ।। विकटेंचि बोलत आली गजरीं ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति विपरीत भावना आली ते पाहून श्री रुक्मिणी चारुमतीशीं बोलते पाहा.

**दरू** : (सुरटी. आदिताल)
कवण कुटिल रमणी येते पाहा ।। ताकरिये असणीं ।।
भ्यासूर लक्षणें या समयिं माझ्या ।।
आसुर प्रकृतिचें धासतसे निज ।। १ ।।
शमलतरु शतकाचें बीजशी ।।
तमरूपिणी हे तडकली बीजसी ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीति रुक्मिणीचें वाक्य ऐकून चारुमती उत्तर देते पाहा.

**दरू** : (मोहन)
आये नेणसी विपरीत भावना ।। काय ।।
नेणसी पुससी अवो जना ।। १ ।।
ज्येष्ठया रुक्मिया बंधुची ।। हे ।।
इष्ट सखी गुणासिंधूची ।। २ ।।
चैद्यहितीं रती स्वैरिणी ।।
भव वैद्यवासुदेव वैरिणी ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीति रुक्मिणीदेवी चारुमती संवाद करीत असतां, विपरीतभावना रुक्मिणी-निकट येवून विकटवाक्य बोलते पाहा. वरवावुग लोक.

**दरू** : (केदार गौळा. आदिताल)
भीमकी धन्या अति ।। हे ति तूं श्रीसती पुण्यद ती ।।
जोडूं पाहतों चेदिपतीवर ।। जोडि ज्यासिं नसे ।। जगतीवर ।।

**सूत्रधार** : ऐसें विपरीतभावनेचे कठोर वाक्य ऐकून रुक्मिणी कान झांकून, अनन्यभावनेचे विलोकन करितां ते विपरीत भावनेला उत्तर देते पाहा.

**श्लोक** : नको भ्रांतवाणी वदूं क्रूर वाणी ।।
अवो चक्रपाणी विना अन्यपाणी ।।

धरीना विदर्भात्मजा पुण्यगर्भा ।
पुरे व्यर्थ अभांट हा योग्य अर्भा ।।

सूत्रधार : येणेरीति अनन्यभावनेचे वचन ऐकून विपरीतभावना रुक्मिणीशीच पाहून बोलते पाहा.

दरू : (असावेरी. आदिताल)

कामिनी कां रुचला पशुपाळा ।। नरपति मंडळीं ।।
परम वरिष्ठ तो वर्जुनियां शिशुपळा ।। १ ।।
नांगरियाचा भाऊ ।। सांग जीचा पती ।।
सांग त्या तुझे कपाळें ।। २ ।।
मातुनियां जेणें मातुळ तो मारिला
घातक तो अकृपाळे ।। ३ ।।
कुत्सित भिल्लिणीचें उच्छिष्ट खाणारा ।।
तुच्छ कलीचा द्वारपाळ ।। ४ ।।
जरि गमे अंतरिं तो चेदिपती ।। वरी ।।
भलताच नृपाळ ।। ५ ।।

सूत्रधार : येणेरीति विपरीत भावनेचें वचन ऐकून अनन्य भावना तिला धिक्कारून श्रीकृष्णाचा महिमा सांगते पाहा.

दरू : (व्यागडा. आदिताल)

अवो फोल शब्द बोलतेचि व्यर्थ कांहीं ।।
कैसा वासुदेव देव देव नोहे बाई ।। १ ।।
जेण । बाळंतिया तिला बाळें वरदानें ।। केला ।।
चूरचूरे गाडा गाडरवधानें ।। २ ।।
करूं ।। यातना पूतना येतां रक्षसीचे स्तन चोखूनी
शोकिली देखीना सुती शीण ।। ३ ।।
जोग लीला लोण वा करूनी वोणवा करूनी कालिया हे ।।
केलं । तांडवपांडव प्रिये माथां पाही ।। ४ ।।
करितां गोकुळें व्याकुळें शक्रधारा लोटीं ।।
धरिल्या गोवर्धनें नीट बोटीं ।। ५ ।।
गुरु ।। नंदननंदानंदन मृत ते ही ।।
केल्यें ।। जीवंत श्रीमंते पुन्हा लवलाहीं ।। ६ ।।

सूत्रधार : येणे रीति अनन्य भावनामुखें भगवन्महिमा ऐकून रुक्मिणी बोलते पहा.

दरू : (कानडा. अटताल)

देवकी नंदन वरील तरीच तो ।। महिले दिली असती ।।
महिवर अभिनव ।। महिमतीर्थ ।। अवगाहिली जरि पुरती ।। १ ।।
स्वहित सार्थक मये ।। नटोवा असेल जरी ।।
महेश्वर पूजिला ।।
ना हस दुष्टभावें सकळ जगत्रयीं नाहींच जरि योजला मजला ।। २ ।।

(श्लोक): जळी या या जरी वरि न मुरारी मातें ।।
मी नातळे तरिहि दुजा पुरुषाधमातें ।।
जे नित्य मूढ फिरती भव शोकोनी ।।
माझी कशी पुरवू सकती सिवाणी ।।

सूत्रधार : येणे रीति बोलून पुन्हा चारुमतीशी बोलते पाहा.

श्लोक : करीन अतिसाहसें पुनरपि हें साजणी ।।
धरीन कठिण व्रतें अकृतपूर्व कोण्ही जनी ।।
वरीन शतजन्महीं डक त्रिलोकें सखा श्रीहरी ।।
तरीच निजनाम हें समज रुक्मिणी सुंदरीं ।।

सूत्रधार : येणे रीति देवीचा निर्धार ऐकून हें वर्तमान शिशुपालास सांगावे (म्हणून विपरीतभावना निघतांच पड्यात एकच कोलाहल झाला तें परिसून देवी चारुमतीसीं बोलते पाहा).

(दरू) : अवो चारुमती विपरीतभावने ।। आम्ही अव्हेरिल्या करितां ।।
वहुतेसि दमघोषनंदन माझें प्रलोभन करायाचा येतो ।। तरी ।।
हंम्बास (आम्हास) येथें राहाणें युक्त नव्हे ।।
कासा ।। बागांत गुर्त (गुप्त) बसून सर्व समाचार ऐकावा ।।

सूत्रधार : येणे रीति सखीशी बोलून रुक्मिणीदेवी शृंगारोद्यानात निघाल्यानंतर सकळु भूपालांसहित शिशुपाल येतो पाहा.

दरू : केदार गौरिला आदिताल

आला तो शिशुपाळा ।। विणा रुक्मिणीवरी ।।
जाल मोहपूतच ।। पाळा सभोवत ।।
तमीं रत वतसे भूमि हा लाचा भूषण चांगला ।।
मालव मागध मत्स्य कुरु पांचाल काश्मीर देशाधिपती ।।
ताल झंग अलंग वंग कलिंग वैशींल विशाल असती ।। २ ।।
साल्य व कोसल कुंतल आणि ते पाळ बळांचे सिंधु अति चोळ
पांडच तुंडर प्रचंड जे घोषत यो चित्रिळू करांनीं कुदती ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीति शिशुपाळ येऊन जरासंधाती नराधिपाला अवलोकून बोलतो.

दरू : (चंडसू)

आपुलिया बळें रुक्मिणी वरून नृपती हे आलों येथें मी वरू ।।
कपटि गोप हा विट्ठघनीं उपतसें पाहा ग्रणी

सूत्रधार : येणे रीति (चैर) चैद्याचे वचन ऐकून असत्य संघ जरासंध प्रत्युत्तर देतो पाहा.

फिरति ज्या तों वनांतरी ।।
शिरकला न जों तेथ केसरी ।।
वांसत्या परि यादव स्वयें ।।
झरती आमुच्या दर्शनान्वयें ।।

वचन : म्यां हीं चारमुखें हा समाचार ऐकिला कीं सर्व राजमंडळीच्या दर्प खंडून राक्षसविधीनें कल्याण रुक्मिणीस न्यावें मुगी पाठीलाग करून आल्याने त्या सकळ देवादिकांनी ठोकून वाटे लावावें.

सूत्रधार : येणे रीति मागधाचे वाक्य ऐकून, वक्रदंत प्रमुख मुखंड राजे वक्रोत्तरें बोलतात पाहा.

(श्लोक) : गिळील तिमिरावली जरि सरोजबंधूसही ।।
चळील निजधीबळें आणि गुरूस मूढ स्वयें ।।
पडील धरणी जरी मशक पक्षघाते गिरी ।।
घडेल तरि तो आम्हां अजय यादवांचे करी ।।

सूत्रधार : येणे रिती बोलून वक्रदंत मिशास ताव देऊन अर्भाटकरितां शिशुपाळ बोलतो पाहा.

(श्लोक) : जसा पण दशाननें कृत रघुत्तमाचे जयीं ।।
पराभव उपरां तुम्ही तशीच घातली पैजही ।।

सूत्रधार : येणेरीती शिशुपाल बोलतांच सर्व राजे विरामून टकमकां येकमेकांचे सा अन्योन्य संवाद ऐकून रक्मिणीदेवी संतोषाच्याने एकांती चारुमतीस पाहून बोलते पाहा.

(श्लोक) : पुढील सखी होयिक प्रकटतें असेंचि असें ।।

सूत्रधार : येणेरीति रुक्मिणी चारुमती परस्परांस बोलत असतां शिशुपाळादिक भूपाळ अग्र कार्याचे ठायीं सावधान असावें म्हणवून निघाल्यानंतर कौतुक अवलोकून सकळ राजांचा वीट मानून, कालक्षेपार्थ शृंगारवनविहार करितां देतें, अद्भुतरिती देखून सख्यांप्रति सांगते पाहा.

दरु : (कांबोदि. अटताल)
नवलाचें वन बाई ।। अवलोकिं दिठीं ।। कांही ।। भुवि याशि सरी नाहीं ।। भुवनाश्लिष तारु भुवनातीत हे पाही ।। निवसती यया ठायीं ।। निगदूं मी किती कायीं ।। वाघ आणि त्या गायीं ।। वागती मिळून गायीं ।। नागाचिया वोहिं ।। सांविजे बेडूकांहीं ।। नागशिशु लवलाहीं ।। मागती स्तव सिंह लाही ।। लागतें मांजरापायी ।। निगुती अंदीर माहीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती रुक्मिणीदेवीने वनाचा अतिशय वर्णितां ऐकून चारुमतीही वनचमत्कार सांगते पाहा.

(श्लोक) : जिलाकांता कांता कवळिती भुजीं गाढ शतशा ।।
लतावृक्षालक्षावक्षी लिधरल्या केवळ तशा ।
मनोहारी हारीं वरतरतारू चि मिरवते ।।
असंख्यात हा ह्यातकी व्दिज करितिही गुंजरवते ।।

सूत्रधार : येणे रिती चारुमती बोलताच लतावृक्षादिकांचे अन्योन्य मेळत पाहून श्रीकृष्णदेवाचे ठायीं रत विरह परवश होउन सखीची प्रार्थना करिते पाहा.

(श्लोक) : कठोर कर्णशी पाहा महा की ।।
हो कूजितो कोकिलवृंद हाकीं ।।
निस्सीम कामज्वर ताप द्याया ।।
सांगे सखे शीतल भेषाजा या ।।

**सूत्रधार :** येणे रिती रुक्मिणीचे वाक्य ऐकून शीतलोपचार करायाकारणें चारुमती उद्युक्त होताच रुक्मिणीदेवी बोलते पाहा.

**दरु :** (पुन्नागवराळी अटताल)
सजणा वन नको विजणावार हरीं निज सखी आणिती ।। १ ।।

(दरु) : करणें करि मजला मीनलीस करूं कार्य या पापाला ।। १ ।।
हरिवीण सुमनसा सरही अव्हेरितां सरीतेची परिवरी ।।
वरीं म्हणुनि बोलसी ।। २ ।। सशीर न लावि दावीं ।।
शिशिरा शुमुखे वढतां उशीराच्या प्रसंगे नसतां हा मांडसी ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती चारुमतीने केला उपचार सर्वही अपचार मानून विरहवेदना न साहतां प्राणवल्लभास पाचारायाकारणें रुक्मिणीदेवी तांतड करीते पाहा.

**दरु :** (आदिताल)
उशिर करिशी कायी तूं आता शिशिराशुमुखी बाई ।।
अशरीर मनसिजा आ नीहा आ ।। पण स्वशिरी ती विंदितो आर्द्र हिमग्रहीं ।
चिर हा दारुण कैसा विचरलास हा ले न लहरी विण घडिभरी ।।
मज रहावेना ।। करितां विनवणी कलभगामिनी तूझें हरि हरी मानसे अझुणि द्रवेना ।। १ ।। हा दुस्सह माझ्ये हा हा हे ।। पाहूं नीचा तविशी किती तरि सजा मनी ।। चाळक हृदयाचा चारुलोचन तया चालता तरि आणि साजणी बधुनि विनवि तूं ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती रुक्मिणीचे वाक्य अैकून चारुमती समाधान करिते पाहा.

**दरु :** (कल्याणी. अटताल)
देखिसि नयदेवकीसुत देविरुक्मिणी ।। देखिसी नयनं हृदे उद्देण निवासितो देखणी बुद्धिच्या देखिलें रमणी ।।
भाव तुझाचि सावळचा देवा दावी पुढें ती । यावरी
विरहाचे नाव पुसूनि टाकी पावेल संपदा ते वळछडती ।। १ ।।
भोगिशी पूकोन भोग तियाशी योन शालिनी ।।
योग हेर्या करूनि सा तशी तुजलागूनि निश्चित हें गुण साजणी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती चारुमतीचे वाक्य अैकून देवी संतोषाने वनविहार करीत असतां. पूर्णकाम हीं कृष्णकार्मुकाचे लक्षणसूचवीत येतो पाहा.

**दरु :** (आनंद भैरवी. अअटताल)
येतसे पाहा श्रीकृष्णदेव । दाता निज सुख दाता ।।
भक्तजनपूत केवळ वीतरागही जे तरी जनरीत दाविता ।। १ ।।

धरःनि रुक्मिणीध्याने ।। मानसस्मरीं स्मरनानंद निदान ।
विरह खिन्न सजण ।। विपुलधैर्य ठिकाण । करित नामस्मरण तिचें ।।
सरसिजायत सरसलोचन ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती श्रीकृष्णदेव येऊन दीर्घश्वास टाकितां आपल्या ठायीं बोलतो पाहा.

वचन : आहे सुदेव व्दिजाने रुक्मिणीच्या रूपगुणातिशय अनन्य भावना ही माझे ठायीं. आहे म्हणून सांगितल्या दिवसापासून चित्त केवळ तदाकार होऊन गेलें. पूर्वी जें जें विषय अनुकूल होते तेच त्या कामिनी विरहदशेमध्ये प्रतिकूल वाटताहेत. हे नवीन पाहा.

दरु : (इन्दुघंटारवं. आदिताल)

लोकीं कौतुक अवलोकी ।। अेक वस्तुचे शेखी समयभेदें हे तें कि प्रिया प्रिया ।। १ ।। शीत हे तां मलयवात वाटतो सदृश जातवेद वल्लभातीत प्रिया प्रिया ।। २ ।।
हा विश्वतापहरि तावितो चंद्र आतां ती वीणे तरुणादित्य ते प्रिया प्रिया ।। ३ ।। या समयीं केवळ निजसखा विदूषकही कोठे गुंतला ते कळत नाहीं ।।

सूत्रधार : येणे रीती श्रीकृष्ण बोलत असता विदूषक येतो.

दरु : (व्यागडा, आदिताल)

कौशल ज्या शिर शिकोवित माजि चित्त तोषक येतो विदूषक तो पाहा ।।

सूत्रधार : येणे रीती विदूषक येऊन रुक्मिणी विरहातुर श्रीकृष्णास पाहून संतोष व्हाया करणें विनोद करितो पाहा.

श्लोक : शिकारिच्या व्याजें सकळदळसन्नाह करुनी ।।
बहिःभार्गी सेना ठिवुनि वनमध्यान्त रिहुनि ।।
रहस्यी वैदर्भी सह करुनि सल्लापहि कसा ।।
आहेशी आज्ञाचे परि ठक नसे तूजसरीसा ।।

अैसे अंतरंग वर्तमान भासत असतां कां विव्हळासारखा दिसतोस काय निमित्त सांगा.

सूत्रधार : येणे रितीं विदूषकाचें वचन अैकून श्रीकृष्ण बोलतो.

वचन : मला पहिल्यापासून कामव्यसन नाहींच अंगज तापाचा उपद्रव सध्या आहे ।।

सूत्रधार : येणे रिती श्रीकृष्ण संदिग्ध उत्तर देतां विदूषक परिहास करितो पाहा.

दरु : (यमुना कल्याणी. आदिताल)

कान्हा तोचि तूं नव्हेसी काय सांग सावळा ।।
राणीस हुडकीत वेड वा वाणिचा हुडक जो कीं ।।
राणी तरूलागी भेटूं ।। रामरूपें धांवला ।। १ ।।
रासरोक गोटकाशि रासक्रीडा खेळला जो ।।
दासभावही त्या ज्यास गोड भावला ।। २ ।।

चंद्रानना करुनि भार्या पंधरा दिसें रात्रीं जेण
चंद्रावळी भागली गुण सांद्रचर्मे केवळ ।। ३ ।।
क्षीराब्धि कन्यका प्रेमे उरावरी वाहुनी ।
जो निरामय म्हणून विषया निराळा मी सांवळा ।। ४ ।।

**सूत्रधार** : येणे रिती विदूषकानें मर्मोध्दाटन करितां श्रीकृष्ण हास्यमुखे येऊन बोलतो पहा.

**दरु** : (सुरटी मल्हारी. शापुताल)
रमणी देखिली रमणीय ते कमलायताक्षी ।।
किमपि बोलवेना स्वमुखे लावण्य हें मज लेशही चित्त
भ्रामते अशि जे ते । फलित भाग्य जणूं जनांचे कीं ललित
शृंगाराची पेटी ।। ललनमंडळीं मालिके ते जें ।।
मेरु मजणाधारीं झळकली तारकधाटी ।।
त्या जणुं चंद्ररेखाची मोठी ।। कलदौत दीप्तीची पाटी ।।
नेणों ।। आलकीं मज देऊं भेटी ।। सुख कोटी ।।

**सूत्रधार** : येणे रिती श्रीकृष्णाचे वाक्य अैकून विदूषक बोलतो पाहा.

**श्लोक** : स्वप्नांत नेणू नवमेघनीळा ।। त्वां देखिली रुक्मिणि चारुशीला । कीं ध्यास तीचाचि मनिं म्हणूनी ।। बाहेरही भासली नसोनी ।। अंबाल योना तरि दिव्य चित्रा ।। कांताकृती पाहुनियां विचित्रा ।। नेणूनी तत्यत्व निजातरंगी ।। भ्रमां वुध्याचेक बुडसी तरंगी ।।

**सूत्रधार** : येणे रिती विदूषक ते गोष्टीही उडवून देतांच कृष्ण बोलतो पाहा.

**(वचन)** अरे विदुषका माझे स्वरूपी असत्याचा डाग नाही म्हणून कळला असतां पुन्हा अनृतवाद. का स्थापितोस.

**सूत्रधार** : येणे रीति कृष्णाचे वचन अैकून विदूषक बोलतो पाहा.

**वचन** : स्वामी अनृप्रशंसेस आपणच मूळ. हें मला या अनुग्रहेंचि पूर्ण कळलें. त्यासाठीच सविस्तर वर्तमान विचारितो.

**सूत्रधार** : येणे रीति विदूषकाचे वचन अैकून श्रीकृष्ण प्रत्युत्तर बोलतो पाहा.

**(श्लोक)** असत्य माझ्या नलगे न भाषीं । सिणोनि हे प्राण किमर्थ खाशी ।।

**वि.** : सर्वाकृता आश्रय तूंची देवा ।। जाणूनि (मी) बोलतसे सवेदा ।।

**वचन** : पूर्वोत्तर सांगती सांगशील तरी । त्वा रुक्मिणी देखिली ते सत्य वाटेल.

**सूत्रधार** : येणे रिती विदूषक वाक्य अैकून श्रीकृष्ण बोलतो पाहा.

**(श्लोक)** ठिऊनी सोनावन वनबाह्यदेशीं ।।
मी पावलों अव्दयपा प्रदेशीं ।।
न देखूनि ते प्रकृतिस्वभावें ।।
तैं मोहवूं तद्गुण सुप्रभावें ।।
याप्रमाणे मी रुक्मिणीदर्शनार्थ उत्कंठित असतां.

श्लोक : मनोरथ धनोदया सुचवणार कीं काहळी ।।
मनोज जय दुंदुभी अवनिच की खिली जाहली ।।
संदेश सम अनारिता श्रुतियुगींत सा चांगला ।।
झुळंझाळितनू पुरस्वन सख्या पडू लागला ।।

वचन : याप्रकारे नूपूरांचा मंजुळ स्वर ऐकून त्याच्या सुमाथरून म्यां विलोकितां तो पूर्वोक्त लावण्यशालिनी दिव्यस्त्री पाहून मनात उत्प्रेक्षा केली ती सांगतो ऐका.

दरू : (सुरटी)
अमरराजवधूच बोलूनी हे निमिषमात्र आहे ती ना ।।
त्रिनेत्री विमल कालिका भाविजे तरी हे मला ।।
सडाची नवाणवे नागाची पुत्री ज्या ।।
अमितश्वान न पडि कीं गमीक्तिकीं ही युक्तिचे सूत्रीं आली ।।
कमळाची कल्याणधात्री ।। १ ।।

(श्लोक) ब्रह्मानंद अलभ्य केवळ जरी ब्रह्मादिकां निर्जरा ।।
मी तेथें परि नित्य पोहत असे हें जाणसी तूं बरा ।।
देवी दर्शन जन्य उत्कट सुखा जें जें शतांशोपरि ।।
तो कांही ना तुकेचि निश्चित मनीं हे सूचली गां परी ।।

सूत्रधार : येणे रीति कृष्णाचे वाक्य ऐकून विदूषकाने तुझ्यासारिखा तत्वज्ञ कोणी नाही म्हणून पुन्हा बोलतो.

छंद : सुदतीते तुझें सांग गोडशी ।।
बदलि काय गा गोष्टी थोडिशी ।।
न धरिते मजशि भिन्न भावना ।।
अधर मी कोठें हालवीच ना ।।
येणे रीति विदूषकाचे वचन ऐकून कृष्ण बोलतो.

वचन : सख्या ठेवीना आल्यानंतर निजमनोभाव सूचक प्रकार रचिला तोचि ऐका.

(श्लोक) न्याहाळिलें मातें करूं कि प्रियेनें ।।
न्याहाळ कांही भरितां तियेनें ।।
न हालावूला मदनज्वराचा ।।
चहाळ झाला सुख निर्भराचा ।।

वचन : या तीन्ही प्रकारें अलक्ष्या संलोमला कटाक्षवीक्षण सलक्ष रूपस्या मधूरवाक्य प्रवणें माझ्या श्रवणासही कृतार्थथा आ वे म्हणून देवीने उद्युक्त होताच एक अंतःपुराचार दूतिकेनें कानी काही रहस्य सांगतांच सख्यासी तेथून निघाली.

(श्लोक) तदा प्रभृति जाहलें चपळचित्त माझें पिसें ।।
तदात्मकचि विश्व हे नकळलों विलोकीं तसे ।।
सदाशिव पे जलती वाचि हे जीभली ।।
सदाशिव कदा ती शकरी वीरसंगति जे भली ।।

शाहन : ध्यान तीचे मानसीं या जाण लागते ।।
आणिक विषयावरील भान सकळ हरपते ।।
व्दिजराज निंदत मुखी जगती अणिखी ।।
निज भूती विलंघन मतसिजासायकसम नयन कीं ।। १ ।।

वचन : विदूषका त्या देवी सन्निधी जाऊन माझे ठायीं तिचें मन लग्न होऊन ज्या लग्नकार्याशी बिरास चढेल तेंचि करावे नहींच प्रियभूषणा. येणे रीति कृष्णवचन ऐकून विदूषक बोलतो.

(श्लोक) मायाचा गुणलेशही तुज नसे मायापि या सर्वथा ।।
तुजपासी कांही क्रियेची कथा ।।
आंगे सर्व करुनिहीं म्हण ऐशी सांगे अकर्ता असें ।।
पुण्यपूज्योहीनेन नीच न असा अन्याय कोठें असे ।।

वचन : ऐशा तुझ्या मध्यावृत्ती करवेना.

सूत्रधार : येणे रीति विदूषक विनोद करतांच श्रीकृष्ण बोलतो पाहा.

वचन : याप्रकारे, तदनुसार योग्या मी संविधानार्थ पाठवितो.

सूत्रधार : येणे रीति विदूषकासी बोलून श्रीकृष्ण निजनिवासास आल्या प्रसन्नता येते पाहा.

दरू : (शंकर. आदिताल)

साधन करिति जि साजी महाथोर साधुजन सर्वदा सत्य पाहा ।।
माधव प्रसन्नता ते मानव ।। आली ।।
साथि देवी देहयोग साधूंच हा ।।

सूत्रधार : येणे रीति प्रसन्नता येऊन बोलते पाहा :—
श्रीकृष्ण आज्ञा न केली जे, अवो प्रसन्नता, ते तुझी जननी जे अनन्य-भावना तीणें रुक्मिणीचा माझे ठायीं दृढ प्रियभाव आहे म्हणून सांगितले. तरी, त्वां तीपासी जाऊन, माझ्या हे स्नेहातिशया देवीवर आहे म्हणून या प्रकारें सांगवून अन्योन्या एकात्मता हेतु तेथेंच राहून स्वयंवर कार्यसिद्धी करावी. तरी त्याप्रमाणेच देवीनिकटीं जाऊन उभयतांचे सामर्थ्य साधित्ये. हे रुक्मिणी देवीही चारुमतीशी एकांतीं बसली आहे कीं, मीही तेथेंच जाऊन रहस्य वर्तमान निवेदीन.

सूत्रधार : येणे रीति प्रसन्नता बोलत असता रुक्मिणीदेवी येते.

(भुजावंती)

आली राजकन्या रुक्मिणी वनमालींसी ते अनन्या ।।
आली राजकन्या हरिकें वैदर्भी मान्या ।।
मदनमनोहर मधुकुळधीप हृदयीं आठसी तनुदिर स्वरूपा ।।
मदिराक्षी न सहतां ।।
मनसिजतापा, विधुमुखी विरही तीं वळते ।।

सूत्रधार : येणे रीति रुक्मिणीदेवी आल्यानंतर तशी चारुमती बोलते.

वचन : देवि, या सुखाचे समयीं वृथा चिंता कां वाहतेस ।।

सूत्रधार : येणे रीति रुक्मिणी —

दरू : (यरुकुल कांबोदि. अटताल)

लाहीन मी सुख सखिये तेव्हा लाहिन सुख तेंव्हा ।।
सहकारी हो दुस्सह कामाचा ।। सहकार न पुले ।।
जेव्हां तुहिनाकरासही बहुत केतुची कुहुदृढ कवळिलहि ते जेव्हा ।। १ ।।
कंजदळाक्षी खंज वाडेल प्रभंजन मलय जें पाहिल जेव्हां ।।
कुंजरगमने कुंजवनाचा पुंजहि लोपला अवघा जेव्हा ।। २ ।।
पंचमसे पिक पंचमरागा न सोडिती केव्हा ।।
चंचरीकही चंचलनयनें ना किंचित गुंजती साजण जेव्हा ।। ३ ।।

सूत्रधार : येणे रीति रुक्मिणीचे वाक्य ऐकून चारुमती बोलते.

चारुमती : देवी हे तुझ्या अनन्यभावनेची कन्या प्रसन्नता आली आहे येचा अवलंब न झालिया घडिचा विलंब न लगता भगवंताची प्राप्ती होयील तरी दर्शनाचा लाभ देऊन सकृतार्थ करावे

सूत्रधार : येणे रीति चारुमतीचे वाक्य ऐकून प्रसन्नतेसीं गाढालिंगन देऊन रुक्मिणी बोलते पाहा.

श्लोक : हे तांति योन तुझ्या वीर्यतिरूचा तो ताल पैं तूटला ।।
हा ताप स्मर जात दुस्सह महा अता सये सूटला ।।
ली वडु धना तिरघडली वाताहत मा सखीता अबि ।।
आला मुकुंदनिधी तो दाता सुखाचा सखी ।।

सूत्रधार : रुक्मिणीचें वाक्य अैकून प्रसन्नता स्वप्रशंसा करिते.

श्लोक : आहे व्यापक तो हरि प्रतिघटीं बाहेरि अभ्यंतरि ।।
पाहे त्यास्तव दुःख वानें सुखहि पाहेन कोणातरी ।।
राहे मोक्षणमात्र जज्जन तो लाहेत घोरापरा ।।
पोहे बुधीतही मृषा न हेंचि राहे कडा ।।

वचन : देवी, मी इतके बोलत असतांही तूं केवळ परवदा आहेस, यासी निमित्त काय. ?

सूत्रधार : रुक्मिणी ।।

दरू : (अहिरी)

पाहिलीया पासोनी प्राण नाहे देहीं बुद्धिची गेली कल्पना हे ।
नावडी बैसली अवघिया विषयां । सुचे दुसरा भावे ।।
केवळ तन्मय होऊनि ठेल्यें न वदवे तो नवलावो अवो ।।
विश्वरूप अैसे ना नाम साच याचें ।। संशया कांही ठावो ।।

विश्व सर्व भासे तदुप ज्यास्तव ।। विस्मय ग मजला हे आहे ।। २ ।।
कौसल याचे काय मी सांगू अस्करनिहि येकात्मक भावो ।।
विसर मनि त्या विरहें सळी जीवा घे स्वसुखाचाहि लाहे आहे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणे रीति यास्तव स झाले रुक्मिणी प्रसन्नता दोघी संवादता अंबिका-पूजनार्थ देवीस बोलावा कारणे दूतिका येते.

**(दरु)** : ते समयीं आपडति ज्जे ।। देवीस मोठी । केवळ सत्वमयो ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रिती दूतिका येऊन देवीस नमस्कार करून बोलते पाहा.

**वचन** : अवो देवी मुहुर्त समय समीप ठरला आहे. तेरी अंबिका पूजनार्थ शीघ्र चलावे.

**सूत्रधार** : येणे रीति सखीचे वचन अैकून प्रसन्नतेस पुढें करून चारुमतीचा हस्त धरून देवतासगौस येते पाहा.

**दरु** : (राग अहिरी. आदि)

अंबुजाक्षी येते पाहा ।। अंबिका दर्शना ।। अंबरमध्या सौवर्णा ।
अंबराकुंदनिनदशा ।। शिसफुलचंद्रमशिरसी मिरवमध्येरजलाक भांग टिळा
जडित भला ।। लजनिजाक्षी कजळ सूदियेलें ।। तिलकें कुंकुमाचा ललाटी
शोभला ।। कलहंससारिखी ।। हळुहळू ।। पुरसिज कलशभरे करुनी ।।
अलिवेणी । ललित रूप झलंझालित मजिरातें ।। कलितसखी हस्ता
कमनीय करुनि ।।

**सूत्रधार** : येणें रीति रूक्मिणी षोडशोपचारी देवीस पूजून सुवासिनिसही हळदेकुंकू ताँबूल फलादि समर्पून देवीची प्रार्थना करिते पाहा.

**(श्लोक)** :
मझ्यारिघटिकेचिया निजसखा माझ्या भरों पाणि कीं ।।
हा जावो विगतासि चैद्यअय जाउनि आणिती ।।
काजा साधुनि देशि याच दिवु ये राजानने माणिकीं ।।
पूजा भांदुनि अर्पितेही बहुशा मी कोळ की ।।

**दरु** : (सुरटी)

देवी देई वर तो देवकी तनयचि वर तो ।।
तूं केवळ होशील सत्याचे जरी आवो ।। फुकी आस आजी ना बरी संततही
पूजीन मी तुझे जननी करीत आल्ये ।। ते अंतरी चितून चिंतितां दायिनी
अंबिके पावा ।। अचल बाळये ।। आणिक ही विज्ञापना हे आईक का
माझ्या आई ।। हा दानव भेद्यती भग मनोरत वीन ही हे कीरवाणी ।।

**सूत्रधार** : येणे रीति देवीस प्रार्थिता श्रीकृष्णागमन सूचक अंबिकेनें अंबुजाचे मालिका रुक्मिणी त्यास सर्मपिता तत्समयीं आनंदकंद मुकुंद पावला पाहा.

**दरु** : (तोडी. आदिताल)

आला आनंदसिंधु आत्माराम ।। ज्याला साजे पंचज्योती अैसेना आरूढ
लासे ।। मनोरथीं ।। भावदारक सेवे सारथी ।। धुरे वारू श्रवणादिक
असती ।। मनी मरुता ज्याची मोठी शीघ्रगती ।। १ ।।

सूत्रधार : श्रीकृष्ण आल्यानंतर त्यास विलोकून रुक्मिणी लज्जावती होऊन आप-आपणाते रुक्मिणी बोलते पाहा.

(श्लोक) : नित्याभिव्यक्त चित्तीं असुनि गे विभु हा लोचनीं पहातांच ।।
ध्याते कैशी मुमुक्षा स्वसुखी अजि असे लब्धतें लाहतांची ।।
आल्यें सावल्य मोठे दरशत घडतां दीर्घ या सारसाक्षी ।।

सूत्रधार : येणे रीति रुक्मिणीचे वाक्य अैकून श्रीकृष्ण त्वरेंने चमत्कारे सर्व पूर्वानुबंधसूचक वाक्य बोलतो.

(श्लोक) : मी धाराधर तूं अचंचल विभूं मी चंद्र तूं चंद्रिका ।।
मी वारानिधी तूं अभंग लहरी मी शंभु तूं अंबिका ।।
मी राघव तूं विदेहतनया मी वृक्ष तू वो लता ।।
मी नारायण तूं रमा इतरता येथें नये बोलतां ।।

सूत्रधार : येणे रिती अरविंदसाभावे बोलून करारविंदव्दये इंदिरास्वरुपी रुक्मिणी उचलून अचंचल मनोरथ रथावरी बैसवून शिशुपालादिकाते मुखे स्ववर्गीकित करून व्दारकेस येणे केलें पाहा.

सूत्रधार : येणे रिती पुंडरिकाच्या विक्रम वैदर्भीस नेल्यानंतर विवाहदीक्षा दिक्षितां शिशुपाल वाढवेला रुक्मिणीचा पुनरागमन समाचार कळता मुहूर्तसमय हिंडकळता बहुतेक पूर्व सुदावेन सर्व अंबिका पूजनार्थ आल्याठायीं काळ्या गोवळाने भीमकीस उचलून नेले असेल जणू. बरे हा वृत्तांत घेऊ म्हणून सचिवासी चिंताक्रांत शिशुपाल येतो पाहा.

दरु : (काफी. आदिताल)

आला चेदिपती वापी ।। अति ज्याला असे
चित्तमनी ज्वाला हरिव्देषा ।।

सूत्रधार : येणे रीति शिशुपाल आल्यानंतर त्या विलोकून सचिव बोलतो पाहा.

(दरु) : प्रार्थितसे मी जोडनि पाणी ।। लागली कां तुजलागुनी चिंता ।
सांग मला रे ते मज कानीं ।।

सूत्रधार : येणे रीति सचिवाचे वाक्य अैकून शिशुपाल बोलतो पाहा.

वचन : रुक्मिणीचा समाचार कळायाकारणें जासूद, आला नाही यास्तव चिंता वाटते.

सूत्रधार : येणे रीति शिशुपाल सचिव संवादत असता, जासूद येतो पाहा.

दरु : (देवगांधारी)

का सका सूनि (?) यावरी ।। श्रास गास गतचे ध्यावे भला ।।
जासूद तो पाहा आला ।। १ ।। लवली मुरकुंडी ।।
भोवती लोकांची झुंडी ।। अवनळा शिरीली तुंडी ।। धुंडी ।। २ ।।

जासूदास अविलोकून बहुतेक आमचा मोडा झाला असेल म्हणून सचिवाने सूचितां ते गोष्टी कानावरी घेता दुरभिमानानें दमघोषनंदन बुद्धि मंदमंद हा पूर्व खुणेने विचारिता पाहा.

वचन : राया अमुच्या शत्रुपक्षास जैशी परम अनकूल ते जाहले.

सूत्रधार : येणे रीति जासूद वाक्य, हातपायी गाळून बहिरंगालाटिकीच धिटाई धरून चेंद्याने पूर्वोत्तर समाचार विचारिता जासूद सांगतो—

(श्लोक): दत्तायत्ता समस्त सैन्य असता मस्तव्दयाचे महा।
गेली ते गिरीजागृहा नृपसुता पूजानिमित्ते पहा ।।
मोटा जी सागे हे ना असा।
काळा गोवळ पैठला शठ भला कोठूनि की तो कसा ।।

(श्लोक): अगोदरीच अंबिकागृही लपोनि ते म्हणून गोष्टी
अशी युक्तशी गमता अंतरंगी गणून ।। १ ।।
न गोपमतदा निजस्थळीं तेही होतात त्यासी त्याचि परी ।।
जाता कृष्णसादेखिला अम्ही धरानाथा अपर्णागृही ।। २ ।।
येतां हे रमणी सुगुणोपत त्याचे बरी धावतां रथधन
जातांचिया निःस्वते ।। हाताटी हरि कांपितो
कहुनि ते हातापलो जी मनें ।। ३ ।।

वचन : याप्रमाणे भीमकीस नेल्यानंतर वर्तले वर्तमान ऐकावे.

(श्लोक): पराजित नराधिपा प्रबळ मुख्य होतांच हे ।।
परायण पलायन प्रकट सर्व झाले स्वयें ।।
धरा त्या नद्या शोणितें ।।
चराचरीं पुरा असे नर न जाहले जाणते ।।

(श्लोक): टिका टिकारे च अभंग ठाणीं
न काने मुखे समुच्चारित चित्स्वभावें ।।
गेल्या पळोनि अतिभीतभाव ।।

सूत्रधार : येणे रिती जासूदाने वर्तमान सांगतांच रुक्मिणीचा म्हणून चैद्याने पुसता तो वृत्तांत सांगतो पाहा.

वचन : राया कृष्णास पराभूतून रुक्मिणी आणिल्यावीण न करास ये आपुल्या बापापुढे पण करून रुक्मिणी जाऊन वासुदेवासी अडविता,

(श्लोक): क्षणामध्येचि कमलेक्षणाने शिक्षणानें ।।
रुक्मी तरी उद्भटपुंजी केला पराभूताचि पापशंखी ।।

सूत्रधार : याप्रमाणे रुक्मिस पराभवू दे मनि त्या अनंते ध्वजी. बांधूनि राजया वीर्यवंतें शिरीं काढून पांच ते पाट पाठीं अकीर्तीचिया

सूत्रधार : वचनःयाप्रकारे कृष्णाने विटंबना करिता बळदेवानें दयेनें सोडवितां तो अधोमुखी तेथून निघाला हा अग्रकार्यी आपण समर्थ आहे.

सूत्रधार : येणे रिती जासूदाचे वाक्य ऐकून चैद्य चितासमुद्रा समाधान करितो पाहा.

(दरु): दैवानुसारे जयाजय दोनि राया लोकीं ।।
हेयिले च्या क्षयें सर्व
दुष्ट हेयि की का धी जे हेवूं पुण्यश्लोकी ।। १ ।।
केवळ नर राम रावण बळसिंधु।। जीव घेतले ।।

सूत्रधार : येणे रिती प्रधानानें समाधान करितां भरून मनोरथ गेल्यानंतर नेपथ्यात ऐक दूत येऊन बोलतो पाहा.

वचन : आहे श्रीकृष्ण विजय श्रीसमवेत।। श्रीकृष्ण व्दारकापट्टणास येतोही। तरी। शृंगार नीट आता नगर न चुकता येकही बिदी रंगी। रांगरास चित्रचित्रे सुरंगे। बादा उद्धाम रत्ना प्रकर घटित हें तोरणें ठायीं ठायीं गेंद्रा वणनेंचि शिपा अजि शायीं।।

सूत्रधार : येणे रिती वेत्रधरानें ताकीद केल्यानंतर श्रीकृष्ण चतुरंग बळेंसी येतो.

चारु(दरु): रथावरि येतसे श्रीसहदेव मुरारी।। वास्तमणिसम भासुर उत्भासत त्रिभुवनीं भारीं।। हर्षूनी वर्षती कल्पतरूची सुमनतोडें।। निरुपम रूपे ते निरखनी गर्जती नरनारी जयघोषीं।।

सूत्रधार : येणे रिती रुक्मिणी कृष्ण आल्यानंतर श्रीकृष्णास रुक्मिणी समेत रुक्मवेदिकेवरी बैसवून विवाहमुहूर्त करायाकारणें जोश्यास बलाविता शंकर जोशी येतो पाहा.

हातीं पंचांग घेउनि म्हातारा फार लवूनि।।
टेकीत काठीस बळें शंकर जोशी तो आला।।

सूत्रधार : येणे रिती जोशी आल्यानंतर श्रीरुक्मिणीदेवीस श्रीकृष्ण देवास नवरत्नमणिमय विरचित कल्याणमंटप बसवुन देवगंधर्व मुनिजन सर्वही मंगळ नीरांजन करिताहेत पाहा.

श्री रुक्मिणीशाय मंगळं।। श्रीमते सर्वेशाय मंगळं।।
धेनुवृंद पालाय धेनुकासुरकालाय।। मनसिजजनकाय मंगळं।। १।।
श्री एकेंद्र सुधासमुद्रजठसीं चंद्रापरी जन्मला।।
धर्मात्मा तुळजेंद्र जो तनुज त्या दीपांबिकेचा भला।।
त्याचा नंदन जो उभे सम उमादेवीकुमार स्वयें।।
तेणें भाक्षूकाख्यर चला सद्ग्रंथ हे निश्चयें।।
श्रीरामार्पण्म्।। श्री।। श्री।। श्री।।

सूत्रधार : येणे रिती श्रीरुक्मिणी कल्याण महोत्सव झाल्यानंतर श्रीकृष्ण मूर्ती भक्तजनांस वर मागा म्हणतांच भक्तलोक मागतो।।

श्लोक : धर्मिष्ठासी कदा विपत्ति न लगो स्वप्नांतही अेकदां।।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदये सब्दोध लोकां महा।।
श्रीमत् राम पदारविंद युगळीं कल्याण भाग्यप्रदा।
जोडो भक्ति उदार ते अनुदिनी स्वानंद राध्यास्पदा।।

सूत्रधार : येणे रिती वर मागतां मनोरथांते पूरवून श्री रुक्मिणीसमवेत श्रीकृष्ण नित्यानंद मंदिरासी चालला पहा.

श्रीमालोजी।। पुण्य। त्याचा पुत्र जगतीं येकेंद्र। त्यापासोनी। प्रतापसिंहेंद्र कुमार त्याचा जो अंश श्रीकृष्ण जगत्पित्याचा उमा सतीची सुकृतैकरासी कल्पदुमाच्या न तुले कराशी।।

श्रीरस्तु।। श्रीरस्तु।। श्रीरस्तु।।

**।। श्री रुक्मिणी कल्याण समाप्त ।।**

# ३. श्रीपार्वती कल्याण प्राकृत नाटक

श्री गणेशाय नमः ।। श्री गुरुभ्योनमः ।।

(श्लोक) श्री शक्तिनी ज्याप्रति नागराजी ।। योषा स्वयें लाभलि नागराजी ।।
भूषावलि जो धरि नागराजी ।। असो अम्हां तो सुरनाग राजी ।।

**सूत्रधार :** पारिपार्श्वका, येथें संगीतसाहित्यादि सकलकलावल्लभ परमदुर्लभ शिवशक्ति पारावार परिण अनन्यसाधारण अदृश्य वैदुष्य(?) मंडित पंडितमंडळी श्रीचंद्रभौळीश्वरात्मस्वरूप श्रीप्रतापरामचंद्रनित्यमहोत्सव पहायास मिळाली आहे. तरी सर्वजनमनोरंजन कल्याणपरंपरावर्धन पार्वतीकल्याण नांवाचे नाटक नाचवून यांचे चित्त संतुष्ठ करावे.

**पा.व. :** अरे सूत्रधारा, अनवद्य गद्यपद्यात्मक नाटकाचा निर्माता कोण ?

**सूत्रधार** (श्लोक) प्रतापरामसद्भक्ति विभवोद्दाम जो महा ।।
प्रतापसिंहराजर्षि प्रणतापाशि तो पहा ।।

**वचन :** आणीकहि याचा गुणातिशय सांगतो ऐक.

(श्लोक) रूपाने जणूं धर्म केवळ दुजा भूपावलीचा तुरा ।।
बापाहूनि गुणाढ्य सत्वर खुडी पापाचिया वागुरा ।।
कोपातीत सदैव शांतहि बुधा जो पालितो मेदिनी ।।
सोपानी दृढ भक्तिचे स्थित सदा सोपा भल्या लागुनि ।।

परि. (श्लोक) ग्रंथकर्ता प्रतापेंद्र देवीकल्याण वस्तु की ।।
प्रतिपाद्य तथा प्रौढ सभ्य लोकांस मस्तकीं ।।
नटनीं पटु आम्हींही असाधारण पै अहों ।।
भाग्य अलभ्य हा योग मीनला यापरि अहो ।।

(श्लोक) सरस ते कविता अति चांगली ।। नवरसावलि त्यातहि वागली ।।
परमवस्तुच जेथ विकासली ।। सरस हे घटना अशि भासली ।।

**वचन :** तरी तुझ्या वचनावरून नाटक नाचावयास सिद्ध आहे. परंतु एका गोष्टीचा अडथळा पडिलाहे, तोचि अैक. संतानार्थिनी माझी कांता निरंतर प्रार्थना करिते कीं दृष्टादृष्ट यत्नाने अगत्य अपत्य मिळावे त्यासाठीं मन चिंताक्रांत जाले कांही सुचत नाहीं.

**सूत्रधार :** अरे, त्या गोष्टीची विलंब काय. यापरिच मनोदेवीस संतानार्थ प्रार्थिता तेते वरदेवता प्रसन्न व्हावी. म्हणून तप तपतां श्रीदेवीने आपणासारिखे संतान त्यास तीज(?) देऊन परमेश्वरासमान जावायीस मिळवून दिल्हा. त्याप्रमाणे देवी तुझा मनोरथ पुरवील.
(ऐसे उभयतां संवादिता हिमाचल येतो पहा.)

(श्लोक) क्ष्माधरमणी महामहिम दूसरा तो गिरी ।।
समान जगि ज्या नसे गगनहि स्वशृंगें गिरी ।।

हिमांशु कृतशेखर श्वशुर दिव्यवेष पहा ।।
हिमाद्रिवर येतसे भरुनिया प्रमोदें महा ।।

(पल्लवी) मानुषवेष धरुनि सानुवर गुणनिधि ।।
मानशुध्द भावाख्य मैत्र वसे सन्निधि ।।

सूत्रधार : येणे रीती हिमाचल येऊन मेनेचे स्मरण करतां ते येते पहा.

(दरुऊ) मेना येतसे विलोकी येणांकमुखी ।।
जे नारीमणि लोकीं मीनांककांतेसारिखी ।।
येणे रीति मेनादेवी येऊन संतान नाही म्हणून अत्यंत चितातूर भर्तारा निकट जाऊन विनयपूर्वक बोलते पहा.

[ दरुऊ : ( राग अहिरी) ]

ऐक आता आत्मनाथा ।। ऐक स्वामि महदैश्वर्यसागरा ।।
गै करि नशि हे येक माझी गिरा ।।

(अनुप.) लेंकराविण जिणे लेखिचें अमुचें लोकीं अश्लाध्यचि देख महा ।।
शेखि गति परलोकिंहि नाहिच हें कि सांगति पुण्यश्लोक अहा ।।
जीवेविणे कुडि हे वल्लभा जसि तेवीच आमुचि भावी परी ।।
कोणाचे लागतां ऋणी रात्रिदिस नेणेचि हें मी नीट मनीं ।।
जाण तपासीच जाणें यापरि युक्त ।। रानामध्ये नगराज शिरोमणि ।।

सूत्रधार : येणे रीति मेनेने प्रार्थना करितांच तें युक्त मानून अपुल्या स्थलिच तपश्चरणी रत होता अनुचरांसगट मेनादेवी सेवेंत मग्न जाली पहा.

(श्लोक) निजकरेंचि सुगंध उगाळी ।। व्यजन घेउनि वातहि घाली ।।
अलस आणि पिटीत अघालि ।। कळुनि धर्म करूं हि निघाली ।।

सूत्रधार : येणे रीति मेनादेवी सेवा करिता हिमाचलानें पूजनपूर्वक देवीचे ध्यान करितां तो नेपथ्यांत शुद्धभाव येतो पहा.

[ दरुऊ : (राग कल्याणि) ]

शुद्धभाव आला ।। उद्धारक जो शुद्धभाव आला ।।
शुद्धभाव आला ।। उद्धारकार्यें जो बद्धकंकण प्रबुद्धजनां इष्ट ।।
येणे रीति शुद्धभाव येऊन अपुला प्रभाव वर्णितो पहा.

(श्लोक) हिमाचलाचा शुभभाव साचा ।। घेऊनि ठेवा अजि चिद्रसाचा ।।
आलों पहा हो बहुता दिसांचा ।। संदर्शने हर्ष अपार साचा ।।

वचन : आणिकहि येक चोंज ऐका.

(श्लोक) तपोत तप तापसी जप जपीत जे निश्चयें ।।
कपोत खग वृत्तिने उदरहि भरोत स्वयें ।।
उपोषण करोतहि परि न पोशिता पै मला ।।
अहो नच घडे फलां म्हणुनि धन्य-मी येकला ।।

**सूत्रधार :** येणे रीति अपुला प्रभाव वर्णिता शुद्धभावानें हिमाचलांस विलोकून 'तूं महाभाग्याचा ! साक्षातपबर देवता प्रसन्न आली' म्हणून संवदतां देवी येते पहा.

[ **दरु :** (कानडा) ]

देवदेवी आली देख नयनी ।।

**पल्लवी :** देवी आली महादैवयोगे जवळी ।।
कोटि दिनकर रुचिर कोटीर मस्तकीं नेटका लखलखित नीट कैसा ।।
लोट परादीप्तिचा लोटला किं जणुं ।। वाटतो भाव किती वानिजे कायसा ।।

**सूत्रधार :** येणे रीति हृदयसरोवरांत मनोलक्षणउत्पलांत प्रत्यक्ष जाली ते त्रिपुर-सुंदरी तिला विलोकून विनयपूर्वक हिमाचल बोलतो पहा.

[ **दरु :** राग भैरवी ]

अपरूप भेटि तुहि आजि जाहली ।
उपकार काय वदूं आपण मी माउली ।।

**(अनुपल्लवी)** तपति तप ज्यासाठी तापसी थोर ते ।।
उपरि उपरि नसुनि उपरतीची ।।
न परि त्यांचें दिठीस जें पडत रूपडे ।।
पूर्ण सुखरूप अशीचे ।।
मननशील स्वये मुनिहि विख्यात जे सनक प्रभुति भले ।।
आणिक सुरुचि ।। जननी ऐशांची या मानी ।।
तेचि अवो जननी तत्व तूं ।। प्रकृति परजगत्प्रकृति प्रथमा ।।
जे सुकृति वदती ।। मम सुकृताविपाकचि ।।
रोख देतां जेथे रोखचि ।।

**सूत्रधार :** येणे रीति हिमाचलाकृत स्त्रोत्र ऐकून देवीने संतुष्ट होऊन 'अभीष्ट वर माग' म्हणता त्याने मेनेचे सुख विलोकितां (ते) देवीपति बोलते.

**(श्लोक)** देवी प्रसन्न जाहलीस जरी स्वभावे । हें विश्वबीज निरुपे दयार्द्र भावे ।
लोपोनि आपण नटे अति बालवेषे ।। तेणे भरीन नभ मी जननी प्रतोषे ।।

**सूत्रधार :** येणे मेनाचे रीति वाक्य ऐकून देवीने तान्या लेंकराचें रुप धरितां.

**(श्लोक)** निरखुनि गिरिजेचा वेष तैं फार तान्हा ।।
स्तनिं गिरिवनितेचा सूटला थोर पान्हा ।।
उचलुनि करपद्में पद्मिनीसी उमेंते ।।
सुचेति सदनिं आली प्राणनाथासमेते ।।

येणे रीती हिमाचल मेनादेवीस घेऊन अपुल्या घरांस आल्यानंतर देवेंद्र येतो म्हणून सभ्यांस सावध कराया कारणें कंचुकी येतो पहा.

दरु : (राग कल्याणि)

येतसे अमरनाथाचा दूत तो पहा ।।
येतसे शक्राचा दूत पथें ।। तेजस्वी महा ।।
वेत्र ज्याचे हाती मिरवितो विचित्र कनकाचा ।।
नेत्र निमिषावीणीहंदोन्हि (?)
चित्री लिहिजें वेष जयाचा ।।

सूत्रधार : येणे रीति कंचुकी येऊन सभ्यास सावध केल्यानंतर देवेंद्र येतो पहा.

दरु : ( राग सावेरी)

आला शचीपति आराधिति अति ज्याला ।।
निर्जर सुमति ।। बालार्कसम द्युतिमाला रत्नाचिया गळां ज्याचिया डोलती ।।

(अनुपल्लवी) हेमदंडदिव्यचामरें उडविती वामलोचना सुंदरी ।।
प्रेमभरित चित्ते मयूरगण कोमलस्वरिं गाती आदरी ।।

सूत्रधार : येणे रीति देवेंद्र येऊन आपणास तारकासुराने कष्टी केले तें वर्तमान ब्रम्हदेवापासी निर्वेदाने म्हणून चिंतितां ब्रह्मदेव येतो पहा.

दरु : येतसे ब्रह्मदेव देवदेव ।

पल्लवी : येतसे विधि सर्व चेतनि उत्तम येथें ।। चित्त भुवना हेतु निरामय ।।

(अनुपल्लवी) मंडित मुनिवर मंडलीं धरुनि कमंडलु निजकरीं ।।
पुंडरिकाशन शौंड जो ब्रह्मांडलक्षण भांडरचनि अखंड वैभव ।।
येणे रीति ब्रह्मदेव आल्यानंतर त्याला विलोकून इंद्र तारकासुराचें वर्तमान सांगतो पहा.

दरु : (राग सौराष्ट्र)

फार कांही सलतो हा तारकासुर पापी महा ।।
सारभूत थोडका हा स्वामि कथितों भाव पाहा ।। १ ।।
तापत्रय निरसाया तापसी मांडितां तप ।।
बापुडचा त्यांचाहि प्राण आपण घेतो अकृप ।। २ ।।
पूजिता देवतोद्द्दिशे यजमान जें तें जनीं ।।
मजचि द्या हविर्भाग म्हणतो हा दुष्ट मानी ।। ३ ।।
घातकी ये तिही लोकीं घातली आपुली ठाणीं ।।
रावलो सेवनि त्याचें ताता आम्ही दीनवाणी ।। ४ ।।

(श्लोक) स्वामीय या दनुकलाधमतारकानें ।।
केल्या अम्ही स्वपदभ्रष्ट प्रतारकानें ।।
त्याचा जसा परि सुभाग्य उतारकानें ।।
ते सांगिजे परि भयावुधितारकानें ।।
याप्रमाणे देवेंद्राचे वाक्य ऐकून ब्रम्हदेव बोलतो पहा.

दरु : (राग हुशानी)

**ब्रह्मदेव :** सांगतो परि मी परिसा उपाय तो चांगला येक असा ।।
सांगतो मार्ग मी चांग शत्रुचि उचलपागडी (उचलबांगडी?)
करूनीहि टांगडी मोडेसा ।।
मारवैरिस कुमार ।। गिरीशकुमारीपासुनि सुकुमार जन्माला जरि
मारील तोचि कुमार नामांकित ।।
तारक दिसतो सुमार ऐशापरी ।।

**सूत्रधार :** येणे रिती ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून देवेंद्र विज्ञापना करतो पहा ।।

**वचन :** स्वामि, आपण बोलिलें ते गोष्टी अशक्य ऐशी वाटते तेचि ऐकावे ।।

**(श्लोक)** कदाचित् दिग्दंती पडतिल. चि मागोनि धरणीं ।।
रणीं गाढस्वांताकरि अजय पावेल तरणी ।।
त्वरें पंगू वेंधू (घे?) सकलगिरीशृंगाहि उपरी ।।
परी नोहे कामी पुरहर कलये हे स्फुट परी ।।

**वचन :** ऐसें देवेंद्राचे वाक्य ऐकून ब्रह्मदेव बोलतो पहा
जरी ईश्वर ऊर्ध्वरेता निष्काम। परंतु तो आत्मारामस्वरूपानंदभोगी सदा आसवत आहे. यास्तव अनन्यरूपी देवीचे ठायीं कैसा लोलंगत होईना तेचि ऐक.

**(श्लोक)** रंभेचे कुचकुंभही झगटल्या कांहिं न जे मोहती ।।
तेही नित्यविरक्त मुक्तिललनासक्तीमध्ये पोहती ।।
तैसाची त्रिपुराघ्न मग्न विषयीं होईल देवीहृया ।।
जे त्याचीच निजात्मरूपरमणी आनंदवल्ली प्रिया ।।

**वचन :** या कार्यि मन्मथासहि प्रेरावे ।। तो क्षणामध्ये परमेश्वराचे चित्त देवीचे ठायी आसक्त करवील ।।

**सूत्रधार :** येणे रिती ब्रह्मदेव बोलत असता वसंतदत्तहस्त मन्मथ येतो पहा.

**दरु :** ( राग सौराष्ट्र )
रतिपति येतो पहा ।। अति सुंदर . . . (अपूर्ण)
येणे रिती मन्मथ आल्यानंतर त्याला विलोकून देवेंद्र बोलतो पहा ।।

**वचन :** अहो मन्मथा, परमेश्वराचे अंतःकरण स्वबाणप्रहारे. जर्झ(र्ज)र करून विषयसुखाकडे फिरवावे. (असें) म्हणता ते कार्य अशक्य म्हणून मन्मथ उत्तर देतो पहा.

**(श्लोक)** घालारे कोलदंडा शिवमुनिसुता ताणुनी बाहुदंडा ।
आलो मी कालदंडासहित यम असे बोलणारा उदंडा ।।
जेणे तत्काल दंडा करूनिहि तनुशी घेतलें प्राणदंडा ।
तो माझ्या बालदंडाहुनि मृदु विशिखें जिंकवे केवि दिंडा ।।

**सूत्रधार :** येणे रिती मन्मथाचे उत्तर देता देवेंद्र मन्मथाचे प्रोत्साहन करून बोलतो पहा.

**दरु : (राग मध्यमावति)**

धीर न टाकी कदापीहि वीरमंडना ।।
शूर कोण तुजसमोर टिकूनि करिल भंडना ।।

(पल्लवी) वृंदारकगणमणि जो कां शमदमगुणठेवा ।।
नंदतनय धरित हृषीकेश म्हणुनि नांवा ।।
विधुनि तो कुसुमशरि नीट हृदयकमळि तुवां ।।
वृंदेशीं रत केला कंदर्पा नित्य नवा ।।

(श्लोक) भिक्षाटनावसरिं जो ऋषिवर्य रामा ।।
लक्षूनि वश्य जहला तुजलागि कामा ।।
तूं हाचि कीं पशुपती दुसरा निरूपी ।।
ब्रह्मादिका अजय तूं विजयस्वरूपी ।।

सूत्रधार : येणे रिती इंद्राने मन्मथाची पाठि थापटून खुशाल करितांच मन्मथ बोलतो पहा.

(श्लोक) जाली जरी सुगरिणी रमणी कराचें ।
मांडे करील तरि काय कधी स्ववाचें ।।
तंतूविना चतुर तो बहुसाल कोष्टी ।
निर्मी पटा घडल हे कशि सत्य गोष्टी ।।

वचन : तरी परमेश्वराचे चित्त व्यामोहन करी असे स्त्रीरत्न अशिल्याने तिला पुढे करून कार्य साधतो. वसंत मलय मारुतहि बरोबर असावें.

सूत्रधार : येणे रिती मन्मथाचे वाक्य ऐकून देवेंद्र बोलतो पहा.

वचन : त्रिभुवनसुंदरी जे त्रिपुरसुंदरी ते हिमाचलास प्रार्थून तपोनिष्ट जो परमेश्वर त्याच्या सेवेशी योजितां, तत्समयीं तुवां स्वसामर्थ्य वेचून ईश्वरास वश करावे.

सूत्रधार : येणे रिती देवेंद्राचे वाक्य ऐकून मन्मथाने अंगीकार करता समस्त देवहि स्वस्थानाप्रति आल्यानंतर हिमाद्रिशिखरी तप करायाकारणें परमेश्वर येतो पहा.

**[ दरु ।। ।। राग सुरटी ।। ]**

त्रिभुवननायक येतसे पहा । त्रिनयन शंकर हा ।।
प्रभु जो स्वानंदसाम्राज्याचा । विभूतिविभूषित ईश्वर महा ।।

(अनुपल्लवी) मस्त (क?) जटाजूटामध्ये मिरवे ।। निस्तुल जान्हवी निर्मल बरवी
हस्तकीं साजित शूल पिनाक प्रशस्त ।।
कपालादिक तें अवघी ।। जो महनीय गुणाचा सागर
सोमचंद्रप्रमर्थादिपति भला ।।
व्योमकेश हर निर्जर सार्वभौम भुजंगमभूषणीं शोभला ।।

सूत्रधार : येणे रिती परमेश्वराने येऊन तप आरंभिल्यानंतर येके दिवशी येका-येकिच कोटी विद्युलता लवल्याप्रमाणे वनप्रांती अत्यंत कांति फाकतांच

कोण की हे स्वप्रकाशवल्ली येते की म्हणून परमेश्वराने आलोचना करितां देवी येते पहा.

**दरु :** (राग भैरवी)

देवदेवी आली ।। देवी आली महादैवयोगें जवळी ।।

**सूत्रधार :** येणे रिती येणार देवीस पाहून परमेश्वर बोलतो पहा.

**दरु :** (राग अहिरी)

येते कोण की हे येथे रमणी ।।

**(पल्लवी)** येणांकनिभानना जे नारी शिरोमणी ।।

**(अनुपल्लवी)** जणु सकल रुचिरता । जाण जेथें घनवटुनि थांबली ।।
तनुकांति कशी दिव्य अनुपम लाभली ।।
वनप्रांती सजल ती धनपंक्ति भली ।।
इंदिरा म्हणूं मी जरी ।। सुंदरी हे इंदिवर शामला ।।
इंद्राणीसही कैचि सुंदर हे कळा ।।
संदेह नसे स्वानंदचित्कोकिळा ।।

**सूत्रधार :** येणे रिती परमेश्वराने वर्णन करीत असतां त्रिपुरसुंदरी येऊन आप-आपणांस बोलती जाली की "इंद्रादिक देवांनी माझ्या जनकाची प्रार्थना केली की, हिमाचला तुझी कुमारी जे पार्वती तिला तपोनिष्ठ जो महादेव त्याच्यासेवाकार्यी योजावे. याप्रमाणे देवाची गोष्टी ऐकून माझ्या जनकाने ईश्वराची शुश्रूषा करायास मज पाठविलें. तरी तातवाक्यानुरुप वर्तन करीन म्हणून निर्धारून आपला मनोभाव देवी अनुवादिते.

**(श्लोक)** सेवा करावी परमेश्वराची । होता असा भाव मला बराचि ।।
तो अर्थ प्रार्थित लाभला हो । घेईन मी सेवन भक्तीलाहो ।।

**सूत्रधार :** येणे रीति बोलून परमेश्वरसंनिधि येऊन तन्मय भावनेनें सेवेसी तत्पर होतां देवीच्या रंगांत गंगाधर कांहीं मिळाले हें अवलोकून वसंत-मलय मारुतासमवेत मन्मथ येऊन पूजननिमित्यें पुष्पबाणप्रयोग करिता निर्विकार देवाचें चित्तात कामविकार उपजतां, हें कोणाचें कृत्य म्हणून चहूकडे विलोकितां तेथें कंदर्पास विलोकून याचेंच कार्य असेल म्हणून तृतीय नेत्रानें त्याचा दर्प वारितां इतक्यांत देवी देहावर येतां तो येक सुंदर नारी आपणाकडे येणार ऐशी पाहून हे दिव्य स्त्री कोण कि येते म्हणून आलोचना करितां रतीदेवी येते पहा.

**दरु :** (राग-आहरी)

येते पहा रतीदेवी ।। सकल सद्गुण श्रेणी ।।
सरस अलिकुलवेणी ।। प्रगटे लावण्यखाणी ।। परमकल्याणी ।। १ ।।
मधुर कोकिळवाणी ।। मदगजगामिनी ।।
मृदु पल्लवपाणी ।। मदनाची राणी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रीति रतिदेवी येऊन देवीची प्रार्थना करिते पहा.

**दरु :** (राग-पुन्नगवराली)

देवी विनवीतसें मी विनयें करून ।।

**(पल्लवी) :** हे विश्वनाथदयिते केवलानंदभरिते। ये वेळे रक्षी मज ठेऊनि अभय धामीं ।।

**अनुपल्लवी :** करऊं तुजसि नित्य निरंतर मन्मथें पुष्पें हर तो पूजितां कोपे भरुनी ।।
सुरुचि नेत्रानलें सहरुनि ठेला ।। १ ।।
पति जीवऊनि आता वितरी ।। चुडेदानहि जगतीं ।। दुसरी मजला न गती ।।
अतिशये जननी काकुळति येउनि निगुति ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रीति रतीचें वाक्य ऐकून पार्वती दयेने आर्द्रहृदय होऊन, कामोपजीवन करावें म्हणून देवी परमेश्वराची प्रार्थना करिते पहा.

**दरु :** (राग-तोडी)

सदया वाचवि तो आता ।। मदनासी नाथा ।।

**(पल्लवी) :** पदर पसरुनि पहा मी प्रार्थितें पदपंकजहि वंदुनि नाथा ।।
समरस आम्हा व्हावयासाटी ।। सुमनीं पूजिलें येणें ।।
तुज न थाटी(?) शमित केल्यां तो विमल नेत्राग्नी ।।
समज लागेल शब्द मज शेवटी ।।

**(श्लोक) :** दृष्टीस आड म्हणुन खुडुनी स्वहाते। कीं टाकिता जगति बिल्वदळे पहाते
दैवेंकडूनि पडतां निजलिंग माथा। नेला पदा शबर त्यास्तव लोकनाथा ।। १ ।।
प्रत्यक्ष मूर्ति तुझि लक्षुनि या स्मरानें। जी पूजिता सुमनि आपुलिया करानें।
तदुर्दशा पुरहरा न तया घडावी। कांही दयार्द्र दिठि त्यास्तव हे पडावी ।।

**सूत्रधार :** येणे रीति देवीनें प्रार्थितां परमेश्वर बोलतो पहा.

**(वचन) :** व्दापरी रुक्मिणीचें पोटीं जन्मून मन्मथ सांग होईल ।। सांप्रतहि यथापूर्व करूं व नंतर तिचे दृष्टीस गोचर घडे न उपभोगादि सकलां सोहळेहि देईल.

**सूत्रधार :** याप्रकारें बोलून रतीस मन्मथाची भेट करवावी म्हणून परमेश्वरानें चिंतिता यथार्थपूर्वक मन्मथ येतो पहा.

**(दरु) :** रतिपति येतो पहा अति सुंदर ।।
येणे रीति मन्मथ येतां त्याला विलोकून परमेश्वर बोलतो पहा.

**श्लोक :** दावी पौरुष दूर्जनातें। सलू नको यावरी सज्जनातें ।।
होऊनियां सांग मम प्रसादें। संतुष्ट कांतेसह नित्य नांदे ।।

**सूत्रधार :** यापरी मन्मथास वरप्रदान करून परमेश्वर गुप्त होतां पार्वतीहि रतीचें समाधान करून जनकमंदिरीं आल्यानंतर कुंभोदर नाम शिवगणासमेत हिमाचल येतो पहा.

(दरु) : आला हिमाचल . . . . . (अपूर्ण)

सूत्रधार : येणे रीति हिमाद्रि येऊन आकाशाकडे रोख देऊन शिवगणास पाहून बोलतो पहा.

(वचन) : अगा ये कुंभोदरा कोण कीं हे तेजःपुंज व्यक्ति व्योममंडळीहून उतरते आहे. नारायण स्वरमिश्रित वीणारवहि कानीं पडतो. यावरून बहुतेक नारद होईल सारिखा दिसतो.

सूत्रधार : येणे रीति हिमाचल बोलत असतां नारद येतो पहा.

(श्लोक) : सरसकरसरोजें वाजवी ब्रह्मवीणा ।। हरिगुणकथनीं ते जीभ ज्याची प्रवीणा ।। धरि शिरिं हर तैसा जो जटांच्या कलापा । सुरमुनि अजि येतो तो निधि कलापा ।।

दरु : (राग-घंटारव)

येतो नारद हा येथेचि पहा ।। हेतु जो कां कलहा ।।

(पल्लवी) : प्रीतीचें हरिचे गात गुणा स्वयें ।। मातुनि हरिखे मानसी महा ।।

अनुपल्लवी : वीणा सप्तरवा । वामहस्त तो वीणाशोभें बरवा ।।
श्रीनारायण ध्यानरूढ जो । नानाविध घेत गानरस नवा ।।

सूत्रधार : येणे रीति नारद येऊन स्वस्थलिं बोलता झाला कीं या तारकानें देव अवघे निर्वियें करून पदभ्रष्ट केले. यास्तव फार दिवस झाले युद्धाचा तमासा दृष्टीस पडत नाही. तरी हरिहरासीच अन्योन्य भांडण लावावें. त्यास मूळ हेच जें हिमालयाचें कन्यारत्न श्रीहरिसाटी मागावें. त्यानें अंगीकार केल्यां परमेश्वर कोपून विष्णुसि व्दंद घडेल. नाहितरी ईश्वरास अर्पिल्यां श्रीहरीस राग येऊन युद्धार्थ सिद्ध होईल. ऐसा विचार करितां हिमाचलापुढें उभा ठाकला जो नारद त्यास विलोकून हिमाद्रि बोलतो पहा.

दरु : (राग-तोडी)

पाऊलें देखतां आपुलें झालों ।। पावन दोषहि लोपले ।।

(पल्लवी) : उगवला सोन्याचा दिवस अजि ।। न गणवेचि सुख बहुतसे ।।

अनुपल्लवी : पूर्वजवंशपरंपरा शुद्ध । सर्वहि झाली दयापरा ।।
कासयासि येथें अहो विजें केलें ते सांगिजे कलहबीज ।।

सूत्रधार : येणे रीति हिमाद्रिने पुसतां नारद प्रत्युत्तर देतो पहा.

वचन : हिमाचला तुझे कन्यारत्न सुवर्ण जो श्रीहरि त्यासी मिळावें यास्तव मी आलो.

सूत्रधार : ऐसे नारदवाक्य ऐकून हिमाचल बोलतो पहा. स्वामि आपण बोलतां ते यथार्थच. परंतु म्या परमेश्वरास कन्यारत्न समर्पावे ऐसे निर्धारिलें आहे. कुमारीचा तैसा दृढनिश्चयच आहे यास्तव आपण दया करावी.

सूत्रधार : ऐसे हिमाचलाचे वाक्य ऐकून परमेश्वराचे हेण करीत नार दबोलतो पहा.

(श्लोक) : सदाच . . . कारि, कुदेशाधिकारी ।
विराजे विखारी तनू जे बिकारी ।
विनाशप्रकारी जगव्दिप्रकारी ।। (जगद्दीप्तकारी?)
रतध्वांतकारी न तूं अंगिकारी ।।

सूत्रधार : येणे रिती नारदाने परमेश्वराची निंदा करितां कुंभोदर रागाने डोळे ताऊन त्याला उत्तर देतो पहा.

(श्लोक) : ईशेशान महेश ज्यास म्हणती वेदांत शास्त्रांतरी ।
जो भूतेश उमापती पशुपती सर्वज्ञ संज्ञा धरी ।।
कामारी अणि कालकाल त्रिपुरव्देष्टांधकारी महा ।
अष्टात्मा शिव मूर्ति भूषण नव्हे कैसा परंज्योति हा ।।

सूत्रधार : येणे रिती कुंभोदराचे वाक्य एकून विष्णूची प्रशंसापूर्वक नारद बोलतो पहा.

(श्लोक) : जो विश्वंभर विश्वरूपहि हृषीकेशः स्वभू श्रीहरी ।
श्रीनारायण वासुदेव म्हणुनी अन्वर्थनामे धरी ।।
साक्षी जो पुरुषोत्तमाख्य परता चिद्रत्न वर्गाहुनी ।
तीचि ब्रह्म जगी नसेचि दुसरा उत्कृष्ट की त्याहुनी ।।

**दरु : (राग मरुकलकांबोदि)**

काय वानिशी या कालकंठासी ।। काय वानिसी काय वानिसी ।
भूतनायक पशुपती ।। लायक भावेंसी अहर्निशीं ।।

अनुपल्लवी : माथां जटाजूटामाजी धरी लक्ष्मी ।।
१ . . . . . . . तीर्थ जो नामे गंगाधर ।।
हे थोर थोरीव तेथें कैसी न मृषा ।।
गातात ते कळुनहि गा फार सादरा ।। १ ।।
कनके रत्नांची धनवत्ता नाही ।।
म्हणुनि न कांहि मी म्हणतसे ईशासी ।।
फणिमय भूषणगणचि घालुनि देही ।।
अनुचित न वाटेचि ज्या अणुहि ऐशाशि । २ ।
पालक म्हणवी दिक्पालकांचा ।।
शंखपाल घेऊनि कपाल जो घरोघरी ।।
कालक्षेपाशि गथाल(?) मागे भीक ।।
कालकाल जो सर्वकाल अघोरी ।। ३ ।।
राजधानी ज्याची राजस की ।।
जियेमाजि गेल्या न फिरे हा जन येकहि ।।
साजिरा तुम्ही वल्लभ लक्ष्मीचा उल्लासवल्लीकंदप्रती ।
मल्लरूपे स्मरा उल्लंघुनि त्याशि ।। ४ ।।
(१ अक्षरे सुटली आहेत.)

**सूत्रधार :** नारदाचे वाक्य ऐकून कुंभोदर बोलतो पहा.

**दरु :** (राग कपि)

वामदेव भीकारी हा म्हणवुनि बोल ।।
वामबुद्धी तूं कुमति ।। वामनें तुझ्या पूर्णकामे ।।
बलीस भिक्षा ते मागितली असतां ।। कां मनीं विसरसी ।।
विश्वनाथा शंकरासी निंदू नको रे ।।

. . . . . . .
(१ शब्द लागत नाही).
विश्वसे प्रत्यंतरांसी ।। ऐक निःशेष देवोद्धारासी ।। सद्‌गुणरासी ।।

**अनुपल्लवी :** भीक मागणे दीनलोकांपरी दोघां ।। ठीक तो दोष लागे ।।
प्रगटचि पहा देखत केली चंद्रशेखरें चोरी ।।
परी स्वकीय पोटासाटी येक दोष हा ।।
रुद्रभूमिसी राहे रुद्र म्हणुनिया ।। क्षुद्रता स्थापियेला ।।
दुर्धरदोष ।। चिद्रत्न तुझा हरि स्थिरला वृंदाधरिं ।।
छिद्र हे नेणोनिया चित्ति अशेष ।।

**छंद :** परम चांगला श्रीहरी असे ।। सुरऋषी तुला लागलें पिसे ।।
धरुनि मोहिनीवेष तोहि कां ।। निरत जाहला शंभुसी निका ।
हरिपदोद्‌भवा जान्हवी शिरी ।। धरिलीयासटी ही नतांवरी ।
तरि शिवाचि या लिंगपूजना ।। परिसंयुक्त ते पूस तूं जना ।।

**सूत्रधार :** येणे रिती उभयतां भांडतां 'हरिहर दोघेहि येक, तुम्ही का व्यर्थ कंठशोष करितां' म्हणून हिमाचल बोलतो पहा.

**दरु :** (राग घंटारव)

येकचि हे हरिहर लोकनायक ।। जो करित भेद याशीं ते केवळ पापात्मक ।

**अनुपल्लवी :** गगन येकच जैसे घटामाजि कोंदले ।।
जगतिं जगतिं भिन्नसें गमे प्रगटोपाधीनें ।।
अगुण येकचि तैसा चिद्‌घन गुणभेदाने ।।
निदिचे (?) विष्णुशिव निगमी हे म्हणऊनि ।।
पार्वती ते कसी ते ऐका —

**श्लोक :** घनाकार आनंद मोठा नि साचा ।।
स्वयें बोलिला वेष जो चिद्रसाचा ।।
तया येकरूपे धरीं नित्य काली ।।
म्हणूनी गमे जाहली सत्यकाली ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती हिमाचलाचे वाक्य ऐकून यथार्थच. माझाहि निर्धार असाच आहे परंतु विनोदार्थ क्षणभरी वाक्य संग केला म्हणून नारद कुंभोदर बोलून आपल्या ठिकाणास पावल्यानंतर हिमाचलहि स्वसदनास आल्यानंतर देवी येते पहा.

दरु : (राग आहरि)

सुंदरी त्रिपुर सुंदरी येते ।। मंदमंद मदसिंधुगामिनी ।।
नंदनंदिनी नित्य नंददायिनी जे ते ।।

सूत्रधार : येणे रिती देवी येऊन चित्तवृत्तिमंजीरिप्रती बोलते पहा.

वचन : अवो प्रियसखे नारदाने येऊन शिवनिंदापूर्वक विष्णूचा उत्कर्ष सांगता मायबापाचे चित्त गोविंदाकडेच डोल दिल्यासारखे दिसते म्हणून अंतःपूरदूतिकेने मला वर्तमान सांगितले. इत:पर मला प्राणधारण करणें नाही. म्हणताच चित्तवृत्तिमंजिरी बोलते पहा.

वचन : देवी आत्महत्या करणे उक्त नव्हे. तपोवनी जाऊन परमेश्वराची पूजा केल्याने तो प्रसन्न होऊन इष्टार्थ सिद्धि करील.

सूत्रधार : येणे रिती चित्तवृत्तिमंजिरीचे वाक्य ऐकून देवीने वनांत येऊन उपवास नियमपूर्वक संध्याकाळी परमेश्वरास पूजून रात्री चारी प्रहरही जाऊन व्रतांग पारणे सारून सखिसी बसली असतां व्रतानुष्ठानमहात्मेकरून परमेश्वर संतोषाने देवीस दर्शन द्यावे, तिचे मनहि शोधावे या अभिप्रायानें वृद्ध ब्राह्मणाचा वेष धरून येतो पहा.

दरु : (राग सावेरि)

आला श्रीकंठ तो हा आता पहा ।।
धरूनि जरठव्दिज सोंगासी । चर्चुन चंदन निज अंगासी ।।
करि कवळुनिया दंडासी परमशांतिनें गुणराशी ।।

सूत्रधार : आपणाकडे येणार वृद्ध ब्राह्मणास विलोकून देवी सखीप्रति बोलते पहा.

दरु : (राग सौराष्ट्र)

कवण येतो कि अवलोकीं । नवसरसीरुहनिभ शुभनयने ।।
नवलाचा येथें येकायेकी ।।
कवळिली हें जेणें उजव्या करिं । तें केवळ दृढतर काठी ।।
लवलीसे अत्यंतचि ज्याचि शिवशिवा वार्धक्ये पाठी ।। १ ।।
उरल्या असती देहिं शिराचि । उघड वेंचुनि घेऊ ये तशा ।।
झुरळ्या पडल्या वदनावरी बहु तरुणि कठिण बोलवेना दशा

सूत्रधार : येणे रिती देवीने संवाद करितां असता वृद्ध ब्राम्हण येऊन बोलतो पहा.

दरु : (राग मोहन)

कासया वनवास करिसि ।। तूं या समयीं बाले ।।
वासवमणिसम भासुर तनु । उपवासे न शोषि वृथा वेल्हाळे ।।
राजस उपरीं तूं राहुनिया नाना राजभोग तां ।।
रात्रिदिसहि या जनि भोगावे ।। यामिनीशमुखी ।।
कथ हे साजणि प्रत्यहीं ।। १ ।।
कवण तात तुझा कवण ते माउली कुवलयलोचने ।।

अवघे निरूपी ।। अवनीतलीं स्वर्गभुवनी येकही
तवसम नसेचि युवति सुरूपी ।।

**सूत्रधार :** येणे रिती वृद्ध ब्राह्मणाने विचारीतां देवीने अर्घ्यपाद्यादिक पुजा करून वर्तमान सांग म्हणून सखीस खुणावितां ते बोलते पहा.

(श्लोक) हिमाचलसुता व्दिजा अनुपमान हे सुंदरी ।।
कुमारिणि उमा अशी परमदिव्य शंसा धरी ।।
हिमांशुकृतशेखरा पुरुहरा बरू निश्चयें ।।
श्रमाप्रतिहि सोसुनि तपतसे तपासी स्वये ।।

**सूत्रधार :** येणे रिती सखीचे वाक्य ऐकून वृद्ध ब्राह्मण बोलतो पहा.

(श्लोक) अशन करि विषाचे वस्त्र त्यासी दिशांचे ।।
वहन तरि वृषांचे भृत्यो भूते पिशाच्चे ।।
कनक मणि कशाचे लागले कां अशाचें ।।
तुजमनि गिरिशाचें ध्यान मोठचा पिशाचे ।।

(दरु) तो भूतनाथ शंभु मानला तुज केवी ।।
जोगी दिगंबर जो त्यायोगी नव्हसि तूं ।।
भोगी माझिया चित्त ठेवी ।। १ ।।
वस्तभाव रत्न याचा अस्तमान जयापासी ।।
(तो) विस्तुनेत्री, (विस्तृतनेत्री) (अग्निनेत्री) धरी शेवी (सेवी) ।। २ ।।
पांढरा परिस बसविला त्या ढोरावरि ।।
तुज धंडोरा हाटितो (?) कळुनि ठेवी ।। ३ ।।
रमणि भूतपिशाच्चे समुदि लागल्या तुज ।।
घुमती बससील भूतदेव ।। ४ ।।
मंगलसूत्र सर्पाचे चांगले बांधिल कंठी ।।
व्याघ्रांबर नेसविल देवी ।। ५ ।।

**सूत्रधार :** येणे रिती वृद्ध ब्राह्मणाचे अपुले पाणिग्रहण करि म्हणतांच सखीस पाहून देवी बोलते पहा.

**दरु :** (राग हुशानि)

न सुटेचि हे विषयाशा पहा ।।
बोंचरें खिडिली पिकली ह्याचि समस्त डोई ।।
लोचनयुगल निकट पदार्थ जो। गोचर न होतोहि ।। १ ।।
खोंकी टरिवरी कोंडती श्वास ।। थुंकी मह्रीच्या पाठीं ।।
टेंक धरूनि पण तिष्ठलाहे कसा। टेंकुनि दृढतर काठी ।। २ ।।
टवकी व्रणांची काढिली (?) यास्तव खवदे पडिली देहिं ।।
अवघी वेळहि माशा वारी अवलोकी स्थिति तेहि ।। ३ ।।
रोखुनिया दृष्टी प्रीतीनें अवलोकन करिता हे तें
वोखटें वाढुनि ।। केवळ हासें देख पुन्हा लज येतें ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रीति सखीस पाहून आपला उपहास करितां वृद्ध ब्राह्मण उत्तर देतो पहा.

(श्लोक) शर्याति नामक महीपतिची सुकन्या। ते भार्गवें परिणितां सखिचे सुकन्या।
योगें तिच्याच जाहला मुनि दिव्य देही।
दैवें तुझ्या घडल ते विभुसाच मीहि ।। १ ।।
पडेन मी सत्य तुझ्या कपाळी। दे ये सखे सादर अंकपाळी।
कामार्त हा केवळ रंक पाळी। कामांध कामदन (धन?) हेचि कर्पादिका ही ।।
हातीं तसे फुटकि ज्यांस कर्पादिका ही।
जेणे स्वयें निवटिला जगि धम जा जा
त्याचेंनि लाभसि कसी त्रिपुरार्थ काजा ।।

वचन : तुझ्या मनामध्ये जरि शिवासच वरावें म्हणून आहे तरी सर्वात्मक शिव मन्मथ हे काय ?

दरु : (राग-केदार गौळ)

जगदीश्वर येक जो तो नगरनाथ कसा नव्हे ।।
जगति मंडलधारक तो नगविटपी धर्ता नव्हे ।।
निगमत्रितयी वेद्य तो विभु आधिगम्य कसा नव्हे ।।
निगदि कैसा अखिलमय शिव प्रगट मन्मथें नव्हे ।।
शिव कामज भावविसि ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीति वृद्ध ब्राह्मणाचे वाक्य ऐकून देवी उत्तर देते पहा.

दरु : (राग-मोहन)

शिवशिवा ऐसे अव्दैत तुजला कवणें सांगितलें ।।
व्यवहारदर्शेतहि अवघे येकचि म्हणसि ।।
श्रवणि ऐकवेना किंचित् तव वाक्य चांगलें ।।

(अनुपल्लवी) हे वार्ता भेदाचि जेव्हा जाहली मृषा ।। वैवाहिक कार्या ठाव कैचा तें ।।
तूं हे चाउटि करोनि कां लाविशी गा सूत्र मजशी ।।

(श्लोक) तूं नेणशी पार सदाशिवाचा। यालागि हे बोलसि फार वाचा ।।
दुष्कर्म तें सर्व फलासि आलें। तुझें मला दर्शन आजि झालें ।।
लाभावया वर महेश्वर मी तपासी। विप्रा करी न गणिता हिमआतपासी।।
माझी महद्विपिनि घेत बरी तपासी। आलासि कोठुनि कथी निजमत्त-पासी (?)

दरु : (राग-आनंदभैरवी)

कवणाचें मुख पाहिलें आजि स्यां नेणो ।।
शिवशिवा न वचें सहिलें दुःख हें मोठें।।
(पल्लवी) भवनिंदावचनाचें श्रवणां श्रवण जाहलें।।

(अनुप.) कंटाळुनि घरदारा ।। कंबुकंठी स्वपरिवारा ।।
कंठू जारिविनक्नी(?) आले कंजाक्षिबाले ।।
कंटकरूप येथेंहि कोठुनि किं पाहि कुंठावयासि ।।
नीलकंठ भक्तिपंथ उत्कंठित। भेटला महाशुंडाग्रणी हा या ठायीं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रीति सखिसी बोलून वृद्ध ब्राह्मणानें ईश्वरास अधम अकिंचन म्हणून जें निंदिलें होतें त्या संदर्भेंकरून सखी उत्तर देते पहा.

(श्लोक) ज्याला पूजुनि देवदेव हरि तो वृत्रायुधा पावला ।।
गेला भूमि वराह होऊनि पदा ज्याच्या नव्हे पावला ।।
पाहू मस्तक हंसरूपगगनी ब्रह्मा उडाला परी ।।
त्यालाही शिर नाकळे कवण त्या श्रीशंकरासी सरी ।।

. . . . . . . . .     . . . . . . . . .     . . . . . . . . .

तो सुंदर सरस भूषण त्या कशाला ।।
नाही जयासम दुजें जगिं साच तों किं
आत्मस्वरूप सुख भोगुनि नाचतो किं ।।

(श्लोक) कनकरजकरत्ने काय रे त्यासि बाणी ।।
व्दिजुकुलतिलका हें सांग माते स्ववाणी ।।
परपुजनीं अशी शाप पावणे भाग्य तेवी ।।
त्वरित मजपुढारी सांगते तेचि ठेवी ।।

**सूत्रधार :** यापरी परमेश्वराची प्रशंसा करून 'ब्राह्मणा, तूं दैत्य आहेस यास्तव शिवनिंदा करितोस. ब्राह्मणवेषधरिल्यास्तव निग्रहासहि योग्य नव्हेस. आम्ही येथून निघणेच उत्तम दिसतें'. येणे रिती देवीनें संवादिता ब्राह्मण उत्तर देतो पहा.

(श्लोक) जाल्या समस्त सफला तप पुण्यकोटी।
माझी म्हणुनि घडली तुज सत्य भेटी ।।

. . . . . .     . . . . . .     . . . . . .     . . . . . .

मी नित्य निर्मळ शिवात्मक पूर्ण मानी।
तूतें केवळ मग हें अवघे निदानि ।।

**सूत्रधार :** येणे रिती ब्राह्मणाचे वाक्य ऐकून देवीने मागे जायास उद्युक्त होताच दृष्टीपुढे तो ब्राह्मण गुप्त झाला, ते पाहून देवी सखीसी बोलते पहा.

(श्लोक) महद्भूत ते कोण येऊनि गेले।
अहो चित्त चाकाटुनि फार ठेलें ।।
पिनाकी परीक्षूं अता या मनातें।
जणूं विप्र होऊनि आला वनाते ।।

**सूत्रधार :** येणे रिती देवीने बोलता.

(श्लोक) दक्षाची बलि घेतली मखक्रिया दक्षा तयाची अणी।
अक्षाग्नीकडुनि क्षणे अतनुची रक्षाच केली वनीं ।।

रक्षाया निजभक्तवृंद धरिली दीक्षा जयानें निकी।
साक्षात् तोचि मि दृश्य तूज जहाली दाक्षायणीनाथ कीं ।।

याप्रमाणे परोक्षच असुन परमेश्वराने उत्तर देता पार्वती पश्चाताप पावून सखिसी बोलते पहा.

[ दरु : (राग येरुकलकांबोदि) ]

मोह कैसा माते आला मोटा कि सये ।।
जो हर त्रैलोक्यनाथ धिक्कारिला स्वये ।।
वासरनिशि येकाग्र ज्यासाटी तपलें तप
अव्हेरिला तो साक्षात चिद्रत्नदीप ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रिती देवी बोलून सखिसि विनविते पहा.

(दरु) साहूं कैसी विरह नाथाविण राहुनिया अहह हे ।।
जाऊनिया वेगीं जाणवी प्राणेशा ।।
पाउले वंदुनि परमसुखावहा ।। १ ।।
सरस चंपक मालती सुरुची पुष्पभरित वाते हलती ।।
बरि कीर कोकिळ बलाऊहि(?) बोलती ।।
निरखुनि हे गालें निरवधी पोळती ।। २ ।।
वनउनि पुरमर्दना नेणुनि केले मनसिज अभिवर्धनाम अनुपदीचे तेणें ।।
अनुपमकृताघ्ने हाणुनि स्वशरि केलेवनि या चित्तमर्दना ।। ३ ।।
रतलें अरी चरणीं कोपुनी तेणें सुतनु अंतःकरणीं ।।
सुपति हे शरशयन आपणा गमे ।।
सुमति ईश्वराहीन खुपति चंदनकण रुतति सुमनगण ।।
तपति चंद्रकिरण तपनकराहुन ।। ४ ।।

**सूत्रधार** : येणे रिती पार्वती विरहाने कष्टी होता असता करुणानिधी शंकर वरप्रदान करायां कारणे निज रूपाने येताहेत पहा.

[ दरु : (राग त्रिभुवननायक) ]

.... .... .... .... .... ...

**सूत्रधार** : ईश्वर प्रत्यक्ष होता त्यास साष्टांग प्रणाम करून देवी विनयाने उभी ठाकली असता तिला पाहून परमेश्वर बोलतो पहा.

(श्लोक) तुझ्या मनीं वर अपेक्षित काय सांगें।
झालो प्रसन्न तुजलागुनि शीघ्र मागे ।।

**देवी** : तुज स्वयंवर अपेक्षित जाण मातें।
संप्रार्थि तें अजि असें सुरसत्तमाते ।।

**सूत्रधार** : येणे रिती देवीचे वाक्य ऐकून परमेश्वर बोलतो पहा.

(श्लोक) मी कल्पप्रभु तूं लता जलद मी तूं दिव्य सौदामिनी
मी श्रीभास्कर तूं प्रभा जलधि मी तूं वीचिका भामिनी ।।

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

मी तो निर्गुण पुरुष प्रकृति तूं मी चंद्र तूं चंद्रिका ।।
मी त्राता त्रिजगास तूंच जननी मी शंभू तूं अंबिका ।।

**वचन :** याप्रमाणे अनन्यभाव असल्यानेहि अन्योन्य संमतीने पाणिग्रहण केल्याने लौकिक बरा दिसणार नाही. यास्तव ऋषीस हिमाचलापाशी पाठवून त्यांच्या मुखे निश्चय करून तुज परिणितो. अता संतोषरूप तां मंदिरास चलावे.

**सूत्रधार :** याप्रमाणे ईश्वराचे वाक्य अैकून 'आज्ञाप्रमाण' म्हणून देवीने चित्तवृत्ति-मंजिरीस ईश्वरासमीप ठेवून निघाल्यानंतर गौरीचा वियोग न सहतां परमेश्वर बोलतो पहा.

[ **दरु :** (राग हुशानी) ]

थोर जाहला दगा मज । कसा मज ।
नीरजाक्षी प्रार्थिताहि नेणुनिया त्याग केला ।।
नसती घातली अडी दिस येक अजि मज दिसत युगापरि तपा ।।
गंधर्व-विवाहाची सुंदरी प्रणिली असती ।।
कंदर्पबाधाचिया गुधवार्ता नसती ।।
अंधकारीच ही माझी अंध जाहली मती ।।
दंधन (?) केल्या न सुटे बंध प्रेमाचा अति ।।

**सूत्रधार :** येणेप्रमाणे बोलून परमेश्वराने विदूषकाचे स्मरण करतांच तो येतो पहा.

(दरु०)
कुंडली कुंडली कृत कुंडल जो विराजित ।।
गुंडुनि गुंडी पगडी गुंडोदर आला गडी ।।

**सूत्रधार :** येणे रीति गुंडोदर येऊन ईश्वरास पाहून बोलतो पहा.

(श्लोक)
केले पर्वत सर्व मेरु प्रभृति तां शर्व देवा वृथा ।।
की नीरें भरितां अखंड सरितां या निर्मिल्याही तथा ।।
मांडे तेल वऱ्यापुऱ्या गुलबऱ्या ह्यांचे गिरीं गोरसें ।।
सिंधूही रचितास की व्दिकरि तैं मी भक्षितो बोरसें ।।

**सूत्रधार :** येणे रीति गुंदोदर बोलता परमेश्वर बोलिला जे 'तुला नेहमी पोटाचेच ध्यान आहे दुसरी चिंता नाही.'

**गुंडोदर :** स्वामी आपणास स्त्रीचे व्यसन मला पोटाचे व्यसन, दोघासहि दोनि व्यसने समान, परंतु मी निजअवगुण झांकून पराव्यास स्वामीसारिखा लटका उपदेश करित नाही.

(श्लोक)
आशेनें कनकाद्रि वाहसि भला लोभावला तूं करी ।।
माथा घेऊनि कामिनीहि असमी गौरीवियोगें तरी ।।
त्यागा स्त्री धन संग सांगसि परी या सर्व विश्वास रे ।।
मोठा तूं परदुःखशीतल तुझा वाटे न विश्वास रे ।।

[ दरु० : (राग आनंदभैरवी) ]

कळुनि अजिंक्य काम हा ।। यावरि तरि ।।
सळू नको आम्हासि महा ।।
तुजसम ऊर्ध्वरेताहि ।। हे जगन्नाथ जितेंद्रियापरि पाही ।।
आपण आता भज्जल्या का प्रवाही ।।
गजमुखताता आमुचा अन्याय कार्यी ।।

सूत्रधार : येणे रीति गुंडोदराचे वाक्य अैकून परमेश्वर हासून चित्तवृत्तिमंजिरीस लक्षून बोलतो पहा.

[ दरु० : (राग कल्याणी) ]

केधवा मी देखेन नयनीं ते धणीवरी रमणी ।।
जे धराधरेंद्राप्रिय नंदिनी ।। वेध तीचाची ।। जडला निजमनीं ।।

(अनुप.) विसर पडत नाहीच क्षणभरी ।। न सुचन सहसा गोष्टी दुसरी ।।
विषय विविध हे विषमचि गमति ।। विषवल्लरीचे परी ।।
दिसते मूर्ति तिची हे रात्रिदिसहि ।। दशदिशां मंडलांतरीं ।।
असिततनु नीलोत्पल समवरी ।। भासमान भूषणगणि साजिरी ।।

सूत्रधार : येणे रीति परमेश्वराचे वाक्य अैकून चित्तवृत्तिमंजिरी बोलते पहा.

(श्लोक) आहे जोवरि एकनिष्ट सदया मी त्वत्पदासंनिधी ।।
पाहेना दुसरीकडे गिरीसुता तो हो हरी की विधी ।।
राहे निश्चलचित्त चित्तजहरा चिंता गिळोनी बळे ।।
पाहे तूजचि गा वरील नवरी गौरी गणि हे भलें ।।

सूत्रधार : येणे रीति चित्तवृत्तिमंजिरीचे वाक्य अेकून परमेश्वर निजधामा आल्यानंतर सपरिवारकांसहित हिमाचल येतो पहा.

[ दरु० : (राग-केदारगौळा) ]

आला हिमाचल रमणीसगेत तो शैलाधिराज महा ।।
(पल्लवी) कैलासादि भोवताले नगोत्तम ।। तिष्ठती विनयानें महा ।।

सूत्रधार : येणे रीति हिमाचल आल्यानंतर सभेमध्ये येकायेकीच सप्त सूर्य उगवल्याप्रमाणे कांति फाकतांच हें काय म्हणून कौतुकानें विलोकितांच सप्तऋषि येताहेत पहा.

[ दरु० : (राग—सौराष्ट्र) ]

सात या महीस सप्तर्षिगण नाथ आले पाहा ।।
पातकी यासहि पावन करणार जातवेदासम ज्वलित रूपें महा ।।

सूत्रधार : येणे रीति सप्तर्षि आल्यानंतर त्यास यथोक्त पुजून विनयपूर्वक हिमाचल बोलतो पहा.

(श्लोक) येणे अपूर्व अपुलें घडि पुण्य संगा ।। की लोटलीच अलस्यावरि काय गंगा ।।
विज्ञापना सरस येकचि आयकीजे । आज्ञा करूनि मजलागि कृतार्थ कीजे ।।

**सूत्रधार :** ऐसे हिमाचलाचें वाक्य ऐकून वसिष्ठ बोलतो पहा.

(श्लोक) जो आज्ञावरि आपुल्या हरिहर ब्रह्मादिका वर्तवी ।।
संकल्पेंचि विचित्र जीवपुतळचा नानाविध नर्तवी ।।
वेदान्तप्रतिपाद्य अव्दयचिदानंदाबुधी निश्चयें ।।
तो तुझ्या प्रिय कन्यकेप्रति वरं प्रार्थी महेश स्वयें ।।

**सूत्रधार :** ऐसे वसिष्ठाचें वाक्य ऐकून हिमाचल बोलतो पहा.

[ **दरु० :** (राग—कापि) ]

धन्य धन्य मी येक धात्रीधरेन्द्र ।।

**पल्लवी :** धन्य मी सुकृतिमूर्धन्य, नसे सम अन्य, न भाग्य हें अन्यथा देख. ।।

(अनु.) निगमागोचर जो कीं नित्यानंद ।।
सुगुणमंदिरा अवलोकीं । सुगम जावायी तो जोडतो ।।
माझी ते निगदु भाग्यता कितीतरिही या लोकीं ।।

(श्लोक) जामाता परमेश्वर प्रभु तुझ्या पुण्योत्करें जोडतो ।।
जामातांकथितां यदार्थ अजि त्या कन्येसही जोडतो ।।
सांगा तीव्र परंतु तातजननी भावं सखे कोणते ।।
सांगाती कुलशील वित्तवयही याचें तुम्ही जाणते ।।

**सूत्रधार :** येणे रीति पर्वतेंद्र प्रश्न करितां सर्वज्ञहि सप्तऋषि मौन मुद्रेनें — राहतां हिमाचल आपल्या आपण बोलतो पहा.

(श्लोक) नाहीं जाया जन्मजरादि कांही ।। कीं नेणिजे वेद सुरादि कांही ।।
जें व्याप्त भूमीतलि अंतरिक्षीं ।। तें ब्रम्ह शंभू मन हें परीक्षी ।।

**सूत्रधार :** येणे रीति निर्धारून हे गोष्टी मला मानली परंतु अरुंधतीस पाठवून मेनेची मात्र संमती करावी, ऐसे हिमाचल बोलतांच वसिष्ठानें अरुंधतीचे स्मरण करितांच ते येते पहा.

[ **दरु० :** (राग—कल्याणी) ]

सकलपतिव्रता प्रकारामध्यें जें अकलंक केवळ साध्वि शिरोमणी ।।
विकचनेत्री विश्वदित अरुंधती निकट येतसे ते अनुपम गुणश्रेणी ।।

**सूत्रधार :** येणे रीति अरुंधती येऊन मेनेसमीप जाऊन बोलते पहा.

(श्लोक) नेणों तुवां कवण उत्कट धर्म केला । जोडे महेशसम वल्लभ कन्यकेला ।।
आतां न किंतु सखि अंतरिं तां धरावा । वाङनिश्चयो स्वजनसंमतिनें करावा ।।

**सूत्रधार :** अरुंधतीचें वाक्य ऐकून मैना बोलते पहा.

**वचन :** देवी तुझी गोष्ट मी मोडीत नाही. परंतु ईश्वराची मोटी तामस प्रकृति, तदनुसार त्याची चर्याहि लोकविलक्षण आहे.

दरु (राग : मुखारी)

सांगतसे तुज बायी गिरीशाचरणा।
राग नको करूं कांहीं लगतसे तव चरणा ।।
श्वशुराचा यज्ञ येणे शशिमुखि भंगियला।
तिसऱ्या लोचनानलें प्रशमित स्मर केला ।।
भ्यासुर अंतक जो कां ग्रासिला तो अवलीला।
जोडिलीसें सायासें हे मुलि करुनि तप फार ।।
जोडी नाही यीसम दुसरी साचार।
गोड इणे करितां आमुचा अवघा संसार ।।

सूत्रधार : येणे रीति मेनेचे वाक्य ऐकून अरुधती बोलते पहा.

दरु : (राग : कांबादि)

इंदुशेखरा करुणासागरा सर्वथा निंदू नको।
सखिये सुंदरि यासम सत्य भक्तजनबंधु नसे दुसरा ।।
मन्मथें विधुनि सुमशरिं चित्त उन्मथिलें ध्यानावसरी ।।
चिन्मये यास्तव नेत्रानले उन्मत्त शमविला क्षणांतरी ।।
शरण येतां मुनिनंदने परिसे मार्कंडेयभक्त मंडन चिरंजीवी केला।
तो आपणे हरुनि तरसणि सुताचे मीपण (हरिले?) ।।

सूत्रधार : येणे रिती अरुंधतीचे वाक्य ऐकून मेनादेवीने अंगिकार करता ऋषीश्वरानीं हिमाचलानिकट येऊन वर्तमान सांगितल्याने वाङ्निश्चय करिता कुंभोदर विवाह-मंडप सिद्ध झाला. म्हणून हिमाद्रिसमीप येऊन बोलतो पहा.

दरु : (राग : धन्यासि)

विवाह दिव्य मंडप तो सिद्ध जाहला।
तिहीं लोकीं उपमा नाहि ज्याला ।।
शातुकुंभाचे स्तंभ उभे केले।
आंत पुतळ्याचे वृंद कोरियले ।।
मोतियांचे झळकती झाले।
जोति पाहुनि जन येक (जागि?) ठेले ।। १ ।।
चंद्रमसासम चांदवे बरि।
भोंवते भेंवले (?) झाल्लरभरजारि ।।
रत्नखचित वेदिका साजे बरी।
शोभताती तोरणे परोपरी ।।

सूत्रधार : येणे रिती कुंभोदराचे वाक्य ऐकून हिमाचल संतोषाने बसला असतां परमेश्वर येतो म्हणून पडद्यातून वैतालिक बोलतो पहा.

(श्लोक)

नीवारद्यति कंठुकें मजला वाणी न ची बरी ।।
वाणीते झळके तितें कवण तो वानील सांगा तऱ्ही ।।

.... .... .... ....

वाणीशादिक प्रार्थिता मनि जडावा नीट जो की असें।
वाणी नित्य सुखी न जेथ करुणावानीश तो येतसे ।।

दरु : (राग : अठाणा (अडाणा) ]

चंद्रमौलीश येतो सद्धी सांद्रदयांबुधि ।।
यंद्रादिक देव अगदी वंदिति ज्या पदोपदी ।।
शिशिरभानु दिप्ती धरि जो। बसुनिया वृषभावरी ।।
स्वसुखाचा निधि मनोहारी। असित कंठ भक्तसंहकारी ।।

**सूत्रधार :** येणे रिती चंद्रमौलीश आल्यानंतर ब्रह्मादिक देवांसहित महाविष्णु येताहेत पहा.

दरु : (राग : शंकराभरणा)

येतो तो पुरुष लक्ष्मीयेचा विसावा।
चेतोधामवासी हा महा येथ चित्ता संविसावा ।।
मस्तकीं मुकुट झळाळीं। कस्तुरी रेखिली भाळीं ।।
कौस्तुभमणी नेणो कोटि अंशुमाली।
हस्तकीं दर सरसिज कौ (मो?) दकी ।।
निसतुल ज्याप्रति तेजोमाली। वस्तभाव वरि सकलहि लेउनी ।।
वस्तुतमः पर जीवन माली ।।

**सूत्रधार :** येणे रिती महाविष्णु आल्यानंतर लग्नघनिटका समीप उरली म्हणून जोशाने तातडी करताच (शिव पार्वतीचे लग्न लागते).

( श्लोक )

जो व्यापुनि सर्व जगासि राहे। ज्या विश्व साक्षीभुति बोलताहे ।।
ज्याचे दिसेना शिर धातयासी। आच्छादिता सानपटे तयासी ।।

( श्लोक )

नामे रूप गुणे करूनि शिव जो त्या शंकराला वरी।
जे देवी अजि सर्वमंगलमयी विद्रूपिणी सुंदरी ।।
ज्याच्या आठवणें घडे सकलिकां कल्याण तें चांगले।
त्या तुम्हां शिवशक्तिरूप उभयां भूयास्तदां मंगलें ।। १ ।।
भाग्यश्री धनधान्य संतति चिरंजिवित्व तें चांगलें।
अष्टैश्वर्य विशिष्ट धैर्य सकल श्रेष्ठत्व लोकागळें ।।
ऐसें सर्व समर्पुनी धनकृपापैसे शिवा निश्चयें।
भक्ताच्या निज रक्षणीच असिजे तां सावधान स्वयें ।। २ ।।
धान्यासी वसने धनें नवनिधि अन्यांतही मान्यता।
कन्यापुत्र कलत्र मित्र बरवें संन्यासनिष्ठा तथा ।।
अन्याही वरसंपदा वितरुनी अन्यादृशा येक्षणी।
धन्य तां बहुसावधान असिजे पुण्यात्मसंरक्षणीं ।। ३ ।।

(मंगळ) चंद्रमौळीशाय मंगळं। कल्याणाद्रि कार्मुकाय मंगळं ।।
कल्याणविधायकाय मंगळं। दर्पकंदर्पहराय सर्पाधिराज
हराय कर्पुर कुंदहराय मंगळं। प्रथत चिब्दैभवाय
प्रणतकंजभय प्रतापेंद्रकुलदेवाय मंगळं।
चांद्रमुखनदीशाय मंगळं ।।

सूत्रधार : येणे रिती हिमाचलाने परमेश्वरास कन्यारत्न समर्पून (हिमाचल) बोलतो पहा.

( श्लोक )

धर्मिष्ठासि कदा विपत्ति नलगो स्वप्नांतही येकदां।
लाभो नित्य सदाशिवप्रभुदयें सद्बोध लोकां सदा ।।
श्रीमद्रामपदारविंदयुगली कल्याण भाग्यप्रदा।
जोडे भक्ति उदार ते अनुदिनी स्वानंदराज्यास्पदा ।।

सूत्रधार : या प्रकारें हिमाचलानें प्रार्थितां त्याचें मनोरथ परिपूर्ण करून सपरिवार परमेश्वर नित्यानंद मंदिरास आले पहा.

( श्लोक )

श्रीमालोजि नरेन्द्रनंदन भला शाहेन्द्रनामाथिला।
पुण्यश्लोक म्हणून लोक निगदी ज्याला प्रपंच्यातिला ।।
त्याचा पुत्रक सच्चरित्र जगतीं येकेन्द्र भाग्यागला।
त्यापासूनि शिवस्वरूप तुलजाराजेंद्र जो जन्मला ।। १ ।।
प्रतापसिंहेन्द्र कुमार त्याचा।
जो अंशि श्रीविष्णुजगत्पित्याचा ।।
उमासतीची सुकृतैकराशी।
कल्पद्रुमाच्या न तुले कराशी ।। २ ।।
जो कां त्रिवर्ण गुरुशी अपरूपकाशी।
आधार थोर अजि आत्मनिरूपकाशी ।।
तेणेचि या गिरिसुताशिव रूपकाशीं।
केलें पहा निरुपमाद्भुत रूपकाशीं ।।

।। श्री सां ब स दा शि वा र्प ण म स्तु ।।

---

# ४. कोरवंजी नाटक

श्रीगणेशाय नमः ।। नाटचारंभ करून जानकी सुखोल्लास नाटक सुकवि विरचित या रंग भूमीत नाट्य करितों या करितां नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पहा.

**(श्लोक)** दिनानाथ शरण्य जो जप तप ध्यानान्वयेंहि अति ।।
मानार्हा प्रति मानितां वितरितां दानासि पात्रा प्रति ।।
ना ना लक्षण शास्त्र दक्ष शत ज्ञानाध्यपकाच्या मुखें ।।
प्राणाचा धणि जानकीसेमिनला तो नाथ रक्षो सुखें ।।
येणेरीति नाटकार्थ संग्रह श्लोक म्हटल्यानंतर विनायक येतो पहा.

**(दरूऊ)** कोदूनि आनंद भरें.

**वचन :** अरे पारिपार्श्वका विघ्नेश्वरें येऊन सकल विघ्नें निवारणें केली कीं या प्रस्तुत कार्यास तां इकडें यावें पारि : जि मी हाजीर आहे ।। तर सांगतो ऐका येथें प्रतापरामचंद्र महोत्सव विलोकनोत्सुक सकल विद्वज्जन मिळाले आहेत यास्तव जानकी सुखोल्लास नाटक नाचऊन सम्यास अंतर संतुष्ट कराया इच्छितों. कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता सांगतों ऐका.

**(श्लोक)** साकेत राणार रघुराज पाहे । भाकेसि ज्याच्या बहुगुंतलाहे ।।
तो केंवि हो प्राकृतसा म्हणावा ।। साकार सद्भाव तसा गणावा ।। १ ।।

**वचन :** पारिपार्श्वका पूर्वी अपुर्व नाटकें निर्माण झालीं असतां या — नाटकांत काय अतिशय जेवि निरवधिं कृपायनें श्रीव्दैपायनें श्रीकृष्णे पदीष्ट वेदांत शास्त्रार्थ सप्तशत श्लोकीं निबध्द करूनि सर्व लोक उद्धरिल्या प्रमाणे यां महाराजें सर्व लोकापकार काजें जानकी आणि कैकाडिण याच्या प्रश्नोत्तर व्याजें सकल इतिहास पुराण धर्म शास्त्री विस्त्रित कलि विडंबन पूर्वक वर्णाश्रम धर्म अदि करूनि गुरुशिष्यधर्मस्त्रीधर्म पुत्रधर्म शेवकधर्म याचें वर्म समस्तांहिं सर्वत्रास कलावया कारणें नाटक रूप यां ग्रंथांत निरोपिलें आहे. तरि पारिपार्श्वका तरि तुझे अंतःकरण आर्थांतरि आसक्त आहे सारिखे वाटतें पारि : भलारे भला सूत्रधारा तुज-समान इंगितज्ञ प्राज्ञ नाहिं तरि प्रश्नार्थ सांगतो ऐक या नगरांत शकुन शास्त्र निपुण येक ब्राह्मण आला आहे म्हणून ऐकिलें त्याच्या दर्शनार्थ अंतःकर्ण उत्कंठित जालें आहे या परीच जानकीचे अंतःकरण हिं श्रीराम प्राप्ती साटीं शकुन सामुद्रिक लक्षणाभिज्ञ जनास प्रश्न कराया कारणें उद्युक होते ऐसे संवदतां सखी समवेत जानकी येते पहा.

**(दरुऊ)** वैदेही ते विमुखी जे ते भूदेवी कन्यका जनक भूपवंश भूषा जेते स्मरकोटी स्वरूप ।। स्मरत आत्माराम रूप ।। श्रीसमरूप शालिनी श्रीमती हेममालिनी ।। जिस तुल्य नारी कोण्ही दुसरी नाही भुवनी ।। १ ।। अनन्य भावना सखि ।। हस्त धरुनियां नीकी ।। कनक वर्णा सारिखि ।। तनुजीची शशि मुखी ।। २ ।।

सूत्रधार : जानकी देवी येऊन अंतरंगी संतोषामृतें धाली असतां तिची रीति विलोकून अनन्य भावना विचारिते पहा.

(दरुऊ) चिंता लागली तुझ्या चित्तास का चिंत्ता रत्नसा भाग्यवंत बाप असतां ।। वसणे भूषणें ना ना वर रत्नखचित तें ।। वसति सौध मंदिरे वसति बाई ।। अशन उत्तमोत्तम रस युक्त प्रार्थना वसरी घेऊनि शिद्ध असतां कीं करी पाहि ।। १ ।।

सूत्रधार : सखिनें पुसतां जानकी बोलते पहा.

(श्लोक) मारीच निर्दालुनि दिर्घ बाहु ।। विदारूनी दारूण तो सुबाहु ।।
केलि त्वरे कौशिक यज्ञ सिद्धी ।। हे अैकिली विप्रमुखे प्रसिद्धी ।।

वचन : असो अशा श्रीरामाविण भूषणादिक सकल जोडि आसिल्या हीं ते दूषणादिक सकल जोडि असिल्या हीं ते दूषणासिच मूल.

(दरुऊ) जोडी राघवा वीण जे झोडि ते बाई ।। कोटि लक्षहून दे पाडिल शोका पाई ।। मिनल्यां कालकूट मोलें वीण प्रकट ।। मिनाक्षी घट मोदें प्रासिजे काई ।। १ ।। नेघतां कवडि वेश्या रोगीण पडिल्या गळा ।। भोगिजे केवि जीण्या बोलवण जें कांहि ।। २ ।।

(श्लोक) भारेंहिन अहिप तेवि गमती या पुष्प हारावळी ।।
त्राशी सांग अनंग तो बसुनि या माझ्या कुडी राउळीं ।।
वाटे कोटि युगासमान अयुगासनी तुरीहीकशी ।।
रामाभी असुनी समये निरखी जे झालें रामा अशी ।। १ ।।

(दरुऊ) पाहिन तो केव्हां सखिया प्राणप्रीये ।। आठवितां रूप ज्याचे अंतरि ठाये ।। पाठिमोरें होतां चित्त पलूनियां जाये ।। कोंदाटला सर्व घटिं कोण्ही न पाहे ।। बोधानंद मूर्ति पूर्ण ब्रम्ह सत्य स्वयें ।। २ ।।

(श्लोक) वाटे धीर मना गजेंद्र गमने भेटेल तो की मला ।। साकेताधिप पुत्र तो मुनिचिया भाकेशी पैं गुंतला ।। आहे त्या प्रति अंतराय सखिये हा येक कैसा टळे ।। कोणालागि पूसुं हिताहित कसें होणार किं आकले ।।

सूत्रधार : अैसे जानकीचें वाक्य अैकतांच अनन्यभावना नामानुरुपे अनन्योभावना सोडुन आलोचना करितां येक उपाय सुचुन आनंदे कोंदाटतां वैदेहि संदेहि पडून विचारिते पहा.

(छंद) निरखिलें तुवां काय गोरटि । हारिख पावलें चित्त ज्यासटीं ।।
न रिघली कधी हे मुखी कळा ।। त्वरित बोलिजे भाव मोकला ।।

सूत्रधार : अैसे जानकीने विचारितां सखी जाब देते पहा.

वचन : माय बाई होईल कोण सांगेल म्हणून तूं बोलीलीस कीं तें अैकून म्या तजवीज करितां शकून सांगायास मोटी शाहणी कैकाडिण दूर देशांतुन या नगरास आली आहे तिला शकुन पुशिल्याने मन कामना पुरेल या साटीं संतोषानें कोंदाटलें.

**दरुऊ :** नामोश काय मी तीचा बोलूं कामिनी। कैंकाडिणीचा सांगू पुरे शकुनाते।। अर्थलागो पाटफले माते लोक लागले मागें जेतें ।। फळभाग वीचारूं भावले ते ते ।। १ ।।

**सूत्रधार :** या प्रकारें अनन्य भावना जानकीसिं वदत आसतां वैदेहीचा मनस्ताप लोपून रघुनंदन प्राप्ती सुचक सकुण सांगुन तीची आनंदाभिवृध्दि करायाकारणे सत्रकाल ज्ञानि शतानंद बुरडीचा वेष घेउन येतो पाहा.

**(दरुऊ)** देखिजे येते कैंकाडिणी ते ।। कैंकाय कैंकाय घोंकित वदनी ते ।। कुरू कृष्ण निज शिरी मनोहर मिरवित अति हरिखुनि ते जरतारि बुटेदार ।। नेसुनी साडी जडित घालुनि हार ।। सरस शंखमणीनी करूनि साज कामिनी ।। करसरोजें गडिणी चाकर धरुनि दुसरि काय दामिनी ।।

**(दरुऊ)** येतसे कैंकाडिण हे दूर देशीची ।। यथेचि सावध पाहें ।। पाठिं बालक बांधुनि ज्याती यपरि ।। पाटिनें बीही मंधुनि पाटीर आंगी लाऊनि रंगीत सानिकाठि करि घेउनि ।। सूप बांधितें या परी ।। वदन वाणी टोपलें विणित करीं ।। रूप शालिनी बरी ।। घरोघर थोपतहास्तिनी परीं ।। २ ।। प्रत्यक्ष जणु गुलाल तैसे जीयेचे अत्यंत लोचन लाल ।। उत्तुंग स्तनी जुलाल देखोनि काममत्त घोंटीति लाळ ।। ३ ।। पैजण पाई वाजती सकुण पसाया पैंजन मार्गी माजती कंजाज्यांक्षी प्यालीसें अती भोंवते गडगंजे भोंवरे भोवती ।। १ ।।

**सूत्रधार :** या परि सखी समवेत कैंकाडिण येउन बोलते पाहा.

**(पद्ये)** या जगन्मंडला माजी नाना कळा ।। साजीऱ्या यथेंचि गाजती कीं ।। साज सामान ते साजती सर्वासी राजयाचे परी चोजलेंखि ।। सान थोरासही आनंद सारिखा न्युनता अधिक्य या नुनता कीं मानी जे मोक्ष रामानुजाचा बरा मानवाला भला मर्त्यलोकीं तारतम्या नसे थोर येथें गोरटीनवलाव गमत मातें ।। राजधानी महाराज याची कोण त्या सांगपा खुण त्याचि ।। या परी सखिनें विचारितां कैंकाडीण उत्तर देते पाहा.

**(दरुऊ)** भोंसल वंश विभूषण जो त्याची राजधानी ।।
नित्य पोषक आश्रिताबा पाहूनि त्याचि राजधानि ।। १ ।।
प्रताप सिव्हेंद्र प्रथित महिपाल राजधानि ।।
जेथें प्रताप श्रीराम प्रकट सन्निधानि राजधानि ।। २ ।।
भरता सम राम भक्त शिखामणि राजधानि ।।
त्याचि भरित अष्ट सिध्दि नवविधि याचेनि राजधानि ।। ३ ।।
विक्रमार्कसम विक्रम त्याचि राजधानि ।।
शोभे शक्रपुरिसम संभृत योधानि राजधानि ।। ४ ।।
जो धर्म परायण धर्मा परि त्याचि राजधानि ।।
विप्रशर्मद अद्भुत कर्म ज्याचे त्याचि राजधानि ।। ५ ।।
जो दान शूरामाजि माननीय त्याचि राजधानि ।।
मोटा ज्ञानि या जनकाहूनि जो त्याची राजधानि ।। ६ ।।

**सूत्रधार :** या परि राजधानिचें वर्णन करून सखी प्रती कैंकाडिण बोलली कीं या प्रमाणें अम्ही संस्कृत मिश्रत व्यवहार केल्यानें आम्हास कोण्ही — कैंकाडिणी

जातीचि म्हणना तया साटी देशीय भाष्यें व्यवहार करावा ऐसें निर्धारून आपल्या बुरडास आठउन बोलते पहा.

(श्लोक) कोठें गेला नाथ माझ्या कलेना ।। कांहि केल्या चित्त हें आवरेना ।।
माराचा तो मार साहेन मातें ।। आणुनीया दूरि कीजे श्रमातें ।। १ ।।

(दरुऊ) कोठें पाहूं रमण कोण करूं गति कोटि येगा परि लोटे क्षण ।।
प्रळय या पावकापरिस उबारा मलयाचल भव मांडी वारा ।।
जलविनें मासा तलमली जैसा तलकी होत आहे तेवि देहा ।। १ ।।
मदिरा पीउनी मस्तपती सवें ।। मुदित जै मंदिरा माजि होते मदन बाधा ।।
तैं मातें न झालीच अधम तो बडसाल सलितो आतां ।। २ ।।

सूत्रधार : बुरडीचें वाक्य ऐकून सखी बोलते पाहा.

(छंद) करू नको वृथा खेद हा सयें । चरण संन्निधि तूझिया स्वयें ।।
बुरड येउनि पावल त्वरें ।। परिस सांगते मी तुला खरें ।।

वचन : कोणता मदनाचा पुतला वायां गेला पोट धंदा पावहवना काय ?

सूत्रधार : येणेरीति उभयतां संवदतां जानकीचा आज्ञेवरून अनन्य भावना तिला विचारिते पाहा.

वचन : अग तूं कोण ग ? कैकाडिण आईस खुण सांगायास आलें या प्रकारें कैकाडिणीनें जाब देतां तुझें गांव कोणतें म्हणून पुसतां ते उत्तर देते पाहा.

(दरुऊ) हिंकदन्त गांव सातवा ।। रहिवास जागा चोखट तो नीचहि नवा ।।
भूक ताहानेचागोवानकहि त्या ठाई बोलावा ।। १ ।।
कैकाडिण शतानंदिनी हें नांवे माझें ।। सकुण बोलावया आलें सखियें राजनंदिनी ।।

सूत्रधार : कैकाडिणीचें वाक्य अैकून आन्यन्य भावना बोलते पाहा.

वचन : हिंकडून सातवा गांवे म्हणालीस कीं पूर्वेकडून सातवा गांवे दीपावांपूर काय ? कोठून सातवा गांवे म्हणून अनन्य भावनेनें पुसतांहि कंठून वरिल सात गांवे म्हणून कैकाडिणीनें सांगता जानकीनें जाणून पुन्हा त्या लोकिचा प्रकार पुसतां ते बोलते पहा.

(दरुऊ) आवडीचे गोड जेवण उदंड साला सारा आवधिहिं वेळशेवणें ।।
लवनाशि पांती पाहणें ।। नव नव सुखी पोहणें ।। १ ।।
चंद्र नाहीं सूर्य नाहीं अपाय उजेड कोंदला तो ठाईचा ठाई ।।
सांडणें मोडणें नाही ।। नांदणूक असली आई ।। २ ।।

सूत्रधार : कैकाडिणीने सांगतां अनन्य भावना बोलते पहा.

वचन : तां साला सारा म्हटलें कि त्याचा अर्थ होत नाहीं.
शाला काय साल वृक्ष काय नव्हें गाई नव्हें वेधलें.
कशावरि वेधलें ? जुंदें गाई जुदें.
अैसे ककाडिणीनें म्हणता टिकाटूकाम पेक्षते म्हणून अनन्य भावनेने विनोद करून लिहून दाखेव म्हणतां ककाडिणीनें सारा म्हणून लिहिता अनन्य भावनेनें कानास हात लाऊन शिंदिचा सारा किं ताडीचा सारा किं नारिलीचा कीं या प्रकारें पुसतां कैकाडिण बोलते पहा.

**वचन :** सुतिसालशियुन आलें.

**सूत्रधार :** अैसे कैकाडिणीचे वाक्य अैकून हे केवळ जाणती आहे म्हणून निर्धारून कोण कोण देश त्वां देखिले म्हणून विचारितां ते उत्तर देते पाहा.

**(दरु)** मागध मालव मैथिल माधुर मारवाड ।। कुरूजांगल अंग कलिंग त्रिलिंग वंगवाड ।। बहु नागर कोंकण तंकण मंकण देशगोड ।। सखीं चांगट या वीण केरळ काश्मीर चोळ जेथें विप्र प्रौढ ।। १ ।।

येणेरिती कैकाडिणीने आपण देखिले देश सांगितील्या वरि कोणतीं तीर्थे कोणते कोणते देव त्वां पाहिले म्हणून जानकीचे आज्ञेवरून अनन्य भावनेनें विचारितां ते बोलते पाहा ।।

**(श्लोक)** मानशीक स्नानें जे मानसिक सर्व पातके करिती
मान नस सरजारयु मानिनी ते नीट पाहिली पुरती ।।

**(दरु)** जे अयोध्या नगरा जवली वाहेन यामध्यें थोरिवसा हे सध्या लागती श्रीरामपाय शेविली ते सरयू माये ।। १ ।।

**(श्लोक)** चैतन्य दात्री सगरात्मजा जे । शुद्धत्त्व जीचे हरि तुल्य साजे ।।
संदर्शने ध्वंसिति दोष नाना ते । पाहिली म्या त्रिजगत्पूताना ।।

**(दरू)** काशीतळीं प्रवाहति सुशीतळ तो या अति ।। ते श्रीगंगा भागिरथी देखिलीया दृष्टीने अधि ।। २ ।।

**(श्लोक)** ज्याच्या अजा लागि अदृश्य माथां । प्रसिध्द जाची निगमांत गाथा ।।
जो मोक्ष दे मूढजना अनाथां । त्या देखिलें सद्गुरू विश्वनाथा ।।

**(दरू)** सोमचुडाचा अवतार श्रीम्हालसा प्राणेश्वर पेमरीस पाहिजेला तो मल्लाचा दावेदार ।।

**(श्लोक)** जेथें कीडे न पडती असुहीन देहा । खाती न गीध कुतरीं न कुगंध तो हा ।।
ते क्षेत्र अणिखि तदीश सुरोतमातें । म्या पाहिलें निज दिठि पुरुषोत्माते ।।

**(दरू)** भोंसल्याचें कुलदैव पोशिदें त्यांशि सदैव ।। तो शंभु श्री महादेव ।। तोशं देखिला देव देव ।। १ ।।

**(श्लोक)** गोदावरी तीर समीप भद्रा । चळाधिवासी नीरसी अभद्रा ।।
जो सेव्य गौरी हर वीरभद्रा । विलोकिलें त्यासखि राम भद्रा ।।

**(दरू)** आधीं माय मग राणी अळविजे म्हणे मायराणि ।। साधी भक्ताची — शिराणी तेथें देखिली वेद्य पुराणीं ।। इटेवरीं चंद्रभागा तटीं विटेना सा उभा विठ्ठल तो सौख्य गाभा ।। नीट पाहिला आत्म लाभा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रीती सकल तीर्थे क्षेत्रें देवहिं म्या पाहिलें म्हणून कैकाडिणीने सांगतां अनन्य भावना बोलते पाहा.

**(दरू)** परीसुनीयां अघहर तीर्थे क्षेत्रेंशि पुरम पूत पूज्य देवहिं ।। तेणें हरिख माजला थोर ।। हर हर बोलवे सरलि पापें शीघ्र सर्वहि ।।

वचन : कोणते कोणते पर्वत देखिले म्हणून अनन्य भावनेनें विचारितां कैकाडिणी बोलते पहा ।।

(दरू) मंदर गिरी आणि सुंदर मैनाक गंधमादन सालग्राम गुणाधिक ।। चंदन गिरी सुरवंद्य अलोलिक इंदुशिलोच्चय इंदु मुखी ऐक ।। देखिले बाई हे वैदेही ।। कैलास पर्वत केवळ पावन श्रीशैल श्रीपूर्वक सर्वाध सूदन ।। ऐलीकडे वेंकटाद्रि निषधाद्रि कैलाखया वीण मलयादि गिरिगण ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति भूलोकास गट चौदा भुवनें म्या पाहिलीं म्हणून कैकाडिणीनें सांगता तेथें नवल अपरूप कांहि देखिलें काय म्हणून जानकीनें विचारितां ते बोलते पाहा.

(दरू) येथें आहे तेचि तेथें तेवि ।। विंबिचि प्रति ।। बिंबी भासें बिंबोण्णी सर्वं जेवि ।। १ ।। आपण बोलिल्या ऐसा उब्जेनिधा ।। तो पर्वत दरिता जेंवि ।।

सूत्रधार : येणेरीति कैकाडिणीनें परमार्थसार सांगतां तें यर्थाथच म्हणून जानकीनें शिरकांप करून तुं बहुतादिसाचि व्यावहारिक रितीनें कांहि नवलाव देखिला असल्यानें सांग म्हणतां ते बोलते पाहा.

(दरू) पाषाणांचि पांखरें उडतां आई । नीट आंखियानें देखियेलें माझ्यायाहिं ।। सकल कला पूर्ण इंदु सता तोंहि ।। निज सखिये श्रुत्ध तो येतो सिंधुहाहिं ।। १ ।। हालाहल प्पील्यापूर्वी चांगला गे म्या हराचा पाहिला गळा पांढरा ग ।। बाळ मुकुंदाचि भेटी जाली मागें आणि मार्कन्डेयाचि मुंजी ठावी लागे ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति कैकाडिणीनें अपूर्व गोष्टी सांगतां तिला सराऊंन बोलते पहा.

(दरू) कैकमी पाहिली दृष्टी कैकाडिणीयां सृष्टि ऐशीं पृथ्वी पाचे पाठीं नहि जाणती मोटी कैकाडिणी होशी शाहणी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति तिला सराउन तुंचा धर्म काय म्हणुन जानकीनें विचारितां कैकाडिण उत्तर देते पाहा.

(दरू) तारेचा संप्रदाय चालत येत आहे बाले कलूनि ठाये बोलू नको.

(दरू) मांजर मोहांचे भाजुनियां नीट ।। रोज गार तें गोड खाजें आम्हा ।। असूयेचि थोर सुसरीचिरूनि दिसोडी खांउनि खुशाल ग ।।

सूत्रधार : येणेरिति कैकाडिणीनें अपला जातीचा धर्म सांगतां अवघें कळें तुम्हा मधें कन्या दक्षिणा काय देताहेत म्हणून विचारितां ते बोलते पाहा.

(दरू) दीड नातरि औल गाढव देउनि ।। कोडें करिति वऱ्हाड बुरड ।।

सूत्रधार : अपला जातीचा धर्म सांगता ऐकून जानकीचे आज्ञे वरून अनन्य भावना प्रश्न करिते पाहा.

(दरू) कोण कोणाशिं तां सकुण कैकाडिणी कथिला ।। जाणविजे भाव मातें अनुपमे जो पूर्वी विमला बहुमान कोण काइ हौसांने अर्पिला औधा तो प्रकारहिं आतां पाहिजे बोलिला ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति अनन्य भावनेचें वाक्य ऐकून कैकाडिण पूर्वील समाचार सांगते पाहा.

**(दरू)** तप तपतां तरूणी गौरीनें ।। अपुला कर दाविला ।। उपरि म्या वदतां तों पति जोडला ।। श्रीपरमेश्वर तिला ।। १ ।। प्रचलित पदिंहुनि वृत्रहनन दोषें ।। सुचरीते शतमख होतां ।। शचीहि माझ्या शकुनोक्ति बळें मग अचिरें भेटली निजनाथा ।। २ ।। दमयंती कर कमळ प्रदर्शितां सामुद्रिक चिन्हानि म्या म्हटल्या परि रमणी तीशीं नळ समरसला तनिदानि

**वचन :** अतां कोणे काय बहु मान केला तो सांगते ऐक ।।

**(दरू)** अनुपमान दिधला ऐक्य अनुरागाचा झुणाग ।। जननीये अंबेनें ।। अनुदिन रंग माजे डणाग ।। मननाचा कडदोरा घणसर बांधिला वुरि जुनागे मणि किंकिणी गण जेथें सोहंनाद करी रूण झुणागे ।। १ ।।
ताला पडतां सकुणा भालुनि इंद्राणीनें खांशीगे ।। चोळी मजला दिली बाले सत्व गुणाची घांशीगे तोळबंद्यावरू त्या थोर प्रकाशाची राशीगें धोलतनिशिदिनि तेणें फिरतें बोलउनि तिमिराशिगें ।। २ ।।
भाव मंगल सूत्र शुत्ध केवळ प्रमाणीकगे ।। अवडीनें मज दिल्हें रमा — माउलीनें अणिकगें देवदेशीक चरणि अविटी प्रेमाचें माणिक गे ।। येवढियानें जालें जीवन्मुक्तीची ठाणिक गे ।। ३ ।। दयाकार अरपिला देवी काय कोणें मजगे ऐकावे सांगते कैकाडीण मी मागील गुज गें ।। प ।।

**सूत्रधार :** येणेरीति बुडडीनें पूर्वील कथा सांगतां अनन्य भावनेनें अतां शीता देवीस सकुण सांग म्हणतां ते बोलते पाहा.

**(दरू)** सकुण मी सांगते सखे तुज ।। माणिक मोते पेरोज हीरे । अणीक मरकत नीळ साजिरे । अणि कल्याणि सर्व यापरि ।। काणिक पूजन देव विध्नारि । कोवळचा दूरवा कस्तुरि कन्निर शेवंती जुई जाई हीं पन्निरें कवीठें जांवले केळे नारिकेळें ।। अवधीं अणवीं आनंद मेळें ।।

**वचन :** आई सुपानें भरूनि आणि गाई हातानें अणू नको हळदी कूंकू पान फोडीसारें आणून ठेव गाई ।।

**सूत्रधार :** येणेरीति कैकाडिणीचे वाक्य ऐकून सकल सामानहि सिध्द करितां सोन्याचा गणेश मांडून यथोक्त पूजा करून प्रार्थिते पाहा.

**वचन :** वाकादे ।। माहोरचे महिसासुरमर्दिनी वाकादे ।। तुळजा भवानी वाकादे ।। शंभू महादेवा वाकादे ।। कोल्हापुरल (माहूर) स्वामी वाकादे ।। मळचाळ भगवती वाकादे ।। पंढरीच्या विठोबा वाकादे ।। गिरिच्या वेंकोबा वाकादे ।

**सूत्रधार :** येणेरीति देवास प्रार्थुनि जनकीस पाहून पुन्हां कैकाडिण बोलते पाहा.

**वचन :** आई माझे वचन ऐक ऐक, मी जें कोंणदावि म्हणेन तो दावावा, मी जें आंगशीव म्हणेन तें शिवावें, म्यां पाण्यातिल सावजाचें नावें घ्यावें म्हणतां घ्यावें.

सूत्रधार : कैकाडिणीचें वाक्य ऐकून जानकीने तथास्तु म्हणून शिरःकंप करितां मागुती बुरडीनें मना आला तो कोण दाविजे म्हणतां वैदेहीनें हात उचलून आकाशाकडें पाहतां कैकाडिण संतोषे बोलते पहा.

वचन : जय मंगळ शुभ मंगळ, उमगलें गाई उमगलें मनिचें गुपित सांगते ऐक.

(श्लोक) भक्ता पाय परंपरा निरशिति जे पावले वांउनि । लक्ष्मी जें पद अदरें चूरि सदा वक्षस्थली ठेउनि ।। जे पादांबुज वेदवाद निरतां चित्तिन धाते अशे ।। येथें यतिल केंवि तें म्हणे मनी तां चितिले राजसे ।।

सूत्रधार : कैकाडिणीने मनांतिल गोष्टि सांगतां जानकी संतोषानें रोमांचित होउनि तिला सराविते.

(दरू) देऊं तुजला काय बुरडि ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति जानकीने तिला सराउन रावण धनुर्भन्ग करून जनकाचा पण जिंकिल कीं न जिंकिल म्हणून चितून कैकाडिणीचें मुखावलोकन करितां बुरडीनें आठा कोनांत येक कोना दाखवि म्हणतां देवीनें येक कोना -- दाखवितां कैकाडिण बोलते पाहा.

वचन : कलें गाई कळें. राक्षसाच्या विषई तां चिंता केली खरें कीं लटकें मनांत पाहा गाई.

सूत्रधार : येणेरीति कैकाडिणीनें सांगतां त्या गोष्टीचा अंगीकार करून जानकीनें तो राक्षस कसला बोल म्हणतां येरीनें पाण्याच्या सावजामधे येकाचें नाव घेई म्हणतां सीता देवीनें सुसरीचें नांव घेतां बुरडी बोलते पाहा.

वचन : आई धा धा ।।

सूत्रधार : येणेरीति तीनें सांगतां सीता देवी बोलिली ऐसें जें कैकाडिणी तां धा धा म्हटलें कीं त्याचा अर्थ कळत नाहिं, खउन धा कीं लेउन धा कीं नेसून धा म्हणतेस, ऐसें जानकीनें विचारितां ते जाब देते.

वचन : आई खाउन जेउन तुं घालीस आहेस येथें म्या काय सांगणें, परंतु तां राक्षसाचें लक्षण विचारिलें कीं त्यास जाब दिल्हा कीं धाडोक्याचा म्हणूनें.

सूत्रधार : तीचे वाक्य ऐकून जानकीनें विस्मय पाऊन रावण दंत भग्न होईल की न होईल म्हणून चिंतिता कैकाडिण बोलते पहा.

(दरू) हे पृथिवीतल पाटा शिवच्यापेंचि तो वरवंटाचे पल मधें बरवंटा तो पौलस्त्यकरंटा ।।

सूत्रधार : येणेरिति कैकाडिणीनें भविष्यार्थ सांगतां अरिष्ट परिहार निर्धारून इष्ट प्राप्ती होईल किं न होईल म्हणून प्रश्न करितां बुरडी बोलते पहा.

(दरू) दाखवी सहातसयेनयनी देखेन नीट स्वयें ।। कमळ दलाहुन केवळ जो मउसमुचित लक्षण संभृत कीं बहु ।। १ ।। श्रीकर म्हणुनि सावें म्हणिजा ।। श्रीकर जो अतिश्रितपद पंकजा ।। २ ।। प्रति अवरांतीं प्रथम विवाहिं ।।

धृत जो त्रिभुवन पतिनें बाई ।। ३ ।।
हात गुणीजा हरी माधव अशी ।। ख्यातीस पावला सुतनुवोरशी ।। ४ ।।
येणेरीति कैकाडिणीचें वाक्य ऐकून जानकीनें करारविद दाखवितां आनंदानें शतानंदी बोलते पहा.

**(श्लोक)** वरिल मज कृपेने काय तो चक्रपाणी । करिल (हयगय) कीं सांग पाहूनि णाणी ।।
म्हण पुरविरमेनें दाविलें ज्या कराशी । जननी निरखिते मी त्याच या श्रीकराशी ।।

**वचन :** बहुतेक तुं लक्ष्मी होशील कीं काय म्हणून जानकीची भाटीव करून पुन्हा कर सरोजास स्तविते पहा.

**(श्लोक)** जांबुनद स्वर्न पुठीं हजारीं । घालूनियां प्रत्यहि काम गारिं ।।
की दीधल्या वो या कराचा । नयेसयेवान शुभोत्काराचा ।।

**वचन :** आई सामुद्रिक लक्षण येथेचि आहेत दुसरे ठाई आहेत म्हणणें लटकें कोण्या प्रकारें तेंच ऐक.

**(छंद)** शशांक पाडशी सिंह लक्षणें असति । तें कशी अंबुजेक्षणे मशक बाळकीं । हंस खूण तें कशि वराननें । लेश बाण ते या साटीं ।।

**(श्लोक)** कार्यी ठसा गुण कारणाचा । अन्यत्र नाहीं रहिवास त्याचा ।।
या लागि सामुद्रिक लक्षणासी । समुद्र कन्ये निधि तूंची होसी ।।

**सूत्रधार :** येणे रीति स्तवन करून त्या दिव्य रेखे वरून होईल सांगते.

**(दरू)** दईवाची सखिये तूं देवि ।। कौस्तुभ रेखे करितां सुंदर ।। कौस्तुभ कंधर धरिल तुझा कर ।। १ ।। पद्मरेखा हे पद्मिनी तवकरिं ।। पद्मनाम गुण सद्मवरिल तरि ।। २ ।। डमरू करं खास मज हे पुरती अमर पुरेशासन लाभसी पति ।। ३ ।। अणिकां करिं अशिधन रेखानहि ।। अनुदिन नवविधी असतील तवगृहीं ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरीति कैकडिणीनें तिहें लोका मध्ये अलोलिक नरव मिलेल म्हणून सामुद्रिक लक्षणांवरूनि सांगतां अनन्य साधारण आनंद समुद्रांत मग्न होऊन अनन्य भावना जानकीचें स्तवन करिते.

**(दरू)** भाग्यांची तुंचि वैदेही बाई ।। वर चढ सर्वास वर तो तुजला ।। वरील सुधां बुधिशाई ।। १ ।। राम रतेल अकामहि तुजशी ।। कामिनि कामितदाई ।। २ ।। जनक कुलाशि धन होरा आला ।। जननी आपुल्यां पाई ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रीति अनन्य भावनेनें स्तवितां पुन्हां जानकीचा कर कमल पाहून कैकाडिण बोलते पाहा.

**(श्लोक)** सखे तुझा नाथ दशाश्वमेधा । करील अन्य ऋतुही सुमेधा ।।
सहस्त्र — येकादश संख्य वर्षे ।। पाळील तो राज्य समस्त हर्षे ।। १ ।।
खगीं मृगीं अणी चतुष्यखानीं । संयुक्त हे पावन राजधानी ।।
नेयील सांतानंत दिव्य लोका । जेथें नसें जन्मजराधि धोका ।।

(श्लोक) मस्तान ते तान बहुं मणिचि। चित्ताक चित्ता हरि जे मनिचि ।।
उद्याम दाम स्फुरदर्क जेवि। इत्यादी दे त्या बुरडीस देवी ।। १ ।।

सूत्रधार : ऐसा बहुमान घेउनि शतानंद अपरमितानंद पूर्ण होउन जानकीसी बोलते पाहा.

श्लोक : चिताक देतां जननि तुंवा हें। चिता कशी ते जवळी न राहे ।।
कंथा विदारूनि मनोज्वराचि। कंथासि भेटेन अतित्वरेंचि ।। १ ।।
या प्रकारें कैकाडिण तजविज करिता बुरड येतो पाहा ।।

(दरू) बुरड येतो पाहा बुरड्यांहा ।। बुरड येतस बुरबुरित काहि ।। बुरडिचा ध्यास धरूनि ।। १ ।। लंगोटील लावली बोगळ सुक्ष्म अगदी ।। थोडें सुंगारासि तेणे ।। २ ।। वोखट मांखरू माकड मांजरा रोखुनि त्या त्यास लौकरि मारिता ।। ३ ।। पंखाचा तुरा तो शंखहि लाउनि नि:शंकचि मण्या-सांखळच्या धरित चि ।। ४ ।।

सूत्रधार : या परि बुरड येउन कैकाडीणीस आठउन बोलतो पाहा.

(दरु) धुंडित कैकेदेशहिंडलों मिं रात्रिदिवस कोठहि कैकाडिण नाही ।। १ ।।
मनाचे झाले चिरफाले मन्मथाचे पुष्प भाले लागतां नये सांगतानये ।। २ ।।
बगितलि हाय काय ।। बुरूडिने ते हाय हाय ।। वेगी जो बोला बोलाजि ।। ३ ।।
भस्मावति नावां ऐसि कसमाळ झोबलि कैसि ।। सुटेना मनहीं वीटेना ।। ४ ।।
नागविलें सोनें वानें ना ना संचितासनाण ।। दिसांच मात हे सात्र ।। ५ ।।

सूत्रधार : येणे रीति बुरड बोलून मज कैकाडिणीचि सखी प्रज्ञाहीं नजरेस पडतनाहि ।।
ऐसें चिंतीता ते येउन बुरडास देखून बोलते पाहा ।।
अरे तुं कोण तुझें नावें काये ।। ऐसें तीणें विचारितां मि यातिचा बुरड माझें नावुमरड्या ।। ऐसें त्यान सांगतां येरीन खद खदा हासता तो बोलतो पाहा.

वचन : अई तु हासलिस ते उमगलो, आणिक कोण्याच्या नावां सारखें झुटें नव्हें गुणा जोगें आहे तेचि ऐक.

(श्लोक) केसें गळा आचूक कापूनियां जनाचा। विश्वास राव म्हणुन नाव धरि गुणाचा ।।
अनंद राव म्हणुन नावरडे विपळी। मोटी अमंगळ बधु परि भद्रकालि ।। १ ।।
पोटासि येके दिन आन्नपूर्णा। नामें परि बोलति। आन्नपूर्णा कुबेर तो। भिक अखंड मागे ।। अमचें खरें नावें बरें पाहगे ।। २ ।।

सूत्रधार : या प्रकारें बुरड बोलतां तुझा नामार्थ तूंच पाहून घे मला गरज नाहिं ऐसें म्हणून तूं कां काळधा खापरा सारिखा झालास. ऐसें प्रज्ञावतीनें पुसतां बुरडान भस्मावतीच्या संगतिने हे गति झालि. ऐसा जाब देतां प्रज्ञावति रागान बोलते पहा.

(दरू) वालुनि बुरडीसनूमति धरितां लीवीशय (?) वासना वेश्या संगति ।। कालिमा जडलि अति पुण्य शक्तिहीं झालि संपूर्ण तुटली ।। १ ।। अतां कष्टुनि वाउगें

काय रे आत्म घातक्या राहिजे उगे ।। जातां उदक आडवें बाधितां वळण सार्थक कायरे सांगे ।। २ ।। वेचल्या कोडीच्या कोडि या देहीं वय साचार न जोड घडी ।। ते चालिलें दिसोडी जेल भिन्न घागरी परि रेवेडी ।। ३ ।। लागुनि कामाच्या पाठी केलीरे परलोक कामाचि आटी ।। च्यापल्य सोडुनि तऱ्ही घ्याई रे शरच्याप पाणि तो अंतरि ।। साफल्य जन्माचें करि ऐसें घबाडें सांपडेना यां वरि ।। ४ ।।

**सूत्रधार :** ऐसे प्रज्ञावतीचें वाक्य ऐकून आईसनूमति कैकाडिण भेटल्यावीण देव धर्म ध्यानगीन काही गोड रामेना तरि पुढे माझि गति काय ऐसें बुरूडानें पुसतां अधोगतिच्या म्हणून येरीनें जाब देतां बुरूडचा चिरडीस येउन बोलतो पाहा.

**(दरू)** आलों जेंवी तसा येथुनि जातो ।। शोभन मति जे त्या बुरूरिडिचा लाभ न होन कसा आतां ।। १ ।। याजेन सन्निधि येउनि आणिक तीजाशिवाय आसा ।। २ ।। उगले कैशे नेटुनि आभया आघेव जणहि बसा ।। ३ ।।

**(श्लोक)** षुभमति बुरुडि जे माजिया राजधानि आसल म्हणुनि आलों कीं महन्नधनी करगत दुर दृष्टें येथेंहि ते न झालि ।। त्वरित धरिन आतां निटते वाट आली ।। १ ।।

**वचन :** आई, चौध्यात सांप सांपडल्यानही त्याला वांचविताहेत मी तऱ्ही माणूस. बरें तुमचि ईच्छा म्हणून बुरडचान कष्टतां येथें तुझी कैकाडिण आहे म्हणुन कैसें जाटीलें ऐसें प्रज्ञावतीन पूसतां तो बोलतो पाहा. आई, बाईकोस आपघर कीं बापघर म्हणुन हाये तरी.

**(श्लोक)** प्रतापसिंव्हेद्र आई भल्याचा हा माय बाप प्रभुवयेसाचा ।। या लागि कैकाडिणे सन्मतीसी यथेचि वास्तव्य गमे मतिसी ।। १ ।।
अणीकहीं ऐक जेथें धर्म जगे अधर्म न रिघे पूजे त्ववी प्रासगे ।। पुण्यात्म्ये आवघे प्रधान अवघे कोण्हीनते वाडगे । पमपिष्ठासि दगे म्हणुनी आनघे श्री प्रत्यहि ते फुगे । त्या देशी उमगे तरीच उमगे ते श्रुतधधी भाजगे ।। २ ।।

**वचन :** छपन्न देशा मध्यें हाखेयेक देश तैसा हाये येथें माहाराज प्रभुहून असेल पण मी करंटा त्यास्तवचि प्राप्ती नाही हे बोलून स्वारीस उद्युक्त होतां प्रज्ञावति हांसून बोलते पाहा. आरे बुरूडा भस्मावतीचें पूर्वील नाव ठाउकेची नाही. आई ते काय बोलावें ? ऐसें त्यानें सांगतां येरी जाब देते पाहा. आरे तीचें पहिलील नाव विषयवासना भस्मासुराप्रमाणें ज्याच्या डोईवर हात ठेविल्यां त्याचें भस्मचि करावें त्यास्तव महाराज प्रभूनि भस्मावती म्हणून किताब दिला तुझ्या कपालि ते कोठें पडिलि ? ऐसें प्रज्ञावतीनें कष्टी होतां 'माझा कर्मानें कपांलि' पडिलि म्हणून त्यानें जाब देतां आतां तरि सोडिसिल काय म्हणून येरीन पुसतां तो बोलतो पाहा.

वचन : आई कंबळ संबंध्र संमति बुरूडि भेटलानें कलेना ऐसें बोलतां बर प्रभुस अर्ज करून तुझा कबिला तुला दाविल्यानें मला काय देशील म्हणून पुसतां येरूं आनंदानें बोलतो पाहा.

(वरू) गुंजाचि चांगलि माळ गांजाहि देता रसाल ।। पुंजा घेउन हो खुशाल माझे आई ।। १ ।। वोखटयाचें गोड मास चोखट देतों तुम्हास ।। दाखविजे कैंकाडिणीस अलों वोढिस ।। २ ।। उष्टें खावें तुपासाटी गोठी हे नव्हें कीं उच्छिष्टा घेई गोडें गोरटि तोडिचा माझा ।। ३ ।। ऐसें बोलतां प्रज्ञावतीनें कानास हात लाउन तुझा बहुमान तुला आसुदे मी येक मागतें तेवढे मात्र दिल्हान पुरे ऐसें प्रज्ञावतीनें प्रार्थितां येरानें अवश्य म्हणतां ते बोलतो पाहा. अरे बुरूडा लंगोटी मात्र वोढुन बांध्य ऐसें प्रज्ञावतीचें वाक्य ऐकून अई लंगोटी कसून बांधितो धण्यासही सांगून.

(छंद) बुरूडी भेटवी शीघ्र या वरी। धरीन मी तुझें पाउलें शिरी। करीन बोलिलें वाक्य जे तुंवा शरण मि अलो सत्य ये धवा ।। आई ते कोठें आहे म्हणून वुरूडानें खोद खोदून पुसतां ते मी येकचि आहो परंतु नावें मात्र वेगलें तीला खुण काय सांग म्हणतां तो बोलतो पाहा.

(वरू) मोटी नव्हे धाटी नव्हे कैकाडिणी माझि ।। खोटी नव्हे खरी नव्हे कैंकाडिणी ।। १ ।। नीच नव्हे अंच नव्हे कैंकडिणि माझी कचि नव्हे पकी नव्हे कैंकाडिणी ।। २ ।। गोरी नव्हे काली नव्हे कैंकाडिणी माझी बुरी नव्हे भली नव्हे कैंकाडिणी ।। ३ ।।

सूत्रधार : या प्रकारे लोक विलक्षण आपलि कैंकाडिणी म्हणतां, 'बुरूडा गाढव ब्रम्हच्यारि' ऐसें कोठें तऱ्ही हाय काय म्हणून प्रज्ञावतीनें पुसतां येरू जाब देतो पाहा.

श्लोक : नव्हे असंत संतही असि। आसे जेगजई नसाव जु नव्हे नरू नृसिंव्ह हा — सुरेश्वरू न आंत बाह्य तो बरा आहे. प्रतक्ष अंबरा नव्हे न रून माडीही पाहा न पुसकु आई ।।

सूत्रधार : येणे रीति बुरडान साफसाल जाब देतां प्रज्ञावती बोलते पाहा.

वचन : अरे बुरूडावच्या कव्या सांगीतल्यारे या परि तिन सराविता महासभेचा हा महिमा म्हणून तो बोलतो पहा.

वरू : संतसंग ज्याला साधी वोजा ।। आतां त्याच्या महिमेस नसे जा जा ।। नीरखितांचि तो खेर मेर झाडें। त्वरित होतील ते कल्पतरूचि पाडें ।। १ ।। कर स्पर्श त्याचिया थोर गार गोटे। परिस घडतिल ते परिस मोटे ।। २ ।। ऐसा सत्संगतिचा महिमा सांगतां थाव थाव म्हणून वुरूड घाबिऱ्या — सारिखा चौकडें पाहून येक शिकारी सांपडली म्हणून हाति बलेंकट धरून आनंद समुद्रात पोहतां प्रज्ञावति त्याला काय म्हणून पुसतां येरू जाब देतो पाहा.

(दरू) सांपडला काये वाघ नव्ह सांप थोरला काये नव्ह नव्ह ।। १ ।।
लांडगा धरिला काय नव्ह नव्ह दाडगा म्हहेसोबा काय नव्ह नव्ह ।। २ ।।
हरिण शार्दूल काय नव्ह नव्ह हाति सुकर काय नव्ह नव्ह ।। ३ ।।

सूत्रधार : ऐसें सर्वहि नव्ह नव्ह म्हणतां धाढव धरिला काये म्हणून प्रज्ञावतीन पुसतां धुं म्हणून काना पासीं भोवतें डोल्या तें सीरतें तें धरिलें ।। या प्रकारे बुरूडाचें वाक्य ऐकुन येरी उत्तर देते पाहा.

(श्लोक) कोरूनियां डोंगर उंदिरासी । तां काढिलें केवळ बुत्धीराशी ।।
हाति मि यां ग्रामनुधु गुरूटा । धरिलें पाहालोल नव्हेची झुटा ।। १ ।।
वंद खभाडें गरनाल ज्याचें । तोडूसकेनालिलोमसाचें ।।
फीरंगी पटा तरवार पाहिं ।। कुरंग नेवेन चलेची काहीं ।। २ ।।
सुन्याची मरूकुंडी मूरगुलु येती जपोनि दीनराति ।। परि मनधुगुरूटंहे नलगे बाई कोणाचीये हाती ।। ३ ।।
ऐसी आपूलि तारीफ करूनि आई लंगोटी कसूनि बाधि म्हटले की त्या मूहतनिं फत्ते झालि ।। आतां माझि कैकाडिण द्यावी ।। ऐसें बुरूडान प्रार्थिता प्रज्ञावती बोलते पहा.

वचन : अरे बुरूडा शुभमति प्रज्ञावती म्हणून अर्थ सारा येकच. हाय आतां तीची मिळनी करीतें बग.. ऐसें म्हणतां कैकाडिण येते पाहा.

(दरु) येतसे कैकाडिण हे ।।

सूत्रधार : येणे रीति आली ते कैंकाडीण पाहून दीदीप्यमान पाहून बुरूड बोलतो पाहा

(श्लोक) आचंचला हेतव चंचला कीं सचेनाहेमलता सुचेकिं ।। ताराचताराधिप, आन नागे ।। काहि इचा लाग मला न लागे ।। १ ।।

सूत्रधार : ऐसें बुरूडानें अनिर्वचनीय हे काय की म्हणू बदतां अरे बरें बगुन पाहा. ऐसें प्रज्ञावतीनें सांगतां येर्व्हि लउन न्याहलुन अपूर्व स्त्री रत्न निर्धारून विकल्प करितो पाहा.

(दरु) नवल देवता हे म्हणु जरि ।। लवती पक्ष्म ते सर्वदा तऱ्ही ।। च्यवन भाजतें किं सुकन्यका । युवतिरूढ हे किं कन्यका ।। १ ।। या परि अनुवादुन थोर श्रीमंताची बाईल भावुक अई दंडवत्करितों म्हणुन पाय धरू जातो कैंकाडिणीनें शिवस्मरण पूर्वक चारि पांडें मागें सरकतां प्रज्ञावती बोलते पाहा ।।

वचन : अरे बुरूडा सुदामा जसा, आपुल्या बाईलीस देवाच्या दयेनें भाग्य आलें तें नेणून थोरवंटाची बाईको म्हणून दंडवत्कारायास गेला, तैसाच तूहि पिसा झालास काय ऐसें प्रज्ञावतीनें बोलतां तो बोलतो पाहा.

वचन : आई उगीच येकाचि अस्त्रियांशी अस्त्री मटल्यानें दोषतरि दमयंती प्रमाणें माझ्या कैंकाडिणीचें कपालीं तिलक होता तो आसल्यानें खरें, म्हणून न्हयालितां त्या गोष्टिचा ताळा पडतां बुरूड परमानंदे बोलतो पाहा ।।

(दरु) हेचि कैंकाडिणी हेचि जाण हेचि सोनियाची ।। १ ।। या जिवाजीवन जी साटी अनुदिन मी शीणलों दीन ।। २ ।। खर देअुनिया तीनिवरिजेलि प्रीतीनें ते ।। ३ ।। रंभाहि जीवरून वालिजे वावालून ।। ४ ।।

सूत्रधार : या परि शतानंदीस पाहून अनंद समुद्रात पोहून वस्तभावाचि नावे निशामि नेणून कैकाडिणीस पुसतो पाहा.

(वछ) मखमल किडियाचि माळ कोवून हे मिळविली ।। नव्हे सखया माणिकाचा सरस हार तो न्याहलि ।। १ ।। पालिचें अंड घालितलें कासवासि नाकि ।। नोहे मोलागलें मोती मोटें मनोहर आपलोकीं ।। २ ।। माजि ककंटूनि माधिला कासया पिवला दोरा। नोहें हाजि सोनियाचा अंबेनें दिधला कडदोरा ।। ३ ।। रूण झुण ये काय बोलतें सांग पांथि ।। नोहे मणिमयनुपुरें जानकीनें दिलीं नीट पाहि ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रीति बुरूड बुरूडी अन्योन्य बोलून वियोग सागराचा पार पावल्या वरि शतानंदी जनक नंदीनीस बिलोकून बोलतो पाहा.

वचन : अई तुझा हात पाहिला मूहर्तानें आम्ही दंपती येकठाई जैशी मिलालो तैसीच तुम्हीहि थोडक्या दिवसांत अयोध्याधीश बल्लभा पोऊन सुखी राहशील. आतां तुझ्या प्राणनाथाचा चढता पावला हो म्हणावे तरि स्वतः सिद्ध आहेचेचि ऐक.

(श्लोक) भुमिष्ठ पायहि महोन्नत सप्तलोकीं। ज्या तुझियाच पतिचा चढ लाविलोकीं ।। त्याचा यथार्थ चढताजिगी पावलाग। किं तो दयाधन जया प्रति पावलाग ।।

सूत्रधार : या प्रमाणें जानकीशी बोलून शतानंदी स्वभर्ताराशी मिलून अनंद मंदिरी प्रवेशिल्यानंतर वैदेही वियोग वेदना न साहतां सखीशी बोलते पाहा.

(वछ) कैमी लाहिन आत्मारामा लोकाभिरामा मोहन वयें मोहित कामा ।। अरविंदेक्षण परम सुलक्षण दशरथ नंदन त्रिदशानंदन साहीन विरह या वरि भारि ।। हे गोष्टी लटकी ।। नाहीच उरली स्वल्पही करी प्राणेश्वराजे साहीत्य प्रार्थुनिया करि धरी माया कांहि बाहि ।। बाई जिवलगा बाहीं न बाहीं कवलुनि त्यातें दोही ।। डोहि सुखाच्या होईन मग्न आतां पाही ।। करिशी हे जरि मकरध्वज शरीं ।। शकली कृततरि देखसि तनुवरि ।।

सूत्रधार : या प्रमाणे विरहाभिनव करितां अनन्य भावना समाधान करिते पाहा.

(श्लोक) सिजे अन्न तो राहुनि स्वस्थ बाई। निवे तो कसा टाकिशी धीर गाई ।। चुकेना कदा प्रश्न कैकाडिणीचा। अभिष्टार्थ लाभेल वेगें मनीचा ।। १ ।।

सूत्रधार : या परि अनन्य भावना अनुवदता.

(श्लोक) झाला येकचि थोर घोषयुगपत्कालांबुद ध्वनसा ।।
आला काय युगांत भाव गमला हा जानकी मानसा ।। केला दुंदुभि नाद निर्जर भिवंर्षाव पुष्पीं भला ।।
भावी त्यास्तव मैथिली विजय कीं श्रीराघवा लाभला ।।

सूत्रधार : येणे रीति श्रीराम बिजय श्री अलंकृत झाला हे जानकीनें निर्धारिता श्री राम येताहेत म्हणून नारद येतो पाहा. नारद येऊन सम्यास सावध केल्यानंतर श्रीरामचंद्र अभिव्यक्त होतां आनन्य भावना बोलते पाहा.

(दरू) येतो हा शीते राम पाहा ।। काबिटसें शिव कार्मुक भंगुन अंबुज लोचन वीर महा ।। १ ।। सरसीरूह सर करितो घेउनि परणुं तुज पर पुरुष पाहा ।। २ ।। इंदीवर निभ सुंदर सावळा स्वानंदाचि थोर गुहा ।। ३ ।। चंद्रार्काविधिनांदत त्याशी चंद्रमुखी सुखरूप राहा ।। ४ ।।

सूत्रधार : या परि अनन्य भावना बोलतां श्रीरामचंद्र येतो पाहा.

(दरू) त्रितापहर हा येतो पाहा प्रतापरामचंद्र ।।

सूत्रधार : श्रीरामचंद्र येऊन वैदेहीस विलोकून बोलतो पाहा.

सूत्रधार : ऐसे अनुवादुन श्रीरामकंठीरवनि जानकीचे कंठी कमलमालिका समर्पून अभिष्टार्थ माग. म्हणतां (लोकमाता भक्तलोकाविषई श्रीरामाचि प्रार्थना करिते पाहा.)

(श्लोक) धर्मिष्टास कदा विपत्ति न लगो स्पप्नांतही येकदा ।।
लाभोनित्य सदाशिव प्रभुदयेसद्‌बोधलोकांसदा ।।
श्रीमद्रामपदारविंद युगलीं कल्याण भाग्यप्रदा ।।
जोडो भक्ति उदार ते अनुदिनीं स्वानंद राज्यास्पदा ।। १ ।।

---

## ५. मित्रविंदा परिणय नाटक

॥ श्री गणेशायनमः ॥

नाट्यारंभ करून मित्रविंदा कल्याण नाम नाटक सुकवि विरचित या रंग भूमीत नाट्य करितों या करितां सकळ सभ्यास संतोष व्हावयाकारणें कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पाहा ॥ १ ॥

श्लोक : ज्याला स्तवी निर्जर पंक्ति सारी । जो चिंतिता पातक दूर सारी ॥
ज्याची दया विघ्न तमा विदारी । वंदू तया पूजित जो उदारी ॥ १ ॥

सूत्रधार : येणे रिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीची स्तुति करितो पाहा.

श्लोक : जे सर्व नारींत महा प्रभावती । जीच्या कृपे ज्ञानकळा दुणावती ॥
वैशीच चाले कवनी सरस्वती । भावे नमूत् सदया सरस्वती ॥

सूत्रधार : येणे रिती भारतीची स्तुती केल्यानंतर सद्गुरुची प्रार्थना करितो पाहा.

श्लोक : जो ब्रह्मवित्तम शिरोमणी पुण्यराशी । ऐक्ये वशीकृत सदा महि जीवराशी
अव्दैत बोधसुखसागर पूर्णसोमा । वंदू त्या गुरुस जो धरि सेतुनामा ॥

सूत्रधार : येणे रिती सद्गुरुची प्रार्थना केल्यानंतर हरिहराची स्तुति करितो पाहा.

श्लोक : पतगाधिप पुंगवास्थितौ । फणिशय्या रमणीय भूषणौ ॥
धृतकौस्तुभ बालचंद्राकौभौ ( जचे) । तो मुरमार वरिणौ ॥ १ ॥

सूत्रधार : येणे रिती हरिहराची प्रार्थना केल्यानंतर एकदंताची प्रार्थना केली असतां विघ्ननिवारणास्तव विघ्नेश्वर येतो पाहा.

दरू : (मध्यमावति. आदिताळ)
गणपती येतो पाहा ॥ गुणसिंधू हा ॥ मूषकवाहन ज्याशी तोषक भक्ता सुखराशी ॥ १ ॥

वचन : अरे पारिपार्श्वका, विघ्नेश्वरें येऊन सकळ विघ्ने निवारणें केली कीं । या प्रस्तुत कार्यास तां सिद्ध व्हावें ॥

वचन : पारि० जी मी हाजीर आहे.

वचन : कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता?

सूत्रधार : अरे सांगतो ऐक.
जो भोसलवंशाब्धि चंद्रकरूणासमुद्रे तेणें हा ग्रंथ रचिला आणीक त्याचा दिव्य प्रभाव सांगतो ऐक.

चूर्णिका : सद्यस्समुद्यतहृद्यान वद्य विद्यानुगुण्य दाक्षिण्यागण्य नैपुण्यानुष्टानुकनिष्टित वसिष्ठादि व्दिज वरिष्ट निष्टुर तपोनिष्टा प्रसन्ना पार कृपा पूर्णापर्णा सहाय प्रसाद सादर प्रमोद मेदुर प्रालेय भूधर कुमारिका छाया कलिंदानंदिनी

पूर विहरन्मराळयेमान निर्मल शरीर स्मर हर संदर्शन समसमयाक्रंदिता मंदानंदन संदोहांदोलित मकुट तटवि कट जटा नूटनटत्सुरतटिनी कल्लोल माला संभृत प्राज्य लांम्रज्य मिषिवता समुन्नत निज भुज शिरः पर्यंत संवेशित रसा समर्थित स्थिरा नामधेय युक्त ।। न्यक्कृत कंदर्प सौंदर्य दर्क धिःकृत कार्तिकेय शौर्यापसर्प ।। फूत्कृतमंदराहार्थ धैर्यनीरधि गांभीर्य शौर्यादार्य खाणि ।। निस्तुल भाषा चातुर्य स्वीकृत गोस्तनी माधुर्य वाणी ।। निरंकुश-विला सानुकूल समाक्रांतदान धारा संपादित सरित्परंपरा विद्रावित दारिद्रचावग्र होपद्रवचक्र वाळांतरा निवसव्दनीपका भीष्ट मनोरथ पुरविता ।। श्रीरामचंद्र चरणारविंदमिलिदायमानमानस स्वजनसमूह सगोपिता श्री मत्प्रताप-सविता श्रीप्रतापसिंहभूत्राता ।। १ ।।

**वचन :** अरे पारिपार्श्वका अणीक सांगतों अैक ।।

**श्लोक :** धैर्ये मेरू समान विर्ज्यजलधी शौर्ये महेद्रासरि ।। औदार्ये जणु राजराज दुसरा सत्योक्ति धर्मापरि ।। सौदर्ये सुमसायकासदृश हा संभु दयेने पहा ।। जो जाणा नृपसिव्ह भोसलमणि भूपाकृति राम हा ।। ५ ।।

प्रतापरामी दृढ भक्ति ज्यासि ।। प्रतापसिंव्हेद्र गुणैक रासी ।।
तेणेंवियां सुंदर नाटकाशी ।। केलें पहा हो श्रुभदायकासी ।। ६ ।।

**वाक्य :** अरे पारिपार्श्वका नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो ऐक.

**श्लोक :** वंदारू व्रजपारिजात विभु जो वृंदारका गौरवी ।
वृंदारण्य निवास गोकुल वधू वृंदार विंदारवि ।
विंद्राणे करि जो विचित्र तर गोविंदाख्य आम्हाप्रति ।
विंदारि प्रिय सारथी सुख करो श्रीमित्रविंदापती ।। १ ।।

**पारि- :** अरे पारिपार्श्वका, किं निमित्त चंचळचित्त आहेस ?

**पार्श्वक** सूत्रधारा या सभ्यानुरूप अपरूरूपक नाववायास सुचत नाहीं ।।

**सूत्रधार :** अरे विसरलास काय विव्दज्जन रंजन मित्रविंदा परिणायाख्य मुख्य नाटकास अरे पारिपार्श्वका श्रीकृष्णाच्या हृदयारविंदामाजी मित्रविंदा जैशी बिंबली तैशी तुझी गोष्ठी अंतःकरणी बिंबली अैसे संवदता श्रीकृष्ण येतो म्हणून सभ्यास सावध करायास कंचुकी येतो पाहा ।।

**दरू :** येतो पहा जी भिक्काजी नायक भव्य कपाळीं भंडार सव्य करि टोणपा थोर ।।

**सूत्रधाल :** येणेरिती कंचुकी येउन सावध केल्यानंतर श्रीकृष्ण येतो पाहा.

**द्विपदा :** शरणागतत्राण परगुणग्राम सरसिजासन विनुत सरस निजनाम ।। सारसीरूह स्पर्धिचारू मुखसोम ।। मुर वैरि तो आला मुदित निःस्सीम ।।

**दरू :** कमलनयन यदुपुंगव येतो विमल हृव्दिहारि ।। कमलासन नुतचरण सरोरूह कमला सुखकारि ।। शमित सकल दुरितोत्कर मंडित अमित रत्नहारीं ।। यमुनातट संचारी ।। श्रीमहेमवसनधारी भवतमवारी भौमारी नम्र जनात्तरी लौकरि यमळार्जुनभंजन मुनिरंजन समर विजित दिवि जारी शौरी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण येऊन अद्यापि अक्रूर कां आला नाही अैसें अंतरी चिंतिताच तो येतो पाहा.

द्विपदा : चक्रधर देवास चिंतीत जो भला ।। शक्रसमया जगीं विक्रमी आगळा ।। अक्रूर म्हणउनि अन्वर्थ नाम हा ।। अक्रूर पातला रंगभूमी पहा

दरू : अक्रूर येतो पाहा ।। अति लौकरी न क्रूर ज्याची चर्या विक्रम झाली समरिं ।।

सूत्रधार : येणेरिती अक्रूर येतां कृपेनें कृष्ण बोलतो पाहा.

वचन : अगाये अक्रूरा आजि काय कीं अत्युन्नत विप्राग मनसूचक शुभ चिन्ह दिसते.

सूत्रधार : असें संवदता विद्यानिधी येतो पाहा.

द्विपदा : पुण्य पुरुषामाजी पूत जो सन्मती । वर्ण्य सर्वांसहि मान्य लोकीं अती । गण्य योग्यात सौजन्यशाली गुणी गण्य । धन्य तो विप्र मूर्धन्य आला मुनी ।।

दरू : विद्या पारंगत व्दिज सुप्रभाव येतो विद्यानिधी आयिसें धरि निज नाव पावन मूर्धामणि जो पापभीरु ।। पावला कृष्ण सांगाया समाचारु ।। १ ।।

सूत्रधार : यापरी ब्राम्हणोत्तम येतां त्यांते विलोकून पुरुषोत्तम बोलतो पाहा.

दरू : उशानि । शापुताळ ।।
मान्य मी झालो पावन भूसुरेंद्रा । धन्य आजीचा सुदिन ।। जोडितो करपंकज कोड जिवीचें सांगिजे, जोडि अपुलि श्लाघ्य जे जोडली किति वानिजे ।। १ ।।

दरू : येणेरिती कृष्णवाक्य अैकून ब्राम्हण उत्तर देतो पाहा.

श्लोक : लाहूनि रथ्योदक पुरु संगा । धन्यत्व भावी अपणासि गंगा ।
जैसी तैसें मामक सन्निधानें । मान्यत्व तां आदरिलें निधानें ।।

वचन : गोविंदा, मित्रविंदेनें पाठविलें किंन्निमित्त म्हणशील तरि तोचि प्रकार अवधान देवून अवधारिजे ।।

दरू : कमलावल्लभा श्रवणि प्रमदेचि ऐक वीनवणी स्वामी । अपुल्ये श्रीचरणि रमली ते रमणि । कमलाक्षा यदुवरा कमनीय्या कामाकारा अभिधनंद सागरा । अमराग्रेसरा समजूनि अंतरा । शमयूं या विरह ज्वरा । मम पाणिग्रहण करा ।। नमितें मी सुंदरा ।। १ ।।

चूर्णिका : श्रीमच्चतुर्मुख शत्तमुख प्रमुख बर्हिर्मुख हाटकमकुट तटघटित चिरत्न रत्न निर्यत्न निर्यदवार्य प्रभापुंजमंजरी रंजित पदकंजातें नसेचि तुळ मजातें तेथे माझ्या प्रणामात्तें निवेदी म्हणूनि आज्ञापितां मातें येथें पावलों ।।

श्लोक : जैशी रात्तलि नागराजी गिरीशा कंठी धरी जो गरा ।
कीं वाणी सगुणा गरा विधिस तें जैशी कृपासागरा ।।
तैशी मी तुज नागराजशयना हे वृष्णीवरागरा ।
जाल्यें वश्यजि नागराजवरदा स्वामी महासागरा ।।

**सूत्रधार :** (विद्यानिधीचें वाक्य अैकून कृष्णानें प्रत्युत्तर दिलें ऐसें जें) आपलें आगमन कार्य सिध्र सिद्ध होयील (म्हणतां ब्राम्हण निज निवासास येतां तो अक्रूरास विलोकून कृष्ण अंतर्भाव सांगतो) पाहा.

**दरू :** (राग घंटारवं आदिताळ)

बिंबाधरा तारापतिबिंबानना। सुदतीं बिंबली तें माझ्यें चिती अंबुजाक्षिसति ।। १ ।। कधी करील संविधान। सुधी विप्रनिधान न धीर धरवे आपण वदतों सत्य जाणे ।। २।। सांगिजे काही उपाये सखियां लवलाहें लागवेगें जैशी लाहें लावण्यपेटि हे ।। ३ ।।

**कृष्ण वचन :** अगाये अक्ररा, या समयीं विदूषक अस्तातरि कांही उपाय सांगता. तो अद्यापि कां न आला ।।

**सूत्रधार :** अैसे श्रीकृष्ण बोलतां विदूषक येतो पाहा.

**दरू :** (साम राग ताळशापु)

पातला विदुषक हा। प्रख्यात महा घात मात कथूं ज्या। तुल्य नसे पाहा ।।

**सूत्रधार :** येणे रिती विदूषक येतां त्यांते विलोकून श्रीकृष्ण चंद्राची निंदा करितो पाहा.

**श्लोक :** गिळुनि उगळिला जो राहुने पर्वकाळी।
विखतरिच तनूशीं माखले सर्वकाळीं। दिसत जलज बिंबियासटीं श्याम रेखा।
शश मृग म्हणणें तें भ्रांति अत्यंत देखा ।।

**दरू :** (आनंद भैरवी राग आदिताळ)

हा सारंग लाछनी सळितो किरणि सारसाक्षिवीण अनुदिनी साहुं कैसी कामजाचणि ।। अ ।। सारसान नमनि सारी बिंबली रमणी सारंगेंद्र गमनि साजिरी गुण श्रेणी शालीनी सारंगवाणी साजणी सारंगवेणी सारिखी रती राणी शातोदरी कल्याणी सार चातुर्यकशाणी साम्यथीसी नसेचि त्रिभुवनी त्रिभुवनी ।। १ ।।

**कृष्ण वचन :** अरे विदूषका विप्र वाक्यावरून मित्रविंदा मनी ठसावली. तिच्या दर्शनाची उत्कंठा फार आहे ।।

**दरू :** (आनंद भैरवी राग अटताळ)

भेटल कें ते राशि सुश्रोणी ।। प ।। नाठवेतीज वीण या मनि आठवा दुसरा रमणी ।। अ ।। आसनी शयनी आणि अशंनीजलपानी ध्यास तीचाचि जीविं जडलासे अनुदिनी। भासुर गुणश्रेणी ।। जी समान जनी शसिमुखि वरवर्णिनी शिरोमणी हे सख्या मज साहवेना विषम मोटी विरह जाचणी.

**सूत्रधार :** या प्रकारें कृष्ण वाक्य अैकून विदूषक उत्तर देतो पाहा.

**दरू :** (राग आनंद भरवी आदिताळ)

तुजला कामाचे व्यसन जडलें मोटें। ऐसा सजणा देखिला नाहीं कोठें अजुणिहि मनिची आशा ते न सुटे ।। नित्य ब्रम्हचारी म्हणविशी पण कृत्य

दिस्ये सखया उफराटें ।। १ ।। सोळा सहस्त्र सुंदरी सुंदरी । असुनिही आणीक बाला । मुख्य त्या असतां सप्त पांही । चाला ह्यांचि वाडतो शीमा काही । लीला तुझि धननीला अद्भुत । बोलावि किती सांगूं कायी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती विदूषकाची वाक्यावळी ऐकून सांवळी मूर्ती बोलतो पाहा.

श्लोक : माझा तो अवतार पूर्ण सखया संख्यान्वये आठवा ।
यासाठिं मग आठवा गमतसे जोडा सुखा आठवा ।।
सर्वी मी सम दृष्टिसप्त आशिल्यां पट्टांगना ती सये ।
मोटें ते विषमत्वयास्तव पुन्हा वांछी विवाह स्वयें ।।

सूत्रधार : ऐसे कृष्ण वाक्य अैकून विदूषक बोलतो पाहा.

श्लोक : जेव्हां तुवां श्रीहरी साहळीला । रामाभिरामा वरिलें सुशीला ।।
तेव्हांहि अशी वदलाशि वाणी । आता नव्हे आठविते शिराणी ।।

सूत्रधार : येणे रिती विदूषकाचें वाक्य अैकून विरहातुर श्रीकृष्ण आपुला अंतर्भाव सांगतो पाहा.

श्लोक : यमुनातीर भलें हें वारा पुष्पोफार सुखकारी । कांता संन्निध नसतां झालें विक्षेप हेतु निर्धारी.

कृष्णवचन : अरे विदूषका, नेपथ्यांत गडबड दिसते. बहुतेक अवंत्य राजा येतो. जणू येथें रहाणे उक्त नोव्हे ।।

सूत्रधार : यापरीं संवादून जगंन्निवास निज निवासास येतां मित्रविंदा जनक येतो पाहा.

द्विपद : मित्र निभतेज सोमित्री समविक्रमी चित्रयोधी निजा मित्र संघादमी मित्रविंदा जनक मीनांकसप हा मित्रशिष्टा सुचरित्र आला पाहा ।

दरू : (राग भरवी आदिताळ)

राजित जो अति राजीवनयन हा राजस आवंत्यराज येतो पहा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती अवंतिराज येऊन अनवद्य हृद्य उद्यानी विहरतां अद्यापि प्रियराणी कां न आली असे चिंतीतां राजाधि देवी येते पाहा.

द्विपद : सरस पीनस्तनी सद्‌गुणश्रेणी । सरसिजाक्षि मधुपसादृश्य वेणी । सतत जीची मती निज नाथ चरणी । सति गणि श्रेष्ट ते येतसे रमणी ।।

दरू : (सावेरि राग)

राजाधि देवीसती येतसे हे राज राज युक्ती राज बिंब वदनी मत्त गजराज सदृश गमनी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती प्रियराणी येतां प्रीतियुक्त अवंत्य राजा बोलतो पाहा.

श्लोक : राजीवाय तनेत्री मत्समपती राजीतुला आसतां । कां जीवीं तुज काहिजी जडलिसे काजीं नसे न्यूनता ।। साजीं मंडित हे तनू असुनिहि ताजी न धासे कळा ।। हे जीवा परि साजणी करूनियां हेजी सांगे मला ।।

सूत्रधार : या परि कांताचे वाक्य ऐकून कांता शिरोमणी चिंतेचें निमित्त सांगते पाहा.

दरु : (राग : पुंन्नागवराळि—आदिताळ)

ऐकोजी प्राणनाथा एकाग्रता येकुलती सुता भली ते कांता योग्य जाली ।। अ ।। अनुरुप वर पांही मनुजेद्रां लोकीं तीही अनुपम धुंडितांहि अडळत नाही मनी न सूचेचि कांही अणुमात्र या विषयी म्हणवूनि चिंता जेहीं पहिलें जी स्वामि मीहीं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती पट्टराणीची वाणी अैकन अवंत्यराज बोलतो पाहा.

**श्लोक :** जो मायापर नित्य मुक्त दुसरा जो मानसे ज्यासरी । सोमाकार मुखांबु-सुंदर पव्योमापगें तें धरी । कामातीत असूनिहि पुरवी जो कामा प्रपंन्नाचिया । भामारत्न सुतादि जे प्रभुसत्या या मानिजें निश्चया ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती पतीवाक्य अैकून पतिव्रता शिरोमणी मनीच बोलिली अशी जे हा वर विदानुविंदाच्या मना यावा कीं ऐसे चिंतिता ते येताहेत पाहा.

**द्विपद :** द्वंद्वजा हरि पद द्वंद्व वरीजनी । मंद बुद्धि मध्ये तुंद जे अग्रणी ।।
अंध पूत्राप्रती अर्पिजे सोदरीं । बंधु आलें विंद अनुविंद लौकरी ।।

दरु : (राग : हुशानी आदिताळ)

विंद येतसे दुर्मती अनुविंदा सहीत इंद्रिरावल्लभा प्रति निंदित मानस गति ।

**सूत्रधार :** येणेरिती विंदानुविंदाख्य उभयता नंदन येतां त्यांप्रति अवंत्यराज बोलतो पाहा.

दरु : (राग : यतुकुळ कांबोदी अटताळ)

भगिनि हे तुमचि कवणा भासुरांगि द्यावी निपुणा निगदि जे अपुल्यां मनी निर्धारूनी माजी क्षणा ।।

**अवन्ति-राज वचन :** माझा तो अभिप्राय अरविंदाननास मित्रविंदा द्यावी (हें तात वाक्य कर्णी आकर्णून विंद बोलतो पाहा.)

**विंदः दरु :** ( राग : उशानि ताळ शापु )

काये तुझी संवदता मनुजनाथा । कान्हया नव्हेची योग्य ईशि ताता ।। १ ।।
अकुलीन तो अगुणी गोपयाती । स्वकरीं त्या समर्पणें येव्हें नीति ।। २ ।।
ठेवीतील शब्द अम्हां लागी सर्वही । ठेवि हे बरी नव्हेचि सर्वथाप्कंहि ।।

**श्लोक :** जेणें मानुनि मातुला निवटिले तद्वांववां आटिलें । चोरोनि घृत वांटिलें निजगज्या भौमासुरा छांटिलें ।। गोपांचे कुल बाटिलें बधुचिया प्राणासि उच्चाटिलें । कुब्जें लागी हि लाटिलें चरित हे नाही तुम्ही जांटिले ।। १ ।।
नंदाचा खिल्लारी वृंदसाटी पिसाट जो झाला गारूडिया परि जेणें धरिलें यमुनेंत कृष्ण सर्पाला ।। ३ ।।

**वचन :** यास्तव कृष्णाला देणें उक्त नव्हे राजकुल संभव कोन्ह म्हणशील तर्‍हीं सांगती अैक.

**श्लोक :** कामाचे परि रम्य याचक मनःकामापिता जो अती । धामादिक गुणावळी प्रति महत्धामाप्रति सन्मती ।। ना मार्गें जहला न सांप्रत असें नामाधिला सद्गुणी । नेमा देऊं सुयोधनाप्रति तया हे मात जी मानुनी ।।

दरु : (नीलांबरी आदिताळ)

देयीजे सुयोधना मानूनि बोधना। भगिनी हे शोभना पशुपाशी शोभेना ।।
राजकुळसंभव राजस जो भला। राजीनें तयां करीं हां जी अर्पिजें इला ।।

सूत्रधार : ऐसें विंद संवदता अवंत्यराजा बोलतो पाहा.

वचन : तो वर मित्रविंदा मना यावा कीं कीन्निमित म्हणशील तरी सांगतो ऐका।

श्लोक : कन्या वरयते रूपं। माता वित्तं पिता श्रुतं। बांधवाः कुलंमिछंति। मिष्टांन्न-मितरेजनाः ।।
येणेरिती पुत्राशी संवादून अवंत्यराजा निज मंदिरी आल्यानंतर तों मित्रविंदा आली जनाशीं आली पाहा ।।

द्विपद : कुंदाभरदना अरविंदाक्ष श्रीहरी। चंद्रानना सतत् चिंतित अंतरी। विंदानुजा मित्रविंदा कृशोदरी। मंदारकुसुम गणि मंडिता सुंदरी ।।

दरु : (सौराष्ट्र राग : आदिताळ)

येतसे कोकमान्य हे मित्रविंदा येतसे लोकमान्या।
येथे प्रथित लावण्या पातली ते धन्या परम सौजन्या ।। १ ।।

दरु : (राग : गुम्म कांबोदि आदिताळ)

येतसे भामामणि हे मित्रविंदा येणांकनिभ वदनी शातकुंभा भवर्णीनी घ्यात कृष्णाशी शातोदरी स्वमनी मत्तेभराजगमना अरविंदाक्षि चित्त जनमदविवर्धन उत्तम गुणसदना कुंदरदना उत्तुंगवी पीनस्तना ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती मित्रविंद येऊन तात निकट पाठविली सखी अझुणी कां आली नाही अैसें चिंतितां चितरंजनी येते पाहा.

द्विपद : श्रृंगारवल्लीका श्रृंगारूनी अति तुंग पीनस्तनी अंगनामणिसती। भृंगवेणी मदें धुंगलीलावती मंगळा ते अली रंग भूमी प्रति ।।

दरु : ( राग : असावेरी आदिताळ )
येते वनरूहलोचना येणांकवदना हे मित्रविंदा सखी येथेंची हे सन्मुखी जे तुल्या रतीस ती किं यौवनशाली नीकीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेंरिती श्रृंगारवल्ली येवून रंगागणी उगी राहतां तीतें विलोकून मित्रविंदा बोले पाहा.

दरु : ( नवरोजु राग : अटता )

कट कटा माझ्या भाळा काय सांगूं मी कुटिल कुंतले अबोला कासया सजणी धरिला ।। यौवन हे जीर्णदेहीं केवळ मोलाचे पाही ।।
नवरा अति सौख्यदायी नृवरें बाई कुवलयाक्षि अझुणिहीं अवलोकिला नाही ।। जिवलगे सांगू कांही जीव जाजावला हाहि ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारे मित्रविंदा कष्टी होवुन पुन्हा बोलते पाहा.

दरु : (पुन्नागवराली—आदिताळ)

साजणी सांग गे सौयेय साचंत आता साजिरी ते सारसाक्षी सार काय वदली माता ।।

**सूत्रधार :** येणे रिती मित्रविंदेचे वाक्य अैकून श्रृंगारवल्ली बोलते पाहा.

**दरु :** ( राग : घंटारव आदिताळ )

ऐक वो आई आदरें आद्यंत वृत्त अमित सुखाचि खाणी। अनुपम अळिकुळ वेणी अमल गुणाची श्रेणि। अपुली नंदिनी अर्पूनि वरा चोखट अपेशाचें करा पीठ। अपण जे वाटे नीट आतां धरिजें तेची वाट ॥ १ ॥

**वचन :** तव जननीने या परिं प्रार्थितां जनक संन्निधानी विंदानुविंदानी बोलिला तो प्रकार निज काने अैक.

**श्लोक :** भावू तुझे उभयतां गुण रत्न राशी। द्यावें तुतें म्हणती जाण सुयोधनाशी आहे तुझ्या हृदयी हेतु कसा श्रुभांगी। सांगे मज प्रति अतां अति लागवेगीं ॥

**वचन :** येणेरिती विंदानुविंदाच्या संमतीने तव जननी प्रति अवंत्यराजा बोलिला तो वचन संदर्भ अैक ॥

**दरु :** ( राग : पुन्नगवराली—ताळ : शापु )

सुधव्वा नामाथिला भला मजला सुयोधन वर मानला सुधि की सुधें सारिखी सुमखी हे। निकीं मात सुधिगें प्राण सखि ॥ १ ॥

**वचन :** येणेरिती प्राणेश्वराचे वाक्य ऐकून तव जननीनें सम्मत होतां तो संतोष वृत्तांत साद्यंत सांगायास अत्यंत तांतडीने मी आले.

**सूत्रधार :** येणेरिती श्रृंगारवल्लीने संवदंता ते वर्णावळी कर्णी आकर्णून मित्रविंदेचें वदन विवर्ण होता पुन्हा सखि बोलते पाहा.

**दरु :** ( राग : सैधंवी—आदिताळ )

सजणि गमे नवलाव मोटा तूझा मज आतां साजिरी रति सौख्य दाता वल्लभ पाहिला असतां राजसे कां भीतरि चित्ता राज बिंब मुखि धरिली चिंता ॥

**सखी :** जनक आणि तव जननीचा हेतु असे ऐसाचि जीवीचा अनुविंद विंदासही या अर्थ गोष्टीचा कनक कुंभ सन्निभ स्तन युगी कुंभी राजगमने साचा मा मानिनी उकलूनि सत्वर सांगे भाव निजमनीचा ॥ १ ॥

**मित्रविंदा : वचन** माझ्या अंतःकरणी चक्रपाणीनें पाणिग्रहण करावें अैसें होती ते जावून मुरारे स्त्रितीयः पन्थाः सारिखे जालें ऐसे संवादून पुन्हा मित्रविंदा बोलते पाहा ॥

**दरु :** ( सौराष्ट्र आदिताळ )

कंटाळले मन कलंकंठि अनुदिनी कंटाळले मन साजणी माझें स्त्री जन्म कासया श्रृंगारवल्लीके श्रीकांत सुतें मज दस्धले सये जीवलगे सखि केवळ पराधीन व्हायवयाशि मज योजिलें जाण ॥ १ ॥ पापाचें मुख्य स्थान कापद्याचें ठिकाण कोपाचे राहतें सदन कोमलें अपण तापत्रयाचे राण तापसाशी जे छळणे या परतें नसे आनकामिनी जाण ॥ २ ॥

**वचन :** असे पापिष्ट शरीर श्रीकृष्णांग संगे करून शुद्ध होइलशी बुद्धि होती ते जाऊन विपरीत घडले म्हणून (विरहातुर कष्टी होऊन मित्रविंदा बोलते पाहा).

श्लोक : करूनि बहु साधने कृपण मैत्रिकी साधणें। खडें कुचर रांधणें अविधि दैव आराधणें ।। नदीसिकतीं रोधणें विजनिचें जसें चांदणें। लबाड कथि औतणे स्मरपित्या तसें चितणें ।।

दरु : (राग : दरबार—ताळ : झंप्य)

हरि वधू करि करि केवि लाहे। हरि रमणी तेवि मी त्या न लाहें ।। १ ।।
कासया करिशी तूं चावुटीशी ।। बस उगळी पुरे गोष्टी ऐशी ।। २ ।।
गोळकाच्या सूता केवि वरिजे। बोल हे या वरी राहवी जे ।। ३ ।।
काय बुद्धि कथूं तात जीची। हाय हाय आली गोष्टीकाची ।। ४ ।।

श्लोक : ज्याची मति निमिष धर्मं पथीं वसेना। जेणें दिलें गरळ गुप्तहि भीमसेना ।। घेऊं बलि जतुगृहि निज सोदराची ।। जो सज्जला मज अनावडि फार त्याची ।। १ ।। सोन्याची सूरि लाभली म्हणुनियां पोटीं कसी खोविजे। मौलावीण लाभल्यां गरळ तें तोंडीं कसे घालिजे ।। शैवा मैद करी मागुति धना त्या केवि विश्वासिजे ।। कृष्णावांचुनि जोडि तेवि अवघी नाडीच पैं जाणिजे ।। २ ।।

सूत्रधार : ऐशी कष्टी होऊन मित्रविंदा विरहातुर बोलते पाहा.

सिसपद्य : मुरहरा निजमनी वरिली यास्तव रमा वरवर्णिनी घडलि बहिण माझी सिसीरकर त्या मुलें सहज झाला पंच ।। निसिखहि पुत्र तो वीर गाजी ।। माधवासी मिलुनि मानिनी राहतां माधवू सलितसे मत्त आजि ।। हरि नाम जपत मी हरिणाक्षी असतांहि ।। हरि समुह हिसर्व फार गांजी। या वरूनि गमतसे भाव यैसा सावत्र सुतह्य बंधु जो अपैसा ।। सोयरा — म्हणुनये सत्य बाई ।। येणंक मदन ते येथे गाहि ।।

श्लोक : हिमकर करताती दीप्त जैशा पलीत्या। नभिहुनि तलि पाडा देवुनि तों गलीत्या ।। कलरव करूनीया फार मातें सलीत्या ।। श्रुकततिस धुडावा लांच देतें खलीत्या ।।

दरू : ( राग : पुन्नागवराळी—अटताल )

विरह सोसुं मी कसी हर हर अतां ।। वरि वरी बय जनी सरतें चाल हासनि ।।ध्रु. ।। गमति नग अगाई सुमति भार हे पाहि ।। भ्रमर वेणी सांगु कायी भूमीत झालें बाई ।। कमति विधि कल्प तेहि निमीष न वदवे कांहि ।। रमणी मणी विधुहाहि कमलाक्षी सली लवलाहि ।। १ ।।

दरू : (घंटा राग—ताल : शापु )

शिव शिवा विरह सोसु मी ।। केवि सीतकर मुखी येधावा लवकरी आणि जे जीवलग माधवा ।। ध्रु. ।। नव रत्ने भुषणें नव नवहि बरि ।। न वटति रंम्य गे सुंदरी सखी नव घन शामल नलीन नेत्राविणें नवरा रतिचा विंधी निवडुनि नव कुसुम शर गणीं ।। १ ।।

श्लोक : आणा जीवन ध्यासू गंध वुटि हे प्राणासी आलें पुरे ।। दाणादाण— करासुपुष्प तरूवें जाणा धरूनि त्वरे। येणांक द्विज राज हा निजकरि हे ना लोचि कुडि। ना ना कोकिल कीर शब्द खुपति कानाप्रति या घडि ।।

**सूत्रधार :** ऐसें विरहानें कष्टी होतां तों नेपथ्यांत कोलाहल होतां तो काय म्हणून विचारितां मित्रविंदेतें हुडकीत राजाधि देवी येते पाहा.

**दरू :** राजाधि देवि पहा ।।

**सूत्रधार :** येणेरीति राजाधि देवी येऊन कोपयुक्त सख्यांसी बोलते पहा.

**दरू :** (घंटा राग) ताळ झंपा—

काय कथिजे तुम्हा लागि बुद्धि असी कासया निपजलि ।। हे अपैसी नायक प्रथित कुल पाहिला आसतां बाही येतोन सांगीतला कां ईसी ।। १ ।।

**वाक्य :** नवीर राणा भरी केली बरें झालें.

**सूत्रधार :** यैसे संवदतां सख्या उत्तर देताहेत पाहा.

**छंद :** सुचरिते नरोतंस बोलिला । सुचविला अम्ही भावतो ईला ।।
रूचि ईयेस तों येथ पैं नसे । वचनी पूसीजे तीसि राजसे ।।

**सूत्रधार :** येणेरीति सख्याचें वाक्य ऐकून अपुल्या कन्येतें विलोकुन राजाधिदेवि बोलते पाहा.

**छंद :** वदन कां तुझें श्रांति पालले । सदन जें सुखालागि आंगले ।।
वद सखे मनी काय सुचलें । मदवति कथीं गुज आपुले ।।

**श्लोक :** की दुसऱ्याने अपमान केला । किंवा सखे प्राण असे भुकेला ।।
कोणे तुजा हर्ष हिरोनि नेला । कथी मृगाक्षी निजभावनेला ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती मातेचे वाक्य यैकुन मित्रविंदा बोलते पाहा.

**दरु :** (राग) यमुना—आदिताल :

ऐक अयी माझ्या माता । आद्यंत आतां सोय धरूनिया निज मनि केवळ सुंदरीशु-भगात्ति असये ।। धृ ।। नंदजीचा हृदया वंदन । मंदार धर यशोदा नंदन ।। तुंद धुंद निशाचर कंदन वृंदारकवंदन । सुंदर मिरवे आगि चंदन ।। मंदहासदासा हरि चंदन । कूंदर दब विहगेंद्रस्यंदन ।। वंदिति जा सनकस नंदन ।। १ ।।

**श्लोक :** पालुनि रात्री दिवसहि श्रुकांसी । देणें जसें शेवटि मांजरासी ।।
तैसे मला अंध नृपात्मातजाला । समर्पणें याहुनि काय याला ।। १ ।।

**वाक्य :** विंदानु विंदानी सुयोधना देऊ केलें म्या तो हृदयारविंदि गोविंद वरिला आहे. श्रीकृष्ण वेधलें अन्यास वरणें या प्रकारें.

**दरु :** (राग) निलांबरी—आदिताल :

झुगारूनि रत्नपेटि कोण घेईल नरोटी । टाकोनी अमृताचि वाटि कां जी स्वरकटि ।। १ ।। सोडुनि श्रीचे सोहले । उठणे भीक्षेचे डोहाले ।। त्यजुनि कलाक चांगले पुजणे भोंपले ।। २ ।।

**सूत्रधार :** या परि आपुल्या निर्धार सांगुन तुम्ही योजीला तो प्रकार एक प्रकार म्हणुन स्वहितास्तव पूरोहितास जगन्निवासा निकटी पाठविलें तो सावधान

संविधान. करूनि येईल ऐसा संवदता नेपथ्यांत कोलाहल होतां बहुतेक अवंति राज येतो जणु येसें बोलुन समित्रविंदा निज निवासास आल्यानंतर अवंतिराज येतो पाहा.

दरु : राजितथे जो अति० ।।

सूत्रधार : येणे रीति अवंतिराज येउन सचिवाचें स्मरण करितां तो येतो पाहा.

दरू : (राग) शाप :

येतो सचिव सिरोमणि चतुराग्रणि विख्यात शत्रुदमन वीरवृंदमंडन ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती सचिव येतां अवंत्य राज बोलतो पाहा.

अवंतिराज वाक्य : अगाये प्रधाना नृप मंडलीसह हेजिर करणे ।।

सूत्रधार : यापरि रायाचे वाक्य ऐकून सचिव उत्तर देतो पाहा.

(छंद : )

सचिव : नरवरेश हे सर्वहि वलि । त्वरित पातले या सभास्थली ।।
तरी तुवां प्रभु यूक्त पद्धति । करविजे तया आदराप्रति ।।

सूत्रधार : येणेरिती सचिव बोलता नृप मंडली येते पाहा.

(दरु : )

येतसे रायाचा पाळा प्रतापागळा । चोळ पांडय केरळ मालव मछ पांचाल मागध कुरु कोसल अंगवंग बहुसाल ।।

सूत्रधार : येणे रिती याज मंडली येता स्वयंवर पाहावया कारणें मित्रविंदेचें स्मरण करितां ते येते पाहा.

दरु : येतसे लोकमान्या ।।

सूत्रधार : येणेरिती मित्रविंदा येऊन स्वयंवरास श्रीकृष्णदेव अद्यापि का आले नाहीत यैसें अंतरी चिंतितां ते येताहेत पाहा.

दरु : (राग) कनडा :

कमल नयन यदु पुंगव ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण आल्यानंतर अवंति रायाचे आज्ञेवरून मित्रविंदेस विलोकून अंगदेशाधिपतीस दाखवित प्रज्ञा नामक सखि बोलते पाहा.

अज्ञा : दरु : (राग) हुशानि—आदिताळ :

अंगजाहुनि जो चागट केवल अंगदेशाधिप तुं पहा अंगने जा तुल्य नाहीच संगर शूरमहा । त्रैलोक्याहीं अंगलगासह बैसलासे हा ।।

ध्रु. : वर्णनिय गुण सागर ।। वरर्वाणिनि सूर्याचा कुमार नाम कर्ण हा परमोदार तूवां कर्नि आर्कनि जे कांता मनोहर ।।

श्लोक : याची कीर्ति मयिभली भूज युगी गंगारणाचे स्थली ।। शत्रूची अपकिर्ति तेचि यमुना तीसी त्वरें मीनली । तेथें ताहुनि नीट बाहु जगणी स्त्री नंदनासि वनी । केले क्रिडन आदरें रतूनिया रंभापरि मणि ।।

**सूत्रधार :** येणेरिती अंगदेशाधिपतीचे वर्णन करून कुरु राजास विलोकून मित्रविंदेते सखि बोलते पाहा.

**दरु : (राग) सुरटि अटताल :**

कुरु राज गुणवती विलोकी नेत्रि निरूपम धृतराष्ट्र सुत धीर जो कि ।। धरणीस सर्वहि जयाची मंधरणी करिती वाट धरूनि भयाची तरुणि घडलि मूर्ति याची ।। पूर्ण दुरभिमाने गोष्टि गणिजे साची ।। १ ।।

**सूत्रधार :** या परी कुरुरायाचे वर्णन करून कोसल देशाधिपास विलोकुन मित्रविंदेसी सखी बोलते पाहा.

**दरु : (राग) पंतुवराळी—ताळ शापु :**

जोसल अपिल शत्रुचिया मनि । भूसुर पोषक साजणी ।।
कोसल राज बृहद्दल वीराग्रेसर देखिजेली लोचनी ।। १ ।।
केवल्यापट्टणी पहिलील जे कां पावन साकेत नाम भावितसे जो त्वन्मय संतत ।। आवरूनी पूर्णकाम ।। २ ।।

**श्लोक :** याच्या भीमबलें नृपाल झुरतां टाकुनियां स्वाबला ।
त्याते देखुनि पुसति वनवधुकां बायकानी पळा ।।
येरी सांगती आमुची नगरीची ते चंद्रिका सीतला ।
येथें तापविते म्हणुहुनि नटिकें जातों सुसीत स्थळा ।।

**सूत्रधार :** येणेरिती कोसल देशाधिपाचें वर्णन करून मगध देशाधिपतीस विलोकून बोलतो पाहा.

**दरु :** (राग) केदार गोल—ताल: शापु :

मानिनी हा मागधेश्वर मानसमोहन कीं मानवेंद्र समान या जगीं आन नाहि शुभानने पंचानन रिपु दिजा सखी ।। प्रथित नामें हा त्रिभुवन मंडली ।। प्रबल जरासंध ।। घातलें बंदी पृथिविस सत्यसंध ।। जयाने कथितां कथा याची कनकांगी झुरती ते सीथिल होउनि सकल दिकति नथिरतां क्षणमात्र दुर्मद ।। १ ।।

**श्लोक :** हाये तसें हें वदतां नरानी । त्रासूनि शत्रूसि परताति राणी ।।
अभ्यस्त तेंची पडतां शुकानि । येती सुरीते परसूनि कानि ।।

**सूत्रधार :** येणेरिती सखिने सकल राजे दाखवितां त्याचा वीट मानु मित्रविंदा बोलते पाहा.

**दरु :** (राग) जुजांवंति आदिताल :

सजणी कलुनी सारें करिसी कां घाई हे ।। मज नसे दुसऱ्या ठायीं रजभरि तो भाव बाई ।। निजपती श्रीशेष शाई । निर्धारीला सुख दाई ।।

**ध्रु. :** नीलनीरदनील करुणाशील जो आणी । यमुनाकुल विरचित खेल सुहृदनुकुल गुण खाणी । श्रीलोल चक्रपाणी मुकुर कपोल कीर बाणी । कांचनचेल सीघ्र दाउनि सन्मति ।। शालिनी पुरवि सराणी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरितो मित्रविंदेचे वाक्य यैकून श्रीकृष्पाचे ठाई अचंचल भक्ति देखुनि सखि बोलते पाहा.

दरु : (राग) भैरवी--आदिताल :

तो हा सखे निरखी दिठिनें नाथ निज जीवाचा साचा मोहमांग अनंग शतसम जो हरि भवार्तिदानवेंद्र ।। व्युह मर्दन श्रीजनार्दन मोहतिमीरभानु चित्प्रेमता ।। १ ।।

सूत्रधार : येणे रितो सखिचे वाक्य अैकून मित्रविंदेने श्रीकृष्णास मनःपूर्वक वरितां अवंतीरायाने श्रीकृष्णास कन्यारत्न समर्पिता भगवंताने अभीष्ट वर माग म्हणतां अवंति राज बोलतो पाहा.

श्लोक : सद्भाविकासि सहसा विपदा न लागो। त्याचे घरीं सतत सिंधु सुताहि वागो।। अद्वैत बोध सुख त्या हृदईच जागो। देवोत्तमा तुज अम्ही इतुकेंचि मागों ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती अवंति रायानें प्रार्थिता त्याचे मनोरथ पूर्ण करून सपरिवार भगवंत नित्यानंद मंदिरास येतो पाहा.

दरु : मुरारी बंधु सहित परमानंदयुक्त। करूणांनिधि आला कांतेसी सदनाला ।।

।। इति मित्रविंदा परिणय नाटक संपूर्ण ।।

## ६. मायावती परिणय

श्रीगणेशाय नमः ।। राम प्रताप ।।

**श्लोक :** करुणाजल वरुणालय तरुणारुण भासं ।। शरणागत भरणा कुलतरणादृतचरणं कमलालय कमलासुत कमलासन विनुतं । भजमानस कमलेशय कमलानन रामं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मायावती परिणय नाटक नाटयया करितों सकळ सभ्यास आनंद होवयासाठी कवि इष्ट देवताचि प्रार्थना करितो पाहा.

**श्लोक :** ज्याला स्तवी निर्जर पंक्तिसारी ।। जो चिंतितां पातक दूरसारी ज्याची दया विघ्नतमाविदारी ।। वंदू । तया पूजित जो उदारी ।।

**सूत्रधार :** येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

**श्लोक :** जें सर्व नारींत महा प्रभावी ।। जीच्या कृपे ज्ञान कळा दुणावती ।। तैसीच चाले कवनी सरस्वती ।। भवें नमू ते सदया सरस्वती ।।

**सूत्रधार :** येणेरिती भारतीची प्रार्थना केल्यानंतर सद्गुरुची प्रार्थना करिते पाहा.

**श्लोक :** जो ब्रह्मवित्तम शीरोमणि पुण्यरासि ।। यैक्यें वसी कृत सदामहि जावरासी अव्दैत बोध सुख सागर पूर्णसोमा ।। वंदु तया गुरुस जो धरि शेतुनामा ।।

**सूत्रधार :** येणेरिती सद्गुरुची प्रार्थना केल्यानंतर हरिहराची स्तुति करितो पाहा.

**श्लोक :** पतगाधिप पुंगवास्थितौ ।। फणि शंय्या रमणीय भूषणौ धृत कौस्तुभावाल चंद्रकौ ।। भजचे तो सुरमार बैरिणौ ।।

**सूत्रधार :** येणेरिती हरिहराची प्रार्थना केल्यानंतर येकदंताची प्रार्थना केली असतां विघ्न निवारणास्तव विघ्नेश्वर येतो पाहा.

दरु : ।। मध्यमावती राग आदिताळ ।।

गणपति येतो पाहा ।। गुणसींधु हा ।। प.।। मुषक वाहन ज्यासि तोषक भक्ता सुखरासि ।। १ ।।

**वचन :** अरे पारिपार्श्वका विघ्नेश्वरें येऊन सर्व विघ्ने निवारणें केलीं कीं या प्रस्तुत कार्यास तां सिद्ध व्हावे ।।

**वचन :** जी मी हजीर आहे कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता । अरे सांगतो अैक ।। जो भोसलवंशाब्धि चंद्र करुणा समुद्र तेणे हा ग्रंथ रचिला । आणिक त्याचा दिव्य प्रभाव अैक ।

**श्लोक :** धैर्यं मेरुसमान वीर्यजलधि शौर्यें महेंद्रासरी ।।
औदार्य जणु राज राज दुसरा सत्यत्व धर्मापरि ।।
सोंदर्यं समुसायकासदृश हा शंभु दयेने पहा ।।
तो जाण नृपसिंव्ह भोसलमणि भूपाकृति राम हा ।।

वचन : आणिक सांगतो अैक ।।

श्लोक : प्रतापरामी दृढ भक्ति ज्यासि प्रताप सिंहेद्र गुणैक रासी ।।
मायावती सैंवर नामकासि तेणेचि केलें अजि नाटकासि ।।

वचन : अरे पारिपार्श्वका नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो अैक ।।

श्लोक : प्रद्युन्मवेषें करूनी पाहाजी ।। मायावती स्त्रिमणि लाभलो जी ।।
श्रीकृष्णजि ब्रम्ह सुखैक मूर्ति ।। करो कृपेनें निज इष्ट पूर्ति ।।

सूत्रधार : येणेरिती नाटकार्थ संग्रह श्लोक सांगितल्यानंतर श्रीकृष्ण येतो म्हणुन सभ्यास सावध करावयास कंचुकी येतो पाहा.

दरु : ।। खापिराग ।। आदिताळ ।।

येतो पाहाजि ।। भिकाजी नायक ।। प. ।। भव्य कपाळीं भंडार ।। सव्य करीं टोणपा थोर ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती कंचुकी येऊन सभ्यांस सावध केल्यानंतर श्रीकृष्ण येतो पाहा.

दरु : ।। सावेरी ।। आदिताळ ।।

करूणानिधि येतो पाहा ।। करि कुलपति वरदायिस गुण
शरणागत वत्सल म्हणउनिया ।। विरुद सतत मिरवि जो पायिं ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण येऊन रुक्मीणीचें स्मरण करितां तों रुक्मीणि देवि येते पाहा.

दरु : ।। तोडी राग ।। आदिताळ ।।
येते अळिकुळ वेणी शातोदरी रुक्मीणि ।। शात कुंभघटस्तनी पीतांबर रमणी ।। श्रीतुल्य सरूपिणी ।। मातंग राज निभगामिनी ।। अति मानिनी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती रुक्मीणी येऊन श्रीकृष्णास विलोकून बोलतो पाहा.

श्लोक : बाळकाविण जीणें धिगिलोकीं ।। आमुचें निजमनी अवलोकीं ।।
कासया सकळ राज्य करावी याहुनि विपिन वास बरा जी ।।

सूत्रधार : येणेरिती रुक्मिणी संवदता श्रीकृष्ण बोलतो पाहा.

छंद : कमललोचनें अैक साजणी ।। कथितसे तुला येतया क्षणी ।।
शिव वुपासना करूनिया पाहा ।। सुदतिला हुये सत्य बाळ हा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती बोलुन श्रीकृष्णानें सांबशिवाचें ध्यान धरितां तो येतो पाहा.

दरु : ।। पंतुवराळि राग ।। आदिताळ ।।

येतो शंभू विनयन संतोषें करून ।। प. ।। भुति युक्त अपधन भुतेश गौरि रमण अनु. ।।

सूत्रधार : येणेरितो शंभू आल्यानंतर त्याला अवलोकून श्रीकृष्ण बोलतो पाहा.

श्लोक : देई मला पुत्र गुणैक राशी ।। मी प्रार्थितो जोडुनिया कराशी ।।
ईष्टार्थ दाता तुजविण कोण्हीं ।। नसेसुरा माजी पिनाक पाणि ।।

**सूत्रधार** : येणेरिती कृष्ण बोलता शंकर उत्तर देतो पाहा.

**श्लोक** : कल्पद्रुमा कल्पित अर्थदाता ।। चिंतामणिची हरणार चिंता ।।
तेणेरीति या जगतात पाहें ।। पुत्र प्रदाता तुज कोण आहे ।।

**सूत्रधार** : येणेरिती सांबशिवाने बोलुन शिघ्र सुपुत्र प्राप्ति होईल. मायावति ही शंबरासुराचे घरिं पति लाभासाटीं तपश्चर्या करित आहे. असें सेंवादुन स्वधामास पावल्यानंतर श्रीकृष्णहि स्वधामास येतो तो मायावती येते पाहा.

**द्विप** : चातुर्य गुणशीम चांगली सौम्य ।। श्रीतुल्य मुखिधरी शितांशु साम्य ।।
ज्याया अगोधरिले जे मन्मथाचि मायावती निरखिले ।। पातली तेची ।।

**दरु** : ।। आहरि राग ।। आदिताळ ।।
मायावती येते पाहा ।। मदनकामिनी सुश्रोणि ।।
प. ।। मायाजीच्या उदरीसा ।। भावल्या महा ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिति मायावतीने येउन अंतरंग वलीचें स्मरण करितां ते अंतरंग सखि येते पहा.

**द्विप** : चतुरता जेथुनी जन्मला शस्त ।। न तुकती तुळनीस नारी समस्त ।।
रसिक रंजन अंतरंग वल्लीहि ।। शशि मुखी ते अली साजिरी पांहि ।।

**दरु** : रान भैरवि ।। आदिताळ ।।
येते पहा अंतरंग वल्ली ।। प. ।। चातुर्याची खाणी ।।
चारूपीन श्रृश्रोणी चपलाक्षी नीलवेणी ।। चंद्रमुखी कुंभस्तनी ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति अंतरंग सखी आल्यानंतर ती प्रती मायावती बोलते पाहा.

**दरु** : घंटा राग ।। आदिताळ ।।
विरह सोसु मी कैशी ।। विरसदासये ।। प. ।।
स्वारस्य मनिजें होतें ।। व्यर्थ केलें की वकांते ।। हर हर कायतें ।।
हरिणाक्षी सांगु तुतें ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति मायावती कष्टी होतां ती प्रती अंतरंगवल्ली बोलते पाहा.

**श्लोक** : आहेंसि खिन्न हृदयी सखि कासयासी ।। कांहीच हेतु न सुचे मजलागि याशी ।। नाही असें प्रथित शंबर दैत्य राजा ।। सांगे मनातिल मज प्रति सीघ्रकाजा ।।

**सूत्रधार** : यों रिती अंतरंग वल्लीचे वाक्य अैकून मायावती प्रत्युत्तर देते पाहा.

**मायावती** : (दरु) ।। राग मोहन ।। आदिताळ ।।
सखिये कथितें गुज मनीचें सकळ तुज बाई ।। प. ।। पतित हा पति माझा नोव्हे ।। पद्मपत्र नयेन ।। पतित पावनाचा सुत तो ।। प्राणनाथ सांचा सांचा ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मायावतिचें वाक्य अैकुन अंतरंगवल्ली बोलते पाहा.

**छंद** : किं निमित्त तुं राहसी धरिं ।। दानवाचीया लोकसुंदरी ।।
काज काय या दुष्ट संगति ।। कामीनी मला सर्वही कथिं ।।

सूत्रधार : येणेरिती सखीनें पुसतां मायावती उत्तर देते पाहा.

वाक्य : मायेनें मज सारखीं स्त्रि निर्मुन शंबरा निकट ठेऊन मि पति प्राप्तीकारणें तपश्चर्या करितें अद्यापि ता भेटला नाहि ।।

सूत्रधार : येणेरीति वदुन मायावती विरहानें कष्टि होउन बोलते पाहा.

(दरु) : राग हुशेनि ।। ताळ आदि ।।

मायावती : कैशी सोसु नाथावीणा ।। कमलाक्षी विरहाचा शीण दिसं दिस होतसे क्षीण ।। देह हें माझें ।। राहिना वाटतो प्राण ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति सखीशीं बोलुन पुन्हा विरह वेदना न साहतां तीची प्रार्थना करिते पाहा.

दरु : राग आहेरि ।। आदिताळ ।।

न करूनि है गै नळिनदळाक्षी ।। सुखसागर तो शिघ्र आणि ।। विकळ होतसे विरह मानस हे कशी सोसु हरिहरि जाचणि ।। १ ।। याम येक युग कोटि सम ।। कामीनी वाटत पोटीं ।। काम वल्लभ तो कां आजि रूसला ते मज न कळे तत्व गोरटी ।। २ ।। ऐक साजणी बाई ।। तुज मी अथितें गुज कांहि येकांति प्रभु प्राणाचा तो ।। लौकरि भेटवी येकट गेहिं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति मायावतीनें प्रार्थितां सखी उत्तर देते पाहा.

दरु : जुजावंती राग ।। आदि ताळ ।।

सखी : सजणी भ्रम कां जडला ।। तुजलागी या समई पल्ल।।
निजनाथ निपज नसतां अजि आणु कसी गेहि ।। १ ।।

वचन : नवरीस ठाव नसतां पुत्राच्या लग्नास अवतण सांगितल्या प्रमाणें तुझें बोलणें दिसतें ।।

सूत्रधार : येणेरीति उभयता संवादुन इत:पर शंबरासुर येईल त्यास्तव येथें राहणें युक्त नव्हें या प्रकारें चिंतुन या दाघीहि स्वधाम पावल्या नंतर शंबरासुर येतो पाहा.

द्विपदा : जंभारि मुख अमर संभार दमन ।। शंबराख्य प्रबळ ।। दंब प्रधान ।। घातक जगतीत ।। घोर अविनीत पातक पर मित्य पातला दैत्य ।।

दरु : सामराग ।। आदिताळ ।।

शंबरासुर येतसे अंबरश्याम ।। दंभोळि धर वैरि ।। दंभ दर्प ग्राम ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिति शंबरासुर येउन सदरेस बसतां नेपत्थ्यांत कोलाहल होतां तो काय म्हणुन विचारितां धीवर येताहेत पाहा.

दरु : असावेरि राग ।। ताळ आदि ।।

धीवर वृंद आला ।। आवडी दानव भेटी ।। प. ।।
सावज घेउनी सर्वे विविध आणिकहि भेटी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिति धीवर येउन नमस्कारि करून अपूर्व मल्ल हा स्वामिस भेटिस आणिला आहे म्हणुन नजर करून उभा ठाकता त्यांस विलोकून शंबरासुर बोलतो पाहा.

**दरू :** (राग कांबोदि. अटताळ)
देईगेहिं तीच्या आयतन दीप्तिचा ।। दिव्य मछ तो हा ।।
देईगेहिं तीच्या आयतन दीप्तिचा दिव्य मल्ल तो हा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रीति सांगुन शंबरासुर स्वधामास आल्यानंतर सखी सहित मायावति येते पाहा.

**दरू :** (राग आहेरि. आदिताळ)
मायावती येते पाहा छदन कामिनी ।। माया जीच्या उदरिं सामावली महा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रीति मायावति येउन सखीस विलोकुन बोलते पाहा.

**छंद :** हरिरव होतसे आजिपां सखी ।। स्फुरतते पाहा सव्य भुजकीं लवतसे अता वाम नेत्रहि लौकरि श्रुभ प्राप्ति सुचवि ।।

**सूत्रधार :** येणे रिति मायावती अंतरंग वलिसीं बोलत असतां तों प्रकाश फाकतां मछा सहित चित्रांगी येते पाहा.

**द्विपदा :** चित्र वार्ता कथनी चातुर्य फार। चीत्रि लिहिजे असा चांग आकार ।।
चित्रीणी गुणवति पूजीं अलंकार। चित्र भानुज घटित चित्र रूचि सार ।।
मैत्रिणी जे मुख्य मायावतीची। चित्रांगी ते अलि चाक चक्याची ।। १ ।।

**दरू :** राग वृंदावन सारंगी. आदिताळ)
चित्रांगी येते पाहा चित्र दिव्य वसना ।। मैत्रिण मायावतीचि पंकज ।। पत्र तुल्य नयना शसि वदना ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिति येउन चित्रांगीनें शंबरासुरानें अपूर्व मछ पाठविला यैसें म्हणून मायावती निकट येउन निवांत राहतां तीणें तो मछ चिरून पाहता तेथें दिव्य मूर्ति प्रकट होतां मायावती बोलते पाहा.

**श्लोक :** मछोदरीं या परि रत्न होणें। न दखिले या जगतींत कोणें ।।
श्रीनारदावीण रहस्य याचें। कले न अन्या ममवाच्यासाचें ।।

**वाक्य :** नारदाचे आगमन झाल्यानें हे तत्व कळेल.

**सूत्रधार :** ऐसें मायावतिनें चिंतिता तों देव ऋषी येतो पाहा.

**दरू :** (राग यमुना. ताळ शापू)
येतसे मुनिनाथ नारद ।। जगतात पुत पुत नारि ।।
गीत गात सर्व सुहृद ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद येतांच मायावतीनें नमस्कार करून बोलते पाहा.

**छंद :** जलचराचिया पोटशीं पहा ।। ज्वलीत भास्करा सारिखा माहा ।।
मनुज रत्न हा जन्मला कसा ।। मुनिवरा गेमे चोज मानसा ।।

**सूत्रधार :** येणेरीति मायावतीनें प्रश्न करितां नारद बोलतो पाहा.

श्लोक : त्रिनेत्राच्या नेत्रानलिं पडुनिया शान्त। घडला प्रसादें शंभूच्या हरि रमणि गर्भात। जडला तुझा नाहो लोकीं स्मर म्हणूनि जो कीं प्रतिथ हा ।। अला जन्मालागी बलनिधि बधु शंबर पहा ।। १ ।।

छंद : रमण तो तुझा शंबरे भला ।। समजुनि मनि शत्रु आपुला
झडकरि प्रसूति ग्रहांतुनी ।। उडविला खलें साहवे दिनी ।। १ ।।

वाक्य : सूतिका ग्रहांतुन नेउन समुद्रांत टाकितां तों मछें गिळिला कीं तो तुझा भर्तार यास सकळ माया हि शिकीवी.

सूत्रधार : ऐसें सांगुन नारद निजनिवासास गेल्यानंतर मायावतीहि संतोषानें निजधामास येतां. तो यवनारूढ प्रद्युम्न येतो पाहा.

द्विपद : जैत्र रथ मलयाख्य गोत्रजासाच ।। चैत्र माधव मास मंत्रि वरहेच ।।
मैत्र तो अत्रिमुनि नेत्र संभूत ।। पत्रि बाणासनहि पत्रानुजात ।।
पत्र रथ रथ महापुत्र उद्दाम ।। तो त्रिलोका अजय देखिजे काम ।।

दरू : (राग दरबारू. आदिताल)

सुंदर दिव्य पुरंदर मणिसम ।। कुंदन परमानंद रचिचा हा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती वसंता समवेत मन्मथ येउन कामातुर कष्टी होतो पाहा.

दरू : (राग आनंद भैरवी. अटताळ)

भेटवि मज ते राणि ।। कल्याणि ।। पलवि ।।
अठहि याम यामनि अठव जीचा चारू हासिनी ।। अनुप. ।।
न्यहाळुनि या जगी पाहातां नारि समुह आवघाहि ।। नाहीच जी सम मोहनांगी कोण्ही ।। किंवा सख्या कांहि तरिहि उणि केल्यानेंहि साहसाप्रति साहवेना ।। श्रीहरे विरहा स्त्रीमणि ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती प्रद्युम्न विरहानें कष्टि होउन पुन्हा बोलतो पाहा.

दरू : (ताल आदि)

उदकासी ताहनतें उत्कट लागणें ।। कीं दहना लागीहि कीर उबाग होणें ।।
आदित्यादि ग्रहासी ।। अति ग्रह पीडा येणें तेंवि ।।
मदनासहि मातें मदन फार बाधणें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती प्रद्युम्नाचें वाक्य ऐकून वसंत उत्तर देतो पाहा.

वाक्य : स्वामी अमच्या मैत्रानि इतुका उपद्रव केला तेव्हा इतराचा काय पाड ।।

सूत्रधार : येणेरिती वसंत बोलतां मायावती येइलसें दिसतें यास्तव उद्यानात् विहार करायास जावे म्हणुन प्रद्युम्न वसंतानी उभयता निघता मायावती येते पाहा.

दरू : (राग काबोदि. आदिताल)

येते पाहा मायावति ।। शीतकरनिभानन मातंगराजगमना चातुर्य सदना ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति मायावती येउन सखीस विलोकुन बोलते पहा.

**श्लोक :** नांदि धावरि परी धन सापडेना । सिंधुंत मग्न पण चूल भरूं सकेना ।। नाहो ग्रहांत असतां तसि चोर झाले । तद्‌भोग कार्य विषई वदु काय बोले ।। १ ।।

**दरू :** (राग : आहेरि — ताल झंपताल)

कमलाक्षि काम ते कां मनी रूसला ।। कामिनी उपाय करूं काय याला द्युमणि सारिखा हिमकर तावितो ।। सुमतल्प मृदुल अति सूईपरी टोचीतों ।। १ ।।

**वाक्य :** यास्तव त्यास बोधूनि आणावे.

**सूत्राधर :** यैसे बोलतां सखि उत्तर देते पाहा.

**छंद :** सिकउनी तुझ्या प्राणनायका । निकट आणितें सौख्यदायका ।।
न करि यावरी वेदतो मनी ।। मकरकेतु हा लाभला गणि ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति बोलुन सखी मध्यावर्तीस जातां वसंता समवेत मन्मथ येतो पाहा.

**दरू :** सुंदर दिव्य पुरंदर मणिसम ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रद्युम्न येउन वसंता प्रति बोलतो पाहा.

**वाक्य :** अगाये. वसंता आज काय की श्रुभ चिन्ह दिसतें. बहुतेंक प्राण वल्लभेचा लाभ होईल.

**सूत्रधार :** ऐसे वसंतासी प्रद्युन्म बोलत असतां चित्रांगी येते पाहा.

**दरू :** चित्रांगी येते पाहा.

**सूत्रधार :** येणेरीति चित्रांगी येउन प्रद्युन्मास विलोकुन बोलते पाहा.

**छंद :** गुज मी सांगते स्पष्ट येक्षणी । निज कळत्र मायावती गणी ।।
सिणतसे बहु तूजवीण कीं ।। मनसिजा स्वयोगें करि सुखी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति चित्रांगीनें बर्तमान सांगतां तें वर्तमान ऐकुन काम बाधा न साहतां प्रद्युन्म बोलतो पाहा.

**दरू :** (राग : हुताशनी — ताळ : शापू)

केंवि सोसूं मी सखे ।। या वरि कथिं सखे या वरी कथीं ।।
मायावती विरह आतां ।। पल्लवि ।। तूं धांव सजणि त्वरित संविधान कराया सुदती ।। अनुप. ।। सळिततसें चंद्ररवी सारिखा महा ।। कोकिल रवहि साहवेना कलकंठि हा ।। आणि पळहि युगापरि गमे नलिनाक्षी हा ।। अलिवेणी त्रासी तसें ।। मलय पवन फार पाहा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति प्रद्युन्माचें वाक्य ऐकून चित्रांगी उत्तर देते पाहा.

**छंद :** आणितसें पाहा ते तुझि प्रिया ।। अनुपमान जे कामराजया ।।
अनुदिनीहि ते सद्‌गुणालया ।। शिणतसे तुझि प्राप्ति व्हावया ।।

**सूत्रधार :** येणेरीति चित्रांगीनें बोलुन ते प्राण प्रिया येथें आली म्हणून समज ऐसें निरोपुन पलीकडें जातां मायावती येते पाहा.

दरू : मायावती येते पाहा.

सूत्रधार : येणेरीति मायावती येउन प्रद्युन्मास विलोकुन बोलते पाहा.

दरू : (सामराग : आदिताल)

तव चरण आजी सखया। अवलोकिलिया साटी ।।
जीवि जाहल हरिख तो न वदवे जग जेठि ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति मायावतीचें वाक्य ऐकून प्रद्युन्म बोलतो पाहा.

छंद : दानवाचिया तु ग्रहांतरीं ।। राहूनि कशि मणसि अंतुरि ।।
मि तुझि असें सांग तत्वतां ।। कमल लोचने स्पष्ट तें अतां ।।

सूत्रधार : येणेरीति प्रद्युन्मानें पूसतां मायावती उत्तर देते पाहा.

श्लोक : कीं लोह खाणीतुनि दिव्य सोंतं। काळत्रया माजि जसें न होणें ।।
निंबास किं गोडफळींस येणे। त्व जन्म दैत्याकुलि त्या प्रमाणें ।।

वाक्य : येवं दैत्याचे कुलि तुझा जन्म नव्हे, श्रीकृष्ण तुझा जनक ऐसें नारदानें तूझि कथा सांगितली त्येहा तुझें पुर्वोत्तर कळलें ।।

सूत्रधार : ऐसें मायावतीनें बोलतां तो कोपायमान प्रद्युन्म बोलतो पाहा.

वाक्य : बरें जेणे इतुकें केलें त्या दैत्याचा मस्तक तोडितों.

सूत्रधार : ऐसें आग्रहानें बोलुन युद्धास जातां, तों मायावतीनें चित्रांगी निजसखी पाठवितां तें वर्तमानाउन येते पाहा.

दरू : चित्रांगी येते पाहा चित्र दिव्य वसना ।।

सूत्रधार : येणेरीति चित्रांगी येउन युद्ध वृत्तांत सांगते पाहा.

दरू : (राग : पुन्नागवरालि — आदिताल)

समरिं दैत्य राज तुझा ।। रमणें हाणिजेला बाणी ।।
कमलाक्षि लक्षीता नयनि ।। स्वमनि हरूर्षुनि अमरीं वर्षोनली सुमनी ।।

वाक्य : येणेरीति दैत्यास मारून वीरलक्ष्मीसमेत तुझा वल्लभ आला म्हणून समज.

सूत्रधार : येणेरीति चित्रांगीनें संवदतां प्रद्यन्म येतो पाहा.

दरू : सुंदर दिव्य पुरंदर मणिसम ।।

सूत्रधार : येणेरीति प्रद्युन्म येतां त्याला विलोकुन मायावती बोलते पाहा.

छंद : जनक जननिहि ते तुझी भली ।। मनसीजा मनी कष्टती बळी।
लवकरी अम्ही जाअुंजी चाला ।। न लवितां विलंबासि शामला ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति मायावतीचे वाक्य ऐकून प्रद्युन्म उत्तर देतो पाहा.

वाक्य : देवी, त्वां बोधिलें तें युक्त. अम्ही उभयताहि मिळून भेटीस जाउ ।।

सूत्रधार : यैसें म्हणुन उभयतानि उद्युक्त घडतां तें नेपथ्यांत गलबला होतां ते काय म्हणुन पुसतां सपत्नी समेत रूक्मिणी देवी येते पाहा.

दरू : (राग : सावेरी — ताळ शापू)

येतसे श्री रुक्मिणी ।। शरत्काळ येणांकनिभवदनी संवतीसी ते मीळूनी सत्वर नुतज पद्मपाणी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीति रुक्मिणी देवी येउन मायावती प्रद्युम्नाकडे रोख देउन सत्यभामेस विलोकुन बोलते पाहा.

दरू : (राग : पंतुवराळी — आदिताळ)

पाहतांचि रूप याचें आहे श्रीकृष्णासदृश जाहले विस्मित मानस सांगु मी काय ।। मोहनांगी ऐक राजसे ।।

**रुक्मिणी वाक्य :** माझा पुत्र अस्ता तरि या बरोबरि अस्ता परंतु माझें मानस याचें ठाई इतुके वोढते त्येव्हा हा श्रीकृष्णाचाच पुत्र होईल हें श्रीकृष्ण येथें आल्यानें विचारू यें ।।

**सूत्रधार :** येणेरीति मायावतीनें बोलत असता श्रीकृष्ण येतो पाहा.

**दरू :** अतसी पुष्प संकाश.

**सूत्रधार :** येणेरीति श्रीकृष्ण येउन नारद अद्यापि आला नाही ऐसें चिंतिता तो येतो पाहा.

**दरू :** येतसे मुनिनाथ नारद ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद येऊन रुक्मिणी कृष्णास विलोकून बोलतो पाहा.

**रुक्मिणी (छंद):** पुत्र हा तुझा कृष्णजी पाहा ।। पूर्व संचितें लाभला महा ।।
या वरि सुखी राहसि बरें ।।

**नारद वाक्य :** हें तुंवां मानिजे खरें ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारदाने सांगतां रुक्मिणी देवी प्रद्युमास विलोकून बोलते पाहा.

दरू : (राग : यलकल कांबोदी — आदिताल)

शीणतां तुजविणें पाहा ।। क्षीणता आली या देहा ।।
नंदना रे हा जन्म माझा धन्य झाला ।। मन्मथा देखून तुजला नंदना रे ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती आनंदाने रुक्मिणीदेवी संवदता भक्तवृंद करा रविंद जोडुन बोलतो पाहा.

**श्लोक :** सद्भाविकासि सहसा विपदा न लागो ।। त्यांचे घरी सतत सिंधुसुताहि वागो ।।
अव्दैत बोध सुख त्या हृदईच जागो ।। देवोत्तमा तुज अम्ही इतुकेचि मागो ।।

**सूत्रधार :** येणेरिती भक्तानी प्रर्थितां त्याचे मनोरथ पूर्ण करून श्रीकृष्ण देव सपरिवार नित्यानंद मंदिरास आले पाहा.

**दरू :** नित्यानंद मंदिरासी सत्यानंद सुख राशी ।। सत्यभामेसी कृष्ण हा ।।
सपरिवार आला पाहा ।।

**श्लोक :** प्रतामरामी दृढ भक्ती जाशी ।। प्रतापशीव्हेंद्र गुणैक राशी
तेणेची मायावती नाटकाशी ।। केलें पाहा हो श्रूत दायकाशी ।। १ ।।

**।। इति मायावती नाटकं संपूर्ण ।।**

# ७. प्रभावती परिणय

रामनवमीच्या उत्सवासाठी प्रयोग. कृष्णभेरीसाठी इंद्र कृष्णस्तुती. कृष्णपृच्छा. वज्रनाभ राक्षसाचा वृत्तांत. हंसस्मरण इंद्राकडून

प्रासयुक्त रचना.—'तरीच म्हणिजे हरी मज सरी न सुरि किन्नरी।

हंस—मानससरसींमाजि विहरतो, मानुषवेषें मानस हरतो।

वाक्य.—वारा शिरत नाही, तेथे चाराचा (हेराचा) प्रवेश कसा होईल ? वज्रनाभाला ब्रह्मदेवाचा वर असल्यामुळे अभेद्य नगरात तो राहातो.

भद्रनटाच्या वेषाने प्रवेश. प्रद्युम्न भद्रनट भेट. हंसकन्या शुचीमुखीला प्रभावतीचे मन वळवण्यासाठी पाठवितात. ती प्रभावतीला प्रद्युम्नाविषयी उत्सुकता निर्माण करते. वज्रनाभाला भद्रभटाचे नटकौशल्य सांगते. प्रद्युम्न सांब, गद इत्यादी यादवांसह नटवर्ग बनून येतो. रंभा-नलकुबेराचे शृंगार रसप्रधात नाटक करतो.

रंभा संगीतातील प्राविण्य—'वीणा वाजविल्यानी म्या, ते पाषाण सारे पाझरति', रावणाचा अतिप्रसंग आकाशवाणी. रोमपाद भूपाळ-दुष्काळावर उपाय. ऋष्यश्रृंगाचे निष्पाप वर्तन. स्त्रीदेहाचे वर्णन (नर्मविनोद) विभांडक मुनीने पुत्राची पिशाच्चग्रस्त स्थिती. पित्याला न सांगता वेश्यांबरोबर रोमपाद राजाकडे जातो तो आपली कन्या शांता हिच्याशी विवाह करतो. नाटक संपते. वज्रनाभ भद्रनटाचे कौतुक करतो. शुचीमुखी उद्यानात प्रभावतीची भेट करवते. 'कुरवंडी मी सारीन तनची, चरणांबुजावरी' गांधर्वविवाह. हंसाने कृष्णाचा निरोप—सैन्यासह मदतीला येतो. घोर युद्ध वज्रनाभ, सुनाभ इ. वध. कृष्ण येऊन सर्वांना सुखी केले.



# प्रभावती परिणय

## "शुभमस्तु"

जो हा आश्रितकल्पवृक्षदमितामोहाप्रतिध्वा दैत्या ।। वूहापोहप्रमंर्थ केवळ चतुर्व्यूहात्मिका श्रीपती । माहा चे नि बळी प्रभावति समुव्दाहाशी कथा सूचि । माहात्म्यं बुधितो समस्तं । पुरवो ईद्रा सदा आमुची ।।
पुखो ईहा सदा आमुची

**सूत्रधार :** (नाटकार्थसंग्रह श्लोक सांगितल्यानंतर गणेश प्रत्यक्ष येतो. समस्त पुरं वो) येथें प्रताप रामचंद्र महोत्सव विलोकनोत्सुक अखंडित पांडित्य मंडित पंडित मंडळी आहे ।। तरी प्रभावति परिणयाख्य मुख्य नाटक नाचवून अंतःकरण संतुष्ट कराया इच्छितों.
कोण या दिव्य ग्रंथाचा कर्ता.
प्रतापराम आणकी. ह्याचा प्रभाव ऐक.

**श्लोक :** विश्वास जो विश्वास ज्या देशिक विप्र पायीं । केवळ मान्य पाही ।
विश्वंभराध्यात — रघूत्तमाशी ।।
विश्वंभरें माजि न जोड ज्यासी ।।

**सूत्रधार :** परंतु पारिपार्श्वका, तूला एक विचारितो. व्यग्रचित्त कां आहेस ?

**पा. पा. :** अरे. सूत्रधारा, अरिष्ट्वर्गात लोभशत्रू सोडीत नाहीं. यास मच्चित्त चंचळ आहे. अरे पारिपार्श्वका यापरीस इंद्रास वज्रनाभ म्हणून एक बाह्य शत्रू लाभला होता. त्याने भगवंतास जातां तत्काळ तो शत्रू शम पावला. तूहि त्या कृष्णस्वामीस शरण रिघसी तरी तत्क्षणीं अभिव्यक्त होईल. संतोष व्दारा तुझ्या लोभ शत्रूस दूर करून निश्चिंत ठेवीला. ऐसे सं वदतां.

**श्लोक :** घ्राणीं तो तुळसी सुवास सिरला हाणि श्रमा जो करी ।।
ज्ञानीं षट्पद गुंजतां रवहिं तो कानीं शिरे लौकरी ।।
आणी श्री तनुचि भली झळकतां भा निस्तुळा सांवळी ।।
तो नित्योत्सव पातला हरि असे मानी सदस्यावळी ।।

दरू : (सुरटी. सा)

आनंदसागर आला ।। कृष्ण पहा ।। श्रीनंदनंदन हा ।। जो नंद सांवुज शंखचक्रधर सानंदकायुध अनुज धीरमहा ।। सामरस्यें जेथे संत विश्रामती ।। सामगानप्रिय सतत महामती ।। सामजेंद्र मोक्षदायक यदुपती ।। सामर मुनि ज्या अंतरीं चिंतिती ।। १ ।।
दीर्घकारुह सहसमकर्णांत दीर्घकारुण्या .... दुर्वल । भवश्रम भक्ताचा वारी दृष्टिनेची दुर्घट भव श्रम भक्तांचा वारी ।।
अनर्घ गुणाची मूर्तिच जो साची ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति श्रीकृष्ण येऊन उद्धवास अवलोकून बोलतो.

श्लोक : खलांच्या संभारा कमुनिगत भारा करुं मही।
अधर्माचा, धारा बुडवु बहुधा रात्रिदिसही। स्वभक्ति प्राकारा रचुनि
सुखकारा रतिवळें।। नतांच्या उद्धारास्तव ही अवतारासी धरिले।। छं।।
अधम दैत्य जे बाधिते जगा।। वधुनि सांडिले हे असंख्य गा।
विधिवरास्वयें उग्र जो महा। विदळिजे आता वज्रनाभ हा।।

वचन : जो महेंद्राचा मुख्य दावेदार त्याला शासन करायाकारणे पाकशासनही माझ्या प्रार्थनेस येथें येणार म्हणून कलहप्रियाने सांगितले. ऐसें श्रीकृष्ण संवादता.

(श्लोक): तो विद्युत्संतति वांकली जणू तशी दिव्यप्रभा फांकली।।
लोकांची दिठि झाकलि सयदशासर्वां मनीं ठाकली।।
शालिक्य ध्वनि मातली धृतिपुटें ऐकावया रातली।।
जीचा सारथी घातली दिनगणी ते देवता पातली।।

दरू : (आनंद भरवी. अटताल)

दुरंदर देवामाजी पुरंदर मर्द गाजी।। अरिंदम येत असे हा जी।।
आजी पाहा जी भोंवत्या निर्जरराजी सेवित होउनि राजी।।
धावे पुढें उच्चश्रवा जी।। कोत्तल वाजी जी।। २।।
थोर थोर देवप्रीती मोरकुंचे ते ढाळिती।।
चारुचामरें ही वीजिति चारण हातीं।। ३।।

सूत्रधार : येणेरीति देवेंद्र येऊन श्रीकृष्णास विलोकून बोलतो

(श्लोक): गोष्ठीभीतरी गोपलें कुरुपणें हे क्रीडलें चापलें।। १ (त)
न श्रीमानिसिं धोपलें व्रजवधूश्चिष्टें परि रापलें।।
जेथें तेजहि लोपलें द्युमणिचे भक्तासि आटोपलें।।
तें हें दैवत आपलें निरखितों सर्व व्रजे व्यापलें।।

दरू : आसावेरी।।

शा : देखिलें तें। श्रीपद दिव्य तुझे देवा वासुदेवा।।
मुनि देखील मानसिं ज्या रेखितें ज्यां।। प्रति देव देवा।। १।।
रांगलें दुडु दुडु रम्य नंदाचे अंगणि जें।।
पद्मा भाग देशि धरि भक्तीभावें।। बहु चांग बोजें।। २।।
योगिं बलीनें निगति पुजिति योगिराया।।
जें वागलें धेनु मार्गे।। हर्ती भवरोग माया।। ३।।

सूत्रधार : येणेरीति देवेंद्रानें स्तोत्र करितां पुंडरीकनेत्र स्वागत प्रश्नपूर्वक आगमन कार्य विचारतो।।

दरू : (उखाची. आदिताळ)

वासवा आलाशी येथें कासयासी। पाकशासना बोलिजे हें तूं शीघ्र यासीं।। १।।

साध्य हो असाध्य काज सांग दक्षा । देतो साधुनि यांस द्या देवा सहस्त्राक्षा ।। २ ।।
आजि बा धन्य दिवस वासवा ।। आलासि येथे कासयासी ।।
पाकशासना बोलिजे हैं ।। तूं शीघ्र यासी ।।
साध्य हें असाध्य काज सांग दक्षा ।। देतो ।।
साधुनिया सध्या देवा सहस्त्राक्षा ।।

(श्लोक): सरीनृप मुखांतरी अजि सिरेन मि लौकरी ।।
करीन लघु चाकरी पदीं फिरेन दूतापरी ।।
धरीन शिरसा गिरी भय हरीन कैसें तहीं ।।
तरीच म्हणजे हरी मज सरीं नरीं किन्नरीं ।।

सूत्रधार : येणेरीति श्रीकृष्णाचे वाक्य ऐकून विनयपूर्वक देवेंद्र बोलतो.

श्लोक : देव देव करुणापरिपूर्णवीक्षा ।।
भे देव देव परिपालन बद्ध दीक्षा ।।
श्री देवकी सुकृत पुंज सरोजनाथा ।।
देव देव पूर्वील वधी पुरलेघनाभा ।।
त्याहिमध्यें येक मोठे जोरावर दत्य आहेत तेच सांगतो.

श्लोक : पापिष्ठा ने वज्रनाभे पठाणें ।।
ध्यावें माझें जें असें मुख्य ठाणें ।।
ऐसी चित्तीं योजलें तें हठानें ।।
पारी त्याची दुर्निवारें उठाणें ।।

वचन : अमोध वज्रायुध असतां काय चिंता म्हणसी तरी

(श्लोक): मारील सर्व विष तें जय काळकूट ।।
जाळीलही तुषशीचि प्रलयाग्निशूला ।
बांधील नै हिमगिरिसहि शत्यगाभा ।।
मर्दील तै सदृढ वज्रहीं वज्रनाभा ।।

सूत्रधार : देवेंद्र बोलतां कृष्ण प्रत्युत्तर देतो.

(दरू) : दरू : (ऊसावेरी. उसा)

अपाप्य कृष्ण वज्रनाभा वध हा वाटे तसा । लाटासुर्वेन्याचा लंकापुरीची या । हाटीत गेलीया ह्या लभ्या ज्या परीवाटा ।। निमा घाल चालिल्या स्वर्गाची ।। चालबाळी जेसें वेधीजे त्यावरी ।। १ ।।
स्वदेशे नेशीं जनकाच्या मी सुरवाण लीलि यात्रीशी का म्हणुजे जैसे देवराया ।।
किं सुखरूपचि संसार असलिया शाश्वत मोक्षचि भावूं ये जेविया ।। २ ।।

वचन : याप्रकारे वज्रनाभाचे नगरीं प्रवेश घडल्याने त्याला मारूं येणेचि कठीण । परंतु जासुदाच्या मुखांतरें वज्रनाभाचा समाचार घडिघडि आल्याने त्याच्या वधाचा विचार केला जाईल. ऐसे पद्मनाभानें बोलतांच देवेंद्राने हंसाचे स्मरण करिता ते येताहेत पाहा.

दरू : दरू: (कल्याणी)

आम्हां युक्त आले हंस कसे पांडुर प्रालेयाचळसे ॥
सारासार विवेचक बुध जसे ॥ नीरक्षीरा निवडक सज्जसे ॥ १ ॥
मानससरसींमाजि विहरतो । मानुषवेषें मानस हरतो ॥

सूत्रधार : येणेरीति राजहंसागण येऊन सुरराजयाप्रति विज्ञापना करितो ॥

दरू : मोहनं ॥

नेणजे विपरित कासयासि येथे वासवा ॥
निजदासवृंद आणिला तुंवा ॥ १ ॥
कीजे आतां आज्ञाशासना यदुराज मते पाकशासना ॥ २ ॥
दुर्घट कार्यहि ते स्वयें ॥ साधु दुश्चवचना तुझीये दये ॥ ३ ॥

सूत्रधार : येणेरीति हंसाचे वाक्य ऐकून महेंद्र बोलतो.

दरू : (उयदुकुलकांबोदि. आशा)

काय वानिशी अल्प स्तब्रुध हंस हे खगकुलोत्तंस वंशज भले अमुचे ॥
वंशजही बरे ॥ कंसारिमते जो कार्यांश सांगेन निःसंशय तो करारे ॥
तुम्हि सारे ॥

अ० : वानजसा सुचिमानस तसे अपले ॥ वानुनि काय वाचे ॥
जाण मोठा भगवान वाणीश जो ॥ यानही तुम्ही त्याचे ॥ १ ॥
उपकृति करू सर्वा उपज थोरांचा ॥ निपुणींस हे ठावें ॥
रिपु वज्रनाभाचे खपुरवृत्त अम्हां अपरूप ते बोलावें चलावें ॥ २ ॥
विचारें जशि काम उर्मि गिळावी ॥ विचारें तशि शत्ररीति कळावी ॥
विचारानें तें नव्हे कार्य देखा ॥ विचारांगें होयील जैं हें न ऐका ॥ ३ ॥

वचन : तुम्ही म्हणाला की जासुदाच्या मुखें वज्रनाभाचें वर्तमान आणू नये काय? तरी ब्रम्हदेवाच्या वरदानें करून त्या दैत्याच्या निरोपावेगळें वारा जेथे शिरत नाहीं, तेथें चाराचा प्रवेश कैसा होईल?

सूत्रधार : ऐसें देवेंद्र वाक्य ऐकून उभयतां हरी आज्ञा प्रमाण म्हणून राजहंस निघाल्यानंतर वसुदेवाचा याग संपताच वज्रनाभ वधाचा यत्न केला जाईल* √अग्रकार्यं घटनीं प्रद्युम्नेच समर्थ म्हणून चिंतितां तो येतो.

सूत्रधार : येणेरीति भ्रद्रनटाचें वाक्य ऐकून श्रीकृष्ण देवाने प्रद्युम्नाचें मुखावलोकन करून भटूनटांना गौरव देऊन हंसमुखें प्रद्युम्नाचें वर्तमान प्रभावतीस कल्याणें कार्यसिद्धी होईल ऐसे निर्धारून परिवारासमेत नित्यानंदमंदिरी प्रवेशिल्यानंतर शुचिमुखी हंसकन्या येते पाहा.

दरू : दरू: (घंटा रव)

वासवमणिसम तो रतिवल्लभ तोयजलोचन थोर तुजुक धरुनि येतो ॥
तो रसिकोत्तम थोर कदतोकत वोरसैचि करुनि ॥

√*आतां स्वस्वस्थानास जावें म्हणून दासदास वासुदेवानें निरोप देऊन.

निस्तुळ लेवुनि दुस्तशीच् वस्त भावसारी ।। तो ।।
मस्त मिशावरी हस्तक फिरवित सुस्तमदें भारी ।। २ ।।
अवगत ज्याला विविधा परिच्या अवघ्या माया ही ।।
श्री भुवनेश्वर भुवनज शर जो भुवन दृश्य पाहिं ।।

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्न येवून आपली प्रतिष्ठा वर्निता.

**श्लोक :** (शिखरिणी) धनू तें पुष्पाचें भ्रमर मय मौर्वी मृदु निकीं ।।
जडात्माशीतांशु सचिव असणें पंच विशिखीं ।।
वधूचा अधर प्रकट मलयाचांच रथही ।।
तहि जिकी सर्वा मजसम न योद्धा जनि तिहिं ।।

**दरू :** (कांबोदि) हा वीर दुजा नाहिं वीर ।।
तिहिं लोकीं ढुंढनि पाहतां मजतुज्या जा जा ।। १ ।।
बलिया शंभर झुळी मिळविला तो धुळी ।।
मायाचा जेथें धारा ।। मायावती दारा ।।

**सूत्रधार :** येणेरीति प्रद्युम्नाचे स्वदेविक्रम वटून त्रिविक्रम जो श्रीकृष्णचरणारविंद वंदोन काय आज्ञा म्हणून पुसतां भगवंत वुत्तर देतो पाहा.

**दरू :** तोडि ।।

परिस वचन नंदना आतां ।। सर्व वीरागण्य ताता ।।
दितिज वज्रनाथ नामा आहे ।।
अतिशयित विक्रमी कामा सत्वरि त्याचि ।।
या कामा न जे ।। सात्वतवंशललामा वातासहि जेथ पाही ।।
दैत्यनाथाज्ञेवांचुनि काही ।। जातां नये ऐश्याठायीं ।।
शत्रुघाता लौकरी जायी ।। १ ।।
शशिरविकर लोंढे जेथें चक्राचकोरा ।।
वधुविरह तृषेचा घोर थोरी कुमारा ।।
सरक घडत नाहीं ज्यासाठी मारुताशीं ।।
उरग नगरी त्याचे सर्प नित्योपवासी ।।

**वचन :** तूं म्हणशील वज्रनाभाच्या निरोप वीणें सूर्यचंद्राचे किरणहि जेथे संचरत नाहींत, वाऱ्यासही प्रवेश नाहीं त्या नगरामध्यें कैसा रीघ करावा. तरी सांगतो ऐक. भद्रनटाचा वेष धरून तेथे सुखरूप जाऊन ये.

**सूत्रधार :** कृष्णवाक्य ऐकून भद्रनटास दृष्टीने देखिल्याचे सोंग घेणें कठीण ऐसा मन्मथाने जाप(ब) देतां श्रीहरीनें स्मरण करितां भद्रनट येतो.

**दरू :** भद्राकार जाबल भद्रानुज महाबळ ।।
भद्राख्य नट त्या समेटू येतों सभेस ।। १ ।।
संगीत भरतकळा भगीत कुशल भला अंगी शैलूश फार सांब धरणार भला ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती भद्रनट येवून सम्यास पाहून बोलतो.

श्लोक : (आर्या) आनक दुंदुभी यागीं आननपद्मसुनीशि स्यां स्तविता ।।
आन जना दुर्लभ जे ।। त्यांनी दिधल्यें तशे वर त्वरिता ।।
त्या महिष प्रसादाचा प्रकार तोडसा (थोडासा) सांगतो.

दरू : भैरवी ।।

वेंबे न अंबरीं वेगें पक्षेवीण रीघे न पाताळामाथा घडिभितरीं आघवीया तीर्थी आंघोळी जीं ।। सारिन हाजी जागी जगेमादि जो जो जन त्याची सांगें धरि न हि स्मरी ।। रोग जराशीण भाग न येकही योगशाली ऐसा भारी ।। तानमान केल्या गाने गंधर्वहि मानतलि करीति कीं मानडता नाटयज्ञानशिधू भरत ।। म्लानमुखी होय तो कीं ।।

दरू : आणिक माझा प्रभाव ऐका ।।
म्या ज्या ज्याला आपल्या दृष्टीनें पाहून माजसारखे सर्व सांगे धरायाचे सामर्थ्य येतो म्हणू वर देतां तो हि मजतुल्य प्रभाव होतो ।।

सूत्रधार : येणेरीती भद्रनटाचे वाक्य ऐकून श्रीकृष्ण देवाने प्रद्युम्नाचे मुखावलोकन करून भद्रनटांना गौरव देऊन हंसमुखें प्रद्युम्नाचें वर्तमान प्रभावती सकल्याणें कार्यसिद्धी होईल ऐसे निर्धारून परिवारा समेत नित्यानंदमंदिरी प्रवेशिल्या नंतर शुचिमुखी हंसकन्या येते पाहा.

दरू : आली हे शुचिमुखी हंसमुखी राजमराळकुमारी मा जे ।। रजतवर्ण सुकुमारी ।।
माज बांधुनि दृढतर निर्जर ।। काजे कराया तत्परता करी ।। ११ ।।

सूत्रधार : येणेरीती शुचीमुखी येऊन आपआपणात बोलते.

वचन : आपले वडील जे हंस त्यांनी ऐसी आज्ञा केली मौजे तें खासबागांत प्रभावती आल्याने तिचे अंतःकरण प्रद्युम्नासक्त जेणे घडेल तैसे करावें. तरी या पद्मिनीचे कांठीं पद्मिनी शिरोमणी पद्मेची सून होणार वज्रनामकन्या आल्यानें नेत्रपद्में पाहून संविधान करूं.

सूत्रधार : ऐसें चिंतितां प्रभावती येते पहा.

दरू : (जुजावंती ।। आदिताळ)

तिनें दुसरी हे हरिणी ।। येते रूपवती ।। है प्रभावती ।।
रतिहुनियां सुरेख ।। अतिश तें देख ।। पृथ्वीपाताळ नाक ।।
प्रथित प्रमदांचे नाक ।। वज्रकंकणगणी ।।
उजृंभीकरमणी वज्रमणि नीलवेणी वज्रनाभनंदिनी ।। २ ।।

श्लोक : प्रभावतीची निरखोनी चाली ।
सलज हंसी पदेतीन घाली ।।
मोडी गळ्याची परिसोनि कानी ।।
तें मानिति हारि मनींपिकानी ।। असो ।।
येणेरीती अभिमुखी येणार वज्रनाभकन्येस देखून शुचिमुखी स्वस्थळीं बोलते ।

श्लोक : कामातीत मनुष्य देह मुनि ते कामार्तता पावुनि ।
रामा देखुनि बोलिल्ये रतुं येथें रामास्वयें होवुनि ।।
वामाक्षीसह ये विलोकुनि खगी मी मारमुग्धा जयी ।।
सीमा सुंदरतेस या जगि नसे हें मानिते निश्चयीं ।।

सूत्रधार : ऐशी योजना करून दैत्यकन्येसमीप जातां ते हंसीप्रती बोलिते ।। छं ।।

श्लोक : कवण वो खगी तूं गुणालया ।। अवनि मंडलीं पातलीस या ।।
धवळतेजशी संतकीर्ति की ।। तव तनुतशी, भासते निकी ।।

सूत्रधार : येणेरीति प्रभावती वाक्य ऐकून शुचिमुखी जाब देते. ।। छं ।।
गरुड तो जसा अश्व विष्णूचा ।।
रथवृषेंद्रही आणि शंभूचा ।।
सरसिजासना स्यंधन स्वये ।।
सुरुचिलें विमलपूर्वजात हें ।।

श्लोक : जैमानसेचि रचिलें सरधातयानें ।।
त्या मानिसीं रहाणें विधिलें तयानें ।।
तत्कन्यका समज मी सखिये विलाशी ।।
आल्यें ययावन तटाक स्वस्थळाशी ।।

सूत्रधार : येणेरीती स्ववृत्तांत कथनपूर्वक अत्यंत चांगल्या कहाण्या कथण्यासाठी प्रभावतीचे अंतःकरण वशवत्त होतांच येकांती स्वकार्यसाधक शुचिमुखी येक गोष्टी बोळते.

श्लोक : जैसे तें लवणें क्षणैक विजुचें कीपुंश्चली साजणी
(कीं तार्ण) कर्ताना ज्वलनें निमेष जळणें कं मीपणें मांजणे ।।
कीं संतींवरि कोपणें ।। जळगतें कि बुखुदें थोंपणें ।।
किंवा पत्यल जीवनें चल जसीं तैसी वधू यौवनें ।।

दरू : मोहन ।। शापु ।।
शिवाशिवा ढकलीशी कां वृथा वय ।।
विकच पद्‌मपत्र विस्तीर्ण लोचने ।।
न करि हयगयी आतां कवित्ये बुद्धिसी ।। अनु ।।
यौवन हें चारुहसिनी चल ।। केवळ कीं मत्तकाशिनी ।।
जीवनबुद्धसें जनीं ।। नये ।। जिवलगे फिरुनि तें साजणी ।। १ ।।
कामाभोगासम लाभ हा ।। नसे ।। कामिनी ।। देहीं तूं पहा ।।
या महीं यजुनि मुनी महास्वर्णधामीं भोगिति अहा ।।
नारी रम्य गुणावहे ।। गडिणे तूं माझी म्हणूनि ।।
करितें घडिघडि स्नेहें विनवणी ।। दृढता(त)जविज ।।
येक योजुनि वारी ।। झडकरि वर तो युक्त सर्व गुणीं ।। ३ ।।

श्लोक : मानेल जो वर गुणोत्तर अंतराशी ।।
कन्ये वरी न लगतां क्षण त्या वरासी ।।

ऐसें वदोनि तव तात सुचित आहे ।।
तूं ही उगीच असशी अति चोज पांहे ।।

वचन : तूं म्हणशील देवासुर कुळामध्यें कोणी मनाजोगा वर नाही. त्याचे उत्तर ऐक.

श्लोक : रूपैश्वर्य गुणेंसमान तुझिया वंशाचि ऐसे सये ।।
येऊनि नवरे तिरस्कृत तुवां लाजोनि गेले स्वयें ।।
येथे येईल कासया तनय तो श्रीरुक्मिणीचा भला ।।
लोकातीत गुणी जगत्रयीं अतुल्यत्वेंचि जो शोभला ।। १ ।।
देवांत देव दनुजीं दनुज प्रतापी ।।
जो मानवी मनुजपूर्ण कला कलापीं ।।
देखूनि ज्या सवती त्या युवती प्रकामें ।।
होशील धन्य प्रणिले तरि त्याच कामें ।।

दरू : (सोरटी ।। आदिताळ)

तोचि तुजला तोचि तुजला वूचित नवरा ।।
तोचि तुजला हो ।। जो चराचरीं एक सुंदर लोचनामृत ललनांचे वो ।।
पूर्णचंद्रही परिपूर्णहिन पर्वेचि सरी ।।
वर्णिति यास वरवर्णिनि जो यापरी ।।
कर्णांत दीर्घ विस्तीर्ण नेत्र सुंदरी ।।
अर्णव ज्या पुत्र सावर्ण्य कृष्णाचे धरी ।। १ ।।
सर्व सौंदर्य सार जगतींचे काढुनियां सर्वेश रचली ज्याची पूर्वी सुरुचिर काया ।।
पार्वतीवर लब्ध प्रार्थिती ज्यातें सिया ।।
उर्वशी प्रभृति वारि गर्व सुंदराचिया ।। २ ।।
हेमाद्रिसम धिर जो महोदधि गंभीर श्री मार्तन्डसा वीर ।।
धामाचि भांडार भूमिसाचि क्षमासार भौमवंशीक हीर । (धृ)
तामशि जो शंबर शामेत प्राणहर ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती शुचिमुखीचे वाक्य ऐकून प्रभावती उत्तर देते.

दरू : (नीलांबरी ।। अटताळ)

प्रभावती : ऐका हे प्राण परिसिले शुचिमुखी मुनिमुखें की, हे ।
हरूं भूमि भारा सखी हरि आला नर लोकीं ।। ध्रु ।।

आ. : ज्वलित चक्रादि घायी खलदैत्यसुरापायीं ।।
तिलशा खंडिल्ये मायी ।। जलजलोचने बाई ।। १ ।।
असुराचा बलोद्धार ।। अत्यंत दावेदार,
सुजन जे निराधार ।। सजणी त्यांसी आधार ।। २ ।।

श्लोक : माहेराहुनि भाग्य फार असणें गेहांत कांताचिया ।।
माये वर्तत मानसीं निशिदिनीं हा हेत कन्येचिया ।।
आहे भर्तुकुळीं तसेंचि जरी मी लाहे न त्या मन्मथा ।।
साहेना उपमा दुजी तरि मला कीं नव्हे अन्यथा ।।

दरू : (राग—हुशानी)

**प्रभावती :** सांगधांग सांग सांग मजलागीं उपाय तो लागावेगें सुदती ।। शुचिमुखी ।।
आगमन घडेल जैसें । ह्या घडीं पतीचें की ।। प्रेमें ।।
लागेनें तव पती मागती ।। वृष्णकुलोद्भव केसरी ।। जो ।।
कृष्ण तनय मनोहारी ।। त्याची तृष्णा या, लागे अंतरीं ।
सत्य तूं करणें शुद्धीनें वदते ही वैखरी ।।
त्यासीं करशील योग कीं ।। तरि दाशी होईन तुझी सखी ।।
तूं होसि गे ।। कुशल घटिनी कीं ।। गति ।।
दुसरी नसे मज तुजविणें आणखी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरीती प्रभावती वाक्य आकर्णून नव्हें आपल्याला लगामीं लागली, ऐसें निर्धारून तीचें सांत्वन करून हंसी बोलते.

**हंसीः :** सखे जन्हि एथें प्रदूम्नागमन प्रसक्ती नीहि तहि जैसें कमलेनें तप तपतां क्षीराब्धि सोडून भगवंतानें कृष्ण मंगळ क्षेत्रास येऊन लक्ष्मीचें पाणिग्रहण केले त्या प्रकारेंच मन्मथहि या नगरींच तुला वरील त्या कार्य घटनीं मी दक्ष आहे तेंच सांगतें ऐक.

दरू : (कल्याणी)

देखश्मी नयनीं भेटेल तुजला नाटकीं कांता ।।
हाटकांगी भेटीं हरिसुत चाळुनि तो तुज ।।
भेटी आत्मा तुझा भाव दिधलिया त्याला ।। २ ।।

**आ. :** स्वार होईन ।। चारुहसिनी ।। व्दारवतीशीं ।।
फार तुझे श्रीगुण स्वारस्य सांगेन ।। मी रसिका श्रीकुमारपतिसीं ।।
कामित काया ।। कामिनीजनीं । कोमल अति ।।
कामेंचि तो स्वयें कामें पुरवल मनीचें तुझें भामिनी सुदती ।।

**वचन :** परंतु या गोष्टीस साधक तुजकडून येक हवे. तें काय म्हणसील तरी शुचिमुखी हंसी कहाणी सांगायास मोठी शहाणी. म्हणून वज्रनाभास सांगून त्याचें संदर्शन करविल्या श्रीकृष्णकुमार येथें आला ऐसें जाण.

**सूत्रधार :** याप्रकारें संवादतां तो यदृच्छेनें वज्रनाभ येतो पहा.

दरू : नाटकुरंजी ।। आ ।।

बाण दानव कुलीशनाभ येतो पहा ।। कलुष 'कंद तो हा ।।
ललितहेममणीभूषण वृंदी कलित अतिशये ज्वलिततनु महा ।। आ ।।
समरधीर जो त्रिभुवनीं ।। केवळ ।। समनव्हेति सुरअसुर बृहव्दळ ।।
अमरपतिंही ज्या कांपे चळचळ ।। अमित विक्रमाचा कनकाचळ ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती वज्रनाभ येतांच प्रभावती हंसीप्रती बोलिली कीं सखे ज्याच्या दर्शनाचा उत्कटानुराग होता, तो दैत्यराज स्वतः एव येथे आला. हा मोठा शकुन मानावा.

सूत्रधार : ऐसे संवादून वज्रनाभाच्या चरणारविंदवंदन हे शुचिमुखी कथोपकथा कथनी मोठी कुशल ऐसे विज्ञापन करितां दानवेंद्र बोलतो पहा.

श्लोक : सकंटक बहिस्थळीं फणस गोड अभ्यंतरीं ।।
मनोज्ञ हरी वारुणि वरिवरि कडू अंतरी ।।
समान वरि भीतरी मधुर शर्करा खंडसा ।।
शुचिमुखी तुझा गमत गोमटा हासरा ।।

सुत्रधार : ऐसें तिला सरावून वज्रनाभ पुन्हा बोलतो. ।। छं ।।
भुवनमंडळीं हिंडशी सती ।। नवल तेथ जें पाहिलें आधी ।।
कवण देखिलें ऐकिलें न कीं श्रवणी सांग तें गोप्य नीटकीं ।।

सूत्रधार : याप्रमाणे वज्रनाभाने पुसतां हंसी प्रत्युत्तर देते पहा.

सी : (श्लोक) है ईश्वरी सृष्टि विचित्रवाणी ।। येथें न आश्चर्यगतिस वाणीं ।।
नसे शिखी व्दीप कीं नारिकेळीं ।। अपायु कोठें नरपंक्ति केली ।।

श्लोक : पाहिली शांडिली नामा ।। साध्वी दानवसत्तमा ।।
आश्चर्य कर्म करी तों ।। मरुपार्श्वीमनोरमा ।।

वचन : आहे अवघे एक देश, याहूनि मोठ्या गमतीचा एक पुरुष पाहिला तेंचि ऐक.

दरू : (अडाणा ।। आदिताळ)

सुदति ना देखिला भद्रनट हा एक म्या पहा ।।
चोख कामरूपी जो शेखर चतुरीं महा ।।
भद्राश्वकेतुमाला भव्य व्दिपीं बहु रीती ।।
भद्रगुणीं जो घांडोळी पात्यांन लगता पांती ।। १ ।।
प्रगटूनि रागरंग विकट गातां तो धिंग ।।
सकळही देवसंघ ।। स्वहृदयीं होति दंग ।। २ ।।
देवगंधर्वगाता ।। विविध नाट्यविधानेस ।।
ठाउकें त्यालागून ।। आवघें सत्य जाण ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती शुचिमुखीचे वाक्य ऐकून वज्रनाभ उत्तर देतो

दरू : (नवळाही ।। आदिताळ)

परिशिलें हे श्रवणीं पहिलेंचि पक्षिणी ।।
सरस भद्रनटाचें वर गुण हे कल्याणी ।।
चारण सर्वसिद्ध सर्वही चारुमती आले असतां ।।
फार फार त्या नटाची तारिफ ती केली स्वतां ।।
लोकोत्तर प्रवीणा कीं ।। देखीन मी केव्हां त्यासी ।।
उत्कट नाचे मानसीं ।। उत्कंठा हे राजहंसी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती वज्रनाभाचे वाक्य ऐकून आनंदभरित शुचिमुखी प्रत्युत्तर देते पहा.

**वचन** : राया तुला जशी गुणवृत्तांचे ठायीं प्रीति आहे त्याप्रमाणेची भद्रनटासही गुणग्राही लोक जे त्यांच्या सहवासाची अपेक्षा आहे. तेची ऐक.

**श्लोक** : गुणग्राही तो ही सुगुणजन गेहीं सति जो।
(शिख) तेथें येतो जातो आपण न होऊन होतो फणिभुजा ।।
खरी मानी वाणी निरखिसीहि त्या नटनिपुणा ।।
उद्यां परवा सर्वाधिकनट सुपर्वणिरम ।।

**वचन** : परंतु तो केवळ मानाचा भुकेला अर्थाकांक्षी नव्हे. आदर केल्यानें भद्रनट निरंतर येथेचि राहील ।।

**सूत्रधार** : हे शुचिमुखीचे वाक्य ऐकून वज्रनाभानें तैसें घडेल म्हणून अंत:पुरी प्रवेशीता शुचिमुखीने प्रभावतीस पाहून बोलते.

**शुचिमुखी: वचन** सखे प्रभावती, तुझा मनोरथ सिद्धी झाली मी व्दारकेस जाऊन मध्यस्थी करून तुझ्या प्राणवल्लभास आणून सोडतें किंबहुना तो आलाच म्हणून समजा.

**सूत्रधार** : ऐसे ती समाधान करून हंसीनें श्रीकृष्ण राजधानीस स्वार होता वज्रनाभ-कन्यानें स्मराचें स्मरण करीत अंत:पुरी प्रवेशितां स्मर्तृगामी तो येतो पहा.

**दरू** : (तोडी आदिताल)

आला पहा आनंदसिंधु आला कंदर्पवीर ।। यादवहीर ।।
तो लाघवी नटवेषाला धरूनी गंभीर ।। आ ।।
शैलूष गण ।। बरोबरी नाट्यशैली ठाउकी ज्यास बरी ।।
पृथु शैलस्थनीसवें नारी ।। अन्य ।। सामग्री हे सिद्ध सर्व परोपरी ।। १ ।।

**सूत्राधर** : याप्रमाणे नायिका प्रद्युम्न जाम्बवतीचा लेंक जो सांब तोची विकट कवी, कृष्णाचा भाऊ गद तोचि पारिपार्श्वक इतर यादवस्त्रीवेषादि सकळ वेष धरणार ऐशा विश्वासकळ ससासंताहा सकट नाटकोचित वाद्यें वाजवीत शाखानगरांतर्गत सभेंत येऊन आपआपणांत बोलतो पहा.

**दरू** : यदुकुल कांबोदि ।। (सुदती कावेटी) अगदीं येथील की वज्रनाभ स्थिती निगदितां तेरादिहंसी ।। उपरि ।। जगदीश्वरें मज यापरि शासलें उघड सांगू प्रीती तैशी सुगड गद सांबादि सवंगडे घेउनि सुरुचिरांग स्त्रीगणेंसी ।। दैत्य नगरींच्या भद्रनटवेष धरूनि बरा न करून क्षण विलंबासी ।। प्राचेतसें सृष्ट रामायणी कथा प्राचीन जें दिव्य बरवी तेथें ।। तोचि संदर्भ नाटकरूप रचुनियां नाचवीं यादवाकरवीं ।। लोचनें देखतां भुलतील दनुजगण वेंचि जें सामुर्थ तेंवी ।। विषय ।। नीच तें जालियां ठोकुनी सुरकार्य नीट साधीन नसुनि गोवी ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीती संवादैन शुचिमुखी हंसीनें ऐसें सांगितलें होते तूही भद्रनटाचे सोंग धरून शाखानगरीं प्रवेश करितांच वज्रनाभाचे प्रधान येऊन नाट्यादि विद्या पाहून आदर करील तरी तो आद्यापि कां आला नाहीं म्हणून प्रद्युम्न योचन करिता दैत्येंद्राचा सचीव येतो.

दरू :

विजयसम शूर महारुचिर साज करुनियां ।। अचिरकालें समयीं तया ।।
सचिव वज्रनाभाचा येतो ।।

सूत्रधार : सुचरित्र येतसे पाहा.

दरू :

विजयसम शूर महारुचिर साज करुनियां ।।
अचिर कालें समयीं तया ।। सचिव वज्रनाभाचा हो ।।
सुचरित्र येतसे पहा ।।
सर्वे तो रसमादिक विविधि याति नागरीती ।।
अवघे विप्रश्रुति पाठक ।। अवलोकून आले नाटक ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती वज्रनाभ सचिवानें येऊन कृत्रिम भद्रनटादि वेषधर जे प्रद्युम्नादिक त्यांसी दानमानें करून गौरवून बोलिजे ते पहा.

सचिव : गुण तुझे पुरा ऐकला बरें। अनुमान तें सर्वही खरें ।।
विनयसंपदा काय बोलणें। मन सुखावलें फार दर्शनें ।।
इतःपर आपली नाटचगायनविद्या कांहीं प्रगट केल्यानें नेत्रश्रवण दोन्ही कृतार्थ होईल.

सूत्रधार : हें प्रधानाचें वाक्य ऐकून भद्रनट नाटकार्थसंग्रह श्लोक सांगतो पहा.

श्लोक : कामार्ता विषय स्पृहा अनुचिता जो मानसी वाढली।
कामातीत वधूरते ही असुख ग्रामामध्यें रूढली ।।
व्योमाचें परि नित्य सर्वगत जो सोमार्धचूड स्वता।
तो मारादि तुम्हां शिवाच्छित फलस्तोमाशी देवो अतां ।।

आगा ए परिपार्श्वका येथें वज्रनाभ दैत्येंद्राकडे थोर थोर प्रधान तैसेचि सकल शास्त्र विद्याप्रधानपंडिताग्रेसर नागरिक मंडळीसकट मिळाले आहेत. तरि या सभ्यांनुरूप अपरूप शृंगार रसभरित नाटक नाचवून यांचे अंतःकरण संतुष्ट करावें. परंतु तूं कां चिंताक्रांत आहेस अरे रंभोर्वशीपरी सम जी भार्या मोठी रूपवती, तिला आठवितांच चित्तदामाडोल आहे. ते कोणापरि म्हणशील तरी रंभेच्या विरहें जैसें नळकूबेराचें अंतरंग चंचळ होते. ऐसें संवादतां सखी रंभा येते.

दरू : (आहिरी)

धांव पाव मज संभाविते वधूसंभारीं गंभीर गामिनी ते ।।
समारंभाचिये तसें रंभोरु रंभाकामिनी दे ।। १ ।।
अचलस्तनीनिपुरें अचल जशी सौदामिनी ते ।।
गुण प्रचुरित रुचिरता राज्याची उचित स्वामिनी ते ।। २ ।।
कौबेर जो नलकूबर चिंतित त्या मनीं ते ।।
मृगा चाक्षीरति रसीं लाभली बहू मध्य यामिनी ते ।।

सूत्रधार : येणेरीती रंभा येऊन सखीस विलोकून बोलते पहा.

**अशोक :** (आदिराग)

राजराजनंदन कां न ये राजमुखी शुकवाणी राजस तो करुनी विनवणी ।।
आजि लौकरी आणी ।। १ ।।
भाक तो मज देऊनियां ।। सखा या प्राणाचा ।।
न कां अजुंणि आला न कळे प्रकार तो साचा ।। २ ।।
नवंद्य दिन क्रमणें भोगेंविण ।। निश्चय हा तंव माझा ।।
सावंगप्रिय संगम मनोह्यांतरी ।। सर्व वृथा जाला जा ।। ३ ।।
आलिंगि जरी मातें प्रणयें ।। नलकूबर तो बाहीं ।।
अलिकुलवेणी विझेल विरहानळ हा त्यावरी बाई ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरीती रंभा स्वस्थळीं विरहातुर संवादतां तों येतायेतची पदपठा तळीं भूकंप होतां दैत्य आला कीं दानव आला कीं राक्षस आला कीं म्हणून ते अप्सरा दचकतां दशग्रीव येतो पाहू.

**दरु :** येतो मोहन नृपती येतो दशकंधर राक्षसपति पातपुंजालि ।।
मिरवती भुज ज्या सरळा वीस ते ।। तरुवर शाखा तैसे ।।
हरिचक्रे आणी हरिहय वज्रें ।। भरती वण आपैशें ।।

**सूत्रधार :** येणेरीती रावणें येवून कुबेरनगर प्रांत उद्यानीं कामातुर येकलाच संचरितां तों नळकूबर निकट मधुर राग आलापीत मंदगति जाणार जे रंभा तीतें विलोकून स्वस्थळीं दशकंधर बोलतो.

**(श्लोक)** विकचांबुजदळनेत्र ककचें कामार्त मनसा कापि ।।
लिकुचाकार विराजत्स्तुकुचा नारी विराजित कापि ।।
कोण गळ्याची गोडी वानूं अत्यंत आणि तो साफि ।।
आळापी अनुरागें रामा हे रम्य राग तो काफी ।।

**सूत्रधार :** येणेरीती आपआपणातें संवादतां रंभेनिकट येऊन तिचे वर्तमान विचारतो पहा ।।

**दरू :** (वृंदावन आदिताळ)

रामा नवे गती ।। तरुणी सांग तूं कोण वारणेंद्रगमने ।।
फिरशि वनि या कांयेकटि ।। सरोज दिव्यदळोपमनयने ।।
दानवेंद्रकन्या कीं सुंदर मानवयातीची ।। तूं ।।
माननीय गुण शालिनि वनींची महती देवताची ।।
आननाज पहाताची तुझें आणि आणिक न सुचेची ।।
ताहानभूक सर्वही हरली जाण मातसाची ।। परिसे ।।
अंगने नख शिखीपर्यन्तही अतुळमणोरमकीं ।।
तवा अंगजें जें आवडीनें बहु अक्षियुगें निरखी ।।
रंगुनि दिढि तेथेंचि राहे ।। लंगडी घडुनि की ।। आणि ।।
अंगजाग्नि पेटो वरीच्यावरी अंतरंगि देकीं परिसे तरुणि ।।

**सूत्रधार :** येणेरीती रावणानें पूर्वोत्तर वृत्तांत विचारिता रंभा बोलते पाहे.

दरू : (आहीरी शा.)

यत्नपूर्व देवी मथितांक्षीरांबुधि ।। नारि
रत्न मी जन्मले ते मनोहर ऐक रे सुधी ।।
रंभा ऐसें माझें नांव ख्यात लोकें ।।
विद्यारंभ नाटयाचा मज पासुनी जाण तंव ते ।।
वीणा वाजिविल्यानी म्या ।।
वीर्यखाणी ।। ते पाषाण सारे पाझरति मनी सत्य मानी ।। ३ ।।
राजराजनंदनासी ।। आजि राणी ।। ज्यालें ।।
याजसाठीं मी येथें आलें स्वर्गीहुनी ।।
कवणाचा तूं कवण सांग गोठी ।।
माझी आवडी धरू नको तूं आतरामाजी खोठी ।। ५ ।।

याप्रमाणें रंभेचे वाक्य ऐकून रावण बोलतो.

श्लोक : रंकाचे परि देव सेवीति गताहंकार भेणें जया ।।
टंकारे धनुष्यासा येकही घनातंकार्ह लोकत्रयीं ।।
जिंकाया धरणीवरि फिरत जो फुंकान फुंरवा लंकाधीश ।।
प्रसिद्ध कोण पहुलालंकार तो मीच पां ।।

वचन : ऐसा मीही प्रार्थना करितो

दरू : (पुन्नागं आटताळं)

कानावरि मान कांनेघुशि माझी हें नायके मतकाशिनी आता ।।
नाना म्हणू नको, नाना रीती प्रार्थिता कांहिं मंजुभाषिणी ।। आ ।।
अगण्य नव्हे तुझें पुण्य कोणासही ।। अन्यथा नव्हे हे वेखेरी ।। जो मी ।।
पुण्यजनेश सौजन्य इच्छी तुझें ।। धन्यता याहुन काय कधीं घरी ।। ६ ।।
कायजनयकीं ।। का यच्छिन्नि हें तो काय उपेक्षीसी ।।
आजुनी ।। तुझे ।। पाय धरीन ।। अप्राय चुकाया काकृपा ।।
येवुं देकांहि साजणी ।।

सूत्रधार : येणेरीती रावण गळां पडतां रंभा उत्तर देते पाहूं.

दरू : सोय ते धरि गा ।। सखा या ।। ससरां तूं होशि संशया नाहि रे ।।
न शिवे मातें सर्वथा आतांगा ।। सकळहि ठावे शास्त्र तुला रें ।।
मी कथूं काय बायको धर्म गा ।। ७ ।।

सूत्रधार : येणेरीती रंभेनें परिहार करितां रावण उत्तर देतो पाहूं.

(श्लोक) अनुभवीशि सुरेंद्रा त्याजुनी निर्जरासी ।
अनुदिनि रतणें गे केंवि शक्रानुजानि ।।
सुरहि धरिंति जें ज्येष्ठ पत्नीस कामी ।
प्रथमजसुत भार्ये आद्य सोढि न कामी ।।

वचन : देवांनीच जेव्हां वडील भावजयीच्या ठायीं आसक्ती धरून धर्ममार्ग सोडला तो हा म्या सावत्र ज्येष्ठ भावाचे सुनेशीं रतणें अयुक्त काय ।।

ऐसे रावणानें कटूत्तरें बोलतां बरें आजिचे समयीं नळकूबेराचे ठायी अनन्यचित्त माझें असतां तरी ब्रह्मदेवेच या दुर्मतिस शापरूपशिक्षा करील ऐसें चिंतून इत:पर हा ब्रह्मराक्षस सोडणार नाही म्हणून लताधरातें शिरतां रावणानें बलात्कार करितां तों शापरूप अशरीर वाणी जाली ।। ऐसी जे. आरे पाहे रावणासंमति नसतां पाणी दुर्मती धरिशी जरि
सियेच्या तूं, शतधा मस्तक तेणें तत्क्षणीं भंगेल जाण दुर्जंतू
ऐशी अशरीर वाणी होता रावण भीवून स्वस्थळास जाता आहे
ब्रह्मदेवाचें कोण सामर्थ्य दशग्रीवासारिखांही मर्द जाचे शापभयें
पतिव्रतेस भिऊ लागला हे ही नवल नव्हे

रोमपाद देशीं देवेंद्रानें वृष्टि प्रतिबंध करितां ब्राह्मणपुत्रासम न घडता सद्यासुवृष्टि जाली यापरी सख्यांनीं चिंतिता प्रधानासहित रोमपाद भूपाळ येतो पाहू

दरू : भैरवी ।। आदिता ।।

कोमळ फार मनाचा जो महाधार्मिक साचा ।।
रोम (पाद भू) प तो आला ।। सामत्य मला ।। १ ।।
अनावृष्टि दोषासाठीं ।। जनाची संतथापि ।।
जाणुनि चरमुखें अत्यंत जो चिंताक्रांत ।। २ ।।

**सूत्रधार :** रोमपाद भूप येऊन अमात्या पाहून बोलतो पाहू.
**(श्लोक)** पडेनैक जो थ्येंबुटा जीवनाचा ।।
पुढें मार्ग तैं साज नो जीवनाचा ।।
अकस्मात दुष्काळ आला महा हा ।।
म्हणोनी करी लोक सारा अहाहा ।।

**सूत्रधार :** रोमपाद संकट मानून थोर थोर ऋषिश्वरास अवलोकून बोलतो पाहूं
सुचरिता तुम्हां वर्ष हेतु कीं ।।
सुचलिया वदा पद्धती निकीं ।।
खचरटें वृतें दान हा महोर ।।
अचरिते स्वयें आचरेत हों ।।

**सूत्रधार :** यापरि पार्थिवानें प्रार्थितां त्यांत एक महर्षि उत्तर देतो
**(छंद)** विषया तुझीया ऋष्यशृंग हा ऋषिकुलाग्रणी आलियां पाहा ।।
धरणी मंडलिया धनावळी ।।
करील वृष्टी गा अद्य आगळी ।।

**सूत्रधार :** येणेरीती महर्षिनें उपाय कथितां ऋष्यश्शृंग आणायास वेश्याच समर्थ म्हणून अमात्यांनी आलोंचना सांगतां रोमपाद भूपाळानें गणिकांचें स्मरण करितां त्या येताहेत पाहूं.

दरू : जुजावति ।। आदि. ।।

आल्या रूपाजी सदरेशी ।। भुलवुं जा लाख सर्व जीवा ।।
आल्या रूपाजी आल्या ज्या भूषणधोवा ।।

आर्या : वदन पाहुनि ज्याचें मदनारीसही अति ।। हृदयीं काम विकृति ।।
उदय पाहें पुरती ।। सदन लावण्याचे ।।
सरस ज्या कां सुदती ।। मदगजकांते परी मंदमंद गति ।।

सूत्रधार : येणेरीती वारांगना येताच पार्थिवाज्ञेवरून बुद्धिसागर प्रधान बोलतो पाहू.

(छंद) : ऋषिकुलाग्रणी ऋष्यशृंग हा ।।
वश करूनयां कौवळों महा ।।
विषयीं या आणी वीत राग तो ।।
वसन भूषणवित्त अर्पितो तुम्हां ।।

सूत्रधार : येणेरीती अमात्याने आज्ञापित वारांगना प्रत्युत्तर देताहेत पाहू.

(श्लोक) पुढांही बांधू ये कनकगिरीचा बाळ मशकीं ।।
पुडारूनि युद्धीं हरिहि जिणिजे आणि शशकीं ।।
हुडा वैकुंठाचा करगत करूं ये अद्यपरीं ।।
जडा अम्हांला तो मुनि वश नव्हे हे स्थिति खरी ।।

सूत्रधार : येणे रीती गणिकांनी हातपाय गाळितां रोमपाद भूपाळ चिंताक्रांत घडता येक वृद्ध वेश्या हात जोडून बोलते.

दरू : शरज ।। आदि ।।

चिंता सांडा तुम्ही महाराज ।।
वृद्ध नटी मी बुद्धिबळें तें साधीन कठिणही काज ।। ५ ।।
कुशल मीच या विषया केवळ ।।
दुसऱ्याचा नहीं लाज ।। परम तपस्वीही ।।
धरुनि तो आणीन करुनि भलता व्याज ।। ३ ।।
परंतु मला पाहिजे तें सामग्री तें मात्र सिद्ध करुनि द्यावी

सूत्रधार : हे वृद्ध नटीचे वाक्य ऐकून रोमपाद अमात्यासगट से इतःपर ऋष्यशृंगाचें आगमन घडेल, अनावृष्टी भय वारेल, ऐसे निर्धारून अमात्यासकट रोमपाद अतःपुर प्रवेशितां ऋष्यशृंग येतो पाहूं.

दरू : मोहन ।। आदि ।।
काश्यप मुनि नंदन येतो ऋष्यशृंग तोह ।।
काश्यपी लागला नाहीं जो दुष्य स्मराचा हा ।। आ ।।
तापस वर गण मूर्ध मणिजा तापत्रय हर हिशापानुग्रह निपुण सुरेंद्रही काव्ये ज्या हृदयीं ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती स्वाभिमुख येणार विभंडकसुता देखूनि वृद्ध वेश्या अन्य गणिकांसी बोलते पाहूं.

वचन : अवो मुली हो. आम्ही या वनप्रदेशीं यायास ऋष्यशृंग बाहेर निघायास गाठी पडती तरी तुम्ही सामोरे जाऊन आलिंगनादि स्वजातीय व्यापारें त्याला वश्य करावे.

**वचन :** येणेरीती वृद्ध नटीचे वाक्य ऐकून त्याचौघी जणी मुख्य वारांगना पुढारतां त्यांप्रति विलोकून ऋष्यशृंग स्वस्थळीं बोलतो पाहूं.

**दरू : मांजी ॥ आदि ॥**

ऐसे मुनि तेजोनिधी आले कुणा या स्थळीं ॥
विश्वामित्र व्यासादिक विख्यात देखतेपरी ॥
विश्वांमाजी हेतो ठेवी विचित्र कीं आगळी ॥
हा सर्व प्रांतही दिव्यवासें त्यांच्या पूर्ण जाला ॥
नासा पुटीं आघ्राणून फार सुखें माजली ॥
कोकिल कुजिताचीही वोकारी येतसें आता ॥
हे कंठ माधुरी कोठें लोकातीत चांगली ॥ ३ ॥

**सूत्रधार :** येणेरीती वारांगना साक्षात् मुनीश्वर मानून जवळ जाऊन ऋष्यशृंगानें नमस्कार करायास जातांच ते बोलताहेत पाहूं.

**वचन :** अगा मुनिराजकुमारा, अंमचा संप्रदाय ऐसा कीं कोणाचा नमस्कार घेणें नाही

**सूत्रधार :** येणेरीती वैश्याचे वाक्य ऐकून ऋष्यशृंगानें तुमचें गोत्र कोण, सूत्र कोण, आश्रमाचे नाम काय म्हणून विचारिता वारांगना उत्तर देताहेत पाहूं.

**दरू : सौराष्ट ॥ झंपताल ॥**

परिस गा मुनिवरा परम पुण्यालया ॥
चरित आमुचे सर्वस्वरस बहुसखया ॥ अ ॥
गोत्र अमुचें तरी गोप्याष्कळ असे ॥
सूत्र वाच्यायन श्रुत समजती ॥
चित्र काम्यक विपिन चित्तरंजन शास्त्र त्या स्थळीं सर्वदा वस्ती ॥
आसन चौसष्टी आमुचिया योगाख्य शासनाभितरी ॥
असति पाही ॥ ये सर्वेशिकवितो सर्व तूंजपा ॥
क्लेश नसति तदभ्यासविषण ॥ पूर्वी ॥

**दरू :** नमनीं नवलाव बहु ॥ हे मुनिवरा ॥
समुदा प्रपंच कीं सम नाहींच बरा ॥
व्दिपद ते नर अग्नि त्रिपद पश्वादिक श्वापदौ चतुष्पदें ते ॥
ऐक नीट ॥ षट्पद भ्रमर जेथें शरभ अष्टपद ॥
गोंविचिया न पदाशी संख्यातें ॥ १ ॥
कळलें असे तपोबळ निधी तूजही ॥
सकळिक मानवादिकांसी नसे स्तन युगुल कंठ प्रदेशीं ।
ऐसें असतां कळप शेळांची गळस्तन गुण राशी ॥ २ ॥

**(श्लोक)** झोळे हे पान्याचें किंवा वुंडे मनोज्ञ हळदीचे ॥
निंबे किंवा हृदयीं ठिवली सांगा समस्त अपूर्व हे वाचे ॥

सूत्रधार : येणेरीती ऋष्यशृंगाने पुसता त्याचा जाब देते. मुनिराजकुमारा आमची दोन्हीशिंचें.

सूत्रधार : येणेरीती वारांगनेचे वाक्य ऐकून ऋष्यशृंग बोलतो जी मला मस्तकी शिंग तुम्हाला वक्षस्थळीं कां कुमरे, आले पहा मारादिकाचे.

श्लोक : निभावती न प्रमदाचीच तुकीं ।।
प्रभावतीच्या कथिजेक सामुखीं ।।
प्रभावती जे रतीहुनी भावली प्रभावती ।।
ते हृदयीं ठसावती ।। सुंदर नंदन आले पाहे सुंदर महाकंद पार्वकाचें आले नंदन पाहे ।। सुंदरांगाचे चौघे जन सद्‌गुणकंद कृष्णदर्शनोत्सुक महासविषयी।।

सूत्रधार : येणें स्वपूर्वोत्तर सांगतां ऋषी बोलतो.

वारांगना : अगा मुनीराजकुमारा आमची दोन्ही शिगे वारांगनेच वाक्य ऐकून ऋषीला समस्त शिंग वक्षस्थळीं कां. ऐसे विचारितां त्यास समर्पक जाब देताहेत.

वचन : (सदुनि सविषयीं) ?
येणेरीती सपूर्वोत्तरा सांगून पुन्हां वारांगना बोलताहे पहा.

दरू : अरे मुनीराजकुमारा तुमचे तप हेंयेकस्तपोव्दिरध्ययीं ।। शास्त्रानुसार एकलेंच करावें ।। अमची तप दुसऱ्यावेगळें चालेनाते । काय म्हणून शील तरी ।। नूतन तपस्वी जितुके येतील तितक्यांस आलिंगावें ।।

सूत्रधार : एणेरीती वारांगना बोलतां ऋषी उत्तर देतो पहा.

वचन : तापस हो तुम्ही सांगितलें ते खरेंच
परंतु गाढलिंगनीं शिंगे पोटात शिरून प्रमाद स्फुरेल
ऐसें मुनिपुत्र संवादतां वारांगना जाब देते पहा

छंद : सदृढ पीन हें भासती परी ।। मृदुलता वसे फार भीतरी ।।
उदर तें न फाटेंचि भेटतां ।। न धरूनि भयां तूं पहा स्वतां ।।

सूत्रधार : येणेरीति वेश्यासें समाधान करितां रत्नखचित कांची चोळी सहित लेवून तें बालिकास तो हात लावून लखलखाट देखून विस्मय म्हणून कां हे. गवसनी शिंगास घातली हे. मुनी पुत्राने पुसतां येरी उत्तर देते पहा.

(श्लोक) आमच्या पुण्यतरूचें वल्कल हे गा न गवसणीं कांहीं.

सूत्रधार : येणेरीती वेश्यावाक्य ऐकून कांचोळीस खीळीं मोत्येंरत्नें नेणतां मोती पाळिच, अंतीं रत्नें सोनकिडि. हें मानून ऋष्यशृंग पुसतो पाहे.

श्लोक : सोन किडचासी खिलिती पडली अंडेकसर्थ या ठाइं ।।

सूत्रधार : ऐसा मुनिकुमारानें प्रश्न करितां माणिक्यादि रत्नें भूमीफळें उपरि दिसताहेत तेथें मुक्ताफळ ऐसें त्याचें प्रत्युत्तर ऐकून मक्तानां फळं मुक्ताफळं असा अर्थ करून ते तपस्वी नित्यमुक्त यास धरिली तें फळें मुक्ताफळें हें

निर्धारून आधिं वल्कलाना स्पर्शून नित्याचा सुवासही घेऊन अनंतर स्तनव्दयासहि कर लावून अंतरीं संतोष पावून आपुल्या वल्कलाची शृंगाची निंदा करितो पहा.

**श्लोक :** नाहीं सुवास सहसा आणि चारिकाहि नाहींच । तो लखलखाट ही ज्यांत पाहीं । पूर्वी धृतें आजि इत:पर त्या असा च्यां करें स्पर्शून चिध्या करीन अवलक्षण वल्कलाच्या ।। नसे तो बोलावा करी तरि शुष्कें धनवल्कलाच्या सेंकरे ।। स्वकुंजां जातां किमपि नवडे सौख्य परिसें ।। त्वरें फाडी पोटास दृढ कवाळूत धरितां ।। जळो त्या शृंगाचे धिग् धिग् जिणें याद करिता ।।

**सूत्रधार :** येणेरीती निवेदितांनून वल्कलें फाडायास शिंग मोडायास ऋष्यशृंग सिद्ध होतां वेश्यानीं गाढ आलिंगिता हासून निर्भर विभण्डकपुत्र बोलतो पहा

**श्लोक :** न मरावें उपवाशीं ।। श्वासोच्छवासी रोडतरे नाहीं ।।
पंचातप जल वास प्रमुखें दु:खे नसेचि हें काहीं ।।

**वचन :** इत:पर हेंच तप निरंतर करावें परंतु जन काज्ञा पाहिजे दु:खे तोहि आताच येईल तुम्ही क्षणैक बसावे स्वदर्शन काम देऊन आतिथ्यादिक घेऊन मग आश्रमासी जावें

**सूत्रधार :** येणेरीती ऋषीकुमार वाक्य ऐकून विभांडक आल्यानें आमचे खंडवदन करील येथोन ताटकापितां क्षेम ऐसें निर्धारून उदयिक प्रात:काळी येतो, यापरी वेश्यानें प्रार्थितां बरें आलिंगन रूप तपास व्दितीय विघ्न होण्यासारखे करावें ऐसें मुनिकुमार प्रार्थितां तथास्तु म्हणून वेश्या स्वस्वस्थळास जातां ऋष्यशृंगास केव्हां बाप येईल केव्हां हें सुखसमाचार सांगेन म्हणून वाट पहातां विभंडक येतो पहा

**दरू :** भंड न निवित भंडण ।। मनोज विभंडक नामा भंडनमुनिशीं ।।
येतसे तो पाहे ।। येथेचि हें ।।

**सूत्रधार :** येणेरीती विभंडक मुनि येता तशी वंदून ऋष्यशृंगानें समीप येत जोडोन तित्रां त्याची पिशाचग्रस्तासारखी अव्यवस्थित स्थिती देखून जनक बोलतो पाहे.

**(श्लोक)** वेदाभ्यास न मांडिला रसनव्यासंगही सांडिला ।।
दाणा एक न कांडिला मम भयोत्कर्षाब्धी ओलांडला ।।
देवता राहि न झाडिला नगरिचा तो केरहि काडिला ।।
कोठीं तो मनू धाडिला निज तपा आणावया धाडिला ।।

**सूत्रधार :** येणेरीती विभंडकानें दटावन पुसतां तो उत्तर देतो पहा
बोज सांगू काय तुम्हाला ।। चोज पुसूं मज मुनि आला ।।
घमघम परिमळ आघ्राणोनियां ।। अथवा प्रांतहि धाला ।। १ ।।
पटल जटांची मऊ बहु पुष्पीं ।। जटिल सुखदा हाताला ।। २ ।।
नीर मुखीं मुखें झटतां त्याचें मटमट शब्दहि झाला ।। ३ ।।

भोंबाटित पद मंजुळ ऐकूं लोभ बहू श्रवणाला ।। ४ ।।
वल्कलतेजें वन हे उजळलें ।। शुष्क नसेचि ज्याला ।। ५ ।।
फल माधुर्य तें फार वदूं किति कळेना जी कोणाला ।। ६ ।।
हें व्यसन देणार करावें ।।
येणेरीती वृत्तांत सांगून त्यांनी दिल्हीं जे भक्ष्य तें फळेंच मानून स्ववन फळ निंदापूर्वक त्याची स्तुती करितो पाहा

श्लोक : खारट आंबट तुरट तिखट चिकट कडुहि कुरसाठी ।
वन्यफळें तें आमुची तैशी नोह्येत सस्यलें त्याची ।। १ ।।
जैसा बोध रसाचा सांचा आत्मा असंख्य दिवसाचा ।।
तैसा दिव्यरसाचा साचा तत्फळ समूह तो साचा ।।
अवशा बोलिले ऐसें जें अभ्यासक्तचित्त होऊन तपास पाणी घातले ।।
तरी मी क्षणभरीही रिकामा नव्हतो ।।
अनुष्ठान जप या दोन्हीचे कैवल्य तेहि हस्तगत करून हर्षनिर्भर होतो ।।
ते कैसे म्हणशील तरी सांगतो ऐक ।।

श्लोक : संदर्शनमनुष्ठानं सल्लापः तपः ।।
अंगांगसंग कैवल्यं ऐसें आहे ।।
याहूनि तपकाय ।। थोराचा अंगसंग निरंतर घडला ।।

सूत्रधार : येणेरीती पुत्रवाक्य ऐकून विभंडक वचन
आहारे कपाळ म्हणून कष्ट होवून कोठून विवशी बाजारिणी या पोरास भेटल्या क्षणात वेडें करून सोडलें यावरी हें व्यसन सुटणें कठीण म्हणून बोलतो पाहा

(श्लोक) फिरेल सरिता जहि शिरुनि सागराभीतरीं ।।
स्फुरेल जग सत्यसें परम तत्त्वनिष्ठा जहि ।।
फिरेल आणि ते शिला वनि जलें कृतासेचना ।।
तहि युवतिचा स्पृहा भर्जडूनि जायीच ना ।।

वचन : बरं याला भेडसावूनहि व्यसन दूरी करावे

सूत्रधार : हें निर्धारूना विभंडक मुनिकुमारासि बोलतो पाहे

छंदं : देखीतो तुवां जें सुता सुधी ।। तें खरं नव्हेती तपोनिधी ।।
वोखटें महाराक्षस स्नेयें ।।देख तू जला भक्षतील हे ।।

सूत्रधार : येणेरीती विभंडकानें भेडसावितां जनकास न भेट सांगिता ते ऐकोन मौनाने ऋष्यशृंग अतः स्वस्थलीं विभंडक बोलतो पाहे

(श्लोक) नेणोनि जरी पावकीं पद पडे पोळी तया लौकरी ।।
घेतां हे न कळोणि नाम हरिचें हेळिल अघाची करी ।।
आरो ही जरी शेविली संवृत तें पोळिच हे जे देवी ।।
नारी आंतळतां तशी अरसिकें भोळीही ते नाचवीं ।।
एवं तु दुष्ट वस्तु स्वभावेचि ऐसा

**सूत्रधार :** ऐसे निर्धारून करून रोमपादरायाचे कृत्य म्हणून ध्यानदृष्टीने समजून विभंडक तपास जातां रोमपाद येतो पहा.

**सूत्रधार :** येणेरीती रोमपाद येऊन अद्यापि वृद्ध वेश्या का आली नाही ऐसी चिंता करिता ते येते पाहे.

**दरू : कल्याणी ।। आदि ।।**

येते वृद्ध नटी बुद्धिमती ।।
पुलकित अंग गिरितरुकिटाभुलविणार युक्ति बळे अति ।।

**सूत्रधार :** येणेरीती हास्यमुखी वृद्ध नटी येतांचि सचिवाने वृत्तांत विचारिता ते उत्तर देते.

**वचन :** आहे प्रधानजि रोमपादरायाचा संकल्प सिद्ध झाला. मुनिराज कुमारहि आला.

**सूत्रधार :** ऐसे संवादता ऋष्यशृंग येतो पाहे.

**दरू :** पालखीकरत्नी वारविलासिनी हस्तकांची ।। रती लालसासाधू निभला मुनी तैसे बैसकाची ।। ऋष्यशृंगवमना पातळ हे ।। ऋषिराजराजा ।। अतिवश्य घडूनी रूपवती वेश्यासी रोज सुंदर युक्तीचे कंधरी घालोन हस्त कसा ।। तपोमुनिवरू झुलत तो अज्ञान कंदर्प तैसा ।।
येणेरीती ऋष्यशृंग येताच व्योमी वारिद वोळला घन रवे भूगोल

**(श्लोक)** अंघोळला ।।

ग्रीष्मे जन पाळला अतिशये क्षमा स्वयें चोळला ।।
तो दर्पोदकी लोलला निववुनि गात्रें सुखे घेतला ।।
सस्याचा धर वाळला हि पुढता क्षमा प्रांत झाकोळला ।।

**सूत्रधार :** येणेरीती स्वर्नवर्षासमोर ऋषिकुमार येताच रोमपादरायाने त्याला अभिमुखे जाऊन अर्घ्यपाद्यादिकी अर्चून शांता नामक आपले कन्या रत्न जे या उत्तमपात्रीं अर्पावें ऐसे चिंतिता शांता येते पाहा.

**दरु :** अ ।। शांता ते पातली ।। शांतिपुतळी ।। व्योम समानमध्या ।।
सोमानना अनवद्या रोमपाद दुहिता श्रीमती सरवीसहिता ।।

**सूत्रधार :** येणेरीती शांता येताच शास्त्रोक्त विधिने ऋष्यशृंगास रोमपादरायाने संतोषरूप परिवासगट अंत:पुरी प्रवेशता कृत्रिम भद्रनटास गौरवून वज्रनाभ बोलतो पाहा.

**श्लोक :** नटनच्यातुरी हे जगत्रयी ।। दिठि न म्या नटा पाहिली कही ।।
अटन सोडुनी यावरी स्वये ।। तटुनि राहणे येथ निश्चये ।।

**वचन :** हे आपलेच घर कोण्या गोष्टीस वुणाव पडणार नाही.

सूत्रधार : येणेरीती याप्रकारे वज्रनाभाने प्रद्युम्नादिकांस स्वनगरीं रहावे ऐसे आदरपूर्वक सांगून, अंतःपुरीत प्रवेशल्यानंतर परिवारास वाटे लावून प्रद्युम्न बोलतो पहा.

वचन : आ ।। अरे विदुषिका शुचिमुखी हंसीनें सांगितलें ऐसें जें त्या भद्रनटाच्या वेषानें दैत्यराज नगरी प्रवेशतांच प्रभावतीचा लाभ घडला तरि तें अद्यापि दृष्टिगोचर झाली नाही मज विरहावस्था विलोकता तीच विचित्र आहे तेची सांगतो ऐका.

दरू : यमुना ।। आटा ।।

चोज सांग मी तुज काय ।। जें जगीं सर्वथा जाहाले नाही ।।
पाह्यलाही आला ।। पडसा तो फार ।।
आणि वायूस वात थारा ।। १ ।।
शीतोपद्रवकसा तो सोम हा तो सळितो विकामाया कामा ।। २ ।।
वेताळसही लागते भूत जातवेदास दाह उत्पात ।।
झाली दीप्त हुताशना नत हा वायूसहाया करी ।।
होता तो कृशदीपरूप विझवी त्याते जसा लौकरी ।।
सामंतोत्तम हा वसंतहितसा जो भाग्यकाळीं सखा ।।

वचन : आमचा मूळ पुरुष जो चंद्र त्याचें दुश्चरित्र सांगतो, ऐका.

दरू : कल्याणी ।। आदि ।।

दोषाकरा नाहीं काहीं आपपर तेला घोष सत्य चंद्र हा पूर्वापर ।।
भूषण मी आत्मवंशालोत्तरतालीरोषें ऐसा मातें जो निरंतर ।। १ ।।
शिवद्रोही अंधकाचे भृत्य क्रूर ।। केल्ये अवघे जण तराणीच चूरचुर ।।
अवस्थाते माते आत्मि दुर्नि वार ।। घेति अतां पंचप्राण माझे पंचच्छर ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती संवादोन राजहंसी येथें आली असती तरी तत्काळ प्रभावतीसीं संविधान करीता म्हणून प्रद्युम्नानें चिंतिता शुचिमुखी येते.

दरू : राग बिलहरी

येते जलजाक्षी ।। ते शुचिमुखी ।। हंसी पथें हे हौशी ।।
शीतकर कोटीहुनी ।। या सप्त (शतु) शुभ्र गोक्षीरऐसी ।।

अ. : प्रभावतीचे जी गडणी सुभाषिनी मोठी प्रवीण ।। समराभरी तणीच केवळ नभरत फळ अतिशोभत रूपेण ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती शुचिमुखी येतांचि तिला पाहून प्रद्युम्न बोलतो पाहे.

नायक ।। आटशापू ।।

दावीं आतां सुदती ।। दयिता हा वियोगें तप्त जीव होतसे अति ।। रतिचें ठायींही नसे रति अणुमात्रही ।। आधि तेथे हेचि आतिथ्य ते प्रिती सुदती ।। घटकेमध्ये जरि घटना न करिशी न निटके देहीं प्राण ।। हा निश्चिती ती सुदती ।।

सूत्रधार : येणेरीती प्रद्युम्नानें प्रार्थितां शुचिमुखी जाब देते पाहें ।। छं ।।

(श्लोक) सरसिजानना ते प्रभावती ।। निरखीसी आतां तूं महामती ।।
करूं नको मनीं खंत यावरी ।। तरुणी ते अति संन्निधी बरी ।।

सूत्रधार : ऐसें शुचिमतीचें वाक्य ऐकून प्रद्युम्नानें प्रभावतीचें ध्यान धरोनि उद्यानी विहार करावयास जातां प्रभावती येते पहा.

**दरू** : पूर्वकल्याणी ।।

वज्रनाभ दुहिता येतसे अता ।। वज्रवैदूर्याभरणीं ।।
विजृंभमाणमहित लालित्य दिव्य रत्नापाळीं ।।
कस्तूरि तिलक फाळीं ।। चंद्रमणि साज लाहीं ।।
तगटिकां चोळी ल्याली मत्तेभचाली ।। १ ।।
कामाचियाची ध्यान कामा ।। लागती क्षणहि रिकामा ।।
जाऊ नेदिनीरखाया ।। मुनीवर तोच निकामा ।। मानुनि प्रकामा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती प्रभावती येऊन शुचिमुखी सती विलोकून बोलते पाहे.

श्लोक : श्यामोद्धाम रसाच तो निरखतां वामोरू सर्वत्नही ।।
कामोद्दीण होतसे घडी घडी गरामोत्तमें निश्चयीं ।।
सामोरा करिशि वुभा जरि धणीं सामोपचारान्वयें ।।
या मोहाब्धीस लंघणें स्फुरल तें कोमायिते वत्नतहें ।।

**दरू** : यमुना ।।

दाखिव तो प्राणसखा ।। दर्शनीय बाई ते ।।
सौंदर्य विषयी ज्याची सदृश पै देती साचें ।।
कंदर्प नामा तोपाचें ।। मंदिर जो बाई तें ।।
अंतस्थ वेदना भारी ।। अंतरीं जाणोनि सारी ।।
अंत कितीसी पाहसी तरी ।। कांत दिव्य बाई ते ।। २ ।।
देहसकटा आपलें ।। अहंभाव न हारपलें ।।
मोहनरूपें व्यापिलें ।। तिहिं लोकीं बाई तें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीती प्रभावतीने प्रार्थितां शुचिमुखी उत्तर देते पाहे.

(श्लोक) : पाताळींही वसो त्रिविष्टपीं असो भ्राता विधीच्या सये ।।
प्रीतात्मा यदुवीरनंदन तुजानुरागान्वयें ।।
हाता येईल पुष्पहार सरिसा हा तारनाथाननें ।।
आतां येथ घडेल पूर्णरतिमुग्धह्यता ही दिव्यांगने ।।

सूत्रधार : येणेरीती शुचिमुखीनें प्रभावतीतें आश्वासन करितां विश्वाधिक रूपसंपत्ती शाली विश्वंभरनंदन प्रद्युम्न येतो पाहे.

**दरू** : हुशानि ।। आदि ।।

कंदर्प येतसे पाहें ।। कंजलदलाक्ष ।।
कंदर्पण बांधेकरुनि सादृश्यता प्रत्यक्ष साज करूनि साजिरा ।।
तो राजकुळ मंडनहिरा ज्याचा नाजुक देह गोजिरा ।।
लोकामाजि हुडकितां न ज्या जोड तो दूसरा ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीती प्रद्युम्न येवोन प्रभावती निकट जाऊन सरस सल्लापास आरंभ करितां प्रभावती लज्जेनें माघारतां तो बोलतो ते पाहे.

**दरू : माजि । शापु ।।**

घेसि का वो माघार साजणी तूं । स्थिर राही ।।
दूरुनियां आलो येथे तुज साठीं वो । पुरवी कामना न करूनि घाई ।। १ ।।
वळावुनि अतिथीसी मंदिरासी वो । घालिसी बाहेरी वो ।।
उचित ते का कार्यी ।। २ ।।
नाट्यलोम लोकनाथ नंदन तोही ।।
नटवेषे कुणे त्यजुनि बढाई तुजसाठी ।। ३ ।।

**सूत्रधार** : यावरी अव्हेर करणें युक्त नव्हे हें ऐसाप्रकारें प्रद्युम्नानें प्रार्थिता प्रभावती प्रेमभरित प्रत्युत्तर देते पाहे.

**दरू : फरजु । शापु ।।**

नयन माझे झाले धन्य सखि या । निजनायक जी गुणनिलया आतां ।।
कुरवंडी मी सारीन तनुची । चरणांबुजावरि
निया साची वीरोत्तममंडन यदुराजया ।।
पसरून भुज आलिंगनिया स्वसुखांबुधि पोहवी ।।
आजि सदया । दासीजन रंजवी हा सखया ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीती रमणीनें करकमळ जोडोन विनवितां रुक्मिणीतनय जाब देतो पाहे. अवो प्राणवल्लभे तस्मात् शास्त्र प्रमाणं ते, म्हणून सर्वज्ञ ईश्वरें आज्ञापिलें यास्तव गांधर्व विवाह तुझें पाणीग्रहण करून अनंतर सांगितल्या कार्यास सिद्ध आहे,

**सूत्रधार** : ऐसें संवादून शास्त्रोक्त गांधर्व लग्न साधून प्रभावती प्रद्युम्नानें सकाम सुखी मग्न असतां तोनूपुरध्वनी कानीं पडतां बहुतेक चंद्रवती येते. आपण क्षणभरी अदृश्य असावें यापरि वज्रनाभ कुमारीनें प्रार्थितां मन्मथही गुप्त होतो. तो चंद्रावती येते. पाहे.

**दरू : धन्यासी । आदि ।।**

चंद्रमुखी येते चंद्रावती ते । कोण लावण्याची पुतळी ।।
जे कां साची । वर्णवेना गुण संपदा हे जिची ।।
अवतरिली तारा अवनीवरी काय । नवयौवनवतीच स्तवणें ।।
किती ये ये ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीती चंद्रावती येतांच तिला विलोकून प्रभावती बोलते पाहे.

**प्रभावती वचन** : अवो सुनाभकन्ये तुज जोडिदार बहिण गुणवती कोठें आहे ?

**सूत्रधार** : ऐसें प्रभावतीनें पूसतांच चंद्रवती उत्तर देते पाहे.

**(छंद)** : गुणवती न कोणा गुणस्वये । गुणवती आझी ते गुणालयें ।।
क्षण न लागतां येथें पावली । गणी असें सखे तूं निजस्थळीं ।।

**सूत्रधार** : येणेरीती चंद्रवतीनें संवादतां गुवणवती येते पाहें.

**(छंद)** : गुणीची जे कां मंजूषा । रूपवती येथें ।। मानस मोहिनी ते ।।
पीनस्तरभारें ची मंदगती न तुले । आनन पंकजशशिपूर्णकांती ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीती गुणवती येतां तिला विलोकून चंद्रवती बोलते पाहे.

**वचन** : अवो गुणवती प्रभावतीची रीती विचित्र दिसते.

**(श्लोक)**: होतां घर्षण तो मणी झगझगी क्षीणत्व पावुनी ही ।।
किंवा तीव्र तपें तनू तगमतें येते ताणवे युक्तही ।।
बाणें ब्रह्मविधानने टवटवी मान, क्षयेंही जशी ।।
कोधे जूनीही अश्व हे घवघवी कांतांगसंगें तशी ।। छं ।।
अंधरीं ईचीया तूं पाहा सति । अंधभवक्षते स्पष्ट दीसती ।।
विधुमुखी कुचींतही नखक्षतें । मृदित ही वधूफार भासते ।।

**वचन** : तरी चौघामध्ये विचारणें युक्त नोहे त्यास्तव एकांतीं पुसावें.

**सूत्रधार** : ऐसें गुणवतीसी संवादून चंद्रवती प्रभावतीस बोलते पाहे.

**दरू :**

युक्त हे तुझला काय सखे ।। विफलें जे कां ।।
अपुले वृत्त तें लपविसी मजसीही माये ।। सखे ।। १ ।।
एकचि आत्मा देख तिघींचा हा कळुनि घे अभिप्राय ।। सखे ।। २ ।।
आणिकां न वदे अर्थ न कदापि हा । आणू तुझीच आहे ।। सखे ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीती चंद्रवती गळां पडतां इतः पर हेळ्ळीगौड सुटेना म्हणून वर्तले वर्तमान प्रभावतीनें सविस्तार सांगतां इतक्यांत चंद्रवतीचे इंगित जाणून गुणवती बोलते पाहा.

**दरू :**

आपणांसारिखें करणें आमुचें आतां निपुणें वंदिते चरण ।।
आ ।। नंदनवन संभूत प्राणसखी ये चंदनतरु अणित ।।
गंधातीत वृक्षांहीं समान करिती सुंदरीक्षण न लगतां आमुचें आतां ।। १ ।।
परिस पाषाण ठाउका सर्वा परि तो लोहासी लागतां परिशी स्वर्णेचि करि तेवी स्त्रीरत्न तूंहि त्वरितें दे सुवर्णता आमुचें आतां । वज्रनाभकन्या उत्तर देते पहा.

**वचन** : अवो मायबहिणी गे, पूर्वी मला दुर्वास मुनीनें दिव्य विद्या दिली तिचा प्रभाव ऐसा कीं, देव दानव मानवांत ज्याचें ध्यान धरावें त्यानें तत्काळ प्रत्यक्ष व्हावें. तरी ते विद्या दोघीसहि समर्पिते तरि तुम्ही श्रीकृष्णदेवाचा भाऊ गद त्याचा पुत्र सांब त्याचें चिंतन करावे. ते तत्काळ येतील.

**सूत्रधार** : यापरी संवादून आधी चंद्रवतीनें आकर्षण विद्या सांगतां तिनें गदास ध्याता गद येतो पहा.

**दरू** : सोरटी । आदि. ।।

श्रीयदुकुलानंदन मदभरें यदुवीर ये पाहा । मधुसूदन सोदर ज्यादिती भव ।।

गदगद कांपती गंभीर हा श्री ।।
गद आल्यानंतर गुणवतीनें प्रभावतीदत्त विद्या प्रभावें सांबयावा म्हणून हृदयांबुजी चिंतितां तो येतो पहा.

दरू : हुशानि । आदि ।।

सांब तो येतो पाहें ।। अंबुजाक्ष हा ।। सांभु येतसे जो कां ।।
सांबप्रसादें लब्ध । जांबुवतीस दीप्त जांबुनदासम ।। १ ।।
येणेरीती गद सांबु येतांचि चंद्रवती गुणवती दोघीजणीही गदासांभुयाची प्रार्थना करिताहेत पाहा ।। २ ।।
विरचुनि कृपेनें अनुगृह करूनि आमुच्या जी परिग्रहा । त्वरित वारिजे मन्मथ ज्वरा । चरणपंकजीं ठेवितो शिरा ।।

सूत्रधार : येणेरीती चंद्रवती गुणवती प्रार्थितां सांबा गदानी गांधर्व विधीनें त्यांचे पाणिग्रहण करून आपुल्याल्या स्त्रियेसीं ।। ४ ।।
आनंद भरित क्रीडासक्त असतां तो गद सांबास विलोकून प्रद्युम्न बोलतो पाहे अवो आम्ही ही हें एकांतीं केलें कृत्य उजागरीस आलें प्रभावती, चंद्रवती, गुणवती या तिघींनीं लंबोदरोपासना केली ती तन्मुळें त्याचें सारूप्य प्राप्ती झाली इत: पर कन्या दूषणारास आम्हां वज्रनाभ जीवें सोडणार नाहीं.

सूत्रधार : ऐसे विधान करून हे सर्व वर्तमान चिंतामणी नामक हंसमुखें कृष्णदेवास निवेदावें म्हणून चिंतितां तो हंस येतो पहा.

दरू : कल्याणी ।। आदि ।।

आला हंस कसा ।।

सूत्रधार : येणेरीती चिंतामणी नामक हंस येऊन प्रद्युम्नास विलोकून बोलतो पाहा.

वचन : अगा ये कृष्णकुमार, त्वां येथील समाचार अवघा माझ्या मुखीं कृष्णदेवास श्रुत करावा ऐसे त्वां चितीतां ते भगवत् प्रसादें तात्काळ कळलें, मग कोण मानसगतीनें व्दारकेस जाऊन तेथें मधुसूदनास येथील वर्तमान निवेदून भगवंतानें तुम्हांस शिकविला बुद्धीवाद आणि त्याच्या अमोघ आशीर्वाद दोन्ही मनीं धरून तुझ्या संन्निधीस पावलों. तो बुद्धिवाद प्रकार काय म्हणशील तरी सांगतों ऐक ।।

दरू : न करा तुम्ही कांहीं चिंता । दैत्य प्रखर भांडू आल्या जिथा ।।
गरुडारूढ शत्रुंहंता येतो त्वरित झाडू दनुजअहंता ।। अ ।।
जनकोंतरेंचि थोर तुमचे तनये होतील शूर । धनुर्वेदादिक प्रकार ।।
गर्भस्थानीं येईल त्यासी साचार । मातामहा राज्य भारी पुढे ।।
माना तेचि अधिकार । मात हे येणें प्रकारीं वदला मातें ।।
विलोकून तो सुखकारी ।।

सूत्रधार : येणेरीती चिंतामणी हंसाचें वाक्य ऐकून दिगंतापैलीकडे चिंता भवंडून भला रे राज हंसा, त्वां नावासारी करणी केली म्हणून त्याला समझावून प्रद्युम्न बोलतो पाहे.

दरू : अरे चिंतामणी हंसा (नेपथ्यांत फार कोलाहल) येताहेत बहुतेक वज्रनामं येईलसें भासतें. त्वां मार्गांतरें जावे. आम्ही दोघे गुप्त होतो.

सूत्रधार : येणेरीती संवादता वज्रनाभ येतो पहा.

दरू : आला वज्रनाभ हा। दारुण महा ॥
आला वज्रनाम काळांत कोप ॥
ज्याला वेष्टुनी असे पाळां विरांच्या हा ॥ १ ॥

सूत्रधार : येणेरीती वज्रनाभानें येऊन कन्या अंत:पुर वृत्तांत कळाया कारणें कंचुकीचे स्मरण करितां तो येतो पहा.

दरू : काडा। आट ॥
येतसे कंचुकी हा ॥ येथेंचीं पाहा ॥ तारा जो महा ॥

सूत्रधार : येणेरीती कंचुकी येतां त्याला सचिवकन्यें अन्त:पुर वर्तमान विचारितां तो बोलतो। पाहा.

(श्लोक): वाराहीं शिरकों सके आपुलीया या राजधानींत येरवीं ॥
मी रात्रंदिवस ही रीती हे निरखतों श्रीराजरत्नानिकीं ॥
दारा मोडनि तो सुताला येबलाधारा आला कोण कीं ॥
जारा ग्रेसर नाशिली कुमरी हे ज्या राजसे नेटकी ॥

वचन : आतां सारांशि येकच सांगतो ॥ प्रभावती, चंद्रवती, गुणवती तिघीही पुत्रवती जाळचाईत:. परी अग्रकार्यी आपण समर्थ आहां ॥

सूत्रधार : येणेरीती कंचुकीनें वर्तमान सांगतांच कोपायमान वज्रनाभप्रधानाप्रती बोलतो पाहा.

(छंद) : असुर राक्षसी आणि निर्जनरी। नसलियां मनाज्ञा अरे बरी ॥ नसकिजे शिरू या पुरींतकी ॥ असकी हे तुला रीती ठाउकी ॥

वचन : ऐसें असतां या नगरीं मज न कळतां कोण प्रवेशला ?

सूत्रधार : येणेरीती वज्रनाभ वाक्य ऐकून प्रधान उत्तर देतो पहा.

दरू : सौराष्ट्र ॥
सूचित ( एक योजना ते मज ॥ दैत्यराय तें ॥
साचेची भासतें याच क्षणीं निवेदितो ॥ पाया ॥ १ ॥
व्दारकेचा समाचारची मी असा जाणविला ॥
गेल्या माराधिक तीघे वीर सोडूनियां नगराला ॥ २ ॥
कामराज त्याचे तें मात्र नेणों ठिकाणा कांहीं ॥
बुद्धिग्राम तुम्ही असा स्वामी ॥ निरोपिजे दासें कायी ॥ ३ ॥
काश्यप दर्शना काली आला भद्रनट ऐसें स्या ॥
रहस्य वर्तमान ऐकलें अन्यमुखें आपैसें ॥

सूत्रधार : येणेरीती प्रधानोत्तर ऐकून वज्रनाभानें परमायाद्रंसनांजव नेत्री घाळून पाहांता प्रद्युम्नादिकेचि भद्रनटाचें सोंगधरूणी आले हें स्पष्ट कळतां पुन्हां शिरा ताणून अभांट करितो पाहा ॥ (आभीठक)

**वचन :** प्रधान हें काय पाहातां प्रद्युम्न सांब गद या त्रिवर्गासहि स्वर्गारोहण करावें तुम्ही म्हणाल हें मोठा जोरावार कैसें पराजित होतील तद्विषयीं सांगतो ऐका.

(श्लोक) ऐरावणापरिस सैराट ते सबळ वैरानुबद्ध म्हणुनि ।।
धीमा त्यजा न तुम्ही मी राखतों पाठी वीराधिवीरही रणीं ।।
मारा करा लगट मारादि यादव कुमारांस नातरी बळें ।।
कारागृहीं त्वरीत कारां चीणा चिणा मदकराजिही विरचले ।।

**वचन :** आतां विशेष बोलून काय ? प्रद्युम्नादिक तिघे यादव प्रभावती प्रमुख तिघा कन्यां यांस प्राणान्त शिक्षा करावी.

**सूत्रधार :** ऐसें वज्रनाभ बरळतां तो गद सांबास वर्तमान प्रभावती चंद्रवती गुणवती यांसही ते नेपथ्यांत येऊन दैत्येंद्राचा मान न धरितां प्रद्युम्न बोलतो पाहा. अरे दैत्याधमा, वज्रनाभा काय वृथा बडबडतोस तुझें माया (सामर्थ्य) मजपुढें चालेणा तेंची ऐक.

(श्लोक) ज्याचें मायेत घाता अडकुनि अधमा नित्य च्यैंच्यैं करीतो ।।
त्याचे दायाद आम्ही तुज न वश घडू बोल साचे च होतो ।।
माया मूर्तीची माझी विदित तुज असे बोज मायोवि तेही ।।
कां आख्या ला त अतां पडशि पळुनि जो व्यर्थ जांया नव्हे ही ।।

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्नानें स्वविक्रम वर्णितां हाय आर्थ वादी बोलल्यापरी करणार येथें अल्प बळासी आम्ही आहे सर्व सैन्यासी संयोगून यांची प्राणाहुती घ्यावी म्हणून वज्रनाम माघार घेतां आपुल्याला ललनेशीं प्रद्युम्न गद सांब येतों पाहे.

**दरू :** (मोहन. आदि)

प्रभा प्रभावती निधि ते आली पहा ।। शुभांग यादव वीर श्री ।।
श्री प्रभावती चंद्रवती सुप्रभागुणवतीशी गंभीर ।।

**सूत्रधार :** येणेरीती तिघेही भार्येसहित आल्यानंतर वज्रनाभानें प्रद्युम्नादिकांचें अनिष्ट करितो म्हणून जो दुष्टपणे पण केला तो आठवून प्रभावती प्राणनाथास विलोकून कष्टी होते पाहे.

**दरू :** (पन्नागवराळी आदिताळां)

सांवळिया आली हे अवघड वेळ कैसी ।।
जीवघेणी हा हाय हाय जिवलगा ऐसें ।।

: भोगासक्त होतो अणुरागें आम्ही ।। हा तो भोग वोढला मध्यें ।। भो भो स्वामिया तो ।। योगशालिनी कांताचा वियोग तुज कधीही न घडे तो ।। मोघरूप थोराचा वा वप्रयोग अद्य जणूं जाला गमतो ।। १ ।। दानव बलिये भारी असमान रणी झुंजती बाणें साहिती त्याचे केवी फार तनु सुकुमारी ।। मीन जेविं तो कष्टें उदकाविणें निरंतर त्यापरी ।। शीण तस्यं वाचामगोचरा मीनकेतनावीकेसरी

येणें रीतिप्रभावतीनें प्रलाप करितां तिच्या आशा स्वकरानें प्रसूत प्रद्युम्न स्वविक्रम वर्णितो पाहा.

(श्लोक) क्रोधाचे भरुनि भरीं रण मही गोद्यांगुली त्राण कीं ॥
मी धाराधरशाशरीं वरुषतां हो धाकटा ही सखी ॥
रोधा या जगीं एक वीर न दिसे तो धाडसाचा महा ॥
गद्यां तृप्त करीन मांस कवळें योधांचिया पाहे ॥ १ ॥
छेदाया मम देह सिद्ध सजले हे दारुणात्मे पाहे ॥
भेदावें शरीं केंवि या म्हणुनी मी खेदास माने महा ॥
तें दाक्षिण्य तुझें धनुष्य उचलुने दावया प्रेरितें ॥
वेदाज्ञेपरि वल्लभे करीन तें जें दाविशी इंगिते ॥

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्नाने तुझे दाक्षिण्यास्तव वज्रनामार्थ मी मागेंसा सरतो तरी तो पाहीजे कां मी पाहिजे ऐसें खंडित विचारितां प्रभावती प्रत्युत्तर देते पाहा.

(श्लोक) सवें घेउनि सर्व दैत्य प्रजाला ॥
जीवें घ्यावया जो तुतें सिद्ध जाला ॥
पडो वीज त्या तात माथां आतांचि ॥
घडो लक्षदांचि न काया हतांची ॥

**सूत्रधार :** येणेरीती प्रभावतीचे वाक्य ऐकून प्रद्युम्न बोलतो.

**दरूऊ :** सखी तूं भय न मानी ॥ व्योमभूमीपाताळ तिनीं ॥
समुदीं भुजिता शरानी ॥ १ ॥
वज्रनाभ सेन्याच्या क्षोणी निजवीन ॥
आपल्या बाणी ॥ २ ॥
ठोकीन सत्वर विश्रामखाणी ॥
हो कां दंडपाणी ॥ ३ ॥

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्नानें स्वसामर्थ्य वर्णिता हास्यमुखी प्रभावतो बोलते पाहे.

(श्लोक) सेवणें परितुष्ट होऊनि मला दुर्वाससें यापरी ॥
नाथा जो वर दीधला परिशिजे बोलेन मी वैखरी ॥
सौभाग्यें सुतासमेत बरवीं आकल्पकं नांदसी ॥
नोहे हे लटकी तपोधनगिरी शत्रूसी तूं मर्दिसीं ॥

**सूत्रधार :** ऐसें प्रभावतीनें बोलून स्वकरारविंदें शिवून प्रद्युम्नकरकमळीं समर्पितां त्याणें तें शिरसा वंदून बोलिजे ते पाहे.

**वचन :** अवो प्राणप्रिये, भा विजयसूख हें त्वां दिव्य युधरिलें. त्यानंतर

(श्लोक) लेवून दिव्य कनकोज्जल वारवाणा ॥
घेऊन खड्ग विशिखासन आणि बाणां ॥
घालोनि रत्नगणरंजित टोप माथां ॥
चाळोनि दे रतीसही रतिसौख्य दाता ॥

त्यापरीच चंद्रवती गुणवतीनें सांब, गदास दिव्यायुधें समर्पितां तेहीं प्रद्युम्न बरोबरी विजययात्रेस निघतां सैन्यरहित मन्मथादिक तिघेजण चतुरंग समेत

दुर्जन जे वज्रनाभादिक त्यांस केविं जिंकतील युद्धवार्ता तरि कैसी कळेल बरें? शुचिमुखी अशी समर्थ आहे तें सर्व समाचारही आणील असें प्रभावतीनें चिंतितां तें राजहंसी येते पाहे.

दरूऊ : आलि हे शुचिमुखी ।। हासमुखी ।।

सूत्रधार : येणेरीती हास्यमुखी शुचिमुखी येतांच इंगितावरूण प्रद्युम्नादिक विजय पावले हें निदान करून प्रभावतीनें आद्यंत युद्धाचा वृत्तांत विचारितां राजहंसी सारांश सांगते पाहा.

(श्लोक) जातां भेदुनी मंडळा दनुज ते वातायनाचे परी ।।
बिंबी रंध्रवरीचिया निपजलें बिंबाधरे सुंदरी ।।
दाटीने न फुटोनि वाट तटली दातिव तीची भली ।।
वर्णी दैत्ये कुळाचीया अडचणी स्वर्गी हिं ते जाहली ।।
तूझा जो चुलता सुनाभ जनिता त्रो वज्रनाभ स्वयें ।।
दोघे वासव आसनीचि बसतां दोहींकडोनि स्वयें ।।
मध्ये चेंचरुनि शचिवर करी च्यें च्यें वदेहीं असे ।।
खुंता रोविती कंटका कहडुनि म्यां कृत्य केलें तसें ।।

वचन : पुन्हां देवेंद्र कष्टि तो तो प्रकार सांगतो ऐक.

दरूऊ : अवनीवरी दैत्य होता येथें वमानी आणिला ।।
स्वार्थी विधाता कवणाकडून हें गाथा लोटूं दिवस कसे दुष्ट संगती आता ।।१।।
वसुमती भार खपाया धरिलें वसुदेवनंदन कृष्णाच्या पांयीं ।।
असुरांच्या स्वर्गि न ही पाया पडिल्या कैसा घडेल कीं यांच्या अपाया ।। २ ।।
अहह माझि मती गेली भ्रांत अत्यंत होउनि ठेली ।। आतास्पष्ट सांगतें ऐक. श्रीकृष्ण देवेंद्राच्या आश्रयानें प्रद्युम्नाने वज्रनाभास मारिलें गदानें सुनाभास, सांब जयंत या दोघांनी वज्रनाभाच्या प्रधानासकट सर्व दैत्यां वाट दाविलें. आतां श्रीकृष्ण इंद्र प्रद्युम्ना सांब गद जयंत यांसहवर्तमान विजयश्रीसी विराजनमान या पट्टणा येतीलसें भासलें.

सूत्रधार : येणेंरीती शुचिमुखीनें वर्तमान सांगतां प्रभावतीनें संतोषाने राजहंसीस बहुमान करितां तो श्रीकृष्ण येतो पाहें ।।

दरूऊ : (तोडी. आदि)

आला श्रीरुक्मिणी वल्लभ आला ।।
सरि दुसरी नाही ज्याला ।।
परिपाळी प्रणतप्रजाला भूषण जो व्रजाला ।।
परमात्मा हरि भव ज्याला सनादिक योगी
संनुतगत अमराहित तिमिरा र्क सुकुमारांस हत
तमालतरु समान घनरुचि अनुपमानतनु
क्षमाक्षमाजे नयन ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती श्रीकृष्ण आल्यानंतर कृष्णदर्शनोत्सुक महाबंधु येऊन प्रद्युम्नाचे नंदन तिघे कुठें म्हणून स्मरण करिता कुमार तिघे येताहेत पाहा.
कंदर्पादिकांचे आले नंदन महा सुंदरांग तिघे जन सद्गुण कंद.

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्न सांब गद यांच्या कुमारांनी येऊन श्रीकृष्ण देवेंद्रादिकास नमस्कारून नम्रतेनें कर जोडून तिष्ठतां श्रीकृष्ण बोलतो पाहा.
चतुर्थान दैत्यांचे विभव विभजूनि चतुरा हे तुम्ही राज्ये पाळा। वसती शशिभानु जंवं आहे फिरा धर्मग्रामीं त्रिभुवनीं भली कीर्ती पसरा ।।
करा मद्भक्तीचा अनुदिनी दिवाळी ही दसरा ।।

**सूत्रधार :** येणेरीती प्रियवचनें जयंतपुत्रासकट चौघांचें चित्त तोषवून चौघां जणासहि गजरथतुरंगधनधान्यवसन रत्नादिक सकलही वांटून देऊन जयंत प्रद्युम्न सांब गद याच्या कुमारांचा पट्टाभिषेक करून पुन्हां अभिष्ट मागा म्हणून श्रीकृष्णानें आज्ञापितां बद्धांजली प्रार्थिताहे पाहा.

**(श्लोक)** धर्मिष्ठास कदा विपत्ति न लगो स्वप्नांतही येकदां।

**सूत्रधार :** येणेरीती प्रद्युम्नकादि चौघाकुमारांनी प्रार्थितां त्यांचे मनोरथ पूर्ण करून श्रीकृष्ण सपरिवार नित्यानंदमंदिरास आले.

**दरूऊ :** श्री मालोजि प्रतापसिंह जो का तो कां तेणें प्रभावती चरित्र रूपकासी केलें. पाहा निरोपमाद्भुतरूपकासी ।।

श्रीरामजयमस्तु ।।

## ८. रुक्मांगद चरित्र

॥ श्रीरामजयमस्तु॥

सूत्रधार : येणेरीती सकल देवता प्रार्थना केल्यानंतर नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पाहा.

(शार्दूल) (विश्र श्लोक) ब्रंहत्वेंजाशी मानी श्रुति शिखरागिरा पूर्ण सत्याभिमानी। पावे भक्ता निदानी हृदयकसुनि जो दक्ष मोक्ष प्रदानी॥ भूती आणी प्रदानी असुनिहि परत्या सेव्या देवी प्रदानी। मच्चेतो राजधानी धरूनि हरि असो तो सदा सन्निधानी॥

सूत्रधार : नाटकार्थ संग्रहश्लोक सांगितल्यानंतर विघ्नेश्वराची प्रार्थना केली असतां तो प्रत्यक्ष येतो पाहा.

द० : कोंदूनि आनंद भर॥

वचन : अरे पारिपार्श्वका विघ्नेश्वर येवून सकल विघ्न निवारण केलि यां प्रस्तुत कार्यास तो यिकडे यावे.

अरे सांगतो अैक येथे प्रताप रामचंद्र महोत्सव विलोकनोत्सुक सकळ विव्दन्मंडली मिळाली आहे. तरी रुक्मांगद चरित्राख्य मुख्य नाटक नाचवून यांचे मनोरंजन कराया इच्छितों. कोण ह्या दिव्य ग्रंथाचा निर्माता? दिव्य प्रभाव तो ऐक.

श्लोक : प्रतापराम सद्‌भक्ति विभवोद्दाम जो महा यासिखो पहा प्रतापसिंह राजर्षी प्रणिता॥

वचन : आणिक त्याचा दिव्य प्रभाव अैक॥

श्लोक : धर्मानुगा बुद्दि बरी जयाची। वस्ती स्थली यास्तव जो जयाची॥ की हे अभिव्यक्ती म्हणुन याची। श्रीजातशी लाग म्हणुन याची॥

पा० : परंतु कां चिताक्रांत आहेस?

श्लोक : अगाध संसार समुद्र पाहे॥ जेथें त्रितापी बडवाग्नी आहे तरूं कसा यास्तव थोर चिंता जो भिनली दुस्तर आत्मचिन्ता॥

सूत्रधार : यावरि रुक्मांगद रायानें चिंता करितां त्या प्रति गुरु मुखरूपता सांपडलें. ऐसें संवदता तो रुक्मांगद महाराज येतो म्हणुन सभ्यांस सावध करावयास दौपारिक येतो पाहा.

दरू : पंचंगी बांधुनि

येणेरीती दौवारिक येवून सभ्यास सावधान केल्यानंतर रूक्मांगद भूपाल येतो पाहा.

दरू : आ०॥

रूक्मांगद भूप येतो अनुरुप मन्मथ रूपगुणें अपरूप सुलक्षण शूर मेरूसम

धीरजो सुर कुलोत्तम ही रजो चूरचूर करि वैरियां क्रूरमार प्रमुखा तया सारासार शोधुनि संसार भ्रांति जो नातळेची श्रीरमेश पदसार सैकरतनीर-धिनिम गंभीर दयाधन ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती रूक्मांगद रायानें येवून भवसागरीं भग्न समस्त लोक पाहून यांच्या आणि आपल्या वुद्धारासाठी सर्वाधिकारक अपूर्व मार्ग दे शिकोसमासी पुसवाक्याशी आलोचना करित असतां शिष्य सहित वसिष्ट महामुनि येतो पाहा.

**दरू :** मोहनं ।।

ब्रंम्हखेव सुत येतसे हा ।।
ब्रंम्ह निष्ठ जो महाब्रंम्ह मूर्ति साक्षातचि केवळ ब्राम्हण गणमणि हा ।। १ ।।
वीताखिल विषयाशाकलमष वितत पुण्यराशी पीतवसना पदचिंतन हा जगीं प्रति नसेची ज्यासी । २ ।।

**सूत्रधार :** येणेरीती अरविंदासनाचा नंदन वसिष्ठ महामुनि आल्यानंतर त्याचे पादारविंदास वंदन करून रूक्मांगद राजा बोलतो.

**छ० :** दुरित दुष्टशीं आर्द्रही महा हरि तया प्रति सद्‌गुणावहा ।। त्वरित देशिका साधका कथी गुरुवरा मनी आवडिती ।। अथवा तूं म्हणशील कीं ध्यान कर्मादिक साधन असतां कां चिंता करितोस तरि याचें उत्तर अैक.

**श्लोक :** तरूंजरि करूनियां हरिपद व्दयध्यान मी ।। दुरंतचलाचित्त हे म्हणुनि त्या पथातें न मी ।। अहो गहन हे महा वितत मार्ग सांग स्वयें ।। महाशतसहस्त्र शाजमिल प्रत्यवायान्वयें ।।

**वचन :** यास्तव समस्ताधिकारक पाहे पाप निरासक सुलभो पाय निरोपून किंकरास कृतार्थ करावें ।।

**सूत्रधार :** येणेरीती रूक्मांगदाचे वाक्य अैकुन वसिष्ठ महामुनीने विशिष्ट दानव्रते ध्यानासि आणितां त्यांत येक भगवत्प्रसादक साधन सकल दुरित निवर्तक वुत्तम व्रत अंतःकरणांत स्फुरतां वात्सल्यानें स्वशिष्यास उपदेशाया कारणें उद्युक्त होता तो रूक्मांगद रायानें धर्मार्थ कामविभागिनी धर्मपत्नी जे संध्यावलि तिणें स्वारस्यपूर्वक ते रहस्य ऐकावें म्हणुन आलोचना करितां यदृछेनें ती येतेपाहा.

**शा०वि० श्लोक० :** विंध्याद्रि प्रतिमस्तनी सुचरितें चिंध्या अधाच्या करी । वंध्या जे म्हणवीत दुष्कृत वितयावंद्या सत्याचेथरी ।।
धंद्याचे त्यजुनि दुज्या निमजनी संध्यात रूक्मांगदा ।।
संध्या रागनिभा घरा प्रगकटली संध्यावली हे तदा ।।

**दरू :** (आहिरी) आ.

सध्यावली येते संभ्रमें महा विंध्य पर्वतस्तनिजे सिंधुर गारमिनी पहा ।। अ ।।
योचना करूनि पुरी वेंचुनी सर्व चातुरी ।। हे चतुर्मुखे सुंदरी ।।
साच निर्मिजेली बरी ।। १ ।। पैटणी साडी भरजरी ।। पेंटकांरे माजि घरीं ।। पेठ प्रज्ञेच्या साजिरी ।। वैटली चातुर्योत्तरी ।।

सूत्रधार : येणेरीती संध्यावलि येवून वसिष्ट महामुनीस नमून रूक्मांगद रायांचे पार्श्वभागी असतां शुभावह एकादशी व्रतोपदेश उर्वशितनय करितो पाहा.

(छं०) तुज नृपोत्तमा आजि आदरे। गुज निसे निरूपितो शास्त्रिचेबरें।। आजि हरादिकां प्रीतीचे महा। निज पदा प्रति पाववी पहा।।

(पृथ्वी) : शिणेत गिरीगव्हरि बहु फिरोत तीर्थावलि।। धरोत कढिण व्रतें जप करोत पुण्यस्थलीं।। तरोत्त निगमांबुधी अनुसरोत योगाध्वकीं।। सुरोत्तम दिनी नरोतमातेनकीं। प्रयाग जलमज्जनी सुकृत वुक्त जे सज्जनी।। तसेचि अधवर्जनी फळ हि जो दया वर्जनी।। ततोधिक सकृज्जनी कृतहि श्रेयता मज्जनी। सर्मपित रंजनी स्थिरवि आणि श्रीरंजनी।। २।।

सूत्रधार : येणेरीती वसिष्टानें विष्णुव्रत महिमा वर्णितां निराहार पंचक युक्त प्राण पंचक घेणार विष्णुपंचक व्रत काय म्हणून रूक्मांगद रायानें पुसतां अरूंधती वल्लभ वुत्तर देतो.

दरू : मोहनं।। आ।।

परम शुद्धहो हरिवासर व्रत परिस नीट कानी राया।। दुरित कानन दावानळ जें निरूपमान श्रीहाहि वानी

(श्लोक) अश्वमेघ सहस्त्राणि वाजपेय शतानिच।।
येकादश्युपवासस्य कलांनाहीति षोडशीं।।

(दरू) तुरग मेघ बहुसहस्त्र संख्या परिहि वाजपेय क्रतुशतशः।। करिती नित्यजन चुकत विधीशि धरणी वरि सुयशानिखधि विद्या निधिसहि अर्पितिनिखिल वित भरभरू नी गणशः परि येकादशीव्रत निरंतांची सरिस पावतिहे लवही महिशान।। हरिति विप्रधन हे निरंतर।। धरिति भाजा गुरूची हि दुर्जन।। गर देति आणि घरहि जाळिति करिति ब्रंम्ह हननें परपति मद्यसुराहि अनुदिन प्रचंड दोषहि विरचिति दारूण।। तरति असेहि येकादशीसि निरशन मात्रें अवघेंहि जन।। २।।

(श्लोक) येकादशि करणानी---जे कां पापें वुपात्तचिरकाळि।। येकादशी वुपवासे येका त्याची मळूनिये होळि।।

(दरू) अमरमंडळि अधिकजसातो कमलनाभ करूणेची खाणी प्रमुख तशीच सकळहि तीर्थि विमल जान्हवी आणि सुमनवृंद श्रीतुळशी उत्कट।। तमभव तिमिरा कीर्ति हानी।। समर पुंगवा समज त्यापरिसमस्त व्रतगण आणि ध्यानीं।।

सूत्रधार : येणेरीती वसिष्ट महामुनि नें हरिवासर व्रत वुपदेशितां संतोषाने धर्मांगद जनासी बोलतो.

दरू : पंतुरावळी।।

लाभ आजि जाहला लक्षांचा।। लाभ होचि पद्मनाम व्रताचा।। शोधन उपदेश तो भला घडला।। १।। पातक लक्षण पायोधितारण हेतु तुवां थोरशे तुहा दाविला।। २।। या वीण साधन भाविन अन्य मी पावन स्वामी कृपा राशी।। ३।।

कुंठित श्रीवैकुंठ मार्गमुनि कंठीरवा निष्कंटक तां केला ।। ४ ।।
मोठये धणीसुख पेठेचे सनकादि वाटतसों त्यांच्ये वांटे करिअंहि ।। ५ ।।
साखर पडियेली ते खरी ।। अंतक--लेखकांचेय मुखीं लेखणिही राहिली ।।

**सूत्रधार :** येणे रीती संतोषातिशयाने कोंदाहून देशिकेंद्राच्या देशिकेंद्राच्या चरणार विद वंदितां ब्रंम्हनंदनाने--आशीर्वाद पूर्वक गाढालिंगन देवून आत्ममंदिरीं प्रवेशतां तों कांहि योचने सांटि सचिवाचें स्मरण करितां अचिरकाळे येतो पाहा.

**दरू :** सावेरि ।। आ ।।

रूचिरवेषधर रूक्मांगद नृप सचिव येतो पाहा ।। वीऊ चितज्ञया नांवे -- विश्वविख्यात जो-सुचीत नीति पारंगत तो महा ।। आ ।।

**सूत्रधान :** येणेरीती सचिव येवून रूक्मांगदास विलोकुन बोलतो ।।
(च०) ।। कधिही आननीं या वरि गुणोदधी न देखिली ते कला म्हणों निधीच लब्धकी त्याहुनी भला ।। अधिक भासतो लाभला भला.

**सूत्रधार :** येणेरीती उचितज्ञ सचिवानें विचारितां वसिष्ट महामुनिने उपदिष्ट एका-दशीव्रत श्रवणाने आनंद युक्त झालों ऐसें संवादतां प्रधान बोलतो.

**वचन :** आपल्या अम्हासर्व वैभवानृपवरा विभागी गुणार्णवा--कृपणासा तरि गूढ अर्थ हा लपविशी नव्हे युक्त हें पहा.

**सूत्रधार :** येणे रीती प्रधान बोलतां येकादशी व्रत प्रशंसा पूर्वक राजा बोलतो.

**(श्लोक)** न गंगा सुभंगा कुला जाडई नव्हे नर्मदा शर्मधा तीहि ऐसी ।। नया ग प्रयाग प्रभास प्रभावें तुलाहें तुलाहें कळोगा स्वभावें ।। १ ।। पाथेय परलोकाचें माया पाथोची तरी--पातकाख्या घट ध्वंसी हें पाथ रथरापंशी ।। २ ।।

**वचन :** ऐसे महाप्रभावें युक्त येकादशीव्रत वसिष्ठ मुनि पुंगवाने सांगितले. इत:पर तूं सर्वांशी हि भाग्याचा. अंही आप्त जनासह वर्तमान हे सर्वंही व्रत आचरू--इतरास प्रकट करायास गरज नाही ।।

**सूत्रधार :** रूक्मांगद रायाचे वाक्य ऐकून प्रधान उत्तर देतो पाहा.

**दरू :** पतुवराळि ।। चा ।।

नोहेयेचि हें युक्त सर्वथा राजेंद्र सिंहरीति बरी मोहांबुधी मग्न लोकहे वुद्धव सकलहि ।। हरिप्रियव्रत याचा लाभ सतत करवी यशासिज्ये जोडी सर्वांची ये करी ।। अ ।। वरि वरि दुस्सहनरकादि यातना--निरापधी भोगूनि सतत मागति--परम कुत्सित स्थावर तिर्यग्योनिहि फिरूनि निगुति ।। सरस पूर्वं पुण्ययोगेनरजन्म तनु लाहुनिहि हरहर पावती हे अधोगती । दुर्गतां तारि करूणे हरिव्रत लक्षण तरणोपाय त्यासी करूणें सांगूनि तारि महामति ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती उचितज्ञ सचिवाचे वचन ऐकून 'भलारे भलारे । नामा सारिखी उचित क्रिया केली' म्हणवून त्याचे अंत:करण संतोषवून येकादशी व्रत सर्व लोकांनी आचरावें यासाटीं पट्टणीं दांडोरा पिटीयास्तव कोत्तवालास रूक्मांगदाने आठवितां तो येतो ।।

दरू : (थेन्न) अडाणा ।। शा ।।

कोतवाल येतो पाहा–जरावात वेगेंस नाथ आज्ञेपरि–हाते करितोचि मुजरा ।। दो ।। आ ।।

सूत्रधार : येणेरीती कोतवाल येतांच रूक्मांगद रायानें सचिवाचे मुखावलोकन करितां त्याने राजाज्ञा प्रकार निरोपिता 'जी शेवेशी हाजीर' म्हणतां प्रधानासहित रायाने स्वमंदिरी येतां––कोतवाल दांडोया पिटीत सर्वास ताकीत करितो पाहा.

श्लोक : करून अशन नागा–देवकी नंदना गा–हरिदिनि निशि जागा थोर पावेल जागा विषयवनीं न वागा मर्दुनि मोहबाधा ।।
नसरूनि तुहि मागा––दास्यदेवासि मागा ।।

दरू : आहिरी ।।

येकादशी अंगजे काहीं कर्तव्य काज आहे ।। नीट ते कान भरूनि ऐकीजे आद्यंतास पाहे ।। दशमीस अनिषिद्द अशन––करावे येकवेळी आणि विसरावी स्त्रीव्यसनादिवाबु गीट कटवाळी ।। अंन्न सेवुंनये येकादशीस रात्रि दिवस कोण्ही परिछिन्न पापउच्छिन्न व्हावयाशि अवघे जणी ।। हरिगुण कीर्तन करीत ऐकतोचि सारे जागा ।। रात्री परस संतोषे हरि तुम्हा देयील. धरा जागा ।। व्दादशीस पूजूनि सारस नाभा अच्युतासी कीजे ।। पारणें भवसिंधु पार पावेल निश्चयेशी–गर्भिण वृद्द हो अर्भक असिल्यां शक्ति पाहून बरा ।। दुर्भर हे अन्नें निर्भीऊ सांगतो––शास्त्रधर्म दंडकहि जरि––खंडाला दंडय व्हाल राया––आणि दंडपाणिहि दंडील पाप समूळ जाया ।।

सूत्रधार : येणेरीती नगरांत नगारा बडवुन आबाल गोपाल सर्वहि एकादशी व्रत आचरा म्हणुन ताकित करून राज्यांतहि येणे प्रमाणे––
कोतवाल आपल्या ठिकाणास पावल्यानंतर यमयातने पासून सुटलो म्हणुन प्राणिमात्र हि हर्ष निर्भर अ ध्यात कोलाहल झाला त्याचे मूळ शोधिता किंकरासमवेत अंतक येतो पाहा.

दरू : कन्नड ।। अ ।।

चंडभानु प्रचंड येतो पाहा ।। दंडपाणी नादें उदंड दूतांसहित हो ।। मुख्य सरसीरूह सुकलें बहुवस सुख नावडे चित्ता: सोडिताहि श्वास––ति प्तादिक स्वजना सहित दूरूनि वुत्कट निर्वेदास तियम येवून विरामून चित्रगुप्तास विलोकून बोलतो ।।

दरू : उशानि ।।

कायहें जिणें लाजिर वाणें ।। बायको परि पौरुषाविणे ।। अ ।।
लत्ता खावूनियां लक्षदां ममकरें ।। वृन्तहीन नरकी पडिल्ये निर्धारे ।।
उत्तम श्लोकसे आज वुद्धरलें ते त्वरें ।। उत्तप्त अंतर्थ ज्वरें ।।

सूत्रधार : येणेरीती चित्रगुप्ताशि संवादून हे दुःख नारदमुनि पाशि निवेदिल्याने तो कांहीं वुपाय सांगेल ऐसे चिंतितां तो अकस्मात कलहप्रिय येतो.

दरू : शाहना ।। शा ।।

कलहाचे बीज आला कलित वल्लकी हा ।। नळिननाभाकीतनचि विलसे ज्या ।। हा कलुशाचल भेदनीं जो कुशिल रूपी पाहा ललित नारदाभिदान–लसमान सुकृत हा ।।

**सूत्रधार :** नारद मुनीनें येवून सन्मुख यमाते पाहून त्याप्रति समाचार विचारिजेतो पहा.

दरू : असावरि ।। जं ।।

म्लान मुख कां तुझें बहु आज गमतसे मानसहि काहलें ।। अ ।।
निरय खेदा प्रतिन नारकीं भोगितां करिति आक्रंद तो ।।
कोटें आता दुरित लेखा लिहित नाहीत खरूज खाजवीत चित्रगुप्त असति
स्वत: कां चं पुरूष येकहि या म्य पट्टणापरिस कां न येति
महग्दुणा-त्वरित याचिया प्रति तंरणिनंदना सांग संप्रति ।।

**सूत्रधार :** येणेरीति नारदानें पुसतां वैवस्वत वुत्तर देतो,

दरू : आनंद भैरवी ।। शा ।।

नारदा ऐक नारदा उत्तकांहि भूरमण रूक्मांगद तो महि सार साक्षांचे व्रत आचरूनि साचे तेणे जग तारियले पाहिं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती यमाचें वाक्य ऐकून नारद प्रत्युत्तर देतो.

**वचन :** अरे अंतका या तुझ्या वृत्तिचा अंतक मलासना विणे कोण्ही करणार नाही त्याला शरण जाणे उचित.

**सूत्रधार :** ऐसें नारदानें संवादतां या प्रकारें हितोपदेश करून नारदानें अंतर्धान पावतां तो यम धर्मानें ब्रंम्ह देवाचे ध्यान करितां तो येतो.

दरू : तोडि ।। आ ।।

येतसे हा पंकजासन येथ तेजो मूर्ति कैसा भास्करा परि अतीवदीप्त या जनी चेतनी जो प्रखर गुणैकनिकेतनात्म भूभुवनपिता महात्रे तसा आसन्वत जो श्रीकांत कांते कांत निंचितत्तानी ।।

**सूत्रधार :** येणेरीती ब्रह्मदेवानें देव समूह सकल आल्यानंतर त्याला यमाने प्रणाम तेथें खिन्नवदन यमास विलोकून आश्चर्य पावून अमर परस्परें बोलताहेत पाहा.

दरू : शंकरा भरण ।।

हे तवे आजि आम्हा निरूतें योजने माजी रवि तनयहि तो ज्ञणि
वडीला म्हणून स्वमतें ।। अ ।। जगत्पतीच्या आज्ञेनें नारकी जन अवघे
दंडित काळ ढकळीताहे हरि हरि तोहि आखिल जनासि नाहीं निरूपम
बैसला हे कारण न सुचेची याशि केलियां तजवीज मनि हे ।।

**सूत्रधार :** येणेरीती देवसमूहा सगट ब्रम्हदेव आल्यानंतर ब्रंम्हदेवानिकटीं छिन्नमूळ वृक्षासारिखा दंडपाणी दंडप्राय पृथ्वीवरि पडून फुंदतां वायु आप आपणांत

बोलतो (श्लोक) पुंदवीत पन नंदन सर्व लोकां। तो विनोद भलावि लोका। हे सत्य यास्तव गमे मज लोक गाढा। होतो प्रनष्ट अचिरें जन दुःखदाता ॥

वचन : यास्तव जाण त्यानें कोणाचे अंतःकरण दुखवु नये दुखविल्यानें अंतका प्रमाणे त्याचा प्रांत नीट होणार नाहि ऐसे अंतरि निर्धारून विधि संन्निधानीं सविस्तार वृत्तांत यमधर्मास वायु विचारितो ॥

(श्लोक) : कोणें गा तुज जिंकिलें निजपद भ्रष्टत्वहि आणिलें।
कोणे या गणनापटाशि पुशिलें सर्वाक्षरां नाशिलें।
हा निःस्संशय हेम गर्भ असुख ध्वंसोनि तुझे महा ॥
स्थापील स्वपदि कथी म्हणवुनि वृत्तांत आद्यंत हा ॥

सूत्रधार : येणेरीती पवनाने पुसतां ब्रम्हदेवानेही खुणावितां त्याप्रति यम उत्तर देतो.

सूत्रधार : येणेरीती परस्परें देव संवादता छिन्न मूळ वृक्षासारिखा दंडपाणी दंडप्राय पृथ्वीवरी पडुन स्फुंदत ब्रंम्हदेवाशी बोलतो.

(छंद) : असूनिया धणी तुज सारिखा ॥ विषम दुर्दशा हे सुरादिकां। आपुलिया जना ते घडुनये ॥ स्वपद भ्रष्ट मी जाहलों स्वये ॥

सूत्रधार : येणेरिती भानुनंदनाने संवादता हिरण्यागमनि पूर्वोत्तर संदर्भ सांग म्हणता धर्मराज बोलतो.

दरू : पुन्नागवराळि ॥

सांगावी मात तुज ते सांग काय ॥ आंगाची येकेचि होते आगी स्मरतां हाय हाय ॥ वोसरे नादाढी रात्रि दिसहि ज्या ठायां माजी-भो सारस नामपुत्र जी मी होतां अत्यंत दोषपर प्राणि पहाजी ॥ रोदन ध्वनी सोसवेना अश्राव्य जी अशिहिं नगरी ते माझी। वोस पडिली येकहि न मिळे वोखदासहि जी आंता ॥ १ ॥

दंडाशि खंड तो अमर मंडना कोठेंचि नाहि-खंडित टावेंहि तुजहीं ऐसे असतां-षंड पुरुष आणी नारींहि करूनी पातकचंड अनुदिनी यांमहीं। दंडुनि मम दूतांसहि। अंडजवरवाहन जाती अंबुजाक्ष गेहिं आतां ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरीति वैवस्वताचे वचन ऐकून सर्वलोक वुद्धरावयास हेतु काय म्हणुन विधाता विचारितो.

दरू : तोडि ॥

नवल वाढे मोठें न वदवेचि मज कवण्यासाधने जन अवघें वुद्धरले सहज ॥ अ ॥

सतत अव्दैत निष्ठा सर्वांशी बाणली काय-वितथ हें मगे आशाहत जन सर्व पाहे ॥ १ ॥ नलिनाक्ष ध्यानी रत नर जाले नातरी कीं चलाचित्ता साटि गोष्टी सर्वथा हे न घडे कीं ॥ २ ॥

शरण रिघाले कि वाप्ररारि सजन साचें स्मर पर वइयां त्यांशी स्मरण केंचें ईशाचे ॥ ३ ॥

प्रयाग तीर्थि अथवा प्राण त्यागिति कीं साटें प्रयासरूपे काजातें प्राणियां अशक्य वसे बारे ।। ४ ।।
वाराणशी माजी काय थारा केला समस्तानिसारार्थ नव्हे तो लोकही राहिला स्व स्व स्थानी ।। ५ ।।

**सूत्रधार :** येणेरीती ब्रम्हदेवानें विचारितां यम उत्तर देतो.

**वचन :** सूर्य वंशोभ्दव रुक्मांगद म्हणुन येक राजा आहे. त्यामुळे माझ्ा अधिकारास पाणि पडलें. त्याने एक विष्णुव्रत निर्माण करवुन सर्वही त्या धर्माच लाविले तोचि प्रकार सांगतो.

**श्लोक :** लागतां नवमवत्सर जो कीं। न्यून आणि अंयिशी साहिलो कीं ।। अन्नसेविल अहो मम देशीं । पात्र तो खळ महव्दिपकेशीं ।। १ ।। प्राणांत्तावधि दंड योग्य जरी ते आणावधा दुर्गुण । जे नाशार्हं नव्हेती विप्र दवडा ते नारकी येथुनी ।। जाणा तात तनूज हे गुणवती कीं नायका हि तर्हि । मानातीत करा समस्त आपली माना अशी वैखरी ।। २ ।। वेधेचि तो व्दिज अघांत रामनाहि त्याचा मुखासुर मुखाप्रति शीघ्रलावा दुर्जंतुहि छंजंकतो अशिल्यां बलावा । मत्सन्निधी मीन त्यानविलंबलावा ।। ३ ।। लाभलेखां सांगुनि काय या प्रकारें रुक्मांगदानें ताकिद केल्यासाटि सर्वहि हरिभक्त झाले आतां येकादशी व्रतानें घर बुडविलें तेंचि ऐक सांगतों.

दरू : घंटा ।। येन्निदलचू ।।

मर घेणे भेटलें सारसासना अहा ।। हरिवासर वृत हे पहा वरकड साधनें तां पुसिजेलिजें नरनारी कोण्ही हि न करिति ते अहा ।। पातकी पतित किरात कि तव अंत्यजातहि महादुर्मती यातनेशी योग्य यातीत कुत्सित यातीच्येहि सहसंतती भातपाणी मात्र नातळूनि सर्वनाथ भीवुनि असताति लात मारुनि अम्हा मात मात करूनि जाती अक्षयधामा ज्यास्तव जगती ।।

**(श्लोक):** झालें तें गड्ग पत्रांन्वित व्रन बरवे जोड अंभोज पत्रा तप्ताय स्तंभ वित्रासन-हिमगिरि साशीत झाला । पवित्रा कोण्ही घालीन चित्राहुति । जगनजगतीं दैवरेखा विचित्रा प्राणाग्नि क्षेत्रासहि रण न मिळे जाठरा वितिहोत्रानाशावस्थ झोंबली काळ पाशा केली दंडेलोक दंठिड निराशाशास्त्रे सारी यारनेची पलालीं अस्त्रें शस्त्रें सर्व तेणे गलाली इंगल वैतरणीचे लंध्य नभें मत्युरैक सरणीचे शीतळ बहु घडले विझुनी कालेचि कोलसे साचे ।।

**(छंद):** दहन तप्त जे फार वालुका । जाहली जोडते शीतवालुका । प्रहरि जे व्रत स्थिसदानरक फार वर्षलाजी आम्हावरी ।।

**वचन :** आणिखी एक चमत्कार ऐकावा जो जो एकादशी व्रत करितो ती त्यासहि हे दिव्य तिथि विष्णु सारूप्य देते. यातून

**(श्लोक):** लोकातीत प्रजापती गमतसे एकादशी हे तिथि ।। जे का प्रत्यह दत्त कोढि शतशा देखार्थ धाना प्रति ।। श्री कौमोदकि शंख आणि कमला लेखाच नाही कदा ।। त्याकाही वनमालिका गणवती ना कामितार्थ प्रदा ।

(श्लोक) पीतांबराची ।।

येणेरिती सविस्तर वर्तमान सांगून आपणास अधिकार लागत नाही म्हणून यमधर्म राजा स्वनिंदापूर्वक पुन्हा निर्वेदानें ब्रम्हदेवाशी बोलतो.

दरू : मध्यमावती ।। यवरय्या ।।

धिग् धिग् जिणे त्याचे देवदेवा भक्षि वुगले जो वेतन करूनि स्वामि सेवाजगती भार तो जाण पापठेवा–आग आणी तरूवरसकट तयांहुनि श्लाघ नाहि या गणितो भावा ।। १ ।। दंडमुद्राहि अपली आतां घेयीं अमरमंडना स्वकरिं पट्टि येकदेयी षढ प्रभुशेवा नरूचे चित्त गेहीं ।। तुंड तुंड करी मुंडही शस्त्रे तुंडन दावी परि कोणासहि ।। २ ।। पुशिला पट पाहे को राहि शोभाचान लावुनि वुशिरा मोसबादिधला सर्व साचा पुशिला वृत्तांत कथिला म्या स्ववाचा–कुशकेतन सुत कुशल असे तो. न शके करूं अधिकार निजाचा ।। ३ ।। वुसणे फेडिले पूर्विल प्राणियानि रात्रि दिसहि तिवुनि अमुची कणिक यानी बसला सर्वांशी धाक हृदया स्थानी–दिसति हरिजनचि दशदिकप्रांति विसर नसे हे सत्यचि मानी ।। ४ ।।

श्लोक : प्राणी जे मज वंदणार अवघे पाणीव्दया जोडुनी । पाणी पूर्ण विसर्जिले तिहि जापानी बरें झोडुनि–वाणीने निगादनये अजि सभा स्थानी स्वमानाची या । हानिला म्हणवुनि मौन धरिलें हा निश्चये घातया ।।

वचन : इत:पर लक्षावधि दक्षिणा दिधल्यानें हि दक्षिण दिशाधिकार मला करणे नाही. ऐसे बोलून दंडमुद्रा कोरेहिशोबाचे रूमाल स्वयंभूपाशीं ठेवून दंडपाणीने सांष्टांग दंडवत घालितां ब्रम्हदेव बोलतो.

(श्लोक) नोहे हा नवलाव भानु तनया पाहे विचारूनियां मोहे तां बहुसाल गा शिणविलें येकीं हे भलें ये पापियां ।। याहुनि तुज दंडचेंड घडल्या लाहेल दोषा स्वयें राहें झांकुनि आसनाशि मज हे साहेचिना निश्चये ।।

वचन : अखंड पाप करणार ते कैसे भले होतील ? त्यांनी अम्हा दंडिल्या प्रयुक्त स्वामीनी संतोष मानिल्यानें तुंची चाकरी पुरे.

ब्रं.व. : अरे यमधर्मा रूक्मांगद रायाच्या देशी असणार लोकांनी येकादशी व्रत करून यास्तव सर्वहि ग्रेखादे दिवशी तर्हि हरिनाम वुच्चारिले असेल यास्तव सर्वहि पडित पावन जाले त्यांचा तूहि व्देष केल्यास या वरुनि निशेष क्लेश प्राप्त व्हावे परंतु दैवाधीनें चुकलास. तूं म्हणशील भगवन्नामाचा इतुका अतिशय काय तोची सांगतो.

दरू : असावेरी ।। रूपक ।।

नामरत्न हे अमोलिक नामरत्न हे कामितार्थ दान विषयी कामधेनु परीस. अधिक । अ. ।। जपति सदा संत सनक नृपति बौधि विधिही जनक निपुण थोर थोर आणीक अपरिमय गुणक विपुल मतिहि विश्वजनक निपुणहि तन्महिम गणक । वुपलतसे म्हणति कनक ।। ते वुपरत ज्याचेनि धनिक ।। १ ।। सकल

साधनाग्र गण्य नहि भेद ववैगुण्य–अदिल दोषकरि शून्य–पिकवी फार पुण्य–न करूनियां धर्म अन्य ।। प्रकट भक्ति निरत धन्य–अकळ शुद्ध चैतन्य ज्या कोण होती अनन्य ।।

(श्लोक) रजस्वला जे श्वपची तियेशी । रमे सदा जो नर निर्भयेशी ।। भक्षी सुरापक्वदुरन्न तोहि । नामोक्ति मात्रेवरि मुक्ति देहि ।। १ ।। अवशेंशीं वदनीं वदे हरी ऐके जो श्रवणीहि त्यापरी नरतो तरूनी अघांबुधी मिसले श्रीहरिच्चे पदीं सुधी ।।

(दरू) राखिला मान आमुचा बंधीखानी न घालितां मोकला केलाशी–मंदमती दाक्षिण्याने साचा ।। १ ।। प्राणनाश केलियां जाण तूझा तेंहि ।। कोण असे शिक्षक पै त्याचा ।। २ ।। रोष टाकूनियां दूरीं रोष पराव्यावदरू तोषि कीजे नियोगतां निजाचा ।।

येणेरिती हिरण्य गर्भाचें ।। जनक आमचा जो जगत्पति मनुज शसक्त जे त्याचीयां प्रति–अनुदिनी तुवां त्याशीं दंडणे अनुचित स्वयें नीट पाहणें

(श्लोक) निग्रह हरि सक्ताशिकैसा बापा घडेल मुक्ताशी सेवक दंडिल केवीं–भूपति पुत्राशि योग युक्ताशि । येकादशी व्रत परी तुज दंडिल्याने । मी तो सहाय न करींच तवाभिमाने ।। केल्या घडेना अति भाजन प्रत्यवाया कशी यित:पर नव्हेल मात्र वांया तथापि तव पक्षन्या धरिलियां दिनेशार्भका ।। यथार्थ आजि या तनूसहि बसेल मोदका ।। हरि प्रिय जनांसवे क्षण विवाद केल्या पुरें महत्तरपदीअुनी च्यवन आपुल्या सत्य रें ।।
येणेरीती ब्रम्हदेवाने समाधान करितांच यम बोलतो.

श्लोक : तुझ्या रम्य हे ऐकतां वाक्यमाळा ।।

दरू : गुम्मकांबोदी––आदि ।।

आली हे मोहिनी–अखिल प्रमोहिनी । ललित स्वरूपिणी कीं रोह्रिणी कलशोपम स्तनी कोकिळ मंजुवाणी । विलासित नीलालक विचरवित वेणी कलित कोमल वेषें भुलवीत सर्व प्राणी । ललित मत्तेभगति लावण्यखाणी ।।

श्लोक : पिकही शिकती कंट माधुर्य टेवी ।। मधुहि मधु रता गोड अत्यंत भावी । सरस सरसिजासी भीडती नेत्र जीचे । विधुहि विधुर जाला कांतिनें आननाचें निवाल्या श्रुति ध्वंस जा श्रमाला । मन स्तुष्ठिते सांगतांही पुरेंना । आहा जीव देहातुनी कीं झुरेना ।।

वचन : या परिचे दक्षिण देशाधिपत्य केल्या परीस भिक्षा मागून पोट भरणें युक्त. आतां खंडीत एकच सांगतो.

(श्लोक) एकादशी न सोडि जों रूक्मांगद नृपाळ हा अधिकार नको मातें तत्काळ पितामहा ।।

सूत्रधार : येणेरीती अश्रु गाळित गग्दद स्वरानें यमानें बोलतां रूक्मांगद रायाचा व्रत-भंग जैसा होयील तें सांग यत्न करितों त्वां सुखरुप स्वलोकास जावें, ऐसे

सर्वलोक पितामहाने आश्वासितां 'जी आज्ञा प्रमाण' म्हणून वैवस्वतानें स्वस्थानी प्रवेशतां विश्वविमोहिनी रूक्मांगदे चित्तभ्रामक एक लोकाभिराम रामा निर्माण व्हावी म्हणून मानशी चिंतीता चित्तानुरूप ते मोहिनी येते पाहा.

(श्लोक) पिकहि शिकति ।।

(दरू) आली मोहिनी ।।

सूत्रधार : स्वमनो निर्मिता दिव्य स्त्री समोर वुभी ठाकतांच आप आपणांत ब्रम्हदेव बोलतो पाहा.

(छंद) हृदयी ज्यापरी मूर्ति चिंतिली । सुदति हे तशी भासते । भलीमद विवर्धिनी मानसनासहे । मदनही इला मोहिल स्वयें ।।

सूत्रधार : हिरण्य गर्भानें अनुवादून आरंभिले कार्यासिद्धी व्हायासाठीं प्रियवचनी खुलवितां जगन्मोहिनी बोलते पाहा.

वचन : अगाये सर्वलोक पितामह तुझा मनोभाव पाहतां कोण्हि येका भूपाचे अंत:करण मोहवून नियम भ्रष्ठ करावें त्या साटीच माझे शरिरहि निर्माण केलें. तव्दिषयीं चिंता करायास गरज नाहि तेंच सांगतें ऐक.

दरू : भैरवी ।। अट ।।

न धरीं कांहि चिंता नळिनासना ताता–उदरी आपल्या आतां वदन पाहुनी माझें हृदयीं धीर धरिसा त्रिदशोत्तमा नाहि त्रैलोक्यि निरखिता सनकादिक येकासनि तप करणार–मननशील मोठये मुक्त ब्रंम्हाकार–धन कटाक्षे क्षणें विलासे मानि मी भुलविन सत्वरा ।। १ ।। भंगोयेतां धैर्य श्रृंगालरवती रंभा संगोपिलें ब्रंम्हचर्याचि या स्तंभा रंगुनी मम रंगतो शुक संग यिछिल. जी अदंभा ।। २ ।। आपली करू नये आपणेंची स्तुति । कीं पाविजे तेणे बापा अधोगती । मी पणा प्रति जी पहा करितें परि अति ।। ३ ।।

(श्लोक) लंघोनी विषय स्पृहाबधिचिया तुं गोर्मिमालातती । तंगोनी बसल्ये सदानिज सुखी भंगोनि भेदाप्रति । पाहूनी ममदेह सौरभलवा रंगोनि का मी मति लंगोढाहि गळूनि धांवतील. मत्संगोत्सवाते यती ।।

(दरू) नृपतीस कोण पुसे तेथे महामती-शुक सनकादिक ठकति हि जेथें-प्रकट मनी धरूनि प्रीती महामति ।।१।। मुख जो माझे मुदित न पाहे ।। सकलहि तों वदन नीती महामति ।।२।। अवलोकिलियां म्या द्रवतिल गिरी हि अवघे पाहा-नवल रीती महामति ।

(श्लोक) सोहं चिंतिति तोवरी बसुनीयां पांथीस योग्याचिया । गातीहि हरिनाम पावन दिवाराति भल्ये घातया । होति तों वरि कर्मनिष्ट अति त्हन्योतीसहि रंगति जो तीक्ष्ण प्रमदा कटाक्ष विशिखा घातींन ते भंगती ।। ब्रंम्ही भूत घडूनि जे मिसळल्ये ब्रंम्ही जिता मुक्ति कीं । ब्रांम्ही मी फिरवीन तेथूनी तयां ब्रांम्ही गणी हे निकी ।।

**वचन :** आपण म्हणाल कीं गंगा सागर न्यायें जैसि स्वरूप मिसळून तदाकार झाली ते कैशे फिरविशील ? तरि याचें वुत्तर ऐकावे.

**(श्लोक)** अस्तक्षिप्त घटोदकां हरिहरयेकीं आपुल्या मागता दिल्हे तेचितयां जसे विधिसुते वर्तेन तैशी स्वता ।।
हेचि कथा प्रकटून सांगते.

**सूत्रधार :** येणेरीति मोहिनीने आत्मप्रशंसा करितां हंसासन परम संतोषाने रुक्मांगद रायाचे वर्तमान सांगतो पाहा.

**दरू : सौराष्ट्र ।।**

ऐके नंदिनी माझीवाणि । आतां कल्याणि ।। हरिवारस व्रतीं आसक्त हरिणाक्षि आहे ।। नरनाथ एक विष्णुभक्त धरिती जो पाहे बरवें रुक्मांगद नामे युक्त करिजे लवलाहे ।। तरुणीव्रत भंग त्याचा वरुनी आज्ञा शिरसाहे ।।१।। तरुनी तो आपण पृथ्वी पति । उगला न वसून तरुणी निजराज्य सर्वाप्रति । प्रकट शासूनि करवितो श्रेष्ठव्रत हे अति नगरिं बैसुनि तरणी तनयाचे तेणे पुर ओस पाडिले जगति ।।

**सूत्रधार :** येणेरिती जनकाने ब्रम्हदेवाने आज्ञापितांच जी मी सांगितल्या कार्या हाजिर आहे म्हणून मोहिनीनें तेथून निघतां इतःपार रुक्मांगदाचा व्रत भंग होयील हें निर्धारुन विधाता स्वधामी प्रवेशतां निजसभेस विलासाने रुक्मांगद येतो पाहा.

**दरू :** भूप येतो ।।

**सूत्रधार :** येणेरीती रुक्मांगंद रायाने सभेस येवून सिंहासनी बसतां दौव्वारिक वर्तमान सांगतो.

**(छं.)** रविकुलोद्भवा वीरकेसरी । नवल ऐकते ऐकीजे परी । कवण कार्य कीं चिंतुनि प्रजा । अवघेंहि आली येथ भूभुजा ।।

**सूत्रधार :** योणेरीति बंक नायकाने समाचार सांगता अवघ्या पाटिलास जवळ बलावा म्हणुन रुक्मांगद रायाने आज्ञापितां ते येताहेत .

**दरू : केदार गौळ ।।**

भूपति श्रीपति प्रेमळ भक्त येतसे महापति ।। रुप लक्षणि मनोज समजो पापभीरु संध्यावलि पति ।।अ.।। शातघटमय जो धरिल विशाल मति मुकुट शिरावरी ।। नीति सागर पार गामिनी त्य शोभन धारा ।। नातळेचि परदारा–स्वप्नातिल तिलक सुंदरा ।। गुरुनाथ अंध्रि पद्मयुग्म अंतरी ध्यात सर्व भुवनी स्वयेशें प्रख्यात दिव्य चाप बाणधर अतिशयित विक्रमें जितपर वीरा ।।१।।

**दरू : खापि ।।**

येताहेत पाटिल थोर येकंदर पाहा ।। शेताचे भारे देवुनि कुणब्याचें माथां खेदें भरुनी ते महा ।।

**सूत्रधार** : येणेरीती पाटील अवघे जण येवून संध्यावळि वल्लभाशीं सांगताहेत पाहा.

दरू : कांबोदि ।।

राज्य पालनेचि धर्म राज्यांशि थोर । दुसरा पूज्य धर्म नव्हे जाण पूर्ण साचारे ।। अ ।। हा काळ वरि तुझिया लोकनाथा देशींया ।। सौख्य भोगीतकीं हे तों स्वर्गाहूनिया ।। वृपमा ।। एक रामराज्यची विततया ।। आता आकस्मिक मृग धाडि आली राजया ।। वागति सर्वत्र ठायीं ।। वाघसिंह स्थूल देहि मागेन देखिले अम्ही जागा कधीहीं महाभागा राणडुकरे आणि लाडय्यें तेहि ।। शेतें आगळीं ते विध्वंशिति रागाने पाहि ।।

**सूत्रधार** : येणेरीत पाटिलाचें वाक्य ऐकून उचित प्रधानांशि योचना करून शिकारीस जाबुन पापकारी जे दुष्ट मृग त्यांचे संहारुन अरिष्ट परिहार करितों तुम्ही आपल्याल्या मंदिरास आनंदरूप जावें म्हणून सर्वांस निरुप देवून रुक्मागंद रायाने शिकारी जनाचे स्मरण करितां ते येताहेत.

दरू : अठाणा ।।

साज करूनि फार सरस सकळ शिखारी जनीहा ।। राज राज सन्निधानी नजरी येतो पाहा ।। दारूण आयुधे करी तरवारा आणि कुंत दारूसह बंदूखा । करणार प्राणांत निरुपम जाळींहि थोर धरुं मृगें तें अनंत । सारमेय बृंद सर्वेशि करेहि बळवंत ।।१।।

**सूत्रधार** : येणेरीति सामानांशि शिखरि जन आल्यानंतर रुक्मांगद रायानें व्यहळीस जायास निर्धारुन आपण येतो तोंवर राज्यभार धर्मांगदाच्या गळा घालावा तो मजपेक्षा मोठा धर्मिष्ठ हरि वासरादि सर्वहि कर्म चालवील–ऐसे चिंतितां धर्मांगद येतो ।।

दरू : असावेरि ।।

धार्मिकैक चूडामणि येतो निर्मळ चित्त अति ।।१।।
धर्मांगद नामा कनकांगद शर्मदा तनय वुदार महामति ।।२।।

**सूत्रधार** : येणेरीति धर्मांगद आल्यानंतर त्याला विलोकून रुक्मांगद बोलतो.

दरू : केदार गौळ ।।जंपे ।।

परिस माझे वचन पुण्यखाणी ।। सरस धर्मांगदा सर्वकानी अगा ।। अ.।। वसुमति हे सकळ वसु पूर्ण नंदना । बसुनि युवराज्य पदी शासिजे कीं ।। न सर मागे कदा कुशल तूं आहेसि । विषयी या मजहूनि वैखरी हो निकी ।। तनय असतां क्षमावन चतुर अत्यंत । वनज निभ लोचना वरजुनि जो जनक त्या स्वयमेव अनुभवी राज्य तो ।। धन धर्म कीर्तिचा घातकी समजो ।।१।। करवी अवघ्या जना करवीत अत्यादरें । नरक भय वा वारिते नर वरा हें ।। हरिवासर व्रत हरि तुष्ठिकर । आणि हरिख येणे मला परम पाहे अगा ।।

**सूत्रधार** : येणेरीति रुक्मांगद रायाचे वाक्य ऐकून धर्मांगद वुत्तर देतो.

दरू : गोपिकावसंत ।।शा.।।

धन्य मी जालों जीं ताता ।। धन्य मी सर्व पुण्यपरी अति गव्य नव्हें कीं अन्यथा भारती मान्य स्वामीं तां मजलागि ज्यास्तव मानियलें आता ।।१।। आशीर्वाद बाळकाशीं जो दिधला शासनी सर्वांच्या शक्ति असे तुला ।। तो सत्यसाधील सत्ता मात्ने काज थाशि नसे स्वत्ता ।।२।। जनकाशा संगोपान धर्मासरिसा आणिक धर्म नसे आत्मजा सहसा म्हणवुनि तत्पर मी घडतो सर्व जन रक्षणी नाथा ।।३।।

**सूत्रधार :** येणेरीति पुत्रास युवराज्य भार निरवून रुम्मांगद राजा शिकारी जनासह थोर वनांत शिरुन व्यहाली खेळायास वुद्युक्त होतां रुक्मांगदास विलोकून शिकारी जन बोलताहेत पहा.

**(दरू) :** खेळो शिकारी बरवा रुक्मांगदा ।। खेळो कोण्ही न खेळले त्यापरी मेळ मृगांचे हे लक्ष लौकरि ।।अ।।

**(श्लोक):** धाराळ सत्कर्म शराग्र धारी माराक्रते पापमृगाशी मारी । नारायणचार्या परपुंगवागा । नाराच बोधें बधि मी माहवाघा ।।१।। सैराट हा महिष मन्मथ रूप पाहि । वैराग्य लक्षण शरें निवटीं वुपायीं । ज्याची सुरांसहि दुरासद ते मुसंडी । याची चमूस वुरुन सवेग धुंडी ।।२।।

**दरू :** गीर्द झाडीमध्ये गर्जतो मत्सर शार्दूळ हा नर शार्दूळ जी मर्दहोशी तर्हि मर्म भेदी बाणे मर्दूनि मिळविजे गर्देशि आतां अतिज ।।१।। रोख देवुनियां देख सुधार्मिक शेखरा येतसे येकबळें भीकर कोपचि सूकर निर्दळि येक क्षमा खड्‌गें ऐकयेची वेळे (?) ।।२।। शोभन गुणहि यशोनिधि अवध्य जो वरवी वनी झाड असा । क्षोभक चित्ताशि लोभ महागज ।। तो भंगिजे पूर्ण तोषकरें असा ।।

**सूत्रधार :** येणेरीति शिकारिजनाचे वाक्य ऐकून तदनुसारेचि रायाने दुष्ट मृगें संहारितां तों.

**(श्लोक):** चपळहरिण मोटाहि मनोरूप जोकीं अपरिमित जयाचा व्यापपूर्ण त्रिलोकी नृपति धूं तयाशि लोभतां एकलाचि–विपूल दलें ते राहिलीं दूर साचीं ।।

**(वचन) :** विश्राणासी शूर जोकां अश्रांत फिरतां बला तो श्रांत भपति पाहेविश्रातिस शुभ स्थळा ।। तो एक्या अल्पवृक्षातळी रुक्मांगद रायानें आसन घालून येथेंच आसन म्हणून मनी योजिता मनोहर गायन ध्वनी कानीं शिरतां आनंद पावून आपआपणांत बोलतो.

**(श्लोक):** कर्णाशिया अति सुखावह येक रीति । वर्णाभिराम जशि केवळ गोडनीति– वीणार मुक्ति शतकाहुनी थोर प्रीखि । विणारवें कलित ऐकतोस सुगीति ।। बहुतेक मंदाराचलाञ्चे ठायी गंधर्वराजा गाताहेत कीं काय ?

**(श्लोक):** राणीया मंदराचे बसुनि वसवुनी वल्लकी हि स्वपाणी । गाणी गंधर्व गाती जणूं भुवनि तिही ख्यात ते रम्यवाणी ।। मानीना चित्तहें तो बहुत परिशीली तें पुरा म्या स्वकानीं । कानी माधुर्य यनचे (यांचे) तिलभरिहि नसे बोलतो सत्यवाणी ।।

सूत्रधार : येणेरीती आपआपणांत संवादून गायनध्वनीचा सुमार धरून रुक्मांगद रायानें मंदराचल सुंदरवनांप्रति भुवन सुंदरि येक स्त्री पाहून अंतरी मोडून दंग होता तों सखी समवेत मोहिनी येते पाहा.

दरू : आहिरि राग ।। शा ।।

अ. ।। मोहिनी येते सुदति मोहक अति ।। मोहवी मुनीच्याहि मानसा शीघ्रगती ।। अ. ।। अवलोकुनि मुखरूचि कांहि अवतंस शंभूचाहि अवचितें घडला पायीं अव खेंहि ।। अवतीर्ण रंभाकायी ।। अवनीत बाच्ये ठायीं अवशें हे मनोगेहि ।। आवडी वदति देहीं ।।

सूत्रधार : येणेरीती नारीगणोत्तमा मोहिनी येवून तिलोत्तमेस विलोकून मंदराचलास विलोकून वर्णिते पाहा.

दरू : आनंद भैरवी ।।

मंदरगिरी मंडन केवळ सखि सुंदर तरठि निरखी जो ।। सुंदरी भुवन मंदिरास जणु सरळ खाच हा गमतो मज हो ।। अमरतरू तसे अभिनव मिरवित हरि ते सुम संभृत सफलाहि कोमल नगभारी हे समुदित समुदें वरिवंभर झंकारी अनुपम गुंजती अति रमणी ते अवधारीं ।। अमित फुल्ल अद्भुत सहकारी कमळ बाण जीवलग सहकारी सुमधुरामृतासम सुखाकारी प्रमद कूजति पिक त ती सारी–द्युमणि शहाहूनि द्युतिसारी–युत जो कामदेमणि सुभारी शमदम पर मुनिच्या साठीरें विमल अहेति बिरति विहारी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीती मंदारचलाचा सौंदार्यातिशय वर्णून परस्परें क्रीडा करणार पक्षियां विलोकून कामपरवश मोहिनी तिलोत्तमेशी बोलते.

श्लोक : हंगावया मज विहंगम या प्रदेशी । कीं अंगने करिती संगम पक्षणीशी ।। देखूनि धीर मज नीरज नेत्रि नोव्हे। या मोह सागरीं सये अजि कोण पोहे ।। कसा कसाबा परि कामवैरि शरीं शरीरा प्रति या विदारी नये नयेज्ञ प्रभुजो अहाहा । असा असावा न वढये ठसा हा ।। (ओढवे)

दरू : पुन्नागवराळि ।।

स्त्रीजन्महे कासया साटि श्रीकांतें मज दीदलें बीज जें पातकांशी । हे यहि अतिशयेशि सजणि साचसांग ते गुज निज मनीचे भलें ।। अनवृत्या अन्य योनी त्या ना ना प्रकारी। काय युवती मंडळ मणि अवलोकि न्याय अवघ्या सोडुनि स्वयें ।। अहह दूरदृष्टी पाहें केवळ हा दीन व्हावयाशि जिणें हें नावा साधूनि माझा देख पूर्ण निश्चयें ।।

वचन : सखे तूं म्हणशील अम्ही स्त्रीयोनीत जन्म घेवूनिहि मानल्या पुरुषाशी विहार करून खुशाल आहों तरि याचें उत्तर ऐक ।।

दरू : शिरजां कामाचें चित्तीं थोर अनिवार वारवरिशि कोण्हि तहि पुरुष तूं निर्विचारें ते रीति याठायीं नाहिं तरूणि ताताज्ञाधारें झुरत्यें रुक्मांगद नरनाथासाठिं खरें—मार वश्य होवूनि हरी हरी कृपाकरि ।। १ ।।

**(श्लोक) :** दिरंग आतां सहसा न लावीं । कुरंग नेत्रे रमणी बलावीं । तरंग तोडि सुखाब्धि माजी । तरंग ते भेटवी कांत आजी ।।

**सूत्रधार :** येणेरीती मोहिनी विरहाने कष्ठी होतां तिला विलोकून तिलोत्तमा बोलते.

**वचन :** सखि, तुला शीघ्रेची वल्लभाचा लाभ होईल कांहि प्रतिबंधक असल्या तन्निवृत्ति साठि धूर्जटी प्रीत्यर्थ वीणागान करीं तेणे उमाकांत संतोषून इष्टवर प्रदान करील.

**सूत्रधार :** हें ऐकून मोहिनीने वीणागान आरंभितां तो सर्वधर्म प्रवीणाग्रेसर रूक्मांगद् राजा ती जवळ येऊन मन्मथ शर पीडा पाऊन देहभाव विसरून वसुमति वरि बसतो तेव्हा.

**(श्लोक) :** निरखुनि दिठि मूर्च्छाक्रांत राया प्रवीणा सरस निजकरीचा ठेवुनी (व) क्षि वीणा ।। प्रवीणा । नरपती निकटी ते येवुनि मोहनांगी त्वरीत सखिस बाहे घावरील्या प्रसंगी ।।

दरू : हुशानी ।।

धांव धांव येथे येयी मज पाशी–जीवलगे आतां लौकरी ।। हा विलोकी मूर्च्छित पडिला राव येकायेकी पहा हे नावरतां मोह लावण्याची राशी– वारिजलोचने शीतल शिंपी वारि सुवासित केवळ–आणी वारूनी विजणा- राहि सर्ववारिजे हुत्ताशन लावितां बहुवेळ ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरीती मोहिनीचें वाक्य ऐकून सखीनें शीतलोपचार करितां येरीनेही अंचलानें वारा घालीतां.

**(श्लोक) :** कटाक्षामृतेंशिंचि तां मोहिनीनें तदा भूपतीला जगन्मोहिनीनें आली पूर्ण, संज्ञा अभिज्ञोत्तमाशी प्रिया दर्शनें लाभला संभ्रमाशी ।।

**सूत्रधार :** येणेरीती रूक्मांगद राजा देहावरि येताच विनयाने प्रणय पूर्वक त्याचा वुपहास वूकरित बोलते.

**(छं.) :** पुरूष तूं मही धीरराजया । निरखितांची म्या दृष्टिनें यया । परम विश्रमा पावलाशी हा करीन मी तुझा पूर्णकाम हा ।। शुभ गुण श्रया तू मजप्रति अभिमत स्वये सत्य भूपती वुभयतां मिळूं येक अंतरें अभय देतसे आपुल्या करें ।।

**सूत्रधार :** येणेरीती मोहिनीने आपल्या मोहपाशी रूक्मांगद रायास गोवितां तो संतोषाने तीचा समाचार विचारितो.

दरू : यमुना ।।

कवण ललने सांग तू वो मातें कां आलीस येते ।। जनक तुझा आणी जननिहि कोण ।। कनक निभांगी ते कथी खुण ।। १ ।। अनुभविल्या बहु वनिता म्या कीं–अनुपमहि रसातीहि लोकीं ।। २ ।। दरशन मात्र होतां अपलें हरहर दुजें भान हरपलें ।।

**सूत्रधार :** येणेरीती रूक्मांगद रायानें वर्तमान विचारितां मोहिनी उत्तर देते.

(दरू) : ऐक वृत्त माझें आतां ऐश्यापरी डेक दिव्यमूर्ति साकल्ये भूप केसरी ।। अ ।। अंकट काज गाहे आघवे लौकरी प्रतापाब्धी महाभागा–प्रीतीची तत्कन्या मी गा देखुनियां पहा मोहिनी नाम या देहा–मोदें ठेविलें पुण्य गेहा ।।

सूत्रधार : येणेरीती मोहिनी स्ववृत्तांत सांगून रूक्मांगद रायाचे वर्तमान विचारीते.

(श्लोक): अवनितळमहेन्द्रा ।।

दरू : व्यागठ ।। अ ।।

ऐकीजे वृत्त माझें आतां येणेपरी ऐक गा दिव्यमूर्ति साकल्यें भूप केसरी ।। अकळंका हें अवघें लौकरी ।। अ ।। तातया तुमचा निर्धारीं–भूमि नाथ जी चतुर्मुख धारी मी तवं त्याची कुमरी जीणे शीतभानुमुख अंतरा मायुरी ।। १ ।। मोहकतीहिं लोकांलाहीं वेष माझा देखुनियां पाहां–मोहिनी नावें या देहा–तेणे मोदे ठेवीलें पुण्यगेहा वीत मोझ ।। २ ।।
कोटि कंदर्प रूपा युवति कुवलयाशि पूर्णचंद्र स्वरुपा ।। कवण जनक तूझा सांग आद्यंत वृत्ता श्रवणि परम आशा जागते माजि चित्ता ।।

सूत्रधार : येणेरीती मोहिनीचे वाक्य ऐकून रूक्मांगद उत्तर देतो.

दरू : मोहनं ।।

सारसेक्षणे परिस आदरें निज वृत्त ।। वीर पुंगव श्रीमती मी सूर कुलज नृपहीरसा जणे ।। अ ।। ख्यात जगीं माझा गुणांबुधी तात कुशकेतन राजा । जात रुक्मांगद नामा जनीशातकुंभप्रति मठ वर्णिसि ।। १ ।। औसरात्मज कीं धर्मांगद चारूतर रूपान्वित जो कीं–गौरव राखीत संतत माझे पोरसेचि वोरति रूपिणी ।। २ ।।

(श्लोक): तीर तुझ्या दृष्टीचे नीरज नेत्रेस वेग सुटतां हे धीर समग्रहि गेले–मारज–तापहि मनी वुभाराहे ।। १ ।। करूनि देवीतरि तुं प्रसादा–हरीं मडीनें स्वमनो विषादा–सये दयेशी जरि कीं नयेशी–असुटिके नातरि देह देशीं ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती प्रार्थना करून मोहिनी समीप रूक्मांगद रायानें जातां तीने चार पावलें परतें सरून अंगीकार न करितां पुन्हा राजा बोलतो.

दरू : सावेरी ।। अट ।।

अव्हेरं कां करिशी—अरविंद लोचने नोव्हे हे वुचित तुजे ।। निर्वेद धरायासि हे वेळ नोव्हेची जीवरी अभयाशी देवुनीयां मन ।। अ ।। अवयव मी जे ज्ये अवलीकीतसे तूश्ये ।। आवडीनें माझे ज्ये नढले तेथुनि डोळये न निघतीच माझ्ये ।। नव नव पुनः पुन्हा केवळ रति माझ्ये ।। १ ।। रंभारूप समा रंभा देखतां भली रंभाची महीजाली–हे महि चांगलि हे मानवूनि तुजे श्रीमति जडत्वासि नेमस्त पावली ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती स रावून रूक्मांगद नराधिपानें केवल गळा पडतां ब्रम्हकुमारिने अपल्या समयात नीट यावा म्हणून तत्काळ झिडिकावून. सखीशि मंदरवन प्रांतीं विहार करायास जांताच खिन्न चित्त राजा बोलतो.

(श्लोक): सौंदर्यातिशयी रतीसहि नये जीची कदाहीनिकी हे। ब्रंम्हसमुद्र संमनिजा नंद्दाबुधी वाहिनी। जेरा हरिणी क बिंब बदुनाश्रृंगार संघाहिनी।। कैशी ते मज वश्यही यील आंता तैलोक्य ह्रन्मोहिनी।।

वचन : या वेळेस प्राणसखा हितोपदेश करणार विदूषक असतां तरिही भले त्या प्रकारीं मोहिनीशि संविधान करितां.

सूत्रधार : ऐसे चिंताक्रांत रायानें चिंतितां तो विदूषक येतो.

(दरू) : तो शहाणा संतोष मूनि विदूषक येतो पहा। कौशल जाप्रति हास्य रसि बहु भूषित भू षणा हारि महा।।

सूत्रधार : येणेरोती विदूषक येवून रूक्मांगदांस विलोकून बोलतो.

(छंद) : श्रमित कासया बारशी बरा। अमित सद्‌गुणा नंदसागरा।।
भूमीतही तुझ्या रीति वाटले। स्वमनिवी कधी ठेवि नीट ते।।

सूत्रधार : (श्लोक) रूक्मांगद। जांबूनद प्रतिम सुंदरव्देहषानी। जंबीर स्यकुच जीच्ये जण कोणरानी। कुंभी समान नगति मंद जीचि विराजे। बिंबोनि ते हृदयीं ती भुवनीं ही वराज्ये।।

दरू : येरूकुल कांबोदि ।। अ ।।

अहहा ते मनी बिंबली मोहिनी माझे।। अहरह आणिक ध्यान राहत नाहिंची जाण प्रहर आठहि थांबली।। मोहिनी माझ्ये ।। अ ।। नवल ऐक सांगू कायी लवहिर जर वुटये जा ठांयीं।। युवति तेथें शिरूनि जाताहिं हृदय गेहिं न वुपद्रव कांही।। निवाल्ये नेत्रही पाहिं शिव शिवाले सुखनवायी न वदवे कधिहीं।। भोग यिचा मानसिक तो झडतां आतां टिक योग गमितो मानशीक।। भोग तो देख माझा तू गडचा कार्य साधक लाघवी हि अत्यंतर वेगि आणि मत्प्राणाधिक वनिता सुरेख।। १ ।।

सुत्रधार : येणेरीती रूक्मांगद रायाचे वाक्य ऐकून विदूषक बोलतो.

वचन : अगा रूक्मांगद राया त्वां वशिष्ट महामुनि पाशी परवा शांति पाठपूर्वक वेदांत आरंभ केला कीं त्यांचे हेच फळ काय? ब्रम्ह जिज्ञासा जावून ब्रांम्ही-जिज्ञासा आरंभिली.

सूत्रधार : येणेरीती विदूषकाचें वाक्य ऐकून रूक्मांगद वुत्तर देतो.

दरू : (व्यागड)

ऐसी मोढि लागलें दर्पकाचे दिसे दिसहोतसे चित्तकांचे।। अ।। शांतिपाटाची शांति नीट केलि-भ्रांतिं कांतेची अंतरी उदेली।। हानि जाली गैराडचे निश्चयाची।। दिनमुखे नारी दास्य बायाची।।

(श्लोक): ब्रंह्मिष्ठाते आणि माते हि पाहिं ब्रांह्मिजिज्ञासा नवरा भेदनाहि।।
रामाकारे विश्व दोघे ह्रि पाहू-वैषम्यातें चित्त तुझे न भावू।।

सूत्रधार : येणेरिती रुक्मांगद राजा बोलतां हा केवळ मोहिनी मोह पाशी बद्ध जाला इत:पर याच्या मनोगतानुरूप जावें हा निश्चय करून विदूषकाने अंतस्सं-विधान हरितां मोहिनी येते पाहा.

(दरू) : येते मोहिनी ।।

सूत्रधार : येणेरिती मोहिनी येतां तिला विलोकून रुक्मांगद बोलतो.

(छंद) : वुपवर प्रिये तू आहेसकी नृपहि मी तुतें प्रार्थितो सखी नपरिहार तो सर्वदा की ज्ये ।। अपुलिया मुखें भरवशा दिजे ।।

सूत्रधार : रुक्मांगदाचे वाक्य ऐकून मोहिनी बोलते पाहा.

वचन : नराधिपा मी वरार्थिनी नवरी खरीच परंतु माझा अभिष्ठ सिद्धी जाल्यां-वांचून तुझी नवरी होत नाही.

दरू : (मोहनं)

ललना मी ही यीना तुझा सलिल संभावसम ललित विलोचना चलचित्त पुरूषाचे कळुनिया मनोधामी ।। अ ।। गरजेशि पंचांग चांगति ।। कामातुर जन भागति मागुति निरत जालियां पालिलागति पुरे हर हर यास्तव घोर तत्संगति ।। १ ।। चवळहि कापि तिशढ अति–वदति अवधि हि तुझाच संपत्ति यौवन वेचतां भूपति तिशी शेवटी निश्शंक दवडिती दुर्मति ।। २ ।। होवेत सवति—ये हें करि तीच आपण करविती चाकिरि–कापिति मान अथांतरि रीति या परि जाणुनि मी निज अंतरी ।। ३ ।। देशील भरवशा आपला–जरि देवव्दिज साक्षिने मला जें शीघ्र मागेन मी तुला की जे तें सिद्धन मनुनि क्लेश पुण्य शीळा ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती मोहिनीचे वाक्य ऐकून रुक्मांगद राजा कामातुर होत्साता तुझि सर्वकामातुर पूर्ति करितो म्हणून बोलतो.

दरू : (नीलांबरी)

भाक मी देतो सुंदरी लौकरि तुझा शातोदरि घे कर वुजवा माझा श्रीकर भय नधरी ।। १ ।। दुर्लब्ध जे जे आहे दैते त्रिभुवनी पांहे कुल्लहीं बीतरिन तें तें कांक्षित लवलाहे ।। २ ।। राजीवायत नयने याजिशि ज्या ज्या कांजिराजि होवुनि करीन ते साजणी घडि माजि ।। ३ ।। मग याचे मज जरि रमणी मानितल्या तहिं नमुनी अरपिन तवकरीं समुदें निर्धारी ।। ४ ।। न करीन तुझा वैखरी अखिलविमोहि मी खरी–सरळहि सुकृतां बोहरी सखिये हो तरी ।। ५ ।।

सूत्रधार : रुक्मांगद रायाचे वाक्य ऐकून मोहिनी खुशाल होवून प्रियोक्तिने भुलविते पाहा.

(श्लोक): शर्व मुख्यांस त्यां सर्व सत्राशना । सर्वथा सोडुनी पर्व चंद्रानना । वुर्वीना–वरूं भर्वशाने तुला. । स्वर्वधूशि आल्यें पर्वतीं या स्थला ।। करूनि सरस गाना रंजवितां हराशि । करूण हरिखतां तो पूर्नकल्याण राशी । न-प्रति तुज विथ विश्याला भव्य मी वराशी । त्वरीत सकळ आली संपदा या घराशी ।। २ ।।

**सूत्रधार :** मोहिनीचे वाक्य ऐकून शास्त्रोक्त प्रकारे मोहिनीचे पाणिग्रहण करून संतोषाने बोलतो.

**(श्लोक) :** स्वये तुझा हा वरिताच पाणि । नयेगमे भाकस वज्र वज्रपाणि ।।
मंदाराच्या वसते शिराणिकीं । येशिगाहिं वदते शिराणि ।।

**सूत्रधार :** रूक्मांगदाचे वाक्य ऐकून मोहिनी बोलते.

**(श्लोक) :** यावे थेय जरितरि सवतीच्या रूझेकटाक्षा नले । माझे देहचि आहल्येलवरिहि चित्ता ज्वराच्या भले । येथे राहिलीयां वृषांगदा कथा संध्यावली वाचूनि । राया कष्टशि दुष्ट हेतनुतई लेखी वृथा वांचूनी भोग ।। जावूनीयां तुझा भोग तो बोढवेल कीं–म्हणे येननगमे योग्य यास्तव सत्यकी ।। १ ।।
दरिद्र पति मंद्दारि न वसतां स्वता ता त्या धरि । करि रमणि वासजे विभव आस यागें खरी । पदूनि चिरकाल ते नरकीं घोर अंद्दत मी । घडये वुपरिस करि समज त्येज आद्यंत मी ।। २ ।।

**(छंद) :** सकल संपदा तेथ नांदती । सुखदतोति गा स्वर्ग भूपति । निकट तो पतिच्या स्थली वसे । विकळता जहि जे स्थली असे. ।।

**रूक्मांगद :** (रूक्मां. ।। द. ।। केदारि गौळ)
चालविसवें सखियें आघवा माल तुझाचि प्रिये ।। शंका न धरी सक्तीची लव अंकित होतील अखिल हित्वां तव ।। १ ।। असुख तुला जाल्यां अति सुंदरी असून टेपवन मी आत्मक जे बरी ।। २ ।। भोगीं कांक्षित भोग माशिबरे योगवति मनो योचना हे पुरे ।।

**सूत्रधार :** येणेरिती अन्योन्य बोलून मोहिनी रूक्मांगद दोघे जनहि संधावलिसि हें सम्मत असेल कीं नसेल म्हणून आलोचना करित वैदिशपुरास येतां प्रज्ञावती सखीशि खिन्नमुख संध्यावलि येते.

**(दरू) :** संध्यावली येते संभ्रम महा ।।

**सूत्रधार :** संध्यावलि येतां तिला पाहून प्रज्ञावती सखि बोलते.

**(छंद) :** वदन का तुझे श्रांति पावले । सदन जे सुखालागि भावले ।।
हृदयी त्यासटीं खिन्न तू असे । वद मनांतलें गौप्य जें असे ।।

**सूत्रधार :** सखीचे वाक्य ऐकून संध्यावलि बोलते पाहा.

**वचन :** वायी ते काय अंतर्दुःख सांगावे ? रूक्मांगद रायानें मजसहित सपत्नी समुदायास मोहिनीचे हाती वोपून मला पाहून बोलिजे हा प्रकार ऐक

**(छंद) :** अनुसरूनियां मोहिनीस तां अनुदिनीं । असावें सती स्वताअणुहि सुकल्या येथकी प्रिये । गणिन दुःख मी फार निश्चये ।।

**सूत्रधार :** चितेचे मूळ सांगून संध्यावलि सखीस विलोकून कष्ठि होते.

दरू : (येरुकुल)

होडवले कैसे कर्महि प्रौडदश्ये माजी ।। घोड मोहिनीचे रूढले निश्चित ।।

वेड लागूनि तीचे वल्लभादेवाजी ।।अ।। निरंतर रंम्यदनाचलि रमणाशि बहुसाल विलाशीं उमळला या परि स्व मनोरथ तरू–भ्रम जडता तेथील रायाशी ।।

सूत्रधार : येणेरीती तात्काली रमना मध्ये खेद मानून इन्दा देहा परि येवून पतिव्रता स्त्रीयानी पतिचितानुरूपेच वर्तावें तोच मुख्य धर्म हे निर्धारून सखीस पाहून संध्यावली पुन्हा बोलते.

(दरू) अनुसरून कांता असणेचि साध्वीस ।। अनुपमान धर्म संशय नाहि ।। अनुदित संक्तीशी मनसिज केली हा धन तोषे करू मानल्या रांया ।।

सूत्रधार : येणेरीती प्रियसखीशि संव्यादून मोहिनीच्ये ठांयी रूक्मांगद रायाचा मोहातिशय वर्णीत स्वंमदिरी प्रवेशल्यानंतर.

(श्लोक) द्रव्यानी गिरीकंदरी तरूतळीं हृद्यान वद्य स्थली । अध्याशी नरेंद्र तो समरसें विद्यात्मजेशी बली । अद्यात्ति निपुण प्रसिद्ध परि ते पद्या विसर्जूनिकीं । सद्या कामरसीच निमग्न घडलान ध्यात ते आणिखी ।।

सूत्रधार : येणेरीती निरंतर मोहिनीशि क्रिडा करित अस्तां एकाएकीच एकादशी व्रतानुष्ठान करा म्हणून धर्मांगदाच्या आज्ञेवरुन कोतवालाने पट्टणी हत्ति वरि नगारा पिठितां तों धाभिर्येपणाने मोहिनी सहित रूक्मांगद राजा येतो पाहा.

(दरू) रुक्क प्रति भट नर्न भली जे रुक्क गर्भ दुहिता तिशीं रुक्मांगद घर येतो नृपहा रुक्मांगद त्वरिता ।।

येणेरीती रुक्मांगद राजा येवून येकादशीचा विसर पडल्यास्तव खेद पावून बोलतो ।।

दरू : (व्यागडा)

थोर दगा चुकला आता कीं श्रीहरिहरि थोर दगा काय तो कथिजे आतां श्रीरमेशदिन स्मृति सर्वहि जातां ।। शर्वादिक देव शेवा सिद्धि झाली । पूर्विल पुण्य सर्व फला आली । पटहनाद नस्ता पडिला कानीजरि । कटकटा स्वहिताचि स्फुठ होति बोहरि ।। दश करणाऱ्या विषयाशेसाटि दशमीसेचि आजि विसरतो शेवटी ।। काम सुखाचि करितो दीवाळि । तामसा परि अंधत्व मी बुडतो चिरकाळी ।।

सूत्रधार : येणेरीती रुक्मांगद राजा वीसणून वुद्धा मानसासारिका आप आपणात शीण मानून बोलतां मोहिनी वृत्तांत विचारिते ।।

(श्लोक) अस्ताल हांसत खेळत स्फूटमशीं । आस्ता धरोनितशीं हस्ता झाडुनी । कां आलाशि करूनी अस्ता सुखाच्या बरे स्वस्थानीहुनि बुद्धि कां विचळली. ग्रस्ताहि चिंत्ताहिने स्वस्ति क्षेम घडो तुतें स्वगुजें तें विस्तारुनि सांगणें

सूत्रधार : मोहिनीने विचारितांच रुक्मांगद रायाने एकादशीचा महिमा सविस्तार सांगता वुपहास पूर्वक ते बोलते.

दरू : (आहिरि)

प्रतापशाली अजि कां विव्हळ पण विशेष दिसत तुज अहा ।। न तापहे तु स्फुरत हृदयी अणुशतापराधहि क्षमिजे जी महा ।।अ।। अंगजात ताप सर्वहि वारुं अंबुजा तायता क्षतावकीन ।। अंगसंग उत्कंठा नाचत अद्य फार जाण ।। रंग भंग तों कदापि न करीं रशिक लोकहि रचित रंजन मंगलाकृति आलींगन दे मस्त ।।

दरू : (केदार)

एकादशी कैंचि हे काडिली तारि हरिवासर आल्या हरितनयोंत्सव हरिखें दोवें करुं ये आतां–उपवासि जरि उत्कंठा असे उपवास माझा वुचित पाहतां भूपरिपालन भूपाचां धर्म विपरीत करणे हा विधवा धर्मता ।।

**सूत्रधार :** येकादशी उपवास बुडवून मोहिनीनें बोलता रुक्मांगद राजा जाब देतो.

दरू : (यमुना)

हें वाक्य बोलूं नये तुवां ।। सखिये जोडितो कर पल्लवा ।।
श्रीविधीचि नंदिनी तूं देवि समजशि धर्म अवचा ।।अ।।
जाणपण आल्या वानुन प्राण दैतींकि ।। अशनें व्यसनें म्या जाण त्यजिलीं विष्णु वासरीं ।। अन्न भुक्ती अद्य न नीकी ।। कार्तिक येकादशी हे कामिनी बरवी वुदिया वुदया श्रीमूर्ती पाववी–सतत जे वैकर्तनाची आर्तिनुरवी ।। श्रवण केल्यास्तव अद्यावह श्रवणी तदवाणी–सदया हृदयां तरी शिवाशि स्मरतसे मी कुवलयाक्षि भुवन मोहिनी सुचविते या परि समाधा वुचलुनी टाकीं अचिरें मचला सहिसाच वदतों प्रचर दुःखे नाचरें निजनाथ आहितकीं ।। उमयतांहि मिळूनियां कुरूं वुत्कट प्रति हरिवासरिया जें शुभद अनशन शुद्ध भावें अभय दे मज अद्य सुदती ।।

**सूत्रधार :** येणेरीती रुक्मांगद वाक्य ऐकून मोहिनी वुत्तर देते ।।

दरू : (नायकी)

अंदरु हें का लौकरी सोडी येकादशीचा हे काम पात्र नये या चित्ताशी– स्वामी मी सद्भावे नमिते सौख्यराशी ।।अ ।। गौणी उपवासहि असति ते कीं प्राणेश्वरा बरुरीति त्यात मानेल जो तुज प्रति –निज मानशी आदरतोंचि महामति ।। निरशन ये हे रत्यजी आतां हरिवासरीं नरनाथ जीकिंद्वा गरज नाहि मज तूझा विसें वर वीं निधुं दे वाक्य मुखांबुजींहाचि गा वर दत्त पहिला आतां याचि तसें तूतें वहिला–तरि साच करी पणा आपला भोकां वाचनिक नृपशार्दूळा चपला ।।२।। लटिका होवुनि सुखी राहिमोटा पठुहोशीं तूं नीट पाहिपरि न टिक्ये मी या स्थळीं कांहि येक घटिका मात्र तुझा आश्रयानी सायी ।।

**सूत्रधार :** येणे रीती मोहिनीचे उत्तर ऐकून तीचे समाधान करितो पहा.

**दरू :** सजणि फिर आतां सजणि सजणि हरि वासरीं भोजना विण दुसरि– तुज जे जे असे वांछा अज पुरवितो त्वरि ।।अ।। नाकलोकीं असति नागरिक

मणि या घडी आणूनी अर्पितो भामिनी पारिजाततरु पाहिजे तुज वारि जाक्षि देतो वदतो सयोदरी ।। न करी दुराग्रह नलिनासन कन्ये ।। प्रकटी अनुग्रहा मजवरि धन्ये ।।

सूत्रधार : मोहिनी येणेरीती रुक्मांगदाचे वाक्य ऐकून चाचि पाहि मला गरज नाही ।। येकादशी निराहार मात्र पाप हरून पुनाहि मोहिनी बोलते.

(श्लोक): त्यजुनि निरशनाशि मात्र एकादशीला। तुज आजी नमग्यै भी चित्र एकादशीला। वुदयीं करिन भुक्ति ते परि द्वादशीला। वुदईक न घडूनि तेथ हिं वादशीला ।।

सूत्रधार : येणेरिती

वरूण : तू म्हणशिल म्या एकादशीचा निराहार नियम केला हे तो कसा सोडावा तरि ?

(श्लोक): स्वबुध्या तथा नेम केला नरेन्द्रा ।। नव्हे शास्त्र शिद्धांत तो पुण्यसांद्रा ।। असासादि जो त्या द्विजाने द्विकाळीं सुखे शेविजे अन्नतें सर्वकाळी ।।

(दरू) : तथापि तुला व्रत भंग करु नये म्हणून आग्रह असल्याने त्यासही उपाय सांगते ऐक.

(श्लोक): अष्ठौतान्यव्रत ध्यानी आपोमूलं धृतंपय: ।। हविर्बाम्हिण कामायगुरोर्वचन मौषधं ।।

वरूण : ऐसे धर्मशास्त्र आहे या साटि सर्ववर्नाच्ये गुरु ब्राम्हण त्याच्या वचनावरुन व्रतभंग केल्यानेहि दोषनाहि तेंच ऐक.

(छंद) : द्विजवराशी याकीसदुत्तरे त्यजिनराधिपा हे व्रत त्वरे ।। नजरिवीकशी विप्र भाषणा ।। भजशि दुर्गती वंश भूषणा ।।

सूत्रधार : येणेरिति मोहिनीचे वाक्य ऐकून हरिस्मरण पूर्वक कानास हात लावून येकादशी कर्तव्य विषयीं न शंके नविषरुतोयंन खादे मत्स्यसूकरौ ।। एकादश्यान भुंजेतपक्षयोरुमयोरपि ।। ऐसे वचन वुवाहरुन रुक्मांगद राजा आपला निष्कर्ष सांगतो.

(श्लोक): वुटोनि सभहि पडो शिरी मही समुद्री बुडो निजाप्तगणहि वुडो त्यजुनि रोग आंगी जुळो ।। निषेध वचने पडो विधिहि भुक्ति ते नावडो परी हरिदिनी घडोक्तिकमसल्या स्वजिव्हा झडो ।।१।।

सूत्रधार : येणेरिति रुक्मांगदाने आपुल्या मनाची करार सांगतांच मोहिनी कोपाने तप्त होवून डोल्ये लावून भर्ताराप्रति बोलते पहा ।।

(दरू) : (अठाणा)

संगति तुझा हे पुरे ।। सांगतें अरे ।। लंगरसत्याची तां भंगिली हरे हरे ।।अ।। भाक देवुनि आधि ठिक मंदिरी सुधी तां काडिल्याने मार्गे हा केवि धर्मजयें येकादशीचा पंक्तिरथें आरामा पाहें धाडिलें रामा ।। सत्यासाटीच

अम्हा व्यक्त हे सर्वत्रारे ।।३।। लक्षाश्वमे धापरीस लक्षि अधिक सरस तें क्षात्र बंधो सत्यपक्ष हा पोरांच्यारे ।। धर्मांगद जो धर्म पारायण तुझा पुत्र त्याच तरि लाज धरुन अपलि पैज सत्यकरी ।।

**सूत्रधार** : या प्रकारे मोहिनीने हिणवितांहि राजाने डोळ न दृता आपल्या ठिकाणास जात्ये म्हणून मोहिनीने च्यारी पावलें पुढें टाकितां तों अंतःपुरी गलबला ऐकून धर्मांगद येतो.

**(दरू)** : धार्मिकेक चुडामणि येतो.

**सूत्रधार** : धर्मांगदाने येवून.

**(श्लोक)** : प्रणमुनि पद दोन्ही मोहिनीच्ये स्वभावें ।। विनवुनि विनयोक्ती कौशलाच्या प्रभावें । धरुनि हन वाढिला आणुनि शीघ्र टायां ।। नरपतिसुत मांडी प्रश्न शंका तुटायां ।।

**(छंद)** : जननी कोपुनि कासया सटी वन तटीप्रती चालशी हठी । मनी महीपति कष्टवूनि हा धन अघांबुधीं मज्जशी पहा ।।

**सूत्रधार** : येणेरीती धर्मांगद वाक्य ऐकून मोहिनीनें पूर्वोत्तर वर्तमान सांगते पहा ।।

**वचन** : अगाय धर्मांगदा मी कांहीं धन रत्नादिक मागत नाही. रायाची शरीरेची दृढ असावे म्हणून येकादशी वृत माल टाकी म्हणतां भूपाळ हेका धरुन वसला हे यास्तव मी स्थस्थानास जातें.

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीचे वाक्य ऐकून येकादशी व्रत भंग करायाचा क्रोधमात्र टाकी म्हणून चरणार विंद वंदून प्रार्थितांहि तीनें धरिला हट्ट न सोडितां स्वमाता जे संध्यावली.

**सूत्रधार** : या प्रकारें मोहिनीनें धरिला हट्ट न सोडितां स्वमाता जे संध्याकाळी ती कडून तर्हि समाधान करवावें ऐसें धर्मांगदाने चिंतितां तो दूति सुखानें हा सर्व समाचार ऐकून यदृच्छेनें संध्यावली सखीशी येते.

**(दरू)** : संध्यावली येते.

**सूत्रधार** : संध्यावली येवून सखिस विलोकून बोलते ।।

दरू : (यमुना)

कायकीजे आतां देवा हे कृपाबुवा हा यशोजलधि रुक्मांगदनृप हायहाय शिणतो गुण ठेवा ।।अ।। श्रीहरी प्रिय भक्त केवळ जो हितावह सर्व जगाशी मोहिनीने गोविला तो मोह महापाशीं ।। कीं हल्ले ना तैसा केला केविधि नसा आननवाशी– साहशिण परि न कळे विजवटि काहीं मनी ते कर्कश दिवशी ।। वोकटिया साटी मोटा ।। ते खरी दुष्ट स्त्रीपुगती ।। वोकटी कृत सुकृते सारीं कोरव देतां निगुती ।। पोखति नृप बुद्धिही भुलली पोर ज्यापरि तेणें रति ।। वोखद नचल्ये कवणहि या प्रति ।। चोखट न सुचे एकहि ते गति ।।

**वचन** : या साटि.

(श्लोक): मन्मथाद्रेक जो वुन्मथी आग लावुननी वाद्रशी सन्मती
लागला चिन्मय राघवा तनमयत्वें स्मस्रे हृन्कांट बोभला जन्म त्याच्या चुरे ।।

सूत्रधार : येणेरीति स्वस्थळीं संवादून बरे मोहिनीस निती सांगून पाहवी म्हणून तीजदर येतां येरीनेंहि प्रमाणे पूर्वक काय आज्ञा म्हणून पुसतां संध्यावलि साध्वीचा धर्म सांगते पाहा.

दरूऊ : आनंद भैरवी. आदि.

साध्वी धर्माची पधति ऐक वो आता ।। आधी सोडुनी बुद्धती
साधिजे सर्वार्थ हि साधूनि देते सुद्गति ।।अ।। नारी जे केचि वायिट ।।
नास्तीवयाची मुख्य पेंट ।। नरकाची तो मोकळी वाट तरणी निघोट ।।
तारक येथे अवीट धवक्या शेवानीट ।। नीरजाक्षि म्हणूनि प्रकट न करीं
बल्लभाशी हट ।। शिरसा तम्दामयाची मोट बरवी वाहेन मनी वीट ।।
नायकाची तू वैखरी दाष्ठीक पणा जे जरि– नायकाशी कर्ण विवरी
नेमस्तहारी —वायिका येकारवा भीतरी बहुकाल वरि–हाय हाय पच धरी
सोय चित्ति कांहीं तहि होय किंवा नव्हे विवरी हे नावय निजांतरी ।।

सूत्रधार : येणेरीति संध्यावळीने पतिव्रता धर्म सांगता मोहिनी ते कानावरि घेइना सारिखे रागाने प्रत्योत्तर देते.

वचन : मी रुक्मांगद रायाचा व्रत भंग कराया साटीच आल्ये ऐसे असतां व्रत भंग करू नका म्हणून सांगणेची निरर्थक. ते कोण्या प्रकारे म्हणशील ते ऐक.

(दरूऊ): झोतशी जारिणी सत्यसार निरोपणें–मारकाशी कृपा थोर हे सांगणे ।।
पंचकाशी जसें तें पंची करणें. आत्म संचित करणाशंसये वितरणे ।।
धनमेंदापाशी बोंधुनी दाजशी–मंदकर्णा गीति सुंदर व्यर्थशी ।।

वचन : असा रुक्मांगद रायाने असत्याच्ये समुद्रे बुडतां त्याला तेथूनि काढणार मी पटका.

दरूऊ : असावेरी.

वावुगितशि गमत असे तुझा बुठी हे पोठीं। ।
आवधाहि अश्राव्य रुपाची ।। अवगुण शालिनी अतिशय बोखटी ।।अ।।
जारिणी ककटीं जे विसति व्रतसार बोध करणें ।। कि मारकाशी अनिदन
शास्त्राची ।। मातनीट कथणें चौर्यशि न करा चोरि अशि–चारुधी शिकवणे ।।
स्वशरीरमीच जा भ्रम या परि त्या रीति तात्विक ते अनु ।। परंतु—

(श्लोक): असे पातिव्रत्ये तूं जननी आस्था जरि भली ।।
असा त्याच्ये डोहा मथुनि तारि काढी नृपभळी ।।

वचन : तू म्हणशील जे गोष्टी केल्या धर्म संकटापासून मुक्त होयील, तो भाव दुर्घट असल्यानेहि सांगा. मी सत्वास टलेना सारिखि अगत्य करीन तरी ऐका.

**(श्लोक):** आहा माझा नेहि त तो भावही मनप वदू जिव्हा कांप्येचळ चळ वदू काय ये वचनी ।।

**वचन :** बरे आता तीनी सांगत त्यात बोमानेल तो भर्तारा करी करवी.

**(श्लोक):** रेन्द्र हरिवासरीं अन्नशेखीं हे होयी नातरी जा पथ सांगतेशी ।।
देवो ननूज शिर कापुनिया स्वतातें ।। नाहीं तरि गमन मी करितें गृहांते ।।

**सूत्रधार :** येणेरीति रतीचे कठोर वाक्य ऐकतांच रामनामोच्चारण पूर्वक देवास आठवून संध्यावळि कष्टी होते पाहा.

**दरूऊ :** (हसावेरि)

कवणे ठायीं तूं आहेशि माझ्या या वाये वेळे तुझा यावा कांतो निश्चयेशी।। ।।अ।। बाहे वुचलुनि यावरी बाळका ये ये ।। बाहूं कोणशिरी ।। बापारे स्वये बाहुजवृंद केसरी लोभाती शय होवून पुटतो कैशी साहूं बाधा अंतरी ।।१।। वांज खेठर मोहिनी खोठी चंडाळीं ।। ब घा जीवग्राहिणी ।। कोठुनीं कीं आलीं ।। लाज नाहीच जे मनि कोपि अगुणाळी हा जन धिक्कारितां हास्य हर्षेमानुनि ।।

**सूत्रधार :** येणेरीति पुत्रास आठवून त्याचे साहिना सारिखे. देवापाशीं हि गाऱ्हाणे देवून शरीर भाव विसरून पुत्र वत्सल्याने अनुसरून थोर थोर संन्यास विलोकून बोलतो ।। तुम्ही म्हणाल कीं त्याच राया नीति सांगून येकायतरि ऐक. सांगा काही न्याय रायाशी कां घालूनि घोण करितां उपेक्षा लागतसे लवलाहे पांयांशी ।।अ।। सतीच्ये सांपडला कांत ।। न वदवे माझ्याने नीतिकी निवशी ते मोठा स्ववश नव्हेची कवणासहितीची अवघे ।। ठावुक करितिकीं ।। जीवलग बालाशि वीवदा अवनी शाला जसीकीं बये तो की ।।

**वचन :** तुम्ही म्हणाला कीं रुक्मांगद राया तूं जे मागशील ते खेयीन मागें मंद्र पर्वती ला आतां तिणे व्रत भंग कराल याचा वर मांगता भूपाळानें मागें सरल्या असल्याचा दागला गेला तरि ऐक.

**(श्लोक):** अहितकानि ।।

**दरूऊ :** (मदन मोहरु)

राबवुनिया मोहिनीने मदमस्त वल्लभे मंद्दरि वदने केला पण वदवेना तैसा ।। न दुसरीं ते साक्षिव धुवीण या आर्थिकी बरी वधन मयी पण वर्जिल्या साधर एवं विधबीपरी ।।२।।

**सूत्रधार :** येणेरीति सन्यास विसविण्या करून धैर्य अवलंबून ममता मोहास विडंबून धर्मांगदाची बळी वी परंतु रायाचे सत्य प्रतिज्ञे भंग येवुनये हे निर्धारितां.

**सूत्रधार :** येणेरीति सन्यास विनवून धीर सोडून पुत्र ममता पाळणी बद्ध होवून दुस्तर चिता समुद्री बुडतां तीचे समा धर्मांगद सन्निधानी येवून माबुलीचे समाधान करितो.

(छंद) : जननि आपुल्ये अंतरी वृथा शिणशि कासया सागत कथा जनक पैज तेव्हां दयाखरी ।। तुज तनुहि वोपितो साच मी बरी ।।

सूत्रधार : धर्मांगदाची वाक्यवळी ऐकून त्याला नीट विलोकून पोटीं कळवळून संध्यावळी बोलते ।।सी।। वांज आसतें जरि वारिजाझा सुखें या जगीं वांचते आत्मधामि राजसा तुज कडये रोखदेतां खेद माजे ।। तो मानस माजि स्वामि काजें जालें फिकें काय बोलू वृथा माझिया जीवलगा मात हे मी भाजूनी तव तनुभक्षणार्थचि नृपा भाज गा भेट ली हे हरामि ।। भोज कीं न वुरलें पूर्ण वलांबोज निरखूं तुझे भोसु पुत्र तूज हे गिलिल जरि दुश्चरित्राचोज वृतरि कोठ चारु गाता.

सूत्रधार : येणेरीति मावुलीचे वाक्य ऐकून धर्म अघटित गोष्टि घडली म्हणून धर्मांगद बोलतो

श्लोक : घनांधकारी रवी तो बुडाला ।। विवेकेशी मोह ग्रहीद डालाकी तप्तता गांग जलें वुदेली माते तशीं तां अजि गोष्टे केली ।। बापाची प्रतिज्ञा राखावया कारणे म्या माघार घेतला तर्हि त्वां बुद्धि शिकवुन कार्यसिद्धि करावि ।। ते जावू वुपराहीं तूच कष्ठि होतसे इतकी पर वुभयता ही मिळून राजास सत्य प्रतिज्ञ करावें ।।

सूत्रधार : ऐसे निर्धारुन ।।

सूत्रधार : येणेरीति धर्मांगदाचे वाक्य ऐकून रुक्मांगदास विलोकून मोहिनीचे हाती धर्मांगदास समर्पून प्रतिज्ञातार्थ यथार्थ करावा म्हणून संध्यावळीने प्रार्थिता रुक्मांगद बोलतो पाहा ।।

दरूऊ : (बिलहरी)

रमणी कैसा निवटूं सांग रमणात्मजा स्वमरण याहून शत गुणी उत्तम समजनवधी परिशि शुहाझा द्विप येकची पाळित होतां कीं सुरुचिर गुणवती मी भूपमंडन केवळ म्हणवीत कीं मजहुनि या आधिकचि हा प्रिये तव नंनद जो सखी ।। दीप भानु कुलाशी हे सन्मुख तो पाहा द्विपसा तही संगोपि तो व वीर नायकी ।।

सूत्रधार : संध्यावलीशी बोलून पुत्रास विलोकून कष्ठी होतो पहा.

(श्लोक): ज्याकरे तव मुखा कुरवाळी तोचि योजुनि कसा करवाळीं ।। संहरूं तुजचि हे कणवाळी ।। भाज की शिणललें कुरुवाळीं ।।१।।

सूत्रधार : येणेरीति रुक्मांगद राजा कनिष्ठ होतां धर्मांगद बोलतो ।। राया सत्याशी न सांडीं ।। धैर्या ते करुनि ।। हेय–अवध्या कलुष समूहि हे अन्य तवदणे समजे मनीं ।। माया त्यजुनी यां वधाया ।। माते सज्जगुण निलया ।।अ।। भीम तनय स्वकीयेस्य भीम विक्रमालय नाम भभू धनकायन वधिला काय ।। भूमिपाल प्रणमीतसें तुज मी पहतरि तूं सत्य काम करुनिया मला निजधामां पाववीं दाखवी सोय ।।

सूत्रधार : येणेरीति धर्मांगदाचे वाक्य अैकून रुक्मांगद प्रत्योत्तर देतो.

**वचन** : पुत्रा त्वा दिल्हा तो दृष्टांत युक्त नव्हे भीमसेवाने बभ्रू आपुलालें की हे न जाणून कृष्णोपदेशाने त्याचा प्राण घेतला मी कळून कैसे तुझी अनिष्ट करुं कष्टे ते धन्याशी ।।

सावेरी ।। जंपे ।।

हरि हरि केवढे हे वुभे ठाकले दुरित माझे पुढती तनयां जे स्मरतांची काज मन हरवहुनि सद्याकरवुनि जातसे सदया ।। दिव्यवर रुप जो पुरलष धारिये त्या तुझी शिरसे कापिजे सखया ।। आणी करही हा उचलूनि तरवार वध तुझा व तर्हि करील कैसा सौख्य निलया ।।१।।

**सूत्रधार** : येणेरिति रुक्मांगद राजा खेद पावतां धर्मांगद विवेकोपदेश पूर्वक त्यांचे समाधान करितो ।।

**(श्लोक)**: श्रीयालें श्रियालंकृता शंकराशी ।। दिल्हे कापुनि आपुल्यालें कराशी ।। अमी मांस तन्मांस हि शीघ्र खाया ।। पुन्हा सज्जलास सज्जना मान्य राया।। परंतु त्याने अतिथि साठी करुन पुत्र संहार केला तुवां एकादशि तिथी साठी माझे वायीट करणे मांसखायाचाचा वुपद्रव एक हे तोच थोर लाभ ।।

**सूत्रधार** : ऐसा वुपदेश करितां ही रुक्मांगदाचें चित्त ममतां भ्रमा वती–मग्न देखून पुन्हा धर्मागद बोलतो ।।

कां मोह धरितां कळूनिहि सर्व काही ताता ।। जांयीं जणी हे तनू जायील कधितर्हि बरवा वुपयोग आता कां ।।१।। एकादशी व्रत सिद्धिसा करता हरिची पंथे एका दोनी कार्ये येणें होतां ।। आनंदियासवें सारी ।। अनेक नंदन केल्ये मानितां कां लेश हे तनुजा तां ।। अनाशी तो आत्मा एक ।। अखंड सर्वत्र आहे धनानंद शिद्ध पूर्ण नाथा ।।

**सूत्रधार** : येणेरिति धर्मागदाने धर्मोपदेश करुन आत्म प्रस्तुत कार्यार्थ् जनाकाचे पायी किठि घालितां संध्यावळीनेही सय्यासठळू नये ।। आत्मानं सततं रक्षेद्धोरैरपि धनैरपि ऐसे शास्त्र आहे यास्तव कुमारास तर्हि मोहिनीच्ये हातीं वोपून स्वप्रतिज्ञा भंगरुप दोषा पासाव आत्मसंरक्षण करणे युक्त ऐसे म्हणून वल्लभाचे चरणारविंद सधृढ धरितां राजा स्तंब्द राहतां धर्मागद बोलतो ।।

**(छंद)** : प्रशमसागरा सद्‌गुणाकरा ।। विषम भाव हा टाकुनि खरा ।। वुशिर तो न लावुनि ये क्षणी ।। स्वशिर कापिजे प्रार्थितो झणी ।।

**(श्लोक)**: देहतो सदृश्य बन्दुदा नेणकां घडशि सर्व विब्दुधा ।। शीघ्र हे खचवीं स चावडी ।। दुसरि मज नसेचि आवडी ।।

येणेरिति धर्मागदाने प्रार्थिता मोहिनी रुक्मांगद रायाने गहीवर येवून आंशी गाळीत हळूचे न बरे म्हणता मोहिनी बोलते. पहा ।।

**(श्लोक)**: येवू नये नेत्र युग्माशी पाणी घेऊनियां शीघ्र करें कृपाणी ।। धर्मागदाच्या शिरी शीघ्र हाणी ।। धर्मांशि तेणें न घडेल हानी ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहिनीचे वाक्य ऐकून रुक्मांगद रायाने खड्ग. उचलता तों.

(श्लोक): लखलखत जशी कांचन साखळी ।। विज जणू अथवा घनी वांकली ।।
तशी असियुत फांकली ।। सकल लोक दिठीतई छाकली ।।

सूत्रधार : येणेरिती तरवार लखलखाय मान वुचलून गीतंपुरा वसिष्ठेन पुलस्यक महात्मना महत्या पदि संप्राप्ते स्मर्वब्यो भगवान्हरी : ।। म्हणुन रुक्मांगद बोलतो पाहा.

दरू : येस्कुल कांब्रोदि ।।

स्वामी श्रीमानस हंसासुख सिंधू श्री प्रतापराम हा मी तूझ्या पायीं आलों शरण आतां दीनजन बंधू सरसिजदळ निभ सरस नयन युग मुरहर सुरवर वरद व्दिरद सुखकर धृतशर उदारा ।। १ ।। पावन सुकृपा वन निधी पाववी पारा लवकरी या परि प्रणमिने तादक हें पदाब्ज ।। २ ।। विखत शोक भरीं अति सांपडणीं ।। सतत तूजे विणे गति नाहि सांप्रत मज हे त्रिलोक ।। ३ ।। तू गणणातहीं ।। तू घन भाग्य ही सांगे यथार्थ हे गुण धामा ।। भूमि नंदिनीश ।। ४ ।। याससुयास येशी न प्रयास निरास पैं करूं ।। उदास होवूनी दासावरी जनि सरले नाहीच ते सकळहि ।। दुरित बासते जी ध्यास तुझा जीवास ।। ५ ।।

सूत्रधार : येणेरिती भगवंताचे स्मरण करून माथालववून पुढे बुभा ठाकला जो धर्मांगद त्याच्या मस्तकीं धाव घालाया कारणे वुद्युक्त होता दोघेहीनि रूक्मांगद रायास विलोकून बहिरंग धर्मांगदावरिमाया दाखवून बोलते पहा.

(श्लोक): जीवदान नृपा देई शीघ्र धर्मांगदास या ।। शेवी एकादशी माजी अन्न प्राणाधिक प्रिया ।। रूक्मांगदांचा व्रत भंग करावा म्हणुन मोहिनीनें वंचना आरंभितां वल्लभास विलोकून संध्यावली बोलते पाहा.

(छंद) : सकळ जाणकी भूपकेसरी न करी भोजना विष्णुवासरीं अकरूण वत्थे अंगी कारूनीस्वकरें ठाकिजेपुत्र मारूनी ।।

सूत्रधार : संध्यावलिने संवादतां ।। चूर्णिका ।। तदनंतरे निजवधोद्युक्त होता भूपाळाने प्रसन्नांतरें धर्मांगदे जन नि जनकाच्ये चरणारविंद्द वंदून अरविंद नाभा ते स्करून रूक्मांगदा वुडती आपली वृत्त मांग लववून संतुष्ट तिष्ठता त्वरें हरिचरण परिचरण हरिवासर व्रताचरण जन्य अनन्य साधारण सुकृतातिशयें निधूतांहंताममता पंक परमानंद संदोह भरित कुशाग्र कुमरें ।। तटित्कोटि प्रति भट लखलखाय मान करोरूहे तरवार वुचलून धर्मांगदामस्तकीं मघाव घालू ज जातां भगवव्दक्ताग्रेसरें सर्व लोकांची या हा हा कर स्वरें दचकुनि प्रचुर भये ।। अचिरकाले सहस्र मंडळ झंझडितां भुजगेश्वरे ।। सकल जल निधीच्ये वुल्लोल कल्लोल वुचळतां वुलंडल्यागि गिरी शिखरीं मंडित धरा मंडल चलतां खेचरा बरी खचूनि वसुंधरे परि पडतां–प्रचंड प्रभंज नोत्पाता समवेत वरिच्या वरी विजाचा वर्षाव घडतां–नाभी नाभी याशजाचा गंभीर घोष करित गरूढारूढ पद्मनाथ प्रकण जाला पाहा. घडतां नाभी नाभी या शब्दांचा गंभीर घोष करित गरूढारूढ पद्मनाभ प्रकटता जाला पाहा.

# अनसूया उपाख्यान नाटक

## १०. अनसूयाउपाख्यान

शुभमस्तु ।। अविघ्नमस्तु ।।

सत्तामात्र अखंड बाधधन जी–सत्ता–पशी वुद्धरूं । चित्तातोषवुं स्त्रीसमेत मुनिच्या दत्ताचि कां जो गुरु ।। वित्ताधिशनिजानुजावधु मदोन्मत्तावनीं पावला । वुत्तारो विभुतो अंह्राशि असुखा वर्तावुनी सावळा ।।

**वचन :** येणेरिती नाटकार्थं संग्रह श्लोक म्हटल्यानंतर विध्नेश्वराची प्रार्थना केलि असतां प्रत्यक्ष येतो पाहा.

**दरु :** ।। कोंडुनि आनंदभरें ।।

**सूत्रधार :** पारिपार्श्वक विघ्नेश्वर येवुन सकल विघ्न निवारण केली कीं, या प्रस्तुत कार्यास तां इकडे यावें. ' जी मी हाजीर आहे. ' तरि पारिपार्श्वक, नवरस भरित सरस भक्ति ज्ञान वैराग्यप्रधान वर्णाश्रमादि धर्म प्रतिपादक नाटकहि नाचवूंन सभ्याचें मनोरंजन केलें. सांप्रत सकळ धर्म शिरोमणी जो पविव्रता धर्म तन्महिम प्रतिपादक दिव्य नाटकाभिनयनें सदस्याचें अंतःकरण संतुष्ट कराया इच्छितों.

**पारि. :** अरे विसरलास काय अनसूया प्रभाव प्रतिपादक सिद्ध हि.
अरे कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ?

**(श्लोक):** प्रतापसिंह सद्भक्ति ।। आणिक त्या प्रभाव ऐक ।।

**(श्लोक):** जो धर्म कार्यी सदृढाभिमानी । सदैव की दैवत विप्मानी ।।
अद्वैत निष्णात असूनि पाहि ।। आसक्ति जो केवळ राम पाहीं ।।

**सूत्रधार :** अरे युक्त युक्त. परंतु पारिपार्श्वकाबैम्हापरोक्ष ज्ञानीं जे महा पुरुष त्यांच्या मुख्य प्रसादा प्रमाण तुझाहि मुख प्रसाद लक्षिजे, तो तरीं याचें कारण काय सांग ?

**पारि. :** ऐके गा विपलें विचित्र सपनीं जें कालिचे यामिनी ।।
कोण्ही येक तमाल नील मणि तो म्या देखिला यामनी ।।
नोह्य हें तंवं चोज बाह्यातिमिरा तत्कांतिने ध्वंसिले ।।
चंद्रार्का अनिवार्य अंतर तमस्तोमासहिं ग्राशिले ।।

**वचन :** इत्क्येच नोह्ये.

**(श्लोक):** विद्युल्लता जशि घनी झळके सदाबा ।।
तेविच येक ललना ललिता सदाभा ।
रूक्मान्न तन्निकठीं वीरहिं पालिराखा ।।
म्या देखिला रणी अनावर कोटिलाखा ।।

**वचन :** तन्मूर्ति दर्शनापासून अद्यापिहीं आनंदाच्ये हेलाव्ये मानशी हेलावताहेत ते कांही सांगू पुरवेना.

**सूत्रधार :** अरे तूं मोटा धन्य पुण्य श्लोक. जें जानकीं लक्ष्मण समवेत अखंड बोध स्वरूप सांवळे परब्रम्ह देखिलें.

सूत्रधार : ऐसे संवदतां वैदेहि सौमित्रि सहित श्रीरामचंद्र येताहेत पाहा.

दरु : (सुरठि)

रामचंद्र येतो धामनिधी कोटि ।।
धाम दयाधन हा ।। नाम घेतांची
अनामय जो देयी ।। नाम कैवल्याचा
पामराशी पहा ।। अ ।। मरकत मणि
सकलामर राजमणिसम सरसवान ज्याचा ।।
परम मनोहर निरुपम मुख सरसीरुह दृष्टीस
निरखितांची सर्व निरसे भव ज्वर ।। १ ।।
बाहुजतिलक सुबाहु राक्षसाच्ये–बाहु खांडुनि
जेणे आहुति घेतली–बाहुली नटवी जो बाहुलीं
जीची बाहुनी दे पदवी ।। भाविकाशी भलीं ।। २ ।।
कुठिलाल कजाळ संघटितमया ।। जठा पटल रूपेची मकुट साजे
चांगला ।। निटिलाक्ष भेद प्रकट करूं वेषेंया नटला नेणो ।।
जगन्नाटकी अगळा ।। ३ ।। वल्कल वसन ते वेष्टिलें
कठीवीर्य शुल्लक शीतासवें शुद्ध मतीवरी ।।
कल्क जोंगधदरूप कलमषा कमलकीं जल्क अरूण
पदजैत्र धनुर्धारी ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती जानकी लक्ष्मणा समवेत श्रीरामचंद्र येऊन सौमित्रास विलोकून बोलतो पहा.

(छंद) हितकरीं जगीं कैकयीपरी ।।
अतिशय नसे सत्य दुसरी ।।
व्रत तपोनिधी जी सटीं मुनी ।।
सतत पाहतो हिंडतां वनीं ।।

(श्लोक) पत्रं पुष्पफलीं समुद्ध बरवीं धाती रुहांचि कशी ।।
च्छवी भूत सुरेख पंक्ति मिरव्ये चित्ती लिहावी तशी ।।
पत्री कोकिल कीरकूजति पडये श्रोत्ती ध्वनी साजरा ।।
नेत्री आश्रम लक्ष्मणा निरखीं हा अत्री मुनीचा बरा ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीराम भावाशी संवदता जानकी देवी वल्लभास विलोकून वनाचा अतिशय वर्णिते पाहा.

दरु : (आनंद भैरवी)

श्रीराम देखिजे दिठिया आरामा ।।
व्योमा गामीच् ज्यामध्ये अजि हे कहीरुह पूर्णकामा ।।
साहुनिया आंगे साधुहि महतप बाहुजमंडनापांडी
जसा तप साहस बहुहे तसा करिती अनुसुरूप होऊनि अतिहीन योनि
नराहुनि हे धन्य पादप ।।

**सूत्रधार :** येणेरिती जानकीचे वाक्य ऐकून हा सर्वेहि महानुभाव अत्रीचा प्रभाव म्हणुन श्रीरामानें संवदतां अत्रि महर्षि शिष्या समवेत येतो पाहा.

दरु : (कांबोदि)

सातापसाग्रणी येत हा पहा मुनि ।।
जो पयोजना तनय कोपकाम मर्दन जनि ।।
अ ।। धरित अत्रिया सरस नामकीं ।।
दुरित पुंज देखुनि ज्या दूरि पळतकीं ।।
परम पुरुष मूर्ति निरंतर वरद ध्यातनिकीं ।।
हरिहर भेद भ्रमाशि हरूनि शीघ्र टाकी असा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती अत्रि मुनीश्वर येताचें त्यांचे चरणारविंद वंदून श्रीरामचंद्र करद्वंद्व जोडुन बोलतो पाहा.

दरु : (भैरवी ।। आदि)

मुनिवरा सफल जाहलें ।। जन्म हें बळें ।।
अनुपम सुख पावलें जननिजनक कुळक्षणीया दर्शन बळें ।।
धनश्लाध्य पण पावलें अतिशयें धन प्राप्तहि अखिलकीं
महि ।। स्वामित्व निश्चयीं शतमख पदतेहीं न तुळये
या लाभा कांहि कितिर्तहि वान् वडायी ।। १ ।।
संसार ताप धसरा ध्वंसूनि धीरा
हिंसाव्हया मनुपुरा संशित व्रतपरा
संत्संग एकबरा संशय नया वुत्तरा ।।

**सूत्रधार :** येणेरिती रामाचे रसाळ वाक्य अैकून खुशाल होऊन अनसुयेचा कांता वुत्तर देतो पाहा.

दरू : (कल्याणी ।। आदि)

धन्य झालों मी आतां आत्मारामा ।।
पुण्यश्लोका पाहुनि तूतें पूर्णकामा ।। प ।।
गण्य गुणाड्य गणि घडलो अनरण्या कुलेश
हिरण्य धनुर्धर ।। लक्षकोटी जन्म माजि
आत्मारामा कृत जें लक्षण पूर्वजातप म्या दिव्य
नामा ।। अक्षय तें पळलें आज घनश्यामा ।।
अमृत या क्षणे तूझिया सर्व सार्वभौमा ।।
लक्ष्य नव्हे मज मोक्षहि शिक्षत राक्षस ।।
वृंद सुलक्षण शीमा ।। १ ।।
नामरसायन तूझें पूर्णकामा ।।
पिऊनिया पामरहि हरिति संस्कृति रोगकामा ।।
सामर विधिहि नेणे महिमशीमा ।।
फुल्लतामरसाक्षासम भर भूमि भीमा ।।
प्रेम पदद्वयीं दे मज आणिक तें मनीं

इष्ट नसें अभिरामा ।। २ ।। हा मी तव
अंशसाचा आत्मारामा ।। अंतर्यामी
तू सकळ जीवाचा आत्मारामा ।।
दिव्याचा मी करविल सत्कवचा आत्मारामा ।।
कामित दायक काम मनोहर कोमल मुखजित
सोम परात्पर रामा ।।

सूत्रधार : येणेरिती अत्रि महामुनिचें वाक्य ऐकून श्रीरामचंद्रानें संतोष पाऊन अनुसूयादेवी दर्शनाची उत्कंठा धरितां ते सखिसहित येते पाहा.

दरु : (सावेरि ।। आदि)

येतसे अनसूया अत्रीची प्रिया ।।
संतत निरसूया जेतवं भुवनातीत देखुनि भली ।।
वुत्तम गुण म्हणति येथेंचि असूया ।। अ ।।
धाता आणि सुखदाता महेश्वर ।।
पीतांबर धर ख्यात अखिल जनीया तीघांचि हि ।।
माता अत्यंतचि म्हातारी केवळ जे तपाशी खाणी ।।

सूत्रधार : येणेरिती अनसूया आल्यानंतर जानकी लक्ष्मण समवेत श्रीरामस्वामीनें सांष्टांग प्रणाम करितां मुनि पत्नी संतोष पाऊन रघुनंदनास पाहून बोलते पाहा.

(छंद) प्रणत वत्सला राघवा तुझा ।।
झणी विलोकितां श्रीमुखांबुजा ।।
घन सुखाब्धि तो आजि फूगला ।।
मनि न कल्पव्ये तेंवि आगळा ।।

दरु : (येरुकूल कांबोदि)

भुवनी मी धन्य अति नवधन स्यामला ।।
अवनिजा निज हृदय धामा ।। प ।।
भवविरिंचाशि वैभव नसे हें कदा ।।
तवरूप दर्शनोद्भव हृदयभिरामा ।।
जो तूं नित्यानंदाकार परम ज्योतिर्मय
अगुण अविकार सकल भूत हृदयीं निवसणार
पाहत्यें त्या तुज मी नयनी सुरनाथ जी साचार ।। १ ।।
वेदासहि पार कदा कळेना योग्यांस जें मानसीं
आकल्येना अतींद्रिया व्याप्त अश्या स्वरूपा ।।
प्रत्यक्ष पाहें सकळात्मरूपा ।।

सूत्रधार : येणेरिती अनसूयेचे वाक्य ऐकून संतोष पाऊन जानकीस अवलोकून बोलतो पाहा.

दरु : (बिलहरी)

जानकीस सांग तूं मानसीचें गुज मानसीचें गुज माय बायी आतां ।
जणू मी इच्छितें जाण पूर्ण सहज ।। अ ।। खुपति तूश्यापदा ।।
सुमतिमव फतर नृपतिलक नंदिनी नित्यसाचार ।।
त्यापदे अनुदिन हि विपनी फिरशी कशी ।।
वृपलकंठ जेथें बुपमेतीत घोर ।। अनुपम मांसाच्ये
जिनस पक्वान्नेशि कनकांगि
आत्माराम प्रत्युत्तर देतो पाहा.

(छंद) जननि बाळकाप्रति निर्भर म्हणत तू महाराज
हे बनें तनय मी तुझासटी अशीं प्रणय युक्त तूं फार वानिशि ।।

सूत्रधार : येणेरिती रामस्वामीचे वाक्य अैकून
तुझीया मनायेणे कठिण ।। वनपळें तैशी
तूं विरस कडू तिकठ ।। अनुदिनी शेवेशि
अमणि कैशि सगुण ।। वृपरि परि जेथें
न परिस्पंद वायुचा ।। अपण राहुनि
तेथेच लयेणे लोचने निपुण जेथे वारा ।।
नियत धूळिशि बडव्यै विपिनी मोकळचा
अइशा बनसि केंवि शोभनें ।।

वचन : तू म्हणशील इतुक्ये ही क्लेश भर्तार एक निरंतर लोलंगत असलियां सोसूयेत कांतरि सर्वसुखा पेक्षा कामसुख अधिक तरि याचे वुत्तर ऐक ।।

(श्लोक) आत्माराम अवाप्त काम सतत श्रीराम माझा सये ।।
तो तूंशी रतला कसा गमतसे ही थोर कीं संशये ।।

सूत्रधार : येणेरिती अनुसूयेचा वाक्य एकून वैदेही वुत्तर देते पाहा.

(श्लोक) प्रेमाचें परि त्या निरंतर सुख ग्रामाशी मोठा पिसें
त्यामूळे मदधीन दिन करूणा पारिण झाला असे ।।

(श्लोक) अंतर्बाह्य हि नित्य भास्कर प्रभा व्यापूनि जेथे असें
तेथे हे ललनोत्तमे तिमिर कीं थोडेहि कैसे घुसें ।।
तसा पूर्ण सुखावुधी नखशिख्ये पर्यंत या वोघटीं ।।
अस्तां नांदत केंवि सांग वुसळये दु:खोर्मिते वोखठीं ।।

वचन : आणीकहि तुवा वनवास फार कठिण म्हणुन बोलिजे लेकीं त्याचा फेडा सांगते ऐक ।।

दरु : (आहिरी ।। आ.)

काय वंदू नवलाई तुज पाशीं ।। प ।।
नायक सन्निधानी येक असल्याहा
नाहि युणे भाग्याशीं काही ।।
रमणिय्यांग परम पुरुषा या
रमणाच्या सहवासें अमर पुराहुन

अमित गुणाधिक अमणि वन हे भासे ।।
कुलतिलकाची ललना म्हणुनी मी
जलजंबुधहीनता वीपूल तशी मवभूजननी
मध्ये चालत जातां देवी ।। वुपरीहुनि मज वुपजवि रति मही
उपरिही राहणें मातें सुपति तृणाचीहि नृपतिलका या
सुपतिसवे सुख देते ।। २ ।। सुरुचिर रमणाकरिची बहुविध
तुरुची फळेही खातां सुरुचिसुधे हुन सुरुचि गमति
अति अरूचि न येकहि चित्त ।। ३ ।। यजमानिनण मी
निज तनयाची गुज हे समजूहि वारा ।। रजनुधनुनि रज
वीशित घडुनि ।। विजनि स्वयें विजणवारा ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती जानकीचे वचन ऐकून तीची अनन्य साधारण पति भक्ति देखून अनसूया अंतरिं हरिख पावून पुन्हा बोलते पाहा.

दरु : (पुन्नागवराळी)

जनक नृपनंदिनी जनि यया तूं ऐक ।।
जननिये धन्य होसी ।। प ।।
कनक रूचिरांगी तुज आणिक जोडि नसे ।।
कनकचे निश्चयेशीं सखिये ।।
परिसतां तव वचन ।।
माळिका हे सुधेपरिस अति गोड वाटचे ।।
वरि वरि कांडे हरिणांक बिंबमुखी हरिख मोटा
हृदयीं हरि हरी तोन सांटयें ।। तरि तुलावर अतां अर्पितें
ज्यासठीं ।। त्वरित सौभाग्य दाढये जो जीवनजे सकळासीं असतां आपणात
तो कसे त्राशी मद्यस्थेची नभ तुझे बांधिल तें सांग केंवि गुणराशि ।।
येणे प्रकारे पंचभूता कडुनिहि उपद्रव नाहि ।।

सूत्रधार : येणेरिती जानकिला वर देऊन पुनः पुन्हा तुज समाज पतिव्रदा कोणी नाही म्हणून अनुसूयेनें स्तवितां सीतादेवी उत्तर देते पाहा

दरु : (कांबोदि)

आपुला प्रभाव हा अद्‌भुत पाही ।। न परि काज
हे माझें निगदितें भाव हा यापरि दृढ भक्ति
पतीच्ये रायीं महास्वमनिया संपदा न मनीच मी कदा
रमणावीण आपदा भावीं सदा अमये वल्लभ पदा
अमित वैभवा सदा समजल्ये जे समुदाय मणि समुदा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती जानकीचे वाक्य अैकून अनसूयेने जानकीस प्रियवचनें गौरवुन पतिव्रता धर्म सांगून अत्रिमहर्षि जवळी तीनें उभे असतां तो वीणरव मिश्र नारायण नाम संकीर्तनाचा ध्वनी कानीं पडता श्रीरामादिकांनी काय हे कौतुक म्हणून आकाशाकडे देतां नारदमुनि येतो पाहा.

(दरु) कलहाचे मूळ तो येतसे अवलोका जलजासन तनय ।।
नलिनाक्षाचें मुखें नामघेत सुखें जलदवायू परिनिलय
गुणस्वय ।। अ ।। नारद हें नाम ज्यासि भक्ति पारग
सद्‌गुणाराशी ।। मदभार अहंकृती ग्राशी ।। यष्ठ फार जो मधुसंहराशी
श्रीहरासी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती नारद महामुनि येतां त्याला अनसूया वल्लभानें अभिमुख जाऊन कुशल प्रश्न करून आगमन कार्य विचारीतां तो उत्तर देतो पाहा.

(श्लोक) साचा जो निजबोध पूर्ण जलधीशांचा सुखाचा महा ।।
ज्याचा फार वंदून शक्य श्रुतिची वाचा विचारें पहा ।।
त्याचावर्ग रघुत्तमाशि तिर निरखून पाचारिता या
मनें आचारैक निधी अलोमुनिवरा लांचाउनी तद्‌गुणे ।।

वचन : यापरि बोलुन रामस्वामीस विलोकुन नारद बोलतो.

दरु : (यमुना)

दुर्लभ तुझी भेटी हे ठीक जाली ।। प ।।
वल्लभजी शीता पूर्व पुण्य या काळीं ।। अ ।।
त्रिभुवनि शोधितां प्रभु जी असी नाहि
शोभनतर मूर्ति लावण्यशाली ।। १ ।। कोण तुझें
हे गुणे वदनीं वंदू सके मानसहरा वृत्ति अंत्यत
धाली ।। २ ।। अभिनव सुंदरा अधवी घरासीया ।।
प्रभावकीर्तिचालूनि आली ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीरामचंद्रास स्तवुन अनसूया कांतास अवलोकून नारद बोलतो पहा.

(श्लोक) चित्तीं नित्य ठसविलें मुनिचिया सर्वत्र पैसावळें
ध्यातां जें निजपावले करिवरा त्या संकटी पावलें ।।
चित्ताचें बहुकोवळें प्रकृतीच्या स्पर्शाविना सावलें
भाग्य ब्रम्ह विसावलें तवं घरी रामाख्य हें सावळें ।।

दरु : (सुरटी)

मुनी धन्य तूं अति अनसूया कांता वान् मी किती
तुझारे वाड प्रभाव हा आतां ।। अ ।।
उपदेशी विधिलाही आपण जो जलशायी ।।
तो परिपूर्ण हि तवपद नमि जयीं ।।

सूत्रधार : येणेरिती अत्रि महर्षीने नारदाने स्तवितां त्याला विलोकून अनसूया कांत बोलतो पहा.

(छंद) रघुपतीचिया दर्शनात्वयें निगमपारगा पावलाशि रे ।।
प्रकट हे खरें अन्य काज हे निगदि गुप्त जे मानसी अहे ।।

सूत्रधार : येणेरिती अत्रिमुनीने प्रश्न करितां कहलप्रिय सविस्तार वर्तमान सांगतो पाहा.

(श्लोक) गेलों मी विधी आणि माधव तथा श्रीदुर्जटीच्या पुरा ।।
तेथें गाचर लोचना न घडतां ब्रम्हादि योगीश्वरा ।।
केला प्रश्न तदाश्रितज व्यका म्या दाटुनी कीं असा,
सांगा देव तिघेहि कोठ असतीं कांरे उगेची असा ।।

वचन : येणेरिती म्या प्रश्न करितां त्यांनी उत्तरे दिल्हे तो प्रकार सांगतो ऐक.

(श्लोक) वनिता मनि जनी अनसूया। तीवरि धरूनि थोर असूया ।।
शंकर प्रभृति मध्यम लोका। ते गात प्रभु समस्तहि लोका ।।

वचन : भूलोकिहि कोठें हुडकावें म्हणुन म्या पुसतां हरिहर सेवकानी उत्तर दिल्हे तो प्रकार ऐक.

(छंद) मुनिवराश्रमी अविख्यातयां। गुणगणाबुधी सुरत्रया
धनकळि प्रिया सत्य देखिली। मनी अशी सुच्चे मूर्ति ठीकली।

वचन : ब्रंम्हादिकांस इतकी अनसूये वरी असूया यावयास काय निमित्त म्हणुन म्या पुन्हा विचारीतां त्यानी उत्तर दिल्हें ते ऐक ।।

(श्लोक) पाताळाख्य प्रसिद्ध लोक अति जो बाताशनाचा बरा ।।
तात तेथवरी नसेचि सहसा कीं तो य बिदुभ्ररा ।।
जातां गुल्मलतां तरू करपुनि खातां जवानी जवा
भूताची जगि मात सांगकयिची तू तापसा तेथवां ।।
वाणी वाणी ज्यास सोडुनि पाणी। नाणी नाणी
ऐक दृष्टीस कोण्णी। कोनी कोनी बुंदुशातेसुकोनी
पाणी पाणी बोलती सर्व प्राणी ।। २ ।।
बोलता नलगेची पै अणुतिये बेलारसशे प्रति ।।
बोलावा तनुदाहही प्रगटला बेला त्यजूनि अति ।।
बोलावा नभीं मेघ येक घटिका तो लाधवें नातरि
बोलावा आमुच्या घडेल वुटिकाला कोलाहलू या वरी ।।

वचन : येणेप्रकारे अनावृष्टीने कष्टी होऊन सर्व लोकानी तजवीज केली तो प्रकार हरिहर दूतांनीं सांगितल्याप्रमाणें निगदितो ऐका.

पद : (फरजु)

करणे कायी या परि अम्ही शरण जावा कोणा ।।
हरहर हे भय परि हरू दुर्घट थोर निश्चये ।।
श्रीवत्सा का जीववी म्हणु जरि की वनसे त्याशी
जीव घेतला माउलीचा जेणें मातुनी मदें अहोजितयीं ।।
गौरीनाथ हा घोरकीं चुकवील कीर नव्हे हे हीं ।।
मारारीतो मारक त्रिजगाचा साय पहा विचार हृदयीं ।। २ ।।

(श्लोक) दाता विश्वरचूंच शक्त न परि त्राता जगातें यया ।।
जातां त्या निकटी न अल्प अमुच्या हाताशि येयीलया ।।
सुत्रामात्री दर्शेद्र दुष्ट अवध्यां गोत्राणीं भेता महा ।।
शवाणीतरि देव केंवि करिती संत्राण अंचे पहा ।।

**वचन** : येणेरिती हरिहर दूतांनी वर्तमान सांगता लक्ष्मी पार्वती दोघे जणीहि आदिशक्ति लोक संरक्षण शक्त असतां त्यांस जन शरण कां न गेल्ये म्हणुनि म्या पुसतां त्यानी उत्तर दिल्हे तो प्रकार ऐक ।।

**(श्लोक)** काळकूट भगिनी हरिकांता । काळिका गिरिसुता धनकांता ।।
येकहि न परिलें करू वाळी ।। ते करें कसी अम्हा कुरवाळी ।।
अनसूया नव्हति ज्या सासूया त्या समस्तही नारी शरण
रिघल्यां त्यांशी रक्षिते हें तों वृथा कथा सारी ।। २ ।।

**वचन** : ऐसे निर्धारून अनसूया निकट जाऊन सर्वजनानीं प्रार्थना केलीं तो प्रकार हरिहर दूतांनी सांगितल्या प्रमाणें निरोपितो ऐक.

**दरु** : (गोळि पंतु)

पाळी अम्हाशी अनसूये तूं निरसूये ।। प. ।।
साहस केल्यानेहि माये ।।
भूकतहान राहिली सर्वधान जाये ।।
करुणा कटाक्षा पाहें क्षणेक तुज्यें
पाये प्रणमितो स्वयें ।। दुःख यापरि
जननीचे ।। इतुक्ये दिवस देखिले नाही जननीये ।।
क्षाम देवता हे जशी त्वरे वार्ये तेंक रीं पुण्यालयें ।। २ ।।

**वचन** : येणेरिती जनानी प्रार्थितां अनसूयेने त्यांसी अभय प्रदान केलें तो बाप अवधारिल्या प्रमाणे सांगतो ऐक.

**(श्लोक)** काये नेमन सागिरा स्वपतिन्ये पाय स्मर्ये मी जरि
छायेशी अनुवर्तुनी अणि असें स्वायनुवाच्ये तरी ।।
त्या एका सुकृतेंचि सर्वहि जनापाय त्वरेनें सकीं
यावद्वय पुष्ठ लोक अथवा हा येथ सौख्ये स्थिरो ।।
नित्य दिव्यान्न दाने ।।

**वचन** : येणेरिती अनसूयेनें सर्व लोकांसहि अभय प्रदान करून दुष्कालाचे भय हरून नित्य दिव्यान्न दाने सुष्टी सर्वहि संतुष्ठि केली म्हणुन कर्णोपकर्ण वर्तमान ऐकून प्रेरून ब्रम्हा विष्णु महेश्वर भूलोकास आले म्हणुन हरिहर ब्रम्हदेवांच्या शेवकांनी वृत्तांत निरोपितां येथे कौतुक पहावया साटिं आलो त्रिमूर्ति मध्येहि त्रिलोचन अगोधर निघाला तो कां अद्यापि आला नाही ऐसे नारद संवादता महादेव येतो पाहा.

**दरु** : (कल्याणी)

त्र्यंबक प्रथम कदंब सहित येतो अंबरकेश श्रीशंभु पहा ।।
शंबरारि मद डंबर सहित येतो ।। हरण दिगंबर
दिव्य चिदंबरेश हा ।। प. ।। कामित फल अर्पिता
हो शिवकाम सुंदरीचा नाहो ।। थोर ज्या मस्तकीं
जटजूट सरस दे महा सौख्येलाहो ।। सोम शेखर सुरस्तोम

विनुत पद श्याम कंट पापशामक हो भौतामा जलधिचा
ज्यामनी धरी सदा ।। हेमगिरीचाप श्रीमहादेवी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती परमेश्वर आल्यानंतर त्यास विलोकून नारद बोलतो पहा.

(छंद) रजत पर्वता सोडुनी भवा ।। निजसुखाबुधे नित्य वैभवा ।।
विजनि अत्रीच्या आश्रमा प्रति । अजि आलासि कां सांग निश्चिति ।।

सूत्रधार : येणेरिती नारदाने विचारितां परमेश्वर प्रत्युत्तर देतो पहा.

वचन : अगाये कलहप्रिया अम्ही त्रिमूर्तिनीं तीनि कार्य वाटुनि घेतली आहेत त्यांस जो अन्यथा भाव करितो त्याच्या निग्रहार्थ अम्ही अव्यक्त स्वरूपहि व्यक्त होतों तोचि प्रकार सांगतो ऐक.

दरु : स्वर्ग तथा स्थिति कामा करि सत्यलोक

पति आणि हरि नामा ।। प. ।।
भर्गतिजा गुणग्रामा भूत वर्ग मी पाटवीं
भानुज धामा ।। अ ।। क्षममूळें जन अस्तां करूं
या मनीं अम्हीं भाविले अस्तां हे मुनि भाज
समस्तां जीववूं म्हणते धरूनी घन आस्था ।। १ ।।
संकल्पा अन्यथा भाव केल्यां सन्निहितजुनी
मांडुनि ताव किंकर हो चोर सावल्याशी
कीं निग्रही नातो कासया राव ।। २ ।।

(श्लोक) होकांल्ये कहि एकना सलगिचा लोका गळा सद्गुणी ।।
ते कांत अति कांतरूपहि सदा एकांतिचि मैत्रिणी
एखादि जरि मोडिति नृपतिचि देखा स्व आज्ञांत या ।।
लेखामाजि न आणुनी दिनी प्रभु लोकांसि दावूं भया ।।

वचन : यास्तव अम्हास लेखीना सारखें अनसूया नित्य अन्नसत्र घालून प्राणीमात्र वांचविते. तो तिचा गर्व भंग कराया कारणे आम्ही आलो.

सूत्रधार : येणेरिती परमेश्वराचें वाक्य ऐकून नारद बोलतो पाहा.

वचन : तुमचें थोरपण कोठें सांगावें. आपल्याने लोकांस वांचवनार्तहि दुसऱ्यानें वांचविती म्हटल्याने हि विघ्न करास सिद्ध आहो. यावरून महामूर्ति दिसतां बरें या पुण्याचें फळही लोकरिच अनुभवाल परंतु हे गोष्टी विष्णूस संमत कीं काय.

सूत्रधार : या प्रकारें नारदाने विचारितां परमेश्वर बोलतो पहा.

वचन : अम्ही उभयताहि एकात्मक असें अस्तां विष्णुस संमत कीं काय म्हणून पुसणेंच अयुक्त.

सूत्रधार : ऐसे परमेश्वरानें संवादता महाविष्णू येतो पाहा.

(दरु) : (असावेरि)

परमानंदचा सिंधू येतो पाहा ।।
करुणामय मूर्ति तरुण शामल तुलसी
धाम विभूषणं वरुणालय शायी ।।
विमल सुरवर विनुत कीर्ति ।। अ ।।
तिलक रेखिला भाली ।। ललीत
कस्तुरीचा झळकत कौस्तुभ चांग बुरीं
जलज चक्रे दोन्ही जोडकरी ।।
आणि खळदमनार्थ जो खड्गधारी ।।
करिवारा भय वरसमर्पक चरणनिरता
शरण सम्यक धरणी निर्जर निरक पाळतक
नरहरीं जों हृदय चाळक ।। १ ।।

येणेरिती महाविष्णु आल्यानंतर त्यास विलोकुन नारद बोलतो पहा.

(श्लोक) निर्वाणैक वरप्रदान चतुरा गीर्वाण कंठीरवा।
निर्वाहे निज भक्त रक्षणपरा निर्वाणकाळी ध्रुवा ।।
पूर्विया मुनि आसकाय करूणा पूर्वा दिठीसें येथें
दुर्वाराघहरा आलाशीं निगहीं सर्वात्मयानी गुतें ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारदाचे वाक्य ऐकून आले कार्य तुला क्रियेवरून कळूं येयील ऐसा महाविष्णुने जाब देतां भोळा जो शंकर त्याने अगोधरीच तत्वार्थ सांगितला हे तुम्ही कां लपवितां ऐसे नारदाने विचारितां.

**वचन :** बरें तैसेचि हो महाविष्णूने वूत्तर देतां तुम्ही सत्व प्रधान महापुरुष तुम्हास ऐसी पापबुद्धि येणे युक्त नव्हे या रीति कलहप्रियानें पेंचून विचारीतां मधुसुधन बोलतो पाहा.

(दरु) :

दुष्कृत न शिवे देख मला तसें ।। नभ असतां हे सभराभरजळीं ।।
नभि जेत्यें तिळभरीही जसें ।। गरुडे गिलील्यांगटगट सर्पहि गरळ न बाधी परि त्याला जसें ।। १ ।। काळकूट विख कालांतक पीतां आलें जीर्ण अवघें ते तसें ।।

**सूत्रधार :** येणेरिती महाविष्णूचें वाक्य ऐकून नारद उत्तर देतो पाहा.

(श्लोक) जयापजय हें पहा सुकृत दुष्कृताची फळे। वळूनि रणीं नांद तूं बुडविशी सदा आपलें। त्यजूनि मथुरा पुरी शिरकलाशि सिंधूदरीं। जरासुत भयें हरी प्रकट हें पुराणांतरीं ।।

(श्लोक) काळतरूका भेणें फिरतां थोडी वसुंधरा जाली
मुचुकुंदाच्या धम वांचुनि आलाशी सत्य वनमाली ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारदाचे वाक्य ऐकून अरविंद प्रत्युत्तर देतो.

छंद : फिरलीया स्वयें भोवतेधरा। स्फुरत हा जसा भावतो नरा ।।
परि भवादिकांची मुनी तथा ।। स्वरूपी माझिया ते मृषाकथा ।।

सूत्रधार : येणेरिती महाविष्णुचें वाक्य ऐकून नारद प्रत्युत्तर देतो पाहा.

वचन : तुम्हा महापुरुषाचा स्वभावेच असा जें जन्माशि येवून अजन्मा म्हणावाचें लत्ताखावून मार घेणार कोण मारू घेणार म्हणवावें ।। इतःपर अनसुयेनेहि प्रायश्चित्त केल्यानें तें सर्वेहि स्वप्नप्राय मिथ्या म्हणशील.

सूत्रधार : या परी नारदानें परिसहास करितां हांसत श्रीहरीनें कां आला नाही हें चिंतिता तो यदृछेने ब्रम्हदेव येतो पाहा.

दरु : ।। कन्नड ।।

हेमगर्भ ब्रम्हदेव येतसे पहा ।। जो महानुभाव मुनिस्तोम विनुत पुण्य गुहा ।। हे विविध चराचर समस्त विरचित जो विमल चरित्र अवगत जा वेदनिखिल असति संतत अवघेहि सनकादिक यति ज्याचे सुतप्रनीत प्रवर सकळ चेतनात एथित दिव्य किर्ति भरित ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती ब्रम्हदेव आल्यानंतर तुम्ही गोब्राम्हण अम्हा अवध्यासहि वडील या क्षुद्रकार्यास कां आल्येत. ऐसे नारदानें पुसतां हरिहरानी बोडिलो यास्तव आलो म्हणून ब्रम्हदेवाने उत्तर देतां कलहबीज बोलतो.

वचन : स्वामी असती संगदोषण सत्याश्वसति विभ्रमः ।। हा न्याय यदार्थ केला या वरून स्वतः बुद्धि नाहि म्हणून निश्चय झाला.

(श्लोक) सकल जन ललाटीं बक्र रेखोनि रेख बहुत श्रमविलें जे नित्य अत्यंत देखा ।।
म्हणवुनि विपरिता जाहली बुद्धि मोठी ।।
परिणति कृतिचि या शीघ्र पावाल खोटीं ।।

वचन : अवघ्याची कपाली तुम्ही वक्र रेखा लिहितां. ब्रम्हदेवाच्यानेंहि पुसवना-सारिख्या तुंची ललाटीं मी लिहितो ।। ऐसे नारदानें वुपहास पूर्वक बोलतस्तां तो अत्रि महामुनि हरिहर ब्रम्ह यास नमून स्तवन करितो पाहा.

(छंद) कमललोचना नीलकंधरा। कमल संभवा हे गुणोत्तरा
नमितसे तुम्हा मीं घनारतें ।। अमित सौख्य पैं पावुनि बरे ।।

सूत्रधार : येणेरिती अत्रि महामुनि स्तवन करितां साध्वी शिरोमणी अनसूये कोठे आहे म्हणुन त्रिमूर्तिनी पुस्तां तो यदृच्छेनेन मुनि पत्नी येते पाहा.

(दरु) येतसे अनसूया अत्रीचि प्रिया ।।

सूत्रधार : येणेरिती अनसूया देवी आल्यानंतर त्रिमूर्तिनी नारदास खुणवितां त्याचा अभिप्राय जाणून देवर्षि अधिपत्नीशि बोलतो.

(श्लोक) कटितटीं पट मोटाकासुनी या दिशा।। स्वकरी करूनि अम्हा आणि अभ्यंग साचा ।।
उपरि परम तोषे पाहुणीराशी कीजे ।। हरिहरविधि ऐसे प्रार्थिति आयिकीजे ।।

सूत्रधार : येणेरिती नग्न होऊन हरिहर ब्रम्हदेवास नाहुन घालून अनसूयेने इच्छा भोजन समर्पावे ऐसे त्रिमुर्तिती कोडें घातलेसें नारदाच्या मुखानें नीट ऐकून अत्रिमहामुनि आपल्या ठायीं कष्ठी होतो पाहा.

(छंद) हरिहराब्ज जी या परिच्छलाजरिं आरंभिलें साम्य वत्सला तरि करील स्त्री काय हे गति निरशि कोण या संकटाप्रति ।।

दरु : ।। व्यागडा ।।

काय करूं संकटाया कटकटा ।। काय करूं आतां जायेची ।।
लाज हे जावयाशी आली ।। जाण कीं दुर्घटहरिहर हे म्हणुं ।।
जरि हरितील विधू तरि तेचीच ना करूं बसल्ये प्राज्ञ ।। १ ।।
हा पहा अपला बापहि धाता–त्यांपरि बोलतो बापुडा माता ।।

सूत्रधार : येणेरिती अपुला वल्लभ कष्ठी होतां त्याला अवलोकुन अनसूया बोलते पहा.

दरु : ।। पुन्नागवराळी ।। शा ।।

कासयाशी पावतसां क्लेश अंतरी ।। हे स्वामि
राजया समयात नसुनि हाव चिंतेस परी ।।
हे दैव अपली दया असलियाच पुरे कुसरि ।।
सरसिजाक्ष अथवा तो हर पुरहर पांहिगुरु
समस्त तर अचरा थोर विधि तोहि
फिरूनि पडोतथा वीण सुरवर सहित
समूहि परी मज भय लवत काहीं चरण
सुपरि चरण वळें वरकड बळवृथा निश्चयीं ।। १ ।।

वचन : आणिकहि अघटित कार्य घडवीन तें ऐकावें.

(पद्य) सागराशी मही सर्वहि वुलथुनी मागुती स्थापीन मी क्षणींते ।।
डोंगराचे धवे लागल्येचि नखें योग युक्त करीन हेहीं चर्ण
ते गगनीं लोपल्यां तपन आणि शशीकीं घडण तदुपदा घडीने-
तीघेही जे मला तीव्र आल्ये सळू निर्गत ज्ञानते करीन जाण हृदयीं
संशय कदा येथनाथा न धरिजे जोलत्यें नीट आता-पदर
ज्याचा तुझ्या पै प्रभावें वदतसे सत्य मी वाक्य भावें ।।

सूत्रधार : येणेरिती अनसूयेचे वाक्य ऐकून अत्रिमुनीनें संतोष पावुन स्वभार्येस त्रिमूर्तिची प्रार्थना पूर्ण करी म्हणून आज्ञापितां मुनिपत्नी नारदास विलोकुन बोलते पहा.

वचन : अगाये नारद मुनि त्रिमुर्तीनी जो वर मागितला तो द्यावयाकारणे मी मागे सरत नाहि परंतु अजी अर्धरात्रिसमय अभ्यंग स्नान करणे विहित नव्हे वुदयीं अंतःकरणानुरूप सहणे जेवणे घडेल.

सूत्रधार : ऐसे अनसूयेचे नारदाशी संवादता हरिहर ब्रम्हदेव तीघेहि आनंदाने आपुल्याल्या मंदिरास जायास सिद्य होतां तों येकायेकीच कोटिसूर्य वुगवल्या प्रमाणे प्रकाश फांकतां क्षणभरी राहुन हा नवलाव अवलोकून जावूं ऐसे निर्धारितां तो अनसूया देवीच्ये आज्ञेवरून त्रिमूर्तिच्या दर्शनासाठीं दिव्यालंकार युक्त बैदेहि येते पाहा.

श्लोक : कानी ताटंक जोडी झळकत दुसरू जीस नाहीच जोडि
स्वद्योताहुनि थोंडी गमत जिजपुढें कांतिने सूर्यकोटी ।।
वस्तांची दीप्ति वाडी अपरिमित विजाचा अहंभाव झाडी ।
सगंधानेहि गाढी भरूनि त्रिभुवनी घेतली आणि वाढी ।।

दरू : ॥ भैरवी ॥ आ ॥

मिथिलाधीश्वर प्रियतनया हे मधुर भाषिणी ॥
प्रथित सर्वभुवनी जे कां पृथुल कमलदळ लोचना
कशी पृथिवी गर्भरत्नरूप केवळ अतुल यौवनवती येथ अजिते ॥

सूत्रधार : येणेरिती जानकी देवी येतांच तीच्या अळंकाराची थोरकांति विलोकुन हिरण्यागर्भ हरिहर प्रति बोलतो पहा.

(श्लोक) लाविल्या नभिवहु महताबा ॥ दीपिका जसि घडये निहता ।
भातोंड तेज झळके रविताबा ॥ सारिला अजि तसा परतावा ॥

सूत्रधार : येणेरिती ताटकांचा प्रकाशातिशय वर्णून भूलोकांतहि अशि रत्ने आहेत काय म्हणुन ब्रम्हदेवाने चोज मानितां नारद उत्तर देतो पाहा.

दरू : ॥ फरूजू ॥

अनसूयेचा हा महिमा कोण वानूं सके परमार्थ परमा ॥
तगटिसाटी देखते कशी पद्मा सकट नेणेची स्वप्नीहि
अशी हा घमघम सुग्गंध स्वर्पाशीवानी मधवाहि ॥
अवघ्यां देवाशी अगदि लब्ध जगति कन्येशी हेजीस्तपत्या ॥ १ ॥

सूत्रधार : येणेरिती नारदाचे वाक्य ऐकून पुन्हा ब्रम्हदेव आश्चर्य मानून बोलतो पहा.

(श्लोक) शीतेने धृत मुद्रिका हिरकणीं स्वल्प प्रकाशीबला ॥
भास्वत्कौस्तुभ ग्रस्त रविस निस्तेजता लाभला ॥
चुडा चंद्रहिं देख पतिचाव्दस्ताभ चूर्णि असा ॥
कल्पेशांग बनेत्र कल्प शिखिहि अत्यल्प खद्योतसा ॥

(श्लोक) आमीनंद चंदनी उटि भरि हे लाविली तेथ कीं
गंधाचीयिचि या नसेचि अणुहिते गंधवार्तानिकीं
बारासूर्य तपोत नित्य नसुक्ये हे पुष्पमाला परि
जायी भारजकाचि ये निजधरीं हे वस्त्र जन्मांतरीं ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरिती ब्रम्हदेवाचे वाक्य ऐकून महाविष्णु बोलतो पाहा.

(श्लोक) परिसुनि कलहप्रिय गोष्टी ॥ भ्रमशीं कां हृदयीं परष्टी ॥
करील काय अम्हा अनसुया ॥ परम निर्भळ जे निरसूया ॥

सूत्रधार : येणेरिती महाविष्णुचे वाक्य ऐकून हि पतिव्रतेचा प्रभाव आढवून पुढें आपलि गति काय होयील कीं म्हणुन चीतीं भीवून स्वस्थली ब्रम्हदेव बोलतो पाहा.

दरू : ॥ खावि ॥

वंचिलें दोघीं किंवा आलें फळा निजसंचित वेगीं ॥
सत्यलोकींचे आधिपात्य करूनि असतां मर्त्य लोकां यावें ॥ १ ॥
सांग म्या कश्यालागी साध्वीचा द्रोह सहसा न सुटये कोणा ॥
साध्वसे येति हे कांढयें संतत आंगीं ॥ २ ॥
गुंतलो पांसाबुद्धिमंत असूनि मिहि ॥
कुंडूनि व्यर्थ आता काय हृद्भागी ॥ ३ ॥

**सूत्रधार :** येणेरिती ब्रम्हदेवानें चिंतासमुद्रीं मग्न होता परिहास पूर्वक त्याप्रति नारद बोलतो पहा.

**(श्लोक)** चातुर्यनाहीच जयाशी लोकीं । क्लालल्या म्हणति विलोकीं ।।
ब्रम्हांड भांडार चरणार तूंचि मुढत्व या या त्वरि चोज कायी ।।

**वचन :** हरिहरानी मला वंचिलें म्हणुन बोलिलासकीं त्याचे हा उत्तर ऐक ।।

**(श्लोक)** भस्मासुरा देखुनि यावराशी । प्राणाशी आलें पुरसंहराशी ।
यालागि तो केवळ देवभोळा । न ठेविजे त्यावरि अल्प बोला ।।

**वचन :** परंतु विष्णु मोठा कपट नाटक सूत्रधारि त्यालाहि देवगतिने भ्रम पाडिला तेंच सांगतो एक.

**(श्लोक)** (सं) हरिणापि हरेणापि ब्रम्हणापि सुरैरपि ।
ललाट लिखिता रेखा परिमार्ष्टुं म शक्य ते ।।
तूंच्या कपाळी जें आहे तें होयील यास संदेह नाही ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद परिहास पूर्वक बोलला–हरिहर ब्रम्हदेव तीघेहि हास्यमुख अपलाल्या मंदिरीं येता जानकीदेवी सहित अनसूयाहि पत्नी शालेंत प्रवेशतां तो जया नामक प्राणसखी समवेत जगदंबिका येते पाहा.

**दरू : ।। कांबोदि ।। आ ।।**

देवी येतसे पुरहर देवदेव प्रियराणी ।। प. ।।
केवळ लावण्य कनिके तन यौवन मंडित कोकिलवाणी
बनजानिभाक्षी हळूहळू चाळत स्तन युग धनभारे करूनी ।।
अनुपम नीळ धन प्रन्नजीची तनु विभूषित आभरणी
कनकवसन मिरवोकटि मंडळी कोटि विजाची जणुभरणी ।।
प्रणवामला पंजर बासिनी शुकी जननी त्रिजगाची शुभकारिणी ।।

**सूत्रधार :** येणेरिती पार्वतीदेवी आल्यानंतर चिंताक्रांत तियेला विलोकुन जयाख्यासखीने बोलिजेतें पहा.

**(छंद)** त्रिपुर सुंदरी सर्वमंगळा ।। निपुण बोलती नित्य हे तुला ।।
कृपण प्राकृता स्त्रीजना अशी ।। अपण कासया खेद पावशी ।।

**सूत्रधार :** येणेरिती जयासखीनें पुसतां चिंतेचे कारण पार्वती सांगते पाहा.

**(श्लोक)** अस्तां सुप्तमी गुप्त तो प्रिय सखे प्राणाप्त होतां स्वयें
तप्त स्वर्ण सवर्ण हे तनुतदा संतप्त चिंता स्वये ।।
काळी जाहली त्या सटीं मज महाकाळी म्हणोनि बरि
आली कीं अभिधा गुणें करूनियां गौरीसहि सुंदरी ।।

**सूत्रधार :** येणेरिती निज स्थिति सांगून विरहातुर जयेशीं बोलते पहा.

**दरू : ।। फरजु ।।**

उठगे साजणी हुडकुनि तो निपति आणीवो उत्तम गुणी ।।
दूप ।। विनवुनियां सखे विविध उपायीं धन सुख वर्धन भटवी तूं लवलाहिं ।।
चतुर शिरोमणि अतुल आहेशि रतवीं अति सांगतो रजनी दिवशीं ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती पार्वतीचे वाक्यऐकुन जया उत्तर देतो पहा.

वचन : वो जननी चारिं दिवस वल्लभ गांवास गेल्याने स्त्रिया कष्ठी होताहेत काय तसाच तुझा कांत दोनि दिवस गुप्त होतां कां इतकें घाभिरेपण आलें।

सूत्रधार : (ऐसे जयेनें समाधान करिता) इतर दंपती सारिखी अम्ही दंपती नोह्ये सूर्य प्रभेतत्प्रमाणे अन्योन्य अनन्य आहो असें अस्तां प्राणेश्वरानें अव्यक्त वेषाने राहणे म्या व्यक्तरूपें असणें हें युक्त नव्हे तेंच सांगतें ऐक. म्हणून पार्वती बोलते पहा.

(दरू) : कोठें हा न्याय कोणें देखिला काय सावळी पुरुषेवीण
साचधार्य एकक्षण मावळतां रविहि टिक्ये मोटी दीप्ति हे ।।
अ ।। पावक लोपतां नभी धांवती ज्वाला वुढाम कीं विधु हरपतां ज्योत्स्ना केवळ राहे ।। १ ।।
प्राणसंसर्ग वीण जेव्हा देहि वाग्ये आणि जीव लपतां स्थिर्ये बौणीव पाहे ।।
अधिष्ठान वस्तुविणे अधिष्ठेय स्पूर्ति स्पुर्ये कधीहि हे किले तुवां कधीं वोमाये ।। २ ।।

(श्लोक) आहे व्यापक यीश्वर सर्वहि घटीं नोह्ये मृषातें सखी ।।
पांहें नाथ परोक्षदृश्य असणे म्या हें नव्हें युक्तकीं
यातें शिणत्यें वियोग बर हा सांह्ये कसा वोरसें ।।
माहेर प्रणताशि तो वद कोठें साहेब माझा असे ।।

सूत्रधार : येणेरिती जयेशीं बोलुन सर्वत्र पतीचें स्वरूप भावून देह भाव विसरून कांतास विलोकिल्याप्रमाणे पार्वती बोलते पहा.

दरू : ।। घंटारव ।। अट ।।

ये ये लौकरि आतां प्रिय प्राणनाथा। दावूनी मुखांबोज (मुखांबुज)
आपुलें हें मनजीवलगा। लपशीं कांतू समजकवण म्या अन्याय केला
रे सांगअवघा धरित्यें पदपंकज धांव ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती विनयाभिनय करून प्राणनाथाचा समाचार आणाया कारणे सर्व कार्यी विजय साधणार विजयेस पाठविलें होतें तेंहि अद्यापि आली नाही यापरि पार्वतीदेवी चिंतिता विजया येते पाहा.

दरू : ।। शंकरा भरणं ।।

येतसे पहा विजया पार्वतीची हे सखी इष्टमहा ।।
घेत घेत शोध त्यातवें शंभूचा वातगती अति
तांतडी सुदनी मनि ध्यात हर हा ।।

सूत्रधार : येणेरिती विजया येवून परमेश्वरास देखिलें नाहि. म्हणुन सांगता या या स्थळीं माझा प्राण नाथ असेल ऐसे देवी पुस्ते पाहा.

दरू : ।। पार्व ।।

वटपिटपितळीं पट्नटनेश तो तटला असेल विलोकीं ।।

**दरू वि० :** कटकटा तेथेंहि कळकंटि हुडकिला जटिल तो नाहि शेखी ।। १ ।।

**पा० :** वाराणशी माजि नारायण प्रिय तो राहिला आहे काय.

**विजया :** ताराधीश मुखी तारकास तेथें थारानेची माये ।। २ ।।
मोहिनीवेष मोहविला जणु तोहरीने निजप्राय ।।

**दरू विज :** तोहि हरपला तोयजाक्षविभु नोह्येची हे अप्रमाण ।। ३ ।।

**पा० :** सामग ब्राम्हण सन्निधीं तो सुखधाम बिगुंतला कायी.

**(दरू) विजया :** ग्रामजेन्द्रगति शोधिला तेथहि व्योमकेश तो नहिं.

**सूत्रधार :** येणेरिती परमेश्वर कोठेहि अभिव्यक्त देखिला नाहि म्हणुन विजयानें सांगता पद्मादेवी पद्मनाभाशी खुशाल क्रीडा करीत असेल. माझाच भोग वोडवला (अयिसें अंतरंगी पार्वतीनें चिंतीता तों पुंडरिकाक्षास हुडकित गुणवती सखि समवेत महालक्ष्मी येते पाहा.)

दरू : ।। पुन्नागवराळि ।। आ ।।

इंदीवराक्षी येतसे इंदिरा हे ।। प ।। इंन्दु बिंब
निभ वदना अरविंद नाम हृत्सदना ।।
अंदुनूपुरीं मंडित चरणा अंबरमध्या असला शरणा ।। अ ।।

**सूत्रधार :** येणेरिती लक्ष्मी आल्यानंतर तीचि खिन्नता पाहुन गुणवतीनें खेदाचे कारण विचारितां इंदिरा उत्तर देते पाहा.

**(छंद)** त्यजुनियां मला येकली सखी । निजसुखांवुधीं श्रीहरी सखी ।।
अजित येकल्ये राहिला कोठें ।। सजणी त्यासाठिं चित्तहे पुठये ।।

**वचन :** कांतास हुडकाया कारणें प्रियंवंदा सखी पाठविली होती तेहि प्रिय समाचार सांगायास आली नाहि.

**सूत्रधार :** ऐसेने इंदिरेने निज सखीस आटवितां प्रियवंदा येते पाहा.

दरू : ।। अठाणा ।

येते प्रियेसजणि हरि प्रियशी हुडकुनि प्रभुशी
सर्व प्रदेशीं झडकरि वृत्तवंदू कमलेशी
प्रियवंदा सखी हे गुणराशी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रियवंदा सखी येतांच तिला प्राणनाथाचें वर्तमान श्रीहरी प्रिया विचारिते पहा.

दरू : ।। पंतुवराळी ।।

देखिला तां काय सांग देवदेवाचा ।। प ।।
सखवार जिव्हाळा तो सखिये निज जीवाचा ।। अ ।।
ठावुके तुज आहेत अवघ्येहि गुणवति ।। ठाव
त्याचे जगीं सती ।। पावन अति जाउलनीयां
शीघ्रगति ।। दिव्य त्या त्या स्थाना प्रति ।।
सावध हुडकिला पति सावळा काय सुदति ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती लोक मातेने पद्मनाभाचा वृत्तांत विचारितां प्रियवंदा वदते पाहा.

दरू : ॥ सौराष्ट्र ॥

कोठेहि तो देखिला कैटभारि नाहि ॥ ध्रु ॥
ते ठाव वेगळाल्ये नीट ऐक बायी ॥
परवासुदेव स्थान वर वैकुंठाभिधान
हरिणाक्षी तुझा प्राणा ॥
हुडकिला तेथे जाण क्षीरसागर ठिकाण ।
तरूणी शोधिलें पण करूणाबोधि आपण वरद ।
श्रीनारायण ॥ १ ॥
स्वेतव्दिप नावाचे निकेतन
जें वैततेय केतनाचें त्रिभुवनी ख्यात सये अतिशये ॥
तेथहि सावधान म्या घेतला शोध सर्वत्र नूतनाधोधर गात्र नाथ
तुझा सुचरित्र ॥ २ ॥
तुळना ज्यानसे घन तुळशीचे
दिव्यवन ॥ नलिनीचें हि कानन अलिवेणी मनोहरण
कळकंठी न सोडून तिलमोहरि प्रमाण स्थळ तेथहि
निधान सखी धांडोविला आपण ॥ ३ ॥

सूत्रधार : येणेरिती प्रियवंदेने कोठेहि वैकुंठनाथास देखिलें नाहि म्हणतां लोकमाता प्रियवंदेस विलोकून बोलते.

दरू : ॥ नीलांबरी ॥

अगायी मी करूं कायि बायी ॥
कशी तगबग हे पुगट सोसूं ॥
सुगम सखिये सांग सांग मजयाशी ॥ अजि बुपयाशी ॥ अ ॥
वल्लभ घेउनि येशी तूं ॥ पल्लवा धरी निश्चयेशीं
वुल्लास हा मनोदेशी होता वुत्कट गे परियेशी
दुर्लभ दर्शन त्याचें तूझिया सुदति वाक्यानें वाटते जाण ॥
सोहळे भोगीन फार सरमोहनासवे निर्विचार वोहळापरि
अनिस्तार आणि वोलांडीनहि विरह थोर वोहट
पडियेला त्याशी वो आंता कल्पनावेस जाहल्ये ऐशी ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरिती आपुला मनोभाव वर्णून सिंधुकन्येनें प्रियवंदेला जयविजय गरूडास पुंडरीकाक्षाचा समाचार विचारिला काय म्हणुन पुस्तां ते उत्तर देते पहा.

(श्लोक) वैकुंठीचा नाथ अकुंट किर्ति । अदृश्य होताचि अनंतमूर्ति
त्याच्या तपाशी न लागोनि कांहि ॥ कीजे तपाशी विजयें जयेंहीं ॥

वचन : आता गरूडाचें वर्तमान सांगते ऐक ॥
जरि दिटीस पडयेना आपल्या कृष्ण मार्गी
तरि निजतनु वेगें वोपितो कृष्ण मार्गी ॥

म्हणुनीं हुडकुं गेला शीघ्र लोकत्रयाशी
जननि गरुड तुझ्या ध्यात चित्ती प्रियाशी ।।

**वचन :** इतक्यांत तुझाहि मनस्ताप येकीकडे प्रेमळ भक्त जे आहेत त्यांचा क्लेश एकीकडे तेंच ऐक ।।

**(श्लोक)** नाहि आईपिता तथा कुलगुरु भ्राता जया मावुली
ज्याची संतत आश्रयुनी वसल्ये निश्चित कीं सावुली ।।
तो देवोत्तम दृष्टी दूर पडतां त्या भाविकांचा स्वये
आकांत स्मरतां आतां वुभडतो येतो मनि माझिये ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रियवंदेचें वाक्य ऐकुन दृष्टीस दूर असणार प्राणनाथासहि प्रत्यक्ष भावून रमादेवी प्रार्थना करिते पाहा.
कांरे रूसलाशी कीर्ति निधाना ।।
कणव कशी नये कणभरी हा तुज
झणी पाहसि किती ।। म्हणुनि निदाना ।।
हे नटिक्ये तुजवीण घडी जीव दे नलिनाक्षा
प्राण प्रदामा ।। तावक भक्त ते भाविक शिणति
धांवयासाटीं तर्हि देव प्रधाना ।। २ ।।
भूलल्ना तुझी भो ध्यानावळीं घालूंवु तटली मति अवधाना ।।

**सूत्रधार :** येणेरिती स्वस्थळी संवादून सखिस विलोकून बोलते पाहा.

**(दरू)** कोठे सांग तो हरि ।। कंबुकटीं आतां मजप्रति लौकरी ।।
नित्यानंद जीवलग सुंदरी ।। कां मजवरी रूसलासे
सगुणनिधी अझुणीवरी ।। कंठकशी वेळही पलभरी ।।
काम कुसुम शरी विधितो वरि वरि नुरलि बुरी ।।

**सूत्रधार :** (येणे रिती विरहाभिनये करून महालक्ष्मीनें येवून पार्वतीदेवी प्रति) तूं कां खिन्न काळीठणक झाली आहेस? (म्हणुन पुसतां ते उत्तर देते पहा)।।

**(श्लोक)** अस्तां सुप्तमी ।।

**सूत्रधार :** पार्वतीच्या उत्तरावरून हरी सारखा हरहि हरपला हे निर्धारून बरें सरस्वतीबायी तर्हि अपुल्या नवर्याशी हासत खेळ सुखरूप असो ऐसे महालक्ष्मी पार्वती संवादता तो सरस्वती प्रभावती सखी सहित येते पहा.

दरू : ।। सावेरी ।।

भारती येते भाज विधीची ।। प. ।।
भारती येते शुभारति तुल्य ते सारसाक्षी
श्रुतिसार विचक्षणी ।। अ ।। कर सरसीरू हें
कवळुनिया वीणाकर जाने वाजवीत स्वर संपत्ति
योगे सकळिक ते राग सुचवीत पल्लवींत तरळ दीप्त हार
वुरीं बहु मिरवीत वररूप चित्तीं ध्यात विरह वैदनेच्ये
विस्तिर्ण डोंगर वरी वरि वोलांडित गुणान्वित ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती सरस्वतीदेवी येवून प्रभावतीस विलोकून बोलते पहा.

दरू : ।। मांजि ।।

जारी मज चिंता सिंधूतुनियां ।। माते ।। प. ।।
कांहीच वुरली नाही वुरी अतां करिजे सदयचिरी ।।
काकुलती येतें दारूण सार विदारितसे तन
वरी वरि सुमशरीं विंदुनि (विंधुनि) सुंदरी ।।
सारस संभव सांग असे कोठेदरि शनथेवूं त्याचे फार आसदैते ।। २ ।।

(श्लोक) जेलेखांस अजिक केशव करे झाल्ये गत प्राणकीं
बोले ते मधु आणि कैठभ पुन्हा आल्येंच जन्मा सखी
नेणो काय तयांचि या घनभयें प्राणेश्वरें निश्चयें
केला श्रीपति नाभि पंकज महानालीं प्रवेश स्वयें ।।

सूत्रधार : येणेरिती सरस्वतीचें सखीशी संवादून लक्ष्मी पार्वती निकट येवून आपले वर्तमान सांगतां तीघे जणीहि समान सुख दुःख होवुन यितःपर काय गती करावी त्रैलोक्यीं विहार करणार कलहप्रिय आल्याने त्याला कांत वृत्तांत पुसयाची येक वुरी आहे ।। या प्रकारें हरिहरब्रम्हदेव कांता चिंताक्रांत अस्तां तो नारद मुनि येतो पाहा.

(दरू) कलहांचे मूळ ।।

सूत्रधार : येणेरिती नारद आल्यानंतर तीघी जणीहि संतोष पावुन त्याजवळी जावून आपुलाल्या भर्ताराचा समाचार विचारितां आधी लक्ष्मीस विलोकून बोलतो पाहा.

(श्लोक) या तीनेहि वुण्य असोत भलते या तीर्थपादा प्रती
गाती जे निज दास तन्मय दिवाराती धरोनी रति
हा तिष्ठे हरि तेथ आणिक जगती ख्यातीसि तद्वीपकीं
त्यातील स्थलीहिं नसेचि नरका राती पहातां सखी ।।

सूत्रधार : येणेरिती लक्ष्मीस संवादतां त्रिपुरसुंदरीने येवुन परमेश्वराचा समाचार विचारितां हरिहर दोघे अंतर्धान पावले नंदिकेश्वरादिकांचा मात्र वृत्तांत सांगतो ऐक.

(छंद) सपकिही त्यजूनि तृणास कीं सपदि पर्वता मस्तकीं सखी ।।
जपत शंभुचें नाम सादरे। तप आरंभिले नंदिकेश्वरें ।।

(श्लोक) अदृश्य होतां गिरीशें अनंते। चिंता भरे वासुकिशी अनंते ।।
रसातळी शीघ्र प्रवेश केला। तो मानसाशी विधि हंस गेला ।।

(श्लोक) मारारातिं अदृश्य रूप घडतां वाराणशी भीतरी ।।
गंगावाहिनी राहिली स्मरत श्रीगंगाधरा अंतरी ।।
मार्कन्डेय मुनीश्वरें अतिशयें अकालिमजाचा भयें
सारंगाक्षि पुन्हा शिवार्चन दमूं आरंभिले त्या त्वरें ।।

सूत्रधार : येणेरिती नारदाने येकंदर पाडा (पाढा) वाचिता इतःपर अनायक झालें सर्वहि त्रैलोक्य वुडेल ऐसें पार्वती लक्ष्मी सरस्वती या तीघी जणानीं म्हणतां नारद उत्तर देतो.

**(श्लोक)** दैत्यारी विधि शंभु ते हरपतां दैत्याचियां याभी भरें ।।
देवेन्द्रादिक देव सर्व घडतां ते व्यग्र कीं अंतरे ।। आले पत्र तदाचि
अत्रिरमणी हस्ताक्षराचें असें। स्वस्थ स्वस्थ तुम्ही बसा विधि हरीश्याच्ये
स्थळीं मी असें ।।

**सूत्रधार :** येणेरिती अनसूयेनें पतिव्रत्य महिमेनें त्रिलोक्याधिपत्य हीं आठोपिलें। ऐसे नारदमुनीने सांगता तीघी जणीनीहि हात पाय गाळून स्वस्व वल्लभाचा वृत्तांत मात्र सांग म्हणुन काकुलती येतां कलहप्रिय बोलतो पाहा.

**दरू : ।। मोहनं ।।**

धन्य ते अग्रगण्य सर्वहि त्रिभुवनी ।। अन्यथा नोह्ये हे जननी
अन्यजीस जोडी पाहतां नाहि ।। पुण्य वल्लरी ने पूर्ण
सुख शालिनी ।। अ ।। पद्मयुग्मतें ज्याचे पद्माक्षि न देखिलें ।।
मदिराक्षि विधीने हि मस्तक चांगले विधुमुखीया परी व्याप्त रूपडें भलें ।।
वृदित सदा आगळें ज्याचे मदन मद भर मर्दका त्या ।।
सुदति करूनि सूक्ष्म वितिभरी सदनि निजवुनि
पाळणेंतहि सतत गीतही गाप्त जे बरी ।।

**सूत्रधार :** येणेरिती महादेवाची रिति सांगून विष्णुचि गति नारद सांगतो पाहा.

**(श्लोक)** जगत्रय पद इथें अखिल ज्या अजें मोजिलें।
तिजें पदबळीचिया। सबळ मस्तकीं योजिलें ।।
त्रिविक्रमपणि अश्या मुरहरा। जिणे न्हाणीजे।
निजी निजवुनी पदीं नवल काय ते वाजिजें ।।

**सूत्रधार :** येणेरिती महादेवाची विष्णुची दशा वर्णून नारदमुनि ब्रम्हदेवाचि स्थिती सांगतो पाहा.

**(श्लोक)** ब्रम्हांडीचें सूक्ष्मशरीर जोळीं। ब्रम्हा असें धरित नांव
यथार्थ लोकीं। ह्यातें अकरूनि शिशु केवळा नेणपांहे ।।
दे स्तन्य अत्रिललना अति धन्य पांहे ।।

**(श्लोक)** हो कां चतुर्मुख चराचर वृंदकारी। तो काळकूट गिळणारहिं
अंधकारी। श्रीकार्मुक प्रथित विष्णुहि हें सतीच्या। देखाच अंतनिरखुन
समर्थ तीचा ।।

**वचन :** तुम्ही म्हणाल कीं अनसूयेस इतुके सामर्थ्य कीं.

**(श्लोक)** क्षीरसिंधुपति आलय पुण्या। क्षीरावार्धिप्रद जो वृपमन्या ।।
या व्दयनंशि विधिशीं मुनिराणी ।। धूत पाजवित गोकरणानी ।।
देवुनि सारूप्य दिगंबराचें। विष्णु स्वयंभूस महेश्वराचें ।।
स्वयेहि तद्रूप घडुनि न्हाणी। अत्रि प्रिया सत्य करून स्ववाणी ।।

**वचन :** येणेरिती अनसूया त्रिमूर्तिस तान्ही लेकरें करून नग्न रूपेंच दिस्सोड न्हाणुन स्तन्य पानादिक करवुन खेळविते.

सूत्रधार : ऐसे नारदांने स्पष्ट सांगता हा प्रभाव मंत्रतंत्रादिकांचा किंवा योग याग व्रतादिकांचा ऐसे पार्वती लक्ष्मी सरस्वती तिघीनीं विचारितां हे कांहि अनसूयेला ठावुके नाही म्हणुन नारद बोलतो.

(श्लोक) प्रोक्षुनियां स्वपतिचें पद पद्मपाणी। केल्ये जिणे शिशुहरी ।।
मंत्रादि अन्य रचिला न वुपाय कांहि। हें वर्णिलें यशतिचें सुर गाय काहीं ।।

सूत्रधार : येणेरिती नारदाने त्रिमूर्तिचे ठाव ठिकाण सांगतांच कांत दर्शनाची वुत्कंठा धरून तीघे जणीहीं लौकरी स्वस्व कांतास भेटवीं म्हणुन नारदाची प्राथना करितो पाहा.

(दरू) न करि न करीं आतां वुशीर अगायोप ।।
नयन भुकेल्ये नाथ विलोकूं कहिं कहीं म्हणवुनि पाहे ।।
दिवस युगाचे दीर्घपणे धरि शिव शिव विरह न सहे
विनवुनि भावें अनसूयेशी धणि आपुलाल्ये दावी कांहे ।।

सूत्रधार : येणेरिती पार्वती लक्ष्मी सरस्वतीनी कलहप्रियाशी संवादता तो तपस्विनी अनसूया येते पाहा

सूत्रधार : येणेरिती अनसूया येतांच तिला पदर पसरून तिधीहि पतिदान मागताहेत पाहा.

दरू : ।। ललितपंचम ।।

देयी वो पतिदान हे ।। प. ।। धेयीं थोर कीर्ति
माते येवढी तूं असंदे हें हुडकुनि अपलाल्यां हृदयीं
शांति घे जणी घडलो नित्य कल्याणि धनश्रांतकी ।।
पडियंते भेटवी हे हरिहर ब्रम्हदेव पडतों अम्ही
पायांवरी ।। पदरही पसरूनिया कीं ।।

सूत्रधार : येणेरिती तीघेनी प्रार्थितां अंतःकरणांत कळवळा येवून अनसूयेने—आपलाल्या प्राणश्वराच्ये आज्ञेची वाट पाहतां अत्रीनेहि अंगीकार करितां तत्काळ मुनिपत्नीने बाळरूपे असणार जे हरिहर ब्रम्हदेवाच्ये अवतार दत्तत्रेय दुर्वास मुनिचंद्रे या तीघासहि निजवेषें यावें म्हणुन मनांत चिंतितां अनसूयेच्या पातिवृत्य प्रभावाने महानुभाव त्रिमूर्ति येता त्पाहा.

दरू : मध्यमावती ।।

शंकर आणि पंकजलोचन विभु पंकजासनहि किंकर जन
परिवेष्ठित हे अकलंक आल्ये अभयंकर तीघेहि ।।
हरिण त्रिशुलधर-दर चक्रांबोजकर
सरस कमंडलु तो धरूनियां पाणी
वर वृषभेन्द्रा वरी वळघुनियां—
गरूड विहगपति तुरगीं बसुनि खेचर हंसासन चर
अचराधिप परमानंदे भरित त्वरित जकीं ।।

सूत्रधार : येणेरिती त्रिमूर्तिहि आल्यानंतर त्याप्रति विलोकून अनसूया बोलते पाहा.

(श्लोक) थोराहुनिहि थोर रूप अपुलें सानाहुकीं सानकीं–
त्रैलोक्याशि अतर्क्य आत्म महिमा हा सूचवूं पूर्णकीं
तुम्हा बाळकं रूप सत्य धरिले–स्वामी स्वयें यिच्छा स्वयें
किंवा वाडकं मत्प्रभा रचिली हे भाव निस्संशये ।।

सूत्रधार : येणेरिती अनसूयेचें वाक्य ऐकुन त्रिमूर्ति बोलताहे त्याहा.

(श्लोक) कळुनि सर्व मनीं अनसूये । छळुं आलो अवघेहि असूये ।।
परि तुझ्या पतिभक्ति पुढारीं–हरपिलें आम्ही हे अवधारीं ।।

सूत्रधार : येणेरिती त्रिमूर्तिनें अंतःकरण संतोषवुन जननीये अपुलाल्या मंदिरी जावुन सुरुरूप असतां अम्हावरि लोभें असुंद्यावा–ऐसे प्रार्थितां मुनि पत्नीने तथास्तु म्हणतां सकळ ऋषी समेत अत्रीस विलोकून परमेश्वर बोलतो पाहा.

वचन : अगाये अत्रि महामुनी माझें अमोघ दर्शन व्यर्थ होणार नाही. या सटीं तुला परमार्थलाभास पात्र करितों.

(श्लोक) जो हा राम दयाभिराम तुझिया धामामध्ये शोभला
तो मीसाच असाच निश्चय धरीं या मानशीं गाभला ।।
हा जी शंकर लोक सौख्य जो मी जीववर्गा प्रभु । राजीवे क्षण राम सर्व श्रुतिचा हा जीव जाण स्वभू ।।

सूत्रधार : येणेरिती हरिहरा व्दैतोपदेश करून श्रीराम अत्री प्रमुख ऋषीश्वरांस–विचारून सरस्वती लक्ष्मी पार्वती सहित ब्रम्हाविष्णु महेश्वर स्वानंद युक्त आपुलाल्या मंदिरी प्रवेशिल्या नंतर अनसूयेच्या पातिवृत्यांचा प्रभाव देखून वैदेहि हरिखुन पतिभक्ति ज्या स्त्रियेस नाही तीचें जिणें व्यर्थ म्हणुन बोलते पाहा.

(दरु : सुरटि) अतिशये गुवती असो हे संसारी ।। पतिभक्ति नाहि ते पै व्यर्थ नारी
स्वादु भोजन युक्त षड्सीहि कैसे ।।
आदर नसलियां अत्यंत फिकें जैसें ।।
क्रोध कामाचें या कोंदाटल्यां ऐसे
ऐसे बोधाचें राहणें बायी वृथा जसें ।। १ ।।
थोक थोक पुण्यकीं केल्यां अपैसें
येकदाये वीण हे वावुगें जैसें ।।
श्रीकंट माधव शेवनवोरसें देख वृथा
त्यांशि व्दैत भावित जैसें ।।
येणेरिती पतिभक्ति विमुख स्त्रीयेचें मुख पाहू नये ।। तीशि संभाषण करू नये ।। ऐसे दूषून पतिव्रता धर्माचे शिरोभूषण काय म्हणून जानकीदेवीने प्रश्न करितां इतर साधन निषेधपूर्वक साध्वी धर्म सर्वस्व अनसूया सांगते पाहा.

श्लोक : नलगे वपु दंडावें न लगे पुण्य स्थलाशिहीं डावें ।।
परतत्वही धुंडावें न लगे शास्त्रीं अखंड तंडावें
न लगे विष्णु भजावा न लगे गौरी पतीहि पूजावा
यज्ञीही नयजौयज्ञेश्वर हा न योग सज्जवा ।।
हे अवघे हिं न लगे तरी पाहिजे काय म्हणशील तरि सांगत्यें ऐक ।।

(छंद) वदतस्यें तुला सूक्ष्म हे किली। सुदति पाहिजे नीट ऐकिली ।।
पद सरोरुहें स्वामिची अयी-हृदयीं टेवुनि शेवि नित्यही ।।

वचन : तूं आदि शक्ति तुला म्या सांगणें पुनरुक्त परंतु लोकरीतिने हितोपदेश केला.

सूत्रधार : ऐसे अनसूयेचे म्हणतां जानकी उत्तर देते पाहा.

(छंद) जशी मजप्रती राम सावुली। तशीच पूज्य तूं निश्चये भली ।।
स्वशिरसातवाज्ञेशि वंदुनी। असन राघवा नित्य शेवुनी ।।
येणेरिती बोलून जानकीनें अनसूयेचें पदारविंद वंदितां तीणे नित्य अनपायिनी आत्मा रामाशीं मिळुन अनंत समय आनंदरूप नांदशील ऐशा आशीर्वाद देतां रामस्वामीनेहि अत्रीच्या आज्ञेनेहे आपली आदि जननी म्हणुन जाणुन प्रणाम करितां अनसूयेचा कांत संतोषाने आपुले अभीष्ट काम पूर्णकाम श्रीरामास मागतो पाहा.

(श्लोक) करयगीं कवळुनि बाण बाणास नाशी। करूनि सदय दृष्टी हृत्तमः पुंजनाशी
परम विमल ऐसें रूप तुझें पुढारीं। वदत सतत राहो माझिया या मिठारीं ।।

सूत्रधार : येणेरिती अत्रीचें प्रार्थना ऐकून सौमित्र जानकी सहित श्रीरामाने अनसूया कांताच्ये शांतहृत्पुंडरीक नगरीं अखंडित वास्तव्य केलें ।। सकळ ऋषि मंडळीं सुखरूप आपुलाल्या आश्रमी राहिली.

(श्लोक) धर्मिष्ठास कदा विपक्ति न लगो स्वप्नातही एकदा ।।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदयें सव्दोध लोकां सदा ।।
श्रीमद्राम पदारविंदयुगळीं कल्याण भाग्य प्रदा जोडो
भक्ति वुदार ते अनुदिनींस्वानंद राज्यास्पदा ।।
श्रीमालोजि नरेन्द्र नंदन भला शाहेन्द्र नामाधिला
पुण्यश्लोक म्हणुनि लोक निगदीं जाला प्रपंचांतिला ।।
त्याचा पुत्रक सच्चरित्र जगती येकेन्द्र भाग्या गळा ।।
त्या पासूनि शिव स्वरूप तुळजा राजेंद्र जो जन्मला ।।
प्रतापसिम्हन्द्र कुमार त्याचा–जो अशी श्रीविष्णु जगत्पित्याचा–
वुमासतीचि सुकृतैकराशी ।। कल्पद्रुमाच्या नतुळेक राशी ।।
मालोजि क्षितिनाथ पुत्र शजी तत्पुत्र एकोजिहा
तज्जन्मा तुळजेन्द्र भूवररिपू त्याचा प्रतापे माहा–
तत्कुक्षी तुळजा वनीं पतिमणी–वुत्पन्न झाला महा
तत्सूनू शरभेन्द्र भूप विलसे सिंहासनी तो पहा ।।
जो कां त्रिवर्ण गुरूची अपुरूपकाशी–आधार थोर अजि आत्म निरूपकाशी।
तेणेचि अत्रि ललना कृति रूपकाशी। केलें पहा निरूप माद्‌भुत रूपकाशी।

श्रीमच्चंद्राय परम गुरवेनमः ।। श्रीरामचंद्राय मंगळं ।।

## ११. कृष्णजनन नाटक

श्रीरामकर्ता ।। नाट्यारंभ करून कृष्णजनन नाटक सुकवि विरचित या रंगभूमींत नाट्य करितों याकरिता सकल सम्यास व्हावया कारणें कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पहा.

(श्लोक) ज्याला स्तवी निर्जर पंक्ति सारी ।।
जो चिंतित्ता पातक दूर सारी ।।
ज्याची दया विघ्नत्तमा विदारी ।।
वंदू तया पूजित जो उदारीं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीची स्तुती करितो पहा.

(श्लोक) जे सर्व नारीत महा प्रभावती ।।
जीच्या कृपे ज्ञानकळा दुणावती ।।
तैशीच चाले कवनी सरस्वती ।।
भावें नमूं सदया सरस्वती ।।

**सूत्रधार :** येणेरिती भारतीची स्तुती केल्यानंतर सद्‌गुरुची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) जो ब्रह्मवित्तम शिरोमणि पुण्यराशी ।।
ऐशें वशीकृत सदाम हिजाव राशी ।।
अव्दैत बोध सुखसागर पूर्ण सोमा ।
वंदूं तया गुरुस जो धरि सेतु नामा ।।

**सूत्रधार :** येणेरिती सद्‌गुरुची प्रार्थना केल्यानंतर हरिहराची स्तुति करितो पहा.

(श्लोक) पतगाधिप पुंगवास्थितौ ।
फणिशय्या रमणीय भूषणौ ।।
धृत कौस्तुभ बाल चंद्रकौ ।
भज चेतो मुरमार वैरिणौ ।।

**सूत्रधार :** येणेरिती हरिहराची प्रार्थना केल्यानंतर एकदंताची प्रार्थना केली असता विघ्ननिवारण स्तवी विघ्नेश्वर येतो पाहा.

**दरु :** मध्यमावति ।। आदिताळ ।।

गणपती येतो पहा । गुणसिंधू हा मुषकवाहन ।।
ज्याशी तोषक भक्ता सुखराशी ।।

**वचन :** अरे पारिपार्श्वका विघ्नेश्वरें येऊन सकल विघ्ने निवारणे केली ।। या प्रस्तुत कार्यास ता सिद्ध व्हावें ।।

**वचन :** पारिपार्श्वक ।।
जी मी हाजिर आहे ।।

**वचन :** कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ।।

**सूत्रधार :** अरे सांगतों ऐक. जो भोसल वंशाधिचंद्र करुणासमुद्र तेणें हा ग्रंथ रचिला आणीक याचा दिव्य प्रभाव सांगतों ऐक.

(श्लोक) धैर्य मेरुसमान विर्यजलधी
शौर्ये महिद्रा सरी ।।
तो जाणा नृपसिंव्हराज
दुसरा सत्योक्ति धर्मापरि ।।
सौंदर्ये समसायकासदृश हा शंभु दयेने पहा ।।
तो जाणा नृपसिंव्ह भोंसलमणी कृति राम हा ।। १ ।।
श्री महत्प्रताप रघुर्गुवि भक्तिजासी ।
जो कावतंसवर भोसल भूभुजासी ।।
तेणेचि पुण्यतिलकें शुभदायकासी ।।
केले जगतजनक संभव रूपकासी ।। २ ।।

वचन : अरे पार्श्वका नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतों ऐक.

(श्लोक) जे दूसरे हरिविना न मनी मनीते ।
देवोत्तमा पूसवली रमणी मृणीते ।।
तो वासुदेव अवतार हिं आठवा जी ।
देवो सदा सकलिका निज आठवा जी ।।
येणेरिती नाटकार्थ संग्रह श्लोक सांगीतल्यानंतर यशोदा देवी येते म्हणुन सम्यांस सावध करायास दौवारिक येतो पाहा.

(दरु) येतो पहा जी भीकाजी नायिक ।
भव्य कपाळि भंडार ।।
सव्य करी टोणपा थोर ।।

सूत्रधार : येणेरिती दौवारिकाने येउन सम्यास सावध केल्यानंतर यशोदादेवी येते पहा.

(द्विपद) साध्वी शिरोरत्न सार साक्षीपरी ।।
माधवी रस स्फूर्ति माजवी वेखरी ।।
अधीजगत्पूज्य शुद्धीच चालती ।।
बुद्धी जिची रम्य सेतसे नीगुति ।।

दरु : ।। राग ।। खावि ।। अदितळ ।।

पर्वचंद्र निभानना पूर्ण गर्भिणी ।।
येते उर्वसी रंभादिकांसी गर्वहरिणी ।।
सर्व लावण्याची खाणी सरसिज्याक्षी ।।
आणि पर्वत राजस स्तनी नंद रमणी मणी ।।
कोमायीले मुख फार कोमलांगिचे स्थम ।।
धर्मसुक्त कपाळ झाले ।।

सूत्रधार : येणेरिती यशोदेनें येउन प्रसव समय समीप झाला म्हणुन सुईणिचें स्मरण करीता ते येते पाहा.

दरु : राग सोवरि ।। आदिताल ।।

येते पहा जी गौतमी वृद्धा येते पाहा जी ।।

वय झाले जील्म लागी साटि ।।
कवलुनी ही हाती काठि ।।

**सूत्रधार :** येणेरिती गौतमी आल्यानंतर यशोदेस पूत्रोत्सव होता बाळकाशी घेऊन गौतमी सहित यशोदा येते पाहा.

दरु : राग सौराष्ट्र ।। आदिताळ ।।

येतसे सीधुरेंद्र गमना ।। यशोदा रमणीमणी ।।
शात कुंभ कुंभ स्तनिभस्तीत ।।
क्षीतरश्मिबींब सहृश वदनी ।।

**सूत्रधार :** येणेरिती यशोदेनें येउन शिसुजनन । लग्नादि विलोकायाकारणें जोशाचें स्मरण करितां तो येतो पाहा.

दरु : राग केदार गौळ ।। आदिताळ ।।

बालजांशी येतो हा बोलका महा फल भाग सांगायसी ।।
तूलना नाहित ज्या साचे ।।
क्रमितां पाउले बहुश्वास सोडि अतां ।।
भूमि पोहता न दिसे इस जोडि ।।

**सूत्रधार :** येणेरिती जोसी येता त्याला गौतमीने शिशुजन्म वेल नक्षत्रादिक विचारितां तो उत्तर देतो पाहा.

**(श्लोक)** मास श्रावण कृष्ण संत बरवा तो पक्ष शुद्धाष्टमी ।। (?) कृष्णाष्टमी
मोटा सौम्य हि सौम्यवान कथितों रक्षादिक स्पष्ट मी ।।
येतां चंद्रवृषीनिसीध समयी ते रोहिणी तारका ।।
तेव्हा जन्म अजन्म यासि घडला भक्तावळि तारका ।।

**सूत्रधार :** येणेरिती सीशुजन्म नक्षत्रादिक सांगुन पुन्हा ज्ञानदृष्टीने समजुन जोसी बोलतो पाहा.

**गद्य :** श्रीमत्सोम वंशा संभव भुपाळ मौलिकास मस्तकिचा
मुगुटमणी दीनजन मनोरथ सतत पुरविता चिंतामणी ।।
भक्तभयापहारी शमदन विलासित योगि जनमानस सदन विहारी ।।
त्रिभुवन जन सुमति नयन प्रतिबंधकारण निबिडतर दुरि तिमीर
हरावया ।। मदोन्मत्त रक्षोबृंद प्रताप नयन स्पर्श सुकुलित
सुरसनः कुसुदपंक्तीपरी ।। करुणा जोत्स्ना विजृंभपा करावया ।
क्षीरार्णवापासुति पूर्व दिशोदरी श्रीकृष्णराका चंद्रापरी ।।
वादिवगु समुद्रापासुन देवकी गर्भी अवतरला ।।

**वाक्य :** मथुरेतुन हा जग जनक चित्त चोरटा कोणे की चोरून यशोदेचा संनिधनि आणुन ठेविला सारिखा दिसतो. [ यीतः परपुत्रा नंद मंदहि अनभविला ]

**सूत्रधार :** येसें जोडून नेसें वदतां नंदगोप येतो पहा.

(द्विपद) अष्टांग योगात निष्णात जो अति ।।
दृष्टांत नाहिच सृष्टीत ज्या प्रति ।।
सिष्टासहि मना श्रेष्ठ ज्यासी स्थिती ।।
दुष्टयैसा आला तो नंदगोपति ।।

दरु : राग ध्यागड ।। अटनाल ।।

नंदगोप येतो हा आनंदुनि चित्ती पाहा ।।
चामगुणाचे जगी केवळ ।।
हिम नगापरी धीरमहाबळ ।।

सूत्रधार : येणेरिती नंद येउन आनंद पुनसर पुत्ररुप नटला जो अखींदनाथ त्याचें वदनारविंद विलोकुन बोलतो पाहा.

(श्लोक) स्वयेच जो चंद्र महेंद्र भानु ।। झाला धनाध्यक्षहि चित्र भानु ।।
समीरपासी आणि दंडधणि ।। तो पुत्र होता प्रभु चक्रपाणि ।।
सवाई जोडुनि हात पाहात हि गोपसत भान वदे विनये करुनि ।।
दिक्षीत जो निज आश्रितरक्षणि सिक्षक दुष्टजना अवनि ।।
जो विधिचारी गुरु करुणामय मूर्ति सहृदय रतमल ।।
चरणस्मरणची असा उदरीं मधुसूदन संभवला ।।

सूत्रधार : येणेरिती नंदगोप बोलुन नामकरणादिक करून दूत:परक्रुष्ठम महोत्सवास गोपांगना यैतिल ।। आम्ही यास्तव सभेस जावे यैसे संवादुन त्यापरिच वर्तता तो यशोदा चित्ता नंदन श्रीकृष्णाख्य जो तीचा नंदन तद्दर्शनार्थ गोपांगना येत आहेत पाहा.

(द्विपद) राममुनियोगी प्रेमयुक्ताशये पाहोनि वेगी ।।
कांमितां तद्भोग कृष्णाअवतारी ।।
ते मही जन्मले गोजिकाकारी ।।
एकें दुसम मुखि राजीव नयना ।।
लौकरि पातल्या लावण्य सदना ।।

दरु : राग आहेरी ।। आदिताळ ।।

येती पाहा जी गोपिका राजी ।।
राजी ज्या लागी महा कृष्ण हा ।।
काज धरुनि भेटीचे ।। गजगति गुणावह ।।

(छंद) पशुपू सुंदरि पंकजानना ।।
शिशुस पाहुनि त्या कृपाघना ।।
उचलुनि कडे प्राणसोयरा ।।
हृद भेटति भार सूंदरा ।।

सूत्रधार : येणेरिती कृष्णांग संग संभव संतोषाउ भउन यशोदेते विलोकुन बोलताहेत पहा.

दरु : (रागोळिपंतु)

राजस बाळ तुझा राजीवाक्षि ।।
राजमानीत हिलोकी ।। राजबिंबान स्वये ।।

येणेरिती संवादुन गोपांगना नंदनंदनास पाळण्यात निजउन गान पुरसर हलविताहेत पाहा.

जो जो घननीळ गोपाळबाळ ।।
जो जो करुणावाला श्रीलोला ।।
पुतनादि असुर शिक्षण दक्षा ।।
पुनमूर्धा मणीत् कंजाक्षा ।।
पुतळा स्वतुखाचा विस्तीर्ण वृक्षा ।।
पुरहुन गणिति भास्करणा कटाक्षा ।।
सुचरीता ब्रह्यांड कोटचानुकोटि ।।
रचितां नानाविध अत्यंत मोटि ।।
प्रचुर स्त्रम झाला तुज कल्याण पेटि ।।
अचिरकाळे निद्रा घेई जगजेठि ।। १ ।।
कळांतक नेत्री अग्निची ज्वाळा ।।
मेळभूतांचा तो जा सवें प्रबळ ।।
गळागळा येतो तो पाहा बागुल ।।
बाळा न करि चाळा आतां बहुवेळ ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कृष्ण योगनिद्रा करीतां सकळ गोपांगना स्वमंदिरास येतां. कित्तेक काळ लोटितां गोपबाळ पाळासी श्रीगोपाळ येतो पाहा.

**(द्विपद)** लीला धृती दार ललीत आकार ।।
श्रीलागि श्लाध्य तर सील श्रुतिसार ।।
रूपनिर्जीव मार गोपिकां हीर ।।
पापदंउन धीर तापसाधार ।।

दरु : (राग : सुरटि ।। आदिताळ)

तो गोपिरमण श्रीहरी ।। गोपपरिवारी ।।
वेष्टित येतसे ।। वेणु वाजवीत ।।
श्रेष्ठ जो परमेटीतात भारी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्ण देव येउन गोपबाळकासी तो पाहा.

दरु : (राग : आहेरि)

सीरुनि गोपिका गेहिं ।। गोरसादिक पाहीं ।।
चोरुं चलारे लवलांहि ।। चोरवटतेंहि ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्ण देव गोपाळकासी मिळुन चौर्यादिक करिता ते न साहुन यशोदे निकटी गाऱ्हाणें द्याया कारणें गोपांगना येताहेत पाहा.

**(दव)** येत पाहा जी गोपिका राजी ।।

**सूत्रधार :** येणेरिती गोपांगना येउन अन्योन्य बोलताहेत पाहा.

**दरु :** (राग : अठाणा ।। ताळशापू)

साजणी सांगतें कांहि ।। चोजतें परिसायें ।।
राज गोपे केलें प्रत्यक्ष येणे ।।
आजी जे कपट नाटक सूत्रधार वासुदेव ।। ध्रु ।।
क्षीर मि विकुनि जांतार साक्षी त्यव्हा चोर वाटे येउनि वेगे ।।
गोरसाचे पात्र हरुनि बरवा ।।
मोरपिंछ धरवो रसें तें पय सारे हे पीउनी दे रिक्त भाड हा ।। १ ।।

**सूत्रधार :** ऐसें परस्पर संवादुन यशोदे निकटि गाऱ्हाणि देताहेत पाहा.

**दरु :** (राग : भैरवी ।। ताळशापू)

बाई ये यशोदे परिस यापरि सळितो अम्हा कृष्ण ।।
काय ते सांगि जे लाज हे अमुची जाइल लवलाहे ।।

**सूत्रधार :** ऐसि गाऱ्हाणि देतां जगज्जनक जननी बोलते पाहा.

**दरु :** (राग : कांबोदि ।। ताळ : शापू)

काय बोलता बायकानो तुम्ही ।। या यवढचा बाळासी ।।
होईल तरि नीट दंडा मी न येचि रागासि ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती यशोदा गोपिकांसी संवादुन श्रीकृष्णासी अवलोकुनी बोलते पाहा.

**दरु :** (राग : सरटि ।। आदिताळ)

साहतील कितितरीं सळणूक तुझी ।।
मोहरी वाजउनि अहिशयना ।। मोहविसी कां सुंदरी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्णास बुधि सीकउन गोपिकास निरोप देऊन वासुदेवासह वर्तमान यशोदा देवि निज मंदिरी आल्यानंतर गोपिकाहि श्रीकृष्ण ध्यानासक्त आल्या सदनी प्रवेशतां अक्रुरासीं श्रीकृष्ण येतो पाहा.

**दरु :** (राग : भैरवि ।। आदिताळ)

अतसी पुष्पसंकाश अच्युत येतो हा ।।
नतसी दुज प्रासी महिमा ।। नायक जो कमलेचा पाहा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कृष्ण येऊन अक्रूरास निरखुनी विरह वेदना न साहतां कष्टि होतो पाहा.

**दरु :** (अटताळ)

काय सांगु सखया आतां मि ।। तें कौतुक तुजला ।।
कायज असुनिहि माझा ।। कायज विंधि बाणि मजला ।। धृ ।।
परिसें अणिक चोज सरस दोनि काने धरूनि ।।
हरिणांक बालक माझा ।। हर हर तापितो किरणी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती अक्रूराशीं संवादून पुढें दोनि पावुलें उद्यान वनी मानस सरोवरापरि येक दिव्य सरोवर विलोकून मानसीं संतोष पाऊन त्याचे वर्णन करितो पाहा.

(श्लोक) सादृश्य ज्या निर्मल मानसाचें ।।
जें पूर्ण अछोद की जाण साचे ।।
समृद्धी हि उत्पल सारसानि।
कीं बैसिजे त्या स्छळि सारसानि ।।

सूत्रधार : येणेरिती सरोवर वर्णन करुन विरहाने कष्टि होत्साता दोनि पावलें संचरितां तो दक्षिण नेत्र बाहु फुरतां तो कांहि अपूर्व वस्तु दृष्टिस पडेल यैसे चितीतां यदृच्छेन राजहंस येतो पाहा.

(द्विपद) ठाणी मनोरंग वाह प्रवीण ।।
आणी महाशुभ्र आकारपूर्ण ।।
जाला कळे निरनीय मृतांना ।।
आला असा येथ तो राजहंस पहा ।।

दरु : (राग : आहेरि ।। आदिताळ)

राजहंस आला। राजस अती ।।
कामरुप धर। हेमसम द्युति ।।
सोम वदन तो मंद मंद गति ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती राजहंस येतां यदुराज राजहंस गतीने त्याला धरावयास जावा तो कां हिमाचे उडुनि बसतां ।।

(द्विपद) जावे जरी उघड त्यासि धरावयासि ।।
सारे कळेल म्हणुनी सुगणक राशी ।।
बांधुनि कींणिपटें जपुनी समीटीं ।।
जाता करीं अडकला असुखांध कूपि ।।

सूत्रधार : येणेरिती सांपडता तो हंस कृष्णास विलोकून बोलतो पाहा.

(श्लोक) त्वरित सोडि यदूत्तम केसरी ।।
विनवितों तुज जोडुनियां करिं ।।
करिन या उपकार जनार्दना ।।
रचि दयास दया रीपुन्मर्दना ।। १ ।।
अनृवदुनि वाणी जाईल सस्छळाशी ।।
म्हणुनि न धरि चिती सर्वथा संशयाशी ।।
मनुजसम नु हों गा जाण (अम्हेंनिशा) ।।
कळल मग कृपेनें रिति माझि सुकेशा ।। २ ।।

सूत्रधार : येणेंरिती बोलुन मजकडून स्त्रिरत्न लाभ घडून येईल. दयेने मुक्त करावे यैसे प्रार्थितां श्रीकृष्ण त्याला मोकलुन निजमंदिरीं येवां यदछेनें राधिका येते पाहा.

(द्विपद) साधुनि बहु साल जन्मी जीवा ।।
माधवासहि मान्य होइले गुणें नाधिका जीहुनि नळिन नाभाप्रती ।
राधिका ते अली राजमात अति ।।

दरु : (राग : सौराष्ट्र ।। आदिताळ)

आली धरुनि मनि ।। आली राधा कल्याणी ।।
आलीची संगपाली ।। आली वेणि सद्गुणशाली ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती राधिका येउन रत्नावली सखीते विलोकून बोलते पाहा.

वाक्य : सखे म्या वनी विहार करीत असता तेथें येका राजहंसास विलोकुन त्याला कृष्णाचा वृत्तांत विचारिला तो प्रकार यैक ।।

(श्लोक) जे पोंबव्हनि वटिलेंव नरका नृरांसा ।।
ज्याची समस्त सूरहि करिति प्रशंसा ।।
योग्यांचिया विमल मानसराजहंसा ।।
त्या देखिल्या वद मजप्रति राजहंसा ।। १ ।।

या परि म्या विचारिता यमुना तट वन कुंजी श्रीकृष्ण आहे म्हणुन सांगता येथे येउन हुडकितां कांत दृष्टिगोचर झाला नाही.

सूत्रधार : येणरिती बोलुन सखीस विलोकुन आपुली स्थिति राधिका सांगते पाहा.

दरु : (रा : कांबोदि ।। अटताळ)

अळि वेणी मम पूजा फळल ईतकें असतां ।।
बोले ठेऊं कोणावरी ।।
विलसित कलिकाला माजी चाली जाणुनि ।।
चालविता प्रभु भटणें स्वल्प काय सूदति ।। धृ ।।
निजसख्याची दया मजवरती आता जै ।।
हा ईदुहि पाहा हितके विन होता ।।
हे साजणि आठवितां येणा का बोल काये ।।
तो जाणता त्या लागिहि दृषुनि फळ काय आता ।। १ ।।
कोपमजवरि पूर्ण ।। आपले केला फलुन ।।
हा मदन मज बहु सळि असे समजुनि ।।
स्वामीचें हि मन फार तुष्ट झाल्या पुरे ।।
मी प्रतीक्षणी त्यासी बोल ठेऊं केवी सुदती ।। २ ।।
मदवती प्रताप राम प्रभु मिळुनि असतां ।।
मंद नरुचे तदा श्रम न हरिला केवि ।।
गंधवाह्य पूती निदूनी काज काया ।।
हृदये शासी पूति कुळ म्हणुं कैसी अद्य त्या ।। ३ ।।

सूत्रधार : येणरिती सख्यांसी संवदता तो मुरलीरव कानी पडता बहुतेक श्रीकृष्ण येतो जणू यैसे राधिकेनें अंतरी चिंतीता नंदनंदन येतो पाहा.

(दरु) अतसी पुष्पसंकाहा अच्युत येतो पाहा.

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण येवुन राधिकेस विलोकुन अक्रुरांशी बोलतो पाहा.

(चूर्णिका) इयं खलू सुवदना ।। नखमयुख तिरस्कृत चंद्ररेखा ।।
कछ्प तिरस्कारि प्रपद सौदर्य युता ।।
कुसुम शरकाटळी विजई जघायु गळ शोभा ।।
करिकराकरोरुयुगला ।। पुळिनतळ विशाल जघना ।।
अस्तिनास्ति संशया धाई मध्यभागा ।।
तनुत रंत रंगत ती विलसत त्रिवाळीराजि ।।
शांतकुंभमय कलशानुकारि कुचकुंभा ।।
चंद्रमणि हार सुंदर बाहुव्दय विराजिता ।।
निष्कलंकराका शशांकाति शाई वदन शोभा ।।
प्रावट स्कमय सकल जलद समुदय विडबिचुकुर निकुरा ।।
सकल भुवन संमोह न करी कुसुमास्त्रा पूर्वविधेपरि ।।
त्रिलोकी व जई कुसुम शरपता केसरी ।। रति कराज्य घृत
रमणीय श्रृकेपरि ।। हे रमणि मणि विराजे ।।

**सूत्रधार :** येणरिती अक्रूरांशी श्रीकृष्ण बोलत असतां त्यास विलोकुन राधिका बोलते पाहा.

(श्लोक) हे भक्त वत्सल दयानिधि पद्मनेना ।।
गोधुव्हि धुसरित् तल्प सुवर्ण नेत्रा ।।
तुझ्या पदीं अचळू देई अम्हा समुद्रा ।।
आनंद मूर्तिवरद करुणासमुद्रा ।।

**सूत्रधार :** येणेरिती राधिकेचे वाक्य यैकुन श्रीकृष्ण उत्तर देतो पाहा.

(श्लोक) दुऱ्हावलें मी म्हणउनि रागा ।।
धरुन का जी अति मारबाण न साहता ।।
विरहातुर श्रम तो नाथा ।। कर ठेवि अमचा माथां ।।
करुणान्धे पाव आता ।। २ ।।
काम पाव्हा तुज कृष्णा ।। भामा मान समोहता ।।
सोमवंशविभूषणा ।। हेम सादृश्य वसना ।। ३ ।।

दरू० : (आदितळा)

पाहि पाहि गोप शौरे ।। पाहि पाहि गोप शौरे ।।
पाहि पाहि गोप शोरे ।। पाहि मां शोरे ।।
शेषशयना गोपबाला ।।
केशवासुर बाला किशि टपन श्वलीला ।। करुणालवाला ।। १ ।।
मछवामनराया । कछप परशुरामा ।।
केसरी क्रोडबलरामा ।। कल्किय पुसोमा ।। २ ।।
इत्यादि अवतार बरवो नित्यानंदा धरुनि नवे ।।
दत्याचे निवट थोवे ।। सत्येशा अधवे ।। ३ ।।

दरू० : (आदिताळ)

पाहि पाहि गोप शोरे ।।
पाहि पाहि गोप शोरे । पाहि पाहि गोप शोरे ।। पाहि मां शोरे ।।

वासवमणि शासमाना । त्रासकोध सुदना ॥
कंस करि पंचानना । रासभासुर दमना ॥ १ ॥
लीलाविग्रह कारणा । नीलालकातृत वदना ॥
जलजाक्षा कलि कलुषहरणा । वल्लीव मोहना ॥ २ ॥
शरणागत वज्रवंजरा । करिजा वरदा वुदारा ॥
करूणाब्धे श्री यदुवरा । कनकाद्रिधीरा ॥ ३ ॥

दरू० : (ताळशापु)

पाहि पाहि पाहि पाहि पाहि पाहि
पाहि पाहि पाहि पाहि मां शोरे ॥
कामित काम सुर दुम सत्सुसानुराग ॥
जाऊ चला यावरि क्रीडनासी ॥
समत्य हि त्या यमुनावनासी ॥

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण गोपिकांचे समाधान करून त्या सह वर्तमान खेळतो पाहा

चूर्णिका : जो गोपिका स्तोमालिंगन सहस्त्र करूं ।
कीं सरितां वेष्टित रत्नाकरू ॥
जैसा ऋक्ष गणी कळाधरू ॥
सकल भाग्यप्रद अमित शाखायुक्त कल्पतरू ॥
ना तरि भूं धर कुलि विजृंभमाण स्वर्णधरा धरू ॥
तेंवि हा मंदरोधर यदुवीर । यमुना तट वनी न कुंजि विराजे ॥

दरू० : (राग सैधवि. आदिताळ,)

पाहि पाहि शौरे कृष्णा पाहि पाहि शौरे ॥
पाहि पाहि शौरे कृष्णा पाहि पाहि शौरे ॥
नीलवर्ण वेषा श्री गोपाल वंशभूषा ।
लिला रचुनि भुलीवशि सर्वहि । ललित गोपयोबा ॥ १ ॥
शकट दैत्य दमना दारूण । बक दान वहनना ॥
अकलंकव्रजनारि रमणा । सकलु गुणामरणा ॥ २ ॥
अवसी सुभ भासा सुंदर । अज्ब तुल्य हासा ॥
सतत कृत विलासा कटि धृत । पीत दिव्य वासा ॥ ३ ॥

दरू० : पाहि पाहि गोप शौरे, पाहि पाहि गोप शौरे ॥
पाहि पाहि गोप शौरे ॥
पाहि मां गोप शौरे । दिन राति गोप रामा ॥
मनि ध्याति आत्मारामा । अनंदें पाउनि आराम ॥
आनना ठविती काना ॥ १॥
ख । धाम परिपूर्ण काम पाहा ॥
भामा मनोहर भौम विनाशन । तामरसे क्षण स्वामिमहा ॥
गोवर्धना लागि घेऊनि या करिं । गोवर्धना करि गोपपदि ॥ ३ ॥
भाव देई तुझा पावुलि माधवा । भुवनपाल विभू तुज गति ॥ ४ ॥

दरू० : (ताळशापु)

पाहि पाहि गोप शौरे। पाहि पाहि गोप शौरे।।
पाहि पाहि गोप शौरे। पाहि पाहि गोप शौरे।।
गोप कुलोत्तसां कृष्णा।
श्रीपते पुरवि तृष्णा।।
गोपिका मनमोहना।
कोप सोडि दयाघना।। १।।
कालीय गर्वं विदारा।
कांव्हि दीती विहारा।।
कलय वन मर्दन धीरा।
कलांतक सख्यकरा।। २।।
नीलांबुद सम गात्रा।
की लालज पत्ननेत्रा।।
लीला घृत वेणु नेत्रा।
श्री लक्ष्मी देवि कलत्ना।। ३।।

दरू : (ताळशापु)

पाहि पाहि गोप शौरे। कृष्णा।
पाहि पाहि गोप शौरे।
वल्लविवसनापहरका।। राधा।। वल्लभा पाप निवारका।। १।।
मत्त साम जग मन मुरारे। दुष्टासपूतना शोषण श्रीहरे।। २।।
आत्वं तुज लागि चिदधना।
धृतालिला मानष दिव्य अपघना।। ३।।

दरू० : (ताळशापु)

पाहि पाहि मां श्रीकृष्णा।
पाहि पाहि पाहि मां। विमल साधुरंजना।
गोपाल यमलानभंजना। शामित दुरित बंधना।।
यदुवर कमलायतलोचना।। १।।
मार कोटि सुंदरा। कौस्तुभ।। हार शोभित कंधरा।
सार सद्‌गुण मंदिरा मत्तचाणूरानलकंधरा।। २।।
योगिमानसहंसा। श्रीकांता। नागार्ति विध्वंसा।।
वेगखंडित कंसा। गोविंद। श्रीगोकुलोत्सां।। ३।।

दरू० : (तालआदि)

पाहि पाहि वल्लवीपते। श्रीकृष्ण।
पाहि मां गोपगोपते। मुर मधूनरक भंज ना।
सुरश्रेष्ठा। सरसिजाक्ष गरुड वाहना।। १।।
अनुपमान भुवन सुंदरा जगंनाथा। आनंदिसी घुबंधुरा।। २।।
कामितानंददायका। कामजनक। शामळारमा नायको।। ३।।

दरू० : (आदिताळ)

पाहि श्रीहरि पाहि श्रीधव पाहि श्री हरि पाहि मां।
पाहि मुनिजन गेयकामा। पाहि रुक्मिणि नायका ॥ १ ॥
कमनियांगा काम जनका। सोम वंश विभुषणा ॥
कमळ दळनिभ लोचन हरि। करि दया कलि मोचना ॥ २ ॥
मदनशरिं ब्रहुम्दित नाहलों।
सदय हृदया माधवा ॥
पद सरोवरुह दाखवुनी।
पाव्हिजे जी यादवा ॥ ३ ॥
गोवलासी गौरविलें।
गोपिजन मनमोहन ॥
गोकुळि अवतरुनि गोपिशी।
गोकुला मधुसुदना ॥

दरू० : (आदिताळ)

पाहि पाहि मां कृष्ण।
पाहि पाहि मां कृष्णा। पाहि मां कृष्णा।
शरणागत टंजरा। करुणाब्धि यदुवरा।
भरण उदारा ॥ १ ॥
काळीयामद हर। काळीदि तरीव हार।
ताळीदळ सुंदर। पाळीश्रीधर ॥ २ ॥
वांचुनि तुजविण। वांचुनि काय नीणा।
साचार तुं जाण। हें चि निदाना ॥ ३ ॥

श्लोक : यापरी युवतिंशी हरि खेळा।
खेळुनी निजमनी हरिखेला ॥
घेवुनि मग सवें व्रजनारी।
पावला निज घरा वृजिनारी ॥ १ ॥
सदभाविकासी सहसा विपदा न लागो।
त्याचे घरी सतत सिंधुसुताही वागो ॥
अव्दैत बीज सुख त्या हृदयींच जागो।
देवोत्तमा तुज अम्ही इतकेंच मागों ॥ २ ॥
श्रीमत्प्रताप रघुपुंग विभक्ति जासी।
जो कां वतंस वर भोसल भु-भुजासी ॥
तेणेचि पुण्य तीलकें श्रुभदायकासी।
केलें जगजनक संभव रुपकासी ॥ ३ ॥
इतिश्री कृष्णजनन नाटकं संपूर्ण

श्री रा म क र्ता

# १२. ययाति चरित्र नाटक

श्री रामकर्ता ।। नाट्यारंभ करून ययाति चरित्र नाटक सुकवि विरचित या रंग भुमित नाट्य करितों या करितां सकल सभ्यास आनंद व्हावया साठीं कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) विजय वैभव मंगल दायका ।।
निजनाम्दुत सौख्यविधांयका ।।
गजमुखा वरदाक विनायका ।।
तुज नमो अजि सिद्धिविनायका ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) आतां प्रार्थू वागधिष्टान वाणी ।।
ध्यातां जीतें धी प्रकाशा न वाणी ।।
वीणा हस्ते वाजवी रम्य वाणी ।।
ना ना विमूल जे कीरवाणी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णुची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) सत्य ज्ञान सुखेक सार जलथी गंभीर जो शोभला ।।
प्रत्यग्द्रप अरूपमान निखिलाधिष्ठान कर्ता भला ।।
मोहातें हरूनी स्वधाम वितरी जो भेद खेदातुरा ।।
तो हा सद्‌गुण धाम राम नमिला श्री देशिकांचा तुरा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती महाविष्णूची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) जीवेशव्दय येक चिद्घन अचित्रैलोक्य तें वेगलें ।।
ऐसें वेद रहस्य सूचउनि जो विज्ञान मुद्रावलें ।।
मौनेची हरि शिष्य संशय तथा व्दैतात्मक स्फूर्तिला ।।
वंदू त्या गुरू मूर्तिला समरसें श्री दक्षिणा मूर्तिला ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती सकल देव प्रार्थना केल्यानंतर नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पाहा.

(श्लोक) विद्याजीवन कारिणी इहपरीं त्याजीव ज्याता कवी ।।
शुध्दात्मा अति ब्रम्ह मूर्ति करूणापरिण जो सीकवी ।।
सत्संपत्तीहिं दे अनंन्य भजतां जों ज्यातिही नासहीं ।।
देवो राघव आदि देव गुरू तो आम्हा सुखें सर्वहीं ।। ५ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नाटकार्थ संग्रह श्लोक सांगीतल्यानंतर एकदंताची प्रार्थना केलि असतां तो प्रत्यक्ष येतो पाहा.

**दरू० :** (पाडिराग. आदिताळ)

कोंदूनि आनंद भरें ।। दोंद हलवित बरें ।।
मोदक झेलित करें ।। गणाधिप येतो पाहा ।। १ ।।
मुषक वाहन मस्त ।। भूषणी युक्त समस्त ।।

पाशांकुश कर हस्त ।। विनायक येतो पाहा ।। २ ।।
मंगल धाम सुंदर ।। आंगी चर्चुनि शेंदूर ।।
संगीत नटन पर ।। गजमुख येतो पाहा ।। ३ ।।

सूत्रधार : अरे परिपार्श्वका विघ्नेश्वरा येवून सकल विघ्नें निवारणें केलीं की या पूस्तुत कार्यास तां इकडें यावें.
परि पार्श्व । वाक्य ! जी मी हजीर आहें.

सूत्रधार : येथें श्री प्रतापरामचंद्र नित्यमहोत्सव पाहावया कारणें सकल विद्वन्मंडली मिळाली आहे तरी ययाति चरित्र नामक नाटक नाचवून यांचे मनोरंजन कराया इच्छितों, परि पार्श्वक. कोणया दिव्य ग्रंथाचा निर्माता.

सूत्रधार (श्लोक) : प्रतापरामसद्वक्ती वभवोद्दाम जो महा ।।
प्रतापसिंव्ह राजर्षि प्रणीता यासि तो पाहा।।

वाक्य : आणीक त्याचा दिव्य प्रभाव सांगतों ऐक.
(श्लोक) जो धर्म कार्यीसुदृढाभिमानी ।। सदैवकीं दैवत विमानी ।।
अद्वैत निष्णात असूनि पाही ।।
आसक्त जो केवल रामपायीं ।।

परि. : परंतु तुझें अंतःकरण चंचल कां आहे ?

सूत्रधार : माझी उत्तम चित्तवृत्ति परम पुरुषार्थाचे ठाई आसक्त होत नाहीं काम्य. कर्माचे ठाईच वोढते हेंच मन चांचल्यास मूळ.

परि० : यास दैवच मूळ. पूर्वी पूर्व देवगुरू जो श्रुक्राच्यार्या होता. त्याचे मनी स्वकन्या जे देवयानी भूदेवोत्तमास द्यावी म्हणून अस्तां दैवयोगें ययाति भूपतीसीं तीस संघ्धदृप्न करविलें ईश्वर संकल्पाचें प्रमाण म्हणून भार्गवानें त्या गोष्टीची अवखिती मानिली नाहीं.

सूत्रधार : येणेरिती पारिपार्श्वक बोलतां शिष्या समतेवेत दैत्यगुरू येतो पाहा.

दरू० : (राग शाहना. ताल शापू)
दानव गुरू येतो पाहा ।। सुनिधान जो प्राज्ञ महा ।।
गुणवारिधी श्रेष्ट महा ।। प० ।।
भार्गव कुल तिलक कसा ।। भासमान यिंदु तसा ।।
भर्ग चरण सारसा ।। भक्ती पूर्व स्मरत असा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती श्रुक्राच्यार्या येवून आकाशाकडें रोख देवून शिष्यासीं बोलतो पाहा.

(श्लोक) ज्योतिं मंडल हें नव्हे रवि तथा वन्हीं अनुष्णांन्वयें ।।
सीतोपद्रवहीं नशे म्हणवुनी शीतां श्रुनोहे स्वयें ।।
ब्राह्म ज्योतिचहें असंशय गमे सोग्य प्रकाशा सटीं ।।
अंतर्धात निवारिलें टिरखितां हेकांति कीं गोमटी ।।

सूत्रधार : येणेरिती दैत्यगुरू बोलत अस्तां ज्ञाननिधि नामक मैत्रासहित गुरूपुत्र कच येतो पाहा.

**दरू० :** (राग कल्याणी. आदिताल)
देव कार्य मनि चिंतुनि निर्जर ।। देशिकेंद्र सुत येतो ।।
प० ।। ध्यावयासिकवि पासुनी मृतसंजीवन विद्येलागि अहोतो ।।
अनु० प० ।। प्राण मैत्र तो विप्र बरोबरी ।। ज्ञान निधि श्रुभ नामा ।।
माननीय्य अजि त्यासह वर्तमान निखिल सद्गुण गणसीमा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कच आल्यानंतर त्याला विलोकून ज्ञाननिधि बोलतो पाहा.
**(श्लोक)** ज्याचें आंगणिचे खडे हीं अघवे ते चोख चिंतामणी ।।
खिल्लारें तरि काम धेनुतातिचीते कल्प शाखीवनी ।।
ऐसाहीं अमरेंद्र तूज असतां दासानुदास स्वता ।।
कां मौका नरकास या गमनतां आरंभीलें तत्वता ।।

**सूत्रधार :** यापरीं ज्ञाननिधीचें वाक्य ऐकून कच उत्तर देतो पाहा.
**(श्लोक)** सजीव असतां सुरां करितजे अजीव स्वयें ।।
तसीच असुरांस दे अमरता जिवां निश्चयें ।।
असी कविपसीं असे प्रभुत जीवनीसत्कला ।।
तदीय्य ग्रहणार्थ मी ह्रित जातसें भूतला ।। १ ।।

**वाक्य :** तूं म्हणसील देवांस उपद्रव झाल्यानें त्वां कि मर्थ भूलोकास जावून ।।
श्रुक्राच्यार्याचें शिष्य पण अंगिकार करावें तरि याचें उत्तर ऐक ।।
**(श्लोक)** विद्या हे मृत जीवनी भृगुसुता विद्यानिधी पासुनी ।।
ह्यातां सिकल्यां समस्त मरणावद्यासिहर्तीगुणी ।।
युध्ता भीतरि भांगिल्यां हित नुते क्रुध्ता अरोनी करूं ।।
सध्यातन्मिमिमान्वयें मृतिचि या उद्यापना हे गुरू ।।
**(छंद)** सरस आमुचें कार्य साधुनी ।। त्वरित आलियां त्वां महामुनी ।।
करूं तुतें सुखी भाग अर्पुनी ।। गुरू सुतागमा हेत मनी ।।

**वाक्य :** येणेरिती देवानी मज प्रार्थितां या गोष्टींत स्वार्थं परमार्थ दोनी हीं आहे ते म्हणून मी येथे आलों,

**सूत्रधार :** ऐसे कच्याचें वाक्य ऐकून ज्ञान निधीनें सशिरस्कंप युक्त म्हणतां पुन्हा कच बोलतो पाहा.

**वाक्य :** अगाये ज्ञाननिधी, आम्ही निघालें मुहूर्त फार उत्तम ! या समई देवयानीहिं श्रुक्रसंन्निधि येते तेहीं माझें विषई स्वजनकासु सांगून संग्रह करवील.

**सूत्रधार :** येणेरिती ज्ञान निधीसी कच बोलत असतां देवयानी येते पाहा.

**दरू० :** (राग पुन्नागवराली. आदिताल)
देवी येतसे पाहे ।। देवयानी हे ।। देवी येतसे पांहे ।।
प० ।। देव कन्येकेकडून केवळ भासमानसींव सुंदर तेचि ।।
श्रीचें सादृश्यलाहे ।। अनु० प० ।। तरणीं जे युक्त कोटी ।।
तरणी प्रदीप्तरत्ना ।। भरणी सद्गुण गणा भरणी ।।

झलंझलीत चरणीनपूर युगरसं चरणी मंडनें मुख्य धरणी
मंडलासी मंधरणी करूं जे चतुर वडीलांचा ।। १ ।।

सूत्रधार : येणरिती देवयानी येवून स्वजनकाजवळ उभी ठेल्यानंतर कच्याने कवीस साष्टांग नमस्कार घालून उभा ठाकता त्यानें स्वागतपूर्वक आगमन कार्याचे प्रश्न करितां वाचस्पतिनंदन उत्तर देतो पाहा.

छंद : कवि बरा तुझ्या सत्य सन्निधी ।।
निवसुं इच्छितो मी कृपानिधी ।।
निववि अस्तुयामंजुलोत्तरें ।।
श्रावण मंडलाला तरी बरें ।।

सूत्रधार : येणेरिती गुरु पुत्रानें पार्थिता दैत्य शत्रू जें देव हा त्यांच्या पुरोहिताचा लेंक याचे हित आम्ही पाहिल्याने दानवासी मानसी खेद प्राप्त होईल यास्तव हराहरीने मगतां उगेंच असावें ऐसें शुक्राच्यार्याने निर्धारून मौन धरिता देवयानी स्वजनकासी बोलते पहा.

दरू : (राग नीलांबरी. आदिताल)

नकरिं निराकरणासी ।। यांच्या ।।
(प०) गुरूनंदन हा ।। सुरवर मान्यकीं ।।
धरितो चरणयुगासी ।। याच्या ।। १ ।।
अप्रत्याख्येय ।। अजि विद्यार्थी ।।
विप्र आल्या गुरूपासीं ।। याच्या ।। २ ।।
वेदासिखेचे वाक्य हें मानसीं ।।
तें धरूनि सगुणरासी ।। याच्या ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीनें प्रार्थिता शुक्राचार्यानें हें युक्त म्हणून अंगिकार करितां उपाच्याय सेवापूर्वक कच्याने नित्यव्रत आचरत असतां प्रत्यही वनांस जावून समिकुश पुष्पादि घेवून यावयाचे समर्द येके दिवसीं कच न येता त्यासाठी मानसीं खेद पावून सखीस पाहून देवयानी बोलते पाहा.

दरू : (राग यमुना. आदिताळ)

काय करूं आता बाई ।। सांगतें मी हें
प० ।। हा येढोलवरि येथें निर्जर ।।
नायक गुत सुत आला नाही ।।
(अनु प०) ।। गोंधनें वनि ।। चारूं शेला ।।
जो दनुज देशिक कविचीं ।।
येधवां ते मात्र फिरूनि ।। येथें पावलीं धरिचीं ।।
शोधिहि घेतां नाढलला कच ।।
वेदपार गामीं कोठेंची ।। क्रोध परि वशीं दिति
तनयी जणु ।। तो धरूनि भक्षिला सुरूची ।। १ ।।
कंजयदल निभनेत्र सद्गुण ।। कंदमज तो रात्रि दिवसहिं

मंजुल रागोत्धराजें ।। मन्मथप्रभ पैं अगई ।।
रंजवित कीं सादर होता ।। रंग करूनी अनुरागें हृदई ।।
कुंजरेशगामिनी मनि मी सोत्कंठ त्यासीं निरखं या समई ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती सखी निकटी देवयानीनें कष्टी होतां शुक्राचार्यानिं स्वकन्येस क्लेश कारण पुसतां तिनें कचाचें वर्तमान सविस्तर सांगतां दैत्य गुरू बोलतो पाहा.

**(श्लोक)** आधीं छेटुनी यां कचासि ककचे सालावृकाला बली ।।
देते सर्वेंहि पूर्व देव जाहले दुर्वार मोटबली ।।
खंडूनीतिलशातदीय्य तनुजे अब्धी पुन्हा टाकिली ।।
तैं म्या मंत्र बलें तया जिवविलें जैतां कृपा भाकिली ।।

**वाक्य :** सांप्रत हीं याला दैत्यानी हत केलें किंवा रोगादि उपद्रवास्तव शरीर वियोग घडला हें कांहीं कळत नाहीं.

**सूत्रधार :** येणेरिती शुक्राचार्याचें वाक्य ऐकून देवयानी प्रत्युत्तर देते पाहा.

**(छंद)** न कळतां कदा मावुनी प्रति। प्रकट जन्मल्या बाल संन्मति ।।
गुरूज वृत्तकीं ते धवांच हें। घडल पैं अवेद्यस्फुटः स्वयें ।।

**वाक्य :** इतःपर विशेष बोलत काय जीवनंदना प्रति जीवविल्याविणें माझा जीव परि छन (क्षण) टिकणार नाहीं.

**सूत्रधार :** येणेरिती देवयानीनें बोलता हें परीछन सोडणार नाहीं म्हणुन शुक्राचार्यानिं जाणून ध्यानारूढ होवून कच वृत्तांत जाणून देवयानी प्रति बोलिजे तें पाहा.

**(श्लोक)** वृश्चिकव्याल्यां जैसा निश्चित त्याची तनू तगेना कीं ।।
जीवविल्या गुरू पुत्रां ध्रुव खैसें दुर्लभ जिवित्व माझें कीं ।।

**वाक्य :** तेंच स्पष्ट सांगतों ऐक.

**(श्लोक)** माझें पोट विदारिद्रल्याविण कदा ते देवयानी स्वयें ।।
नोहे कीं गुरू पुत्र दृश्य तुजला हा मानिजे निश्चयें ।।
वांचावें जगी म्याचं नातरि यया वाचस्पतीच्या सुतें ।।
दोनि माजि अभिष्ट जें निजमना हें सांगिजें नीगुतें ।।

**दरू : राग पुन्नाग वराली. (आदिताल)**

जीववितां नय्ये जीव नंदना तें अवधारी पहिल्या परी ।।
(प.) ।। देवयानी येथें केवल संकट ।। जें वसे आतां मी ।।
ते वदतो वैखरी ।।
(अनु प.) ।। दोष न पाहता दैत्य याचे देह ।।
तासुनी तिळशाह ।। तामसी दुर्जनी ।।
त्यासहित मजकीं सुरायिहिं ।। प्राशविली अप्रकट वंचुनि ।।
वाचस्पती सुता ।। वाचविल्यानें म्या ।। साचन टिके सह ।।
सावपु अद्य हें ।। कच असावा कीं ।। जनक मी ।।
सुचरिते वद ।। सुगमनिश्चय ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती शुक्राचार्यांनें कोडें घालितां देवयानी समर्पक जाब देते पाहा.

दरु : राग तोडी. (ताल शापू)

तैसा झाला न्याय ।। माझा वदूं ।। कैसासाभिपाय
(प.) ।। ज्ञान अपेक्षित पूर्ण विरागकीं ।।
जाणवी खोनीत येक म्हटल्यां ।। कोणत्या गावें कोण मागावे
मौनची राहणे ।। सुख जैसे ।। १ ।।
सतती कीं तुज ।। संपत्ति पाहिजे ।।
चिंतूनि येकचि मागें ।। निट गुंतविल्या असि युक्ती तंतूते ।।
कुंथत सरणें मागें जैसे ।। २ ।।
हानि झाल्या तुहि प्राणाचि राहिना ।।
हा नष्टल्यां कच कष्ट मना ।।
दोनिहिं कांक्षित मानसीं यास्तव ।।
ज्ञाननिधी सत्कीर्ती धना ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीनें सयुक्तिक प्रत्युत्तर देवून पुन्हा प्रार्थितां शुक्राचार्यानें तिचा दृढाशय जाणून दाक्षिण्य परवश होवून बोलिजे तें पाहा.

(छंद) मनि तुझ्या कचोज्जीवनि स्वयें ।।
घन अपेक्षकी जाहल्यां सये ।।
क्षण भरिं तरीं नेत्र झांकिजे ।।
अनुपदीं कचा लागि देखिजे ।।

सूत्रधार : येणेरिती शुक्राचार्याचें वचन ऐकून देवयानीने लोचन व्दय झांकून सवेंच उघडितां समोर कचाप्रति पाहून आश्चिर्य मानून त्याला शुक्राचार्याचें क्षेमतदीय्य प्राणाज्जीवन हे दोनि प्रकार विचार जेताहेत पाहा.

दरु : राग. ?

तवतनु केविं सख्या क्षेम असे बरी ।। प्राण सख्या ।।
प. ।। तातो दर हें ।। दारीनासें ।। अनुल गुणा यथाकार असें बरी ।। १ ।।
चोज गमें हें ।। जीवीं थोर ।। मजनिगदीं ।। वृत्तसार असे बरी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीचें वाक्य ऐकून कच उत्तर देतो पाहा.

दरू : राग सुरटी. (आदिताळ)

ताताचें चातुर्य कांही ।। तत्वता परिस ।।
प. ।। आतां जें म्या अनुभविलें ।। आश्चर्यंकर सरस ।।
अनु. प. ।। झांकितां लोचन तुवां ।।
मजसीं भार्गव वाक्य वदला हें तेधवां ।। जें कचा सहसा ।।
भीति नाहींच त्वज्जीवा ।। माझीया दयें ।।
ते कैसें म्हणसी तरी ।। ऐकें सद्गुणार्णवा ।। १ ।।
जीवनंदना ये वेला ।। सीकवीतों मृतों ।।

ज्जीवन विद्या तुजला त्यावरी कुक्षी ।।
भेदूनि निघुनि तुं मला ।। या देहालागी ।।
जीववीं विद्याबलें ।। हे वत्सामंत्र कुशला ।। २ ।।

**वाक्य :** यापरि शुक्राचार्याचें वाक्य ऐकून म्या तदनुसार वर्तणूक केल्यानंतर— सुरापानामुळें इतका अनर्थ झाला म्हणून कोपारूढ होवून तुझ्या बापानें बोलिजेली त्येगोष्टी ऐक.

**(श्लोक)** जो अद्य प्रमृति पियील कुमती खोटी सुरा विप्रकीं ।।
धर्म भ्रष्ट घडेल तो झडकरी पापागला आणिकीं ।।
ब्रम्हत्येस वरिलनिश्चित यथा लोक द्वया भीतरी ।।
निंद्यत्वा प्रति पात्र होईल तथा हे तथ्य मद्वैखरी ।।

**वाक्य :** येणेरिती सुरापान करणारास पाहून दैत्यांस निकट बलावून त्यावरि कोपून बोलिला तो वचन संदर्भ ऐका.

**(श्लोक)** मूढ बुद्धि आधारूढ हो मग्दिरा ।।
झाड हो आईका वाड दुःख करा ।।
जीव भृहामृतोज्जीवनी सकुला ।।
पावला मत्कृपें पात्रकीं आगला ।।

**वाक्य :** इतःपर हा महानुभाव मत्तुल्य प्रभाव झाला. तुम्ही वृथा दोष भाजन घडलां या प्रकारें वैत्यास धिक्कारून मला आश्वासून हातांत निकटीं जावें म्हणुन आज्ञापून शुक्राचार्यानें आपण अंतर्धान पाविजेले. या नंतर त्वांनिरोप दिल्यानें सुखरूप आपल्या मंदिरी पावतो.

**सूत्रधार :** या प्रकारे कच बोलतां देवयानी उत्तर देते पाहा.

**(छंद)** परिस वाक्य हें दिव्य विग्रहा ।। करि यथा विधीं मत्करग्रहा ।।
धरूनी आसनी बैसलें तुझी ।। तरि विवंचना दुसरी त्यजीं ।।

**दरु :** राग पुन्नागवराली. (आदिताल)

कारे अव्हेर मांडिसी सखयारे माझा ।।
प. ।। मीं रतुनि तुझी संतत असतां ।।
निराकरण करणें अनुचित जा ।।
ताराधिपनिभाननाब्जा ।।
तारावें लौकरी करी माझा ।।
अनु प. ।। आधीपासूनी भलि ।। अधीक अधीक आपली ।।
हें धर्मातमयाकां गा ।। हे सवेलारविली ।।
येधवा तिल मात्र तो अपराध
मज कडुनी नसतां साधिसी तूं व्यर्थ वैर कीं ।।
साधु मौलिरत्ना गुण धामा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवयानीनें न्याय निष्ठूर बोलतां कच उत्तर देतो पाहा.

दरू : राग आनंद भैरवी. (ताल शापू)

बोल ठेवूं नको हा मजवरी ।। बोल ठेवू नको हा मजवरी ।।
(प.) ।। बोल ठेवी न हा ।। डोल दिधला नाहीं म्हणुनी (अनु प.) ।।
तातजो काव्य विख्यात तुझा मी त्याचे ।। होतों पोटसीं ठावी ।।
माज तुज हीं ।। आंतलूं सांग तरि सहजातकीं असूनी हि ।।
पातक्या सारिख्या अभिजात वंशी उपजुनी ।। १ ।।
कोप वृक्षाचे रोप खंडुनी नीरोप मज देई ।।
हे पद्म नेत्रे ।। पाप मार्गीसहसा ।। मी पडेना बाई ।।
शाप देवू नको तद्र ।। ताप योगें कांही ।। २ ।।

(श्लोक) पारावार तपासि जो गुण निधी पारागला आदरी ।।
हा रात्रि दिसहीं स्वतात बरवा आराधि जे सुंदरी ।।
दारा होईनमामकीन म्हणुनी मोहाचिये संगती ।।
ताराधीश मुखी नको गुणकलो सारांश हा नीगुती ।।

सूत्रधार : येणेरिती कचनानें खंडित उत्तर देतां देवयानी बोलते पाहा.

(श्लोक) माझी आसनीरासतां व्दिजवरा केली दया त्यागुनी ।।
आता कोपुनि शाप मी वितरिं तें आधीं तुला सांगुनी ।।
जी साटी सिणलासि ते मृत जना जीवातु विद्या बरी ।।
तूं ते गा न फलेचि यत्न रचिल्यां या नंतरें शंभरी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीनें शापितां क्रोधानें कच उत्तर देतो पाहा.

(श्लोक) कामातें वश होवुनी धरूनियां वामाधृता लौकरी ।।
वामाक्षी मज शापिलें सक्रत सद्राभासि कैशापरी ।।
हा माझा प्रतिशाप अैक सकला या माजी भूमंडला ।।
जामाता न मिलेल विप्र कविसी सामान्य ही आगला ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारें कचानें देवयानीला प्रतिशाप देवून ।। तुला मृत संज्जीवनी विद्या फलेना म्हणुन जें बोलिलीस त्याचें उत्तर अैक म्हणुन गुरू पुत्र पुन्हा बोलतो पाहा.

(श्लोक) साक्षान्मोक्ष प्रदर्शन क्षति जरि जगीं पुण्य कर्मे-ही हीं ।।
सद्बोध व्दारयोगे जासि सकल जना अर्पिती मुक्ती पाहीं ।।
अप्राश्य प्राश्य होतें जलधि जल जसें कीं धनाच्या मुखानें ।।
शिष्य व्दारातसी हे सफल वडल वो पूणू विद्या सुखानें ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारें बोलून तुझे पाणिग्रहण ब्राम्हण करीना क्षत्रियाची स्त्री होसील म्हणुन प्रतिशाप देवून वाचस्पति नंदने स्वमंदिरास येतां देवयानीहि स्वसभी प्रवेशतां तों विषपर्व दैत्येंद्राची दाई येते पाहा.

दरु : राग सावेरी (आदिताल)

येतसे पांहे ।। येथें दाई हे ।। येथ येत अजि ।।
हे तवलोक्करि ।। घेत तपासि ।। दैत्य सुतेची ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती दाई येऊन आप आपणात बोलती झाली की मज दनुज राजानें शर्मिष्ठेचा वृत्तांत आणावयास पाठविल्ले तरि ते तटाकामाजि खेलतें. किंवा देवयानीसी कलह करीत काल कंठिते, काही अगवत होत नाहीं. अैसे आलोचना करितां ते दोघी जणी शर्मिष्ठा देवयानी येतायेत पाहा.

**दरू :** राग आसावेरी ।। आदिताल ।।

कलह करिताचि ।। कवि नंदिनी दैत्य ।। तिलक पुत्री येती ।।
कलकंठी दोघी ही ।। गजगतीया पाहा ।। लोलनेत्री ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती दोघीही आल्यानंतर यांस किमर्थ कलह म्हणुन मूल शोधितां तटक तटीं वस्त्रे ठेवन दोघीनी पाण्यांत उतरून खेलतां तें वस्त्रें वायूनें येकंदर मिलविता. शर्मिष्ठेने देवयानीचे वसन अपहर्ल्यास्तिव झगडा लगता हें निर्धारून बरें वृक्षाछादित असून पुतत्तमासा पाहूं म्हणुन दाईनें तटस्तु राहतां तों देवयानी शर्मिष्ठे प्रति बोलते पाहा.

**दरू :** राग धन्यासी ।। आदिताळ ।।

मान्य मी तूजसये ।। सदा स्वयें ।। मान्य मी तूज स्वयें ।।
प० ।। तरूणि तुझा जो ।। तात तयाची ।।
गुरूची कन्या ।। औरसाची ।। १ ।।
वर्णिनी आणिखीं ।। वर्णू किति निज ।।
उन्नत पै निकी ।। २ ।।
वसन मदीय्यण हें ।। नेसणें अनुचित ।।
शशी वदनेया ।। साटीं तां निछित ।। ३ ।।

**वाक्य :** जे माझें वस्त्र धरणें तुला योग्य नव्हे. कां तरी माझा बाप गुरू तुझा जनक शिष्य. हा ब्राम्हणोत्तम. तो दैत्य.

**सूत्रधार :** येणेरिती देवयनीचें वाक्य ऐकून शर्मिष्ठा बोलते पाहा.

**(श्लोक)** याच्तांतकीं गौरव सर्व पांहे ।। व्दिजा पासीं सतत तेचि आहे ।।
त्वतातहीं ब्राम्हणयाचे साठीं ।। गुरू नव्हे तो गुरू गेतिं वाटीं ।। १ ।।
पूर्व देव दनुजासहिं राजा ।। या सटीं जनक थोरचि माझा ।।
तोकुदेव वरताततू झाकीं ।। मान्यता म्हणुनी सर्वहीं झांकीं ।। २ ।।
लोकीं नसेचि सखिये सम दृष्टि ज्यासी ।। तो ब्राम्हणोत्तम कसे म्हणवेल त्यासी
ढोणेद लावलि करित चितात गेहीं ।। गेलें त्वदीय्य गुरूचें वय आवघे ही ।। ३ ।।
या वरी विषमतें नवदावें ।। रत्न दाविन तुतेंच वदावें ।। वाक्य हें वदनुयां घन रागें ।। ते सखीस निगदी अनुरागें ।। ४ ।।

**दरू :** राग यरूकुल कांबोदी ।। आदिताल ।।

काय तयाचा तोरा ।। कथीं ।।
प० ।। जातीचा जो जाण भिकारी ।। ख्यात जगांत भटोरा ।। १ ।।
सांगत जो पंचांग समस्तां ।। चांगट श्रुभ ग्रह होरा ।। २ ।।
श्रून्य शिरस्क श्रुक्र तुझा गुरू ।। धन्य बरोबरि ढोरा ।। ३ ।।

सूत्रधार : या प्रकारें न करायाचा अपमान करून शर्मिष्ठेनें चिताकूपांत शुक्र कन्येस ढकलून स्वसद्मी प्रवेशल्यानंतर देवयानी खिन्न चित्त स्वस्थलो बोलते पाहा.

(श्लोक) न धरूनि माझा पाणी ।। शापहिं देवूनि त्यावरी आणी ।।
गुरू सुत कच तो गेला ।। परम मनी खेद त्यासटी ठेला ।। १ ।।
आतां ही अपमान दैत्य कुलिच्या नाथात्मजेनें कसा ।।
जातांना रचिला तळी ढकलुनी त्या तामसीनें असा ।।
घाताला करिती जरि तरि बरा होताच तो मार्ग हीं ।।
ताता कोण कथील येथ विपल्या माताच निःसंशई ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती अंतरंगी चिंतून निज सखि चातुर्य मंजरीं हीं आली नाहीं म्हणतां तों ते येते पाहा.

दरू : राग काफी ।। आदिताल ।।

वेष जीचा मनोहर असमान ।। दिव्य ।। भूषणी मंडित अति ।।
भासमानें ।। तेशनैः शनैच येते हाश्य मुखी ।। पहा ।।
तोषें भरूनि भार्गवीची खांसी सखी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती चातुर्य मंजरी आल्यानंतर ती पासीं शर्मिष्ठेचा गोष्टीचा तूं श्रमा करून स्व श्रमालि हरून तीणें आश्रमासी ये म्हणुन प्रार्थीतां देवयानी जत्तर देते पाहा.

वाक्य : अगे सखे, शर्मिष्ठेनें माझी अवस्था केली तें पूर्वोत्तर वर्तमान तुला अवगत नाही, यास्तव ऐसें बोलतेस. तें काय म्हणसील तर सांगते ऐक.

(श्लोक) संतापें चितिणें स्व वैभव घनार्हता मुळें लौकरि ।।
तैं तारूण्य मदें मला ढकलिलें चिताख्य कूपांतरीं ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीचे वाक्य ऐकून चातुर्य मंजरी सखेद बोलते पाहा.

(श्लोक) ताराधीश मुखीतदातव समुत्तारार्थ जो भेटला ।।
वीराग्रेसरकोण गेनिगदि जे सारांश तो चांगला ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती चातुर्यं मंजरीचें वाक्य ऐकून देवयानी जाब देते पाहा.

वाक्य : अगें सखे म्या चिताकूपांत मग्न अस्तां तों आकस्मिक येका राजयानें शिकारि खेलत खेलत सन्निधानी येवून दयार्द्र चित्त होवून मला प्रश्न केला तो प्रकार सांगतें ऐक.

दरू : राग केदार गौला ।। अटताल ।।

कोण तूं सुमकोमलांगी ।। टीकोनी ।। आहेसी ।।
(प०) ।। राण हें घोर राजीवेंक्षणें ।। स्यान क्रूर मृगासि दुर्धर ।।
जाण येथें कली असी ।। अनु. प० ।।
ललित तांम्रन रवी यौव्वन शालीनी ।। नलिनानने देवी ।।
अद्भुत तुझी ।। ललना गणी ठेवी ।। पाहातां ।।

विलसित मुखां भोजविलय पावला श्रम ।। पळुनि गेली भूकताहन ।।
पर्लहि नलगुनी लोक सुंदरी ।। १ ।।

**वाक्य :** या प्रकारें त्या रायानें प्रश्न करितां म्या उत्तर दिलें त्यें ऐक.

(श्लोक) जो देवी हतदानवासि अपुल्या विद्या बलें जीववी ।।
श्रीमद्भार्गव वंश भूषण जगीं प्रख्यात नामें कवी ।।
ज्याचे शिष्य असंख्य लक्ष दनुजीं अध्यक्ष दक्ष स्वयें ।।
त्याची मी निज नंदिनी मज कसा तूं नेणसी निश्चयें ।। १ ।।

**वाक्य :** येणेरिती माझा वृत्तांत ययाति रायास सांगून त्याचें पूर्वोत्तर वर्तमान विचारितां त्यानें प्रत्युत्तर दिलें तो प्रकार सांगतें ऐक.

**दरू :** राग मांजी ।। ताल शापू ।।

मर्द येक जो जगीं तो मी पहा ।।
(प०) ।। मर्दिता वैरि यासी महा ।।
(अनु. प०) ।। मन्मथ पुतला ।। सन्मतिचा सिंधु भला अवो ।।
सळातिचा सिंधु भला ।। मनोहर कामिनी पाहा ।। १ ।।
नाहुष विख्यात ।। माझें नावतरी ययाति हे ।।
नरपती मंडन महा ।। २ ।।

**वाक्य :** येणेरिती त्या रायानें स्ववृत्तांत सांगून 'तूं कां चिंता कूपांत मग्न झालीस' म्हणुन मला पुसतां हा शर्मिष्ठेचा धर्म ऐसें म्या सविस्तर वृत्तांत सांगतां त्या रायानें माझें दक्षिण पाणिग्रहण करून चिंता कूपांतून काहडितां मदीय्य चित्त त्याचे ठाईं प्रवृत्त घडून 'तूं पति हो' या प्रकारें म्या या चिंता 'तूं ब्राम्हण कन्या मी राजन्या' यास्तव उभयतास विवाह युक्त नव्हे म्हणुन तेणें अव्हेरून गेल्या क्षणापासून माझें अंतर अत्यंत विव्हळ झालें.

**सूत्रधार :** या प्रकारें सखीस सांगून देवयानी विरहाभिनय करिते पाहा.

**दरू :** राग मांजी ।। ताल शापू ।।

हरिहर करूं काय आतां ।। हे सखी ये ।।
(प०) हरि सर करूं काये ।। तरूणी सांग पांहे ।।
वरद वल्लभ तो ।। वारि जाक्षी नये ।।
(अनु प०) क्षण मज वाटतो ।। जणु युग कोटिसा ।।
तनुधन आशा ते मनि नाहीं अणु भरिनावतों न पडेकीं त्याच्या ।।
कवण धरूनिया ।। विपवि निज प्रिया ।।
आणिक गतीनसे मज ।। अनुपमे तुजवीण समयीं या ।। १ ।।

(श्लोक) सलतकिसलयाची शेज म्हणसील कैसी ।।
असि असि दलशय्येसी असह्यया अपैसी ।।
शशिकर करवाला सारिखे त्रासिताती ।।
फणि समधन भारी हारहीं भासताती ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती चातुर्य मंजरीस स्वविरह वेदना निवेदून श्रमासि पात्र होवून शुक्राश्रमास येत नाहीं. या अनवद्य उद्यावनांत राहते. म्हणुन ययातीचे ध्यान धरून येका रसाल तरू तलीं बैसली असतां ययाती भूपति येतो पाहा.

**दरू : राग सुरटी ।। आदिताल ।।**

ययाति भूपति येतशे जों ।। दयादि गुण सिंधू ।।
(प०) जयासि सरिन या जगि दुसरी ते ।।
श्रिया ज्वलितरा ।। जयासि मंडन ।।
(अनु प०) कनकसदृश शोभन ज्याचा तनु ।।
वर्ण अनुपमानाखिल मोहन ।।
मनसि ज्यात देखुनि रूचि घन ते ।।
मनिच दंग बहु जाहला ।।
दनुतनुभव दंडार्थ जो सुर गण कृत प्रार्थन नहुषाचा ।।
तनुज वीर कुल केसरि अद्भुत विदारित दारूण रिपुजन ।।

**सूत्रधार :** येणेरिती विदूषका सहित नंदन आल्यानंतर चिंताक्रांत त्याचें अंतरंग वलखून विदूषक विनयपूर्वक बोलतो पाहा.

**दरू : राग यमुना कल्याणी ।। आदिताल ।।**

राया विव्ल आहेसी ।। कां या समई कथीं ।।
**प० :** सोम वंशोद्भवा भासे ।। काम पिसें लागलें से ।।
कामिनी कोण ते इष्ट यामिनो बिबली अथीं ।। १ ।।
दुर्लभ असल्यानंतर वल्लभा भेटवीन ते उल्लेख सांगिजे अपला उल्लासुनी भूपति ।।

**सूत्रधार :** येणेरिती विदुषकाचें वाक्य ऐकून ययाति भूपति उत्तर देतो पाहा.

**दरू : राग भैरवी ।। ताल झंप्या ।।**

अनुपनीतां नरां अतीसु दुर्लभ पाहा ।। अनुपमा श्रुति जाणवेजी ।।
आणि ।। अनुदिनी देहात्मवाद पर मुक्तीसी ।। अनधिकारी आज्ञजेवीं ।।
अणुमात्र धर्म तो न करितां अप्राप्यमनुजासि सद्गतीजेंवी ।।
प्राज्ञदनुज गुरू कन्यकादुर्लभा मज तसी ।।
अनवद्य दिव्य तनुदेवी ते ऐक ।। १ ।।

**वाक्य :** परंतु माझें अंतःकरण तीचे ठाई अत्यंत आसक्त झाल्यास्तव दैव योगें तीचा योग घडेल साच वाटतो.

**सूत्रधार :** ऐसें ययाति रायानें बोलतां देवयानीसी तुला सरस सल्लाप कांही झाला काय म्हणुन विदुषकानें पुसतां तो उत्तर देतो पाहा.

**वाक्य :** अरे विदुषका म्या यदृछेनें शिकारी खेलत खेलत उद्यानी देवयानी निगट जातां तीणें प्रीतीनें मदीय्य वृत्तांत आद्यंत विचारिला तो प्रकार — सांगतो ऐक.

दरू : राग सावेरी । ताल शापू ।।

राजसा तूं । राजया कवण ।।
राजीवदल नयना हे । सुकुमारा राजीवदल नयना ।।

(प.) साजसी बहु स्मरतसा बरें ।। आजि देखुनि तूज गमते ।।
सज्ज दसरा दीपावली ।। माझी या मना ।।

(अनु प.) सकल लावण्य समुदितकीं ।। सद्‌गुणां बुधिया तुझ्या ।।
प्रकटतनुरूपेंचि निश्चित ।।
प्रथित वीर्यें महा भुजा निखिल देवहि थोर थोरकीं ।।
सौख्य निधिवरबाहु जान करिती ते साम्य आपुलें चंद्र बिंबानना ।। १ ।।
कवण धीर तूं विजनी येथें ।।
पावलासि यशोधना प्रवरबलसंदोह केवल भावसी
मन मोहना श्रवणि उत्कट आस बरवी ते उदित
अथीया मनानिववि वृत्तालागि सांगुनि कुंदा भरदना ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती वर्तला वृत्तांत सांगून विरहातुर ययाति राज विदूषकाची प्रार्थना करितो पाहा.

दरू : राग शाहना । ताल शापू ।।

कामिनी ते वेगें आणि । वाम लोचनी ।।

(प.) कामाची साहवे नाहीं । कांही जाचणी स्वमती ।।

(धुनु प.) गिलुनि जो राहुनें पुनरटी उगलिला सीतांशु म्हणुनी ।।
कालिमाते विखचि जडली वीकारवाणी हे ज्वालशेया साटी
तत्कर पोळविति जणु निरतिशयकी ।।
बोलती हरिणांक शशि हें फोल सर्वही वचन पाहे ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती विदूषकासीं बोलून ययाति भूपाल बोलतो पाहा.

(छंद) कुवलयात्प तो काल कूटहीं । अवलि जावली मानि जे स्वयें ।।
दवशिखी परी सटीं पाहा । धवल भानुतोताविती महा ।। १ ।।

(आर्या) विषनिधि गर्भी होता विषकंठाचे शिरीं वसे पांहे ।।
वासुकिचा सहवास रावीं दीसहि तयामुळें आहे ।। १ ।।

(श्लोक) गिलुनि उगलिला जो राहुनें पर्वकाली ।।
विखतरि वतनूसीमाखले सर्वकालीं ।।
दिसत जल नबिंबी यासटीं इयास रेखा ।।
शहा मृग म्हणणें तें भ्रांति अंत्यत देखा ।। २ ।।
मुधावदति जापरी जनलघूपला शर्करा ।।
सुधाकर शशि असा न जनवाद तैसा खरा ।।
सुधा सदृश सत्य पैं विरहद णाखारहा ।।
सुधागम तयामुळें जन प्रवाद तोंहीं पहा ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती चंद्रासी निंदा करून ययाति राज कष्टी होतां विदूषकानें बरें शुक्राच्यार्यास सांगून विवाह कार्याची घटना करितों म्हणुन तेथून निघतां ययाति हीं वनविलास विलोकित फिरतां तों दैत्य गुरू येतो पाहा.

(दरू) : दानव गुरू येतो पाहा ।।

सूत्रधार : येणेरिती भार्गवानें येवून जी साटीं मी वनप्रांत हुडकीत आलों ते दैवाधीन देवयानी येथेंच बसली आहे. ऐसें बोलून अंतरी संतोष पावतां देवयानी येते पाहा.

(दरू) देवी येतसे पांहे । देवयानी हे ।।

सूत्रधार : येणेरिती खिन्न चित्त देवयानी येतां तिला बिलोकून दैत्य गुरू बोलतो पाहा.

दरू : राग आनंद भैरवी । आदिताल ।।

रूसलीस देवयानी आइ तूं । रूसलीस ।।

(प.) कासयासी सांग ।। पुसतों आतां काहीं ।।
उणीव तुज काय ।। तन येते आहे दनुज वैभव सारें ।।
गणिजें आपुलें हें धणिहीं जरि तुझ्या मनी ते
असलिया अणिक दुर्लभ विषई अणुनि तें अरपितों आई ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती जनकानें विचारतां देवयानीनें शर्मिष्टेचें वृत्त सांगून निश्चित मनोभिप्राय बोलिजे तो पहा.

(छंद) दनुज नंदिनी वंदुनी पदा ।। अणिकदास्यहिं स्वीकरी तदा ।।
जनक जी घरा येइन स्वयें ।। मनीं न दूसरी कामना अहे ।। १ ।।

वाक्य : तूं म्हणसील शर्मिष्ठा बलिष्ठ दैत्यराज नंदिनी तूं निर्बल ब्राम्हण कंन्या तुझें दास्य तें कैसें करील याचें उत्तर ऐक.

(श्लोक) ब्रम्ह बला पुढतीया ।। बलत्येंनचलेचि सत्य कोणाचें ।।
नहुषय दर्शी साक्षी ।। तुज हीं तें वृत्त ठावुकें साचें ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीनें बोलून हट्ट धरितां दैत्य गुरु उत्तर देतो पाहा.

(श्लोक) क्रोधासमान दुसरा जगि शत्रु नाहीं ।।
आणि क्षमेसम नसे सुख हेतु कांहीं ।।
टाकूनिया सटिं मनातिलकोप आई ।।
येयीं घरासि न पडूनि वृथाचि दाई ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शुक्राच्यार्यांचें वाक्य ऐकून देवयानी बोलते पाहा.

दरू : राग फरजू । आदिताल ।।

जीवनी आशा नाहीं मज । जीवनी आशा नाही ।।
प. ।। उर्मट बोणे शर्मिष्ठेचे मर्मी सलते पाही आतां ।। १ ।।
हे काशि दुर्दशा । अैकुनि जैजय्ये काकुलती तुज कांही अतां ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवयानीचा दुराग्रह देखून ममता पासीं बद्ध होऊन वृषपर्वा विषई शुक्राची बुद्धि वक्र होता तोहिं गुरूचें समाधान कराया कारणें येतो पाहा.

**दरू :** राग व्यागडें ।। आदिताल ।।

येतो वृषपर्व दैत्येशहा ।। प. ।।
जो मजयाचा तो मुखीं नवदवेस्तोम बलाचा महा ।। १ ।।
भोंवते दानव ।। भार यमापरि केवल भीम पराक्रम पहा ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती वृषपर्वयानें येवून आपल्या गुरूचे चरणाविंद वंदून क्षमापन करिजेते तं पाहा.

**(श्लोक)** जैसा पुत्र तसाच शिष्यहिं नशे व्यत्यास येथे कदा ।।
या साठीं क्षमि जे दया धरूनियां अन्याय पुण्यास्पदा ।।
शर्मिष्ठा कृतदोषलेशहि मनी तां नाणिजे देशिका ।।
सर्वज्ञा अन्नय प्रदानमयकीं आता मला देशिका ।।

**सूत्रधार :** येणेरिती दैत्येंद्रांचे वाक्य अैकून शुक्रचार्यी प्रत्युत्तर देतो पाहा.

**(छंद)** मगज फार हा तूजगा अला ।। नगणसी म्हणुनी कदामला
प्रकट सांगतो अैक तें बरें ।। अगदि आपुले वृत्तकी त्वरें ।। १ ।।

**(श्लोक)** दैत्यीं सत्य कभीष्ट जाणुनि तुझें पापेकनिष्ठा मनी ।।
विद्यार्थी कच तो कधीं निवटीला जो विप्र चुडामणी ।।
कन्येनेंही तुझ्या दुरूकी कडुनी त्रासूनियां मत्सुता ।।
कूपा भीतरि लोटिली समजुनी माझे स्तुली तुछता ।। १ ।।

**वाक्य :** इतः पर देशांतरांस जातो.

**सूत्रधार :** येणेरिती शुक्राच्यार्यांने वक्रोत्तरे बोलतां शक्राचा शत्रुसमयवदतो पाहा.

**दरू :** राग सौराष्ट्र । आदिताल ।।

देशिकेंदा तुवां देशांतरास जातां ।। (प.) ।।
हे सर्व संपदा कासया मज आतां ।।
अनु.प. सागरि रिघन मी ।। लागलीच भारें ।।
आगलीं की सिला ते गला बांधूनीं ।।
वेगें पर्वता वरि हिं वेधूनी तलीं पडतों ।।
हे घडी विलोकावें हे मिथ्या नव्हे वाणी ।। १ ।।
सकल साम्राज्यासीं सगट दारासुत प्रगट टाकुनी यासी परमार्थ
आलया शिखिहीं पेटवूनीया सिरेनत्या भीतरी
अकलंका परी न धरीं आस देहाचिया ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती वृषपर्वाने लंति करिता भार्गव निर्दाक्षिण्यें बोलतो पाहा.

**(छंद)** जलधि माजि तूं रीघ पर्वता ।। वरिही वेधुनी की पडे स्वतां ।।
वसुमती तलीं कीं प्रवेशला ।। असुर नायक की वसें उगा ।। १ ।।

**(श्लोक)** आल्या विना देवयानी मी नये तुझीया पुत्रवत्सावीण
तसी धेनू हा भाव हिं तसा बरा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती कवीनें खंडित जाब देतां देवयानी निकट सपरिवार वृषपर्वा येवून गर्वातील तीचे चरण वंदून 'गुरूकन्ये तुझे अभीष्ट कृत्य सांगून मातें कृत-कृत्य करीं' ऐसे प्रार्थिता ते प्रत्युत्तर देते पाहा.

(श्लोक) कन्या पूर्ण सहस्त्र घेवुनि सवें अन्यादृशासंपदा ।।
शर्मिष्ठा मम दास्य सादर करो धर्मातिगादुर्मदा ।।
हस्ती अर्पित ज्याची या निज पिता मातें तयाच्या घरा ।।
मस्ती टाकुनी येईजे अणी इथे मानूनि माझी गिरा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीचें वाक्य ऐकून दैत्य राजानें धात्रीचे मुख पाहता ते सत्वर शर्मिष्ठेसह वर्तमान देते पाहा.

दरू : राग जुजावंती ।। आदिताल ।।

येते वृषपर्व नंदिनी ।। रति स्पर्धिनी ।।
प. ।। जे तवं पाहतां नित्य ।। नूतन सुख वर्धिनी ।।
अनु. प. ।। नाम जीचें शर्मिष्ठा ।। नेमेंशेवी धर्मिष्ठा ।।
कामिनी गणि वीशिष्टा ।। श्रीमती जन्म शिष्ठा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठा येवून स्वजनकाचा मनोभाव जाणून इतःपर हें प्रबल बाधक सुटत नाही हें निर्धारून देवयानीस नमस्कार करून विनय पूर्वक विज्ञापना करिते पाहा.

(श्लोक) हजार दासीसह देवयानी ।। मी शेति तुज यथार्थ मानी ।।
जेथें तुतें अर्पिल तात पाहीं ।। तेथें सवें येइन सत्य मी हीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्टेचें वाक्य अैकुन मर्मोद्घाटन पूर्वक शुक्रकन्या बोलते पाहा.

(श्लोक) भटाची भाटाची तनुज तनये मी निजसुता ।।
कसें मद्धाशयाला करिसिल सदा गर्व निरता ।।
प्रदाता जोस्तव्य प्रबल दिजिजांचा निजधणी ।।
तयाची कन्याही असुनी जगिं नारीजनमणी ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीचे वाक्य अैकून शर्मिष्ठा बोलते पाहा.

(श्लोक) जनक वचन साचें जे याच साटीं ।।
घनतर सखिलज्जा नीट बांधूनी पाठीं ।।
निरत सतत झालें तुझिया दास्य भावीं ।।
निरूपम गुणशीले युक्त हा धर्म भावी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेची गोष्टि ऐकून देवयानी संतुष्ट होतां तिचा मनोधर्म ययाति रायावर आहे म्हणुन धात्रीनें मनिचें मर्म शुक्राच्यार्यास सांगता त्यानें अंगीकार करितां वृक्षाआड असून रहस्यार्थ सर्वही ऐकून विद्रषकानें संतोष पूर्वक नहुषात्मजा पासीं निवेदितां तो हर्ष निर्भर येतो पाहा.

दरू : राग सुरटी ।। आदिताल ।।

ययाति भूपति येतसे जो ।। दयादि गुणसिंधू ।।

प० ।। जयासि सरि न या जगी दुसरि ते ।।
श्रियाज्वलि तरा जयासि मंडन ।। अनु. प० ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययाति भूपति येतां त्याला विलोकून देवयानी बोलते पाहा.

**(छंद)** जैंई अडांत हे देह लोटुनी ।। ऐक निष्टली दैत्य नंदिनी ।।
धरूनि मत्करा काढिले तई ।। नर वरें यया जाण निश्वई ।।

**(श्लोक)** अन्यानें मम हस्तहात धरिलां कन्यापणी तों कई ।।
येणेंची मज सान्निधीं करूनियां येणें नरेंद्रे तई ।।
पाणी दक्षिण दक्षिणें कवलिला राणी महासंकटी ।।
राणिया चिंत होतो म्हणुनी मी नाणी दुजातें दिष्टी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवयानीचें वाक्य ऐकुन ययाति राया प्रति विलोकून दैत्य गुरू बोलतो पाहा.

**(छंद)** नर वरा तुतें जाण मत्सुता ।। वरूं असें पहा सिद्ध तत्वता ।।
तरि न लावुनी वेल सर्वथां ।। करीं करग्रहा ईचियां अतां ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती दैत्य गुरुचें वाक्य ऐकून ययाति उत्तर देतो पाहा.

**(श्लोक)** वर्णसंकरज दोष अहाहा ।। त्वत्सुता परिणये मजला हा ।।
नित्य झोंबल ययास्तव गोष्टी ।।
हे न उच्चरीं कदापिहिं वोष्टि ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययातीचें वाक्य ऐकून शुक्र बोलतो पाहा.

**(श्लोक)** अधर्माचा वारा तुज सुकृत वारां निधिकही ।।
न लगे हा सारांशचि समज सारास्व हृदई ।।
वरी दिव्याकारा म्हणुनि अविकारा मम सुता ।।
मदुवती आधारा धरूनि मनिधाराल विनता ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती शुक्र बोलता महर्षि वाक्यचि धर्माधर्मास प्रमाण इत:परी मला संदेह नाहीं. म्हणून ययाति रायानें देवयानीला अंगिकार करितां सपरिवार दैत्य गुरुनें निज मंदिरी प्रवेशतां देवयानी सहित ययाति रायानें पुरंदरा समान निजपुरीं राहून उद्यानी शर्मिष्ठेंस ठिवून शुक्रकन्येसीं क्रीडा करित अंत:पुरी काल क्रमितां वाण पर्वणीचा सौदर्योक्तर्ष आठवून तन्मय चित्त घडतां तों यदृछेनें दैत्य कन्या येते पाहा.

दरू : राग जुजावंती ।। आदिताळ ।।

येते वृषपर्व नंदिनी ।। रति स्पर्धिनी ।।

**सूत्रधार :** येणेरिती शर्मिष्ठा येवून सखीस पाहून सखेद बोलते पाहा.

**(श्लोक)** प्रसवलि कवि कंन्या दिव्या येका कुमारा ।।
दिसत विमल तेजें तुल्य जो कां कुमारा ।।
रमण अझुनि माझा या शरिरानसे कीं ।।
गमत उभय लोकीं भ्रष्ट झालेंच शेवीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती सखीसीं बोलून अशोकादि वृक्षास विलोकून शर्मिष्ठा विरहाभिनय करिते पाहा.

दरू : राग यमुना कल्याणी ।। आदिताल ।।

अशोका निज नामापरी करी ।।
अशोकात्मा माझा सुखोमन तो दावुनि नयनी ।।
यशोधन नर राजा ।। १ ।।
रसाला देखिला काय ।। रसाला प्रियसाचा ।।
कसाला सोसूं मी सांगा ।। कसा या कामाचा ।। २ ।।
सन्नाहें येथें आला प्रसन्नान व निज प्रणा ।।
पुन्नाग तो कोठें गेला ।। पुन्नागसुविधान ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती वृक्षादिकास पुसतां तेहीं ।। प्रत्युत्तर न देतां पुनः सखीस विलोकून बोलते पाहा.

(श्लोक) जैसें निष्फल चांद विजनिचें कीं पापियाचें जिणें ।।
कीं लोभ्या सहसाजणें अविहित्र कर्मेंचि कीं साधणें ।।
कीं भवतीविण वांचणे धण असत्पात्रीं तसें वेचणें ।।
कांता वीण जिणें तसें युवतिचें धिक् धिक् वृथा पैं दुणें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती आत्मनिंदा करून सखीस पाहून शर्मिष्ठा बोलते पाहा.

दरू : राग नवरोज् ।। आदिताल ।।

साजणी कां नये ।। राज राज तो लौकरीं ।।

प० : साजिरी वेल परिसकीं बरी ।। आजिची सुमन मृदुलुशय्ये ।। अनु. प. ।।

वाक्य : तूं म्हणसील कीं ययाति राजा कोण तूं कोण आपुल्या पतिप्रमाणें पर पुरुषास भावून त्याला बाहून कां कष्टी होतेस ।। तरि निज मानसींचा नहुषात्म जासवरिलें आहे यास्तव तो अन्य पुरुष नव्हे ।।
हाचि –– अंतर्भाव ऐका ।।

(दरू) दुसरी या ठाईं नाहीं ।। कुशले आसक्ति कांहीं ।।
वशमी अपणेचि बाई ।। जाहल्यें निशउभीं ।।
कुसुम बाणाची पाहीं ।। दुर्वार वृष्ठि ।।
नसरे रात्रि दिसहीं ।। शशिहि मिलुनि त्यासीं अगाई ।।।
विषम पावक समान करीं अई ।। पसरितो ताप बहुत देहीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेने अंतःकर्णात चिंतिता ययाति भूपति येतो पाहा.

(दरू) ययाति भूपति येतशे जो ।। दयादि गुणसिंधु ।।
(प०) जयासि सारि न या जगिं दुसरि तें ।।
श्रियाज्वलित राजयासि ।। मंडन ।। अनु. प. ।।

सूत्रधार : येणेरिती ययाति भूपति आल्यानंतर त्याला विलोकून शर्मिष्ठा – बोलते पाहा.

(श्लोक) चकोर तृष्णा समऔं उदेला ।। जैसा शशि त्यापरिस केला ।।
यावातुवां या स्थलि दैवयोगें ।। हें रज्जवी अंतर काम भोगें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेचे वाक्य ऐकून ययाति भूपाल उत्तर देतो पाहा.
(छंद) सकल धर्महीं जाणता सखी ।। न करीं मी तुझा अंगिकारलीं ।।
मुखरता पुर हे वृथा अतां ।। शिकविसी कशालागि दुष्टता ।।

सूत्रधार : येणेरिती ययाति भूपालानें अव्हेर करितां शर्मिष्ठा प्रार्थना करिते पाहा.

दरू : राग केदार गौल ।। आदिताल ।।

अव्हेर केल्या आपण ।। आहे नति फोण ।।
(प०) सहसा उपेक्षूं नको ।। सखया घडूनि कठिण ।।
(अनु. प०) सरसा करां बुज सोडुनि तुजला ।। करित असं मी स्वामी प्रणती ।।
नर मृगेंद्र नहुष राज तनया ।। दे ऋतु स्वीकारूनि विनंती ।। १ ।।
(श्लोक) मनी काम जो इष्ट ज्याज्यास आहे ।।
करीं तों परीपूर्ण तो सत्य पांहे ।।
असांता नगारा अगारा जनागा ।।
पिटूनिकसा मांडिला आजि नागा ।। १ ।।
वाक्य : यास्तव प्रतिज्ञातार्थ यथार्थ कराया साटीं मजवरी अनुग्रह करावा ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेचें वाक्य ऐकून ययाति भूपति उत्तर देतो पाहा.
(श्लोक) यदा प्रभृति देखिलें सरस रूपडें हें तुझें ।।
तदा प्रभृति लेखिलें न जगीं तुल्य यातें दजें ।।
सदा म्हणुनी रेखिलें हृदय भित्तिके भीतरी ।।
उदारदिष्टी रेखिलें परिन तृष्टिया अंतरी ।। १ ।।
वाक्य : ऐसे असतां कां अव्हेर करितोस म्हणसील तरी तोचि प्रकार सविस्तार ऐक ।।
(छंद) अधनसे असत्याहुनी दुजे ।। अगदि शास्त्रिच्चीं हें भक्ती गुजें ।।
नगल सत्कुंचे यासटी तुतें प्रकट आदरूं चित्त हें भित्तें ।। १ ।।

दरू : आहरी राग ।। आदिताल ।।

हे रमणी हें हृदई ।। सार वमनी ।। प० ।।
फार मज तुवां प्रार्थीलीयां हे ।।
तारकाधीश्वराननाजे ।। मारपिडा अनिवार
मानसीं न साहूनियां मानिनी ।।
(अनु. प०) कमललोचने चारुहासिनी ।। अमित गुणाची रासी ।।
अमरराजरिपु नंदिनी तूं हें ।। अवगत कीं अम्हासी ।।
न मज तुजवरी प्रीति पंखू ।। तिमिर पुंज समकेसी ।।
सुमति मूल त्याचें ही वदतों ।। सरस आतां परियेसीं ।। १ ।।

हर्षविमत्कुमरीसीं तूं आर्हविशि रति सुख दानें ।।
वार्ष पार्वणि पालम मात्र चिवत्सा करीं बहुमानें ।।
स्पर्शली यतिस नहुषा परि तुज ।। पतन घडले नियमानें ।।
आर्षशुक्र शासन या परिचें आहे मजला जाण ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती अनृतवादास भीवून ।। ययातिनें निराकरण करितां ।। शर्मिष्ठा बोलते पाहा.

वाक्य : रायासमय विशेषी अनृतोक्ति बाधक नाहीं ।।

(श्लोक) ननर्म युक्तं वचनं हि नास्ति ।। नस्त्रीपुरान्नविवाह काले ।।
प्राणात्यये सर्वधना पहारे ।। पंचानृतान्या हुर पातकानि ।। १ ।।

वाक्य : यास्तव या समई अनृत बोलिल्यानें दोष लेश नाहीं ।। उफराटें हे गोष्नि केलियानें बाधक आहे ।। तेंचि ऐक ।।

(श्लोक) ऋतुकांनी प्रार्थिता हीं ।। अव्हेरी जो स्त्रीयेसकीं ।।
भूषणहत्या तयामाथां बैसेनि स्संशये निकीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेचें वाक्य ऐकून ययातीनें अंगीकार करून आनंदानें बोलिजे तें पाहा.

दरू : राग असावेरी ।। आदिताल ।।

संतोष बहु झाला ।। साखिये चित्ताला ।।

(प०) अतंर मनोरथ ।। आतां फलला ।।

(अनु. प०) अमृतलाभतां देवी ।। अमरी हर्षिजे जेवीं ।।
वाम नेत्री सस्यावरि जेंवी ।। वरि वर्षतां वारिद तेंवी ।। १ ।।
नागांगनेचे वाणी ।। रागिट देवयानी ।।
चांगते मना लागि न इष्ट ।। सांग तसें मी सुंदरे स्पष्ट ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती शर्मिष्ठेसी बोलून देवयानीस हव्हेरून ययाति राज तीसीच आसवक्त असतां दैव योगें दैत्य कुमारीला कुमारत्रय जन्मतां येके दिवसीं तीथेंही मूलें वाटकोल खेलायास जातां नहुषात्मजाने त्याचें स्मरण करितां तीघे हीं कुमार येताहेत पाहा.

दरू : राग बिलहरी ।। आदिताल ।।

घनरूचिरांगक अनुपमानते ।। तनय तीघे येति नृपाचे ।।
जनक सान्निधि अनुरागें कुण कनकामश्रीकरसाचें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती तीघेही ।। कुमार आल्यानंतर शर्मिष्ठेनिकटी नहुषात्मजाने त्यांचे लालन करीत आनंद समुद्र मग्न होऊन या समयीं देवयानी मात्र येऊ नयें ऐसें चिंतिता देवयानी येते पाहा.

दरू : राग पुन्नागवराली ।। आदिताल ।।

येते भार्गव दुहिता ययाति दयिता ।। प० ।।

जे तंत्र तवं कोकिलवाणी ।। शात कुंभनिभवाणी ।।
प्रीती पात्र बहुशाल कवीची ।। पातली सुंदर काय रतीची ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवयानी येतां ययाति रायास विलोकून शर्मिष्टा बोलते पहा.

**दरू : घंटाराग ।। आदिताळ ।।**

चिंताव्याली अकस्मातर ।। कासया जडली ।।
अंतरंगी प्राणेशा भली ।।
(प०) संतत पोहद असतां ।। संतोषाब्धि माजी बाली ।।
(अनु प०) सुकलें आननां भोज ।।
सारसलोचना फार सखवारा उन्हासहीं सरला साचार ।।
उकली खेदाची कैसी ।। उसलली अनिवार ।।
न कले सर्वथां कांहीं ।। निजमनीचा निर्धार ।। १ ।।
काय व्यथा उद्‌धवली ।। कायक साटवेनासी ।।
नायका कोणाचा पोटीं धाक वाहसी ।।
हाय हाय विघ्न कैसें हें आलें जी सल्लापासी ।।
राहिना मानस उगें ।। राजसा सांग हे तूसी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती शर्मिष्ठेनें पुसतां ययाति भूपाल उत्तर देतो पाहा.

**दरू : राग मध्यमावती ।। आदिताल ।।**

दायिजिणी तुझी खोटी ।। हे येतसें पांही दिठी ।।
नायिके कोणाची गोठी ।। साहसीण विजवटी ।। १ ।।
घाय्रानूपुरें पायीं ।। घातली नाहींच पाहीं ।।
राग बोलवेना कांहीं ।। सांगे यासि करूं काओं ।। २ ।।
वाटारिलें नेत्रव्दय ।। वाटे गिळिल लोकत्रय ।।
कांटे देहीं येती भयें ।। कोठें दडूं सांग सयें ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती शर्मिष्टा ययाति रायांसि बोलत असतां.
येणेरिती देवयानी येवून भर्तारा निकटीं शर्मिष्ठेचे तीथें नंदनास पाहून कोपानें तप्त होवून त्यासी बोलते पाहा.

**दरू : राग सुरटी ।। अटताल ।।**

चांगट कुहमार हो ।। चारू संवदतां ।।
(प०) सांगिजे तरि मला ।। शीघ्र तें निजपिता ।।
(अनु प०) सरसनाब दसाखरहीं देतें आणि बरवी साओंही दुधावरिल ये क्षणी ।।
चुरमा लाडुहि मधुर परम बहुसाल ते त्वरित अर्पिन आतां तुमचियां पाणी ।। १ ।।
कवण नामहि आणि ।।
कवणा गोत्रान्वयें प्रवर त्याचे भले कवण निश्चयें ।।
जवलि कीं दूर तोनि वसतो सत्य हे ।।
अवघेही मज पुढें अद्य बोला स्वयें ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीनें पुसतां बोलकानी मौन धरितां कारे आपुला जनक ऋषी ब्राम्हण म्हणुन सांगानात ऐसें दाईने संवदतां तर्जनीनें ययाति रायास दाखवून तीघेही कुमार सांगताहेत पाहा.

दरू : राग मांजी ।। ताल झापु ।।

जनकहाचि अमचा जनक हाचि ।।

(प०) जो नेर्हटि वसे साचा ।।

(अनु प०) ब्रम्ह ऋषि म्हणवुनी बोलियलों ज्यासि आम्ही अपुलिया वाचा ।
मावुलि तो उभी आहे जवलिच पांहे ।। अवघा विस्तार दोघांचा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती दुद्यत्र अनु पूर्वोत्तर वर्तमान सांगतां आज्य सिक्त अग्नि शिखेपरी कोपानें तप्त होवून श्रुक्रनंदिनी शर्मिष्ठेस निखंदून बोलतो पाहा.

दरू : राग वृंदावन सारंग ।। आदिताल ।।

गरतींचे लेंकी भलिगे ।। चारूशील निलनिलये ।।

(प०) दारूण घर घेणीच केवल ।। दुरात्मदानव नायक तनये ।।

(अनु प०) कोण कान्त तूझा म्हणवुनियां ।। करितां प्रश्न असातां ।।
तों न नीट अवगत मातें उत्तर देवुनि सहसा ।।
प्राण नाथ तो नृपति बरा ।।
अनुदिनहिं करूनि पिसा भुक्त जाण काम पर घडुनि अवो अति ।।
चपल आत्मपति सापापिणीं ।। १ ।।

(श्लोक) कोणाचे सुत हे म्हणुनि पुसतां शोणाधरे म्या आधि ।।
मानी हे ऋषि पुत्र उत्तर असेतां नीट दिल्हें अताधि ।।

वाक्य : त्या ऋषीचें नाम गोत्र काय म्हणुन म्या पुनः पुसतां बाव्रलावणी केली तेहीं ऐक.

(श्लोक) त्येजाचा पुतला विलोकुनि मनी मी जाहलें कीं पिसी ।।
त्यामलें सखिये करूं विसरलें नामादिकांची पुसी ।।

वाक्य : ययातीचें नाम गोत्रादिक सर्वही अवगत असून ऐसी तां वंचना केली ।।

सूत्रधार : ऐसें म्हणून शर्मिष्ठेस मर्मी वाग्बाणी देवयानीनें खोंचितां दैत्य पुत्री समर्पक जाव देते पाहा.

दरू : राग सावेरी ।। आदिताल ।।

बाई स्वल्पहीं नाहीं ।। अन्याय माझा ।।
बाई स्पल्पहीं नाहीं ।।

(प०) बाई हा स्वल्पापराधहीं ।। नाहीच मजकडून घडला ।।
पांही तूंची आग्रूह सोडुनिया ।। मनिच अपुलिया विवरूनि कांही ।।

(अनु प०) ऋषीनें दीधला मजला ।। ऋतु जे बोलिजेलें कीं ।।
कृश मध्ये नोहे साहसा ।। कृत्रमत्यकीं ।।

शशधर कुलजनहुष नृपसुत हा दुष्कृत पर ।।
पुण्य पूर्ण तर ।। ऋषभ राज ऋषि सर्वा संमत योषिन्मणि मनि
अवलोकीं ।। १ ।।

**वाक्य** : ययाति राजे माझे पति तुझा भर्तार नव्हे त्यासीं संचार केल्यास्तव व्यभिचार दोष तुला जडला म्हणुन जें बोलिलीस तें अविचार पूर्वक त्याचें उत्तर ऐक

**दरू : राग पंतुवराली ।। ताल शापू ।।**

धणिनीचाहीं धणी ।। धणि तो नव्हे तेंवि ।।
धरणीश हा केंवि माझा ।।
अनुमविल्यास्तव यासीं नसे मज अणुमात्र दोषहीं जाजा ।। १ ।।
देव देवतो देव नव्हे केविं ।। हे वद सद्गुण खाणी ।।
शेवकसचि वाचा ।। भूप भृत्य नव्हे केंवि कथीं कीरवाणी ।। २ ।।
गाडयानें वाहिलें वोझें न वाहिलें ।।। गाढल्यें केंवि धरेनें ।।
वांडयातील वस्ताव्योमीं नसें केवि ।। वाखाणि जे वैरवरीनें ।। ३ ।।
देशाधिप नव्हे सामाधिप केंवि ।।
तें सांग सत्वर ठेवि देशिकाचा गुरू ।।
आत्माराम नव्हे ।। देवि आत्म गुरू केंवि ।। ४ ।।

**सूत्रधार** : येणेरिती शर्मिष्ठेनें समर्पक उत्तर देतां तिला सोडून देवयानी ययाति रायास न्याय निष्ठूर बोलते पाहा.

**दरू : राग भैरवी ।। आदिताल ।।**

रमणा सांगू मी काय ।। रीतीतुझी मजला
भ्रमवूनी मदिरा व्यसनें मना माजी प्रमेदत
अधम जे का बटिका माझि प्रमुदित अति तिसी ।।
रमतचि अनुदिन क्रमिलें निज वय समुदें हें जी ।। १ ।।
उरलें आयुष्यहि या वरि ।। वीर जेठी सखीं ।।
बंदोडीचेंच लागुनि साचदेठीं ।। त्वरित जातें मी आतां ।।
तात भेटी धरि तुझि या पल भरी नवसेचि नरपति
दिधल्यां नवविधि भेटीं ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरिती देवयानीनें कटुत्तरें बोलून शुक्राच्यार्या निकटीं जावया सिघ्र होता ययाति राज तीची हणवटी धरून समाधान करितो पाहा.

**दरू : राग सैंधवी ।। आदिताल ।।**

सुदति नकी रुसूं तूं मजवरि ।। सुंदरी आतां ।।
**(प०)** सदय हृदय कांही करणें ।। सारसाक्षी सत्वर हें तां ।।
उदास केलियां दुसरी ।। गति नसे कोठेही पाहतां ।।
**(अनु प०)** हनुवटी धरूनिया करितों ।।
हे तुतें विनवणी वर वी ।। कनक गौरततनु मागुती ईस ।।

जाणकर नलवी ।। जनक ऐकिल्यां हें समस्तहीं ।।
हानि होईल अपली मनिच्र गोष्टि ठेऊनी येवढी
मज मनोज्ञ चरिते जिववीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती ययाति रायानें प्रार्थना करितां त्यें सर्वहीं व्यर्थ करून आंसी गालित काव्य नंदिनी बोलते पाहा.

(छंद) परम बंचकाग्रेसरा असें परिसतां तुझें वाक्य वोरसें ।।
त्वरित अंतरी कोप वन्ही तो नरपती पुन्हा फार पेटतो ।। १ ।।

(श्लोक) घेशीं वस्ता आपुल्या सर्वराया ।।
याहीं तीची शोभवूनी स्वकाया ।।
देई तीतें भोग सौख्य उदारा ।।
तूझ्या लेखें मी नव्हे आत्मदारा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती बोलून सर्वहीं वस्तावल्लभांच्यावदनार विदारव झुगारून येकचीखुरी घेतां पाठिसीं नहुषात्मजानें युक्त नव्हे म्हणुन धांवतांयेवेलेसे शुक्राच्यार्या मात्र येवू नये ऐसें चिंतिता दैत्य गुरू येतो पाहा.

दरू : शाहनाराग ।। तालशापू ।।

दानव गुरू येतो पाहा ।। सुनिधान जो प्राज्ञमहा ।। प० ।।

सूत्रधार : येणेरिती शुक्राच्यार्या येतां त्याला पाहून.

(श्लोक) झाला चंड अकांड तांडवसिरीं विद्युल्लता पातकीं ।।
आला कल्पत कल्प कार गतिनें कल्पांत उत्पातकीं ।।
मोटा काम मनोरथार्णव यथातत्थ्यस्वयें आटला ।।
येतां देखुनि शुक्र नाहुषमनीं हा भाव पैं वाटला ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती ययाति रायानें शुक्राच्यार्याचा धाक पाहतां तों कर्कशा देवयानीं बापापासीं येतां तिला विलोकून शुक्राच्यार्या बोलतो पाहा.

(छंद) न दिसती तुझ्या भूषणावली ।।
वदन कांति कां मांद्य पावली ।।
पदचरीच कां येथ आलिसीं ।।
वद अतां त्वरें रीति थोडिसी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती स्वजनकानें वृत्तांत पुसतां चित्तातील भाव देवयानी सांगते पाहा.

दरू : राग कल्याणी ।। ताल रूपक ।।

आतांची कलियुग हें ।। आलें निस्संशय ।।
पातकें बुडविले पुण्य पाहे ।।

(प०) नाथानें अजिकेलें ।।
कौतुक हें त्र्येंलोका तीत कान भरूनि तात ऐकावें ।।

(अनु प०) दानव तनया जे ।। दारुण देवता ।।
तीणें भुलवुनी रूपें ।। यानहुष सुता ।।

मानसिज सुखसारें ।। जाणगा अनुभविलें ।।
आणिक कुमर लाभियेलि तीधे स्वता ।। १ ।।

**वाक्य :** मी ज्येष्ठ पत्नी मला यदुतुर्वसु दोघे पुत्र शर्मिष्ठा धाकटी तिला दुह्रच अनुपुरू या नावाचे तीधे पुत्र ऐसा पक्ष पातहीं केला ।।

**सूत्रधार :** या प्रकारें देवयानीनें समाचार सांगतां दैत गुरु अत्यंत कोपाक्रांत होवून ययातीस विलोकून बोलतो पाहा.

**दरू :** राग कांबोदि ।। ताल शापू ।।

वंचुनी देवयानीसी ।। चंचल हों अहर्निशी ।।
मंचकीं वार्ष पर्वणीसीं ।। संचरलासीं ।। १ ।।
तारूण्य लावण्य थाठा ।। फार धरूनि अचाट ।।
कारे केला धर्मगलांटा ।। वोरसें मोटा ।। २ ।।
म्हातारपण तुझ्या देहीं ।। आतां येईल असंदेहीं ।।
जातां तडी आपुल्या गेहीं ।। येथें न राहीं ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती शुक्राच्यार्यानें शाप प्रहारानें प्रहरितां अहा मोटा अन्याय झाल म्हणुन मनामध्ये वेदमानून आधीं शुक्राच्यार्यानें अर्चन करून ययाति विनवितो पाहा.

**दरू :** राग मुखारी ।। आदिताल ।।

स्वामी कीजे प्रसाद ।। सीघ्र मजवरी ।।

**प. :** हामनांत निज अपराध स्फट ।। पामरें कृत तोसुनियावरि ।।

**अनु प. :** ऋतु तों याचितां मातें ।। दितीजेंद्र कन्यकेनें अतिशय काम ज्वरें ।
आहलूनितीणें सतत येक रीती ।।
नमस्कृति सारूनि प्रीति महामति इतर भुक्त हे नोहे म्हणहुनि ।।
म्या तिसीं दीधला दुतगती ।।
रति सुखोत्कर येथें नाहिच ।। पातका प्रतिठाव निश्चिती ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययातीनें प्रार्थितां तां माझें आज्ञोल्लंघन केलें यास्तव शाप सुटना परंतु कांही मनकामना तृप्ति नाहीं म्हणून फार ग्लांति केली त्यास उपाय सांगतों तेंचि ऐक म्हणुन शुक्राच्यार्या बोलतो पाहा.

**(श्लोक)** घेऊनि जो तवजरा तनय स्वभावें ।।
देयील यौव्वनमदीय्य तपः प्रभावें ।।
तें तूज लाभल नसे अनुमान कांही ।।
भोगीं स्त्रिया निज घरा सुखरूप जांई ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययातीचें समाधान करून दैत्यगुरुनें वल्लभा बरोबरी जा म्हणून देवयानीस सांगतां ते उत्तर देते पाहा.

**दरू :** राग भैरवी ।। ताल शापू ।।

नवजायेमी पतिगेहा ।। म्हणुनी अवधारी जे निश्चय हा ।।

(प.) आधीच अप्रिय राणी ।। आणी दिधली हीं ज्याची गाहाणी ।। १ ।।
शापिलें तां मज साटीं ।। तोही कोपकढे याचे पोटीं ।। २ ।।
दाजि तें मत्कृत्य हृदयीं ।। तेणें गांजील शर्मिष्ठावरी हीं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती स्वकन्येचें वाक्य ऐकून दैत्यगुरु तिला बुध्दिवाद सांगतो पाहा.

दरू : घंटा राग ।। अटताल ।।

रतल्यां पाप पथींतात आणि गुरू सुतनु सोडूयेती जाण ।।
पतिस दोषहिं सोडू नये परी पतिव्रतेने सावधान ।। १ ।।
हरि भक्ती लागूनि करितां विरोध हीं ।।
परम क्रूरमति बापत्यासीं वरवर्णिनी दूर वर्जिलें प्रल्हादें ।।
निरखूनीयां तोस पाप ।। २ ।।
वनवासि राघव जननीनें केला ।। म्हणवूनियां भरतानें ।।
घन रागें तीतें तनयें त्यागी येलें ।। अनुपम कीर्तिरतानें ।। ३ ।।
बोधायान जो कां बोधायन गुरू तो धरितां कुपथासीं ।।
वेदविदें याज्ञवल्कें टाकियेलें ।। तेधवाच पहा त्यांसी ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती बापाचें वाक्य ऐकून जीं आज्ञा म्हणतां श्रुक्रही आश्रमास पावतां तोंजराजर्जरित देह होवून ययाति राज येतो पाहा.

दरू : राग बिलहरी ।। आदिताल ।।

येतो नृपति ययाति महातारा ।।
(प.) जो तरूण कृती होता पूर्वी ।। ज्योतिर्मय सद्‌गुण धारा ।।
(अनु प.) चालेखातिचि झालें चलवल हाले संतत ग्रीवाहो ।।
काले केंसही झाले पाढरे प्रालेया परि त्यंव्हां हो ।। १ ।।
धारापंचके पुरानें ऊससारा भरला अपैसा वारा सुटत भरारा
दुसऱ्या व्दारानें असुराच्या हा कैसा ।। २ ।।
सिंकीत सट सट ।। खोंकित वरी वरी ।।
थुंकित हीं चौवाराहो ।। टेंकित काढी ।।
जिंकित मार्ग हीं वोकित दैव प्रकारा हो ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती ययाति येवून यदुप्रभृति पुत्राचें स्मरण करितां पांचजणहीं येताहेत पाहा.

दरू : राग वृंदावन सारंग ।। आदिताल ।।

आले पांचही पुत्र ययातीचे ।।
(प.) जे लोकातीत महाजाण बलाचें सांचें ।।
(अनु प.) तुर्वसुयदु ज्येष्ठ भारी तुलितां नाहीं सरी
सर्वथां ज्यासीं बरीं शर्मिष्ठा पुत्र सर्व धीर अनुद्रुत धुपुरूहीं
पर्वचंद्रमुख मिलुनी यांही ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती पाचजणही पुत्र आल्यानंतर आंधी यदूतुर्वसुद्रुचत्र अनुयां चौघास विलोकून ययाति राजा बोलतो पाहा.

(श्लोक) ऐकानंदहोमदीय्य वचनाया कर्ण युग्मीं अतां ।।
घऊनी मम वार्धका तरुणता द्यावी तुम्ही तत्वता ।।
होतां वत्सर ते हजार तुमचें तारूण्य देतां पुन्हा ।।
ताताज्ञा करणेची धर्म तनया ऐतघ बरं हें मणा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययाति राजाचे वाक्य ऐकून यदु आप आपणांत बोलतो पाहा.

(श्लोक) ताता लागि समर्पिल्यां तरूणता म्या ती मुलें तो पहा ।।
मातेंसीं रति भोग भोगिल सदा मातोन कामें महा ।।
पापातें अति मात्र पात्र तरि कीं मी पांघडे न स्वयें ।।
बापाचें निज वाक्य यास्तव कदां तें पालिना निश्चयें ।। १ ।।
तवकुलीं धरितों मी जन्म ऐसा हरीनें ।।
वर मजला दिधला कीं पंण्य पारंपरीनें ।।
दुरित घडलियां हें थोर आनंदरासी ।।
न करिल अवतार माझि या निंद्यवंसीं ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती हे मनी निर्धारून तिघा भावास तो अंतर्भाव न सांगून जनकाज्ञा भंग पूर्वक तीघास घेऊन येदु बोलतो पाहा.

(श्लोक) विषाचे परीवाट ती दिव्य योषा विषादासिजे मूल माहेर रोषा ।।
पिशाच्या परी देह ज्याचेनि होतें ।।
अशावार्धकालागिता कोण घेतें ।। १ ।।

दरू : राग सावेरी ।। आदिताल ।।

तातातेच परी माडिलीतां आतां ऐक बरी ।।

(प.) कुतरी घऊनिया माझी ।। कुत्सीत दुर्गणी आजी ।।
वितरी कामधेनू तुझी ।। उत्तम तीहि लोका माजि ।। १ ।।
पुतली घेऊनि लोहाची ।। तितुकेंचि जोखानें साची ।।
प्रतिनिधी दे सुवर्णाची ।। प्रतिमा दिव्य वर्णाची ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती चौघानी निराकर्ण करितां ज्येष्ठ क्रमानें ययाति राज यदुस आधी शाप देतो पाहा.

(छंद) जर्ठरिं जन्मुनीया सुदुर्जना ।। शठपणें न देशी स्वयौव्वना ।।
तव कुलोद्भवा आवध्या सुता ।। अवनिचें नये राज्य तत्वता ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययातीनें यदूस शाप देवून तुर्वसूस पाहून बोलतो पाहा.

(श्लोक) देयी यौवनी आपुले म्हणवुनीं मी प्रार्थिता दुर्गती ।।.
दिव्हा थोर बगाथ अगाण गणितां तमं धर्म शास्त्राप्रति ।।
या साठी घडसील तूं अधिपती त्या देशिचा निश्चिती ।।
तुछंम्लेछ असख्य भ्रष्ट अवघे जेथे दि राहती.

**सूत्रधार :** येणेरिती तुर्वसूस शापून दुत्यास पाहून ययाति बोलतो पाहा.

(श्लोक) वलधुनी गज अंश्वी जेथ जाताची येना
धरूनीसहृढ ताफा पाविजे ज्या ठिकाणा ।।
घडसिल नृपत्दुघ्या देशिचा त्या अगारे ।।
वसति सतत जेथे हूण पापिष्ट सारे ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती दुत्द्यास शापून अनूस विलोकून ययाति बोलतो पाहा.
(छंद) उपजली तुझ्या पुत्र जे कुली ।। आपण ते अरे ऐकरे धुली ।।
अपुर त्यावयी देखतिल ते ।। लपन नंदना जाण निगृतें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती चौघास शापून ययातीने पुरूस माथारपण घेऊन तारूण्य देई म्हणून आज्ञापितां आनंद भरित तो पूतित्युतर देतो पाहा.

दरू : राग शंकरा भरणे ।। ताल शापू ।।

धन्य अता मी झाले ।। आणी पुण्यवंत पदवी प्रति आलो ।।
मान्यही होऊन ठेलो नोहे अन्यथा चरण सेविसे भुकेलो ।। १ ।।
यौवन बाधक पाही ।। करूं विवश कामासी पाडी अपाई ।।
तावक भोग विषई झाल्या ते विनियुक्त अशे भाग्य काई ।। २ ।।
यावदायुष्यही माझे घेई यौवन भोगविला सख्या जें ।।
भावी अमीष्ट हे माझें करितों विनये विनंती हितका जे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती पुरुचे उत्तर ऐकून रोमांचित शरिर होऊन त्याला गाढा लिंगन देवून त्याचें यौवन घेऊन देवयानीस विलोकून बोलतो पाहा.

दरू : राग शाहना ।। ताल झंपा ।।

देवयानी तुझे कृत्य न वदवे वैखरी ।। केवल तूं साध्वीत निवडक होसी बरी ।। १ ।। शाप देवूनी निज बापाकरवी मज ।।
पाप जोडिले न्यून्य न परि पडले रज ।। २ ।।
सक्ती भोगिता भोगा ।। नवनवसोहळे निवतील तेणे नेत्र ।।
भुवनैका सुंदरी ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती देवयानीस निखंदून ययाति भूपाल शर्मिष्ठेसहीत नित्यानंद अनुभवीत असता तो देवयानी सखीस विलोकून निर्षद पावून बोलतो पाहा.

(श्लोक) बापानें शापश्स्त्रें स्वपति तरूणता वल्लरी खंडितांची ।।
शर्मिष्ठा भ्रष्ट भोगा घडली म्हणवुनी लाभली तुष्टि साची ।।
पूरूनें यौव्वनातें वितरूनि वरितां तातवार्धिक्य मोटें ।।
तेथेंची सक्त होतां नृपति शतगुणें वाढलें दुःख खोटें ।। १ ।।
मागें जरी नृपवरारति सौख्य कोडें ।।
तें वाटतें बहुमना प्रतिकानकोडें ।।
बैसे उगीन तरि मन्मथ वेग साहे ।।
कार्य व्दयीं विमुख यास्तव चित्तराहे ।। २ ।।

दरू : राग हुशेनी ।। आखिताल ।।

साहेना मन्मथाची ।। सारसाक्षी बाधायाची साहित्य किजे निजाची ।।

सांगातीण तूं साहस माझा मज जाची ।। १ ।।
माझीया पुत्रानी जरा ।। मानिनीं न घेतां जरा ।।
लाजिरें वाटतें अंतरा आजी हरहरा योजि जे उपायो बरा ।। २ ।।

(श्लोक) निजरिपुसह नौके माजि बैसोनि जातां
सजणि हृदय सद्मी ।। योजुनीतद्विधाता ।।
बुडवी जलधि माजी नावचित्त भ्रमानें ।।
नुमजुनि सखि केलें कृत्य म्या त्या प्रमाणें ।। १ ।।
सपत्नीचें जावें विपुलतर सौभाग्य म्हणुनी ।।
जसी प्रार्थी नारी निज अहित वार्ता न कलुनी ।।
निदानीत त्क्लेशें अनुदिन जसी ते तलमली ।।
तसी माझीच यस्मिरण करितांचि मजसली ।। २ ।।

दरू : (रागः यरूकुल कांबोदी ।। आदिताल)

आलें कार्श्य मोटें देहीं ।। अपुल्या दृष्टीनें पाही
अलिवेणी झालें व्यर्थ जोणे बायी बोलूं मी कोणासी कायी ।। १ ।।
निज नाथासी दिल्हासीण ।। विजवटी मी कैदासीण ।।
अलिवेणी ।। भजला सौख्य यंथ जाण ।।
सजणी वाक्य हें प्रमाण ।। अलिवेणी ।। २ ।।
लाववी पापाचें सदन ।। दावितां लोकांसी वदन अलीवेणी ।।
अवघे करिती निर्मत्सनि लाविलें स्वकुलालांछन अलिवेणी ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती देवयानी सखीसीं बोलत असतां तों ययाति राज सहस्र वर्ष पर्यंत नंदनादि वनाचें ठाअीं सुंदर स्त्रीसीं कामानंद भोगून निर्वेद पावून ययाति राज तृष्णेची निंदा करितो पाहा.

(श्लोक) यत्पृथिव्यांव्रीहियवं ।। हिरण्यं पशवस्त्रियः ।।
नालमेकस्य पर्याप्तं इति मत्वाशमंव्रजेत् ।। १ ।।
यादुस्त्य जा दुर्मति भिः यानजीर्यति जीर्यतः
योसौप्राणांतिकोरोगः तां तृष्णं त्यजतः सुखं ।। २ ।।

दरू : (राग : यरूकुल कोबोदी ।। आदिताल)

पुरेयावरी संगति पापी तृष्णेचिया ।।
प. श्री हरे सर्वथा न लगे ।। बारे वंदितों पांया ।।
अवनींत जें काहें ।। नव नव धान्य हें ।।
अवधी स्वर्ण रत्नें हें ।। अत्युत्तम पाहे ।।
जवन अश्ववार जगीं असती जे आपण ।।
भुवनी तेंवींची ।। जे भली युवति पंक्तिसाची ।।
भवनि अभिनवय श्रेष्ठ ।। संतत असतां हें जे विस्तारे अतिययें ।। १ ।।
सकल गात्र अर्जर सहज झाल्यां बहुतर विकट वाढे जे फार ।।
विवसी अनिवार ।। सकलंक बुद्धि पर ।।

ते करूं जीचा अव्व्हेर ।। प्रगन नव्हेति ।।
शक्त जे निखल दुःख मूर्ती ।।
प्राणहर प्रखर रोग जे नाना विधया ।। वोखदानी नशमे कधीही ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती निर्वेद पाहून ययाति भूपाल अद्वैत शास्त्र पसिलन ।।
जन्य संस्कार उधृत होतां पुनः आपणांत बोलतो पाहा.

दरू : (राग : मोहन ।। आदिताल)

तो मि सावध घडलों प्रतापरामी तन्मय जडलों रे ।।
प. व्यामोहा मध्यें जो अनुदिन ।। राम रामा होतों सांपडलो ।।
अनु.प. खार्जेश्वान वृकाचें हें वपु माझें मी म्हणुकाचे रे ।।
वोझे वाहतयाचें झालें ।। वोसरणेंची वयाचें रे ।।
साजणेंकु वधूचें केलें ।। सारें सुकृत वधूचरे ।।
काजहें स्वमनाचें स्मरतां डाजितें जिवीं साचेंरे ।। १ ।।
लक्ष स्वयं प्रभ ज्यातें वदती लक्ष्यावधि श्रुति ज्यातें रे ।।
साक्षी चराचरातें परतें जें क्षराक्षरतिं रे ।।
साक्षाच्चिद्ध मनी तें असतां ।। अक्षय सत्सुख पोतँ रे ।।
भिक्षा निज हे तें याचिली ।। त्याक्षणिका विषयातें रे ।।

**सूत्रधार :** येणेरिती मनी निर्धारून कनिष्ट पुत्र जो पुरू त्याला निकटीं बलावून त्याचें यौव्वन त्याला देवून श्रीरामचंद्राचे ध्यानीं तत्पर होतां ध्यानाभि व्यक्त सीता लक्ष्मण आंजनेया समते श्री रामचंद्र येताहेत पाहा.

दरू : (राग : मोहन ।। आदिलाल)

त्रितापहार हा येतो पाहा ।। प्रतापराम चंद्र ।। त्रितापहर येतो ।।
प. जो नतापवर्ग प्रदउध्दरी ।। कृतापराधींहि नमितां पदा ।।
अनु.प. मित्रनंदन मीत्र जो सौमित्र पूर्वज मन्मथ सान्निभ ।।
गात्र करूणा पात्र पंकज नेत्र सीता वल्लभ स्त्रोत्र करिती जाचे
निर्जर मात्र तन्मय होऊनि जोचिन्मात्र निर्गुण सर्व जिवाचा सूत्रधार
सूत्रामार्चित चित्ररूप सुचरित्र ग्रहायित चित्र जडजंगम क्षण ।।
चित्र भित्तिसम क्षत्रिय वर नक्षत्र पवदक्षेत्रज्ञा व्यय ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती रामचंद्र प्रत्यक्ष होतां ययाति राजा साष्टांग प्रणाम करून स्तात्र करितो पाहा.

दरू : (राग : मोहन ।। आदिताल)

चरण तुझे स्मरतां हरे निज मानस मंदिरिं प्रेम पुरस्सर ।।
(प.) हरूनि मोह भरणी वरीच्यावरि ।।
थारविंसार पथींनृकेसरि ।।
(अनु प.) अनंत गुण सीमा ।।
रजनीचर कृतांतकाल कदन भीमा निरंतरी दुरंतसं चिताघ करीं

बरोबरी त्वरेकरून ।। १ ।।
आणिक गति नाहीं मज या जगीं ।।
जाणसि पूर्ण हृदअीं तूंही जनाधिपा अनाथ दीनदास
गणी दयाउणी गणी म्हणूनी ।। २ ।।
उदार श्रुभ लीला ।।
मदमछर विदारिं सीघ्र सुकृतसीला पदांबुजींस दैव आत्मभक्तिरतानताठिवि ।।
प्रताप रघुपति ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययाति रायानें प्रार्थितां श्री रामचंद्र बोलताहेत पाहा.

**वाक्य :** अगाये ययाति राया पुरूनें तूझें वचन परिपालन केलें यास्तव याला युवराज्य पट्टाभिषिक्त करून तूं जीवंन्मुक्त घडून नित्य अजरामर तुवां अद्वैत सांम्राज्य सुख माझ्या करूणा कटाक्षें अनुभवीत राहणें ।। आणीक कांही अभीष्ट असलियानें मागणें ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीप्रतापरामचंद्र स्वामीनी आज्ञापितां पूर्वपिता ययाति राज प्रार्थना करितो पाहा.

**(श्लोक)** धर्मिष्ठासि कदाबिपत्ति न लागो
स्पप्नांतही येकदा लाभो नित्य सदाशिव प्रभुदयेसन्दोध लोकांसदा ।।
श्रीभद्राम पदारविंद युगलीं कल्याण भाग्य प्रदा जोडो भक्खी उदार ते अनुदिनी स्वानंद राज्यास्पदा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती ययाति रायानें प्रार्थीतां त्याचे मनोरथ परिपूर्ण करून श्री रामचंद्रसपरिवार नित्यानंद मंदिरास आले पाहा.

**दरू :** (राग : श्रुध्र सावेरी ।। आदिताल)
नित्यानंद मंदिरासी ।। सत्यानंद सुखरासी ।।
प्रतापरामचंद्र हा परिवारें आला पाहा ।। १ ।।

**श्लोक :** श्रीमालोजीनरेंद्र नंदन भला शाहेंद्र नामाथिला ।।
पुण्य श्लोक म्हणूनि लोक निगदी ज्याला प्रपंचीतिला ।।
त्याचा पुत्रकसच्चरित्र जगती येकेंद्र भाग्यगला ।।
त्या पासूनि शिवस्वरूप तुजला राजेंद्र जो जन्मला ।। १ ।।
प्रतापसिंहेंद्र कुमार त्याचा ।।
जो अंश श्रीविष्णु जगत्पित्याचा उमासतीची सुकृतैकरासी ।।
कल्पद्रु ज्याच्या नतुलेक रासी ।। २ ।।
जो कां त्रिवर्ण गुरुची अपरूप कासी ।।
आधार थोर अजि आतनिरूपकासी तों
तेणें ययाति चरिताभिध रूपकासी ।।
केलें पहा निरूपमाद्भुत रूपकासी ।। ३ ।।

**।। ययाति चरित्र संपूर्ण रामार्पणं ।।**

# १३. पारिजातक नाटक

श्रीगणेशाय नमः ।। नाटचारंभ करून पारिजातापहरण नाम नाटक सुकवि-विरचित रंगभूमीत नाटच करितों याकरिता सकल सभ्यांस संतोष व्हावा-कारणें कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पहा.

(श्लोक) जाला स्तवी निर्जर पंक्ती सारी ।। जो चिंतितां पातक दूर सारी.

सूत्रधार : येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीची स्तुती करितो पहा.

(श्लोक) जे सर्व नारींत महा प्रभावी ।। जिच्या कृपे ज्ञाकळा दुणावति ।
तैशीच चाले कवनी सरस्वती भावें नमू ते सदया सरस्वती ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती भारतीचे स्तवन केल्यांनंतर सद्गुरूची प्रार्थना करितो पहा.

(श्लोक) जो ब्रह्मवित्तम शिरोमणि पुण्यराशी ।
ऐक्ये वशीकृत सदा महिज्या वराशी ।
अव्दैत बोध सुखसागर पूर्ण सोमा ।
वंदू तया गुरुस जो धरि सेतुनामा ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती सद्गुरुची प्रार्थना केल्यांनंतर हरिहराचे स्तोत्र करितो पहा.
पतगाधिपपुंगवास्मितै ।। फणिशय्या रमणीय भूषणौ ।
ध्रुत कौस्तुभ बाल चंद्रकौ ।। भजचेतो मुरमार वैरिणौ ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती हरिहराची प्रार्थना केल्यांनंतर येकदंताची प्रार्थना केली असतां तो प्रत्यक्ष येतो पहा.

दरू : (राग : मध्यमादि ।। आदिताल)

गणपति येतो पहा ।। गुणसिंधु हा
मूषक वाहन ज्यासी तोषक ।। भक्ता सुखराशि ।। १ ।।
विघ्नेश्वरें येऊन सकल विघ्नें निवारणें केली कीं, या प्रस्तुत कार्यास त्वां इकडे यावे ।
जी मी हाजिर आहे ।

पारि. : कोण या ग्रंथाचा निर्माता ?

वाक्य : जो कोसलवंशाधिचन्द्र करुणासमुद्र तेणें हा ग्रन्थ रचिला अरे त्याचा दिव्य प्रभाव सांगतों ऐक ।।

(श्लोक) धैर्यें मेरू समान वीर्य जलधि शौर्ये महेन्द्रासरी ।
औदार्ये जणु राजराज दुसरा सत्योक्ति धर्मापरी ।।
सौन्दर्यें सुमसायकासदृश हा शंभु दयेन पहा ।
तो जाणा नृपसिंह भोंसलमणि भूपाकृती राम हा ।। ५ ।।
प्रतापरामी दृढ भक्ति जासी ।। प्रतापसिंहेन्द्र गुणैकरासि ।।
तेणेचि या सुंदर नाटकाशी ।। केले पाहा हो शुभदायकासी ।। ६ ।।

वाक्य : अरे पारिपार्श्वका नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो ।

(श्लोक) स्वर्गीहुनी अणुनि पारिजाता । भामेचिया मानस वारि जाता ।।
संतोषवितो सुगुणैक मूर्ति । करो समस्तासि अभिष्ट पूर्ति ।। ७ ।।

सूत्रधार : येणेरिती नाटकार्थसंग्रह श्लोक म्हटल्यानंतर रूक्मिणी देवी येते म्हणून सभ्यास सावध कराया कारणे दौवारिक येतो पहा.

दरू : (राग : कापि ।। आदिताल)

येतो पहा जि भिकाजी नायिक भव्य कपाळि भंडार सव्य करि टोणपा थोर ।।

सूत्रधार : येणेरिती दौवारिकाने येऊन सभ्यास सावध केल्यानंतर रुक्मिणीदेवी येते पहा.

(द्विपदा) तु हिमांशुसम मुखी तोयजनेत्री ।। महित गुण संपन्न मोहनगात्री ।।
घडि न भरत करि वड मोडि सारि ।। लुढुनि हृदयीं घरीं लोकेश शौरी ।।
सिंधु ज्या मदमत्त सिंधुरचालि ।। इंदुचि बहिणुली इंदिरा आली ।।

दरू : राग नीलांबरि ।। आदि ।।

कोमलांगि येते पहा कमनीये गुण श्रेणि । काम जननी सोमवदना भ्रमर वेणि ।। ९ ।।

सूत्रधार : येणेरिती तृष्ण कान्ता येउनि कृष्ण विरहाने कष्टि होउन बोलते पहा.

दरू : (राग : जुजावति ।। आदिताळ)

जायी तुं वेगी मोहनांगि ।। सकळ सद्गुणखाणि श्रीहरीणि ।।
मजला स्मर झडपणि जाहली की खाणि ।। १ ।।

सूत्रधार : येगेरिती सखीची प्रार्थना करून पुन्हा बोलते पहा.

(श्लोक) यातिची स्वयमेव मी गुणवति नितिज्ञ मोटी पहा ।।
हातीं भूषवि अपुल्या जिस मुरारी ति गुणाधि महा ।।
प्रितीचि रमणि म्हणुनि बहु जे यांति जगी ख्यात कीं ।।
हातिच्या सदनात साजणि दिवाराति क्रमि काळ किं ।। १ ।।

वचन : ऐसे असतां

दरू : (राग : झरकराश्ररण ।। अटताळ)

प्राणसखा येथे येईल का । कान्हया तो कामिनि मोहन ।।
भामा जे प्रितिचि शामळू वर्णि । निधाम तिचें घनश्याम सोडूनिया ।। १ ।।
वचन सत्यभामेसारिखि माझ्यानें वर्त्तणूक होइना काय ।।
परंतु प्रति विशेषानें । तें चरणि भाउन तेथेंच श्रीकृष्ण असक्त अहे ।।
बरें प्रारब्धास यत्न काय ।। २ ।।

सूत्रधार : ऐसे सखिशि संवदतां तो नेपथ्यात कोलाहल होतां. तो काय म्हणून शोध घतां यदृच्छेन भक्तवत्सल श्रीकृष्ण येतो पहा.

दरू : (राग : भैरवि ।। आदिताळ)

अतसि पुष्प संकाश अच्युत येतो पहा.
नससि दुसऱ्यासि महिमा नायक जो कमलेचा पहा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण अल्यानंतर त्याला विलोकून रुक्मिणि देवी बोलते पहा.
(छंदोवत्त) धमधमाट तो फार सुटला ।। नगर प्रांत हा सर्व दाटला ।।
अगरबुद्धिचा तुं वरि अधि ।। प्रकार याचि या कारणाकधि ।।

सूत्रधार : ऐसे रुक्मिणीचे वाक्ये ऐकून श्रीकृष्ण बोलतो पहा.

वाक्य : बहुतेक देवऋषि येतो जणू (द्विपद) अभंगणि अभिनंदय अद्‌भुत स्फूर्ति ।
शामिल दुरितध्वांत शांतिचि मूर्ति ।। करनखरि वाजवि कमनीय वीणा ।
हरिभक्त तिलक मुनि येतसे माना ।।

सूत्रधार : ऐसे श्रीकृष्ण रुक्मिणीस सांगतां ।। तों नारद येतो पहा.

दरु : (राग : यमुना ।। ताल शापु)

येतसे मुनिनाथ नारद ।। जगत्तात पूत पूतनारि ।।
गित गात सर्व सुहृद ।। १ ।।
व्दिपद मधुकुलांह्य बुधि सोम मुदि रसु श्याम मधुमर्दत्रोदाय मधुरा ललाभ
विधूत दुरित ग्रामविद्वदभिराम मधु र पावन नाम प्रथित रिपु भौम ।।

सूत्रधार : येणेरिती नारद येतों त्याला नमस्कार करून श्रीकृष्ण बोलतो पहा.

दरु : (राग : हुशानि ।। अटताळ)

धन्य जाहला अजिचा दिवस ।। पुण्य पुरुष तुम्ही पूर्व
सुकृतानें मान्य अलेति अतां माझिया घराला ।। १ ।।

सूत्रधार : ऐसे श्रीकृष्ण बोलतां विधिसुत उत्तर देतो पहा.
(छंद) दर्शनाने तुझ्या फार श्रीहरि । हरिख जाहला गा निजांतरी ।।
तुजप्रति अतां उचित घ्यावरा पुष्प आणिले देवराजया ।।

सूत्रधार : येणेरिती बोलुने पारिजात पुष्प श्रीकृष्णाचे हातिं देतां ते पुष्प देवानें रुक्मिणीस अर्पितां तिणें तें अंगिकार करून हे वर्तमान भामिस कळू नये म्हणून श्रीकृष्णाने निजधामास येता तो सत्यभामा देवि येते पहा.

(श्लोक) रतिहुनि अति रम्य दिव्य कांतालकांता ।।
फिरत फिरत ऐशि पातली कृष्णकांता ।।
तदुपरी सखियासि खेलत प्रेमपुष्पा ।।
हळूहळु मृदु गाते जिंकिती अन्य पुष्पा ।।

दरु : (राग : आसावरि ।। आदिताळ)

येतसे पाहा येणांकमुखी यौवनांगि सखि सत्यभामा ।।
शांत कुंभ कुंभस्तनि शातोदरि निलालकते ।।
जो चराचर जगज्योतीं हे सारे नाचवी जन आत्मयित्सुनि सारें ।।
गोचर श्रुतिस जो गोविंद निस ।।
जिचिया लक्षणे जिंकिला सत्य बोडस सह स्त्री सौदर्ययाश ।।
लाड चालवि जि चालाक्षी विलासि ।।
आलि आसि ते हि आलि जें नासि ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती सत्यभामा येऊन सखीस विलोकून विरहाने कष्टि होते पाहा.

(**दरु**) (मध्यमवति ।। आदिताल)

नवल हें सखि तुज मी कथिते गुज कांहि ।।
समय पाहूनि सलिते जास्तव विधु हा मजलागि पाहि ।।
चंद्रमुखी मजला ना म्हणवी चंडकोपुनि त्यास्तव चिंत्ति चंचलाक्षि सलितो रात्रि चंडाशु सम मूढमति ।। १ ।।
विरह नल देहिं ग्रज्वलला करूं त्याचिया साह्याला
तरुणि मलयानिल आला ताप तेणें फार उदेला ।। २ ।।

**सूत्रधार :** यापरि निज स्थिति सांगून काम वेदना न सहता पुन्हा सत्यभामा सखिप्रति बोलते पाहा.

**दरु :** (पुन्नागवराली ।। अटताल)

काम जनक श्रीहरी का मज सखे रुसला ग सुंदरी ।।
तामस स्मर शरिं त्रासितो वरिवरि सोम मत्तावितो निजकरिं हरिहरि ।।
सरसि जलद लोचना आणिजे तुवां सरसावुनि सदनासर सांगाविणें नयना शरानि निज देईना दारुणा मज सहवेना विरह वेदना ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कष्टि होऊन सत्यभामा पुन्हा बोलते पाहा.

**(द्विपद)** नाथजि निकट जे दूति का गेली येथ फिरूनि हे का ना अलि ।।
कारूण्य जलधि हरि कंदर्प कोटि कांथव रुसुनि बैसला कामिणि पोटीं ।
लक्ष्य न करुनि हरिणलक्ष्य सखि बाणि लैक्ष मै करूनि शर लक्षुनि हाणि ।। १ ।।

ऐसे संवदता तो अत्त रंगावलि येते पहा.

**द्विपद :** चतुरता जेथुनि जम्मालि शस्त नतुकति तुलसीस नारी समस्ता ।।
रसिक रंजन अंतरगवलि ही शशिमुखी ते अलि साजिरी पाही ।।

**दरु :** (भैरवी)

अतुलांगि जेयेते पाहा अंतरगावलि ।। चातुर्याचि खाणि चा र्प्पन सुश्रेणि ।।
चपलाक्षिनि लवेणि ।। चंद्रमुखि कुंभस्तनि ।। १ ।।

**सूत्रधार :** अंतरंगावलि येताती ते विलोकून भामा बोलते पहा.

**(छंद)** रमण वृत्त सादयंत्त विस्तरें ।। कमल लोचने ज्ञात जें बरें ।।
न मानितां त्रयालागि अंतरिं ।। भ्रमर कुंतले बोल सत्वरि ।।

**सूत्रधार :** येणेरिती भामेनें पुसतां सखि उत्तर देते पाहा.

**(श्लोक)** परम नवल केले कृत्य जे नायकानें ।। सरसि जलद नेत्रे ऐकावे स्वकानें ।।
सुरत कुसुमातें अर्पितांत्र नारदानें ।।
स्मरजन न विसते वों दिधले मानदानें ।। १ ।।
ऐकिली अधिकता जवें तिची । आत्मकर्ण ग्रुगले सवतिची ।।
तम्हयुक्त अभिमानवतिचि । चित्तवृत्ति शामली युवतिचि ।। २ ।।

वचन : यापरि अज्यसिक अग्निसिखेपरि कोपयुक्त भामा बोलते पहा.

दरु : (पुन्नगवराली)

कपटी महा वनमाली हा सखे ।। रमण हा भेटला कोठुनि या मला ।।
सुमन सवेंतिस देऊनि जो रमला ।। जगी नसे यासम शठ दुसरा ।।
अगई शिरोमणि धूर्तांचा बरा ।। २ ।।

(श्लोक) रतुनिया तिर्नासि शठगोपहा । सतत तन्मय कि हा जाहला पहा ।।
गणयले मजला सम बा कसा । कटकटा विधि वोढवला कसा ।।

सूत्रधार : यापरि सत्यभामा बोलून निर्वेद पाऊन सखीस पाहुन बोलते पहा.

दरु : (राग : आनंद भैरवी ।। आदिताल)

खोटे अदृष्ट माझे कवाणा ते सांगूं को वे गेल्याहि न सुटे ।।
कोमलांगि हे सखि सवति एकचि असिलन्या तिच्या असुखापार नाहि ।
सोलासहज ति मि करूं कायि ।।

दरु : (राग : शंकरा भरणा ।। आदिताल)

न वदिजे तुम्ही त्यांसि नव धननिलासि ।।
कुवलयाक्षि सर्वथाहि ।। उवलोकूं नका बाई ।।
जाचे कुटिल अंतर जार चोराग्रेसर ज्याचा या मज निष्ठूर झाला किं भर्तारि ।। १ ।।
पंचूने त्या फार काहि लांच तुम्हा दिधल्याहिं ।।
वंचूनि का चित्त गेहि चंचलाक्षि हो नित्याहिं ।। २ ।।

(श्लोक) स्वये आलिया माझिँया द्वारदेशा ।। न सोडा तया सर्वथा द्वारकेशा तुम्हा फार पंचांग सांगितल्याहि ।। धरावे कांहि ।।

सूत्रधार : यापरि भामेचें वाक्य ऐकून सखि उत्तर देते पहा.

(श्लोक) ज्याच्या द्वावा जवल विधि सिंदेववृंद सदा ।।
येता होतो कमलनयने पात्र वेच प्रज्ञरा ।।
रोमाछिंद्रि वसत हातशा थोर ब्रंम्हांड कोटि ।।
ज्या देवाच्या निरुड घडुनि कोण पैंसास लोटि ।।

सूत्रधार : यापरि सखिचें वाक्य ऐकुनि भामा बोलते पहा.

(श्लोक) त्रैलोक्याचें धणिपण असो सर्वदा त्याचपासि ।।
भक्तानि तों सदृढ कसुनि बांधिला प्रेमपासि ।।
लोटिला किं कुटिलहि सपास्निसि माझि पुरायि ।
अहेति याविषयीं मर्जासि प्राह्य ते थोर गालि ।।

श्लोक : सख्यानो मि त्यांसि न करि सहसा भाषण पहा ।।

(शिखरिणी) न लक्षी मी त्याच्या वदन कमलांते नियम हा ।।
नका येऊं देऊं मम सदनिं गोपीप्रियकारा ।।
मला तो स्पर्शेना मुरहरी असें सर्व करा ।।

सूत्रधार : येणें रिती सत्यभामेचें वाक्य ऐकून सखि उत्तर देते पहा.

**द्विपदा :** (कुवलयाक्षि) कुलवल्लाक्षि आम्ही केवळ कायका ।।
अवधि या हडवूं सकूं केवि श्रीनायका ।।
पवन सखि मोटेंत केडवा बांधवो ।।
अवघड न हें काज तेंवि पै साधवो ।।

**सूत्रधार :** यापरि सखीचे वाक्य ऐकून भामा उत्तर देते पाहा.

दरु : (राग : आसावरि ।। आदिताल)

पुरे यावरि संग भोंदू कृष्णाचा ।। धरेवरि ज्या जोड नसे धन्य ऐशांचा
सोळासहस्र सप्त वधूंताहि येवुपडियांनि ।।
वेळोवेळी हेचि बोलत येऊनि येकांति ।।
केला तो अपुला अवगुणा प्रकट कुटील तो अंति ।।
हेला याचि अशीच अवधी कळली कि दिनरात्री ।। १ ।।

**सूत्रधार :** यापरि बोलून सत्यभामा श्रीकृष्णाची निंदास्तुती करिते पाहा.

**वाक्य :** अद्यापि त्या कृतघ्नाचा भ्रम तुम्हास जात नाही

दरु : (राग कल्याणी आदिताला)

काय सांगु मी कृष्णजिचि थोरि सदा गोपिकांचे घरिं करिचे ठकऊनि
त्या प्रौढव्रजनारी ।। जेणे रित्या गोप किशोरी ।।
जलनिया यमुनें तटाप्रति चेंडू खेळे किशोरि संगाति ।।
वेणुनादें लुब्धवि पशुयोनि ।। वधूसंवे धाऊनि तेथे येति ।।

**सूत्रधार :** येणेरिती सत्यभामा अंतरंगावलिसी बोलत असतां श्रीकृष्ण येतो पहा.

**(दरु)** अतसि पुष्प संकाश.

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्णदेव येता भामेस विलोकून सखि बोलते पहा.

**(श्लोक)** तु गा कोण महिधरेंद्र अहि किं नोहे फणिमर्दिता ।।
किंतु वार्क्ष्य न मि हरितुरग कि लोहि न चकि स्वना ।।
साक्षात् तूचि कुलाल किं न कहितो मी माधवरच्यात किं ।।
होशि काय वसंत जा बन सुचे वेला प्रभूस्तधकि ।।

**सूत्रधार :** येणेरिती सत्यभामेनिकटि सखिने श्रीकृष्णास निरुत्तर केले म्हणून वर्तमान सांगता तो भामेस विलोकून श्रीकृष्ण बोलतो पहा.

**(दरु)** गोकुल गोकुल गोपति ।। श्रीगोपाल मि सत्यभामे ।।
गोपाल कि बक पाल की सुकृपाल कि मि तेणें ।। १ ।।
शांतदांत मुनि मानसा निज सुखवर्धन मि सत्यभामे ।।
सुखसंवर्धन कि रिपु मर्दन कि जनार्दन कि मि नेणे ।। २ ।।
करुणावरुणालय दासा हरि चंदन मि सत्यभामे
हरिचंदन कि सुखनंदन कि यदुनंदन कि मी नेणें ।। ४ ।।
शरणागत संरक्षणि रमापति मि सत्यभामे ।।
पति कि भासापति कि शामाकृति कि मी नेणे ।। ५ ।।

सूत्रधार : श्रीकृष्णदेव बोलतां त्याते विलोकून सखि बोलते पहा.

(छंदोवृत्ता) ऐक स्वामिया हे तुझि अजि ।।
पद्मलोचना सत्य हे गणि ।।
तुं करि अहा गा बुझावणि ।।

सूत्रधार : येणेरिती सखिचे वाक्य ऐकून श्रीकृष्णदेव भामानिकट येऊन बोलतो पाहा.

(श्लोक) कांते तुतो (कोप) किमर्थ आला ।। कोणें तुझा किं अपराध केला ।।
दंडास तो योग्य नसौतरि हि ।। दंडीन मि संशय येथ नाहि ।।

सूत्रधार : येणेरिती बोलून श्रीकृष्णदेव भामेचा पदर धरून वोढिता भामा बोलते पाहा.

(दरु) पदर तुं सोडि सुंदरा रे ।। सोडि रे सोडि माते सुंदरा रे ।।
ठकपणा तुझे ठाऊक सर्वहि ।। न करि या वरि नसति धाई ।।

सूत्रधार : सत्यभामेचे वाक्य ऐकून श्रीकृष्ण बोलतो पहा.

(दरु) न करि यावरि नारदाकेंदु मुखिच करपंकज मि जोडुनि विनावितों ।।
सखिवा रे उदासी न करूं नको गे सखि ।। १ ।।

दरु (शाहना)

सजणी तुं कृपेनें मज पाहिं वो आता ।।
राजसे रुसलीस का व्दिजराजवदनें तत्वता ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण बोलता भामा उत्तर देते पहा.

(श्लोक) कार्याथि तुमची मति मजपुढे कशि वंचना ।।
घेऊनि कुसूमास तीस दिधले हे युक्त वाटे मना ।।
तुझा मि म्हणुनि निशिदिनी बोलोनिया ।। (निशि)
भारति चौघा माजि कसि तुवा जवमति केली सख्यागोपति ।।

(दरु) जायि गा तिचिया सदना अता धाई न करि ।। मधुसूदना रे ।।
कुसुमशर जननीस कुसुम दिधलें जिला ।। असुरकुलमर्दना विसरुनिया मला ।।

(श्लोक) देउनिया कुसूम तीस उगीच घाई ।। अतां किति करिसि तूं भुजगेंद्रशाई ।।
कापटयपूर्ण मजपासुनि हे शिकावे ।। स्वामि इतःपर अशग्रहि टिकावें ।।

सूत्रधार : भामेचे वाक्य ऐकून श्रीकृष्ण उत्तर देतो पहा.

(श्लोक) अर्णिता विधि सुते सुमनासि । भासले त्वरित हेंच मनासि ।
हा पुरीत तरुराज असावा । त्यासहि तव गृहीच वसावा ।।

(श्लोक) सांगितल्या बहुत अद्य न येति वाटे । केला प्रयास अवघाहि निरर्थक वाटे ।।
झाले अहा परम निष्फल येथे येतो ।। शेखीं तूंते कळुनि येईल हे क्रियेनें ।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्णाने समाधानाकरितां सत्यभामा प्रत्युत्तर देते पहा.

दरु : (देव गांधारि)

न कळत म्या केला । सखया कोप न कळत म्या केला ।।
तो न करि जे क्षमा होऊनिया सकपल लोकनायका प्राथिते असूप ।।

**सूत्रधार** : यापरि भामेने प्रार्थिता श्रीकृष्ण उत्तर देतो पहा.

**वचन** : प्राणवल्लभे हे तो केवढो प्राण मागितल्याहि देईन तेथे या वृक्षाचा पाडकाय

**सूत्रधार** : येणेरिती बोलून दौवारिकास नारदास आणि म्हणून अज्ञाधितां देवऋषी येतो पहा.

**(दरु)** (यमुना. येतसे मुनिनाश नारद)

**सूत्रधार** : येणेरिती नारद येता श्रीकृष्ण बोलतो पहा.

**दरु** : (राग गौल्लिपं)

आणि मुनिराया वृक्षराजया ।। साहसतो बहुसाल करूनिया ।।
त्या हरिलागि त्वरित बोधुनिया ।। १ ।।

**सूत्रधार** : ऐसे कलहप्रियास अज्ञापितां तो अमरावतीस जाऊन देवेंद्रास श्रीकृष्णासाटि पारिजात वृक्ष मागतां तो वृक्षासह वर्तमान देवराज येतो पहा.

**दरु** : (राग गुंमताबोधि. तालशापू)

येतसे देवेंद्र हा यौनिसवे ।। येतसे हरि पारिजातासहित देवदेव बासुदेव दर्शनार्थ ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती देवेंद्र येऊनि श्रीकृष्णास विलोकून बोलतो पहा.

**(दरु)** घेई तू आता कृष्णा वृक्षराज हा ।। घेईतु आता ।।
कामपालानु भामिनि प्रितिची काजनका त्या सत्यभामेसि देई सुरुवि ।।

**सूत्रधार** : येणेरिती बोलून देवेंद्रानि पारिजातकवृक्ष श्रीकृष्णास समर्पिता श्रीकृष्णाने तो पारिजातकवृक्ष सत्यभामेस देऊन तीचे समाधान करून देवेंद्रास विलोकून अभीष्ट वर माग म्हणून अज्ञापितां तो बोलतो पहा.

**(श्लोक)** सभ्दाषिकांसि सहसा विपदा न लागो ।।
त्याचे धरि सतत सिंधुसुताहि कोणी ।।
अव्दैत बोध सुखसाहृदईचे जागो ।।
देवोत्तमा तुज अम्ही इतुकेंचि मागों ।।

**सूत्रधार** : येणेरिती देवेंद्राचे वाक्य ऐकून त्याचे मनोरथ परिपूर्ण करून श्रीकृष्णदेव नित्यानंद मंदिरा आला पहा.

**दरु** : (राग शुध्द सावेरि. आदिताल)

नित्यानंद मंदिरासि सत्यानंद सुखसि सत्यभामेसहित श्रीकृष्ण परिवार आला पहा ।।

**(श्लोक)** प्रताप रामी दृढभक्ति जासि ।। प्रतापसिंह वेद्रगुणैकरासि ।
ते पोथि या सुंदर नाटकासि । केले पहा हा शुभदायकासि ।।

**समाप्त**

---

# १४. स्यमन्तकोपाख्यानं नाटकं

॥ श्रीरस्तु ॥

नाटचारंभ करून गणेशाचरित्र मुख्य नाटक नाचवून याचे मनोरंजनवयाकारणे कवि इष्ट देवताची प्रार्थना करितो पहा.

(श्लोक) विजयवैभव मंगल दायका ॥ निजजनाद्भुत सुख दायका ॥
गजमुखा वरदा कविनायका ॥ तुजनमु अजि सिद्धि विनायका ॥
ये गणेश प्रार्थना केल्यानंतर सरस्वती प्रार्थना करिते.
आता प्रार्थूं वागधिष्ठान वाणी। ध्याता जि ते प्रकाशवाणी।
वीणाहस्ते वाजवी रम्य वाणी ॥ नाना विद्या मूळी जे कीर वाणी ॥
ये भारतीची स्तुती केल्यानंतर महाविष्णुची प्रार्थना करितो.

(श्लोक) सत्यज्ञान सुखैकसार जलधि गंभीर जने शोभला ॥
प्रत्यग्रूप अनुपमान निखिलाधिष्ठान कर्ता भला ॥
मोहाते हरुनि स्वधाम वितरी जो भेद खेदातुरां ॥
तो हा सद्गुणधाम राम नमिला श्री देशिकांचा तुरा ॥
श्री महाविष्णूची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो.
जीवेश व्दय एक सिद्धन अचिभै लोक्यते ॥
वेगळे ऐसे वेदरहस्य सुचवू निजाविज्ञानमुद्राबळें ॥
मौनेचि हरि शिष्य संशय तथा व्दैतात्मक स्फूर्ति लावूंदू ॥
त्या गुरुमूर्तीला समरसे श्रीदक्षिणामूर्तीला ॥
ही सकळ देवतांची प्रार्थना केल्यानंतर गणेशप्रार्थना केली असता तो गणेश प्रत्यक्ष येतो.

(दरू) कोंदूंनि आनंदभरें। येणें रिती विघ्नेश्वर आल्यानंतर नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पहा.

श्रीशुभंमस्तु ॥ दाता असुनिया त्या सविश्व रचूनि धाता सुखें जाहला ॥
श्री तारकेशहि शाप गिळुनी सीतात्मता लाभला ॥
गीताच्यार्यहि आळ येउनि मृषा ध्याता जयाते तथा ॥
पूतात्म घडला घडो सुमुख तो दाता स्वसौख्य सदा ॥

सूत्रधार : येथे श्री प्रतापरामचंद्र स्वामीच्या महोत्सव पहावयाकारणे सकळ रसिक भक्त मंडळी मिळाली आहेत. तरी श्रीगणेश चरित्र प्रधान नाटक नाचवून याचे मनोरंजन करावे. ह्या दिव्य प्रबंधाचा कर्ता कोण?
प्रताप राम कवियाचा महाप्रभाव ऐका.
धर्माची तरि साळ आश्रित जना माहेर माये परि ॥
सौजन्या प्रति जन्मभूमी करुणा साकार हे की बरी ॥
शक्तीची तरि खाणी मुक्ति जनक ज्ञानद्रुमा जी ॥
जे ही देवब्राम्हण पालनैकपर जो देवेंद्र साक्षात् मही ॥ प ॥

पाद्यगणाध्यक्ष प्रबंधी प्रशस्त की। कर्ता प्रतापराजेन्द्र श्रेष्ठ सभ्य तसेच का (व्य) प्रवीण सर्वही आहे. आम्ही भरतशासनी, देवे समग्रमग्री मिळत आजचे दिनी.

परंतु म्यां एक महत्कार्य आरंभीत आहे. त्यास प्रतिपदी विघ्न होते यास्तव चित्त उव्दिग्नता पावले.

सूत्रधार : असे कोणि प्रारंभिता गणेशाची प्रार्थना केली नसेल. पूर्वी हे थोरथोरानी विनायकाची पूजिता कार्यारंभ केला ते काय शिखरा न चढतां ? पुन्हा विघ्नहरा शरण सर्व अभीष्ट सिद्दी प्राप्त झाली. तूं इथें प्रमाणेच गजानन नाचे पूजा प्रकरणीं तत्पर हो. असे संवादतां गणेश सभेस येतो म्हणून सभास्थांस सावध करायास द्वौवारिक येतो पहा.

(दरु०) दंड मोठा टोणया.

सूत्रधार : येणेरिती दौवारिक येऊन सभास्थांस सावध केल्यावर गणराज येतो पहा.

दरू : खावी (आदिताल)

गणराज मंगलनिधी येतसे मोठा।
खा बी
गजराज मंगलनिधी येतसे मोठा ।।
कनवाळ भक्त संनिधी प्रणत जनार्थी निवारण दीक्षित।
प्रणवात्मक जो प्रथित गुणोदाधि ।।
समर समदजळगंडीहुनिया ।। विमळ गळतसे फार ।।
भ्रमती सोहनिनदे बुधजन भ्रमर तेथ अविकारा ।।
समुदि भुवनी वसती मणवनी योदर धोरा ।।
समुदित पूर्ण प्रसादे झडकरी शमवी विघ्न घोरा ।। १ ।।
सिंदुर मुख समवदन निजाश्रित। बंधु हृदज विहारी ।।
सिंधु सुखाच्या निरुपम सांदा ।। बिंदु कला ती भारी ।।
सिंधुरचार्चित त्रिभुवन मोहन सुंदर दिव्य शरीरी ।।
उंदिर वाहन सकल कळाचे ।। मंदिर तरी भवनीरी ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती गणराज येऊन सभेत बसला असता दौवारिक येऊन विज्ञापना करितो पहा.

(छंद) जय जगत्सा ते चालविग्रहा ।। जय निरामया जी सुखावहा ।।
नयविदाग्रणी दर्शना विधी ।। ऐक तूंझया येतसे सुधी ।।

सूत्रधार : एणेरिती दौवारिकाने सूचना करता विनायकाचे आज्ञेवरून ब्रह्मदेव येतो पहा.

दरू० : सावेरी (आदिताल)

धाता येतसे येथ आता पहा ।। पा०
येतयेत शातकुंभ गर्भ पुनीता ।। अ० ।।
नीतिपारग गुण सागर ।। अ ।।

वेदपठत तव वदनी चारी ॥
विदित वेद्य जो कां खारी ॥
वेद धरुनि निज व्यापारी तो ॥
विमल हृदय हृत परिवारी ॥

सूत्रधार : येणेरिती ब्रह्मदेव येताच त्यावरती सनत्कुमार बोलतो पहा.

(छंद) मुदित मूर्ती तूं मा जया जगी । वुदित कासया लागी हे दुभी ॥
हृदयीं तुझ्या या पेदधी महा । वद निमित्त ते सद्‌गुणावहा ॥

सूत्रधार : तृषाविषादभरित चातकावरी अकस्मात् वोळल्यापरी ॥ कं ॥
चकोर तृष्णारंघारुरूपूर्ण चंद्रोदय झाल्यावरी ॥ कं ॥
जठरानलप्रबल ज्वाला व्याकुळित मनुजामुखी सुधाकवळ पडिल्यापरी ॥ कं ॥
संसारतापसंतप्त जनाला सुनायासें सज्जन सहवास लाभल्यापरीहा ॥
स्वत: एव गजानन निजादृष्ट विभवे दृष्टी गोचर झाला.

सूत्रधार : येणेरिती संत्रादून विघ्नहरानिकट येऊन प्रार्थना करितो पहा.

दरू० : अहेरी त्र.

सुप्रसन्ना हे सुरेशा सुपुसन्न हे यि अप्रमेयगुणा ॥
क्षुप्रमजप्रति स्वप्रभ मूर्त ॥ १ ॥
सृष्टि रचु जाता दुष्ट विघ्नेमजा । कष्ट करीती प्रणष्ट विते सर्व.

सूत्रधार : येणेरिती सांग पूजन पूर्वक ब्रह्मदेवाने स्तविता विघ्नेश्वराने सकळ विघ्ने निवारण करितां करून त्याला सृष्टीरचना सामर्थ्य समावून निरोप देऊन प्रमोदाने मोदक झेलीत विनायकाने नित्यानंदमंदिरास येता, चंद्राकडून महदपराप घडता, त्याला शापरूप दंडास पात्र करिता, परिजना परम पतिव्रता रोहिणी त्वरीतही दृष्टीगोचर होऊन शाप फिरवावा म्हणता ते अलक्ष करुन स्वधामी गणराज प्रवेशल्यानतर वाणी येते पाहा.

दरु० : (आहीरी).

मोहनरूपिणी ते हरिणाक्षी ॥ ये सौख्यकेणी येते ॥
रोहिणी उहापोहा ॥ विशारदतील वेणी ॥ १ ॥
चंद्रमुखी जे चंद्राच केवळ इष्टराणी जाली ॥
सांद्रखेदें कृशचंद्रापरी जीची देहवाणी ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरिती रोहिणी देवी आल्यानंतर तिला प्रज्ञावती सखीनें खिन्न कां आहेस म्हणून विचारितां, प्रत्युत्तर देते पाहा.

(श्लोक) जीलागी एकचि असे सवती तियेते ॥
वाचक दानव दवे असुख स्त्रियेचे ॥
सव्वीस सोळ असल्या असल्या न हाणि ॥
दुःखास ती सश्रुत हेतुज कीरवाणी ॥

(छंद) पतिगुणी जरी प्रीती याविजे मती । मती तदर्थी ऐकिजे ॥
प्रतिदिनी तया लागली कला । अतिसूये वरी राग ये भला ॥

(श्लोक) दोषाकर सदाच्याही बुधासि मित्रता नसे,
कलंक कमलावरी राजयक्ष्माहि ज्या वसे ।।
'आधीच तारे त्यावर गेले वारे' या आहाण्याप्रमाणे आता नवा एक अतिशय जाला. हे तोचि ऐका.

(श्लोक) पूजा वावुनी ब्रह्मया करी ।। बर राजागणाच्या बळीं ।।
हा जाता निजमंदिरासि पडिला राजाननी भुतळी ।।
डोलाते तिरखूनिया सोळा कलांचा निधि ।।
लोदाक्षी बहु हासला नुमजता कोलाहले मंदधी ।।

(श्लोक) आरूढ लावुनि ढेरापोटा ।। लपेटिला त्यावरी सर्पमोठा ।।
गजास्य दुर्वांकुर हि तुराजा ।। हासे असे देखुनि विप्रराजा
रूपाच्या मगजे सुधांशु हासता तो पाहुनी ता करी ।।
कोपाने मग विधीला गजमुखे शापा येथे अंतरी ।।
जो पाप्यानें रखिलें तूं ज्या दुरिता रोपा मृषा ।।
तो अति । हे पात्र त्रिजगीं यदार्थ वरतो हे पातकी मुखौ भारती ।।

(छंद) परिसुनि असा शाप ती स्वयें ।।
परमताप कं पावुनिसये ।।
हरिण लाञ्छने ही धरूनि हा ।।
शिरकला कुठें नेणवे अहा ।।

दरू० : केदार गौड.

खोटें कपाळ माझें कोणा सांगूं मी ।।
कुठें गेल्याही न सुटे कोमलांगी हे सखे ।। १ ।।
राज्ञला मजसीं प्राणनाथ म्हणून निजाणा ।।
ताता निकटीं बहीण वी देता गाऱ्हाणी ।।
जात राषें तयानें हातव रोगी ।।
जाल जात कीं जलातु जमात ठाऊक हें कं ।। १ ।।
विरहिणी नारी प्रति वल्लभ माझ्या अति ।।
किरणीं तापितां सजणी करुणा त्यजुनी ।।
परम रोषें सृष्टिसन मणुनी चंद्रा नेणाशी ते शापिले त्यांनी ।।
स्फुरतो हा भाव मनीं ।।

**सूत्रधार** : रोहिणीचें वाक्य ऐकून अज्ञावती बोलते—
मित्राशीं मिळुनी प्रकाशतनयो मोठा जडात्या पहा
ज्याला ही सुरकल्प तत्त्वधुरि ते लोक कवळकी महा ।।
त्याते उच्चपदापिधिवर पीडी देता
प्रभुने तर ही ।। चंद्राचे परि शेवटीं करिल तो त्याचीच पेमस्कता ।।

**सूत्रधार** : अज्ञावती सखीवाक्य ऐकून रोहिणी बोलते पहा.

(श्लोक) सोडून जरी मज वसे कधीं निराळा तो अजि निष्ठर करूनि की अंतराला ।।
माते त्यजुनि सखिये अतिदूर डेरा ।।
हा पापकर्म परिपाक कसा उदेला ।।

सूत्रधार : येणेरिती चिंताक्रांतचे ध्यान रोहिणीने करितां अत्यंत खिन्नचंद्र येतो पहा.

दरू : आनंदभैरवी.

सोम येतो पहा ।।
होमायिले मुखसि मानसे खेदाव्योमकेश शिरोमयाद्धा ललामअमृत कलामयांगक
अपराध निजमनीं आठवीत ।।
अपला तो प्रतिक्षणीं ।।
अुपहास कवणाचा अता न करी साचा ।।
वर तया परविदन वैखरी हृदयजात सुहृद सभांतरीं ।।

सूत्रधार : चंद्र येऊन तेही रोहिणीप्रति बोलतो.

(दरू०) कोणातरील संकटी जा.
अनुकंपे कोणें अंतरी पघळू ना ।।
हरिला जाऊं जरी शरणे मि सये तरी तो पसणुकृतीच्या दया नये, माझ्या
अपहासे अपुल्या तनयाचे केला ।। कोण त्यास्तव कांतकाळा ।।
गुरुचीच्या महिम्या धरिती यासाठी परिपूर्ण वैराभर झाला
चंद्र रोहिणीसी बोलित ती संवादितां आकाशवाणी झाली. विसिज्जे अगा ये सुधाकरा, जेथें हरपली वस्त तेथेंच पाहा. वियान्यायें गणेशाच्या शाप त्याच्या दयेनीच वारावा तरी प्रार्थनापूर्तक यथोक्त पूजा केल्यानें सुमुख सुमुख होऊन शापदोषापासाव मुक्त करील, हें वचन ऐकून चंद्र बालचंद्राचें स्तवन करितो पाहा.

दरू० : हुसानि (हुसेनी) अटताल.

तुजविणें नाही दुसरी गत मज, गजमुखावरदहि खंडित हे भुजा ।।
अंत कितितरि अद्यापि पहासी ।।
संतुष्टक स्वास्वस्थळीं आहेसि ।।
अंतर पडिते आता छमूनियां ।।
अंतकांतक आत्मजा पाव सदया ।।

सूत्रधार : येणेरिती चंद्रानें स्तोत्र करितां गणेश येतो पहा.

(दरू.) गणराजा.

सूत्रधार : येणेरिती गणराज आल्यानंतर त्याची चंद्रानें यथोक्त पूजा करितां विघ्नहरानें संतुष्ट होऊन अभीष्ट वर मांग म्हणतां तो विज्ञापना करितो.

(श्लोक) ज्याचे दर्शन इच्छितो अनुदिनी या जंगमस्थावरीं ।।
अधला भरिते भय निरवधि जो का बुदेल्यावरी ।।
ईनामा चंद्र असा जयाप्रति आला आल्हारक ते ।।
भला त्वच्चापें पतिता परिणहति कोणही ऐशा मला ।।

**वचन** : तरी दयेनें यथापूर्वक सर्वजन दर्शनार्ह करावे.

**सूत्रधार** : येणेरिती चंद्रवाक्य ऐकून गणेश बोलतो पहा.

(श्लोक) सुटला बाणा हा भूमाते न पिर्थे जेविसर्वेदा (फ)
माझे वचन हे नोहे ती चंद्रा तैसेचि अन्यधा ।।

**वचन** : तदापि ब्रम्हदेवाच्या वचनगौरवान्वये तुझ्या भक्तीच्या अतिशये शापदंडास स्तखंड करितो.

(श्लोक) भाद्रपद चतुर्थीस अदृश्य घडी शिखरे
लटका आळ येईल पाहाता तै तुज त्वरे
ह्या दाक्षिण्यास्तवही आपण क्षमापण केले ऐसे
वारणाने शाप निर्हीण करितां, आनंसांद्र चंद्र रोहिणीसहित निजमंदिरासी आल्यानंतर उद्धवानिसहित श्रीष्ण येतो पहा. कृष्णरूपी जो विष्णु त्याचा तूं पूर्वज म्हणुनि

दरु० : (सुरती आदिताल)

तो हरि येतो पाहा, मोहार्णवहा ।।
घन समजाची तनु अति सावळी ।।
प्रणतहृदयीं अनुदिनीहि सावळी ।।
कर शमली धरी ।। धरचक्र व्दय परमात्मज
जो परिपूर्ण अव्दये ।।

**सूत्रधार** : येणेरिती श्रीकृष्ण येऊन सभेत बैसला असता, यकायकच अभ्दुत प्रकाश फांकतांच उद्धव बोलतो पाहा.

(छंद) प्रणत वत्सला प्रीति उत्तरी । विनवितो तूंते वृष्णिकेसरी । दिनमणी तुझ्या दर्शनीपहा । अनुपम द्युति अद्य देत हा ।।

**सूत्रधार** : उद्धव वाक्य ऐकून श्रीकृष्ण बोलतो.

दरु० : (राग सवेरी. आदिताल)

हा राजीवास्त तेजोमय समाजिते
ह्या आराधूनी या निरामयाते लाभिजेले ।।
भारास्वर्णास दिये ।। १ ।।

**फ०** : नोहे सर्वथा सविताहा मोहकावहा माझी घ्या ते रत्न गळ्यामाजी घालून वरू जेरी येतसे महाविष्ट तेणे कांतिमाजिपाक

**सूत्रधार** : येणेरिती श्रीकृष्ण संवादित असता समाजित येतो पहा.

दरु० : (कन्नडा. आदिताल)

समाजित तो समासजनवृंद ।। सतास ज्याच्या खासे ।
वरुणार्क बिंबासमान स्यमंतक

**सूत्रधार** : सभासजत येउनि वर्तमान सांगतो पहा.

छंद : आपुली ये दये आत्पवत्सला तो मला
सपदि हा मणि श्रेष्ठ दीधला ।।
अपरिमेय जो कांतीने भला ।।

सूत्रधार : सत्राजीताने सविस्तर वृत्तांत निवेदून स्वमंदिरी प्रवेशल्यानंतर, दौवारिक येऊन ...... पहा.

दरु ० : (अहिरी शा)

शिरुनि नपि का गेहे व्दारकेशा येक जोशी
थारला हे व्दारदेशी ।। थोर अरोनि अमाशी दर्शनाचिया ।।
देविदेवा स्वभेटीच्या ।। देऊनि लाभ व्दिजाचा ।।
निववजे जीव पै याचा ।। निर्मळासाचा ।।

सूत्रधार : दौवारिकाने वर्तमान निवेदिता श्रीकृष्णाज्ञेवरून जोशी येतो पाहा.

दरू ० : (वृंदावन सारंग)

जो जनेशी येतो पहा ।। जो योग्य महा ।।
संचार ज्यासी सर्वत्र पंचागाचे हाती पत्र ।।

सूत्रधार : जोशी आल्यानंतर त्याप्रति श्रीकृष्ण बोलतो पद्यम् (तेलगू पद्य)
निपुण गमतां अहो निरुपम ज्योतिष: आपण ।
शुक्ताहुनि अधिक माते ।।
सपदि सांगा मला सकळ होणार का सुफळ हे ना तरी दुष्ट जेतें ।।
लपन दाक्षिण्य हे लवलेशही नाही लव विनाशे कथा कलित वांचे ।।
अपरिमित भाग्य मी अर्पतो जाहला । उपरिभवदानने उक्त साचे ।।
विद्यवाक्यच मजविद्यामानी, सुप्रमाण त्वधी सूज्ञमानी ।।
क्षिप्र कीजे दया क्ष्मासुरेशा, मी प्रभू प्रार्थितो मित्रभासा ।।

सूत्रधार : जोशी :

दरू ० : (शंकराभरणा. अटताल)

दीजे दिनकरा कोण दीप्ति मोठी, शिकवीजे कोण बुद्धि गुरुशीं वीरजेठी ।।
भाविक रक्षका तूंज जिवलगा कोण ।। भावि फळ सांगिजे हे तेंचि जागा ।।
शीतळता कोण द्यावी इतिकरा ।। जातवेदा रोषण जाणे ।।

वचन : तदापि आज्ञा प्रमाण. भावि फळ सांगतो. ऐका.

श्लोक : नगोद्धरण राक्षिता प्रजसमस्त दोषागिता ।।
अगोधरि तुझ्या शिरीं अमृष आळ येईल गा ।।
स्यमतंकमणि तथा परम दिव्य नारी मणी ।।
अमंदमतिलब्ध हे घडती तूज मानी मनी ।।

सूत्रधार : येणेरिती भवितव्य प्रकार जोशाचे सविस्तर सांगता जांबवती आणि सत्यभामा दोन्ही स्त्रीरत्ने आपणांस अनुरूप अपरूप लाभतील म्हणून हर्षयुक्त शृंगारजनीं प्रवेशून विषय लोलंगत घडन अंतरंगास्थिती श्रीरंग बोलतो.

**(श्लोक)** ज्योतिदर्शन कोविदा न कळिता। म्या प्रश्न केले कसा ।।
तन्मूळे हृदयीं सदैव जडला ।। त्या सुंदरीचा ठसा ।।
जैसा बाळक चंद्रमंडलकरें आकर्षू इच्छितसे ।।
वाटे दुर्घटण फार हे कटकटा साहित्य तीचे तसें ।।
श्रीवत्सलांछन तू महा स्वच्छ कुत्सित चोरीचा डागा इच्छितीला वायो मोघाच्या तुम्ही.

**वचन** : तोच प्रकाश सांगतों ऐकावे.
प्रभूतावा रत्नासाठीं प्रशेमाची केली आटी त्रिभुवनी लोक थाटी।
न भीता हे जोत गोठी ।।

**सूत्रधार** : येणेरिती दौवारिकाचे वाक्य ऐकून कृष्णा बोलतो पाहा.

**(श्लोक)** विच्छा येईल आळ हे वचन तो झाले व्दिजाचे।
जैसे मौक्तिक शुक्तिकेंत निवजे तेणे परिजे भले ।।
रुष्टाचे (ष्पा) उदर कृशोशदर रज्जनी जन्माप्रती लाभते।

**सूत्रधार** : येणेरिती संवादत जांबवतीचे ध्यान धरून स्वमंतक मणी शोधतार्थ आनंद-बोधस्वरूप श्रीकृष्ण निघाल्यानंतर जांबवती प्रज्ञावती सखीशी येते पाहा.

**दरु ० :** (जुजा पंक्ता)

येतें जांबवती हे रूपवती। चंचलाक्षी सुश्रोणी ।।
चंचरीकाम वेणी। चंचलाशुक धारिणी ।।
चंद्रतहारिणी ।। १ ।। चंपकदाम वर्णिनी ।।
चंद्रापवदनी। संपत्र गुणगणी संतत्य विरहें मनीं ।। २ ।।

**सूत्रधार** : जांबवती येउलन प्रज्ञावतीस बोलते।

**दरु ० :** (आहिरी. आदिताल)

निरखिल्याविणें नयनीं निजनाहें ।। वाडें ।।
विरहानल भडका विजना हे ।। १ ।।
कलकंठी धरुनि माझ्या कवणेला।
आणि बलदेवा नुजा नलवी बहुवेळां ।। २ ।।
मदनबाधा नसो हे मज पाहीं चंद्रा ।।
वदनीं याशीं उपाये वद कांही ।।

**सूत्रधार** : येणेरिती जांबवतीने आपल्या विरहवेदना प्रकार सांगता प्रज्ञावती बोलते.

**(श्लोक)** मनुष्याच्या वाहनानन तविळितारािधपमुखी तरी
श्रीणीभारालसगति विभारा निजसखी स्मराच्या
या पारावीण हृदयें धाराळ जाहला कसा।
माते सारनिगरी अतिसार्थाचि बळा ।। १ ।।
तरुण पुरुष दृष्टी पाहिलावीण बाई
स्मर उकळी आशी तो सत्य येणार नाही।
स्मरण अननुभूता वस्तुतेतो घडेना
सुरुचि न मज याचे मूळ न पै सांपडेना ।।

सूत्रधार : येणेरिती प्रज्ञावतीने प्रश्न करितां जांबवती उत्तर देते पाहा.

(श्लोक) यदृच्छेने चित्रे तिहित असतां दिव्रमणा
मनिं माझे एक स्फुरित अतिकृष्ट द्युतिमणी ॥
यथास्फूर्ति त्याची प्रतिकृति पटामाजी लिहिता
तदाकारें सृष्टी सकळ नटती आत्मसहिता ॥

सूत्रधार : जांबवतीचे वाक्य ऐकून आनंदाने प्रज्ञावती बोलते पहा.

दरु ० : (केदार गौड. आदिताल)

योगाचि सखि ये तूं एकचि। साधन करिता स्वल्पहि सुंदरी।
माधव प्रकटला मानस मंदिरी ॥
यावरुनि तुज यादवपति शुभा। या कर लाभेल वल्लभा ॥

सूत्रधार : प्रज्ञावतीचे वाक्य ऐकन जांबवती उत्तर देते पहा.

(श्लोक) पाताळीं मजला निवास असतो श्रीकृष्ण भूमंडळीं
दोघा योग घडले केविं मासि तूं शाहणी आगळी।
कोठें कुत्सितपे तनू नीपजली जे तुच्छ रुक्षाकुळीं।
कोठें पूर्णसुखैक विग्रेह हरि जो जसलाणा कुली ॥

(छंद) तो मज केविं लाभले हेमांगि हा
जो महाप्रभाव सद्गुण सुखनिंदसी पूर्ण अहा।
सुवंदनिया चारित्र्य मंदभाग धेय केवळ निंदिताकृतीलागी पावन।

सूत्रधार : येणेरिती जांबवतीचे वाक्य ऐकून प्रज्ञावती बोलते पहा.

वचन : देवि तूं बोलिता माझे राहणे गुहेत. श्रीकृष्ण देवाचे राहणे भूलोक. कैसा योग घडेल म्हणून बोलली सखी. तेरी दैवघटना अघटित तेचि ऐका.

(श्लोक) भूमंडली वसत अर्जुन तो सुरापि ॥
पाताळवासिनी अहीशसुता उलूपी ॥
दैवें तयास घडला परि योग जेवीं ॥
तूंही तशीच प्रभूशीं मिळशील देवी ॥ १ ॥
कुब्जेस रूपवतीही करूनि जयाने ॥
केले निजानुभव योग्य जन्म याने ॥
तो केवि तुज्या अनुरूप करून बाई ॥
नेंदील आत्मसुखसांग पदोधिशायी ॥

सूत्रधार : येणेरिती प्रज्ञावतीनें समाधान करितांच उत्कट अनुरागे जांबवती बोलते पहा

(दरु) सुखसिंदुर प्राणपति का वो न ये शेखरदेवांच्या ॥
सुंदरत्वा व्रजसुंदरीशीं पुन्हा चर्चा करून रतलाहे ॥ १ ॥
एक घडि मज देख तयावीण हे करमेंना माये ॥ २ ॥
जिवलगास जाउनी विनवी भाव धरून पाहें ॥ ३ ॥

**सूत्रधार :** येणेरिती जांबवतीचे वाक्य ऐकून प्रज्ञावतीने तुला शीघ्र भगवंताची प्राप्ती होईल म्हणून आश्वास करितां तव्दचनी विश्वास धरून ध्यान लक्षण गहन बिळाचे ठायी प्रवेशल्यानंतर स्यमंतक मणी शोधनार्थ श्रीकृष्ण जाबवंत गेल्हातर्यासाच्या याच्या बिळात जाऊन बहुत दिवस झाले म्हणून प्रियवंद मैत्रीस उम्दव येतो पहा.

दरू : भैरवी ।। आदि.

उद्धव येतो पहा श्रीकृष्ण भक्त शुद्धमती तो जो महा।
उद्धव सगुण अनुद्धत चिंता। रूब्ध अतीज प्रबुद्ध सचिव जो ।।

**सूत्रधार :** येणेरिती चिंतातुर उद्धवाला विलोकून प्रियवंद बोलतो पाहा.

**श्लोक :** अव्दैतनिष्ठ परिपूर्ण सुखानुभूति तूं योगीराज सहरूप समस्ता भूतीं ।।
आनंदसिंधुहि तरी तुजलागी चिंता का लागली कथुनि वारी ।।
अगाध किंता ।।

**सूत्रधार :** प्रियवंदाचे वाक्य ऐकून उद्धव बोलतो पहा.

(दरू) गौळीपंतु शापताल ।।

लटिका आळ ज्या वयासी गेला लक्ष्मी सरुक्ष बिळासी कटकट तो गुणरासी फिरुनि कमलाक्षण आला या व्दारकेसी ।।
यास्तव लागली चिंता। माझीया हृदयीं मतिमत्ता।
निस्तुळरूप अनंता। कधि निरखी मी भगवंता ।। २ ।।
बळदेवा तुजे सुखदायी–नेणे–गिळिला तो अजगरे कायी।
बिळगत मृग समुदायी। किंवा मिळुनि कभक्षियेलानेणे वे कांही ।। ३ ।।

**वचन :** श्रीकृष्णासवें योगमाया हेरायावसे योगमाया शंखचक्रगदा पंकजादि शस्त्री अंकित श्रीवत्सांकप्रिया अति ।। १ ।।
व्यापक जो सकळां परमईश्वर आपण
गवसणी जे पाहा त्यासही ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रसन्नमुखी योगमाई येतांच ती प्रतिभंगवंताच्या वृत्तांत उद्धवाने विचारितां ते सांगते पहा.

**(श्लोक)** सिंहे प्रकेश वधिला स्वबळ प्रभावे रिक्षि तयासिही विदा नि यांसवभावें ।।
घेउनिया मणि बिळांत प्रवेश केला।
वृत्तांत हा सकळिकौशिकबोनि गेला।

**सूत्रधार :** येणेरिती योगामायाचे वाक्य ऐकून उद्धवाने भगवंताचा समाचार विचारितां ते बोलिली श्रीकृष्णाने स्यमंतकाच्या अपहार केला म्हणून लटिकाच सत्राजिता आळ घालिता आम्ही समस्तांनी वनप्रांती शोध घेता तेथे सिंहाने प्रशेनासी मारिलें त्यासी जाबवंताने निवटा न बिळांत प्रवेश केला. ते त्याच्या पावलावाटे वरून जाणू अवघेचि बिळव्दारपर्यंत पावतो. तेथे गाढाधकारास्तव समस्तांस प्रवेश दुर्घट झाला. हे वृत्तांत अवघ्यास अवगतच आहे, प्रच्यासंसार वर्तला समाचार सांगते म्हणून योगमाया बोलते पहा.

(छंद) ठिवुनि सर्वही व्दारभूमीसी। नवघनद्युति श्रीहरी मसी।
लोकरि बिळी तो प्रवेशला। तव संख्याचमत्कार वर्तला।
उगवल्या पळयार्थ हवारा। तिमीर जे न करी तरिही वारा।
प्रभुची या नखकांतिलवाने। सकळ ते हरलेच जवाने (भा)

वचन : स्वप्रकाशाच्या प्रकाशाने शतयोजन बिळामध्ये रतरता तो जाबवंताच्या अपूर्व प्रसाद देखला तेथील रत्नाचे कौतुक ऐका.

(श्लोक) चोरूनि या दिनमणि द्युतिलिये शेखीने नेणो. बिळांत शिरले मणि सर्व ते कं, की कांते नेईल रवि आपुली म्हणुन ठेले. समस्तहि तमासि पुढे करोनि ।।

वचन : या प्रकारे कोटिसूर्यासमान जाज्वल्यमान प्रासापत्याचें अंतरे प्रदेश मज श्रीकृष्ण प्रविष्ट झाल्यानंतर.

दरू : ।। सोरटि ।।

दिव्यरूप रमणी देखली। दीप्तिपुंज नयनीजे भव्य पारामणी।
मंडित भूषणीं। भामसकर मधुर भाषिणी उर्वशिही रंभा घृताची उत्तम वधु अन्याच्या सर्वहि ना तुळती चरण जो अशी चांगली । सकळ भुवनि धन्या।। १।। आळवितांनिज अनुजा धरूनि पालख गणपाणी ते ताळ फलस्तनी गदहि गात हालवी आणि रम्य वाणी।।

सूत्रधार : याप्रकारे स्त्रीरत्न पाहिल्यानंतर तजी अरविंदनाभाचें वदनारविंद विलोकून आनंदभरित झाली तेंचि ऐका.

(श्लोक) रोमांचे तनु धाटली अतिशये प्रेमेचि कोंदाटली ।।
नीवीग्रंथी ही सूटली तनुमती तटचाळ ते तूटली।
एकांतस्थिती भेटली भवरसीं यावास वा वाटली।
चर्चा अभ्दुत वाटली म्हणुनियां फार चाकाटली।।

सूत्रधार : येणेरिती श्रीकृष्ण संदर्शने तदाकार होऊन भगवंताचे अंतरंग जाणून स्यमंतकमणी समर्पून प्रीतीपूर्वक संवादतो मनुष्याच्या स्वर वळखून जांबवतीसे अंतःपुर प्रवेशून दिव्यरत्नासहित कल्याणगुण रत्नाकरास विलोकून पुन्हां तो मनीहि रुणध्या म्हणून वृक्षशितकोमणी सज्जता उदयांस महायुद्ध जाले कैसी ते ऐका.

(श्लोक) किरातार्जुना जाहले युद्ध जैसे।
सुरारी रितरासा लागले घोर तैसे।।
जणू भीडली रंगभूमीस जेठी।
झणी पातली तैसी सत्य गोठी।।
निजस्वामि या राम कोदंडपाणी।। २।।
संहतासकळा मिलामु निजनिजो निच्च आराधिला।
अधि गर्व निराधिला मग बळे अंभोनिधि बांधिला।
जेणे रावण बाधिला वितरूनि प्राणव्यय व्यापिला।
लंकेचा गड साधिला प्रभु तो हा तत्थ्यता दे शोभला।।

**सूत्रधार** : येणेरिती जांबवंताने मनीं निधारूनि व्दापाराती श्रीरामाने आपुले दर्शन देतो म्हणून अभय प्रधान केले तें अर्ही या कृष्णरूप दर्शनास्तवेच सफळ झालेतर्ही श्रीराम रूप विलोकनार्थं उत्कट वांच्छा नटते ऐसे जांबवंताने चिंतीतां ॥

**दरू** : ॥ गुम कांबोदि ॥

देखला श्रीराम सावळा ॥ देवाधिदेवामाजी जो उत्तम केवळा ॥
नंद पूतळा । धर चक्रदोनि ते धवा सुंदर जाली । सरचाप वीर पुंगवा ।
नरराज वेषे नरा । नटला कैवल्यठेवा ॥ १ ॥
मंदहासयुक्त चांगले मंगलप्रद । इंदुसमान शोभले ।
राघवाचे कंदर्प कोटि परि सौदर्य जेथे मावले ॥

**दरू** : ॥ रामपदी ॥

याप्रकारे रामरूप कृष्णाते पाहून जांबवंत बोलिले ते सांगतो ऐका.

(छंद) सरस वेष तुझा सावळा ॥ निरजिता मनु 'तो' विसावला ।
पुरली आवड सर्वही बरी मुरलि मोहना दूत हे बरी ।
याप्रमाणे संवादून ऋक्षरायाने जांबवती समेत स्यमंतक मणी श्रीकृष्णासी अर्पिला तो सुखसमाचार सांगावयास मी शीघ्र आलें.
श्रीकृष्णही क्षणात सुलक्षणा जांबवतीसमवेत येईल

**सूत्रधार** : ऐसे योगमायेनें संवादता जांबवतीसमेत कृष्ण येतो.

**दरू** : ॥ मोहन ॥

पद्मनाम निज सभेसि पाहतो । येते पद्मपत्र सदृश नयना ॥

**दरू** : ॥ रामपदी ॥

चिंता रातले । बिंदुपरि मोहसिंधू वलांडुनि ॥
बिंदुकुलें भेदा घातलें । हात जोडुनियां हे तव कैवल्य तातडीनें घरी पातले ।
नामरसायन गोमटें ठेवा ॥
प्रेमभरें बहुभरें घातलें । पद्मिनी वधू समेत ॥
अमित पौर देखुनि आनंदें स्तवन करिती ।

**सूत्रधार** : जांबवंतीसमेत श्रीकृष्णानें आल्यानंतर सम्यांस पाहून बोलिजेले. ऐसें जें म्यां चोरून नेलतां तो स्यमंतक मणी पहा हे वर्तमा समाजिता सहि श्रुतकरा म्हणून बोलतांच समाजित येतो पहा.

**सूत्रधार** : येणेरिती समाजित आल्यानंतर श्रीकृष्णानें स्यमंतक मणि त्याला समर्पिता लज्जाक्रांत होऊन देखास पाहून बोलतो.

(दरू) वावुगाचि आळ भारी । वारिजाक्ष तुजवरी ॥
म्यां उगाचि घातला हरी । देवदेवा क्षमा करी ॥
श्रीमत्तांतमत्कन्या भामा सीमंतिनी सत्यभामा स्वयंतकासी सुखधामा सर्मपितों पूर्ण कामा ॥ २ ॥
येणेरिती बोलतांत तातवाक्य यत्सत्य करावयाकारणें सत्यभामा येते येते सत्यभामा जितस्वंगी ।

सूत्रधार : येणेरिती जांबवती व सत्यभामा या उभयतांचे पाणीग्रहण करून चक्रपाणी आनंद भरित असतां तो नारायण स्मरण विश्रुत वीणारव कानीं पडतां हें काय कौतुक म्हणून विलोकितां नारद येतो पहा.

(दरू) नांरदमुनि येतो पहा.

सूत्रधार : नारद येऊन चिंताक्रांतसारखें रुक्मिणीकान्तास पाहून चिंतेचें मूळ विचारतां श्रीकृष्ण बोलतो पहा.

पूर्वी आधि स्यमंतक मणि म्यां चोरिला म्हणून सभाजितानें लटिकाच आळ घातला यास्तव.

(श्लोक) र्व्दळांतरे धुनिबळें जिणुनि ऋक्षराजा प्रती ।।
स्यमंतक मणी तथा आणिली जांबवती ।।
ससाक्षिक सुरत्न तें परि शीघ्र समाजिता ।।
समर्पुन निवारिला अमृत आळ पूर्णाजिता ।।
सवेंचि गजाच्या आगमनं म्यां मुनि योजिता
तदा खळ सुधन्वयें निवटिलेंचि समाजिता ।।
हरूनि मणि पापियें पळहि येथुनि काढिला ।।
समस्त रमणीमुखें उपरि भाव तो जाटिला ।।

येणेरिती सुधन्वयानें समाजितास सत्यभामा देवीच्या मुखें समोर रत्नापहरून वृत्त कळतांच ।।

(श्लोक) उग्र जें सांद्र निग्रहा या भला । उग्र तो पुण्य सव्दिग्रहा धांवला ।।
अग्रजासि तथा आग्रहें व्यापलो ।। विग्रह शत्रुसि सीघ्र जें पातलों ।। १ ।।
रथारूढ दोघांजणीं पाठिलाग करितां अरि जो भयें व्यापला गा ।।
त्वरें योजनाच्या शता लंघितांचि । मही लोटली अश्विनी दिव्य त्याची ।। २ ।।

ह्याप्रमाणें घोटी पडिल्यावरी शतधन्वा पदात धांवतां म्या रथातळीं उडी टाकून पाठीं लागतां तो हस्तगत जाला ।।

(छंद) झडकरी तथा मर्दुनि करें । हुडकितां गुण अंशुकीं त्वरें
पडच ना जयीं तो सदृष्टिसीं । घडुनि राहलों खिन्न मानसीं ।।
मग तो वृत्तांत रेवतीकांतास सांगतो. क्रूर बोलिला तेंचि ऐका.

दरू : ।। यदुकुल कांबोदि ।।

यावरि संग पुरे तुझा । सांवळिया परी साहे भाव ती
तसा जे तुझी चे तूजा अतिशवाशिवा दुर्शयमनसा
दावि मजपुढती न सहासा । मणिसाठीं पवे मातेहि
घेऊनी वनजाता सदृश नयनावनीं शिरलासी या
घनवैरियासि वाटेहि लावुनी भानु शतसम रत्न लपवून
ज्याने ठेविलें मजसी लपवुनि
येप्रमाणें वुणे उत्तरें बोलून

(श्लोक) विवई देशा बळदेव गेला । म्यां व्दारकेमाजि प्रवेश केला मणि निमित्तें निज अग्रजातें मुडाविलें बोलती लोक मातें माझ्या अदृष्ट विपरीत सांगतो ऐक ।

दरू : ।। पंतुवराळि ।।

लोकांवेगळें माझें देस कपाळ नित्य ।।
एका दान सतायेत । वोखटा मोठा आळ ।।
स्यमंतक मणि हा । न मज ठाउक पाहा ।।
सुमंदमती निज मज चोरठे केली, अहा ।।
श्रम तो वारु सर्वाच्या व्रमुनी सर्व साचा ।।
अमितद्युतिनी ते रत्न आणूनी दीधला तेधवां ।।

**वचन** : पुन्हां बळरामानें म्यां मणि अपहारिला म्हणून लटिकाच आळ घातला.

**सूत्रधार** : येणेरिती श्रीकृष्ण बोलतां नारद उत्तर देतो.

दरू : ।। आळ जुजांवंती ।।

हे काजी तुजचि योग्य रे पाहा ।।
लोक हे वदती म्हणून लाज धरिशि कां महा ।।
चोरटे चोरटयासि म्हणतां थोर ते न्यनता वकाय ।।
श्रीरमावल्लभा सांगे मज हा न्याय ।।
व जो थोर ससेशि अपहारितां कीं गोरसासिन ।।
संजाले रे जन्म गेला कीं ठाउकें थोरांसी जगिं हें ।।

**सूत्रधार** : येणेरिती विनोद करून पुन्हा नारदमुनी श्रीकृष्णाप्रति बोलितो ऐसे जे त्वां भाद्रपद शुक्ल चतुर्थी चंद्र पाहिला असेल तरीच हा मिथ्याविशाप आला. तूं म्हणशील कां चवथीच्या चंद्रा पाहूं नये तरि तें अपूर्व पूर्व कथा ऐक म्हणून वर्तवल्याप्रमाणें चंद्राची कथा सांगून इतःपर लटिका आळ जायासाठीं विनायकाची प्रार्थना केल्यानें तो तात्काळ परिहार करील असें संवादून नारद स्वस्थानास आल्यानंतर त्या वाक्य आकर्णून शूर्पकर्णाचे ध्यान धरितां तो येतो पहा.

**(दरू)** देव सदय गजमुख येतो पहा वासुदेवाजवळी दुरिततमोहा ।।
केवळ सुखधन वंदन रतजनशरणसुंदर ।

**सूत्रधार** : येणेरिती गणेश येता त्याला श्रीकृष्णानें यथोक्त पूजितां तो संतोषानें बोलतो पहा.

**(श्लोक)** मागें अभिष्ट वर तो मग वासुदेव ।।
मागे नको सरू कदापिही देव देवा ।।
मी निश्चयें पुरवितों भजतां शिराणी ।।
प्रख्यात मात अशि शास्त्र तथा पुराणी ।। (वु)

**सूत्रधार** : गणेशाचे वाक्य ऐकून कृष्ण बोलतो.

**(श्लोक)** नकरितां मणिचौर्य हें मला । अकलुषा मृषा आळ जोसें अला ।।
निकट दोष तो वारणें तुंवा । प्रकट मागतों हेंच माधवा ।। (मिधवा)

**सूत्रधार** : कृष्णाचे वाक्य ऐकून गणेश बोलतो.

(श्लोक) माझ्या प्रसादें धर चक्रपाणी। मिथ्यामिशापासि पडेल पाणि ॥
सर्वाची या सच्च हित्त वाणी। मी सांगतों एक मनाशि आणी ॥ १ ॥
तुझ्या चरितासह दिव्य कैसें। अधि ज्याला मृषा आळ कदा न खादी ॥

सूत्रधार : येणेरिती कृष्णाचे वाक्य ऐकन त्याप्रती अभिष्ट वर देऊन गणेश आनंद मंदिरा आल्यानंतर श्रीकृष्णानें विनायक प्रताप चरण करितां – तत्प्रभावें स्यमंतक मणि अक्रूरापाशीं सुधन्वयानें दिला असेल म्हणून वासवाच्या(त्वा) च्ये मनीं उल्लेख होता, अक्रूर येतो पहा.

दरू : वस्तु विचार.

आला कअक्रूर भक्त हा सर्वथा चितीं धाला र भाव हा कांदिप्रियकरा मा। नित्य जो धर्मछंदानुर्वति साचारा। नंदपुत्र जो अविकार त्याचीया पदवंद-मार्गा तत्पर ॥

सूत्रधार : अक्रूर आल्यानंतर त्या कृष्णाप्रती बोलतो

दरू : जुजावंत

न करि मर्जास चाळे। यावरि सहसा ॥
ता करि अक्रूराला देई श्रीकर तो मणि ॥
मी करा सोडुनि तुजला ठीक समजुनि हें या वेळे ॥
ठाउका मज ने ठाव न म्हणुनी भाव मनीं न धरि या ॥
भाव आणि अभाव वस्तु ते। मी बसे विवरिं हें माव सर्व कुसरी ॥
या सामावलीच उदरीं नेणुनि ताव फार केलीया न सुटे ॥
एवढी तुजलागुनि चोरी ॥
ताळकेतन आळ मजवरी घालुनि बसला ॥
की माल लपविला तो ललितमणि द्युतिला–हा ॥
माळवुन दोष देते बाळमणि आपला ॥
मन्मथपाळकासि दावुनी पुनरपि माल घे तुझ्या तूं कुशला ॥ २ ॥
व तूं म्हणसील कीं दिव्यरत्न हस्तगत झाल्यानें पुन्हां देणें दुर्लभ तें रिजो स्त्री जित नोहहम् (हूं)। उन्मत्तहि नव्हे त्याने ही रत्न धरावें, अन्यथा बाधक हाईल. माझी रीती तुला ठौकींच आहे की. सांगतो ऐक.

दरू : ॥ सोराष्ट्र ॥

आवरूं कें स्मरावें का केवळ मी बाईल मेलगा। अवधिया ...... कांलागी ॥
अवगत आहे हा गा। म्हणुनि रत्नावरि कांहीं ॥
मजला तो असे नाहीं। झणि देईना अग्रजा पाहिं
मनि न धरी भाव हा ही ॥ १ ॥
कामपाळ ऐसें याचे। नाम निःसंशय ये साचें ॥
भ्रामक दुसरेंही असे गोमटें व्यसन पानाचि ॥
यास्तव आम्हां उभयतांसही तें रत्न योग्य नव्हे एकदां बळरामास रत्न दाखवून पुन्हां तुला देतो.

**सूत्रधार :** श्रीकृष्णानें पेंचू विचारितां अक्रूरानें स्यमंतकमणि समर्पितां श्रीकृष्णानें सर्व सभ्यांस दाखवून मिथ्यामिशाप निवारून पुन्हां अक्रूरापाशी देतां तो बोलतो.

**(श्लोक)** तो बिंब प्रतिबिंब मी तरि तूं वा तेजोनिधी हा मणि ।।
कंठीं आपलिया सदैव धरिल्या हे देव चूडामणी ।।
जालो मीही अळंकृत प्रभुवरा विज्ञप्ति हे ऐक जे ।।
आहे तुला कोण जितेंद्रिय त्रिभुवनीं त्वत्तुल्य हें सांगिजे ।।

**सूत्रधार :** येणेरिती भक्तानें प्रार्थना करितां श्रीकृष्णानें स्यमंतकमणि धारण करून गणेश प्रसादें मिथ्यामिशापदोष विवारून आनंदभरित निजमंदिरास येणें केलें.
श्री मालोजि नरेन्द्र नंदन भला शाहेंद्र नामाथिला ।।
पुण्यश्लोक म्हणूनि लोक निगदीं चाला प्रपंचातिला ।।
त्याचा पुत्रक सच्चरित्र जगतीं येकेंद्र भाग्यागळा ।।
त्यापासूनि शिवस्वरूप तुळजा राजेंद्र जो जन्मला ।।
प्रताप सिंहद्र कुमार त्याच्या जो अंशीं श्री विष्णू जगत्पित्याचा ।।
उमासती सुकृतकरासी । कल्पद्रुजाच्या न तुले करासी ।।
जो कां त्रिवर्ण गुरुची अपरूपकासी । आधार थोर अजि आत्मनिहाकपाची ।।
तेणें विनायक चरित्र सुरूपकासी । केलें पहा निरुपमाद्भुत रूपकासी ।।

---

## १५. प्रबोध चंद्रोदय

।। श्रीगणेशाय नमः ।।

जयजनकजा रमण ।। जय जगत्रय शरण ।।
जय जनन भय तरण। जय दुरित हरण ।।
जय विबुधनुत चरण ।। जय विशुद्धता चरण ।।
जय विहित परि चरण ।। जय विश्व चरण ।। १ ।।
जय निर्जरा भरण ।। जय निजाश्रित भरण ।।
जय निरस्तावरण ।। जय निर्विवरणा ।।
जय दनुज संहरण ।। जय संदतःकरण ।।
जय सकल सुख करण ।। जय भवोत्तरणा ।। २ ।।
शरण शरण महेश्वरा ।। तूं शरण चंद्रमौथळेश्वरा ।।
शरण दीन दयापरा ।। तूं शरण परम परात्परा ।। ३ ।।
सर्व भूतगुहाशया शिव ।। शर्व रजत नगाश्रया ।।
पार्वती प्रिय चिन्मया ।। यम गर्व हरण निरामया ।। ४ ।।
कलित करि चर्मावराहृत ।। कलित कलुषाडंबरा ।।
कुलिश करनुतशंबरार्दन दळन पर विश्वंभरा ।। ५ ।।
अंधकासुर शासना मोहांधकार विनाशना ।।
संधुता शुभ वासनात्मक बंध वृषभेंद्रासना ।। ६ ।।
मंगळ श्री सीता वल्लभाय मंगळं ।।
नित्य भासुर स्व प्रभाय मंगळं ।। ७ ।।
विविधावताराय ।। विमलैक ताराय ।।
भवसमुताराय मंगळं ।। सकळ लोकाद्याय समुदित
विद्याय अकलंक वेद्याय मंगळं ।। ८ ।।
प्रणतां बुधि चंद्राय ।। प्रततानंद सांद्राय ।।
प्रतापरामचंद्राय मंगळं ।। ९ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नाट्यारंभ करून प्रबोध चंद्रोदय नाटक सुकवि विरचित या रंगभूमिस नाट्य करितो या करितां सकल जनास संतोष व्हाया कारणें कवि इष्ट देवताची प्रार्थना करितो पाहा.

**(श्लोक)** विजय वैभव मंगळदायका ।। निज जनाभ्दुत सौख्य विद्यायका ।।
गज मुखा वरदायक विनायका ।। तुज नमो अजि सिद्धिविनायका ।।

**सूत्रधार :** येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीची प्रार्थना करितो पाहा.

**श्लोक :** आता प्रार्थू वागधिष्ठान वाणी ।।
ध्यांता जीतें धी प्रकाशा न वाणी ।।
वीणा हस्ते वाजवीं रम्य वाणी ।।
ना ना विद्या मूळ जे कीरवाणी ।।

**सूत्रधार :** येणेंरिती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णुची प्रार्थना करितो पाहा.

**(श्लोक)** सत्य ज्ञान सुखैक सार जलधी गंभीर जो शोभला ।।
प्रत्यग्रूप अरूपमान निखिलाधिष्टान कर्ताभला ।।
मोहातें हरुनि स्वधाम वितरी जो भेद खेदातुरां ।।
तो हा सद्‌गुण धाम राम नमिला श्रीदेशिकांचा तुरा ।।

**सूत्रधार :** येणेरिती महाविष्णुची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

**(श्लोक)** जीवेशव्दय येकचित्‌धन अचि त्रैलोक्य तें वेंगलें ।।
ऐसे वेद रहस्य सुचवुनि जो विज्ञान मुद्राबलें ।।
मौनेंचि हरि शिष्य संशय तथा व्दैतात्मक स्फूर्तिला ।।
वंदू त्या गुरुमूर्तिला समरसें श्रीदक्षिणामूर्तिला ।।

**सूत्रधार :** येणेरिती सकल देवतांची प्रार्थना केल्यानंतर नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो पाहा.

**(श्लोक)** मध्यान्हार्क मरीचिकेवरि पयः पुरापरी सर्वही ।।
जाच्या नेणपणे स्फुरें गजन भोंवतांबुते जो महि ।।
ज्याचें तत्वकलों पुरे मग नुरे हे रज्जुसर्पा कृति ।।
पूर्णानंद पासितों विमळ तें बम्हस्व बोधद्युति ।।

**(श्लोक)** कोंडून मोक्ष नाहीतचि पवन बलें लंघुनि ब्रह्म रंध्रा ।।
येतां ते शांतिसे जे हृदय समरसें बाणतां तुष्टि सांद्रा ।।
आत्म ज्योती विराजे परम कशि जगद्यातपयोगीश्वराची च्या भालाक्षाच्या ।।
मीसानें प्रकट जणुतशी चंद्रमौली श्वराच्या ।।

**सूत्रधार :** येणेरिती नाटकार्थ संग्रह श्लोक म्हटल्यानंतरे विघ्नेश्वराची प्रार्थना केली असतां विघ्नराज नांटचरंगि नृत्य करित येतो पाहा.

**(दरू)** कोंठूनि आनंद भरें दोंद हालवित बरें ।।
मोदक झेलित करें गजमुख येतो पाहा ।। १ ।।
मूषिक वाहन मस्त भूषण युक्त समस्त
पाशांकुश वर हस्त विनायक येतो पाहा ।। २ ।।
मंगळ धाम सुंदर ।। आंगी चर्चुनि शिंदूर ।।
संगीत नटनपर गणाधिप येतो पाहा ।। ३ ।।

**सूत्रधार :** अरे पारिपार्श्वका ।। विघ्नेश्वर येवून सकल विघ्नें निवारण केली कीं या प्रस्तुत कार्यास तां सिद्ध व्हावें ।।

**पारि. :** जी मी हाजीर आहें ।।

**सूत्रधार :** सांगतो ऐक (चूर्णिका) ।। येथें असंख्यात विख्यात निलिलादिक चक्रमंडन चोल मंडल स्थिर विव्दन् मंडळी. तथा हृद्यानवद्य विद्यावैशिष्ट विद्योदित

निरतिशयधिविकासवासव गुरु प्रज्ञ सर्वज्ञ नागरिक श्नेणिहि भलि. श्री प्रताप रामचंद्र महोत्सव दर्शनोत्सुक मीनली आहे. तें विव्दांस कैसे म्हणसील तरि सांगतो ऐक.

(श्लोक) तर्किशिक्षित अक्षपादकपिल प्रख्यात सांखी जणू ।।
शब्द व्याकरणि पतंजलि दुजे योगी स्वयंभू म्हणू ।।
मीमांसाद्वितयांत जैमिनि तथ व्दैपायना सारिखे ।।
येकाहूनि विशेष येक मिनले विव्दांस रोशेनिके ।।

(श्लोक) अलंकार संगीत वेत्ते विलोकिं ।।
कलंका विना जे कलांचे निधीहिं ।।
अलंकाम संगें अशि ज्यां सुधीहिं ।। चू ।।
यास्तव वास्तव ।। सुख निधान शांति रस प्रधान ।।
अभिनव संविधान ।। विधान जटिल नाटकाभिनयनें ।।
सहृदय हृदयांनंदकराया कारणें ।।
अंत:करणांते उत्कट उत्कंठा नटते ।। व ।। परि ।।
तरि या सम्यानुसार सारभूत प्रबंध अनुसंधानरूढ होत नाही

सूत्रधार : अरे परिपार्श्वका महाराष्ट्र भाषाभूषित अभिनव प्रबोध चंद्रोदयाख्य मुख्य नाटक आहे. त्या ग्रंथाचे महत्त्व सांगतो ऐक.

(श्लोक) ज्याचे तत्व कलों पुरे सकलहि हृद्ग्रंथी वेगें सुटे ।।
होती अस्त समस्त संशय सवे दुष्कर्म वेहि तेटे ।।
जेथें ते प्रतिपाद्य मुख्य सखया अव्दैत जीवेश्वरां ।।
ग्रंथाग्रेसर हा प्रबंध म्हणुनी जोडोन या दूसरा ।।

वचन : परि कोण या दिव्य प्रबंधाचा निर्माता ?

सूत्रधार : प्रताप राम सद्भक्ती विभवोद्दाम जो महा प्रतापसिंह राजर्षि प्रणेता याशि तो पाहा.

पारि. : अव्दैत रस मिश्र अवोधत मिश्र हर श्रीकृष्ण मिश्र कृत संस्कृत प्रबोध चंद्रोदयाख्य अपूर्व पूर्व नाटक असतां महाराष्ट्र भाषेने पुन्हा करणें निष्कारणें भासतें.

सूत्रधार : सकल धर्म बोधक वेद बंदे असतांहि ।। स्वायंभुव मन्वादिकी सर्वज्ञ मूर्धन्या निमित्त प्रज्ञलोकोपकारार्थ धर्म शास्त्रें केल्याप्रमाणे माहा कारूणिकें या महाराजयानें करतला मलकपाय सकल जनासहि वेदांत सित्धांतावगम सुगम मार्गें व्हावयाकारणे हा वुपाय रचिला. आणिकही याचा स्वभाव महा प्रभाव ऐक

वचन : विविध वर्णाश्रम धर्मतिरोधान, विधानैक तप्तर तुछम्लेछाधिक अधर्म भूयिष्ट पापिष्ठ पिष्ट करून, यथोक्त वैदिक धर्म प्रतिष्ठोपने केल्यापरि विवेंके विद्या प्रबोध चंद्ररूप विमल यतल निर्मूमकामादि व्यूह सहित महामोह निर्नामधेय करून अव्दैत सांम्राज्य सिंहासनी प्रत्यगात्मा वरविला.

**सूत्रधार :** (येणेरितीं पारिपार्श्वकाचे वचन ऐकून मन्मथ पडद्यातून बोलतो पाहा).

**वचन :** अरे पाप्या नटाधमा केंवि अम्ही अनंत सेवक जीवंत असतां महामोह रायास विवेका पासाव पराजय व्यर्थ सांगतोस.

**सूत्रधार :** (येणेरिती बोलून मन्मथ सभेस यायाशउद्युक्त असतां सभास्थास सावध करायास कंचुकी येतो पाहा).

**(दरु)** घडु मोटा टोणपा दृढ टेंकीत टोणपा ।।
उडत उडत हापा झडकरी देतो धापा ।। १ ।।
सरसावीत मीशाला ।। धरुनि दिव्य वेषाला ।।
करित ना ना छंदाला कंचुकी सभेशि आला ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कंचुकी येऊन सभास्थांस सावध केल्यानंतर मन्मथ येतो पाहा.

**दरु :** सौराष्ट्र ।। आदिताल ।।

रतिपति येतो पाहा अति सुंदर ।।
सतत रसिक जनाचा संतोषकर ।।
साचा मल्लीक मुकुलाचा तुरा ।।
मस्तकी साजे चतुरा ।।
हल्लक माणिक्य बुराहें प्रकाशवी फुल्ल ।।
चंपका चाजीरातल्लज आंगी साजीरा ।।
वुल्लस त्कुंदाचाहिरावुद्दाम घवघवी ।।
अतुलित हाती भाला आम्रपल्लवाचा भाला ।।
वितत केवडा ज्याला विलसे ठांक हा ।।
शतशा भृंगाचा मेळ शब्द करी वेळोवेळ ।।
सतत संगीत मेळ सरसमाती जे पाहा ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मन्मथ येऊन रतीचे स्मरण करितां ते येते पाहा.

**(श्लोक)** आनंदावह रूप सुंदर जिचें पाहूनी मीनध्वजा ।।
वाटे किं फुलवाण मार घडतां कीं मार आला दुजा ।।
ऐशि दर्प कदर्पकाशि रचिति अत्यंत रूपागलि ।।
श्रृंगारिं पुरतीरती गुणवती येते पहा या स्थलि ।।

**दरु :** ।।आहरि ।।

येते पाहा रति देवि येते पाहा ।।
सकल सद्गुण श्रेणि ।। सरस अलिकुल वेणि ।।
प्रकट लावण्यखाणि परम कल्याणी ।। १ ।।
येते पाहा मधुर कोकिल वाणी ।। मदगज गामिनी ।।
मृदुल पल्लव पाणी मदनाचि राणी ।। २ ।।
वर युवति जिच्या नखीं ।। विवरितां तुकती नकीं ।।
परि पूर्ण चंद्रमुखी पद्मचि सुनसखी ।। ३ ।।
आलि हे रति बरवि स्वकांति भरें ।।

आवधी सभा भरवि केसरि साडि तगटी ।। ४ ।।
नेसलि काम केसरि कांता स्वकटी ।।
जे सार नारिजवटि ।। शोभवि रत्न बेसर नाकीं गोरटि ।। ५ ।।
कांचन कलशापरि वर्तुळ कुचि कांचोळी झलके जरि ।।
अंचल वरि सावरि ।। गर्जति अंदू संचरतां गजरि ।। ६ ।।
कर्णि भूषणें हलति ।। नटती वर वर्णिनि हार डोलति
वर्णू जियेस भरति नशक्त स्वर्ण वर्ण गौरांगि पुरति ।। ७ ।।

सूत्रधार : (येणेरिती रति आल्यानंतर तिला पाहून मन्मथ बोलतो पाहा).

मन्म. : प्रिये विवेकें महामोहाकस जिकिलें म्हणून नट बोलिला तें लेंयकिकिलें किं त्या गोष्टीस बाधक काय म्हणशिल तरि सांगतो ऐक.

(श्लोक) विलसत हृदयिं विवेक प्राज्ञासहि शास्त्र जन्य हा तोचि ।।
न लगत कटाक्ष भालि जंवरियिंदीवराक्षीची ।।

सूत्रधार : येणेरिती मन्मथाचें वचन आयिकून रति बोलते पाहा.

रति. : प्राणनाथा मोहरायाचा दावेदार विवेक मोटा जोरावर दिसतो.

सूत्रधार : येणेरिती रतीचें वचन ऐकून मम्मथ बोलतो पाहा.

दरू : हुशानी ।।

सखिये अवो प्रिये ।। सखि ये न धरिं भये ।।
समरिं मजला ।। अखिल भुवनि पाहें ।।
अडविता कोण आहे ।। १ ।।
ब्रम्ह निष्ट महायोगि ।। ब्रम्हदेव कन्या भोगि ।।
सुरूचि चंद्रहि बरि ।। गुरूचिच भाज धरि ।। २ ।।
जडमति सुराचार्या वडिल भावाचि भार्या ।।
भरलि गर्भीण पाहा ।। हरी हरी भोगि हा हा ।। ३ ।।
रति देवि वारं वार ।। किति वानू बडिवार ।।
समजे त्रैलोक्य जयीं श्रम माझ्या शरा नाहिं ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती मन्मथाचें वचन अयिकून रति बोलते पाहा.

दरू : नीलांबरि ।।

अयिका हो प्राणनाथा ।। वचन माझें संकट थोर भासतें ।।
सर्वथा मजला वोझें येकाहूनि या येक थोर तिहि लोंकि
शिर जोर असम वळ जुंझार असति ते दावेदार ।। १ ।।
जयांचें घेताचि नाव ।। भयें कडुनि बारा गांव हे मोहादि घेति नाव ।।
दे माये धरणी ठाव ।। २ ।।
समजेते सावधान ।। नियमादिक प्रधान ।।
समर श्रूरहि आन शमादि असति जाण ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती रतीचें वचन अयिकून मन्मथ बोलतो पाहा.

**दरू :** भैरवि ।। कोपाचाच पेटसाहे अपणा किं अहिंसा हे ।।
सर्वथा मात ते वृधा ।। १ ।।
ब्रम्ह निष्ठांचे उत्तम ब्रम्हचर्यादि नियम ।।
झडति मजे पुढति होतां लोभाशिं विग्रह ।।
सत्यास्तेय अपरिग्रह केवूं ते सांग पाहूं ते ।। ३ ।।
नसतां चित्तचि स्वाधीन असकीं योगांगेहि दीन ।।
भिणार पळुनि जाणार ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मन्मथाचें वचन अयिकून रति बोलते पाहा.

**वचन :** प्राणनाथा ।। तुमचें आणि शमदमादि विवेकादिकांचेहि येकत वृत्पतिस्थान म्हणवुनि ऐकिलें किं म्यातरि कांहादावा ।।

**सूत्रधार :** येणेरिती रतीचें वचन अयिकून मन्मथ बोलतो पाहा.

**वचन :** अवो काय बोललिस येकच जन्मस्थान म्हणवून परंतु आम्हां सकलिकांचा जनक येक ।।

**दरू :** कल्याणी ।।

सावधाने ऐक साजणि सहसा झणि कांहि पूर्विल गुज तेणेचि मानस मंदिरि ।। सत्य सुंदरि सर्व समजे तूज असतिच येक पदावरि दिव्यनोवरि नाम मायाहितितें यीश्वर शब्दे जो रूढला तिशि जोडला ।। काज साधुं रतीचें पाहतां तो नित्य अक्रिये परतांयिये चोज तत्संगजितचें लटिकें न तें अधवाखरें ।।
सांगणें बरें हेचि सर्व श्रुतिचें ।। १ ।।
अनिर्वचनीय्य त्यावरि माया नोवरि व्यालि आधि मनातें ।। विख्यात गुण निधिनें तेणे यीश सत्येनें रचुनि भुवनातें ।। परस्पर व्देष संकुलें ।। आमुचि कुलें केली पुन्हां पुन्हातें विस्तारे तुज तें संगति कथूं मागुति जैसे उमजेल नातें ।। २ ।।
प्रवृत्ति निवृत्ति साजणि या दोघि जणि जाण मनाच्या स्त्रिया येक कुळि मोह प्रधान ।। शौर्य विधान व्यालि प्रवृत्ति पांया विवेक प्रधान दुसरें कोप धूसरें लिप्त ज्याचीनकाया ।। निवृत्तिचे ठांयी तें भले ।। जन्मालाभलें ।। स्वामि काज कराया ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मन्मथाचे वचन ऐकून रति बोलते पाहा.

**वचन :** हे प्राणनाथ ऐसें झालें तरि तुम्हास तुमच्या भावाम अन्योन्य कां वैर ।।

**सूत्रधार :** येणेरिती रतिचें वचन ऐकून मन्मथ बोलतो पाहा.

**(श्लोक)** येकामिषास्तवचि येथ सहोदरांशि ।।
दावा पडे प्रकट हें असुरांसुराशि ।।
संग्राम जेथ चवल नृपति जीवाशि ।।

**वचन :** ऐसे सर्वही जग अमच्या बापाने मनानें एमलविलें । अम्ही सलिगिच्ये लेंक म्हणून अटेपिलें वैरियांचा कोठ कोठें थोडका संचार आहे ।।

(छंद) म्हणवुनि अधोन्मत्त हेधुलि ।। अनुदिनी अतां आमुचि मुलिं ।।
खणुनि कढणें जाण यासाटी। पण करूनियां पेटलें हटि ।। १ ।।

रति : शांतं पापं शांतं पापं ।।

दरू : ।। शा० ।।

अमित वैर ज्या कारणान्वयें ।। समजलें मला बाह्य मूळ हें ।।
असलियां दुजा गुप्त हेतु या ।। अजी कथीं त्वरे मानस प्रिया ।।

सूत्रधार : येणेरिती रतीचे वचन आयिकून मन्मथ बोलतो पाहा.

वचन : येथे एक गुप्त कारण आहे.

रती : तें काय नीट सांगितलें नाहि.

सूत्रधार : येणेरिती रतिचे वचन ऐकून मन्मथ बोलतो पाहा.

(दरू) सजणि ऐक हे मात तत्वता ।।
तुज मनांत भैस्त्री स्वभावना ।।
अधम कृत्य हें अद्य दारूण। वुदरि ठेविलें वोन सांगुन ।।

(रति०द.) अतुल वल्लभा तें कसें कथी। अतिशयें मनी आवडि अथि ।।

सूत्रधार : येणेरिती रतीचे वचन रोकून मन्मथ बोलतो पाहा.

(दरू) परिसवो प्रियो पाप हेतुकी। हतक वासना हे वृथा फिकी ।।

वचन : परंतु ऐशि जन वार्ता आहे की ।।
अमुचे कुलीं काळरात्रि सारिखी विद्या नाम राक्षसी उपजेल ।।

सूत्रधार : येणेरिती मन्मथाचें वचन ऐकून रति बोलते पाहा.

वचन : हाधिगि धिगी ।। अमच्या कुलिहि राक्षसि वुपजेल. म्हणतां माझें मन थर थरां कांपतें.

मन्मथ : भीवु नको

रति : प्राणनाथा मग त्या राक्षसीनें काय कृत्य करणें ?

सूत्रधार : येणेरिती रतिचे अयिकून मन्मथ बोलतो पाहा.

(श्लोक) मायाख्या गृहिणी असंग विमुचि तत्संग नस्तां मना ।।
आधीं ते विवुन क्रमें प्रसवली भूरादि लोकां पुन्हा ।।
त्या पासूनिच वुद्भुवेल आणिखि विद्या म्हणूनि सुता ।।
माता तात सहोदरां सहकुला ।। आणील ते बाध्यता ।।

सूत्रधार : येणेरिती मन्मथाचें वचन रोकून भयानें रति भेटतां रतीस पाहून मन्मथ बोलतो पाहा.

दरू : कांबोधि ।।

भीवुं नोको प्रिये भीवुंनको वांचलो अम्ही असतां कैचा विद्योदय ।। १ ।।
विवेक अम्हा पुढें केवढें बापुडे ।। २ ।।

धणिच जाहल्या भ्याड ।। आणिकाचा काय पाड ।। ३ ।।
येणेरीति मन्मथाचें वचन ऐकून रति बोलते पाहा.

दरू : शापु ।। मोहनं ।।

निपज तया घोर राक्षसिण्नीचा ।। नीपट संमत वैरियां काय साचा ।।

(दरू) मन्मथ ।।

त्यासहि संमत तें बहु आहे ।। यास नसे अनुमानविसये ।।
बोध चन्द्र आणि विद्याहि दुसरि रोधक मोहासि मानुनि कुसरि पडनिषदाख्य देवि कडूनि ।। १ ।। अपण ते निर्मावे विवेक सजणि ।। शमदमादिक तयासटिं सत्य ।। रमणि लागले त्यायत्नासि नित्य ।। २ ।।

दरू : यति ।।

प्राणनाथा महा दुष्टानि नित्य हानि करि जे सर्व निदानि ।।
केवि त्या विद्येचा निज संभावाशि ।। जीवियिळिज्ये सद्‌गुणराशि ।।

**सूत्रधार :** येणेरिती रतिचें वचन ऐकून बोलतो पाहा.

**वचन :** सखे वक्र बुधीचा स्वभावच हा पहा.

**श्लोक :** सहज मलिन वक्र भाव ज्यांचा ।। सह मूळ आत्मलयार्थं जन्म त्यांचा ।।
जलद पथि चढूनि धूम पांहि ।। विझवुनि वंन्हिसलोपतो स्वताही ।।

**सूत्रधार :** येणेरिती मन्मथाचे अति क्रूर वचन ऐकून विवेक पड्यातून बोलतो पाहा.

**विवेका :** अरे पापिष्टा ! दुरात्मया केवि आम्हाशीच पाप करणार म्हणवून बरळतोस.

**सूत्रधार :** येणेरिती विवेकाचें वचन रोकून मन्मथ रतीस पाहून बोलतो पाहा.

**मन्मथ :** अवो रति देवि अमचा कुल ज्येष्ठ विवेक येतो ये हे. या करितां येथें राहणें युक्त नव्हे.

**सूत्रधार :** येणेरिती रति मन्मथ बोलून निज निवासास गेल्यानंतर विवेक राजा येतो म्हणवुनि सभ्यांस सावध करावयास शांति सहित सत्संग येतो पाहा.

दरू : ।। शापु ।।

पापाचा करणार भंग ।। आपण शुचि अंतरंग ।।
मुक्तिचें व्दारी ही जो वुतुंग ।। मुख्य पातला तो सत्संग ।।
संत जनाचा जो माहेर ।। संतत विश्रांतिची थार ।।
शांति कांतेशि त्या साचार ।। संतोष सागरी पोहत फार ।।

**सूत्रधार :** येणेरिती शांति सहित सत्संग येवोन सभ्यास सावध केल्यानंतर विवेक राजा येतो पाहा.

**(श्लोक)** अराजे हिराजे घडति जंगि ज्याच्या दृढबलें ।।
चवेयव्दै मुख्यें नृपकुळ पदीहूनिहि भलें ।।
आसाहा राज्यांचा मुकुटमणि मुख्य त्रिजगति ।।
महोत्साहें येतो हलुहलु विवेकाख्य नृपति ।।

(दरू) येतो पाहा जी विवेकराजा येतो पाहा जी हेतु सुखास अहेतुक जो दृढसेतु-भवां बुधि तरणा लागी ।। नवल सुवर्णक श्रवणाचि मकुट हें दिवसेश्वरासमन दिसे मस्तकीं ।। अवघे जींकिन वैरि अवलिला या संतोषे ।। तों तों किटत विकटत रिकिठतक तों थां थलांगुतक म्हणवुनि नटत येतो पाहाजी ।। १ ।।
वारणा गति अनिवाण रति तरवारवारंवार फीरवीत कि ।।
सार शांति फळकांशि वीर मंडीत कर ।।
तारि तकिटा विकटत रिकिट कतं त्धुलंगुतक म्हणवुनि नटत ।।

सूत्रधार : येणेरिती विवेक येवोन मतीचे स्मरण करितां ते येते पाहा.

दरू : आहरि ।। आदिताल ।।

मति देवि येते सुमति ।। मद गज गंती सतत कारूण्य वती ।।
सकल जनाची गती ।। युवति मंडलाग्रणी ।।
युत सर्वगुण गणि कुवलय समता नयनि ।।
कीरवाणी जीवगणो जीवनी ।। विवेक राज रमणी ।।
अवसरि सांगातीनि अवघ्या स्वजनाहूनि ।। १ ।।
शीसफल चंद्रधरि ।। शिंशि रम्यशातोदरि ।।
भासुर कंठसरि ।। भासे कुसरि ।।
कुसुमाची भरजरी कुसुंबी साडि साजिरि
कासे काशिलि वरि ।। कैसि विद्युल्लते परि ।।

दरू : राजस केवळ तृणराज फळस्तनिधन ।।
राजस येतसे करिराज गमना राजीव नयन गुण राजीव सकलहीं जीस ।।
राजे विवेकाख्य महाराज ललना ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती मति देवि आल्यानंतर मतीस पाहून विवेक बोलतो पाहा.

वचन : अवो प्रीये ऐकिलें कि त्वां उत्धट पोराचें मस्तीनें दुर्भाषण. जो आम्हासीच पापिष्ट म्हणतो.

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वाक्य ऐकून मती उत्तर देते पाहा. प्राणनाथा काय म्हणुन की लोक अपुले निज दोष जाणत नाहीत. ऐसें मतीचें वाक्य ऐकुन विवेक बोलतो पाहा.

विवेक : प्रिये वैरियांचे अकृत्य सांगतो ऐक.

(श्लोक) अहा अहंकार परि अधार्मिकिं । बांधूनीया पाशशते सदादिकीं ।
सदाचिदानंद निधी आले पहा ।। केला जगन्नाथचि दुःखिया महां ।।

वचन : या प्रकारे यीश्वरास बंध करून नित्य कष्ट देणार अपण भले त्यास सुटिका करणार अम्ही दुष्ट म्हणून अप्रयोजिक बोलिला ते गोष्टि सर्वधा सत्य मानू नको ।।

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वचन ऐकून मति बोलते पाहा.

दरु० : (कांबोधि)

चोज गमे मजला बहु साल हें ।। प्राणनाथा
मुख्य जो जगदीश तयासही कैंचि बंध गाथा ।। १ ।।
पाणियाशि कैसा लागेल सांगे वोणवारै ।।
नरें आणि वळें करिं केवि यमासहि वोणवारे ।। २ ।।
जेंवि दिवाकर मंडलि नाल्पहि ध्वांत थारे ।।
लटिकी तेवि प्रकाशैक रूपिं अविवेकी हे एक थोर ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मति देविचें वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

(दरु०) परिसें साजणि गुज निज जीविचें कांहि ।।
श्रवण सरिसें दूरि जायल संशय राणपांहि
परमार्थे पहातां स्वरूपिं बंध नाहिं ।।
परि मृगजळ परिपूर्ण नदि परि ।
वरिवरि भासत अनृतचि हाहिं ।। १ ।।
बिंबलि बुधि ते जे चित्कला हे ।।
वुपाधि सबंधे लटिकें बंधन तेचि लाहे ।।
बिंब चैतन्य कांहि ।।
ते न साहे जलगत तपनें अपण चलता
पण गगनि जसा रवि निश्चळ आहे ।। २ ।।
रमणी अघटित हि घडवि ।।
देव गोठि पाहवा ।।
स्वमुखें बडवाग्निही सागर नीर घोंटि ।।
तमहि आछादित पनें मूर्ति मोटि ।।
अमित शिव रमा रमण भक्त नर ।।
दमिति यमासहि वोडुनि झोटि ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती विवेकाचें वचन ऐकून मति बोलते पाहा.

**वचन** : निर्विकार जो यीश्वर त्यालाहि मायनें सविकार करायास निमित्त काय?

**सूत्रधार** : येणेरिती मतिचें वचन ऐकून विवेक बोलतो पांहा.

**वचन** : स्वभाव गुणच हा स्त्री पिशाचीचा

**श्लोक** : निर्भत्सीति भुलवीति महमाज वीति ।।
दुःखांत लोटिति विडंबिति रंजवीति ।।
या अंतरिं शिरुनि सौम्य पणे नरांच्या ।।
दुष्टा न काय करिती अहितास त्यांच्या ।।

**वचन** : अणिकहि येक कारण आहे.

**मती** : तें काय कारण.

**सूत्रधार** : येणेरिती मतिचे वचन ऐकून विवेक बोलतो पाहा.

दरू० : (शुद्ध सावेरि)
पापिण हे माया कामिनी यिणें या परि चितिलें भामिनि ।।
अपण जाहली म्हातारि ।। जुना अनादि पुरुष तो तरि ।। १ ।।
यीश्वर पडि श्म्हणवुनियां मीं शाश्वत बसवीने तान्हया मन
आशय जाणूनि हायिचा झाला आज्ञा धारक आयिचा ।। २ ।।
जवलीच तो राहिल्या साटि दृढ कवळूनि जनका शेवटिं ।।
कोंडूनियां देह मंदिरि ठेला केवळ तद्रूप सुंदरि ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती विवेकाचे वचन ऐकून मति बोलतो.

वचन : माय जैशि गुणाचि तैसाच लेंक हि फार चांगला झाला.

सूत्रधार : येणेरिती मतीचें वचन ऐकून विवेक बोलतो पाहा.

वचन : यथा बीजं तथां कुरः ।। आजा प्रमाणें नातूहि जाहला ।।
तो कोण म्हणशील तरि चित्ताचा वडिल लेंक ।।
अहंकार त्यानेंहि पण ज्याच्या गलां घट्टि मीठि घालितांच तो भ्रमून असिया बोलू लागला.

(श्लोक) मी झालो मम मावुलि जनक हे क्षेत्रें सखें सोयरे ।।
मित्रा मित्र कलत्र पुत्र वसु व्दिजा दि माझीच रे ।।
निद्रा मोहमयी वरूनि विसरें आत्माचिया प्रायशा ।।
मी माझें म्हणुनि मनो विकृतिनें स्वप्नाशि पाहे अश्या ।।

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वचन ऐकून मति बोलते.

(दरू०) आपण अयिकावे आदरें ।। या परि मोह महा भरें ।।
जडपण धरिल्यां यीश्वरें ।। केंवि जन्मावें प्रबोध कुमरें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती मतिचें वचन ऐकून जाब न देतां खालें मान करून लज्जेनें वुगाच राहिल्यां विवेकास पाहून मति बोलते पाहा.

वचन : प्राणनाथा कां वुगाच आहां?

सूत्रधार : येणेरिती मतिचें वचन ऐकून विवेक बोलतो पाहा.

वचन : दुसरें वऱ्हाड केल्यावांचून स्वामि कार्य होत नाहिं. लग्न करावें तरि तुला वायिट वाटेल.

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वचन ऐकून मति बोलते पाहा.

(दरू०) वेगलिया त्या ढालगजा मोद्य जाण बायका ।।
कांहि सांगतें त्यांचि रीति तुजला प्राण नायका ।। १ ।।
करिन मी दुसरें लग्न संतानाभिवृध्दी लागें तरी निरोप मजला देयीं अतां प्रियें लागवेगें ।। २ ।।
वर प्रार्थितां या परि ज्या वदति बहुसाल रागें ।।
कुळ नरकिं पडो सवतीचा वारा परि तो- न लागो ।। ३ ।।
जडित जग बहु घेऊन तुजला देतों परोपरि

आणि वडिले पणहि पुढति घरिचें सर्व तूंची करि ॥ ४ ॥
बहु बडबड हे पुरे वोस पडो तुमच्या वस्तावरि
मज तोड गरसोलि गोडहि तें झोडन लगे परि ॥ ५ ॥

(दरु०) मी तशिली नव्हे असती पातक पर जगिं ज्यासती ॥
नसतें भांड काढुनि तंडती सासूशीं दिनराती ॥
वस वस कां करिशि म्हणतां प्रिये ॥
रूसुनी तयावरि जाति ॥ १ ॥
वावचि दुखणे आणूनि आंगीं लावुनी पदिं पासोडी
सावकाश निज ती नीज मंचकीं ॥ जेवुन गुप्त दिसोंडि ॥ २ ॥
यौवन रूप मदे गर्वित अति दैवेंगर्भिणी होतां
त्यावरि करिती भैरव यातना ज्या वल्लभा आणि गोता ॥ ३ ॥
पर पुरुषांशीं निर्भयें बोलती हांसति परम विलासें ॥
घर घेती झडकरी दुसऱ्याचें ॥ हर हर बहु सायासें ॥ ४ ॥

**सूत्रधार :** येणेरिती मतिचें वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

**विवेक वचन :** प्राणप्रिये तूं बोललीस तें यथार्थंच पति शेवे वेगळें स्त्रियानी सर्व धर्म केल्यानें व्यर्थ. तेच सांगतो रोक.

(दरु०) वावुग केवळ तिचा ॥ धर्म अवघा प्राणप्रिये असतीचा ॥
औठ कोटि तीर्थी नाहो ॥
आणि अवघी व्रतें हि कां करिनाहो ॥
जोठिक आपुला नाहो प्रेमे नीट निरंतर आराधिना हो ॥ १ ॥
ज्ञान सिंधु माजि पोहो किंवा ध्यान करित अखंडित राहो ॥
दान यथा विधि देवो पूजो ॥ मानिनि भक्ती पुरस्सर देवो ॥ २ ॥

**सूत्रधार :** येणेरिती विवेकाचे वचन रोकून मति बोलते.

**मति : (दरु०)** पतिच दैवत माझें पतीच जीवन माझें.
पतिच भूषण माझे नाथा प्रतिकूल पतीसजे.
पतिव्रता ती शिखाजे पतित ते नरकीं वोज नाथा ॥ १ ॥
न कळे मजला धर्म ॥ नकळ कैसा अधर्म ॥
न कळे शास्त्राचे गुज नाथा अकलंक पति शेवा ॥
सकळ धर्मस्थानि येक हें कळलें मज नाथा ॥ २ ॥

दरु० : (पुन्नागवरालि)

सुगड वल्लभाचें सुगम वाक्य मनि ॥ उमग शास्त्राचे ठायिं ॥
अगदि गंगादिक सगट तीर्थाचाहि ॥
उगम भाविं पति पायीं निगर ते पुण्यांचे
अगर जेथें नांदे प्रकट नाथांचे पाही ॥
बगली प्राणेशाचे अगणित देवहीन गाणे त्यासि थोर कांही ॥
सवंतीशि तो प्रिय संसार करितां कवळूनि नारि कनिष्टा ॥

नवशिति रात्रीं दिवस हिं ज्याच्या शिव शिव फार अनिष्टा ।।
ऐशी मी प्राणपती पतिव्रता जैशी तें अरूंधति स्ववश व्हावया पती कवठाळ मांडिती अवलंबुनि पापनिष्टा अवधारि मी तशी अवक्रयेची नव्हे ।।
तव पददासी वरिष्टा ।।

वचन : मी कांही तसली नव्हे स्वामिनि सुखरुप लग्न सिद्धी करावी.

सूत्रधार : येणेरिती मतिचें वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

(श्लोक) ईर्ष्या व्याकुळ दीर्घ काल विरहें ते मानिनि सज्जशि ।।
व्दारें शांति सखीचीया वुपनिषद्देवि मिल्याल्या मशि ।।
टाकूनि विषया मुहूर्तंचि तुहिं ठेल्या वुगी निश्चयें ।।
जाग्रत्स्वप्न सुषुप्तिच्या प्रविलयें होयील बोधोदयें ।।

सूत्रधार : येणेरिती विवेकाचे वचन रोकून मति बोलते पाहा.

वचन : ऐसे झाल्यानें वुपनिषद्देविशिचं मिळूनी असावें. हें मला फार संमत.

सूत्रधार : येणेरिती मतिचें वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

(दरु) ऐसे झाल्या फार बरें प्राणप्रिये ।।
फळले अवघे मनोरथ आजी माझे निश्चयें ।।

(श्लोक) विश्वाचा प्रभु नित्य थोर पुरुष सृष्टा तथा येकही ।।
भेदोनि बहुधा गुहें तरूधुनि केला जडांतमजिहिं ।।
त्या जीवेश्वर भेद का विहित मि प्राणांतकीं निष्कृति
विधेनें रचुनी करस्थ करितों ब्रम्हैक्य या मागुति ।।

सूत्रधार : येणेरिती मतिस पाहून बोलून विवेक राजा संतोषानें निज निवासास चालिला पाहा.

(दरु) अव्दैत सांम्राज्यासनि स्थापिन आपुल्या धणि.
आनंद यास्तव भरूनि चालिला राजा ।। १ ।।
शमदमा प्रस्तुतकाजि नेमसनियां मध गाजि ।।
रमणि मतिशीं वाहावि चालिला राजा ।। २ ।।

।। प्रथमोंकस्समाप्तः ।।

येणेरिती विवेक राज्यानें विद्योत्पत्ति कारणें शमदमदिकांस पाठविलें असतां त्यांचे विघटन कराया कारणें महा मोहाचें आज्ञेवरून वंचना भार्य सहित दंभ येतो पाहा.

(दरु) : (यमुना ।। शा)

आयिसा कीं दंभ पाहा ।। कैसा येतसे महा ।।
मयि साजणु दिशा दहा तैसा निरखितचि हा ।। १ ।।
लटिकाचिदंद करि तटकांहीं नसेपरि

स्फुट भक्ती न अंतरि पुट पुट मुखितरि ।। २ ।।
अडतां बुडतोति परि अटकूनि कपि परि
कुटिल वंचने परि कुटुंबिनी बरोबरी ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरिती दंभ येवन शिष्यास पाहून बोलतो पाहा.

**दरु० : (असावेरि)**

तूछ शत्रूनिफिरपगडि मजवरि ।। वत्साबांविली आहे ।।
वृत्सेदार्थ तयांचा निघूतं वुत्साहें लवलाहे ।। अ ।।
म्हणवुनि मोह नृपालें मज सांगितलें ।। १ ।।
परतर मुक्ति स्थळ काशीपुरि ।।
तरि तेथें निज झेंडा त्वरितें रोवुनि
अपुला नाचवि घरोघरि मग धेंडा ।। २ ।।
तेंविच म्या श्रीविवनाथ पुरी हे वश्य केली फार ।।
अवघा तो कथितो वृत्तांतची अवधारा साचार ।। ३ ।।

**वचन** : तो काय समाचार म्हणाल तरि सांगतो.

**(श्लोक)** वेश्याचे घरिं मद्य गंध भरितें कांता मुखें चुंबी ।।
उद्यच्चंद्रनिशा अशाच बहुशा क्रीडारसें
कंठूनी वेदांति सकलज्ञ दीक्षित जुने जी अग्निहोत्री बरें ।।
आम्ही तापस यापरि ठकविति लोकां दिसां धूर्तरे ।।

**वचन** : आणिकहि म्या भ्रष्टविल्या लोकाचि स्थिति सांगतो ऐक.

**(दरु०)** केल्ये म्या लोक अशे केवल दांभिकतशे ।।
हृदयीं करी मोह नृत्य वुदरासहशेफ भृत्य
सदनांतरि घडत नित्य मदनाचें आतिथ्य ।। १ ।।
पद शोधाया निसित्य ।। वुदमा तीव्रय अमित्य ।।
वदणें श्रम्हैव सत्य ।। वदनी हेंहीं अगत्य ।। २ ।।
डंभाचें वचन ऐकून वंचनी बोलते पाहा.

**(दरु०)** केलें जग वंचक ऐसें ।। गुरु तें दावुनि विश्वासें ।।
निरुतें आषाढ भूतिशे त्वरितें ।। हरिति शिष्याहि धन पुरतें ।। १ ।।
धरूनी कुल वधूच्या वेषा तरुणी ।। अपुल्या कांताशी तरूनी संचरति येछे करूनी ।।

**सूत्रधार** : येणेरिती वंचनेचे वचन रोकून तिला वाटे लावून दंभ अपली प्रतिष्ठा सांगून चहुंकडे पाहून दंभ बोलतो पाहा.

**वचन** : अरे कोण कीं हा वाटसरूं आतांच भागीरथीहून येथेंच येतो ? तरि अमचा आजा जो अहंकार त्याचा समाचार विचारवा.

**(दरु५)** येणेरिती दंभ बोलत असतां अंहकार असुया सहित येतो पाहा.
अहंकार आला कैसा ।। असूयेंशि अहंकार आला कैसा ।।

अवघे लोक गिळि तैसा ।। अहं मद युक्त जैसा ।।
अमरेंद्र गज तैसा ।। कोठें प्रभाकर मत कौमारील पाशुपत ।।
कोठें भाष्य शेषकृत कोठें तर्क तर्कावृत ।।
कोटीं तें कोण्ही नेणत कोलाहलें हें गर्जत ।। १ ।।
मीच गुणाचे नगर ।। मीच औदार्याचें घर ।।
मीच केवळ नागर ।। मीच विद्येचा सागर ।।
मीच श्रृंगार शेखर ।। मी मी म्हणत ऐसा थोर ।। २ ।।

(दरु०) सर्वा निदित चालियेला तो अहंकार ।।
सर्वथा ब्रम्हादिकां दुर्वार तोंडा गळा ।।

सूत्रधार : येणेरिती अहंकार येवून अध्यापकाची विडंबन करितो पाहा.

(दरु०) चंदन खंड भारवाहितो खर जैसा ।।
सुंदर वास नेणे कांहि ।।
त्या परि स्वर संदर्भ वेद सांगताहि ।।
परंतु अर्थ गंध नेणीजे मनि ज्यांहि ।।
आयिश्यें हे मति मंद वेद बुडवे संदेह येतें नाहीं ।।

सूत्रधार : येणेरिती अध्यापकाची विडंबना करून अहंकार रामानुज यतीश्वराची निंदा करितो पाहा.

(दरु०) पोटासाटीच हे सन्याशी ।।
मुंडित मुंड लोठाश्रम त्रिदंड जाशी ।।
व्दैताव्दैतांच्या वाटा विरूध्द दोनियाशी ।।
तिसऱ्या परिपाटा कल्पुनि सुप्रयाशीं
सांगति कैशी पाठावेदांता चांगला हाटा करावयाशी ।। २ ।।

वचन : हे डांभिक हें द्रव्य भोंदू. यापाशीं राहणे युक्त नव्हे.

सूत्रधार : येणेरिती अहंकाराचें वचन रोकून असुया बोलते पाहा.

(दरु०) आघवें जग हें नाथा ।।
मजलागी दुष्ट वाटेतें आतां नीट पहतां ।।
ध्यानीरत थोर मननि बकवाणी मानी जें स्वमनी ।।
वानिशि जरि दान शूर दिवाळ—
खोर तो जाण अवगुण खाणि ।।
शूरमानिन गुणी ।।
प्राणि वध पर परम पातकी ।।
नाणिजे दिठि निषूराग्रणी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती असूयेचे वचन रोकून अहंकार दंभाश्रमांतून जावून डंभाचि विडंबन करितो पाहा.

(श्लोक) बाहूहोट ललाट गाल चुंबुकी कंठी वुरी पाठिशीं ।।
गोपी चंदन रेखलें गुडगियां मांडी सहीं वोरशीं ।।

चूडाग्रि श्रवणि करीं कटि तटीं दंर्भाकुरा खोवुनी मोटा
दांभिक कोण हा दिसतसे कीं दंभ साक्षात गुणी ।।

**वचन** : अहो तुम्हास कल्याण हो.

**सूत्रधार** : येणेरिती अहंकाराचें वचन रोकून डंभ हुंकारानें वरितांच डंभ शिष्य बोलतो पाहा.

**दरु०** : (नीलांबरी)

परम पवित्र द्विजा हे घर ।। सरस कल्याणाचें आगर ।। १ ।।
पाड धुवुनि आधीं यां साटि मग जाये भीतरि निज धाटि ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरितीं डंभ शिष्याचें वचन रोकून अहंकार बोलतो पाहा.

**वचन** : जा जा न कळतां तुरूकाच्या घरास ।। आम्हीं आलों जेथें अतिथि ब्राह्मणास भोजनादिक नसल्यासहि नसो बरि गोष्ठीं हि नाहि काय ।।

**सूत्रधार** : येणेरिती अहंकाराचे वचन रोकून डंभ बोलतो.

**दरु०** : (रावेरि)

आपुलें ना ठाव ठिकाण नाम रूपहि तैंसेचि तें जाण ।।
या साटि न घडलें अतिथ्य ।। संभाषण निजे हें तथ्य ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती डंभाचे वचन रोकून अहंकार बोलतो पाहा.

**वचन** : शिव शिव नाम रूप अंहंचेहि काय नवे निवेदावें.

**दरु०** : (व्यागडा)

बरें सांगतो नीट मी यावरि त्वरें सावध श्रवण तूं करिं ।।

**श्लोक** :
मोटा वुत्तम गोड देश अतुलाराढापुरि त्यातहि ।।
थोर श्रेष्ठिक नाम धाम वरतो अंचा पिता तेथहिं ।।
त्याचे पुत्र महाकुलीन सकळा ठावें तया माजि गाधि
आचार विचार धैर्य विनयीं मि श्रेष्ठ अत्यंत गा ।।

**सूत्रधार** : येणेरिती बोलून अहंकार डंभाच्या आसनावरि बसायास जातांच डंभ शिष्य बोलतो पाहा.

**वचन** : अहो अंच्या गुरू स्वामीच्या आसनावरि दुसऱ्याने बसू नये.

**सूत्रधार** : येणेरिती डंभ शिष्याचें वचन ऐकून अहंकार बोलतो पाहा.

**वचन** : शिव शिवा अरे दक्षिण राढापुरि प्रसिद्र शुचिर्भूत ब्राम्हणानी—अमीहिया आसनावरि बसू नये काय ?

**दरु०** : (कल्याणी : शा)

अयिकरे मूढा श्रवणि निज काहणि मोटि कौतुक वाणी तैंशि नव्हे
माझि मायकीं कुलीन निकी ।। जैशि पवित्र राणि ।।

थोर श्रोत्रियाचि कुमारि जे सुकुमारी तीचा धरितां पाणि
बाधाहुनी जालों श्रेष्ट गा माजिया जिगस सृष्टि दृष्टिसनाणि ।। १ ।।
माझिये कांतेचा सुंदर जो सहोदर मैत्र एक तयाचा त्याची
जे मातुल कन्यका आळ लटिका आला तीवरि कांचा परंपरा संबंध तया फार
भीवूनिया ज्ये जीव जीवाचा तेंहि निज भाज धाकली शेखी टाकिली
काया मनसा वाचा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती अहंकाराचे वचन ऐकून डंभ बोलतो पाहा.

वचन : तरि अमचा महिमा ऐक ।।

(श्लोक) दुहिण सदनि गेलों मी पुरा आसना तें
त्यजुनि मुनिजनी तें तिष्टतां पद्मजा तें
झडकरि निज मांडीं गोमये रारवूनिस
शपथ मग तेथे स्थापिले गौखूनि ।।

सूत्रधार : येणेरिती डंभाचे वचन ऐकून अहंकार अपुली प्रतिष्ठा सांगतो पाहा.

(श्लोक) कथीं विधि शत ऋतू कवण याजि मी कोणत्या
वदे जनन भूसिुका ऋषीचियाहिं तूं जाण त्या सुरेंद्र
परमेष्ठीची शतशतें मुनीची तशीं तपोबळ समग्र हें
समज आमुचें मानसीं ।।

सूत्रधार : येणेरिती अहंकाराचे वचन ऐकून अमचा आजा जा अहांकारच आला म्हणवून जाणून डंभ नमस्कार करितो पाहा.

वचन : हे पितामहा लोभाचा लेंक डंभ मी नमस्कार करितों ।। येणेरिती डंभ नमस्कार केल्यानंतर अहंकार आशीर्वाद करितो पहा. वत्स आयुष्मंत हो ।।

दरू० : (तोडि : अटताल)

लोभा तृष्ण तुझीं जननि जनकें तें भलें लेंकरूं
अनृत जगीनिकिं कुशल तयास अंधिकायतें असकें वृत्त कधि ।।

सूत्रधार : येणेरिती अहंकाराचें वचन ऐकून डंभ बोलतो.

दरू० : (तोडि)

मोह नृपाल निरोपें गुणें निधि ।। राहति ते अनुदिन मज सन्निधि ।।
पळ भरि त्यालडि बाळ मुलाविणें ।। कळन पडेचि मनि वाटे बहुशिण ।।

सूत्रधार : येणेरिती डंभाचे वचन ऐकून अनृत कुमारच्या भेटीचि अपेक्षा अहंकार धरितांच दुर्गति सहित अनृत कुमार येतो पाहा.

दरू० : अनृत कुमार असा ।। सत्याचा अरि आला सहसा ।।
परम दुरित जापसिहि नाहिं ।। नियरमूळ जो निरूपम पांहि ।। १ ।।
जवळीच भाजति युवती दुर्गति ।। जीव लाग साजते केवळ जा प्रति ।।

सूत्रधार : येणेरिती अनृत कुमार येवून अहंकारास करितां त्याला पाहून अहंकार बोलतो पाहा.

(श्लोक) अरूण का तुझें अक्ष भासति ।। त्वरित सांग त्या कारणा प्रति ।।
कवण हेतु कि ना कळे मना श्रवणि वाढले फार कामना ।।
येणेरिती अहंकाराचें वचन ऐकून अनृतकुमार बोलतो ।।
वुगवतां निशि वासरेश्वर मृग जळा मध्यें मत्स्य तें धरूं ।।
अगदिया मिनि लोटल्यां सटिं ।।
प्रकट जाहलि दृष्टितां बटि ।।

**सूत्रधार** : येणेरिती अनृतकुमाराचे वचन ऐकून अहंकार बोलतो.

**वचन** : वत्सा त्वां अपुलें नांव राखिलें ।। इतःपर सत्याची विघटनि सावध असावे ।।

**अनृ.** : जी आज्ञा ।।

**सूत्रधार** : येणेरिती अहंकाराचे आज्ञेवरून अनृत कुमार गेल्यानंतर डंभ बोलतो पाहा. आतां वडिलें कोणत्या कार्यासाटिं यथें येणें केलें ।।

**सूत्रधार** : येणेरिती डंभाचे वचन ऐकून अहंकार बोलतो पाहा.

**वचन** : वत्सा डंभा विवेकापासाव अमचा महामोह रायास फार अनिष्ट ऐकिलें तो समाचार कळावयास आलों ।।

**सूत्रधार** : येणेरिती अहंकाराचे वचन ऐकून डंभ बोलतो पाहा.

**वचन** : वडिलांचे येणें बर्या समयींच झालें ।। इंद्र लोकींहून महा मोह राजाहि येथें येणारांहे ।।

(दरू) परमजा लोक वार्ता ऐशी ऐकिली हे बरी लोभताता ।।
थोर जे काशि पुरी तेथें राहीन म्हणतो भूप आतां ।।

**सूत्रधार** : येणेरिती डंभाचे वचन ऐकून अहंकार बोलतो पाहा.

**दरू** : सुरटी. (मल्हारू)

वाराणशी माजी राहावया महामोह राणा ।।
येथें कारण काय निवेदिं आतां तूं सुजाणा ।।

**सूत्रधार** : येणेरिती अहंकाराचे वचन ऐकून डंब बोलतो पाहा.

**दरू** : पुन्नागवराळि

राहीन म्हणतो येथें राजा यास्तवचि.
विद्या आणि प्रबोध विख्यात स्थळकाशी ।।
विघट न त्याचें करायाशि वीर व्रत धरूनी निज मानशीं ।।

**सूत्रधार** : येणेरिती डंभाचे वचन ऐकून अहंकार बोलतो पाहा.

**दरू** : (कांबोधि)

अयिसें जालें तरि कोणाचा सर्वथा यत्न नाहिं ।।
तेथें कसें करिल ठिकाण आधि राजा पांहि ।। १ ।।
कीट मृगादिक जंतूसहि जेथें अंतकाळी करि नीट
वुपदेश तारक दयाब्धि चौंद्र मौळि ।। २ ।।
नित्य या संसार सागरिं बुडाले जीवजांचे त्यां
वुत्तम वुपदेशें तेंहि धणी होति सायुज्याचे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती अहंकाराचे वचन ऐकून डंभ बोलतो.

वचन : आर्य हे खरेच परंतु ज्यास काम क्रोध आहे त्यानि वुत्तम क्षेत्र वास करूनिहि प्रयोजन नाहि.

(श्लोक) यस्यहस्तौच पादौच मनश्चैवसु संयुतं । विद्यातपश्चकीर्तिश्च स तीर्थ फलमश्नुते ।।

सूत्राधर : येणेरिती डंभ अहंकार परस्पर बोलून गेल्यानंतर महामोह येतो म्हणवून सभास्थांस सावध करायास भ्रांति सहित असत्संग येतो पाहा ।।

दरू : (मल्हारू)

जाचा सहज लागल्यां कांहि वारा ।।
मोडेसाचा पुण्य कर्माचा थारा ।।
सोडी पाचारूनी शीघ्रं नरक द्वारा ।।
महा निवाडा तात्काळ बुडवणारा ।।
येतो भ्रांत भार्येशि पाहा ।। असत्संग: ।।
थोर असत्याचा डोंगर चि की हा ।। १ ।।

(श्लोक) शिंपाहो चंदनाची स्फटिक मणि शिलावेदीका आणि तेंहि
कारंजि नीट सोडा चहूंकडूनी सडा घालावा सर्वगेहिं ।।
बांधा सर्वत्र हारी धनमणि विलस त्तारणाच्या चलांकां ।।
प्रासादाग्रीं वुभारा हरि धनुसदृशा चित्रवर्णा पताका ।।

सूत्रधार : येणेरिती असत्संग येवून सभास्थास सावध केल्यानंतर महामोह राजा येतो पाहा।।

दरू : (केदार गौळ)

येतो मोह नृपति घमशानें चेतूनि आवेशानें ।।
भ्रम मी देह असा जो साजेतेचि तिखट तरवार
ममतेचि ढाल सुढाल पुढारूनि तामसी जोरावार ।। १ ।।
बरवें पर पीड नखाजें पोट भरी अमर्यादेनें ।।
नरक सकळ कर जोडुनि मागति वर हा मर्यादेनें ।। २ ।।
दुमदुमिती गंभीर निनीद पर निंदा तेचि नगारे
अमित कनृत चाहाडी गाळ्याचि कर्णे बांकेतुतारे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती मोहराज आल्यानंतर दुर्मति येते पाहा.

दरू : (धन्याशि)

दुर्मति येते पाहा वुर्गट महा मोह मही पालकाचि मुख्य
राणि दिमाकाचि मोहून आद्य रसाचि मूर्तिचसाचि ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती दुर्मति आल्यानंतर महामोह सज्जनाचि निंदा करितो पाहा.

वचन : अवो प्रिये मोटे मूढ लोक हें तेंचि सांगतो.

(श्लोक) कीं अन्य देहाहुनि जीव आहे ।।
लोकांतरि तो फळ भोगिताहे ।।
खवृक्ष पुष्पास्तव सत्फलाची ।।
वुत्पत्ति होणे तशि आस त्याची ।।

दरु : बिलहरि. (त्रिपुरी)

आप आपण की वंचिले यांनि ।। अव्हेरूनि अनुमान ।।
आग माशि अनुमान मानसीं प्रमाण सर्वथा ।।
विश्वास भरें भानूनि या मूढ हे वृथा ।।
भूलोनी गेले नेणूनियां सुखाच्या पथा ।।
किती म्हणूनि वानू त्याची विचित्र कथा ।।
वर्ण व्यक्तिशि अवयव असता समान विर्ण हे चालि ।।
कल्पियेले सर्व अप्रमाण वर्णी गैहस्त वानप्रस्थ यतीश्वर जाण ।।
वर्णिती चारी आश्रमहिं थोर तथा सान ।।
निज संकेत शुकननिके परि सकळहिं
या वरिगुंतुनि ति मूढपणें ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोह रायाचें वचन रोकून दुर्मति बोलते पाहा.

**(दरू)** वल्लभा अहो प्राण वल्लधा ।।
कोठें आलिंगूनि कांता ।।
लोटणें यामिनी कांता कोठे आश्रयूनि यादरी
कंठणें सांग शर्वरी ।। १ ।। कैसे पाप कैंचें पुण्य
कैंचा धर्म सारें शून्य ।। हेच नाथा शास्त्र बरें ।।
निश्चये वाटतें खरें ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरिती दुर्मतीचें वचन ऐकून मोह बोलतो पाहा.

**(श्लोक)** नाहि तेचि असे आशा बहुवृधाजल्येचिया अस्तिकी ।।
केले नास्तिक निंद्य सत्य वदते अत्यंत हें चोज कीं ।।
फोडूनि तनुला इयेहूनि दुजा तो जीव कोण्हि तरीं ।।
आहे काय विलोकिला विवरि जे हे नीट ना ना परि ।।

**सूत्रधार** : येणेरिती महा मोहाचे वचन ऐकून असत्संग बोलतो पाहा.

**(श्लोक)** काजळाच्या नगा माजिहि दीप्तिता या जगा भीतरि माजल्या तत्वता ।।
भूजलाग्नि मरूद्रभाजनांगा प्रति साजति चिल्हळा राजया तैं अति ।।

**सूत्रधार** : येणेरिती असत्संगाचे वचन ऐकून मोह बोलतो पाहा.
सीस पदं वेगल्याले पणें वेडचा जे नव्हे साधतें काजतें साच संगे ।। पर्ण पूगी फलें चुर्णहि मीनतांपूर्ण तो तांबडा वर्ण रंगे ।। नीळ पीताचीया मेळनें वुद्‌भवे ।। वानहिर्वाजसा वाढवेगें ।। येत देहिं यया हे तशि चित्कला भूजलाग्नि मरूद्‌भत योगें ।। नासतां नान्य दुर्वासिनानि ।। देहं आत्मा असंदेह मनि ।। साचहें कलुनि वाचस्पतीनें निर्मिलें शास्त्र मत्संमतीनें ।।

**वचन** : अमच्या मनोगता सारिखें शास्त्र निर्माण करून बृहस्पतीनें चार्वाकास उपदेशिले ।।

**सूत्रधार** : येणेरिती महामोह असत्संग बोलतस्तां शिष्या सहित चार्वाक येता पाहा.

दरु : (हुशानी)

सर्वा अवालिलार्वाचिक तोंडागला चार्वाक तेथवाची आला शिष्यासहित
चार्वाक तेथ वाची आला ।।

सूत्रधार : येणेरिती चार्वाक येऊन अपुल्या शिष्यास पाहून बोलतो पाहा.

(श्लोक) कर्ता द्रव्यें कर्म यांचा विनाशि ।।
लाभे जेव्हां स्वर्ग या दीक्षिताशि ।।
दावाग्नीने दग्धवृक्षाशि साचे ।।
लागावेंतै धोसना फलांचे ।।

दरु : (खाभि. त्रि)

यागीं मारिजेल्यां मेंढरिं सग्दति लागि
पाविजे जरि लागलाचि आपुला बाप तरिं ।।
लागवेग सांग का न वधि जे नरिं
शिष्य अवघे हें फटकाळचि ।।
वावुगें इंद्र जाल शिष्या ।। १ ।।

(श्लोक) जगीं जेवील्या येक अंन्यास मोटी ।।
घडे तृप्ति हे मात जेंव्हां न खोटि ।।
विदोरि नद्या वितरि पांथिकाशि ।।
करावेंच वुद्देशिनी श्रात्ध त्यांशी ।।

दरु : (पंतुवरालि)

परिसरे श्रवणि परिस शिष्यगणि ।।
परमार्थाचि सरणि बरवि याक्षणि ।। १ ।।
प्रत्यक्षचि मान प्रसिध्द हेंचि जाण ।।
अत्यंत अप्रमाण आगम पुराण ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती चार्वाक वचन रोकून शिष्य बोलतो पहा.

दरु : (शाहना)

गुरू राया जगत्रयी गौरविसत सर्वत्रयी ।।
आरूचीया विषयी अपणा कां हृदयीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शिष्याचें वचन रोकून चार्वाक बोलतो पहा.

वचन : वत्सा वंचकानि लवदेंच वेद शास्त्र निर्माण करून ठकविलें ।।

दरु : (व्यागड. आ)

चंदन निप्त सुगधफलाचे ।। सुंदर हार घालूनि
गळां सुंदरीशि नित्य मंदिरी भोगणें ।।
कंदर्प सांम्राज्य पूर्ण सोहळा ।। १ ।।
यांत काय बरें ।। सांग शिष्या नीट विचार भरें ।।
वासर निशि तुपवास जलादि निवास करूनि अणिक हिं क्लेश गुणेंचि
विशेष तनूसहिं शोषूनी टाकणें केवळ पाहिं ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती चार्वाकाचें वचन रोकून शिष्य बोलतो पहा.

**वचन :** आचार्य स्वामी समस्त वैदिकहिं या प्रकारें बोलताहेत की विषयुक्त अन्न भक्षण सारिखे दुःख युक्त संसार सुख वार्जावे ।।

**सूत्रधार :** येणेरिती शिष्याचें वचन रोकून चार्वाक बोलतो पहा.

**(श्लोक)** दुःखाचयीं विषय संगम जन्य तोषा ।।
जें टाकणें म्हणति मूर्ख विचारणैषा ।।
कोंडा असे म्हणुनियां नर बुद्धिशाली ।।
कोणत्यजी धवळ तंडुल युक्त साळी ।।

**सूत्रधार :** येणेरिती शिष्याशीं बोलून मोहराजा जवळ येवून चार्वाक ! मुजरा करितांच मोह बोलतो पहा.
चार्वाक कलि सुखरूप अहे काय ?

**सूत्रधार :** येणेरिती मोह रायाचे वचन रोकून चार्वाक बोलतो पाहा.

**वचन :** स्वामीचे प्रसादें कलि सुखरूप आहे ।। कळी कां आला नाही म्हटलें तरि सांगतो.

**दरु :** (भैरवी. त्रि)

करितां नृपतिलकें आज्ञा होवूनी राजि जिंकुनि अरितें घवघवित वदनें जो बरा जि ।। हरिखे अनुमोदित दर्शन जनसा माजी ।।
धरि शिरसा प्रभु चरण असा तो परम धन्य या धरणी माजी ।।
या साटिं सांगुनि अवघ्या कार्य भागा ।।
आपणापाशीं येथिल मग तो कळि महाभागा ।।

**(श्लोक)** वेदोक्त मार्गच्युत वैदिकावळी येथेष्ट दुष्ट चरणी चालविली ।।
कीं येथ हेतु कलि आणि मी मृषा ।।
करि प्रभुचा महिमाचि पौरूषा ।।

**सूत्रधार :** येणेरिती चार्वाकाचे वचन रोकून मोह बोलतो.

**दरु :** (दरबारू. झं.)

सरस केलें तुम्ही स्वामि काजा ।।
परम संतोषला पाण माझा ।। १ ।।
दवडिला धर्म तो दूरिसरा ।।
कवण वाहिल वृपकार भारा ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मोह रायाचें वचन रोकून चार्वाक बोलतो पहा.

**दरु :** (गौरि. त्रि)

येक विनंति परि येथ आहे ।। ते कौशि म्हणशि तरि आयिक पाहे ।। १ ।।
विदिता जे त्रिभुवनि विष्णु भक्ती वृदितातव अहिंति ते वुग्र शक्ति ।। २ ।।

**वचन :** जरि कळीनें विष्णु भक्तीचा विरळ प्रचार केला आहे ।। तिला आश्रयूनि असणारांकडे पावत नाहिं ।। त्या विषयी स्वामिनि सावधान असांवे ।।

सूत्रधार : येणेरिती चार्वाकाचें वचन रोकून मोह बोलतो पहा.

दरु : (येरूकुल. कांबोधि)

मोटि योगिणी प्रभावाची ते विष्णु भक्ति
खोटि लोटील दुःख कोटीत आम्हासाचि ॥
ठायीं ठायीं म्या जोरावर ॥
जिंकले बहु डायीं पडूनि वारंवार ॥
सांगावा किति कायीतो निज बडिवार ॥
निमाले माझें पायीं वुदंड दावेदार ॥
तैसाहि मी त्या दायीजीषिची पडतां
साथी भितो अनिवार ॥ १ ॥

वचन : बरें हें कार्य अम्ही धैर्यतें साधितों तांहिं ॥ या कार्याचे ठायी सावध असावे।

सूत्रधार : येणेरिती मोहरायाचें वचन रोकून चार्वाक निघाल्यानंतर तो पुरुषोत्तेमे क्षेधिहुनि मदमानादिकांनि पाठविला जासूद येतो पाहा.

दरु : (गोळी पंतु,)

भोपतरायीं पायपोस पायीं
धोपट मार्ग धरूनियां पांहि ॥
लाखोटाप्वेवुनि अपुल्या करि ॥
चोखट कांठि हिं कवळूनि बरि ॥
आला या परिचां जासूद ॥ १ ॥

सूत्रधार : येणेरिती जासूद येवून लाखोटा देतां मोह लाखोटा फोडून वाचवितो पाहा.

वचन : स्वस्ति श्रीवाराणशी नगरिचे ठायीं विद्यामान श्रीमन् महाराजाधिराज महामोह रायाची या विजय श्रियालंकृत चरणा प्रति पुरुषोत्तम क्षेत्रि राहणार मदमानयानि कृत सांष्टांग नमस्कार पूर्वक विज्ञापना ॥ अयिशीजें येथील क्षेम जाणून स्वकुशल लिहावया कारणें आज्ञा केली पाहिजे विशेष वर्तमान तरि शांति श्रद्धा दोघी जणींहि विवेक संबंधा कारणें वृपनिषद्देवीस रात्रि दिवस बोधिताहेत ॥ विदित झालें पाहिजे या सकळ कार्यासि आपण समर्थ आहेत ॥ हे विनंति ॥

सूत्रधार : येणेरिती पत्र रोकून मोह कोपाने बोलतो पाहा.

वचन : अरे अत्यंत निर्बळ बायिको जेशांती तिसहिं भीताहेत काय ॥ हे आधि कोठें आहे ते सांगतो रोक ॥

(श्लोक) ब्रम्ह विश्वर चूंच तत्पर तथा गौरी भुजालिंगनें
जातानंद सदा सदाशिव झुले अर्धोन्मिषल्लोचनें ॥
श्रीवत्सांकर मायकपोल मकरीं पत्रांक वक्षस्वता अब्धी
माजि निजेतयि तदितरां कची शामाची कथा ॥

सूत्रधार : येणेरिती बोलून जासुदास वाटे लाविल्यानंतर असत्संगाकडून क्रोधास बलावितां क्रोध येतो हापा.

दरु : (सुरटि)

आला क्रोध पाहा आग्रहानें तुंगवि कोप न पुंगवसामद
धुंगतनु स्मृति धुंगटकाहुनि वोंगळ दिष्टीतूनि यिंगळवमित अमंगळ वदतनिसंग अजिकसा ।। १ ।।
दांत कर करा खातचि चोळूनि हात यमापरि घात करिलसा ।।
आतळतां गुरू तातहिं हाणुनि लात वुलाथि वुत्पात जणुपिसा ।।

**सूत्रधार :** येणेरिती क्रोध आल्यानंतर हिंसा येतो पाहा.

**(दरु)** नवरोजुनित्य केल्या विण हिंसा नव्हे ।।
नीट जीच्या षाण तोहिंसा सत्वर पळवि अहिंसा ।।
अशि अत्यंत दुर्धर केवळ हिंसा ।। येतसे पाह पाहा
भयचेजन मात्रास देतचि हा हा ।। १ ।।
गिलि माय बाप सुत यी त्यादिकांहि सोयिरायांचे ठांयी
तेथें सोयधरिल हे गोष्टी ते कायी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती हिंसा आल्यानंतर क्रोध अपले सामर्थ्य वर्णितो पाहा.

**वचन :** अवो प्रिये तुज सारिख्या धर्म पत्नीशीं मिळून असणार मला माय बापादिकांस मारणें हिं तृणप्राय ।।

**सूत्रधार :** येणेरितीं हिंसेशी बोलून पुन्हा हात चोळित रागानें क्रोध बरळतो पहा.

**(श्लोक)** या बंधुच्या सर्कांळिका स्वकुळाशीपाणि
गर्भाविधिनद्यलिजो विलसक्र पाणि ।।
क्रोधाग्निचा ठिणगी यांत वंदीप्त भरि
दे हिं कं दान विज्ञति आणिक प्रकारी ।।

**सूत्रधार :** येणेरिती क्रोध हिंसा बोलतस्तां लोभ येतो पाहा.

दरु. : (मुखारी)

या संसारी जीव गेल्या जावो ।।
आस याची मजनाहिंच तरि कासचिये परि
कास न सोडि ।। वासनाहे धरूनि निज अंतरि ।। १ ।।
पातला लोभ अयिसा पाहा ।। कसा पातला लोभ अयिसा ।।
मागणारा पाठिलाग बेगकन लागत जणु जावळि कुतरिचि ।।
नागवायाला आवधें जणु काय लागतसे ऐशीं कां घायीकरीतचि ।।
डोंग नसें कटिं ढोगडेंचि लुकुट घोगडलिगळाचे अयिश्यापरि ।।
सोंग भिकाऱ्याचे वोंगळ पाथिकाशि ता गणा नाहिं सर्वधा हि परि ।।

**सूत्रधार :** येणेरिती लोभ आल्यानंतर तृष्णा येते पाहा.

**(दरु)** तृष्णा आली तेचि तुम्ही पाहा पाहा
थोडिशि पडतां जीचिवरि सायी ।।
लक्षकोटि धन वस्त्र असतांहिं ।।

हिंडति हे जन थोर ठायी ठायीं ।।
ऐशी चंड ते दुर्वार ब्रम्हादिका ।। १ ।।
साता समुद्राचे येकेकटवारि भीतरि भरिल्या
मिळुनि जानि सारि सत्ये न भरे जीची वुदरगारि ।।
ऐशी अत्थ पूर्व रितीची ते लोभ नारी ।। २ ।।
तृष्णा जे का निष्णत विद्या प्रबोध नाही महा ।।

सूत्रधार : येणेरिती तृष्ण आल्यानंतर लोभ तिशी बोलतो पहा.

वचन : अवो प्राणप्रिये फार का रोडेली आहेस ।। तुला हें अवघे दिल्यानें तृप्ति होयिल काय ।। ते काय म्हणशील तरि आयिक ।।

दरु. : (पतुवराळि)

मरूचीहिं मूस वुतरूनि मोद्या मोद्या वस्ता तुज वितरूनि ।।
गौरविल्या बहु साजणि तृप्ति बरवि होयिल काय वो अझुणि ।।

तृप्ति : कांहि हे मजला पुरना ।। कांता काय करू पोट भरेना.

तृप्ति : अंच अंच उत्न सुरंग ।। अति उन्नत अवघे हे सारंग ।। उच्चैश्रवासमतुरंग ।।

सूत्रधार : येणेरिती तृष्णेशीं बोलून क्रोधास पाहून लोभ बोलतो.

वचन : माझा हाता खालें जें सांपळ्ळे ते मनोरथ समुद्रामध्यें बुडवुन गोत्या खात चिरहिले ।। कोण्हि पयिल थटीस गेला नाहिं ।। अरे सखया पहा.

(श्लोक) हे हत्ति मजला आहे ती मद जे गंड स्थली गाळिती ।।
तै शेचीह्यवात वेग अणिखीं लाहेन अन्याय ति ।।
हें लाभेनचिलब्ध हें म्हणवुनि प्राधिक प्रार्थितां ।।
ज्याचें जर्जर चित्त त्याशि कैचि ते शांतीची ही कथा ।।

सूत्रधार : येणेरिती लोभाचें वचन रोकून क्रोध बोलतो पाहा.

वचन : अरे लोभा माझी महिमा तुला काय ठावुकि अहें कीं ते चि अंदूक ।।

(श्लोक) इंद्रे वृत्रविदारीला पुर हरें देवें स्वयंभू शिरा ।।
केले छिन्न वशिष्ट पुत्र वधिलें त्याकाशि काने पुरा ।।
विद्याकिर्ती अलंकृतें हिं विमला चारे शुचीहीं गुणी ।।
मोटी विक्रमवंत हिं घनकुलें नासूकें तक्षणि ।।

सूत्रधार : येणेरिती लोभ तृष्णा क्रोधहिंसा परस्पर बोलून मोहराया जवळ येवून मुजरा करून बोलताति पहा.

वचन : हे महामोह राया अम्हास कशासाटि बलाविलें ।।

सूत्रधार : येणेरिती चौघांचे वचन रोकून महामोह बोलतो पहा.

वचन : अमची तदावे दारिणी शांति श्रद्धा ज्या आहेत त्यांस तुमी निग्रहावें ।।

सूत्रधार : येणेरिती मोहरायाचें आज्ञेवरून चौघेंहि निघाल्यानंतर सात्विक धर्मादि विघटना विषयी अधर्मेच समर्थ म्हणून निर्धार करितांच दुष्ट प्रवृत्ति सहित अधर्म येतो पहा ।।

(दरु) आला अधर्म पाहा ।। अधमहा सृष्टित जो पाप पुष्टिस कारण ।।
दुष्ट प्रवृत्ति इष्ट वधू तिशि ।। १ ।।
स्नान संध्या जपध्यान योग तपज्ञान भक्तिलोप पूर्ण करितचि ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती अधर्म येवून मोहरायास मुजरा करून बोलतो पहा.

**वचन :** हा शेवक जन किमर्थं बलाविला तें कार्य सांगून कृतार्थ करावें ।।

**सूत्रधार :** येणेरिती अर्धमाचे वचन रोकून महामोह बोलतो अहो प्रधान जी सात्विक धर्माच्या बळें शांति श्रद्धा आमुचें अहित करायास सिद्ध अहेत त्यांस तुमिनि ग्रहावें ।।

**सूत्रधार :** मोहरायाचे वचन रोकून अधर्म बोलतो पहा.

दरू : ।। तोडि ।।

अजहरि आणि हरांशि जेकां अजयतशेचि समस्त सुरांशि निजपद
विक्षेपें त्याशिजवीन अनुदिन शौर्य वित्यांशि ।।
मजसम कोण्हिच नाहिं वीर विजय साधणार त्रिभुवनि पांहि ।। १ ।।
सत्व सुता श्रद्धा शांति मी सत्वर शिरतां पावशि शांति अत्यंत
तिमिरनिशांति सूर्य पत्यहि पळवीजे वीदि शांति ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती अधर्म बोलून निघतांच वुपनिषद्देवी पासून श्रद्धा देवीस वोडूनी आणायास मिथ्या दृष्टीस समर्थ म्हणून तिला बलावाया कारणें विभ्रमावतीचे स्मरण करितांच विभ्रमावती येते पाहा.

(दरू) कुंटिन पणी जे कां फार शाहणी ।।
खंटवि दुजीची मति सांगुनिया काहणि ।।
संभ्रमाशीं मोहराणा सन्निधानी आली ।।
विभ्रमावती भैमाची मुख्य राणि ।।

**सूत्रधार :** विभ्रमावती आल्यानंतर तिला पाहून मोह बोलतो पहा.

**वचन :** अवो विभ्रमावती मिथ्या दृष्टीस बलावून आणावें ।। जी आज्ञा ।।

**सूत्रधार :** येणेरिती मोहरायाचे आज्ञेवरून विभ्रमावती जावन बलावितां तीशीं मिळून मिथ्या दृष्टी येते पाहा.

दरू : ।। कांबोधि ।।

आली हे मिथ्या दृष्टी आरक्त दृष्टी ।।
अतुल लावण्या पुष्टि प्रतारिणी मोटि वृष्टि ।।
स्मर कांता रूपागळी परिजीचे तेहिं बगली
तरुणी जगा वेगळीं परम चांगली निरूपम नेत्र युगळीं वरिवरि मोटि वुगली
बरवि निज वृत्ति सगली वरारोहा नेणे वुगळीं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मिथ्या दृष्टी येताच महा मोह बोलतो.

दरू : ।। आहरि ।।

मांडिये येवून बैस मिथ्या दृष्टी मग मांडि कंदर्प विलास मिथ्या दृष्टि ।। १ ।।
अचिर दे गाढलिंगन मिथ्या दृष्टि मिखीं कुचयुगीं नखांकन मिथ्या दृष्टि ।।
येकरूप मिळूनि राहूं मिथ्या दृष्टि नित्य सुखसमुद्रातें पोहूं मिथ्या दृष्टि ।। ३

सूत्रधार : येणेरिती मोहरायाचे वचन रोकून आलिंगनादिक देवून मिथ्या दृष्टि बोलते पाहा.

दरू : विरह संतापणाचा वीरस फार दीसाचा
परि रंभे तुझा आतां पहूनि गेला तो नाथा ।। १ ।।
मुखचंद्रताव कीन सखया हा विलोकून ।।
पारणें नेत्र चकोरा कारणें जालें वीर ।। २ ।।
स्मरिजेलें कशा मूळें स्मर सुरंरा राकळें कथुनी
तें आतां कृत्य करावें जी कृत कृत्य ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती मिथ्या दृष्टीचें वचन रोकून मोह बोलतो.

वचन : अवो मिथ्या दृष्टी सात्विक श्रद्धेला तां निग्रहावें ।।

मि. वचन : जी आज्ञा ।।

सुत्रधार : येणेरिती मिथ्या दृष्टिस आज्ञा देवून महामोह निज निवासास चालिला पाहा.

।। इति द्वितीयोंक ।।

येणेरिती महामोह निंज निवासास गेल्यानंतर अपुल्या मायेला श्रद्धा देविला हुडकित करूणे सहित शांति येते पाहा.

दरू : ।। घंटारवं ।।

हुडकित निज जननी सजणि ।। घडुनी मनी विव्हल रमणि ।।
पटपट आशी नयनिहुनि कटकट गालित बहु भीवुनी ।। १ ।।
करूणें सहित शांतिसति करूनि वदनें सान अति ।।
स्मरताचि मांवुलिला सुदति ।।
हर हर आली शीघ्र गति ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती करूणे सहित शांति येवून मायेस आठवून बोलते पहा.

दरू : ।। मध्यमावति ।।

जननियें कोठे आहेशि ।। जीवलगे माझें ।।
घनखेद मि भोगितां घमणित नाहिशी ।।
धडे येक्या वोवोया बोला पाहातां
नवडनि धरिला का मर्जशि अबोला ।।
भरलि निज वुदरिं घडकिं आणिमनिहि पैठरला ।।
संताप अनळ घडकून फार पेटला ।।
काय मी सांगू घड हें चिंता खड्गे
घड होयिल या वेळा ।। १ ।।
असु दे काहिं कवण पूशि वो माझि आसूवें
कर पल्लवें तेणें होयील आसूदा जीव हा तवें
नातरि देहिं असून टिकति पळलवें ।।
अत्यंत व्देषे असूयेनें तुज कोणें ।।
असुरें नेंलें किं ध्रुव ।। २ ।।

**(श्लोक)** नीरें पाझर ते गिरी गत भयें जेथें मृगें तें वनें
तैशीची तपतें सदैव तपहि ना ना स्थलें पावनें ।।
येथें प्रीति जियेस अघ तशि तूं चंडाल सन्दांतरिं
कैशी वांचशि जेंवि धेनु कपिला प्रात्पा तरूष्कांकरीं ।।

**सूत्रधार :** येणेरितीं शांतिचे वचन ऐकून आशीं गाळित करूणा बोलले पाहा.

दरू : ।। पुन्नागवराळि ।।

घडि धिर धरिं कां गायि ।।
घन कां करिशि कां घायि ।।
जड मोह यें पाहिं ।।
झडपूनि भलत्या ठायीं ।।
दडली असल्यां तुझि आयि ।।
दया देवें केली बाई ।।

**सूत्रधार :** येणेरिती करूणाचे वचन रोकून सर्वत्र मायेला हुडकून कोठें हिं श्रद्धा देवि नाहिं म्हणवून करूणाला सांगतें पाहा.

दरू : ।। आहिरि ।। शापु ।।

नीवार मंडित पुण्यनदी तटीं ।।
देवालयीं तप तपणार नीकटीं ।।
शैवमा ध्वरा मानसज निज मठी ।।
शेवट वरि म्या पाहिलें कीं दिठी ।।
तेथेंहि नाहिं श्रद्धा आयी ।। १ ।।
वाजपेय आणि राज सूयादिक या जगिं
करणार दिक्षित वैदिक याजकहिं
थोर थोर गुणादिक ।।
त्या जवळि हि निरखिलें म्या ठीक ।। २ ।।
मोहविहिनचि दावुनि अंतर ।।
सोहमस्मि असें वदति निरंतर ।।
गेहहिं त्यांचे बाह्य अभ्यंतर पाहिलें ।।
वोपडूं नेंदूनि अंतर तेथेंहि ।।
ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शुद्रसती ।।
ब्रम्हचारि ग्रहि वान प्रीथयति ।।
ब्रम्हीष्टसे रत अवधूत सुव्रति ।।
आम्ही तेथेंहि हुडकिलें वो कोठेंहिं नाहिं श्रद्धा आयी की ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती बोलून शांति फार कष्टि होतां करूणा बोलते पहा.

दरू : पंतुवराळि ।।

माय, तुझी सहसा खलहस्तांकि जायिच ना सत्य ।।
बायीये बरें ऐक तैशियां पुण्यवतिला कैचि दुर्गती हे सखिये ।। १ ।।

शान्ती : मात यथार्थच हे परि वोखटि पातलियां देव धाडिते घटना तशि गोष्टी जनांत सखे अकस्मात केव्हा तरि घडतें ?

(श्लोक) होति श्रीजनकात्मजा निशिचरा त्या रावणाचे ग्रही ।।
नेली नीट रसातळाशि असुरिं पूर्वी त्रयी पूर्ज्यहि ।।
दैत्येंद्रेहीं मदालसा वुडविली गंधर्व कन्यासति ।।
पाताळ ध्वज नामकें अशि महा वक्राचि दैवी गति ।।

सूत्रधार : येणेरिती शान्तीचे वचन ऐकून करूणा बोलते पाहा.

वचन : बरें शान्ती देवि पाषंड मंडलीत हुडकूं चल.

सूत्रधार : येणेरिती शान्ति करूणा दोघी जणि सात्विक श्रद्धेला हुडकीत येतू अस्तां क्षपणक येतो पहा.

दरू : हुसेनी ।।

क्षपणक येतो पहा पहा पहा ।।
अपचरिता धर्म अपुल्या मतामाजि निपुण जो कां महा ।।

सूत्रधार : क्षपणक येतांच भयानें करूणा शान्तिस पाहून बोलसे पाहा.

दरू : अटताल ।। कन्नड ।।

कोण किं प्राण सखि येहा ।। कोणप येतसे महा ।।
लोण उत्तरि जे हा हा ।। शोणाचें या वरि पाहा ।। १ ।।
मळ पंके जो विकारि मळलासे पापकारि ।।
मळ मळूनि वोकारि ।। देखतां येतसे भारी ।। २ ।।
वंचाटनागवा मोर कुंचा हाति ।।
धरि थोर लुंछिले केंसहि घोर सांगवेना साचार ।। ३ ।।

वचन : हा राक्षस म्हणू तरि निर्बल आहे. यास्तव राक्षस नव्हे ।।
पिशाचे म्हणू तरि दिसां भूत दृष्टिस पडत नाहिं;
आताच नरक कुंडातून पापिष्ठ आला म्हणू तरि तोहि नव्हे.
दिगंबर सिध्रांतच दिसतो.

सूत्रधार : येणेरिती शान्ति करूणा संवाद करितस्तां दिगंबर सिध्रांत येवून अपुल्ये शिष्यास पाहून बोलतो पाहा.

(श्लोक) मळ भाजन या देहा कैंचि शुद्धि जलादिकिं साची ।।
ऋषि परिचरणें आत्मा जाणावा किं प्रदीप तैसाची ।।

शा व्या
धूतां शरीसाशि वरि वरि मृत्तिका ।।
लावूनि घालूनि वारि जातांचि ते वेळ पुन्ह वुतावल
मलिन होतां कोणावरि ।।
म्हतार पणीं तो वुसंतेच नाहिं ।। अखंडित वाहे मोरि ।।
आतां शुध्र पण कोठें गा राहिलें सांग ते पांहू मज समोरि ।।
कैचे सोवलें गा ।। आरे शिष्या अवघें वोवलें गा ।। १ ।।

**वचन :** अणिक अयिकरे नित्य गुरूस नमस्कार करावा गोड गोड जेंवू घालावें. अपुल्या बायिलीस धरिल्यानेंहि राग भरू नये.

**सूत्रधार :** येणेरिती अपुल्या सिध्रांत सांगून तामसी श्रद्धेस बलावितां ते येते पाहा.

**दरू : शापु ।। येरक ।।**

तनुमाखलि विष्ठेनें आवधि ।। धन मोर कुंचा करी वागवि
स्तन भारवति कशि मागमी मनि अर्हत सिध्रांत जागवी ।।
अशि अलि सेते श्रद्धा तामसी ।।

**सूत्रधार :** येणेरिती तमसी श्रद्धा येतांच शान्तिने आपुलि माय सात्वीक श्रद्धा म्हणवून मोह पावतांच शान्तीस पाहून करूणा बोलते पाहा.

**दरू : ।। आहारि ।।**

सावेध प्रियसखे होयि अवोपुति नांव
येकचि म्हणूनि भुलु नको सुदत्ति ।। २ ।।
तामसी श्रद्धाहिं वसतसे दुसरि ।।
हें मशि वदलि निज मैत्रिण कुसरि ।।

**सूत्रधार :** येणेरिती करूणा शांति बोलतस्तां सन्यास वेषधारि बुद्धागम येतो पाहा.

**दरू : ।। शा ।। पाडि ।।**

बुद्धागम येतो पाहा पाहा ।। बुद्धागम
बुद्धागम येतो श्रद्धेसीं मिळूनि वुद्धट
वेद विरूद्धाचि बोलत ।।

**सूत्रधार :** येणेरिती बुद्धागम येवून अपले श्रद्धेस पाहून बोलतो. अवो प्रिये अमुचे मत फार चांगलें मुक्ति मुक्ति दोनी आहे. तेंचि सांगतों ऐक ।।

**(श्लोक)** आवास स्थळ रम्य सुंदर वणिक भार्या मनासारीखी
मृष्टांन्नाशयनयिश्लिल्याचि समयीं शय्या मवू फार कीं ।।
विश्वासें भजति अश्या युवतशीं ज्योत्स्नोज्वाला यामिनी
स्त्रगांधादि महोत्सवें ढकलुनी जाति सुखें याजनि ।।

**वचन :** वरकड मत संन्यासास सौख्य कांहि नाहि.

**सूत्रधार :** येणेरिती बुद्धागम बोलतस्तां करूणा शांतीस पाहून बोलते पाहा.

**दरू : ।। आ ।। सुरटा ।।**

कवण किं सांग सये श्रवणि ।। आस असे अमये ।।
तरूण ताळ तरू तैसा लांमट येथेंच आता येतसे वुम्दट ।। १ ।।
रंगित सरस पिशंगत वसन कटिं लंबित ते बहु शोभत गोरटि ।।
मुंडुनि घेतलि शेंडि सारी ।। हस्तकीं धरिलें पुस्तकभारि ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती करूणेचा शांतिने बुध्दागम हा म्हणुन सांगितल्यानंतर क्षपणकानें बुध्दागमाजवळि येवून तुझा मत सिद्धांत काय म्हणून पुस्तां बुध्दागम वुत्तर देतो पाहा.

दरू : आ ।।

आयिसें हें मतरें अमुच्या अच्यार्या संमतरें ।।
क्षणिक जगत्रय गणिजे आपण ।।
घन पटाला परि अनुमानें विण ।। १ ।।
विज्ञानात्मा तोहिं तसाच ।।
अज्ञान्या हें समजसाच ।। २।।
नेणून केल्या स्वैर राहटि ।।
जाणें न लगे नस्का शेवटि ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती बुद्धागमाचें वचन रोकून क्षपणक बोलतो पाहा.

दरू : ।। असावेरि ।। शा ।।

क्षणिक जालासि जरि अनुदिनि व्रतें तरि ।।
मनूष्याचे लेंका हें बरि ।।
मांडीलें कारे सर्वज्ञानें ।। अमुचा बुद्धाचार्यानें सांगितलें ।।

सूत्रधार : येणेरिती बुद्धागमाचे वाक्य ऐकून क्षपणक बोलतो पाहा.

दरू : शाहणा ।।

सर्वज्ञ बुद्धा असें तुजला गुज पूर्वी कसें कळले ।।
अर्वाचिका सांगे ।। अवद्यें हिं तें मज सर्वथा न फुगुनि गर्वबलें ।। १ ।।

बुध्रा. : अयिकरे मूढमति वुत्तर याचे आतांची शीघ्र गति.

बुध्र.दरू : सौगत आगम वाक्या वरूनि सुगत अभिज्ञा असें ।।
सुगम करस्थ फलापरि सर्वहिं ।। समज जाणतसें स्वमानसें ।। २ ।।

क्षपण दरू

तत्कृत शास्त्रच थोर म्हणूनि तूं तर्क्क बळें गणिशि ।।
मी कथिन जें जें सत्य मानी तें करिता न पुशि ।। अमळाशि ।। ३ ।।
साता पिढिचा दास तूं माझा हाता खालिल अगा ।।
पातकिया मम वाक्य गणिं दृढ हा तंव भाववुगा आगा धह ।। ४ ।।

सूत्रधार : येणेरिती क्षपणक बुद्धागम बोलतस्तां सोम सिद्धांत येतो पाहा.

दरू : शा सारंग ।।

पातला पाहा पाहा ।। भैरव जोगि ।।
पातला लोक निपात करिलसें भूतलि अलें महा ।।
भूत जणू तसा ।।
थोर कपाळ अधोर करिं शिर जोर धरूनि कठोर मति ।।

वारणसा अनिवाय भली तर ।।
वारहिं घेवुनि सार बळाकृति ।। १ ।।
पुंड महा नर मुंड माळाधर ।। दंड धरा परि चंडकसा ।।
दंड भाळ वुरिं डंडळे भस्म त्रिपुंड ढिळेहि वुदंड जया असा ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती सोम सिद्धांत येवून बोलतो पाहा.

**(श्लोक)** नरास्थि माळा मय वस्त लेवुनि ।। स्मशान वासी नृकपाळ भोजनी ।।
तो मी जगद्भिन्नचि जे परस्परें ।। तें पाहतों नीट अभिन्न यीश्वरें ।।

**सूत्रधार :** येणेरिती सोम सिद्धांत बोलतस्तां क्षपणक येवून तुझा मत सिद्धांत काय म्हणून विचारितां वुत्तर देतो पाहा.

**श्लोक :** मेदूनि मिनल्या कसे सहमहा मांसाहुतीनें शिखी ।।
धाता ब्रम्ह कपाळ संगत सुरापानें अम्हां पुष्टि कीं ।।
सद्या कपिलि या गळ्यांतुनि गळे द्रवतैकधारान्वये ।।
आम्हा भैरव पूज्य मान बळि अर्पूनि ऐशी स्वयें ।।

**सूत्रधार :** येणेरिती सोम सिद्धांताचे वचन ऐकून क्षपणक बोलतो पाहा.

**वचन :** अरे कोणें किं याला वंचना करून भ्रष्टविलें यास संदेह नाहीं.

**सूत्रधार :** येणेरिती क्षपणकाचे वचन ऐकून कापालिक बोलतो पाहा.

**वचन :** अरे बोडक्या अरे पिशाचा, अमंगळा चौदा भुवने रचणार, परमेश्वरही वंचक कीं कायिरे बरें माझ्या विद्येचा महिमा दाखिवितों पाहसी संहरि मुखामर तथा हरिहर ब्रम्हचा हरिण नादें जश हरिण पांहि. आगदि तारावळि गगन चररोधीन नगर आणी नगासगट भूहिं. भरिन अवधि जळें परिपूर्ण मागुति सलिल तें पियीन पळ न लगतां हीं विविध या वेगळें विध रचाया नव्हे विधिपुरी येक मज वीण नाहिं ।। भैरवाच्या दया गौर वाने सिध्रि अम्हाशि या शिध्र जाणें.

**सूत्रधार :** येणेरिती कापालिकाचे वचन ऐकून क्षपणक बोलतो पाहा.

**वचन :** अरे मूढा, तुला कोणे कीं इंद्रजाल विद्या दाखवून फटविलें यास संदेह नाहीं.

**सूत्रधार :** येणेरिति क्षपणकाचे वचन ऐकून कापालिक बोलतो पाहा.

**दरू :** शाहन ।।

निंदिले श्री भैरवा त्वां मंदा नेणानि तत् गौरवा भोगिशील
पाप्या पुढति रौरवा रागें तुझि मान कापितों येथवा ।। १ ।।
सांग कोठें पळशी नागव्या कोणा पाठि पडशी ।।
लाग वेगें तुझि आहुति गोडशि.
लागलीच घेतों मग कैसें तंडशी ।। २ ।।

**(श्लोक)** हा कापितां तव गळा घनया अशीनें ।।
जे कां वुडे सहित बुदबुद वृंद फेनें ।।

रक्तें तया करिन तुष्ट समेत भूतिं ।।
दुर्गाड मडड मरू झांकृतिनें प्रभूतीं ।।

**सूत्रधार** : येणेरिती बोलून कापालिक खड्ग उपसून क्षपणकास मारायास येतांच क्षपणक भीवून बुद्धागमाचे पाठिशि पडतांच बुद्धागम कापालिकास पाहून बोलतो पाहा.

**वचन** : अरे विनोदानें बोलतांत या तपस्वीला मारणें युक्त नव्हें.

**सूत्रधार** : येणेरिती बुध्दागमाचें वचन ऐकून कापालिक शान्त होता क्षपणक कापालिकास पाहून बोलतो पाहा.

**वचन** : अरे तुला मुक्ति कशि ते मला सांग.

**सूत्रधार** : येणेरिती क्षपणकाचें वचन ऐकून कापालिक बोलतो पाहा.

दरु : कांबोदि ।।

मुक्ति हे आमुचि बरवि ।। नित्य मुक्त शिवोदित धनानंद भरवि
हे वपु पंचभूताचें जातां केवळ भैरव भक्तिरताचें ।।
पावन परम शिवाचें मग पावणें सारूप्य देव देवाचें ।। १ ।।
रमणीय रूपतीशि दिव्य रमणि समान भल्यां युवतीशीं ।।
रमणें सदा आदरें शीं सुमनोरम अति दिव्य विलास भरेंशी ।। २ ।।
येणेरिती बोलून कापालिक अपुल्या मताचे ठायीं विश्वास उपजाया कारणें श्रद्धेला बलावितां राजस श्रद्धा येते पाहा.

(दरू) लेवुनि नरास्थि माळा मय भूषा आणि घेवूनि हस्तिं ।।
रम्य वेषा राजसि से कापालिनि श्रद्धा मोठी राजमुखी येते पाहा ।। गजघाटी ।। १।।

**सूत्रधार** : येणेरिती श्रद्धा आल्यानंतर कापालिक बोलतो पाहा.

**वचन** : अवो प्रिये, दुरहंकार बुद्धास तूं वश्य करूं घे.

**सूत्रधार** : येणेरिती कापालिकाचे वचन ऐकून श्रद्धेनें बुद्धागमाला भेटतांच तो रोमांचित होऊन बोलतो पाहा.

(श्लोक) रंडा पीन पयोधरा किति कीं म्या चंडानुरागें भल्या ।।
दंडाकार भुजीं घन स्तनयुगा चोलुनी मालिंगिल्या ।।
वुद्धाचि शतावार आण वाहतो कोठेंहि कापालिनी ।।
उत्तुंग स्तन संगतोद्भव सुख प्राप्ती न जाली जनी ।।

दरु : आदिताल ।।

नारदाम क्रिय भों मोहे मत फार बरें बरें
मी बोलतसें जी खरें खरें ।। १ ।।
टाकुनि बुधू मत देतों देतों आणि ।।
कापालिक दीक्षाहि घेतों घेतों ।। २ ।।
गुरू तूं शिष्य मी जालों जालों ।।
मनि फार आनंदें घालों घालों ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती बुद्धागम भूलून बोलतांच क्षपणक त्याला निंदितो पाहा.

**वचन :** अरे तुं बा स मला शिवू नको

येणेरीति क्षपणकाचें वचन ऐकून कापालिक श्रध्र्ला पाहून बोलतो पाहा.

अवो प्रिये दुरसहंकार बुद्धासारखें ह्याला हिं वश्य करून घे

**सूत्रधार :** येणेरिती कापालिकाचें वचन ऐकून श्रध्रेनें क्षपणकास भेनटायास जाताच तो चुकून पलीकडे गेल्या त्या क्षपणकास पाहून श्रद्धा बोलते पाहा.

**दरु : नवरोजु ।।**

चुकविल्या तुला सोडिन काय ।।
न करूनि दुराग्रह प्रकट भेटावया ।। १ ।।
वुडतोशि नेणूनि वुपभोग माझा ।।
घडशिल बौद्धापरि घडि मध्यें दास जा जा ।। २ ।।
वट वट करि अयिशे हटवादि फार ।।
फटवुनि केले घरिचे घटदास ते दुरहंकार ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती राजस श्रद्धा बोलून क्षपणकास आलिंगन देताच तो भूलून बोलतो पाहा.

(दरू) नवरो होयिन मी तुझा दास पांहि ।। मज देयि आलिंगन दोहीं बांहि ।।
घडि भरिहि आतां राहवेना ।। जीव घडतो कासाविस साहावेना ।।

(श्लोक) सरस पीन घन स्तनी शोभने ।।
सभय विव्हल येण विलोजने ।।
अपण तू रमशि जरि मानसें ।।
क्षपणकीं तरि कार्य नसा नसें ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रद्धेशी बोलून कापालिकास पाहून बोलतो पाहा.

अहो कापालिक जि मलाहि अपुल्या शिष्य करून घ्यावें.

**सूत्रधार :** येणेरिती क्षपणकाचें वचन ऐकून वुभयतास बलावून अमृत प्राशन करायास मंत्र सांगतो पाहा.

(श्लोक) इदं पवित्रममृतं पीय्यतां भव भेषाजं ।।
पशुपाशसमुदकारणं भैरवोदितं ।।

**सूत्रधार :** येणेरिती मंत्र सांगून अमृतपान करून अवध्यास घेवून नृत्य करितो पाहा.

**दरु : कन्नडा ।।**

चौघेहिं मिळुनी ते जाहले चौबारा नटते अवघे लोक ।।
तमाशा पाहात आश्चर्य मानुनि मानिशि पहाते ।। १ ।।
झोल जाति बहुसा लक्षणेक झुलति बरवे ।।
घेल घेलुनि हिं गीतहिं गाति ।।
डोलति लोलति खेलति आवघे ।। २ ।।
वेंगडि पायांची वळतसे फार ।।

ते घडि घडि त्यांची ।।
फेंगडे चरण करूनि चालति ।।
त्रासहि हांसंति ते सरिसावें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती नाचून बस्तांच कापालिकास पाहून बोलतो पाहा.

वचन : अहो अम्ही अवघे जनही महामोहाचे शेवक म्हणून गणिता वरून नीट कलो.

सूत्रधार : येणेरिती क्षापणकाचे वचन ऐकून कापालिक बोलतो पाहा.

वचन : राजकार्य कससें साहे तें सांगा.

वचन : अहो जी साहिक श्रद्धा महामोह रायास अहित करायास सिद्ध जालि आहे तिला दंडावें म्हणुन महामोहाची आज्ञा आहे.

कापालिक : सात्विक श्रद्धा कोठे कोठे आहे तें सांगा.

वचन : जली नाहीं स्थली नाहिं पाताली नाहिं वर्तती.
विष्णु भक्तिसवें आहे भल्याचे हृदयीं सति.

सूत्रधार : येणेरिती क्षपणकाचे वचन रोकून कापालिक बोलतो तरि आतां निष्काम धर्म कोठें आहे तें सांग.

सूत्रधार : येणेरिती कापालिकाचे वचन रोकून क्षपणक बोलतो पाहा. जलि नाहीं स्थलीं नाहिं पातालीं नाहिं वर्तति विष्णु भक्तिसवें तोकी भल्याचे हृदयीं अथि.
येणे रिती क्षपणकाचे वचन रोकून कापालिक कष्टि होतो पाहा.

(श्लोक) अर्पीसिद्धी विष्णु भक्ति अनन्या तेथें श्रद्धा मीनल्यां सत्व कन्या निष्कामात्मा धर्महि तें अगत्यें झालें वाटेलें विवेकेक कृत्य तथापि प्राण तरि वेचून स्वामी कार्य साधावे.

सूत्रधार : येणेरिती बोलून बुद्धागमा क्षपणक कापालिक स्वकार्यास गेल्यानंतर शांतीस पाहून करूणा बोलते पाहा.

दरु : ।। कल्याणी ।।

दैवांचि सखियें तूं सांति ।। श्रीविष्णु भक्तिची शीतल सावुली ।।
आश्रयुनि असे सुखि तुझि मावुली ।। १ ।।
टाकुनि चिंतेचा गिळुनि ढिगारा।। ठोकीं सुदति सुख विजय नगरा ।।

सूत्रधार : येणेरिती शांती करूणा परस्पर बोलून हें वर्तमान अस्कोंहि विष्णु भक्तिस सांगावे म्हणुन अपले निज निवासास बालिले पाहा.

दरु : ।। आहरि ।।

श्लाध्य गुण रूपावति दोघी जणि करूणा ।।
शांति निघल्या त्या सत्वर गती जागरूक निज स्वामी हीति ।।

।। इति तृतीयोंकः ।।

**सूत्रधार :** येणेरिती शांति करूणा दोघि जणिंहिं निज निवासास गेल्यानंतर मुदितेच्या मुखें महा भैरविपासाव महाप्रयासें कडून श्रद्धा सुटली हें वर्तमान रोकून मैत्रि श्रद्धेला हुडकित येते पहा.

**दरु :** ।। आ ।। आहारि ।।

आवडी जीची सज्जनाला महा ।। पावन मूर्ति अति सुखावहा ।।
लावण्य पेटि थोर दुःखापहरण बलि ते मैत्रि बरवि पाहा ।।

**सूत्रधार :** येणेरिती मैत्री येवून केव्हां श्रद्धेला विलोकिन म्हणून स्मरण करितां श्रद्धा देवि येते पाहा.

**दरु :** शुद्धसा ।। आ ।।

साधावया मुक्ति बरि ।। साधन जे कां सुंदरी ।।
शुद्ध सत्वाची कुमारि ।। श्रद्धा आली ते गजरीं ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेनेती श्रद्धा येवून भयाने कापतस्तां श्रद्धेला पाहून मैत्रि बोलते पाहा.

**वचन :** अवो श्रद्धा देवी तुझी प्रियसखि मी समोर आल्यानेंहिं कां मशीं बोलत नाहीस ?

**सूत्रधार :** येणेरिती मैत्रिचें वचन रोकून श्रद्धा देहावरि येवा भेटतांच मैत्रि बोलते पाहा.

**दरु :** ।। नीलांबरी ।। आदिता ।।

काळ रात्रि धाडेत चडूनियां, चिरकाल आर्जित पुण्ये कडुनियां ।। १ ।।
सुटली संपूर्ण दैव बलें अणिखी ।। भाग्ये सुखरूप देखिलीस निजसखी ।। २ ।।
दुर्लभ पुन्हा मज तुझि भेटी ।। अतां लाभली याचि जन्मी लावण्य पेटी ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मैत्रिचें वचन रोकून श्रद्धा कांपतस्तां पुन्हा मैत्रि बोलते पाहा.

**दरु :** ।। मोहन ।। शा ।।

कांपत कांवो अहेशी ।। भय साफळियाताचि सांपडली ।।
श्रीमति जे विष्णु भक्ति तिणें भितसे मर्दुनि भैरवी शक्ति ।।
क्षेमें रक्षुति तुझि व्यक्ति केली ।। प्रेम रसाचि सये अभिव्यक्ति ।।
कारण तें येथें कायी ।। मज कारणें सांगे सखेल लवलांहि ।।
फार असें आस पांहि ।। तुज वारंवार मन प्रार्थितो बायी ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मैत्रीचें वचन रोकून महा भैरवीनें आपणास कष्टी केलें तें वर्तमान श्रद्धा सांगते पहा.

**(श्लोक)** इथेना परि झडप घालुनि से स्पुरणें ।।
पायि मला धरूनि धर्महि तों करानें ।।
गेली नभीं बुडुनि शीघ्र नखाग्र देशि ।।
कीं मांस पिंड युग मंडित धारि तैशी ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रद्धेचे वचन रोकून मैत्रि बोलते पाहा.

**वचन :** तुला उचलून नेल्यानंतर काय वर्तमान झाले तें सांग.

सूत्रधार येणेरिती मैत्रींचें वचन रोकून श्रद्धा बोलते पहा.

दरु : ।। गांबोदि ।।

ऐक ग समाचार रोशा परि सविस्तार ।। सये बायिये साचार ।।
दृढ महा भैरवीने झडप घालूनि ।। तीणें झडकरि मजलागे ।।
बुडवितां रागें ।। पावुनि म्या व्यथा थोर ।।
धाव मांडितां फार ।। पावली ते दयासार ।।
मावुली दीनाची थार ।। १ ।।
भोवया घालूनि गांठि ।।
आवेशानें वुठावुठि ।। तावुनिया भीम दिठी ।।
तेथ वांहटि देवीनें पाहतां खोटी ।। केवळ पापाचि कोटि ।।
शेवटिं भैरवि भोटि पावलि शांती गोरटि ।। २ ।।

वचन : अवो मैत्रि या प्रकारें विष्णु भक्तिनें महाभैरवीचा संहार केला अस्तांहि माझ्या मनातिल भय अद्यापि गेलें नांहि.

दरु : ।। पुन्नागवराळि ।।

वाटतसे अझुणि असे मज वारंवार सजणी ।।
नीट तें आठवितां अपुल्या मनि ।।
कांटे येताहेत देहिं झणि ।।
मंडित जे नृकपालवि निर्मित कुंडलितां ।।
बट झोंटि अति ।। चंडचि गाळित पिंगळ लोचन ।।
मंडलिहूनि हिं खोटि शशि ।। खंडतशा अति ।।
पांडुर दाढेंत कुंडलिशि जीभ ।। भेटीतुन खंडिल ।।
व्यापारि पुढति तेपा ।। खंड असे अधं कोटि ।। १ ।।
हालतांचि तरू जाललतादिक पहा ललितावुंज ।।
पाणि गमे काळ सर्पिणीच आलि ते भैरवि ।।
गीळावया घोर ।। वाणि बहु घालूं घालूं घेतो ।।
घाबरूनि जीव काटीज कापतें ।। आणि
जगत्दालतद्रूपचि ।। बाळिकें भासतें हाल असें मनि आणि ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती श्रद्धा देवीचें वचन रोकून मैत्रि बोलते पाहा.

दरु : ।। पुन्नागरबळि ।।

हो महा भाग्याची तुं येक ।। होशि महा भाग्याचि ।।
केवळ या सकलांहि जगिं साचि ।। श्रीश भक्ति जिस संकटीं पावलि ।।
शासिनि दुष्ट जनांची वर बळें तुज भैरव रूपिणिनें ।।
भैयविनें ग्रशितां हिं ।। जें रज भावहि वैरूप न घडतां
राहिलीस क्षेम पाहीं ।। वाघिणीचे मुखि ।।
रिघुनि मृगि दैवें ।। मागुति ते सुटे जैसि ।।
सांगातिणी निज त्या जोगिणी पासून ।।
सांगते चुकलीस तैशी ।। २ ।।

**वचन** : तुला भैरवी पासाव विष्णु भक्तीने सोडविल्यानंतर पुन्हा तुजवरि काय प्रसाद केला तो सांग.

**सूत्रधार** : येणेरिती मैत्रिचें वचन रोकून श्रद्धा बोलते पाहा.

सांगतेस समाचार साजणिबायी ।।
सांगातिणि रोक नीट स्वारस्य पूर्वक आयी ।।
आश्वासूनि मज तेंव्हां आनंद ते भक्ति माता ।।
विश्वासें बोलिली ।। आयिशा विशेष
माता नष्ट मोटा या परिचा ।।
नारकी जो मोह गाढा ।। भ्रष्टाच्या
त्या तोंडि शिघ्र म्यासुर केवळ दाढा ।। १ ।।
विवेकाशि माझे वाक्य विशालाक्षि निरोपावें ।।
विरासंजोगूनि शत्रूवरि ।। जावे सैराट गेलिया महा ।।
साहसि कमादिस हा वैराग्योदय न होये ।।
विद्या हेतू तो कसा हा ।। ३ ।।

**वचन** : यास्तव वर्तमान विवेकास सांगायास मी जातें तुझे वर्तमान काय ?

**सूत्रधार** : येणेरिती श्रद्धेचे वचन रोकून मैत्रि बोलते पहा

**वचन** : सखे श्रीविष्णु भक्तिच्या आज्ञेने मुद्रित करणेपेक्षे सगट अम्हि चौघी जणि बहिणिहि विवेक कार्य सिद्धिस्तव महापुरुषाचे हृदयीं राहतों.

**सूत्रधार** : येणेरिती श्रद्धा मैत्री बोलुन स्वस्व कार्यास जातांच वेदवती सहित विवेक राजा येतो पाहा.

दरु : ।। सावेरि ।। शा ।।

शेवकसह महगजरें आला ।। विवेक राजा आनंद भरें
कनक दंड दिव्य चामरें दोहिं कडूनि वुडति अति सुंदरे ।। १ ।।
वेदाभिमानि नि देवता ।। आवेदक जे बरवि हिता ।।
वेदवति तेहिं सुव्रतासवें वेध जीचा राया तत्वता ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरिती विवेक राजा येवून महामोहारास निंदितो पाहा.

दरु : ।। असावेरि ।। शा ।।

जन हा मूढ कैसा अबोधें धन जो आपैसा ।।
शांत अनंत सुखामृत सागर ।। चितूघन जो असमान ।।
तेथें संतत मग्न परंतु नयेकाहि चूळ भरि अप्रमाण आणि ।।
भ्रात असार मृगांबु समुद्रिचें ।। श्रांत करिं जलपान बुडे ।।
आत हिं खेळत पोहत मोहत ।। तो हत भाग्याची जाण ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती मोहाचीं अकृत्ये सांगून पुन्हा बोलतो पहा.

**(श्लोक)** : अबोध मूला भव पाद पायां ।। समूळ वुत्सेद बरा कराया ।।
श्रीविश्वनाथार्चन पुण्य जन्यां ।। बोधासि सोडनि न वाट अन्या ।

सूत्रधार : येणेरिती बोलून मनात निर्धार करून कामास जिंकायास वस्तु विचारास बलावि म्हणन वेदवतीस पाठवितां तिशि मिळून वस्तू विचार येतो पाहा हो.

(गौळिपंतु) आला तो वस्तु विचार देह जोधाचा भाला ।। फिरवित साचार मूत्र मलाचे कोठार ।। नारींचे अपवित्र शरीर तें फार ।। सूत्र पापाचें जंवर बळकट तावन्मान हे गमे सुंदर ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती वस्तु विचार येऊन कामास धिक्कार करितो.

दरु : ।। कांबोधि ।।

धिगिरे धिगि पाप्या मारा ।। भृष्टविले भले शिष्ट
पथिहुनि नष्टा माझिया नभिवुनि मारा ।।
शिकविन मति आणि शिर्काहि लाविन टिक सि
धरूनि तु जरि ठिकसुमारा ।। अंगनाच्या बलें वोंगळा वांचशि ।।
अंगहिनम दुष्टांग कुमारा ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती कामास निंटूनुकाम वश्य लोकास निंदति पहा.

(श्लोक) बाला हे मज इळिते शशि मुखी हर्षत्करें न्याहली ।।
पद्माक्षी कुच चोळति प्रभु तिशी भेटू असे पैठिली ।।
यिछि कोणहि कोण तूज निरखी मांसास्थिमूर्तिच हे ।।
जाण स्त्री दुसरें न येथ वृषभा क्षेत्रज्ञ पाहें स्वयें ।।

सूत्रधार : येणेरिती बोलून विवेक राजा सवळ येवून वस्तु विचार नमस्कार करितांच त्याला पाहून विवेक बोलतो पाहा.

दरु : ।। सा ।। संग्राम आरंभला ।।

आहे लोक मला संगर शुरभला ।। धिग माझा माजी दला ।।
धीर तंचि येकला ।। भंगाया वैरियाला ।।
भासशी मला ।। यिदु मौळिहि जाला ।। यीश्वर जीत जाला
स्कंद तेधवां जन्मला ।। द्वंद्वयाघ्ति बळाथिला ।।
दारूण तो अतुला कंदर्प जोड तुला ।। कल्पि लाभला ।। १ ।।

दरु : येणेरिती विवेकाचें वचन रोकून वस्तु विचार बोलतो पाहा.

दरु : ।। आहरि ।।

प्रार्थितों मी स्वामी पार्थाहूनि मर्द गाजि ।।
व्यर्थ शत्रजय काजीं वातसाचिता कांजि ।।
अंगहिन पंचशर ।। अत्यंत दोषाचें घर ।।
अंगनाचा मुख्या धार ।। आहे ज्याशि निरंतर ।।
अंगज ऐसिया जो मार ।। आटोपाया अपस्मार ।।
पुंगवा ज्ञानवुधार सांगतसे मी निर्धार ।।१।।

(श्लोक) शेना जशि शरि विदारूनि कौर वांची ।।
केलीच शांति विजयें आणि सैंधवाची ।।

तो मी विचार विशिखीं पर सैन्यासरें
जिंकुनि त्यासहि गिळीन तश्याप्रकारें ।।

**सूत्रधार :** येणेरिती वस्तु विचाराचें वचन रोकून त्याला जयास्तव पाठविल्यानंतर विवेक राजा तजवीज करून बोलतो पाहा.

**वचन :** जरि ही वस्तु विचारानें तत्काळ कामास जिंकिले तरिहीं मनाच्या आश्रयाने पुन: कुचेष्टा करिल. यास्तव मनोनिग्रह साटीं शहास पाठवावें वेदवति शमास बलावून आणावें.

**सूत्रधार :** येणेरिती विवेकाचें वचन रोकून वेदवती जावून बलावितां करूणेसहित शम येतो पाहा.

दरु : ।। आनंद भैरवि ।।

शम तो आला कैसा ।। चित्त मदाशि ।।
शामक जो सहसा निरूपाधिक जे कां ।।
पर दु:ख वारणेंछा ।। निरूपम तेचि दुया ।।
सरसीरूहाक्षी सरस सदगुणाम्युदया हरिखें तिचा ।।
धरूनि कर ।। तहूण सुत्सखाकर परम अजयमन ।।
करि वस जो पण ।। सरस मुक्त पण साधक अपण ।।

**सूत्रधार :** येणेरिती शम आल्यानंतर शमास पाहून विवेक बोलतो पाहा.

दरु : रागघंटा ।।

आटोपिशि केवि आदिं मनातें ।। मोटें मोटें योगि ।।
कोटचानुकोटि जे नाटोपेच कांहि ।। सहसा त्यातें ।।
नांव न घेतांहि ।। नावेचरख्ये ।। हाव नराशिहि केवळ पाहि ।।
नावरचि परि नावेक हें चित्त सावध विवरूनि सजण पाहिं ।।

**सूत्रधार :** येणेकिती विवेकाचे वचन रोकून शम मनोनि ग्रहास गेल्यानंतर विवेकराज बात्धेंद्रिय निग्रहा कारणें वेदवती कडून दमास बलावितां दम येतो पाहा.

दरु : ।। हुडशेनि ।।

स्वहित बुडवि जो बहिरिंद्रीय गणविहंरूनि विषयां कुराणि ।।
विहित पथि त्यासहि ।। साहसा भरें ।। सहसा जो कां आणि ।।१।।
दम तो अमित सुखाचा ।। सावध विमल जनाचा बंधु ।।
रमणीय रूप क्षम रमणीचा रमण आला गुण सिंधू ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती दम पुरुष येवून इंद्रियांची निंदा करितो.

।। दरु : ।। केतार ।।

काय सांगू यिंद्रियाची दुष्टता महोदयांची ।।
पायिक केलें थोरहि पापियानि यानि अहा ।।
वायिटाचे मार्गि नेति ।। रोवूनि मनानें महा बुबग ।।

मानूनि हृदयीं ।। वूदशीन अपुलें ठायीं ।।
वुगलें चित्त राहिल्याहि वुपदेश काहि वुघड
आस्था बाळच विषयीं वुपजविती सर्वथाहि ।।
विगडूनि ते पु:नह पाहि ।। पडे संसार प्रवाहीं ।।

विवेक : शमतां मनो निग्रही साटि जावें ।।

सूत्रधार : येणेरिती दम निग्रहांस गेल्यानंतर क्रोधास जिकायास्तव क्षमा देवीस बलावितां क्षमा येते पाहा.

दरू : ।। कल्याणि ।।

पातली क्षमा सुंदरी ।। पुण्य लहरी ।।
पातकें जे संहारि ।। पताका मुक्तिची बरि ।। १ ।।
वडबडुनि दुरूत्तरिं ।। बडवितां दोनि करि ।।
घडि घडि आणि नरिं ।। चळतां वरि घडुनि
घागरि परिं घण मणिनाजे अंतरि चढेळ ।।
निह्यतां नांगरिं अढळ त्या पृथ्वीचे परि ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती क्षमा देवी येवून विवेकराजास नमस्कार करून बोलते पाहा.

वचन : स्वामी माला कोणत्या कामासाटि बलाविले.

सूत्रधार : येणेरिती क्षमा देवीचे वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

वचन : अवो क्षमादेवी क्रोधास जिकाया कारणें तुला पाठवावें म्हणून निश्चय केला आहे.

दरू : ।। येरूकुल ।। कांबोधि ।।

क्रोध कैसा आटोपे तुजला ।। कोण यासम बळ जो न वो माधार ।।
कोण्हीं चालूनि आलीयाहि कोण्या परि शिरकोनि समरिं
त्या जिंकून टाकिशि त्याशि वायि ।।

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वचन रोकून क्षमदेवी बोलते पाहा.

(दरू) धोपटिन अशि कोपास राया धोपटिन अशी ।।
दध रोष आल्या दुज्या हांसत मुखें बहुतेक मानिन
क्षति विण व्देषभरें आवेशलिया अति कुशळ वचन विनवित ।। १।।
कुचलिलिया मज कुचरपणें ।। असंकुचित मनि न आणिन ।।
अचिरचि निज अघखचलें म्हणुनि पण वुचितोत्सव मानिन ।। २ ।।
आसपुरें तंव ज्या शिव्या दिधल्या त्या आशीर्वाद म्हणेन ।।
यास पुढति निरयास जाणें सिध्त या साटि मानि शिणेन ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती क्रोध जायाचा प्रकार सांग्रन पुन्हा विवेकास पाहून क्षमादेवि बोलते पाहा.

(श्लोक) अज्ञक्रिया पितर वेद तपादिकांला निष्कारणें सढि अश्या अधकारकांला ।।
दिष्टितुनि ठिणगि याव मणार कोपा मारीन जेंवि गिरिजा महिषास तेपां ।।

**सूत्रधार** : येणेरिती क्षमा देवीचे वचन रोकून तिला युद्धास पाठवून लोभास जिंकाया कारणें संतोषास बलावितां संतोष येतो पाहा.

**दरू** : ॥ कांबोधि ॥ शा ॥

संतोष आला पाहा पाहा संतोष ॥
स्वस्तीहि सोसुनि मस्त तपादिक ज्यास्तव करिति
समस्त असा हा ॥१॥ रूपाशि आणिलें रूपातीतहि ब्रह्मअपुल्या रूपें
या परिचा तो ॥ २ ॥ *काम धर्म अर्थ नामक पुरुचार्थ*
ज्या मुळें यष्टतो महा समर्थ ॥ ३ ॥

**सूत्रधार** : येणेरिती संतोष येवून लोभास निंदितो पाहा.

**दरू** : ॥ सुरट ॥ आ ॥

धिगिरे धिगि लोभा व्रधा जग पावविलें क्षोभा ॥
निकट साउली तुझी जरि थारे ॥ सकलसि गुण
तैं घडति व्रथारे ॥ १ ॥ *धन मृग दल सागर सलिलशि अनूदिन* शेविने
म्हणे सुललासि ॥

**सूत्रधार** : येणेरिती लोभास निंदून पोटासाटिं धन लोभास्तव लोक कष्टताहेत तो प्रकार वर्णितो पाहा.

**दरू** : मध्यमावति ॥

पोटासाटिं हे लोक आहा ॥ यिछुनि घन मोटा
मोटाचि शीणति मोटा अन्याय कीं हा ॥
राणि फुकट फळें फार ॥ वृक्षाची असति आणि नद्या माजि अपार ॥
भरळें शीतपानीय सेज अरूवर ॥ रचूं ये लता पानि
निश्चित येकंदर असतां हे अवसानि अकरूनि
बुद्धिसानिया वितिभर ॥ १ ॥

**सूत्रधार** : येणेरिती लोभा मुळें लोक कष्टले ते पाहून लोभास जिकावें म्हणून निर्धार करून संतोष विवेक राजा जवळ येवून मुजरा करून बोलतो पाहा.

**वचन** : स्वामि मला कोणत्या कार्या साटिं बलाविलें ॥

**सूत्रधार** : येणेरिती संतोषाचें वचन रोकून विवेक बोलतो पाहा.

**वचन** : अगा ये संतोष लोभास जिंकायास तुला योजिलें आहें तरि सांगतो. शीघैं त्यावरि स्वारि करावि.

**सूत्रधार** : येणेरिती विवेकाचें वचन रोकून संतोष बोलतो पाहा.

**(श्लोक)** जो जिंकिता बहु मुखें अजिंरि जगाला
देव व्दिजा बहुत मर्दुनि पुष्ट जाला ॥
लोभा तया निजबळें निजवीन कसा ॥
श्रीराघवें निवटिला दशकंठ जसा ॥

सूत्रधार : येणेरिती संतोष बोलून निघतांच अधर्मास जिकायास निष्काम धर्माचें स्मरण करितां श्रद्धा सहित निष्काम धर्म येतो पाहा.

दरू : ।। भैरवि ।।

सोपा सायुज्य मोक्षाचच ।। सोपान पंथचिसाचा
जो पाहा प्रख्यात आगळा ।।
निष्काम धर्म तो पत्नी श्रद्धेशीं पावला ।।
मोड जो आत्म शुद्धीचा मोडे धारा दुर्बुद्धीचा ।।
जोड नाहिं सर्वकदा फार थोरानि जोडी केली जाची सर्वथां ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती निष्काम धर्म येवून विवेक रायास मुजरा करितांच त्याला पाहून विवेक बोलतो पाहा.

वचन : अगा ये निष्काम धर्मा त्वां अधर्मास जिकायास स्वारि करावि.

सूत्रधार : येणेरिती निष्काम धर्म बोलून निघतांच दळपति येतो पाहा.

दरू : ।। कन्नड ।।

कलिगिचा तुरा शिरिं सलिगिचा पुतापति दळपति आला तो भारि । भला कारभारि ।।

सूत्रधार : येणेरिती दळपति येवून विवेक रायास मुजरा करून बोलतो पाहा.

वचन : जोशानि सांगितलें तें मुहूर्त जवळ आलें हें चतुरंग बळहि सिद्ध आहे. विजय यात्रास निघावें.

सूत्रधार : येणेरिती दळपति येवून बोलतस्तां शंकर जोशी येतो पाहा.

दरू : ।। कापि ।।

हातिं पंचांग घेऊनि (म्हा) म्हातारा फार तवुनी ।।
टेंकित काठि सभेला शंकर जोसी तो आला ।।
येणेरिती शंकर जोसी येवून मुहूर्त सांगितल्यानंतर विवेक राजा महामोहास जिकायास स्वारिस निघाला पाहा.

दरू : ।। कन्नड ।।

चालियेला वीर केसरि विवेक राजा पूर्वि आजि लें।।
सुंदर पुण्य जें कां येकंदर तेणें शुद्धि निरंतर ।।
जाण जांचे बाह्यंतर ।। मनोरथ तोचि शोभला ।।
मूळ समस्त मनोरथ लाभ जो भरला ।।
राजाधिराज महारथि तेथें जूंभला ।।
मति प्रकाश सारथि त्या जोगाला भला ।।
विश्वाविख्यात ज्ञानेंद्रियचक्षुरादि चारि ।।
अश्वराज ते जुंपिले धुरेशीं युक्त चारि ।।
शाश्वत शम लगाम बोढिला दृढ भारि ।।
नश्वर दुष्ट विषय प्रवृत्त गारि ।।

तेथे मदानें सारथि रथि आणि रथहिं
न घालुनि सिद्ध पथि नटति बरवें
गति शुद्ध मना परि ते मिरवे ।।
अति उद्धट जे प्रति पक्षथवे ।।
बहु दुर्धर त्या शिरणि अवघे ।।
महिवरि खुर शिखर प्रुति ठेवुनि रहि वर
वाहति गगनि जावें ।।

**सूत्रधार :** येणेरिती विवेकराजा येवून काशि पट्टणास पाहून वर्णितो पाहा.

दरू : ।। कांबोदि ।।

परम शिवराज धानि वुदित जे ।। परम पुरुषार्थ दानि ।।
सरस हे दिसतसे ।। चराचर पावानि ।।
भरलि तगटिनिशानि ।। झलकति सौध शिखरें जळयंत्र ।।
गळित जलनाद मुखरें धवल वुंचाट जें ।।
कबळिति जणु नभा जवलि जावुनिच वरें ।।

**सूत्रधार :** येणेरिती गजराजानें येवून गंगातीरि झेंडा देवून विजय नगारां ठोकित वुतरता झाला पाहा.

**।। इति चतुर्थोकस्समाप्तः ।।**

**सूत्रधार :** येणेरिती विवेकराजा गंगातीरिं वुतरल्यानंतर महामोहास विवेक रायास युद्ध झाले तो समाचार विष्णु भक्तिला सांगाया कारणें साहिक श्रद्धा येते पाहा.

दरू : ।। मुखारी ।।

दान यथोक्त विधान पुरस्सर दीधल्याहीं जियेविण ।।
फळासीन अर्पिकथितें जाण कांहि येसेते पहा येथचि ।।
सात्विक श्रद्धा देवी ।। जगीं जे तरणोपायचि चेतन मात्रां दिव्य ठेवि ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रद्धा देवी येवून आसू गाळित काम क्रोधादिकांचा पराभव झाला म्हणून कष्टि होते पाहा.

**(श्लोक)** नगा भरूं सिंधू ध्रुव सकल जाणार पुठति
तयीं शिर्य्यतूला सदृश जनकें शेन खपति ।।
तरिं मोटा बंधु व्यसन भव शोकानल अहा
विवेका ग्रासुनि हृदय बडदाहि विषमहा ।।

दरू : ।। सौराष्ट्र ।। आ ।।

काय करूं मी याशिखेदलयाशि ।। शोकानळ हा स्वजनलयोद्भव जो कां
दुस्सह भरि तो कांहि न विझेचि अनंत विवेकां बुद धन धारि ।। १ ।।
तामस अमुच्ये दायिज दुष्टहि कामादिक जऱ्ही होतें ।।
पामर ते खपल्यांहि ममता ।। हें मन दुखवि अहोते ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रद्धा देवी बोलतस्तां शांति सहित विष्णु भक्ति येते पाहा.

दरू : ।।गौरि आदि।।

विष्णु भक्ती जननी आली विश्वानंद धनि ।।
शंख चक्र आणि नंदक भारि।। पंकज हें करिं आयुधें चारि।।
शांति सखिचिया स्कंधावरि भली ।। शंत मस्तक ताजीची शोभली ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती शांति सहित विष्णु भक्ति आल्यानंतर तिला पाहून शांति बोलते पाहा.

दरू : ।। यमुना ।। आ ।।

अमयेकां चिंतातुर अंतरिं असशी आजि बरि कारण येथें कांहि असल्यां ।।
कारूण्यां बुधिमाते ।। सारस दळ नयने निर्गदि ते सारस हास्यहि मातें ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती शांतिचें वचन रोकून विष्णु भक्ती बोलते पाहा.

दरू : ।। आहरि ।।

अहट नाहिं बळा साहसा आणि जो हाटि शूरहिं ।।
मोह असा त्या हतकांशि ल्हान वत्सहा आहव करिल विवेक कसा ।। १ ।।
या साटि हें मन घाबिरलें होतें कासावीसा जरहिं आवरलें ।।

सूत्रधार : येणेरिती विष्णु भक्तीचे वचन रोकून शांति बोलते पाहा.

(दरू) मावुलिये विलसे कुसरि अभिमान दया तुझि ज्याचे वरि ।।
विवेक रायास त्या तयया यास ।। कांहि न आयास गोष्टि खरि ।।

सूत्रधार : येणेरिती शांति विष्णु भक्ति संवाद करितस्तां श्रद्धादेवि विष्णु भक्तीस नमस्कार करून शांतिस क्षेमालिंगन देवून नम्रतेनें वुभी टाकिली अस्तां तिला पाहून विष्णु भक्ति बोलते पाहा.

दरू : ।। येरूकुल कांबोदि ।।

काय सखये कथिं येथ तेथविपलें ।। कथा आयकों चित्त हें फार टपलें ।।
आयताक्षि अवो बायि ये समरिं जय काय ते पावलें ।। कूट अपलें ।।

सूत्रधार : येणेरिती विष्णु भक्तिचे वचन रोकून श्रद्धा बोलते पाहा.

वचन : अपल्या वैरियांस पापिष्टांस घडायाचें प्रायश्चित्त घडलें.

सूत्रधार : येणेरिती श्रद्धाचें वचन रोकून विष्णु भक्ति बोलते.
आयिसें झालें तरि युद्धाचें वर्तमान सविस्तार सांगावें.

सूत्रधार : येणेरिती विष्णु भक्तीचें वचन रोकून श्रद्धा बोलते.

दरू : ।। चूर्णिका ।।

अवो देवी आपण चक्रतीर्थी पावतांच कांहि रक्तिमा प्रकटानि भगवंत
सूर्य उदयाभिमुख असतां विजय वाद्य घोषें आइयमान अनेक वीर
दळाच्या प्रबळ सिंहनादें बधिरित दिक्प्रांत घडतां ।। सन्नध्त रथ तुरंग
सुस्व थयें पेटे अखंडित भूसंडळा पासाव उधळल्या थोर धूलि पडले ।।
आछादनें दशदिशेमाजि आंश्रु माळि सांपडतां ।। प्रबळ तर कर्णताळ
आंदोळनें उसळल्या समर सिंधुर कुंभ स्थळें सिंदूर सुंदर संध्या राग

दशदिशेचे ठायीं जडतां ।। प्रलय जल धर घोर भीषणें घे घे म्हणूनि शब्द अब्द मंडळ भेदुनि वरि वरि चढतां सिद्ध सैन्य सागरांशी अन्योन्य गांठि पडतां ।। विवेक महाराजानें महामोहा निकटिं भलें ।।
यिष्ट तूटि न व्हावि शिष्ट संप्रदायही न चुकावा म्हणून नघ्यायिक शास्त्र सिष्टायिस पाठविलें ।। तेणे जाऊन या प्रकारें महामोहास प्रबोधिलें ।।
सरस शंभुची सोडुनि पुरि परिस येथतां पावल्या वरि अमुचिया नृपा आणि वरि ।। यांसम रडला भीम तो व्दयां ।। १ ।।
मति वरें महा ।। मोह सन्निधि प्रथित तर्क तो प्रेषिला सुधि ।।
शिकविली अशि त्य किड्किं ।। अकल वैरिया ऐक ते निकी ।। २ ।।
श्लोकेचि सांगते ।।

(श्लोक) टाकूनि हरि मंदिरें ।। शुचि वनें तीरें नद्यांचि बरिं ।।
पुण्यश्लोक मनें हिसानुचर जा म्लेल स्थलीं ना तरि ।।
खड्गें भग्न तुझ्यातनुतुनि गळत्धाराल रक्तें मुखें
वृद्दीप्तें विचकूनि फेरू गण हा ।। भुंको फिरोहिंसुखें ।।
यां प्रमाणें हे जिबाचे वचन ऐकून महामोहानें आर्भाट केला ते सांगते अयिकावें ।।

(दरू) तावुनिया दिठि ताव मिशासहीं देवूनि त्यावरि मोहमहा भोंवयाशि गांठी भीम तो लाघुनि भोंवडी तू पहा हें वदला पहा ।। दुर्मति विवेक हा ।। भोगो दुष्कर्म परिपाक हा ।। १ ।।

वचन : अयिसें महामोह आग्रहानें बरळुन कुतर्क शास्त्रासहित पाषंडागम आधिं युध्रास पाठवितां अमूचें साहाय्य करायास सरस्वतीस पुढें करून मीमांसा देवी त्यास मयीं अयिशी प्रकटली.

(श्लोक) सांख्य न्याय फणाद पाणि निकृत प्रोद्याम शास्त्रान्विता । दिव्य न्याय सहस्त्र बाहुनि करि वुत्भाशिति दिक्पथा ।।
मीमांसा समयार्थिनि प्रकटली धर्मेंदुकांताना ।।
वाग्देवी सहिताद्रत्रयी त्रिनयना गौरी जशीस तूं गुणा ।।

सूत्रधार : येणेरिती श्रध्दा देवीचें वचन ऐकून शांति बोलते पाहा.

(वचन) माते अन्योन्य भांडणार शास्त्रास कैसें ऐकमत्य घडलें ?

सूत्रधार : येणेरिती शांतिचें वचन ऐकून श्रद्धा बोलते पाहा.

(श्लोक) एक वंशोद्भवां दावा असल्याहिं परस्परें ।।
शत्रूशीं पडतां गाठी मिळति ते अति त्वरें ।।

वचन : नीट विचारितां शास्त्राला परस्परें विरोधहि नांहि ।।

(श्लोक) शांतानंत सुतेज नित्य अजहिं तत्तग्दुणाचा भरें
ब्रम्हा शर्व हरि मणोनि बहुशा वाखाणिजेतें बरें ।।
त्या त्या वैदिक आगमी हिं शतशा मार्ग प्रवृत्ती तरीं
गम्य श्री जगदीश हाचि जलधी जैसा नद्यांचा भरीं ।।

सूत्रधार : येणेरिती श्रद्धा देवीनें शांतिला प्रत्युत्तर दिल्यानंतर विष्णु भक्तीनें युध्राचा समाचार विचारतां श्रध्दा बोलते पाहा.

(चूर्णिका) तदनंतरें धन कनक नग नगरतनुतनुजललित ललनादि सुखकर ।। निखिल विषय विषयीं विगत राग कुपितां तरें ।। रथ रज तुरंग पदातिसमाकुल प्रबल तर वुभय बला क्षोणी ।। अभिमुख चालूनि येतां रण क्षोणि विरावेश जनक कनक थपटचारण तुरासगट ।। बाके कंबु बुरंग गर्जत डांके डिंडिमचें गतो ध्वनि फांके नीट निसंग दिडमुख झांके सर्वहि दंग घडतां ।। तो मराज विवेक राज सेनामुख मंडली भंडनोद्युक्त अखंडित विक्रम मंडित बळि ।। निस्तुल वस्तु विचार प्रमुख मुखंड मुखंड महामोह दळ खंड खंड कराया कारणें आले चालूनि तर्कशां बरं ।। ताले द रहि कर्कशा कृति ।। भाले कार्मुक तर्कशासह झालें कुंठित तर्क शाव्वतों ।। मारा मणूनिच सुमारातहि।। अणुचि मारा दियुध्र जगति ।। धारा धरा परिस धाराळ तेविशिख धारांबु वृष्टि करिति ।। वाराणशींत अनिवार स्मरास परिवारा खिळूनि म्हणती ।। होरा आसाच असुहो राजया जय ।। अहो राति निट पुढति ।।

वचन : या प्रमाणे अम्हा कडील मारित कुठतांच महामोहा कडील सरदारहिं चालूनि आले पाळावया स्वजन पाळा तथा निज नृपाळाहिं वुग्र सहसा ।। घालावया अरिस घाला मजोजवनि घाला पर व्रजकसा ।। माला नते कि मणि भाला वुभारुनि नभालागि वुजली असा ढाला पुढारूनि सुलालरणि अति दृढाला यमा गिळिलसा

दरू : आहारी ।।

द्वंद्व युध्दीं मग कंदर्प निजविला सुंदरें वस्तु विचारें
बळवृंद क्षमेने तुंद कोपाचें चंदन केलें सारें ।।
मृत्युरांद किं लोभ निखंडुनि लोटिला खंदलूनि तोषधिरें ।।
अधकंद एकंदर वुरले अबंदर ।। बंदरि गेले अयीसें ।।
तुझिय्ये दये राजा असा पावला विजये ।।

सूत्रधार : येणेरीति श्रध्दा देविचें वचन ऐकून विष्णु भक्ति अत्यंत संतोष पावून विष्णु भक्तिनें मनाचा समाचार विचारितां विकल्पा सहित मनराजा येतो पाहा ।।

दरू : विकल्पाचा धरूनि कर ।। विकट दुःखाक्रांत फार ।।
दुर्मनु आला तो मन नयनि गळति आशी ।। नये वेद सांगायाशि ।।
काहिच अंत नाहीच ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीति मन राजा येवून स्वजनास आठवून कष्टि होतो पाहा.

दरू : आनंद भैरवि ।।

कामादि पुत्र होयावें ।। लौकरि मातें क्षेमालिंगन हिं द्यावें ।।
शोकाग्नि तप्त हें माझें देह स्वभावें प्रेमादं वाक्य अम्रतानें मनि निववावें ।।
असूयादिक कन्यका तैश्याचि सूना आशातृष्णादि आणिका कोठें ठेल्यांकि ।।
कासा सांटि युणाद्दिका त्रासला जीव बहु या समयीं पैं निका ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरीति मनराजा कष्टि होवून विकल्पास वाटे लावून संकल्पाचे स्मरण करितांच सिध्दि भार्यांशि संकल्प येतो.

दरू : ? ॥ ?

सिध्रि भार्येशि पाहा येतसे शुध्द संकल्प महा ॥
बध्रकह जोसु निषिध्र विषय पर वुध्दरिहिं अविरूध्द धर्मासिहिं ॥

**सूत्रधार :** येणेरीति संकल्प येवून सिध्दीं स पाहून बोलतो पाहा.

दरू : घंटा ॥

विकल्पाचे हातिं सांपडूनि मन आतां देवी जालें ॥
अकलिपत क्लेशें अत्यंत तें दीन अतां देवी ॥ १ ॥
जवळिक माझि जाहालियां बरि अतां देवी ॥
त्याशि दवडून घालिल ॥
दूरि झडकरि अतां देवी ॥ २ ॥
वरूणि व्हांवें सां निध्यतु तरि अतां देवी ॥
तेणे तरूनि जायिल मन विकल्पाची तरि अतां देवी ॥ ३ ॥

**सूत्रधार :** येणेरीती संकल्पाचे वचन ऐकून सिध्दी बोलते पाहा.

(दरू) तैंशि आहे पांथा पांशि प्राणनाथा ॥
तें कैसे म्हणा तरि बोलूं तेचि गाथा ॥
जेथें पुरुष तेथें वसे जेंवि छाया ॥
कि जेथें लोभ तेथें निकट राहे माया ॥ १ ॥

**सूत्रधार :** येणेरीति सिध्दि संकल्प परस्पर बोलून मनराज जवळ येतांच संकल्पास पाहून प्रवृत्तीस आठवून बोलतो पाहा.

(दरू) प्रवर्ततिहितीं सदा प्रवृत्ति माझि प्रमदा ॥
ऐसा कष्टता मि फार ॥ कैसा न घे समाचार ॥ १ ॥
संकल्पा हें नीट सांग संशयाचें लोपिं आग
कांता जे कां सानुराग कांतिलाहि आला राग ॥ २ ॥

**सूत्रधार :** येणेरीति मन कष्टि होतस्तां त्यांचे समाधान कराया विष्णुभक्तिनें सरस्वतीस पाठवितां वैय्यासकि सरस्वति येते पाहा.

**मध्यमा :** आ॥

भारति येते पाहा ॥ वैय्यासकि भारति येते महा ॥
भारतिचि प्रति भारति नीट वुभारति जीस्तव नारकीया तारणा ॥
सुखाशि अनारत देत जना रसिकांस जे ॥ २ ॥

**सूत्रधार :** येणेरीति वैय्यासकि सरस्वती येवून मनाचें समाधान करते पाहा.

दरू : हुशानि ॥

विव्हळ कां बापा ॥ असशि आर्वारि हुत्तापा ॥

नित्य कळुनि अनित्य जन फिका अत्ययें थाच्या अतिशीणशि कां ।।
ठांवी तुलायितिहास पुराणें कां विसरिशि गा मोह भरानें ।।

(श्लोक) ब्रम्हें शंभर कल्पजीवि अमरक्ष्मा दैत्य शक्रांबुधि ।।
मन्वादिक मुनीहि जन्मुंनि पहा गेले अनंतावधि ।।
मोटा मोहहि कोण हा वुपजतो शोक प्रदाता जगा ।।
जातां सागर फेंस तुल्य तनुहकीं पंचभूतोत्थगा ।।

सूत्रधार : येणेरीति सरस्वतीचे वचन ऐकून मनराजा बोलतो पहा.

वचन : माते हें यथार्थच ।। परंतु किति विवेक केल्यानेहि शोक जात नाहिं ।।

सरस्वती : व० वत्सा हा स्नेहाचा दोष तेंचि अयिक.

दरू : बिलहरि ।।

स्नेहनुबंधेचि महातापवी आत्म देहाशि शोकाळ हा ।।
स्नेह युक्त वातीसहाजाली तो दीप हें होय नव्हेह कीं पहा ।।
या साटिं स्नेह संगति ।। सोडिरे मना हे सार क्लेश भंगती व पुत्रादिकांच्या संगतीने तां कायि सुख अनुभविलें ।।

सूत्रधार : येणेरीति सरस्वतीचें वचन ऐकून मन राजा बोलतो पाहा.

वचन : काय केल्यानही चिंता जात नाहिं.

सरस्वति : वत्सा हा ममतेचा दोष तेचि अयिक.

श्लोक : माजार भक्षिते सुखं या दृशं गृह कुक्कुटे ।।
नतादडन ममता श्रून्ये कळवि केथ ।।

सूचके : यास्तव ममता टाकून एखाद्या परम शांत विषयि चित्त ठेविल्यानें दुःख शांत होईल.

सूत्रधार : येणेरीति सरस्वतीचें वचन ऐकून मनानें शांत विषय कोणता म्हणून पुसतां सरस्वती सांगते पाहा.

दरू : शंकरभरणा ।।

ध्यायीं अश्या परमात्म्या रामा ।। आत्म्या वुठरे लवलाहिं ।।
जाईल चिंतेचि काजळि जेंवि कांजळि ।।
लवण विरें पांहि राहिलाहीं तुझा वुंबरा ।।
राखतंबरा सायुज्य मोक्ष हाहि ।।
पायिकाचे नित्य पायिक होति ।। आयिक धर्मार्थ कामहि ।। १ ।।
पूर्ण ब्रम्हरसें वोतलि दिव्य पूतलि वर्णवेना वेदाशि ।।
चित् धनाम अति सावळि जेंवि सावळि
भक्त तिच्चसे जेशि योगियांचि बुध्दि सलिन विसंबली ।।
सर्वथा ज्या रूपासि होताना संसारि वरें पुण्य ठावरें कोण्ही त्याशि वुपाशि
निर्वि कल्प वृत्ति कल्पका तलि कल्पिकां ।। २ ।।
मंडप सुमनाच्या मध्ये त्या जीवरत्नासनि चिद्विलासिनी ।।

शीता जे तिंशि साचा ।। ठाकला जो वीर केसरी नटिकेसरि ।।
कोटि मेळ कामाचा काशियेला कटिं कूसरि पर केसरि थाट नेणो विजांचा ।।
प्रीतीनें ध्याई रे प्रताप राम स्वामी पांया ।।
वाहूनि मी पणाचें वाड वाझें सदांसाचें ।।
कां उगा अझुनि शिणशी वांया ।। ३ ।।
कामना विषयाची कां मना धरिताशि यांचि ।।
पामरा शेखीं होशिल जांया ।।
ध्याशि राघवा जरीं ध्याशी स्वानंदे तरि ।।
येशील मूळ मि राशि ठाया ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरीति सरस्वति वुपदेश करितां मनराजा कृतार्थ झालो म्हणून नमस्कार करितां सरस्वती बोलते पाहाह.

**वचन :** वत्सा तुझें हृदय वैराग्यास पात्र झालें.

**सूत्रधार :** येणेरीति सरस्वति अनुग्रह करितांच अहिंसेसहित वैराग्य पुरुष येतो पाहा.

**(दरू)** वैराग्य पुरुष पाहा ।। येतो येथे हा ।। वै ।।
संगति ज्याचि सांग धरलीयां भंगति देह अमंगळ सर्वहिं ।। १ ।।
संशित व्रतहि प्रशंसिति जिस असंशय रमणि अहिंसे सह त्या ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती वैराग्य पुरुष येतांच त्यास पाहून अहिंसा बोलते पाहा.

**(दरू)** स्वामि माझा प्रभाव ऐका ।। काम मनोहरा ।।
या मांजि तिहिं लोकिं ।। धर्मि मि मुख्य जेकचि सुंदरा ।।
पुण्य तीर्थिहिं मज्जन ।। केलियां कन्या दानादि दानें
दिधलिया मान्य जनाची शेवा घडलीयां महनीय दिव्य गुण ।।
अन्यहिं साधन ।। नाना प्रकारें अन्यून साधिल्यां आजि ।।
अवघिहिं धन्या वांया मजवीण सारिहिं ।।
अन्यथा नव्हेचि अंबुजे क्षणा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती अहिंसेचे वचन ऐकून वैराग्य पुरुष मनराजा जवळ येतां त्याला पाहून मनराजा बोलतो पाहा.

**वचन :** वत्सा उपजतांच तुला म्या टाकिलें अतां दैवाधीन आलास तरि भेटूं ये ।। म्हणून भेटला नंतर मनास पाहून वैराग्य पुरुष बोलतो पाहा.

**वचन :** बापा येथें शोकास अवकाश कांहिं नाहीं अयिक.

**दरू : केदार ।।**

तातपितृव्य सुता तनय स्त्री यातील जे निज
यातिचे सकळहिं तैसा मेळयांचा जायांचा
हाट करूं हाटिं दाटति सर्वत्र वाटसरू
वाटे वाटति येकत्र ।। १ ।।

हे घव घवी जशिरे धवितजांचि रे घडि जूजति ।। मेघहिं ज्या परिं ।। २ ।।
वाहिनि भीतरी आहत वायूचें वाहति ते तरूसाहितिनें जसें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती वैराग्य पुरुषाचें वचन ऐकून मन तात्कालिक समाधान पावून कामादिक पुत्रांची दर्शनापेक्षा धरून सरस्वतीस पाहून बोलतो पाहा.

(दरू) पर्ज तशि दया काहिं करिं अमयेहत सुत दाविले धृतराष्ट्रा जशे।।सत्यवती तनयें ।।१।।
फिरूनि गतसुतां गुरूशि दिले ।। जसें मुरहरें अति सदयें ।। २ ।।
भेटतमाचील पेटूनि शुध्द ते भेटवि तनुज अये ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती मनराजानें ममता भ्रांतिनें बोलतांच त्याची भ्राति जायास सरस्वति बोलते पाहा.

वचन : अरे मना हा प्रपंच स्वप्न प्राय येथें जन्म खरें असल्यानें म्हणें गेल्यास्तव कष्टि व्हांवे तेंच सांगतें अयिक.

(दरू) तैसें येणें नसतां जाणें जावें ।। भाव नस्तां ।।
कैंचा देव तो सांग गांव नस्तां कैंची शिव ।। १ ।।
चित्ति पाहा आधि भितिच नसल्यां चित्रा कैंचा ठाव ।।

(दरू) भ्रामशि कां मनारें ममता भ्रमाचि धरूनि ठेवि ।।
वसने फाटति किति तसलिया देहाचि स्थिति व्यसन परतेचि याचें ठेवि ।।
असति माया परि नसति दावीं बाडंबरि ।।
असकितिची उठा ठेवि ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती प्रबोध न करून कामक्रोधादिकांस मनाचि भेटि करावि म्हणून निर्धार करितांच आधि काम येतो पाहा.

दरू : सुरट ।।

निवृत्ति विषयी पूरता ।। आला निरूपपम काम अरता ।।
अवलोकि अतां त्वरिता अवलंबि भेटि करितां ।।

सूत्रधार : येणेरिती काम आल्यानंतर क्रोध येतो पाहा.

दरू : कन्नड ।।

पातला कोप पाहा ।। पाहारे पाहा ।।
घालाया देह भ्रमाशि बाला शान्त ते जो राशि ।।
आला आहे तुजपाशि ।। आलिंगन करायाशि ।।

सूत्रधार : येणेरिती क्रोध आल्यानंतर लोभ येतो पाहा.

दरू : कल्याणि ।।

आला लोभ महा ।। आवडि पाहा ।।
लक्षकोटि अर्थि ।। लक्ष जयाप्रति लक्षणवंत सुरक्षित तो अति ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति लोभ आल्यानंतर द्वेष येतो पाहा.

(दरू) द्वैश येतो पाहा दुर्विषयीं हा ।। दूरि परिहारि क्लेश ।।
दुरि तेहि अवधि निश्शेष ।।
दिव्य मंगळ वेष देखतांचि वाटे संतोष ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति द्वेष आल्यानंतर मद येतो पाहा.

दरू : हुशानु ।। आदिताल ।।

आनंदाच्या अतिशयें अपार वाढला स्वयें ।।
अनुपम जो मातला ।। अशा मद तो पातला ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरीति मद आल्यानंतर असूया आशा सहित तृष्णा येते पाहा.

(दरू) ता द्वैविषयीं असूया जी आली ते पाहा ।।
जे तारक लोका माजि आलि ते पाहा ।। १ ।।
स्वरूप ध्यानाची आशा आलि ते पाहा ।।
दुरंति हर्ति भवपाशा आली ते पाहा ।। २ ।।
नित्य भक्ति विषयीं तृष्णा आली ते पाहा ।।
सत्य जे शमवि आली ते पाहा ।। ३ ।।

**सूत्रधार** : येणेरीति अवघेहि आल्यानंतर मनास पाहून सरस्वती बोलते पाहा.

**वचन** : अरे मना द्वैता विषयीं पूर्ण असूया आली पाहा ।।
निरंतर भक्ति विषयीं तृष्णा आली पाहा ।।
स्वरूप ध्यान विषयीं आशा आली पाहा ।।
निवृत्ति विषयीं सांग काम आला ।।
देह बुधिवरि क्रोध आला ।।
स्वानंदातिशयी मद आला ।।
दुष्ट विषयाचे ठायीं द्वेष आला ।।
लक्ष्यार्थाचे ठांयी लोभ आला ।।
श्रीरामाचेय चरणार विंदी अभिवृध्दि स्नेह आला ।।
तुझ्या विकारानें तेंहि विकार पावले ।।
तूं निर्विकार होतांच तेहि निर्विकार झालें ।।

**सूत्रधार** : येणेरिती सरस्वतीचें वचन ऐकून मन बोलते पाहा.
गेले पणाची भ्रांति गेली बाधक जे होते सर्वहि साधक झाले ।।

(श्लोक) त्या नारी तरण्यास भृंगरवतें झाडें नवोन्मीलितामल्ली
पुष्प सुगंध मंद बरवेकी तेचिवारे स्वता ।।
मिऱ्या हृत्तम जाल भग्न घडतां आतां विचारोत्करीं ।।
त्या याते मन पाहतें मृग जलधिच्या तरंगापरी ।।

सूत्रधार : येणेरीति मनाचें वचन ऐकून सरस्वती बोलते पाहा.

वचन : वत्सा जऱ्हि तूं या प्रकारें विरक्त आहेस तरि गृहस्थानें मूहूर्त मात्रहि आश्रमावेगळें असू नये. आजिपासून निवृत्तिच प्रिय भार्याहोयील विवेकादि शमदमादि पुत्रहि शेवा करितिल तूं सुखरूप ऐस.

सूत्रधार : येणेरीति सरस्वतीचें वचन ऐकून मनराजा कामादिक पुत्राचा लाभ झाला म्हणून बोलतो पाहा.

(श्लोक) आला सांग निवृत्ति काम सहसा सायुज्य कांते वरि ।।
झाला मोह विकास कोप भरला देह श्रमी त्यावरि ।।
स्वानंदें मद मातला कुविषयीं व्देष स्वयं पातला ।।
लक्ष्यार्थी धन लोभ राघव पदीं स्नेह प्रवर्षधिना ।।

सूत्रधार : येणेरिती मनाचें वचन ऐकून सरस्वती बोलते पाहा.

(दरू) निवृत्तीची छाया भली प्रवृत्ति शीघ्र ते आली पाहे गा सुखें गा ।।

सूत्रधार : येणेरीति मनाचे मनोरथ पुरवुन सरस्वती निज निवासास चालिली पाहा.

दरू : सरस्वति देवि फार संतोष भरूनि स्वस्थलास चालिली ।।

।। पंचमोंक ।।

श्रीगणेशाय नमः ।।

सूत्रधार : येणेरीति वैराग्यरूढ मन होवून निवृत्ति भार्येशि युक्त असतां विवेक रायानें उपनिषद्देवीस बलावन आणावया कारणें शान्ति देवीस पाठवितां शांति येते पाहा.

दरू : मध्यमा ।। आदिताल ।।

येतसे शान्ति सखि ।। या ठांयास कि येतसे शान्ति सखि ।।
हेतूसुखासकि पित हे मा सारिखि ।। हे तंव नेटकि ।। १ ।।
पुर्णेदु बिंबानना फुल्ल पद्मलोचना वर्णवेना कवणा ।।
वरारोहासु यावना ।।

सूत्रधार : येणेरीति शान्तिदेवि येतांच जीवरायाचे आज्ञेवरून विवेकरायास बलावया कारणें श्रध्दा देवीस पाठवितां श्रध्दा देवी येते पाहा.

दरू : आहरि ।। आदिताल ।।

मुख्य सद्‌गुणाची श्रोणि ।। मुक्ति सौधाची निश्रेणि ।।
विख्यात देवि ते भली विश्वमणि श्रध्दा आली ।।

सूत्रधार : येणेरीति श्रध्दा आल्यानंतर तिला पाहून शान्ति बोलते पाहा.

वचन : माते आतां मनाचें वर्तमान काय पहिल्या सारिखेंच वुन्मत्त आहे किं जीवरायास अनुकूल होवून त्याच्या आज्ञेत आहे ? तें मला सांगावें.

सूत्रधार : येणेरीति शान्तीचें वचन ऐकून श्रध्दा देवी बोलते पाहा.

वचन : आतां मन केवळ शान्त होवून जीवराराच्या हाताखालें आलें आहे.

**शांति :** माया जे आहे तिचे ठायिं जीव रायाचा अनुग्रह आहे काय ?

**सूत्रधार :** येणेरीति शान्तिचे वचन ऐकून श्रध्दा बोलते पाहा.

(दरू) निग्रहावी सर्वा नये बीजमाया ।।
फार आग्रह या कार्यि आहे जीवराया ।। १ ।।
ठाव कैचा अनुग्रहा तेथें बाअी ।।
नीट भाव सांगीतला तुजलागि पाहिं ।।

**शांति :** तरि आता जीवरायाची स्थिति कैशी आहे ते सांगावें.

**श्रद्धा :** नित्यानित्य विचारणासि दयिता वैराग्य हें सोयरें ।।
सांगाति प्रशमादि मैत्रहि यमाद्यष्टांग तें साजिरें ।।
मैत्रि आदिक पाथकासह चरी देवी मुमुक्षा स्वयें ।।
वारावे अरि नित्य मोह ममता संकल्प संगादि हे ।।

**सूत्रधार :** येणेरीति श्रध्दा देवीचें वचन ऐकून शान्ति बोलते पाहा.

**वचन :** माते योग विघ्न करणार सगट महामोह लपला होता किं.
त्यानें मोक्ष मार्गास काय विघात केला ते सांग श्रद्धा.

दरू : सौराष्ट्र ।।

विधुमति नावाचि विद्या जे पाही ।। अधम मोह वाक्यें बायितिणें ।।
रूधिरा जीव अडमार्गी वुपायि ।। १ ।।
बाजगिरि विद्या भरि पळा माजि दाखविली ना ना प्रकारिं सजीवाक्षि
विद्या धरि जीव राजया मोहवूं आल्यां सुंदरि ।। २ ।।
नवविधि अर्ष्टांहि सिध्दि ।। ठेवया जवलिच येवूनि सर्व समृद्धि ।।
जीव होतां आशा बद्धि ।। ३ ।।

**श्रद्धा :** तोहिं प्रकार सांगतें ऐका ।।

(दरू) व्यागड प्रपंचिया श्रमुनि अजुनि.
न सुटेचि भ्रम ।। तुझा क्षणि ।।
आठविते राम राम मनी ।। अगा राया अमाळ जाचणि ।। १ ।।
विषासह शेविल्यां वोद न घडे देहा जेंवि संछेदन ।।
काम संग तेवि हा दारूण ।। बहु दूरी ।। ठेवि निर्दारून ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरीति परस्परें बोलून शान्ति श्रद्धा दोघि जणिहिं स्वस्थ कार्यास गेल्यानंतर जीव राजा येतो म्हणुन सभ्यास सावध करायास मोक्षकाम येतो पाहा.

दरू : अठाण ।। आदिताल ।।

पावन साधन प्रथम ।। जीवन जीवाचें परम ।।
पावला करित उद्दाम पावला तो मोक्षकाम ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती मोक्ष काम पुरुष येवून सभास्थांस सावध केल्यानंतर जीव राजा येतो पाहा.

(दरू : आनंद भैरवि)

धणि जो तत्व बृंदाचा अणि
निस्वानंदाचा सनातन अंशयिशाचा जो अनुपम साचा ।।
सनातन अंशयिशाचा ।। १।।
पहा तो क्षेत्रज्ञ भला ।। वैभवें पूर्ण पातला ।।
चिद्रसाचा महा पुतळा जो नामाथिला ।।
चिद्रसाचा महा पुतळा ।। २ ।।
समगमे शिरजोर ।।
समाधि अमात्य थोर शमादिहिं सद्गुणाकार सवें किंकर शमादि ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति जीवराजा विष्णु भक्तिचें महत्व वर्णितो पाहा.

(श्लोक) वृत्तीर्णा ममता भ्रमासह महा क्लेशोर्मि माळा भली ।।
स्त्री पुत्रात्मक वक्र नक्र मिठिंहि मोद्या बळें सूटली ।।
कोपाचा बडबाग्नि शान्त घडला ।। छिन्ना दुराशालता ।।
प्राप्त प्राय भवाब्धि पैल तटहें भक्ति प्रभावें अतां ।।

सूत्रधार : येणेरीति विष्णु भक्तिचें स्तोत्र करून जीवराजा बसला अस्तां श्रध्दा देवी सहित विवेक राजा येतो पाहा.

(दरू) वसंत. भैरा विजयासम शूरमहा विजय श्रीशि विवेक हा ।।
गज गति श्रध्देशि पाहा ।। गजरें येतो महा ।।

सूत्रधार : येणेरिती विवेक येवून जीवराजास नमस्कार करायास जातांच त्याचा हात धरून जीवराजा बोलतो पाहा.

वचन : वत्सा जतूं लेंकरू झालास तरि आम्हास ज्ञानोपदेश केल्यास्तव तूं वडिलांचे ठायि तेंच सांगतों ऐक.

(श्लोक) स्वधर्म पूर्वि विसरूनि देवी ।। विचारितां ते तनयांशि ठेवि ।।
तेहि तयां बोधुनि नीट शेखीं ऐका मुलें हो वदले असे किं ।।

वचन : यास्तव त्वां नमस्कार करणे युक्त नव्हे.

सूत्रधार : येणेरिती विवेक राजा बोलतस्तां शान्तिसह वर्तमान उपनिषद्देवी — येते पाहा.

दरू : आहारि ।। आदिताल ।।

देवि हे पातलि उपनिषद्देवी ।। उपमेतित जे कां ।।
वुपजविति बाधा ।। वुपरि वुपरि सदा ।। १ ।।
स्वप्रकाश घन अप्रमेय पूर्णक्षिप्रजे दाखिवी ।।
अप्रयासें करून ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती वुपनिष्नद्देवी विवेक राजाचें संनिधानि येते वेळे शान्तिस पाहून वुपनिषद्देवी विवेक रायाचें गाऱ्हाणें सांगते पाहा.

दरू : गुंम कांबोदि ।। आदिताल ।।

जलजाक्षि ऐक प्राणेशाची ।।
चलंति खोटि कळकंठी लोकातीतसाचि केलें कीं जेणें ।।
कळुनिहि सांडिया देहाचि ।।
शान्ति बायिये येकट मि बहुयेर वधूपरि संकटिं पडिलें सखि मानाचि ।।
महा निष्टूर निर्दयाचें प्राण सखि ये पाहावें कैसें
वदनयाचें नावडे मनि सहसा या जवळि ।। जावंयाचे ।।
सोडूनि आशा राहीन वुगली ठायीच अपुल्या ।।
नेवु नको मज कोठें साचें ।।

**सूत्रधार :** येणेरिती उपनिषद्देवीचें वचन ऐकून शान्ति देवि बोलते पाहा.

दरू : मुखारि ।। आदिताल ।।

अन्याय रायाचा नाहि नाहि ।।
अवो अन्यथा नव्हेचि हे ।।
गोष्टी कांहि घोर संकटिं प्रभु हा सांपडला ।।
जसा तो रमणीय मृगकां सांपडला ।। २ ।।
राण अवघेंहिं फिरूनि पडिलें वरि
निज प्राण टिकणेची झालें कठिण सुंदरि ।।

**सूत्रधार :** येणेरिती शान्तिचें वचन ऐकून उपनिषद्देवी बोलते पाहा.

**वचन :** सखे माझि दुर्दश तां देखिली नाहि ? यास्तव ग ऐसें बोलतेस तेची सांगते ऐक.

दरू : पुन्नगवरालि ।। आदिताल ।।

कुचरीं मज वोढितां दर दर ।।
झालि सुचरित खुळखुळति आंगे येकंदर ।।
खचली माझी वर्ण शोभा मनोहर ।।
कदा वचनि सांगावेना तें हर हर ।। १ ।।
नायक वुहावतां विवेक राजा ।।
म्या कायेक दुर्दशान भोगीली जा जा ।।
बायि पापिष्टी मज दास्य काजा लावू ।।
आयिक यिछिलें कसा ।। भोग माझा ।। २ ।।

शांवबायि हे अवघें खरेंच परंतु विवेक राजाहिं फार कष्टी झाला. यास्तव तुज सारिख्या पतिव्रतेनें त्यावरि शब्द ठेवु नये आतां तुझे वैरि अवघे शान्त झाले विवेक राज खुशाल आहे. तरि शीघ्र चलावें.

**सूत्रधार :** येणेरिती शान्ति उपनिषद्देवी परस्पर बोलून जीवरायास नमस्कार करायास जातांच जीवराजा बोलतो पाहा.

**वचन :** अवो उपनिषद्देवी त्वां नमस्कार करणें युक्त नव्हे. तुम्ही आम्हांस ज्ञान उपदेश केल्यास्तव आम्हांस मातेचे ठायी तूंच नमस्कारास योग्य अथवा मातेहून तूं अधिक तें सांगतो ऐक.

(दरू) उपनिषद्देवी ऐक माझें वचन ॥
अधिक माते परिस अमचे तूचि परिस अनुमान
सर्वथाहि अणुमात्र येथें नाहि ॥ १ ॥
भवपाशि माया गोवि ॥
नवजाये दुःख गोवी अवो तुझ्या वाक्‍ पेटें अवघें बंधन तुटे ॥
नमना योग्य यास्तव समज तूचि यास्तव ॥
स्वमनी आहे हा भाव ॥ नमनि सर्वथा माव ॥

सूत्रधार : येणेरिती जीवराजाचें वचन ऐकून विवेकास नमस्कार करून विनयानें उभी टाकिली असतां उपनिषद्देवीस पाहून जीवराजा बोलतो पाहा ॥

वचन : उपनिषद्देवी यित्के दिवस कोठें कालक्षेप केला?

सूत्रधार : येणेरिती जीवराजाचें वचन ऐकून उपनिषद्देवी बोलते पाहा.

वचन : जीवराया विवेक राजाने माझि वुपेक्षा केल्यानंतर चारि दिवस रहाया कारणें यज्ञविद्येच्या आश्रमास जावून या प्रकारें बोलिलें.

दरू : घटाख ॥ शा

आनाथ मी दिन आयि ॥ मज अपुल्या गर्भी ठाव देयी ॥

वचन : माझें वचन ऐकून अज्ञविद्येनें उत्तर दिलें तें ऐक.

(दरू) सनाथ करीन बायि ॥ सये सांग काज कायि ॥

(श्लोक) जेथुनि जग वुद्‌भवे आणि रमे जेथेंल याहि भजें ज्यातें जें भुवनें ॥
प्रकाशति निजानंदोल्लस मजें कां अक्रिय शान्त नित्य
सुकृति मोक्षा सटि चिद्रविव्दैत गिळून जेथ मिळति सर्वेश्वरा त्यास्ववी ॥

(दरू) सत्य जें बोध निधान ब्रह्म ॥ प्रत्यग भिन्न निदान ॥
नित्य मित्याशि स्तवीन दुजें कृत्य नव्हे या वीण ॥ २ ॥

वचन : येणे प्रकारें माझे वाक्य ऐकून तूं अमुच्या कामाची नव्हे म्हणुन यज्ञ विद्येनें वाटे लाविल्या नंतर मीमां सतर्क सांख्य विद्यातीधि जवळ जावून पहिल्या प्रमाणें ठाव मागतांच त्यानिहिं निराकरण करून माझी दुर्दशा केली. तेव्हां स्या देवाचें स्मरण केलें तें ऐक.

(दरू) पावें पावें प्रताप रामा पावन नामा ॥
धांव धावण्या शीघ्र आतां ॥ धावा मी करीतसें पूर्ण कामा ॥
मोकलीलें मज कां निदानिजि कोणा निरखिलें स्वामिनि
हे कां धरिली क्रूरता या मनि ॥ पाकारिमणिधामा ॥
एकली विजनि हा कष्टतें झणि ॥ हे करूं जाचणि ॥
येताति दुर्गुणि ॥ लौकरि घालि जे कुडिया क्षणि ॥
काकुलति धरूनि लोकाभिरामा ॥ १ ॥

वचन : या प्रकारें स्या देवाचें स्मरण करितां मज रक्षाया कारणें गदापाणि पुरुष आले. तो प्रकार सांगतो ऐक.

(दरू) चांगलें कवळूनि टोणपे कोण्हीं रागानें वुचलुनि ढोणपे घे घे
म्हणतची विक्षेपें त्याशि घेरिलें जाहले त्या क्षेप ।। १ ।।
कर्कश मारन साहून ।। मग तर्क विद्या खेद लावुनि ।।
लोकरि निष्टल्या तेशूनि अति धाकेंचि अवघ्या मधूनि ।। २ ।।
देवाशि घ्यात अजस्त्रमी ।।
अति विव्हळ गाळिति आश्रुमी धांवतचि परमश्रमी ।।
मग पावलें जि गीता श्रमीं ।। ३ ।।

**वचन** : गीतेनें बोलिलें तें ऐकावें ।।

**दरू** : येरूकुल कांबाधी ।।

आळवुनि आयि आयि आप्त पणें गीता तें आळिगीतां दोहिं बाहिं ।।
आली शुध्दि कांहि बाहिं ।। १ ।।
ऐका स्वामी या साचार हा समाचार ।।

**सूत्रधार** : येणेरिती उपनिषद्देवीचें वचन ऐकून जीवराजा बोलतो पाहा ।।

**वचन** : देवि तुझ्या प्रसादानें परब्रह्म स्वरूप जाणाया कारणें यिछितों ।।

**सूत्रधार** : येणेरिती जीवरायाचे वचन ऐकून उपनिषद्देवी बोलते पाहा ।।

**दरू** : केदार गौळ ।। शापु ।।

जीवलगा स्वामि माझिया ।। बाप जी ऐक ।।
जीव रत्ना राज राज या या परि त्वां ।।
अविवेक जगा माजि या ।।
अपुली शुध्दि अवधि टाकिल्यां चिन्मया ।। हे निरामया ।। १ ।।
सांगावें काय म्या तुजला ।। राग येतसे ।।

**सूत्रधार** : येणेरिती उपनिषद्देवीचे वचन ऐकून जीवराजानें आत्म स्वरूप नीट सांगावें म्हणून प्रार्थना करितां आनंदानें उपनिषद्देवी महा वाक्यार्थ सांगते पाहा ।।

**दरू** : सुरट ।। आदिताल ।।

तें तें ब्रह्म अरे केवळ सत्य सनातन सत्सुख सागर ।।
नित्य निरंजन निगम गोचर ।। १ ।।
सहज सहोदित ज्याचा भासें ।।
महदादिक सकळहिं जग भासे ।। २ ।।
येकी बेकियांचि ज्येथें फूकि ।।
शेखि मिहिं ठेलें होवुनि मुंकि ।।

**सूत्रधार** : येणेरिती उपनिषद्देवीचे वचन ऐकून जीवराजा विवेकास पाहून बोलतो पाहा.

**वचन** : अगाये विवेका उपनिषद्देवीनें सांगितला तो भाव नीट अनुभवारूढ होत नाहिं. तेचि ऐक.

**(श्लोक)** जो मी भिन्न परि छिन्न जरामरण भोगिता ।।
त्या माते सांगते देवि सत्यानंदचिदात्मता ।।

सूत्रधार : येणेरिती जीवरायाचे वचन ऐकून विवेक बोलतो पाहा ॥

वचन : ऐसा अगम्यार्थ कसा सांगावा ? तेंच ऐक.

दरू : पुन्नागवराळि ॥

संपर्क इंद्रियांचा नाहि ॥ जेथें संपल्याचारि हवाचाहि ॥
ज्येंपवेना तर्कालाहि रूप ज्येपा स्वयं वेद्यपाहि ॥ १ ॥
सांगणें तें कैसें आतां ज्यथें पागुळलें मन ताता ॥
लगेना मतीच्याहि हाता श्रुतिहि माघारल्या बोलूं जातां ॥ २ ॥
अयिसा अगम्यार्थ शाखा चंद्र न्यायें सांगतो ऐक ॥

दरू : शंकरभरणा ॥

खंबु मध्यें पाहा ॥ अंबर मणि तो बिबत भानुज्ञ साचा ॥
त्या प्रति बिबत सा तूंचि दंबुधि विष्णुचा ॥
बिंबो असें मनिसाचें ॥ १ ॥
भेदनसे स्वयं वेद्य विभुशी तुज वेद रहस्य हें बापा ॥
छेद भेद भय खेदादिक धर्म औपाधिकचि अपापा ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरिती विवेकाचें वचन ऐकून जीवरायानें ऐकिल्यार्थाचें श्रवण मनन करितांच निदिध्यास पुरुष येतो पाहा.

(दरू) मोक्ष बीज अपरोक्ष बोधोदय दक्ष अतीवस्तु लक्षण
सुंदर निरूपम आला महानिरि ध्यास ॥ १ ॥
साधुजिसि आराविती ते सर्वे साध्वी रमणि ॥
समाधि स्थिति बरि ॥ २ ॥

सूत्रधार : येणेरिती निदीध्यास पुरुष येवून उपनिषद्देवीस पाहून बोलतो पाहा ॥

वचन : अवा उपनिषद्देवी तुला विष्णु भक्तिनें रहस्य सांगितलें तें ऐक. विवेकाच्या संकल्पास्तव तूं गर्भिणि झाली आहेस. तुझ्या पोटीं विद्या प्रबोध चंद्र दोनी रत्न आहे वर्तमान ज्ञान दृष्टीनें मला कळलें. या प्रमाणें सांगीतलें ॥ यानंतर करायाचें कर्तव्याहि देवीच्ये आज्ञे वरून सांगतों.

(श्लोक) जैसा तो देवकीचे जठरीहुनि हली राहिणी
गर्भसे जे मायेनें स्थापियेला त्वदुर्दरि ॥
सखि ये दिव्य कन्या असे जे विद्या
विद्या बळें ते तसिच तुंहि मनो गर्भशालेशिठेवि ॥
त्या पाठि बोध चंद्रासहि पुरुष पदीं अर्पणें शीघ्र देवी ॥

सूत्रधार : येणेरिती निरिध्यास पुरुषाचें वचन ऐकून विवेक उपनिषद्देवी विष्णु भक्तिचें दर्शनास गेल्यावरि जीवरायाचें अंतःकरणि निदिध्यास पुरुष प्रवेशिल्यानंतर ध्यानानें चित्त परिपक्व होतां विष्णु भक्तिची महिमा वर्णितो पाहा.

वचन : विष्णु भक्तिच्या दयेनें मलिन चित्तहि दर्पणासारखें निर्मळ झालें. तेथें श्रीप्रतापरामचंद्र स्वामि सीता लक्ष्मण सहित अभिव्यक्त होवून राहिला.

**सूत्रधार :** येणेरिती जीवराजा बोलतस्तां रामस्वामी येताहेत म्हणुन सभास्थांस सावध करायास नारद येतो पाहा.

दरू : परज ।।

नारद येतो पाहा हरिप्रिय नारद येतो पाहा ।।
नारद सुश्रुति पारद भक्ति विशारद ।।
राकाशारद चंद्राभ ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती नारद येवून सभा सिध्रि केल्यानंतर भक्ति देवी आणी जानकी लक्ष्मण आंजनेया समेत श्रीप्रतापरामचंद्र स्वामि येतो पाहा.

दरू : धन्याशि ।। आदिताल ।।

प्रतापरामचंद्र आला हा प्रत्यक्ष पाहा लक्ष्मण सीते सगट ।।
लक्ष्यातीत हिं प्रकट ।।
राक्षस दमन विचक्षण नत जन रक्षण दीक्षित
अक्षय निधि हा धनुर्बाण मनोहर ।।
धरूनिया परात्पर मुनिजन सुखकर
दिनकर कुलवर घनसम सुंदर कनकांबर धर ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीप्रतापरामस्वामि येतां स्तुति पूर्वक जीवराजा नमस्कार करितो पाहा.

(श्लोक) ना ना रंग तरंग संग वुठति वुत्तंग अब्धि यथा
चित्राकार चराचरैक रचना ज्याचा स्वरूपी तथा ।।
सत्यानंद प्रबोध सार जलधी ज्यावेद ऐसें म्हणे
लीलेनें घन नीलरूप धरिलें अस्मै नमो ब्रम्हणें ।।

(दरू) वुगवलादिन अजि सोनयाचा ।।
निगदि महिमा मुखें कोणयाचा सये राम रूपचि जगत्रयहिं जालें ।।
रामा रामा सुखें पूर्ण घालें ।। १ ।।
नवम भक्ति निज निवेदन नाख्या नवमीस
फावली नवल मुख्या स्वामि ।।

**सूत्रधार :** येणेरिती जीवरायानें स्तुति पूर्वक नमस्कार करितां संतोषानें प्रतापरामस्वामी बोलतो पाहा.

**वचन :** वत्सा अतां अविलंबानें विद्या प्रबोध चंद्राचा वुदय होयिल. तूं अद्वैतानंद अनुभाविशील.

**सूत्रधार :** येणेरिती राम स्वामीनें प्रसाद करितांच साक्षात्कार सहित विद्या येते पाहा.

(दरू) विद्या हे बरवी येते पाहा ।।
भेदूनि हृदय ग्रंथी छेदूनि मोहादि गुंति ।।
वुजळित दशदिशां फार गजरानें ।। १ ।।
अखंडाकार येते विद्या पाहा ।।
पावुनिया वुदय सध्या लावुनि वाटे अविद्या ।।
साक्षांत जे अनवद्या मोक्षपट्टणाचि पद्या ।। २ ।।

सवें साक्षात्कार नाहो ।। निवटिना हृतमालाहो ।।
तद्वत तमघ्न शक्ति तद्रुप जीयाचि व्यक्ति ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती विद्या येवून मोहादिकांस निवारण करून चालिल्यानंतर श्रीमत् प्रबोध चंद्र बाळक येतो पाहा.

दरू : भैरवं ।। आदिताल ।।

प्रबोध चंद्र आला अबोध तिमिर हराया ।।
निवेदिठि केवळ शीतळ निजोदयें ज्याचिया
विवेक राजेंद्र सुकुमार आला ।। वुपनिषदाख्य देवि ।।
कमा गर्भिहुनि दुसरा वुपजला नेणो श्रीकुमार आला ।।

सूत्रधार : येणेरिती प्रबोध चंद्र येवून जीवरायास पाहून बोलतो पाहा ।।

(दरू) सकळ विकल्प वार प्रकटतां जोंकि
सुख भरि लोक सांद्र आलों प्रबोध चंद्र ।।

सूत्रधार : येणेरिती बोलून राम स्वामीस नमस्कार करून जीवराजास नमस्कार करितां त्यावरि अनुग्रह कराया कारणें प्रतापराम स्वामीनें जीवनमुक्तिचें स्मरण करितांच जीवन्मुक्ती येते पाहा.

(दरु) जीवनमुक्ती पांवली सोन पावली नलोपतां विश्वमस्त न होतां देहाचा अस्त ।।
कैवल्यानंद समस्त ।। करिते जे का कारस्थ ।। १ ।।
जी साटी योगी हटले ।।
पिसाट होवूनि ठेले ।। संसारि सुख सोहळे समर्पि जे वेळो ।।

सूत्रधार : येणेरिती जीवनमुक्ति येवून रामस्वामीस नमस्कार करितांच रामस्वामीनें प्रबोध चंद्र कुमारास जीवनमुक्ती प्रदान केल्यानंतर जीवराज बोलतो पाहा.

वचन : धन्य झालों.

(दरू) धन्य झालों आता मी धन्य झालों ।।
वुगवला हृद्यगति विद्ये सगट प्रबोध चंद्रमा ।।
अगदिया जग नगरिं सखया प्रकटली सुख सांद्रमा ।। १ ।।
वोहटली लघु वोहळापरि मोह तिमिर नदिभली ।।
सोहमिति मति सोनयाचि पाहट अजि जाहली ।।

सूत्रधार : येणेरिती आपणास पाहून प्रबोधचंद्राचिहि प्रशंसा करून सर्वथा राम स्वामिच्या दयेने कृतकृत्य झालों म्हणताच रामस्वामि बोलतो पाहा.

(श्लोक) मी बिंब प्रतिबिंब तू मी विमल मी चिद्ज्ञान् तूं अंशुगा
मी स्वानंद समुद्र तूं चि लहरी मि अंशि तूं अंशगा ।।
माया मूलक बोल फोलहि असा ।। वायांच नाहि कहि ।।
व्दता ठाव अखंड चित्घन अहो आहे पणा विणहि ।।

दरु : ।। भूपाळा ।।

तुझिये दये आत्माराम श्रीराम ।।
निजरूप विसरूनि जो मि अज्ञुणि वरि केवळ दिनचि होतों ।।
तुझिये दये आत्माराम ।। अजि अव्दैता साम्राज्यि बसलों अहोतों ।।१ ।।
सम सुख सिंधूस आला वाङमानास वृत्ति अगम्य फुगारा ।।
समुदें जगत्रय तेथें ठेलें समरसुनिज शाजीवनिगारा ।। २ ।।
तमसावरण वांघाशि गेलें ।। विक्षेप टाकूनी मुळ अगारा ।।
दुम दुम गंभीर नादें ।। घन गर्जे अनाहत नादें नगारा ।। ३ ।।
थैयिथैयि म्हणतची वाचे व्दैत तालासि वरि वरि तोडित कैशी ।।
लय लय न चुकत नाचे ।। ऐक्य अभिनय जीवनमुक्ति अपैशि ।। ४ ।।
नयन येकचि मी जालों ।। सर्व नयनाचा देखणा केवल भारि ।।
जय जयाकारेचि करिति ।। बहुभाटींव भाटशे वेदहिं च्यारि ।। ५ ।।

**सूत्रधार :** येणेरिती प्रतापरामस्वामीचें स्तवन करून जीवराजा विष्णु भक्तिस पाहून बोलते पाहा.

**वचन :** मोहादिकांस जिंकून मला अव्दैत सिंम्हासनी बसवितों म्हणुन विवेकानें जे जे प्रतिज्ञा केली तेहिं तुझ्या दयेनें यर्थार्थ झाली. शांति शमदमादिकांचा श्रमहि सफल झाला श्रीप्रतापराम स्वामिहिं प्रत्यक्ष झाला.
तथापि यवडें मात्रे ऐकावें.

**(श्लोक)** धर्मिष्ठासि कदा विपत्ति न लगो स्वप्नांतही येकदा ।।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदये सव्दोध लोकां सदा
श्रीमद्रासपदारविंद युगळीं कल्याण भाग्याप्रदा ।।
जोडो भक्ति वुदारद अनुदिनि स्वानंद राज्यास्पदा ।।

**सूत्रधार :** येणेरिती जीवराजा प्रार्थना केल्यानंतर त्याचे मनोरथ पुरवुन अंतःपुरिं विजय दुंदभिवाजवीत नित्यानंद मंदिरास येतो पाहा.

**(श्लोक)** श्रीमालोजी नरेंद्र नंदन भला शाहेंद्र नामाथिला
पुण्य श्लोक म्हणोनि लोक निगदि ज्याला प्रपंचांतिला ।।
त्याचा पुत्रक सच्चरित्र जगतीं येकेंद्र भाग्यागळा ।।
त्या पासूनि शिवस्वरूप तुळजा राजेंद्र जो जन्माला ।। १ ।।
श्रीयेकेंद्र सुधासमुद्र जठरीं चंद्रापरि जन्मला ।
धर्मात्मा तुळजेंद्र जो तनुज्य त्या दीपांबिकेंचा भला ।।
तेणें सुंदर ग्रंथहाविरचिला श्रीबोध चंद्रोदयें ।। १ ।।

**(श्लोक)** पुण्यावतारें परम प्रभावें ।। प्रतापसिंम्हाख्य नृपें स्वभावें ।।
अव्दैत रत्नाढय सुवर्ण माळा ।। हे अर्पिली श्रीरघुसत्तमाला ।।

**(दरू)** नित्यानंद मंदिरासि सत्यानंद सुखराशि ।।
प्रताप रामचंद्र हा परिवारें आला पाहा ।।

**।। इति षष्टोंकः ।।**

## १६. उषा कल्याण नाटक

श्रीगणेशाय नमः । श्री रामचंद्राय नमः
नाटचारंभ करून उषापरिणय नाटक सुकवि विरचित
नाटच करितो याकरिता सकल जनास आनंद व्हावयासाठी
कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पाहा ।।

(श्लोक) विजयवैभव मंगळदायका
निजजनाम्दुत सौख्यविधायका ।
गजमुखा वरदायका विनायका
तुज नमो अजि सिद्धि विनायका ।। १ ।।
विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीची स्तुति करितो पाहा.

(श्लोक) आता प्रार्थू वागधिष्टानवाणी । ध्याता जीतें धी प्रकाशा न वाणी ।
वीणहस्ते वाजवी रम्यवाणी । नानाविद्या मूळ जे कीरवाणी ।। २ ।।
सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णूची प्रार्थना करितो पाहा.
सत्यज्ञान सुखैकसार जलधी गंभीर जो शोभला ।
प्रत्यग्रूप अरूपमान निखिलाधिष्टान कर्ता भला ।
मोहाते हरुनी स्वधाम वितरी जो भेद खेदातुरां ।
तो हा सदगुण धाम राम नमिला श्री देशिकांचा तुरा ।। ३ ।।
महाविष्णूची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वराची प्रार्थना करितो पाहा.

(श्लोक) जीवेश द्वय येकचिध्दन अचि त्रैलोकाते वेगळे ।
असे वेदरहस्य सूचवुनि जो विज्ञान मुद्राबळे ।
मौनाची हरि शिष्य संशय तथा द्वैतात्मक स्फूर्तिला ।
वंदू त्या गुरुमूर्तिला समरसें श्री दक्षिणामूर्तिला ।। ४ ।।
यापरिस सकळ देवतांची प्रार्थना केल्यानंतर कवि नाटकार्थसंग्रह श्लोक सांगतो पाहा

(श्लोक) जो विख्यात सुखैक धाम जगती श्री वासुदेवांश हा
जीवाचे परि पाशबद्ध घडला स्त्रीवासनेने महा ।
देवीच्या।वर वैभवें सहज सद्भावा पुन्हा पावला ।।
देवो जो अजितो समृद्धि अमुतें देवो सदा सावळा ।। ५ ।।
यापरि नाटकार्थ संग्रह श्लोक मंटल्यानंतर विघ्नेश्वराची प्रार्थना केली असता गणेश प्रत्यक्ष येतो पाहा.

(दरू) कोंदूनी आनंदभरें । येथे श्री प्रताप रामस्वामीचा
शारदोत्सव पाहाया कारणे सकलविद्या विशारद
शारदादिग्रह थोर थोर पंडितमान्य मिळाले आहेत तरि
या सभेस उचित उषापरिणयाख्य मुख्य नाटक नाचवून यांचे अंतःकरण संतुष्ट करावे :
कोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ?

(श्लोक) प्रतापराम सद्‌भक्ती विभवोद्दाम जो महा । प्रतापसिंह राजर्षि प्रपोतायासि तो पहा ।।

आणिकही याचा प्रभाव ऐक.

धर्माची तरि साळ आश्रित जना माहेर मायेपरी ।
सौजन्याप्रति जन्मभूमि करुणा साकार की हे बरी ।
भक्तीची तरि खाणि मुक्ती जनकज्ञानद्रुमा बीज ही ।
देव ब्राह्मण पालनकपर जो देवेंद्र साक्षान्महीं ।। ८ ।।
अळंकृत यशोधनी निपुणतत्त्व संशोधनी ।
पटू खल निषेधणीं पुरवितां भल्यांची धणी ।
रघूत्तम शिरोमणी सतत हे चि चिंतामणी ।
नराधिप शिरोमणी सकल लोक चिंतामणी ।। ९ ।।

सुत्रधारा, मलाही आता सूचतें (?) परंतु हा अलभ्य योग मिळाला आहे. तेंच ऐक.

श्लोक : प्रगल्भाचे मूर्धामणि सकल हे सभ्य बरवे ।
प्रमेय प्राद्युन्मीं परिणय मनोरम्य मिरवे ।
प्रबंधाचा कर्ता गुणनिधी प्रतापेंद्र पटुही ।
अम्ही नाटयी ऐसा अघटित नव्हे योगचि कही ।।

वाक्य : परंतु तुझ्या चित्तामध्ये आनंदसिंधूचे हेलावे उसळताहेत यास काय हेतू ? शीघ्र सांगितले पाहिजे.

अगा, ये सूत्रधारा, माझी चित्तवृत्तीच येक दिव्यकन्या, ते उत्तम वराचे ठाई विनियुक्त व्हावी म्हणून चिंतिता पार्वतीदेवीच्या अनुग्रहें सर्वोत्तम जो महापुरुष त्याचे ठायीं स्वतयंवरातली. तन्मूलें हर्षनिर्भर आहे. अरे पारिपार्श्वका, परीच देवीने उषेलाही उचित वर समर्पिला. परंतु तो सर्वही परमेश्वराचा अभाव.

ऐसें बोलतां परमेश्वर येतो म्हणून सभ्यांस सावध करायास नंदिकेश्वर येतो पहा.

दरू : राग तोडी । आदिताल ।

येतो नंदिकेश्वर येथें शैवाग्रेसर ।
केतू शंभूचा सुंदर
ज्योतिर्मय शरीर ।
जो शुभ्र रतजाकार ।
प्रीतीनें ध्यान मनीं ।
शंकर मूर्ती सुखकर ।। १ ।।

सूत्रधार : यापरी नंदिकेश्वर येऊन सभ्यांस सावध केल्यानंतर परमेश्वर येतो पहा.

दरू : राग सुरटी । ताल शापू ।।

देवाधिदेव तो येतो शंकर पाहा ।

श्री वारिभव चूड हा ।। पल्लवी ।।
कैवार घेणार जो सतत स्वसुखाचा
भुवनाधीश्वर भीम दोषा पहा।
(अनुपल्लवी) भासिताचा लाविली बरवी आंगीं उटी।
असित कंठीं माल अहीची ते गोमटी।
सुसित नीर स्वर्गसरिता जटाजूटीं।
दिसत मौलिमाला तैसी पाहतां दिठि ।। १ ।।
प्रथमाचे संघाट प्रबळ बरोबरी।
विमलवाचे स्तोत्रें वदती परोपरी।
अमर वृंद नोहे अमित जा बरोबरी।
नमनमात्रें अंतस्तिमिर जो परिहरी ।। २ ।।
नंदिवाहन परमानंद मग्न सदा।
वंदिशेवर्णीत वंदिती मुनिपदा।
सुंदर नटती सुरसुंदरी येकदां।
स्कंद जनक महास्कंद देता पदा ।। ३ ।।

सूत्रधार : येंणेरिती सांबशिव आल्यानंतर त्याप्रति विलोकून नंदिकेश्वर वनवर्णन करून बोलतो पहा.

(श्लोक) श्रीचन्द्रचुडा चरणारविंदा।
बंदू तुझ्या हे तरु कीर्तिकंदा।
पारंबियाच्या करुनि मिलासा।
भूसृष्ट झाले जणु श्री विशाला ।। १ ।।
शिला त्वं निवासार्थ विस्तीर्ण सोफा।
तरुस्तोम झाला, स्वयें सत्य सोपा।
भले थोर वांशे असंख्यात खांदे।
लतावृंद गुंडाळलेले तेच बांधे ।। २ ।।
श्रवति जे बरवे मधुबिंदू।
स्नापन तें गणिजे गुणसिंधू
पडति जे सुमनें घनवातें
घडत पूजन तूज भवातें ।। ३ ।।

(छंद) परम शोभना पक्व कोमलें।
सुराचि जें गळाली स्वयें फळें।
तरुवरी कृताधिथ्य भावणें।
सरस तें तुवां पुण्यपावनें ।।
भ्रमर गुंजती मंजुलाख्यें।
समज गान तें भक्तिगौरवें।
द्रुम सुमारुतें डोलती शिवा।
स्वमनि मानिजे नाटच तें तुकं ।।

सूत्रधार : येणेरिती आनंदानें नंदिकेश्वर वनवर्णन करितां सुंदर हा विलास त्रिपुरसुंदरीनें पाहावा, म्हणून ईश्वरानें अंतरंगीं चिंतिता स्मृचुगामिनी दिव्यसौदामिनीसमान देदीप्यमान उमादेवी येते पाहा.

दरू : राग आहरी ।। आदिताळ ।।

देवी येतसे पाहा ।। हे वरारोहा ।।
सर्व लावण्याची खाणी ।। पर्व चंद्रानना आणी ।।
पर्वतराज नंदिनी । शर्व मानसा नंदिनी ।। १ ।।
हस्तकीं कीर विराजे । मस्त मंद चाली साजे ।
हस्तिनी देखोनि लाजे । निस्तुल पूर्ण कला जे ।।

सूत्रधार : येणेरिती पार्वती येऊन परमेश्वरास विलोकून बोलते पाहा.

दरू : राग नवरोजू अटताल

कोणें शिकविलें तूज गा । यापरी रमणा ।
टोणें मोहकती जगा । यापरी रमणा ।।
पसरूनि दिठी निरखीत । असतांच तूझें ।।
हसित श्री मुख संतत । नसरे सेते कहीं मागें ।।
भावुनी रात्रीं । दिसहीं नूतन अनुरागें ।।
यापरी रमणा ।।
अनुपम तुझा हा ठसा ।। जोड ज्या नाहीं ।।
म्हणवूनि निज मानसा । वेधल्या सर्व ।।
मुनिपत्न्या महाराजसा । यापरि रमणा ।।
निरखि वल्लभा या वनांतरीं । फिरती केसरी मंडलीं करीं ।
गरुड सन्निधी खेलती अही । शिरति माजरापोटि आखुही ।
हा हसर्व तुझ्याच चरणारविंदाचा महिमा.

सूत्रधार : ऐसे देवीनें संवदनतां परमेश्वर बोलतो पहा.
दनुजनिवह मर्दूकीं स्ययें शीघ्र गेला ।
दरिशनि सखि त्याच्या प्राण माझा भुकेला ।

सूत्रधार : ऐसें देवीनें संवादत असतां कुमारस्वामी येतो पहा.

दरू : राग आनंद भैरवी ।। आदिताल ।।

स्कंद येतसे सुमती । सुंदराकृती ।। प. ।।
इंदुमौलिनंदन सेनापति । मंदमंद सिंधुरेशसमगती ।
(अनु.) तारकासर प्राण । हारक जो सुजाण ।
तारकासम मुक्ता । हार न समान ।
कुमार थोर श्रीमान । सुकुमार भुवनि असमान ।
गिरिदारणी परम पटु षडानन सारसा परिवारालोचन ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती स्कंद आल्यानंतर यवढोल्ल कोठे कालक्रमणा केली म्हणून महेश्वरानें पुसतां कुमारस्वामी उत्तर देतो पाहा.

(श्लोक) दैवज्ञविप्रचतुरोत्तम येक आला। तत्संगती समय लोटुनि फार गेला ।।
झाला उसीर म्हणुनी मज यावयासी ।। कीजे क्षमा अभिबोधसुखेकरासी ।।

वाक्य : त्या जोश्यानें अतिशय सांगितला तोही चरणारविंदास निवेदितों.

(श्लोक) दनुज येक तुतें बल्लसांचा। अनुज जोडल सत्वर साचा।
वदुनिया परी तो व्दिज गेला। परिसतां मनि मोद उदेला ।।

वाक्य : हा सर्व वृत्तांत श्रुत करावा म्हणून शीघ्र आलों.

सूत्रधार : ऐसें कुमारस्वामी संवदतां नेपथ्यांत कोलाहल होतां तो काय म्हणून परमेश्वरानें पुसतां नंदिकेश्वर उत्तर देतो पाहा.
बलीकुमार तो बाणकीं भला। बल्लनिधी तुझ्या दर्शना अला।
दल्लसवें वशेयास टींभवा। गलबला असा जाहला नवा ।।

सूत्रधार : येणेरिती नंदिकेश्वरानें वृत्तांत सांगतां बाणासुरास आणि [म्हणून] परमेश्वरानें खुणावितां तो येतो पहा.

दरू : राग-सावरी आदिताल ।।

बाण दैत्येश्वर बाण कार्मुकधर। स्थाणु दर्शनातत्पर ।।
येतसे वीर ।। पना ।।
बाणली भक्ति थोर ज्या नित्य दृढ गिरिशालर।
मानसीं कांही न सुचे धन सुत वनिता निवडक भक्ताग्रणी।
पुण्यश्रेष्ठी। स्त्रवण मननी आणी।
प्रवण केवल्ल ध्यानी। भवभजनी बहुरतुनी।
धूर्जटि वर्जूनी निर्जर तर्जुनी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती बाणासुराने [येवून] सांबशिवास साष्टांग नमस्कार घालून कुमार स्वामीकडे रोख देऊन आपअपणांत बोलतो पाहा.

(श्लोक) बाणी कार्मुक [] शक्ति हस्त दुसऱ्या बाणी जयाची नये।
पाणी जोडुनि दिक्पति। स्थित उभे राणी हिशेवान्वयें ।।
गाणी गातचि नाचती सुखवधू माणिक्य हेमोज्वला ।।
नाणी ते दिठि जोड यासि न जगीं आणीक भाग्याथिला ।। १ ।।
विसिखी असुनिहि सखिखी कुमार असुनी युवाहि गुणसांचा
तारक तारक हरहीं अशक्ती असुनी सशक्ति जो साचा।

सूत्रधार : येणेरिती चिंतून हा लोकातीत महत्प्रभाव कुमार स्वामीचा कांहीं स्वभावसिद्ध नव्हे। श्री महादेव देवीच्या पुत्रपणाचाच महिमा। तरी मीहिं अभिनय तांडवें तांडवेश्वरास हृदयमंडलीं संतोषवून तो अभिमुख होतांच षण्मुखाप्रमाणें पुत्रभाव महानुभावास मागतों म्हणून बाणासुर निर्धारून गायननटनपूर्वक शिवस्ववनी प्रवर्तला पाहा.

दरू : राग कापी। ताल्लझांपू ।।

करूणेनें पाही। कपूरगौरा।

प. : करुणेनें निरखी श्रीतरुणेंदुशेखरा ।
चरण कमला शरण आलों । मार गर्व संहारा ।
(अनु) जननी जनक तूंचि जगतीं निस्संशय ।
आणखी देवगणाची आसन धरिली स्वयें ।
गणगोतही तूंचि पूर्णाव्दय ।
गणिजे सेवकामाजी तृण मी गंगाधरा ।

सूत्रधार : येणेरीती बाणासुराने स्तवन करितां परमेश्वर बोलतो पाहा.

दरू : राग मांजि ।। आदिताल ।।

माग आतां इष्टकामा । भक्त सार्वभौमा ।।
सायुज्य मोक्षहीं । पाय तुझे सेविल ।
हें मानिजे साच गुणधामा ।। १ ।।
विधिचिया पट्टाचा । वेध असलिया घेई ।
बोध महोदधि पूर्ण सोमा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती परमेश्वराचे वाक्य ईकून । विनयपूर्वक बाणासुर बोलतो पाहा.

दरू : राग पूरि आदिताल ।।

क्षमिजे माझा महा स्वामि आगहा ।
न मागावयाचें मी समज मागतो पाहा ।।
अनुप : तव दासदास्यहीं । न मज अर्हतापणा ।।
शिवशिवा इच्छितों । जी तनयभाव हा ।। १ ।।
न लगे इंद्रपद । नल्लिनभवनिजपद ।
सलगिचें माधणें । सुतपण तुझेंचि हा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरीती बाणासुराने प्रार्थितां भोलाशंकर त्याच्या भक्तीस भाळून याचा पुत्रपणे स्वीकारदेवीच्या संमतीने करावा म्हणून जगदंबेस विलोकून परमेश्वर बोलतो पहा.

(श्लोक) स्वइदत्तही पुत्र देवी म्हणावा
वदे शास्त्र हें निश्चयोची गणावा ।
तरी अंगिकारुनियां पुत्रभावें ।
करावे कृतार्थ स्वयोग प्रभावे ।।

सूत्रधार : येणेरीती परमेश्वराचे वाक्य ऐकून पार्वती विनयपूर्वक विनंती करिते पाहा.
(श्लोक) उगवत रवि जेथे तोचि प्राची विलोकीं ।
सुखकर हृदया जे तोचि गा स्वर्ग लोकी ।
राम मतिस कल्लिजे तेचि ते ब्रम्हनिष्ठा ।
तव वचन तेसे ते तेंच कीं शास्त्रशिष्टा ।।
आपण जे आज्ञा अरिजेय तें शिरसा वंदिते म्हणून त्रिपुरुसुंदरीने बोलतां देवीस शरण जा असें इश्वराचे खुणावतां बाणासुर देवी निकट येऊन स्तवितो पहा.

दरू : राग मोहन ।। ताल शापू ।।

चरण तुझे धरितो । सिरीं निज किंकर शंकरी नित्य
निरंतरी चरण तुझे धरितों ।। प. ।। अरुण बिंब अधरे

गुण मंजरीं, अर्थकि आजि करी कृपा वरी ।।
नटाधिपतिकांते कुटिलसुर ।। विनाशी नील सदल्लकांते
न टाकुनी नतासी पोटसीच । धरीं धरी मुरारीं प्रिय सोदसी
कुरंग शिशुनेत्रे । रमणी मणी, सुरंग नील जलद गात्रे ।।
तरंगवी अभंग सौख्याब्धि धुरंधर पुरंदरा दिविनुत ।।
शशांकमुखी देवी । पद्मकंजी । विशंकरंक सतत ठेवीं ।
अहंकृती फलंक ह्याच पंक हरी शिवंकरी, करी करून ।।

सूत्रधार : येणेरिती बाणसुराने देवीची प्रार्थना करिता कुमारस्वामी जेष्ठ पुत्र तूं कनिष्ठ कुमार या गोष्टीस संदेह नाहीं ।। या रिती देवीने पुत्रत्वेकरून बाणासुराचा स्वीकार केल्यावर पुन: परमेश्वराप्रति बाणासुर बोलतो ।।
वितत पड्गुणा निर्गुनी हरा । वितरि तियेच राज्य किंकरा ।
सतत माझिया आणि रक्षणा । सुसत स्त्री येथ बैस पावना ।।

सूत्रधार : येणेरिती बाणसुरा प्रार्थिता विश्वकर्मयाकरवी शोणित नामक पूर निर्मुलन नित्य अपत्य जो बाणासुर त्याला तेथिंचे अधिपत्य देवून पार्वती समेत परमेश्वर आनंदमंदिरी प्रवेशिल्यानंतर सख्यासमवेत उषा येते पाहा.

(श्लोक) वाफाजे गुणपक्डिचा सुमतिचा सोका तनू तूं निकीं ।
वाफा नीघति फार या दवनिं ही ते फार विश्वासकी ।
ताफानते घृतिचा नसे निधन हृत्तापाब्धिमग्नामहा ।
श्रीफालेक्षण भक्त नंदिनी उषा ते पां अली हो पहा ।।

(दरू) रागपूरी ।। आदिताल ।।

येतसे बाणकन्या, हे उषा धन्या ।
जे धारकी लावण्या, श्री तैसी रूपमान्या

(अनुप.) राजीवाक्षी गुणराजि, कनकवसन माजी ।
विज जैसी मेघामाजी । झल्लुके तेविं पाहाजी मग जाते आजी ।।
सोमानना बुद्धिसीमा श्रृंगार सार्वभौमा ।
मोहक मध्यव्योमा । सारखी सकल्लरामा ।
पत्नवहाभीरामा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती आली जे उषा ती प्रतिविलोकून सखि बोलते पाहा.

दरू : राग पुन्नागवराली । आदिताल ।।

आई मज सांग की नीट । आपली स्थिति सांग की ।
आईक व्यसन काईक । कीं हे माईक आता बाई ।।
प्राणसखी । अनुप. कासया वदनीहूती निधती
श्वास नक्षण राहूनि । तुष्णेते स्वये, रात्रिदीस हे
व्यर्थ कांसया ।। कासाविसी दुस्सह पाहे ।। भासुरांगी
तयास कारण । भासते मृदु भाषिणी निज ।। १ ।।

आपण तुज मैत्रिणी विजिती। आता कां बहु व्यवनी
दत्य भूपहा माथा बापहा। असतां पहा।
कां संताप जडला महा। हे पिकादिक हृद कूजति।
कां परि मनी गोड न वाटे।। २।।

**सूत्रधार** : येणेरिती सखीनें पुन: पुन: विचारिता उषेने मौनमुद्रा धरिता हे आपुले मनोगत अम्हापासी सांगणार नाही इची प्राणसखी कुभांड कन्या श्रृंगारवल्ली तीच्यामुखे अंतर्भाव अवगत व्हावा अैसी तजवीज करितां यदृच्छेनेन त्ये येते पाहा.

दरू : राग अठाणा।। आदिताल् ।।

कुमारी येतसे पाहा, कुभांडाची।।
कुमारी येतसे भव्य। उमरीगणी स्तव्य।
भ्रमरी नुपमीजे वेणी। ते महाश्रृंगारश्रेणी।।

**सूत्रधार** : येणेरिती प्रधानकन्येने येऊन उषेस येकांती नेवून अंतरंग स्थिती विचारीता ते सांगते पाहा.

**(श्लोक)** लोहाचीच पहार हार गमतो भारी पहारापरी।
लोटे की घटिका टिकाव न दिसे देही जिवा यावरी।।
वारा वाटत फार दुःसह अहा शस्त्रप्रहारासशि।।
हा राजीवनिभेक्षणे नुचलवे घोरापदाचा गिरी।।

**वाक्य** : तुं म्हणशील दक्षिणेचा वारा फार शीतल तो कां संताप करितो?

**(श्लोक)** मलयपर्वतसर्पी सेउनी फार सेखी।
घडुनि घन अजीर्ती वोकिता सर्व नोकीं
मदलसहित माझ्या लागता अद्य आंगी।।
हरहर बहु झाली साजणी देख आगी।।

**सूत्रधार** : येणेरिती उषेनेन निज स्थिती सांगता यास मूल काय] म्हणूनी सखीने खोदून खोदून पुसतां वर्तला बृत्तांत बाणकन्या सांगते पाहा.

**(श्लोक)** सख्यासी मी गेलें सहजगति उद्यानविपिनीं।
तई होता तेथे शिव अणि शिवालोक जननी।।
जलक्रीडेसाठी उदित जगदानंदन विधितो।
नवाईते कांही परिस बरवी मी निगदितें।।

**गद्य** : तदनंतरे विमलकमलिनीमाजि उतरूनि संतुष्ट अंतरे श्रीमारमईने कुमार जननीचा सुमार धरूनि पाणिमार करितां दशकारे निर्वाह होईनासारिखा शर्वाणीने चारि भुज भावूज मागें सरू जाता स्कंद आणि लंबांदरे।। व्दादश करी आणि तथा प्रचंड श्रुडादंड लक्षणकरें येकंदर सुंभ नि सुंभ मर्दिनीसी मिलूनी पाणिमार आरंभिता पिनाकपाणी स्थाणू हे नाम यथार्थ घडवायास घणमणी नासा स्थिर राहून आपआपणांत जे बोलिला तेंच ऐक.

(श्लोक) यावत्काल वरीसदा सहचरी ते शक्ति आहे बरी ।
झाली त्याचपरी यया अक्सरी माझी गती लोकरी ।

वाक्य : इत:पर पराशक्तीस सोडून असलिया मी नावरूपास येणार नाही. यास्तव अर्धनारी श्वराचा वेष धरून स्वानंदभोग अनुभवावा म्हणून परमेश्वराने त्याप्रमाणे नानाविध विलासतत्पर होता अकस्मात् तो तमासा माझा लोचनाप्रति गोचर घडतां त्यव्हां मनी सूचला तो भाव सांगते ऐक.

दरू : राग जुजावती ।। ताल एटे ।।

कांतावीणे असणे, काय तसें ।। कांत देह वसो, कांतीने घवघवीत । संतत असुरवाची सरणी असें अनुप० ।। देवल सुंदर केवल झाल्याही । देवावीण न साजेसी देख जसें ।। हे वनजाक्षि दिव्य सरोवर । जीवना विणें वृथा जाण जसें ।। बारिक शास्त्रानुसार गाईल्याही । शरीराविण न शोभे जसें ।।. सारज्ञान तें फार असल्यांही । वैराग्यावीणे वृथा जाण जसें ।। २ ।। हृदई म्यां असे चिंतिल्या क्षणी सुदति ते शिव विश्वसाक्षिणी ।। मदभिकाशिता जाणुनी कसी । वदली मावुली मात ठीकसी ।।

दरू : राग नीलांबरी ।।

ताल रूपक ।। लाभसी लाभसी सत्वर । लावण्याकर तूं वर । शोभन वर्णिनीयावर । सोमननवीर ।। हांसत खेलत दंपती । आहो आम्ही जेणेरीती । होसिल वल्लभा संगती । तैसी सुखी सुदती ।। माधव मासिची बारशी । जे कां शुद्ध अनरिसीं । ते घणी पुरविजो निशी । तो धणी तव तनुशी ।।२।।

सूत्रधार : येणे रिती देवीने वरप्रदान केले तदारम्य अंत:करण विषयांतरीं विमुख झाले याप्रकारे निजास्थिती सविस्तर सांगून विद्यमन प्रसंग बोलते पाहा ।।

दरू : राग मोहना ।। तालुशापू ।।

शिवशिवा केवि मी साहू शिवशिवा । जिवलगावीण त्या अवधारी येधवां ।।
कुवलययोचना मार्ग कथिजे मार्ग तुवा

(अनुप.) मानिनी न स्फुरे माझिया । चल मात्रसीं सर्वथा माझिया । आणिक विषय ते अैसिया थोर । प्राणसंकटा काय जाण की जेया ।।
शंभरी वज्राच्या चूरासी । करूनी कंबुकंठी ल्याले मलयासी बंभर वेणी मीहि असी झाले । अंबुजशरे जेर अंतरंगी कसी ।।

सूत्रधार : येणे रिती बोलून हे देवतारहस्य जननी पासी सांगू नका म्हणून संवदता तो उषेचा परामर्श ध्यावयासाठी बलीची स्नषा येते पाहा ।

दरू : राव सांवरी ।। आदिताल ।।

बाणअंतुरी येते बाणअंतुरीं ।। बाणरमणी कसी ।। सोन बावन्न कसी ।। वानजे शुद्ध तसी । वारणगती असी ।

अनुप. : दाट भोवता फार । दासीजनाचा फार । वाट सारिती थोर । वानिती वारंवार । हाकट मणि सार । हारादि अलंकार । धाकटमंडित रुचिर । ताटंकयुगभर ।

**सूत्रधार :** येणे रिती बाणरमणी येऊन अंतःपुरी उषेला न देखून घाबरी होऊन सख्यासी पुसते पहा ।।

दरू : राग शंकरा भरणा ।। आदिताळू ।।

उषा गेली कुठे सांगा लोकोर । माझे तृषले दर्शना नयनचकोर । भुकेची आलकी आई । न केली न्याहरी कांही । सुकेसी राहिली कैसी । न कळे सखवार ।। १ ।।

**सूत्रधार :** या प्रकारे बाणरमणीने पुसतां उपवनी गेली असेल म्हणून येक्या सखीने सांगता पुनः ते बोलते पाहा.

**(दरू)** उपवनी काज काय । उसीर लागला पाहे ।। तपन तापतो झाली । थोर दुपार ।।२।। श्रमुनी उन्हांत सये श्रमोनि नेणो ते स्वयें ।। कमळींशी रति भमर । करीती झंकार ।। ३ ।। तटलो सर्व वाट सरू । त्या त्या ठाई तृष्णाहरू । सुटल्ये आगिल्वेद शर्य देख अपार ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणे रिती बाणपत्नीने वृत्तांत विचारिता उपवन प्रांतीं हिंडून तेथें मनस्तापाचे खंडन न होता पुन्हा उषा कन्या निजमंदिरी आल्यानंतर तिला जननीने शरीरभाव न विचारतां ते सांगते पाहा ।।

दरू : राग सावेरी ।।

आमये ऐक आता ।। आमये ऐक वो गुज । आमचे शरीरज । स्वमुखे बोलवेना तो । किमपि सर्वथा मज । नलिनाचे मृदु हार । सलती, जेविं पहार । नलगे गोड आहार । नावडे व्यवहार ।। १ ।। करणे सौधनिवास । धरणे सुंदर वास । अरुचि येत जिवासी ।। करू मी काय गे यास ।। २ ।। सुमसेजी जेवी शिखाची, गमते न्वाह लीकाची । समज देहाचा मज । समजही नसे मज ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती उषाकन्येनें वर्तमान सांगता वैद्या वेगळे नीट रोगनिधान कळेणा म्हणून बाणासेने प्राणाचार्यास आणवितां तो येतो पहा ।।

दरू : खाची ।। शा ।।

राजवैद्य येतो लागवेगे बहु तो जसा धन्वंतरी । साजसा सामानासी सार वोखदाची । साजिरी पिशवी ते सानशी । निजकरी ।

**सूत्रधार :** येणे रिती वैद्याने येवून बाणपत्नीचे आज्ञाशासन शिरसा वंदून उषा कन्येची धातु पाहून तत्वार्थ समजून तो अंतरंगी निगूढ करून लोकारूढ प्रकार बोलिजे तो पाहा ।।

**(श्लोक)** सुतनुहुडकितां ते नीट की सर्व सृष्टी ।।
अतुल तव सुताते नेटकी स्वर्ण यष्टी ।।
उपवनि फिरतां की लागली लोक दृष्टी ।।
रिपुस परिइयेच्या ते नसे राग गोष्टी ।।

**सूत्रधार :** येणे रिती बाण पत्नी निकटी वरिरंग वर्तमान सांगून येकांती आत्पास बलावून हे उपवर झाली आहे हा सर्व ही अनंग रंगाचा संताप यास कालो चित्त अनुरूपवर लाभ झाल्याने सुखरूप असेल ।। म्हणून वैद्य निघाल्यानंतर कित्येक दिवसा उपरी पूर्वी देवीने उपवनी असतां उषेला वर दिधला होता ऐसा जो ।। तुला वैशाख

श्रुध्त द्वादशीच रात्री स्वप्नांत बलात्कारानें जो भोगिल तोच प्राणवल्लभ होईल ।। त्याप्रमाणेच ते दिवसी रात्री स्वप्नी येका दिव्य पुरुषाने येवून बलात्काराने अनुभवितां जागी होऊन देवीचे वाक्य विसरून आपणाकडून थोर पाप घडले म्हणून मनस्तापाने बाणकाय देते पहा ।

(दरू) येतसे बाणकन्या ।।

सूत्रधार : येणे रिती उषा येऊन स्वप्नांत उपचार घडला तो आठवून आर्म्तानिंदा करितेपाहा ।।

दरू : राग घंटारव ।। ताल शापू।।

धिगि धिगि माझे जीणे ।। जगी दोषाधार जिणे ।। अगई प्राणहात्यहीन ।। आंतांचसाच ।। १ ।। थोर कुळी जन्मूनि हा ।। घोर घडल्याने महा ।। वोरसे कासयासी पाहा ।। वाचण्याचाया ।। २ ।। दानवेंद्रे कुलांगारा ।। मानिले पातका गारा ।। जाण गेला माझा फुगारा ।। साध्वी पणाचा ।। ३ ।। माय आणि निज बापा । काय सांगू या हो पापा ।। बायानो मी मोटया संतापा । पात्र जाहलें ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रिती उषेने कष्टी होता । सखीने पूर्वोत्तर वर्तमान विचारितां ते सांगते पाहा ।।

(श्लोक) होतें हर्म्यतलीं यथाविध सखी तों एक दिव्याकृती ।।
आला तैं पुरुषाग्रणी नवल जो तो कोटिकामधुति ।।
तेणे स्वप्न **दशे** मधें मज बलात्कारे सखे भोगिलें ।।
या साटीं **निज** जीवनी सजणि म्या स्वारस्य पैं त्यागिलें ।।

सूत्रधार : येणे रिती उषेचें वचन ऐकून प्रधान पुत्री उत्तर देते पाहा ।।

(श्लोक) चित्तें चिंतुनि बोलुनी हि वचनी जे कां शरीरें किजे ।।
होतें पातक हेतु कर्म जानि ते शास्त्रार्थ हो ऐकिजे ।।
लोकातीत विचारसाच गमतो तूझा अतां मानसीं ।।
किं स्वप्नी व्यभिच्यार दोष घडता हे चार तूं माडिसी ।

(छंद) सपनि मारुनी ब्राह्मणा अई ।। उपरि केलियां अमेधही । न परि त्यासटीं पांप पुण्य कीं ।। उपम हे तुझ्या दुष्कृता सखी ।।

(श्लोक) अर्भाट तुझा निरखूनि डोलां । माझा नभी जीव उडोनि गेला ।।
आता मना लागुनि धीर झाला ।
त्वद्बुद्धितचा भास कलोनि आला ।।

सूत्रधार : येणें रिती कुभांड सुतेने समजावितां हीं उषा ठायांस न घेता ते पूर्वील देवता रहस्य सांगते पाहा ।।

(श्लोक) हा कीं शोक समस्त तूं शशि मुखी टाकीं स्वचित्तांतिला ।
लोकीं अप्रतिमानरूपसपनि जो कीं तुवा देखिला ।।
देवीनें वर दत्त तो स्मर मनी हें विभमा त्यागुनी ।।
ठेवीं बोलन आपणा विधि कृता ठेवी असी जाणुनी ।।

**वाक्य :** पूर्वीतांच अपूर्व गुजमज सांगितले होतें तेच आता सुचविलें ।।

**सूत्रधार :** ऐसें सखीने वर्तमान सांगता उषा संतोषाने बोलते पाहा ।।

(श्लोक) ऐक्येची शिव जीव नित्य असतां त्यानेणिवेच्या भरें ।। देहाद्यात्मकमी म्हणूनि भुरले जें पाडियलें बरें ।। वेदांत श्रवणे क्षणेक हरतां तें लब्धला से जसें ।। आत्मैक त्वसयेत्व दीय्य वचनें स्वारस्य केलें तसें ।।

वाक्य : परंतु भोजनार्थ जाऊन मुख विसरल्या परी। देवीच्या वचन विस्मरणाचें मज चोज वाटलें ।।

सूत्रधार : येणे रिती उषेचेवाक्य ऐकून सखी समाधान करिते पाहा ।।

(श्लोक) अशोक विपिनीं वसे जनक नंदिनी या परी ।। जटायु गुरुनें मुखे निगदिलें ही अस्तापरी ।। न आठउनि तें मनी पवन पुत्र स्वेदें आधीं ।। सिणोनि मागतो स्मृती त्वरित पावला कीं तधीं।

वाक्य : एवं हनुमंता सारिख्या बुद्धिमंतास ही जेथे विसर पडला तेथें इतराचा काय पाड असो स्वप्नांत वर्तला जो वृत्तांत ते विस्तारे ऐकावया माझे कान भुकेले।

सूत्रधार : म्हणून मैत्रिणीने पुसतां उषा बोलते पाहा ।।

(श्लोक) गेला खेद समस्त हीं पलुनीया गेला ग वेगे अणी ।। वेलातीत सुखा बुधी निजमनीं हे लावला साजणी ।। हे लावण्यनिधी अपूर्व अजिची ।। वेला गमे मानसा ।। ठेला कांत ठसाऊनी त्रिभुवनी वेल्हाल तो सज्जसा ।।

सूत्रधार : येणे रिती उषेनें सांगतां हास्तवन विखतार असुंदे सार श्रूत वर्तला वृत्तांत निरोपी म्हणून कुभांड कंन्येने संवदतां पुनः बाणकन्या बोलते पाहा ।।

(श्लोक) पलंगी कुरंगी सुनेत्री स्वधामी ।। सुनिदा समुद्रांत मग्नात दामी। स्वयें राहतां साहसी कांत पाही ।। सये पातला तांतडी त्यांच ठांई ।।

वाक्य : या प्रकारें कांत येतां त्याच्या प्रश्नातिश्यें घाबिरून म्या जागें होती त्यानें संकोच टाकून कुचाले मांडितां मी त्येव्हा बोलिलें तो वेचन संदर्भ ऐका ।।

दरू : राग सुरटी ।। आदिताल ।।

सोडि मजला सरसिजाक्षा संकोच टाकुनि ।। वारसें कां कुटिल कटाक्षा ।।

अनुप. : कन्या जनकाधीनमी ।। कंबुकंधरानें मी अन्यथा नमनी वचना ।। अरबिंद वदना ।। अन्याय न करी ऐसा ।। अंतुरी नोहे सहसा ।। पुण्यात्म यारे मनुजा ।। पुंगवा धरीं समज ।। १ ।। कलभंडा सुम बाण ।। कलहीं तूं सुप्रवीण ।। कलसी वक्षोजात्मकीं।। करन धारिलें कीं ।। कळल्या ताता आपण ।। करील चंड शासन ।। बलियानिजें राहून ।। बली चावडील नंदन ।। २ ।।

वाक्य : येणेरीति म्या अनुसरन देवून मागें सरतां प्राण प्रियानें प्रार्थना केली तो प्रकार सांगतें ऐक ।।

दरू : राग आनंद भैरवी ।। अटताळ ।।

कांवो साजणी माझा अव्हेर करीसी ।।

प. : धावत दूरूनि आलों ।। धारकीं कां फार धरसी ।।

अनुप. : घडि निमिष वेल हीं ।। घन पर्वत स्तनी ।। घडतें कीं युगापरी ।। राज जरा गामिनी ।। झड झडू नको या वरी ।। धरूनी थोर झडकरी करूणाकरी ।।

जोडितों करां ।। अडवीनासें अपलियां करीं कड कडूननी भेट सुंदरी ।। १ ।। ढकल सर्वथा ही ।। न करिजे अतिथीचा ।। सकल शास्त्राची हे ।। प्रकट बोले वाचा ।। भूक लागली या समयीं ।। संभोगाची ।। सखि ये तुज्या हृदयीं ।। फार साची अखिल युवति जन शिखामनी ।। अर्पी कामातिथ्यया वरी ।। २ ।।

वाक्य : येणेरीति कांताने प्रार्थिता तत्समई माझे चित्त तन्मय घडतां वर्तले वर्तमान तुला अवगहेंच आहे ।।

सूत्रधार : येणे रिती उषेचें वाक्य ऐकून सखि बोलते पाहा ।।

दरू : ।। ताल शापू ।।

तुजसमजाणसये आननसे जगी ।। ध्रृ ।।जो शूराचा भूषण तो की ।। रतला तुसीं ।। अवो ।। अपणहून नसे जगी ।। १ ।। श्रीशर्वाणी अनुकंपेने ।। भडस तुझी ।। अवो ।। झाली पूर्णनसे जगी ।। २ ।। आचंद्रार्क नांदती वाई ।। पतिसि सुखे।। अवो ।। कोंदाटूनि नसे जगीं ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति सखीचें वाक्य ऐकून इतःपर वल्लभ दर्शनाचा योग जसा होईल त्या कार्यी तूं योग्य आहेस म्हणून उषेनें सराविता कुंभांड कंन्या वल्लभ कोण काय म्हणुन विचारते पहा ।।

(दरू) चंद्रकीं उपेंद्रकीं महेंद्रकीं तो सये ।।

उषा : चंदूकी उपेंद्रकी महेंद्र कीं मीं नेणे ।।

सखी : रूद्रकी वल भद्रकीं सौभद्र कीं तोसये ।।

उषा : रुद्रकी वल भद्रकी सौभद्र कीं मी नेणे ।।

सखी : पक्षीशकीं यक्षेश कीं राक्षस कीं तो सये ।।

उषा : पक्षीशकीं यक्षेश कीं राक्षस कीं मी नेणे ।।

सखी : भूपाल कीं दिक्पाल कीं गोपाल कीं सये ।।

उषा : भूपाल कीं दिक्पाल कीं गोपाल कीं मी नेणे ।।

सखी : नरकीं किन्नर कीं हुन्नर वंद कीं सये ।।

उषा : नरकीं किन्नर कीं हुन्नर वंद कीं मी नेणे ।।

सूत्रधार : येणेरीति उषेनें प्रत्युत्तर देतां सर्वहीं आकाश पंचांग दिसतें कदा विचित्र लेखेनें इकालांत संदर्शन घडविल्याने घडूये म्हणून कुंभांड कन्येने अंतरंगी चिंतितां चित्रलेखा येते पाहा ।।

दरू : राग बिलहरी ।। आदिताल ।।

येते जलजाक्षी देखा ।। हे चित्र रेखा ।।

प. : जे तव वर्णिनें केवल ।। शात कुंभरेखा सुंदरी ।।

अनुप. : निज सखि जे कां उषेची ।। निस्तुल जगतील सद्‌ची ।। गजवर नभ गंभीर गमना।। राज बिंब मुखी मूर्ति गुणाची ।। १ ।।

सूत्रधार : येणेरीति चित्र लेखा येतां तिला विलोकून उषा बोलते पाहा ।।

दरू : राग हुशानी ।। ताल शापू ।।

साजणी यासी उपाय मज प्रति ।। सांग बरा कांही लौकरी ।।

प. : तो जसाकीं भेटल मज ।। तो यजाक्ष बाई ।। आतां ।। चोजवया तया ।। चाल माझे आई ।।

(अनुप.)

सूत्रधार : येणेरीति उषेचे वाक्य ऐकून चित्रलेखा बोलते पाहा ।।

दरू : राग केदार गौला ।। अटताल ।।

धीर धरी थोडासा तरुणी ।।

प. : मी रमणि प्राथितें ।। मैत्री करूनि ।।

अनुप. : चारू तुझा पती ।। चोजवूं गुणवती ।। सार साक्षी अती ।। शीघ्र जातें ।। की भाषिणि येक । कीं पुसतेसें देख ।। सारतें बदढीक ।। सर्वहीं मातें ।। १ ।।

वाक्य : पुसायाचा मार्ग काय म्हणसील तरि ऐक ।।

(दरू) गांव पतिचें कवण ।। नांवही सखि कवण आवये कथि कथन ।। हें अपैसें ।। जावूनी झडकरी ।। जाण आणि तें जरी ।। तो वळेना तरी ।। थोर सायासें ।। २ ।।

सूत्रधार : या प्रकारें सखीनें पुसतां उषा उत्तर देते पाहा ।।

दरू : राग हुशानी ।। ताल शापू ।।

गांवसीव त्याचें काहिंच ।। मज ।। ठावुकें सर्वथा नाहीच ।। आणि नांवही नेणेची साच।। रूप ।। सावळें मात्र तें सुचतें मनोगेहीं ।।१।।

सूत्रधार : येणेरीति उषेन संवादतां ते ऐकून तुझ्या वल्लभाचे गांव नांव न कळल्याने न कळो ।। परंतु तो अमक्या सारिखा म्हणून सांगीतल्यां त्या वरून त्रैलोकयीं हिंडून तरीं तुझ्या कांतास धुंडून आणितें म्हणून चित्रलेखा बोलते पाहा ।।

(दरू) पारखिन रमणया ।। सारिखा म्हटलियां भीरू तो सुचलियां भाव सांग ।। हे रमणि असलियां हेंच सूचक तया ।। फारखुलवुनि प्रिया ।। भेटविन वेगें ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरीति चित्रलेखेचें वाक्य ऐकून आपुल्या वल्लभास मान त्रैलोकयीं कोणीं नाहीं म्हणून बोलते पाहा ।।

(दरू) ज्यास नसे जोड दुसरा ।। जगीं ।। या सर्व धुंडितां साजिरा ।। जैसा ।। भासुर मन्मथ बरा ।। ज्याचा ।। तैसाति चांगट वेष संशय नाही ।। २ ।।

वाक्य : पर तूं शाहाणी आहेस जैसें प्राण वल्लभाचें दर्शन होईल तैसें करावे ।।

सूत्रधार : ऐसें उषेनें प्रार्थितां चित्रलेखा बोलते पाहा ।।

(श्लोक) सुरगणि दुसरी जी पुढतीं कैंन मांडे ।। करील असिहि कैसी ते करावेच मांडे ।। वदति श्रुतिहि शाखा चंद्र रीति स्वरूपा ।। सुदति न कथिसी तूं सुचना स्वल्प रूपा ।।

सूत्रधार : येणेरीति चित्रलेखेचें वाक्य ऐकून उषा बोलते पाहा ।।

(श्लोक) गालुनिगा भासारा ।। सारांश हि जो उरेल गगनाचा ।। तोहीं चिह्न न असल्यां ।। तनूंस त्याचे तुलाईकीं साचा ।। १ ।। अकलंकी अडनत्मा ।। संतत सकला कलासथा राजें।। होईल कला निधी हा ।। न कळे तन्मुख समान घडूये तें ।।

सूत्रधार : येणेरीति उषेचें वाक्य ऐकून चित्रलेखेने चित्तांत योजना केली ऐसी जे त्रैलोक्यांत जितुक्या पुरूष व्यक्ति आहेत तितुक्यासहीं पटांत लिहून उषेला दाखवाव्या तीणें खुणें वरून हा आपुला रमण म्हणून सांगीतल्यानें अनंतर त्याच्या भेटीचा यत्न केला जाईल हें मनी निर्धारून तें उषेसहीं सांगून आधीं स्वर्ग लोकीं असणारे जे देवेंद्रादिकत्ये चित्र लिखित करून चित्रलेखा बाण कन्येसीं बोलते पहा रागवृंदावन सारंग ।। तालशापू ।। बलखूनि सांग वल्लभ तो ।।

(दरू) अली वेणीयांत ।। लिहिला असें जो तो ।।

अनुष. : इंद्र स्वयें अमरेंद्र पाहा ।।

उषा : चंद्र मुखी नव्हे ।। चतुर तो नाथ हा ।। १ ।।

चित्र. : वरूण यमादिक दिक्पति हे ।।

उषा : तरूणी कोणहीं ।। यांत नाहो नोहे ।।

सूत्रधार : येणेरीति स्वर्ग लोकिचे देव अवघे चित्ती दाखवितां यांत आपुला वल्लभ कोणी नव्हे म्हणून सांगता पाताली असणार शेषादिक थोर थोर नाग तसेच कित्येक राजे चित्री लिहून दिव्य रूपधर दाखविते पाहा.

दरू : राग शंकरा भरणा ।। आदिताल ।।

ईशभुजंगाचा हा ।। शेष लोचनी पाहा ।।

उषा : तो सखे नव्हे चित्त ।। तोष कहा ।।

चित्र. : ।। वा ।। हावो वासुकि अहि ।। रावो नयनी पांहीं ।।

उषा : नाहो निज प्रणचा ।। नोहें हाहीं ।।

चित्र. : राजे सर्वही हे की ।। साजिरे अवलोकिं

उषा : राजशे नव्हती माझे ।। नाथ हे कीं ।।

सूत्रधार : येणेरीति पातालिच्च पुरुष व्यक्ती अवघ्या दाखवून भूलोकी जे थोर थोर राजे त्यास उषेला दाखविते पाहा ।।

(दरू) मिथिला पुरपति मान्य पाहा ।।

उषा : कथितसे मी निज ।। कांत नव्हेची हा ।।

चित्र. : कोसल केरल कौरव हे ।।

उषा : या समुदाई एकही तो नव्हे ।।

चित्र. : मागध मालव मत्स्य पहा ।।

उषा : आवघे नव्हतीच आत्म नायक पांहे ।।

सूत्रधार : येणेरीति भूमंडलीचें इतर राजे दाखवून यादव कुलीचे कित्येक दाखवून वसुदेवास चित्रि लिहून चित्रलेखा बोलते पाहा.

(दरू) देवी हा तो वसुदेव नृपहिरा ।।
पावन निज दिष्ठी पांही बरा ।।

**उषा :** याची सावली नतूमात्र जीवलगा परी, तो वनजाक्षी नव्हे निज नवरा.

**सूत्रधार :** येणेरिती वसुदेवास दाखवून श्रीकृष्णाची श्रीमूर्ती दाखविते पाहा.

(दरू) शामल स्वानंद धाम रमापती ।।
हामहिले पहा हे मद्युती ।।

**सूत्रधार :** येणेरिती चित्रलेखेनें चित्र लिखित श्रीमूर्तिला दाखविता हाच आपुला प्राणवल्लभ होईल म्हणून क्षणभरी भ्रमून काही व्यत्यास समजून उषा बोलते पाहा.

(दरू) राम जगति पति साच दिसे परी ।।
तो म्हणवेना दिव्य मती ।।

**वाक्य :** कां म्हणवेना म्हणशील तर सांगते ऐक

(दरू ) देवकी नंदन देव परंतु तो ।।
ठावा पुराणात्मा पुरुष मला ।।
केवल माझिया जीवलगाचा तो ।।
कोवला वेष हा कोठें भला ।।

**सूत्रधार :** येणेरिती उषेचे वाक्य ऐकून चित्रलेखा प्रद्युम्नास दाखविते पाहा.

(दरू) कंदर्प हा तव इंदिरा नंदन ।।
सुंदर अवलोकी सांद्र गुण ।।

**सूत्रधार :** येणेरिती चित्रलेखेचे वाक्य ऐकून पव्याणौ वांटे हाच आपुला प्राण वल्लभ म्हणून मनांत संतोष पावून नीट न्हाहाळून पाहतां थोडसा व्यत्यास आडवून मनोभाव उषा सांगते पाहा.

(दरू) सुंदरि चितानंदन हाच तो ।। बिंदु व्यत्यास कीं पैं सूचतो ।।

**वाक्य :** तोचि व्यत्यास सांगते ऐक ।।

(दरू) मानिनि वल्लभ माझा उपमान ।। मानिजे हा उपमेय जाण ।।
यामध्ये व्यत्यास तो मात्र केवल ।।
ह्यामुळे न मनीं मी या नवरा ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती उषेचें वाक्य ऐकून चित्र लेखित अनिरूष्ठास दाखविते पाहा.

(दरू) सोम कुलां बुधि सोमघनद्युति ।। जो महा लावण्यसीम अति ।।
काम सुत ख्यात नामें हा अनिरूद्ध ।। कामिनी निरखीं कां सुमती ।।

**सूत्रधार :** येणेरिती चित्रलेखेनें अनिरूद्धास दाखवितां आपुल्या वल्लभाचा दिव्य मंगल विग्रह पाहून आनंद समुद्रातं पोहून.

(श्लोक) ध्यानाभि व्यक्त मूर्ती निरखुनि हृदअीं भाविकें जें विधाती ।।
ज्ञानी ब्रम्हक्य बाधें सम रूसुनिज शे पूर्णाचिद्र पठाती ।।
कामी कांतांग संगे विसरूनि दुसरें पावती भाव तोची ।।
तैसी ठेली उषा ते बलखुनि पतिचा वेष तद्रुपसाचा ।।

वाक्य : त्यानंतर देहभावावरी येवून चित्रलिखित अनिरुद्धाची मूर्ति शिरसा वंदून नेत्रात विंदास लावून चित्रलेखेस विलोकून उषा बोलते पाहा.

दरू : राग कल्याणी ।। ताल शापू ।।

प्राणनाथ ह्याच तोसचे ।। प. ।।
खाण खूण सर्व बरोबरी ।। जाण नशेचि अणुमात्र संशये ।।

अनुप. : सपनी येवूनया अपरिमेय जेणें ।। अपुले भोग सुख अर्पिलें ।।
अपरूप ज्यांचे रूपडें त्रिभुवनी ।। पद्ममी कामोद्दीपक आगलें ।।
राजहंसा परी रात्रि दिवस ही ।। साजला मानस पंजरीयां ।।
राजसलोचन राजीवाचे परी ।। साजणी सर्वथा साम्य नसे जया ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती कांताचे वर्णन करून देहभाव विसरून अनिरुद्धाच्या चित्रलिखित प्रतिबिंबास अनिरूद्धच मानून त्यासी संवदते पाहा.

दरू : राग मांजी ।। ताल शापू ।।

बोल मजसीं बोल गोड आवडि ।।
प. ।। निजसुख निधाना ।। सुखवी बहु निधाना ।।
सुखवी बहु श्रवणा या घडिरे ।।
अनुप. ।। कां धन राज तुज लागुनि लाला ।।
सांग धरिला का अबोला ।। सद्गुण गण निधिरे ।। १ ।।
लक्षण निधि असल्या ।। लक्षापराध ।।
लक्षतें न करितां ।। सखाया ।। सादर झडकरीरे ।। २ ।।
हांसति गडिणी डप ।। हास करूनी ।।
कां समज सीनामनी ।। अझुणी ।। यादव कुलमणीरे ।।

सूत्रधार : येणेरिती बोलून चित्रलिखित कांतासी उषा बोलतातीचा भ्रम दवडाया कारणें चित्रलेखा बोलते पाहा.

दरू : राग यमुना कल्याणी ।। अटताल ।।

सजणि तुजला मोह ऐंसा ।। कांवो ।। अजि ।। पडिला अहाहा ।।
प. ।। चित्रगमे मोढे सखी जाण ।। चित्र पतीचे हे नुमजे हा ।। १ ।।
खदखद हासति गडिणीया ।। विधु मुखी टालिया पिढुनिया ।। २ ।।
बहुतचि शहाणी भलि भली माये ।। न्यहळुनि नयना ती क्षण पाहे ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती चित्रलेखेचे वाक्य ऐकून उषेनें साव धपहतां हे अनिरुद्धाची चित्रलिखित प्रतिमा परंतु तो नव्हे ऐसे निर्धारून चित्रलेखेसी बोलते पाहा.

(श्लोक) नाथाचे निज नांव गांव नव्हते ठावें तुला मानिनी ।।
या साटी जाहला उसीर सखि येतद्रूप संदर्शनी ।।
आंता गोत्र कुलादिसर्व कळले कीं त्या प्रियाचे सयें ।।
माथां वंदिन तो गुणार्ण अणूं जा तांतडीनें स्वयें ।।

सूत्रधार : येणेरिती उषेने व्दारकेस जावून कांतास आणावें म्हणून चित्रलेखेस प्रार्थितां ते बोलते पाहा.

(छंद) असुर नायकाची पुरी सखी जसिच हे सुरादुष्प्रवेशकीं ।।
तसिच ते पहा व्दारका पुरी ।। कसि शिरूं सकें तेथ मी बरी ।। १ ।।
हर इेय पुरी रीषतो जसा ।। हरिहीं पालितो व्दारकातसा ।।
तरूणि तूं तरीं सोडिसीचन ।। तरू मी संकटाकें विद्या घना ।।

**सूत्रधार :** येणेरिती व्दारवतीस जावून अनिरुद्धास आपणाच्याने आणवेना तेथें गेलियाने प्राणास येईल म्हणून चित्रलेखेने हाय पाय गालितां उषा तिज दैन्य प्रगट न पूर्वक तिला सरावून बोलते पाहा.

**दरू :** राग सौराष्ट्र ।। अटताल ।।

अहह साजणातांही ऐसे केल्यां कसें ।।
प. ।। सहसा न राहेचि जीव करूं ऐसें ।।
अनुप. ।। पडतां तिहि लोकियां ।। शाहणी तुज सम भली ।।
साहसीणही दुसरी ।। साचनवसे ।। हे हरिणी भृन्मुखीं ।।
येवढचा कार्यासि ।। साग्ततां न करितां ।। सांगूं कवणास ।। १ ।।
आणिसिल वल्लभा ।। आजिवरी या परी ।। जाण आशास
हळ ।। जडली होती ।। राण भरि घडतां ते ।।
अनुसरूनी तीस प्रस्थान करूं सजली पै ।। प्राण सुज्ज्योति ।। २ ।।
अवधीं या दानांत कुवल याक्षी नसे जीवदानासहश जगति दुसरें ।।
हांव धरूनीं आतां ।। धांव वल्लभ पुरा ।। यावदायुष्य उपकार न विसरें ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती उषेने दैन्य पूर्वक स्तोत्र करून फार प्रार्थिता जांबवंताने आंजनेयाची स्तुति करितांच त्याच्या समुद्र उल्लंघन शक्तीची अभिव्यक्ती झाल्याप्रमाणे बाणकन्येच्या स्तुतीने चित्रलेखेस उत्साह शक्ती येऊन उषेसी बोलते पाहा.

(श्लोक) बांधी शकुन ग्रंथी ।। साधिन तूझा यथार्थ मी काजा ।।
आला क्रीडा धामी ।। जाण प्राद्युमुनी निछये जा जा ।।

**वाक्य :** तरी मी वात मनोवेगासहीं भावें टांकून व्दारकेंत जावून तुझ्या रात्रीचा भोग तस्कर जो अनिरुद्ध त्याला प्रेम पासीं निरुद्ध करून आणितें म्हणून चित्रलेखेने प्रतिज्ञा करितां उषा संतोष पूर्वक बोलते पाहा.

**दरू :** राग कल्याणी ।। आदिताल ।।

वासमी तुझी हे आदरें पहतें ।। अस थोरमनीं धरूनियां ।।
प. ।। ध्यास केवल अनुदिनहींचकोरासडयापरी ।।
कीं शशिचा तया ।।
अनप. ।। रफरत नय नडाबा ।। पूर्ण शशि मुखी ।।
सरस भुजलता ।। सव्यहीं निरखी ।। परिसकूजताती चारूखे खग ।।
गरज नाहीं झालें ।। काम काज सखी ।। १ ।। कंठी धरूनी जीव कंज निभे क्षणे ।। कंठितपलल्व ।। कीं असते आतां ।। कुंठित न घडुनि कुंदर दनयदु ।। कंठिख आणी ।। कंदर्प सुख दाता ।। २ ।। अवधि बयाचिया । अवधारी तंवर । तव आगमन होय । जवे फलवत्तर । जिवलगा घेऊन । लवकरी ये कधीं ।। न विसरे उपकार न वदें मिथ्योत्तर ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती उषेचें वाक्य ऐकून कार्यसिद्धी करितें म्हणून चित्रलेखेनें निरोप घेता अनिरूद्धाचें ध्यान धरून बाण कन्या अंतःपूरीं प्रवेशता अनिरूद्ध येतो पाहा.

दरू : राग सुरटी ।। आदिताल ।।

तो गुणनिधि श्रीमनसिज निज सुत ।। अनिरूद्ध येतो पाहा ।।
प. ।। घननील तनू मानस मोहन ।। जनकाहुनि या धन सुंदर हा ।।
अनुप. ।। चारूवरि भवदीर्घ विलोचन ।। धीरवीर भूषण बरवा ।।
वारणेंद्र गंभीर गमन अति ।। सुरूचिर कनकां बर धर जो हा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती अनिरूद्ध येवून कामिनी विरहातुर आप आपणांस बोलतो पाहा.

(श्लोक) कोठें मी असणार संतत सुखे या व्दारकेतस्वता ।।
कोठें ते नव यौव्दनासुनयना श्रृंगार श्रृंगस्थिता ।।
दोघाला घडवून योग विघडूं दैवें पुन्हा पाडिला ।।
केला दंपतिलावियोग जणु म्या जन्मांतरीं चांगला ।।

वाक्य : या समयी प्राण मैत्री विदुषक अस्ता तरीं कांही उपाय सांगतां ।। तोहिं आला नाहीं ।।

सूत्रधार : ऐसें अनिरुद्धानें चिंतितां विदूषक येतो पाहा.

दरू : राग पंतुरवाली ।। ताल शापु ।।

तो शाहणा संतोष भरूनि विदूषक येतो पाहा ।।
प. ।। कौसल ज्या प्रतिहारसीं बहु ।। भूषित भूषणीं हा ।।

सूत्रधार : येणेरिती विदूषक येवून अनिरुद्धास पाहून तूं कां भ्रमिता सारिखा दिसतोसें म्हणुन विचारितां मार कुमार उत्तर देतो पाहा.

दरू : राग यमुना ।। अटताल ।।

सुदतितेसतत मनि जडलि ।। सरसिजानना ।।
मदिराक्षी लावण्य मूर्तिच जाण ।।
प. ।। विदित ज्या बहु त्रिभुवनी ।। मदन तंत्र विलासिनीं ।।
सदृश नव्हती पदर ज्याजनी ।।
जिच्या सुंदरी असी मंदर स्तनी ।।
अनुप. ।। हृदया पासुनि झाला हा ।।
सुप्रसिद्ध मदन हा प्रत्यक्ष पहा ।।
हृदय भेदितो परिहा ।। अधम सुमशरिं अहहा ।।
न धरूनी अब भीति जनि भूविदलनें मदमस्त अति हा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती अनिरुद्धानें मन्मथास निंदिता विदूषक बोलतो पाहा.

वाक्य : राजा तूं सर्व धर्म जाण्ता ऐसें असून बापास निंदणें युक्त नव्हें ।।

सूत्रधार : येणेरिती विदूषकांचें वाक्य ऐकून अनिरुद्ध बोलतो पाहा.

**वचन :** अरे विदुषका त्याने आपणास पुष्पबाणी हणायास वेधलें कारण आहे तेंच ऐक ।।

**(दरू)** जनकनंदन अभिन्न ।। वेदाचें हें ।। जणूं साचें करूं वचन ।।
अनंगपण मजही । आपुलें द्यावया साटीं ।।
हणितसे निज विशिखि सण ।।
तनु अभावचि ।। झणि घडाया ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती अनिरुद्धाचे वाक्य ऐकून विदूषक बोलतो पाहा ।।

**वाक्य :** राया तुझ्या अंतःकरणात बिंबली जे कामिनी तीची स्थिती गति काय ।।

**सूत्रधार :** येणे रिती विदूषकाचें वाक्य ऐकून अनिरुद्ध बोलतो पाहा ।।

**वाक्य :** अरे विदूषका ते सर्वही अनिवर्चनीय तेंची ऐक ।।

**(श्लोक)** द्राक्षाक्षीरसुधामुधामधुरता यांचीं न जेथें सजे ।।
ते कोठें रचनावली विरचना चातुर्य मांदूसजे ।।
ते कोठें अतिष्ठीकरोख सखया जे रोख देते सुखा ।।
ते कोठे तनु नित्य नूतन हि जें श्रृंगार रंगसिका ।।

**सूत्रधार :** येणेरिती अनुरुद्धाने वर्णन करितां तिला तुला योग येव्हा घडला म्हणून विदूषकाने विचारितां प्रद्युम्न कुमार बोलतो पाहा.

**(छंद)** न पवती तिचें साम्यसुस्त्रिया ।।
अपण म्या असी देखिली प्रिया ।।
उपरि भोगहीं लाभला तिसीं ।।
सापनीची कथा सर्वही असी ।।

**वाक्य :** या प्रमाणें स्वप्ना मध्ये तिलामला योग घडला तीचें स्वरूप मात्र अंतःकर्णी ठसावलें ।। परंतु गांव सींव नांव हे कांहींचें मला ठावुकें नाहीं तुंवां उपायानें तें ठाई पाडून प्राण प्रियेचे सविधान करावे.

**सूत्रधार :** म्हणून अनिरुद्ध विदूषकास प्रार्थितो पाहा.

**दरू : राग नायकी ।। तालशापू ।।**

आणी प्राण रमणी ।। सखया ।।
प. ।। अणिखीं तीयें विणनाठवेचि प्राण मणी ।।
अनुप. ।। लोचन कुवलजाचे चारू चंद्रिका ।।
साची श्रृंगार रसिका ।। आणि प्राण रमणी ।। १ ।।
नानर रूपिणी नारि शिरोमणी ।।
भाग ध्येय माझें परम गुणी ।। प्राणरमणी ।। २ ।।

**सूत्रधार :** या प्रकारे अनिरुद्धाने बोलतां याला काम पिसें फार लागते अखंड विरह ताप समुद्रामध्ये बुडाला आहे ।। यास्तव कांही विनोदानें या गोष्टीचा विसर पाडावां म्हणून आप आपणांत चितूर विदुषक बोलतो पाहा.

वाक्य : सखयां तूं मोटा दैवाचा जागरावस्थेंत उत्तम स्त्रिया भोगितोस ।। स्वप्नांतही उत्तम स्त्री भोगिली ।। दैव माझे जोरावर जागॄद्शेत फार चांगल्या स्त्रियेचा सहवास मिलाला स्वप्नांत तरीं दिव्य स्त्रियचा योग घडेल कीं म्हणून चितीतां प्रत्यहीं कुरूपीच स्वप्नांत भेटते त्या स्त्रियेचें रूप लक्षूण सांगतो अैक.

(श्लोक) वेखंडा सम दंत पडिविलसे नासासि सामान्यता ।।
धम्मिल्ला कृति निव्बपल्लवत शे तैसी घरी मान्यता ।।
डोले पक्वपटोलशेकुच जिचे ते लंबतुंब्बोपमा ।।
ऐसी बाईल ज्यासि होईल तरि रामायतस्मैनमः ।।

सूत्रधार : येणे रिती विदूषकाने उपहास करितां अनिरुद्धाचा विरहताप काहीं निरूद्र धडतां तों गौली चिटि चिटियां याचें फल काय म्हणून अनिरुद्धाने पुसतां विदूषकानें दूतिकास गमन घडले म्हणून सांगता तों चित्रलेखा येते पाहा ।।

(दरू) येते जल ज्याक्षी देखा हे चित्रलेखा ।।

सूत्रधार : येणे रिती चित्रलेखा येवून अनिरुद्धास पाहून आप आपणांत बोलते पाहा ।।

(श्लोक) ज्यासाठी शिणते उषा दिन निशा भागींसदैव स्वता ।।
वेषानेंचि जयाचिया भुलविली ते शाहणी तत्वता ।।
आलें ज्यास्तव साहसा करूनि मी येथें मुनीचें दये ।।
झाला लोचन गोचर प्रगटतो प्राद्युम्नि दैवान्वयें ।।

सूत्रधार : यापरि आनंदानें संवाद तजव्वल येणार जे चित्रलेखा तिला विलोकून अनिरुद्ध बोलतो पाहा ।।

छंद : अविदित प्रभूलागि येथकीं ।। पवनही सिरेना कदासखी ।।
नवल भासते तूं अलीस तें ।। कवण सांगण्या काजनीउतें ।।

सूत्रधार : येणे रिती अनिरुद्धानें विचारितां आगमन कार्याचां सारांश दोंच गोष्टीनें चित्र लेखा सांगते पाहा ।।

(श्लोक) जियेच्या अजाचें घरी व्दार पालू ।।
जगन्नाथ तो विष्णु मोढा कृपालु ।।
जिच्या तात दुर्गास जो कोतवाला ।।
परी रक्षितो त्र्यक्ष हीं बैलवाला ।। १ ।।
उषा तयाची तनया रतीची ।।
स्नुष घडू इच्छितसें रतीची ।।
खुशाल हूं या परि कार्य रूपा ।।
टुशाल देई मज दिव्य रूपा ।। २ ।।

वाक्य : तूं म्हणशील कीं च्यारि दिवस गेल्यानंतर मी येईन तरि विलंबला विल्याने उषेचें प्राण टिकणें कठिण तेंच ऐक ।।

(श्लोक) वांचेल तो जरि जलाविण नित्य मासा ।।
सांचेल पुण्य अनृतेंचि जरी सुहासा ।।
कांचेलही असेल तंतु विनाशता हीं ।।
वांचेल ते परि उषा तुलवीण कांहीं ।।

सूत्रधार : यापरि चित्रलेखेने उषेचा समाचार सविस्तार सांगतां अनिरुद्धाचा देहभाव जावन केवल कामातुर होवून बोलतो पाहा ।।

दरू : राग मांजी ।। ताल शापू ।।

कसा सांग मला ।। राहूं कसा सांग मला ।।
स्वसखी वीण येकला ।। अजि स्वसखी वीण येकला ।।
प. ।। ठाव ठिकाणहीं ठीक कळूनियां ।
त्यावरि ज्याक्षिचाथिरवोभला ।। १ ।।
पंक भवासने देख बुडविलें ।।
पंखा लागी न करूनि आगला ।। ३ ।।

सूत्रधार : येणे रिती अत्यंत कामचा पत्यें अनिरुद्धानें प्रार्थिता बरें तैसेचि होईल म्हणून समाधान करून तुझ्या नगारांत प्रवेश कैसा झाला म्हणून ऐसा प्रश्न मारकुमारानें केला होता त्याचें उत्तर ऐक म्हणून चित्रलेखा सांगते पाहा.

(सोसपद्य) व्दारकें तूं नित्य । दान बाचे पुरीं ।
सारसाक्षा तुला । शीघ्र न्याया । पावले भीत्तरी ।
जावयाचे मना भावलें संकट प्रायशाया ।।
नारदाने तदा ।। फार संमोखुनी ।। सार विद्यादिली ।।
वीर राया ।। नामतीचें असें ।। तामसी हे असी ।।
कामसाधूं अलेंकी स्थलाया ।। लोचनाला नव्हे ।। गोचराकीं ।।
साच ब्रम्हादिकां ।। सारव्यांकीं ।। योचना दुसरी ।।
हे नकीजें ।। जीचलावें सवें साच माझें ।।

सूत्रधार : येणे रिती चित्रलेखेचें वाक्य ऐकतांच हर्षभरित अनिरुद्ध बोलिला ऐसे जे मीहीं उषा संवर्शना साटी ।। येका पायावरि उभा आहे ।। आतां दिसांच तुज बरोबरी आल्याने तात्काळ कलुन यादव पाठीलाग करितील ।। त्यास्तव अर्ध रात्री लोटितांच तममसी विद्येच्या बलें आवध्यास भैम पाहून मला कां ते जवळ न्यावें म्हणून चित्रलेखेला अंत:पुरां गुप्त ठाव देऊन आपण उषेचे ठोई केवल आसक्त होऊन कल्याण मंदिरीं प्रवेशल्यानंतर चित्रलेखेस जावून फार उशिर झाला यास्तव उषा चिंता क्रांत येते पाहा।।

दरू : राग असावेरी ।। आदिताल ।।

श्रीमती येतशे दैत्य ।। भूमिप नंदिनी पाहा हे ।।
प. ।। जे मति मति कीं केवल ।।
जगति असमगुण शीला ।। हेम वर्ण तनुबाळा ।।
कसी अतिशय वेव्हाला ।। त्रिभुवन ।।

वामिनी समुदय चूडामणी ॥
गामिनीश प्रति भटमुखी ॥ सौदामिनी जणु कीं द्दिरद ॥
गामिनी ने उषा नामिनी ॥

सूत्रधार : येणे रिती उषा येऊन सखिसी बोलते पाहा ॥

दरू : राग सुरटी ॥ अटताल ॥

निजनाथ लौकरी नयेंकी ॥ क्रमत ॥ मजतयाविणे ।
युगसी अजि घडीहेंकीं ॥
प. ॥ प्रमदासमुदयां बुधिसीं ॥ पूर्ण हिम भानुसमठीक ।
गमतो स्वधीशी ॥ रमणी येईल संन्निधीसी ॥
तो स्व ॥ रमणु असी युक्ती रचिजे शुधीसी ॥ १ ॥
स्मरताप परतास राया ॥ प्रिया ॥ धार
योग्य अमृताब्धि ॥ तरूणी बराया ॥
करवीं तत्पान सुदयेनें ॥ तुझी ॥
भरल जगी कीर्ति सखी ॥ बहुसाल येणे ॥ २ ॥

सूत्रधार : येणे रिती बोलून विरहताप न साहतां उषा चंद्राची निंदा करिते पाहा ॥

(श्लोक) हा कूटस्थ कलानिधी पति कुला ऐसे असूनीं तऱ्हीं ॥
तावीतो मजला करीं रविजसातो कीं युवा सुंदरी ॥
हाही माधव कालरूप घडुनी शास्तासुराशा सुरा ॥
आरामाशिण धारू निशिणवितो मातें अजे सासरा ॥

वाक्य : आतां सख्यासासऱ्याची सलणूक सांगतें ऐक ॥

(श्लोक) मी सुनहें कलुनि काम प्रसून बाणि ॥
चित्ता सिवूर करि यापरि कीर बाणी ॥
जाला सखाचिरसराजरिचेल पंथ्या ॥
अन्यावरी करूनी काय वृथाचि कुंथ्या ॥

वाक्य : मी हीं वज्रादिकास आटोपणार नव्हे ॥ तेंहीं पुष्प बाणा खालें जेर झालें तेंचि सांगतें ऐक ॥

(श्लोक) फोडूनि वज्रशत कावल यासिल्यालें ॥
वाटूनि वैष्णव सुदर्शन सांग प्यालें ॥
श्री शैव बाण जग भीषण त्यान म्यालें ॥
तेहीं कसी सुमरशरार्दित आजि झालें ॥

सूत्रधार : येणेरिती उषेनें सखीसीं बोलून अद्यापि कां चित्रलेखा आली नाहीं म्हणुन घडि घडि आठवितां चित्रलेखा येते पाहा ॥

(दरू) येते जल जाक्षि देखा हे चित्रलेखा ॥

सूत्रधार : येणेरितीं चित्रलेखा येवून उषे प्रतिसुख समाचार सांगते पाहा ॥

(श्लोक) उडुनि गगन मार्गे जाउनी व्दारकेशी ॥
उडुपति मुख म्यातों आणिला भृंगकेशी ॥
जडुनि हृदई होता जो तुझा तोवराकीं ॥
खुडुनि विरह वृक्षालाली आतांचिटाकीं ॥

**सूत्रधार** : येणेरितीं चित्रलेखा उषेसीं संवदतां अनिरुद्ध येतो पाहा.

(दरू) तो गुणनिधी ॥

**सूत्रधार** : येणेरिती अनिरुद्ध येतां त्यास पाहून संतोष पावून आनंद संमुद्री पोहून उषा बोलते पाहा.

(श्लोक) होतासि जो हृदय मंदिरी रेखिलासी ॥
तो तारकेहा मुख तूं अजि देखिलासी ॥
जालेंचि जन्म सफल स्वसुखै करासी ॥
आलें महत्पद गमे अपुल्या करासी ॥

**सूत्रधार** : येणेरिती अनिरुद्धासीं बोलून चित्रलेखेस विलोकून उषा बोलते पाहा.

(दरू) राग व्यागडा ॥ ताल शापू ॥

थोर कल्याण आंजि ॥ झालें बाई ॥
प. ॥ चोर चित्ताचा ॥ सांपडला हाहीं ॥
अनुप. ॥ नवस सायास ॥ सर्व फला आला ॥
दिवस सोन्याचा दिव्य उगवला ॥ १ ॥
स्वामी माझा पहा ॥ तांडोल यानें ॥
प्रेमें दाटूनिये ॥ ती डोळचानें ॥ २ ॥
चरण वंदित ॥ मस्तकाल कीं हे ॥ तरूणी लोटीत वो ॥
मस्तकाल कीं हें ॥ ३ ॥ देखतां मुखां बुजा ॥
या श्रुभागरा ॥ सखे धरिला सौख्यासि ॥ धूने फुगारा ॥ ४ ॥
भडस पुरतां पोसलें देहबाले ॥
अडस होती हे पहा चुडे बाले ॥ ५ ॥
कुचचेलाचे उचटले टांचे ॥
सुचेया पुढें ब्रम्ह सुख तेहीं टांचे ॥ ६ ॥
क्षेम राहीन ॥ कल्पकोटियासी ॥
क्षेम देत साव ॥ ल्या स्वात्मयासीं ॥ ७ ॥
वंदू तुझी काय ॥ मी चतुराओ ॥
कधिहीं होवूं नस कें उतराई ॥ ८ ॥

**सूत्रधार** : येणेरिती चित्रलेखेशी उषा बोलता अनिरुद्ध संतोषून उषेसीं बोलतो पाहा.

दरू : राग यरूकुल कांबोदि ॥ आदिताल ॥

दैवें क्षेम तूं सखी देखिलीस ॥
प. ॥ हे वन जाक्षी सावध परिस ॥
अनुप. ॥ कुसुम शरीं मानस घडता पुडी ॥

असुनिही त्यामध्ये अक्षयराजसे ।। १ ।।
विरहानल निरवधि जालानी ।।
हुरपलुनि हि हरि हरी रात्रि दिस ।। २ ।।
सीत नयन आजि शिव शिवा झाले ।। हें तव पाहूनियां मुख सारस ।। ३ ।।

सूत्रधार : येणेरिती अनिरुद्धाने संतोषने बोलून गांधर्व विधीने उषेचे पाणिग्रहण करून अंतःपुरी नितयानंद अनुभक्ति असतां तो गर्भ संभावना होता हे वर्तमान कोठे बाणासुरास कलेल कीं म्हणून उषेनें चिंताक्रांत होतां कुंभाड नामक प्रधानासहित बाणासुर येतो पाहा.

दरू : राग नाटकुरंगी ।। आदिताल ।।

बाणदानव येतो पाहा ।। बल समुद्र तो हा ।।
प्राण सदृश्य कुंभांड मुखंड प्रधान बुद्दिसु निधान बरोबरी ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती बाणासुर येवून सभेत बसून कारभार करीत असतां तो नेपथ्यांत कोलाहल होतां हे काय म्हणून वर्तमान घेतां दाई येते पाहा.

दरू : राग गौळिळपंतू ।। ताल शापू ।।

दाई येतसे आतां ।। हे पहा ।।
प. ।। दाई येत आहे ।। कैसी म्हातारी ।।
डोई हलवितकीं ।। तटवचि ।। ठाओं ठाओ हलूकीं ।।
टेंकित काठी ।। घाईही करित निकी ।।
बाणा पासीं पांओ फेंगडी नेटकी ।। हे पहा ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती दाई येतां अंतःपुरीं का आर्भाट केला म्हणून कुभांडाने पुसतां उषेचें वर्तमान ते सांगते पाहा.

दाई : चौथा ऐसीं लक्षयोनींत ज्याज्या ।।
आहेती व्यक्ती हे दैत्या राज्या ।।
येकीचाहीं त्या मध्ये रीघनाही ।।
कन्या सद्मी तूझिया सर्वथा हीं ।। १ ।।

दरू : राग फरजु ।। ताल शापू ।।

काय सांगू तुज ताता ।। हा बाईकोचा अति ।।
साहस आतां ।।
प. ।। नसिरे जया स्थलीं वारा ।। तेथें नवरा आणूनि उधारा ।।
मिलुनि त्यासीं उषाईनें सारा ।। काल ।।
हांसत खेलत लोटिला वीरा ।। १ ।।
चित्रलेखा मोटी लुच्ची ।। तेणें ची उषा भोंविली कच्ची ।।
करीं निस्रपते अंधीपच्ची ।। ताडीं ।।
सूतेंहीं मुसवयाताणुनी गच्ची ।।

वाक्य : म्याहीं वरीचा वरी उषा काय करिते म्हणून विचारितां तीणें सखी कडून वंचना कीजेली ते ऐक.

(श्लोक) पूजा करीत बैसली सदनी उषा हे ।।
तूं जाउनी निरखि गोष्टि नव्हे मृषा हे ।।
लालूनि भूलि मजला असि दैत्य राजा केली तिणें सतत मन्मथ देव पूजा ।।

**वाक्य :** येणेरिती कित्येक दिवस लोटिल्यानंतर गर्भ धारणा होतां ते चिन्ह कलून म्या पुसतां उषेनें बाबलावणी केली तो प्रकार हीं सांगते ऐका ।।

(श्लोक) कांवो तुझें उदर हें फुगलें गाई ।।
नाहो तुवां मिलविला वद काय बाई ।।

**वाक्य :** या प्रमाणे म्या पुसतां उषेनें मला भोदिलें तोहीं प्रकार ऐका ।।

(श्लोक) वातोत्तर त्वमजला सखि प्राप्त झालें ।।
शातोदरत्व म्हणवूनि समस्त गेलें ।।

**वाक्य :** येकूण हा वायुगोला पोटांत वाहडला आहे च्यारि पांच महिने होतांच मोकळा होईल ।। ऐसें तिणें समाधान करितां माझ्या मनांत संदेह वाटून हे छिद्र पाडायास्तव सिद्ध होतें तों येक दिवसीं चित्रलेखेसीं उषा बोलत असतां खांबा आड असून सविस्तर वर्तमान ऐकिलें तोहीं प्रकार सांगतें परिसावें.
सीस पद्य ।। चित्रलेखे जगीं ।। चतुर होसी तुझें ।।
चित्र सामर्थ्य तें उण वेना ।। आणिला साहसे प्राण नाहोमनें ।।
आणिकाचेनहें ।। आकलेना ।। भ्रामिका ते कला ।।
तामसी देउनी ।। हामसीं रतविला हे कलेना मात सर्वात्मना ।।
तात मातेसहीं ।। नातरीं माझिया नाश प्राण ।।
गंड हें वारल्यां ।। घोर मोटें ।। चंडागर्भाख्यितें ।।
येक खोटें ।। काल कंठीन मीं कांमरंगें ।।
नीलकांताचि या नित्य संगे ।। १ ।।

**वाक्य :** या प्रमाणें तिचें वाक्य ऐकतांचे ।। मी बंकांत धावून आलें ।। चित्रलेखेनें उषेस दुर्बुद्धि सिकवून ।। हा अनर्थ केला इत:पर उचित कार्य करायास प्रभू समर्थ आंहां ।।

**सूत्रधार :** ऐसें बोलून दाई जातांच बाणासुरानें स्वमाय बलें तामसी विद्या विध्वंसून चारा कडून समाचार आणवीलां दाईच्या गोष्टीस ताळा पडतां ब्रंमांड कोपे भरून कुंभाडादिक सरदारास विलोकून बाणासुर बोलतो पाहा.

दरू : कन्नड राग ।। ताल शापू ।।

उगलें कां बैसले आंहां ।। वदन पाहत ।।
प. ।। अवघे जावूनि करा ।। आतांचि तो हत ।।
अनु. प. ।। जुडुनि कन्येसीं ।। गूढपणें नीचें ।।
बुडविलें कुल ।। प्रौढ दानवाचें ।।
मूढमती जो कां ।। हूडलोकागला ।।
तोडूं तयाचिया ।। दाढा ।। उठाचला ।। १ ।।

(श्लोक) उषा हे उभी चत्वरेनें चिरा हो ।।
बलें भीतरीं क्षारही तो भरा हो असी घेउनि काय कीजे कुपुत्री ।।
कुलघ्नीं सदरातली जे कुपात्रीं ।।

सूत्रधार : येणेरिती बाणासुराचें वाक्य ऐकून कुंभांड बोलतो पाहा.

(श्लोक) बलीचा तूं ज्येष्ठात्मज दनुजराणा तवपुरा ।।
बलिष्ठा रक्षितो पुरहर असा भावहि पुरा ।।
कलनी जोगाजी सदनि बसला भोगित उषा ।।
दलाचे हातीं तो हत घडल हें तो मतमृषा ।। १ ।।

दरू : राग यमुना कल्याणी ।। ताल शापू ।।

हांजि कवेनासैनिका ।। असहायहि झाल्यां पै निका ।।
प. ।। माजिया जगिं सदृश्य ज्यांनाहि ।। माझि या दिष्टी दैत्यतिलका ।।
अनु. प. ।। गगन तुटुनिहि मस्तकीं जरि ।। अगदि पडलियानें ।।
स्वकरें ।। चिखरें ।। ते सगट धरिल ।।
प्रबल यापरि ।। अगर धैर्यानि गद्रि तो मी ।। १ ।।
सकल कलुनिहि येथिल स्थिति ।।
प्रगट आमुचि हि न धरीं उदरीं ।। जो विकलताकीं ।।
अडुहिते पण ।। वीर मंडन मदंगाजी ।। २ ।।

वाक्य : तरी सकल संनाहासीं ।। स्वामीनी त्या वंचकासी ।। जुंझ केल्यानें ।।
जयापजय ईश्वराधीन ।।

सूत्रधार : येणेरिती प्रधानाचे वाक्य ऐकून बाणासुर आपण युद्धार्थ सिद्ध होतां तें वर्तमान अंतःपुर चर दूती मुखीं ऐकून अनिरुध्दासहित उषा येते पाहा.

दरू : राग घंटारव ।। आदिताल ।।

तो रतिसुत दैतेसहसुरूचिर ।। कांति पुंजि येतो ।।
आधार बलास उदार रूप सुख ।। सारसी मजो तो ।। १ ।।
हरिखें भरूनी मनि धरूनि कर ।। तरूणी ललनेचा ।।
हा सरसीरूहनिभसरसे क्षण गुण ।। बारिरासि सांचा ।। २ ।।

सूत्रधार : येणेरिती उभयता आल्यानंतर अनिरुध्दास विलोकून उषा कष्टी होवून बोलते पाहा.

दरू : राग यरूकल कांबोदी ।। झंपे ताल ।।

प्राणनाथा अहो प्राणनाथा ।।
प. ।। प्राणपती वेल कशी ।। जाणें आली आतां ।।
अनु. प. ।। तातसदनी सुखी ।। होतासी बहु दिवस की ।।
वातार्थ सविलास ।। गमत आण विलास ।।
हा तंव बोलविर ।। हातपावरि थोर ।।
घातली मज भूली ।। पातक्यानें भली ।। १ ।।

**सूत्रधार** : कृपण विलपतां ते यापरी दीनवाणी ।।
**(श्लोक)** अपरिमित निघाले लोचनीहूनि पाणी ।।
न परि मनिविराला वीर तो कामिनीचे ।।
उपरि पुसुनि डोले शौर्य बोले स्ववाचे ।। १ ।।

**अनिरुद्ध** : बाणी माझी बाणली तेन वाणी ।।
बाणी व्योमा बूजितों शीघ्र आणी ।।
आणीतों या तारका भूमि कोणी ।।
कोणी राहीनामदग्रीं टिकोनी ।।
**(छंद)** न मज भेटला वीर दुसरा ।।
समज या असा बाण सासरा रमणि वाक्य हें बोलल स्वयें ।।
समरिं मी तसा भीडतों सये ।। १ ।।

**दरू** : पूर्व कल्याणी ।। ताल शापू ।।
कोमलांगी प्रिये ।। भीवूं नको कोमळांगी प्रिये ।।
प. ।। सोमनि भानने ।। समरीं जिकितां मजा । तो मही वरी नये ।।
अनु प. ।। घातला जसा तुझा ।। तातजनक हरीनें ।।
पातालातलीं सजणी ।। तेणें परी ।।
हातवस सख्या झणी ।। विक्रमें अकस्मात ढकलितों
मात गणि साचहे ।। १ ।।
मांडलियां थोर ।। भांडण दनुजासीं ।।
मांडवविशिखाचा हा ।। लालूनियां ।।
कांडोरीं करितों पाहा ।। तनुची जसी ।।
कांडोरली सुरिनें ।। खांडि जे तसी स्वये ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीति उषेला समाधान करून अंतः पुरांत वाटे लावून अनिरुध्द बाणा सुरासीं युद्धार्थ गेल्यानंतर चित्रलेखा कुंभांड सुता येकी माघें येक येताहेत पाहा ।।

**दरू** : राग सौराष्ट्र ।। ताल शापू ।।
बेगल्याले बुद्धि ।। योगें करूं कार्य ।।
भागत्यग येकीं मागूनिया येकी ।।
मानवती अति ।। लाग वेगें ।। १ ।।
चित्रलेखा आणि ।। पुत्री कुंभांडाची चित्रवेषा ।।
चारू गात्री अल्या दीर्घ ।। नेत्री पहा दिव्य वस्त्र भूषा ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेरीति दोघी जणी आल्यानंतर चित्रलेखेनें कुंभांड कन्येस कोठें जातेस म्हणूनि प्रश्न करितां ।। अनिरुद्र बाणासुराचा युद्र वृत्तांत उषेला सांगायास जातें म्हणून प्रधान कन्येनें प्रत्युत्तर समर्पितां तिला कुंभांड कन्येनें तूं कोष्ठें जातेस म्हणून चित्रलेखेस विचारतां मजमुळें म्हणा इतुका अनर्थ झाला तरी नारदाच्या मुखांतरें अनिरुध्दाचा समाचार कृष्ण स्वामीस सांगायास जातें ऐसें चित्रलेखेनें सांगतां दोघी जणी स्वस्व कार्य साधायास गेल्यानंतर श्री कृष्णदेवसात्यकी प्रद्युम्नादिवीरा सगट निज सभेस येतो पाहा ।।

दरू : राग भैरवी ।। आदिताल ।।

तो येतसे अतसी कुसुम प्रतिम वर्ण हरिहा पहा ।।
प० ।। जोतिमिर अज्ञान मय हरि ।। ज्योति आद्य वेद्य वेद माथां ।।
रीत राग ध्येय सज्जन गीत नामधेय हा अहोतो ।।
अनुप. ।। इंदु बिंब निभ दिव्य मुखी मृदु ।। मंद हास साजे ।।
देखुनि सिंधु सखाचा प्रेमळ मानस मंदिरांत माजे ।।
अरविंद नाम भजतां ।। भवबंध जो निवारी ।।
नित्य सनंदनादि वंद्यारण सरसिज च इंदिरा हृदय पम्द विहारी ।। १ ।।

सूत्रधार : येणें रिती श्री कृष्ण देव येवून सभेंत बस्तांच दौवारिक येवून वर्तमान सांगतो पाहा ।।

(छंद) मुरहरा तुझ्या पौत्र चौरूनी ।। परिस कोण कीं नीट घेऊनी ।।
त्वरित निष्टला यामिनीतगा ।। घरिहि या परि जाहला दगा ।।

सूत्रधार : येणे रिती दौवारिकाचें वाक्य ऐकून श्रीकृष्णानें जासूदास अनिरुद्धास हुडकाया कारणें पाठवितां त्यानी छप्पन देश हुडकून येवून कोठेंही अनिरुद्धाचा लाग लागत नाहीं म्हणून सांगतां बहुत्येक त्याच्या चांगुलपणास भुलून येखाद्या दुष्ट स्त्रीनें उडविलें असेल यास संधह नाहीं ऐसे कृष्ण स्वमीन बोलून त्रैलोक्यी संचरणार कलह प्रिय आल्यानें अनिरुद्धाचे ठावठिकाण नीट कलेल ऐसें चिंतितां नारद येतो पाहा ।।

दरू : राग पुन्नागवराली ।। आदिताल ।।

मुनि ।। नारद येतो विशारद भजनी जो ।।
आगला गाव चांगला ।। १ ।। वल्लकि वाजवि वल्लवि मोहन ।
वल्ल भास्तवि ।। दुर्लभा ।।

सूत्रधार : येणे रिती नारद येवून चिंताक्रांत कृष्णास विलोकून बोलतो पाहा ।।

(छंद) अजि दयाघना अब्धि जावरा ।। निजसुखां बुधे नित्य निर्जरा ।।
तुज किमर्थ हे खिन्नता अलिगुज समस्त तें बोलिजे बली ।।

सूत्रधार : येणे रिती नारदानें पुसतां अनिरुद्धास कोणकीं रात्री नेल्या मुलें हा खेद प्राप्त झाला तरी आपणास कोठेंतरीं त्याचें वर्तमान कलें असलियानें तें सांगून श्रवणानंदकरावा ऐसें श्रीकृष्णानें म्हणतां देवीनें उषेस वर दिला त्या पासून चित्रलेखेचें चरित्र अनिरुद्ध उषेचें संधान गर्भा धान बाणा सुराचें युद्ध इत्यादिक सांगून सध्या नागपाश बद्र शोणित पुरीं प्रद्युम्न कुमार आहे देवीच्या दयेनें त्याला प्राणांत उपद्रव होईन सारिखा क्षेम आहे हे ऐकतांच प्रद्युम्न संमतीनें सात्यकी आवेशाने बोलतो पाहा ।।

(श्लोक) जसे श्री जामदग्नें दश शत करहीं कार्तवीर्यर्जुनाचें ।।
वीरोतंसें बलानें अखिल परशूनें छेदिले दुर्जनाचें ।।
तैसे बाणासुराचे त्वरित निजशरीं खंडितो चंडबाहू ।।
साक्षी होवूनि लक्षो सकल कुतुक हें कृष्णा जी ज्येष्ठ भावू ।। १ ।।

उडउन दनुज्यांची उत्तमांगें शरानी ।।
भरित नगर त्याच्या शोणिताच्या पुरानि ।। त्वरित करिन आता सत्यनामा पुरी हें ।। निरखुनि जन माझी संगरीचा तुरी हे ।। २ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सात्विकीनें आर्भाट करितां श्री कृष्णा बोलतो पाहा ।।

**(छंद)** वचन जें तुवां सात्वीकी ।। उचित तें घडूंयेच सत्यकीं ।।
सुचरीता परीं बाधक स्वयें ।। प्रचूर येक पैं त्याप्रती अहे ।।

**वाक्य :** ते बाधक काय म्हणसील तर सांगतों ऐक ।।

**(श्लोक)** ब्रम्हांडाचीं अमित शतकें भालनेत्राग्नि जाळीं ।।
जाळी जो कां पुरारी पळहि न लगतां घो कल्पांत कालीं ।।
कालाग्नी बाजयाची गिळुनी विषम हा जाहली तो कपाली ।।
पाली बाणासुराचें पुर अजयजगीं सर्व या लोकपालीं ।।

**वाक्य :** ऐसें असतां त्याजवरी यादवाचें सामर्थ्य चालेना परश्वरासी मला भेद असल्यानें म्हणें या कलह कार्यी प्रवर्त्तूये ।। अम्ही दोघें हीं येक तत्व तेंच सांगतों ऐक ।।

राग गौली पंतू ।। ताल शापू ।।
दोघेहीं येक पहां ।। तसें अम्ही ।।
प. ।। गंगेचे जशे ।। बोध अभिन्नकीं ।। चांग येकासि सह ।। १ ।।
मछादिक जसे ।। स्वछ येकात्मक ।। निश्चित रूपें दहा ।। २ ।।
भेद भ्रमाउ छेदूनि या परी ।। अव्दैत पंथीच राहा ।। ३ ।।

**वाक्य :** तूं म्हणसील दोघांस ऐक्य असलियांनें परमेश्वरानें बाणासुरा कडून अनिरुध्दास कां उपद्रव करविला तरीं स्या निज दर्शनार्थ यावें या अभिपौयानें महा देवें हा उपाय रचिला यास दृष्टांत सांगतों ऐक ।।

**(श्लोक)** जैसी नारायणानें दरशनि घरुनि माझि या पैं अपेक्षा ।।
नेलीं विप्रा र्भकें तें उपजत अपुल्या सन्निधीं शीघ्र दक्षा ।।
भेटी साटींच माझ्या मदन मदहरें तेविगानाग पासीं ।।
केला बद्धस्मराचा तनय गुज भलें बोलिलों तूजपासीं ।।

**सूत्रधार :** येणेरीती सातिकीचें समाधान करून नारदास श्रीकृष्ण स्वामींनी आज्ञापिलें जें परमेश्वराचा दर्शनास आलों हें वर्तमान उषेला शीघ्र सांगे हें वाक्य ऐकून नारद निघतां प्रयाणार्थ कृष्ण स्वामी उद्युक्त झाल्यानंतर अनिरुध्द बाणासुरासीं युद्धार्थ गेला तें वर्तमान कलाया कारणें सखींसीं चिंताक्रांत उषा येते पहा ।।

दरू : राग ।। असावेरी ।। आदिताल ।।
श्रीमतितसे दैभूमिप् नंयिये त्वनी ।। पहा हे ।।

**सूत्रधार :** येणे रिती उषा आल्यानंतर तू कां चिंताक्रांत आहेस म्हणून सखीनें पुसतां युद्धाचा समाचार आणावया कारणें कुंभांड कन्येस पाठविलें अद्यापि ते आली नाही यास्तव खिन्न आहें म्हणुन उषेनें संवदतां कुंभांड कन्या येतसें पाहा ।।

दरू : कुमारी येतसे पाहा ।।

सूत्रधार : येणे रिती प्रधान कन्या आल्यानंतर तिला उषेनें युद्ध वृत्तांत विचारितां अनिरुद्धाचा पराक्रम ते सांगते पहा ।।

(श्लोक) स्वर्ण वर्ण तुझ्या वर्णनीयये प्रियें ।।
चूर्ण जों लाविजें वर्ण पाठीं सये ।।
चूर्ण तिक्यांत ते तूर्ण केल्ये अरी ।।
पूर्ण झाली शवा कीर्ण भूहे बरी ।। १ ।।
पंकजाक्षी पलें पंकिया शोणिती ।।
संकला हे सहातंक होतां क्षिती ।।
शंख कंठि सुनिः शंख चित्तें भलें ।।
कंक गृध्रादित्या संकटीं पावले ।।
श्रूर होतां शरें चूरचूर त्वरे ।। क्रूरतछो णितें पूर आले बरें ।।
भीरू देखुनि तें दूर पैं निष्टनें ।।
थोर बाणादितेथारूनी तिष्ठले ।। ३ ।।
वाक्षाया परि माडितां स्मर सुतें शाखोपशाखासये ।।
या खालें तवा नव्हें म्हणवुनीयां खांसखांसे स्वयें ।।
लाखाचे सरदारहीं निसटले वाखाणितत्वश्रिया ।।
राखा जीव असे कित्येक वदले उभारूनियां ।। ४ ।।

वाक्य : येणे रिती सैन्य एकंदर मोडिल्यानंतर बाणासुराव्यानें धर्मयुद्धानें निर्वाहा होईना सारिखा करून मायेनें जिंकून अनिरुद्धास नागलेविलें ।।

सूत्रधार : येणे रिती कुंभांड कन्येचें वाक्य ऐकून उषा कष्टी होऊन बोलते पाहा ।।

दरू : राग नीलांबरी ।। आदिताल ।।

नाथली करू मी काई ।। आतां ।।
प० ।। बलि पुत्ता करीं ।। बली हे वोपिली ।।
बलियारे तुझीं पाहीं ।। जनक करावरी ।।
धनवीज पडोत्या हणिलें विशिखीं ज्यांहीं ।। २ ।।
भासुर वदना ।। भासती तुजवीण ।।
श्यासुर आशादाहीं ।। ३ ।।
प्राणसख्या निज प्राणनेठवीं ।। जाण इतःपरी कांहीं ।।

सूत्रधार : येणे रिती उषा कष्टी होतां कुंभांड कन्या बोलते पाहा ।।

दरू : राग देवगांधारी ।। ताल झापू ।।

सांडि सखि ये शोक ।। सर्व दूर ।।
प० ।। जननि अजेस सप्राची ।। फणिपशेज म्हणुनी ।।
भिउनि तया भुजगनया ।। शिवति प्रियारदनी ।। १ ।।
गरूड तुरगरतरि हरिचा ।। धरूनि भयही त्याचें ।।
अहित तुझ्या अयिपतिचें ।। अहिन करिति साचें ।। २ ।।

चापधरहि सांपडला ।। अपण नागपासीं ।।
दैव गती केंवि सुटेल ।। हे वद आणिकासीं ।। ३ ।।
वर नव्हेचि गिरीजेचा ।। तरूणि मृषा कधिहीं ।।
रमसि पतिसीं अमणि सुखें ।। कुमर कुमारिसीं हिं ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणेरिती कुंभांड कन्येचे वाक्य ऐकून उषा बोलते पाहा ।।

**(श्लोक)** खुपति जडित वस्त्राही शरीरा जयासी ।।
रूपति सुमन माला माझिया राजयासी ।।
भुजंगि तनुस अैश्या घातले घट्टि वेढे ।।
अझुणि परिसुनी हें वांचणें काय वेडे ।। १ ।।
स्तन रूततिल माझे ते कठोर प्रियासीं ।।
म्हणुनि सखिन केलें म्या दृढलिंगनासीं ।।
मृदुतनुस अश्याहीं विधिता बाणभाली ।।
सुदति कणव कैंसी सासद्रालान घाली ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणेरिती उषा कष्टी होता तिला विलोकून कुंभांड कन्या बोलिली जें चित्रलेखा कृष्णस्वामीस वर्तमान सांगावयास गेली आहे त्याचें ही येणें आता होईल देवीच्या दयेनें तुझ्या पाणवल्लभास प्राण भय नाहीं असें संवदातांच तुरंग सल श्रीकृष्ण स्वामी येताहेत पहा.

**दरू :** राग व्यागडा ।। आदिताल ।।

मुरारि येतो मदन मनोहर ।। सुखरांचित हा ।।
प. ।। पुरारि भेटिस परिवारासह ।। वारि जनिभ मुख वंद्य जगिं महा ।।
अनुप. ।। दिल्हा दुर्लभ पश्चुपां निज सुख ।।
डल्ला बहु जायहुतिलकें आणि फुल्लांबुज
वलोचन व्रज वधु वल्लभ दिव्य गुणी ।।
डल्लासुनि सल्लापें श्रीहृत्कल्हारा आह्लादुनि अनुदिनि ।।
खिल्लारी नंदाचा स्मरतां ।। उल्लंघ विभव जलधि अगाध ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्री कृष्णानें येवून नीलकंठाचे भेटीची उत्कंष्टा धरितां तों येका येकीचें कोटि सूर्य उगवल्या प्रमाणे शुभ्र प्रकाश फांकतां गोविंद आप आपणांत बोलतो पाहा.

**(श्लोक)** चूडोनं सकला निधी निज कला भासें दिशा प्रांजला ।।
जाल्या या उजला पहा झलझलाधां तौधवि धंसला ।।
माथा गांगतरंगसंगत हलूहिसाहि वारा आला ।।
वाटे कीं श्रुति मस्तक स्तुत शिव प्रस्तुत हा पावला ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्ण देव बोलत असतां परमेश्वर येतो पाहा ।।

**दरू :** राग सुरटी ।। आदिताल ।।

देवादि देव तो येतो शंकर पाहा ।। श्रीवारि भव चूड हा ।
कैंवार घेणार सतत जो स्वसुखाचा शुवनाधीश्वर श्री मदोषा पाहा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती परमेश्वर आल्यानंतर त्यास विलोकून श्रीकृष्ण बोलताहेत पाहा ।।

(श्लोक) प्रालेयाचलनंदिनी प्रिय मानीलोल्ल सत्कंधरा ।।
धाले नेत्रचकोर देखुनी मुखां भोजा तुझ्या सुंदरा ।।
जाले पुण्य तरू समस्त सफल प्रोत्तुंग गंगाधरा ।।
हालेखीं धन लाध संगति गुणें या भक्तहृन्मंदिरा ।। १ ।।
जगन्मूल तूं शूलपाणीं पुरारी ।। त्वदुम्दतमी भूतनाथा मुरारी ।।
सुदृन्मंगला अंजगजांग प्रनाशा झणी भेटिची पूर्ण झाली घनाशा ।।

दरू : राग भैरवी ।। आदिताल ।।

शंभो वंदितो कृपां ।। भोथे तुतें सदा ।।
प. ।। मां भोपालय विधिदं ।। भोलि घरतुत पवा
अनुप. ।। ध्येय तूं भक्ताचें भाग ।। ध्येय तूं पावनें नाम ।।
ध्येय तूं मच्चित्तानुसंध्येय तूं ।। दूरी कृत संदेह तूं ।।
शर्वाणीसीविध्ये तूं निःसंग अप्रमेय तूं ।।
नारद मुनि ।। गेय गुण वज्र ।। गेहपरि हरी ।।
हेय वासना हेयति मेय ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती श्रीकृष्णाचें वाक्य ऐकून परमेश्वर बोलताहेत पहा ।।

दरू : राग फरजू ।। तालशापू ।।

तुज मज भेद नसे ।। यादवेंद्रहिरा ।।
गोविंद निजानंदकंद ।। मंद रोद्धारा ।। १ ।।
शामला तुझें दिव्य नाम वृंदजे ।।
कीं मदीय्यतेंच समज ।। स्वमनिचें गुज ।। २ ।।
भजनिरत तुझ्या जो किं ।। अजि चतुर्भुजा ।।
भजक गणीं अग्रणि गणि ।। त्या जगत्सृजा ।। ३ ।।

(श्लोक) नामानितव गोविंद ।। यानि लोके महांतिचे
तान्येवममना मानि ।। नात्र कार्या विचारणा ।। १ ।।
त्वद्रुपासा जगन्नाथ ।। सैवास्तुममगोपते ।।
आवथोरंतरं नास्ती ।। शब्दैर थैर्जगत्पते ।। २ ।।

(दरू) शब्दता तथा ऐक। शुद्ध अर्थता शोधुनि
वेदांत सकल ।। सतत पाहतां ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रितीं परमेश्वरानीं श्री कृष्णासीं संवादन। नारदास खुणावितां तो बोलतो पाहा ।।

(छंद) यदुकुलोत्तमा बाण नंदिनी ।। मदन संवभा द्यावया गुणी ।।
हृदयि इच्छितो पार्वती पती ।। वदनिजाज्ञ्या सूथै सीघ्र श्रीपती ।।

वाक्य : जऱ्ही गांधर्व विधीनें अनिरुध्दने उषेचे पाणिग्रहण केले आहे ।। जऱ्ही गांधर्व विधीनें ऐसे परमेश्वराचें मनी तऱ्ही च्यारी दिवस सोहले लोकाप्रमाणे करावे ।।

आहे म्हणुन नारदानें सांगता श्रीकृष्णानें इश्वराज्ञा प्रमाण ऐसें बोलून अनिरुद्धाचें स्मरण करितां गरुडाच्या प्रभावाने नागपाश मुक्त घडून उषेसह वर्तमान खुशाल मदन कुमार हरिहर दर्शनार्थ येतो पाहा.

(दरू) तो रति सुतदईतसह सुरूचिर ।।

**सूत्रधार :** येणेरिती उषेसीं अनिरुद्ध आल्यानंतर परमेश्वरानी बाणसुराचें स्मरण करितां प्रधानासहित तो येतो पाहा.

: बाणदानव येतो पाहा.

**सूत्रधार :** येणेरिती बाणसुर आल्यानंतर श्रीकृष्णास विलोकून परमेश्वर बोलताहेत पाहा.

(श्लोक) अधिक दोष हरोनि सुदर्शनें ।।
आपुलि या अजितांसुरहर्षणें ।।
दिधलि पावन पुरुष त्व्यता ।।
बलिसुता मम वाक्य न मोडितां ।। १ ।।
येणे झाली फार चित्तासि तुष्टि ।।
माझ्या देवा लाभसी शौर्य पुष्टी ।।
होसीं सर्वा तूं अजिक स्वभावें ।।
आता कृष्णायावराच्या प्रभावे ।। २ ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीकृष्ण परमेश्वराचा संवाद होत असतां बाणासुर येवुन प्रणाम करून या उभयताच्या आज्ञेवरून उषेला अनिरुद्धास समर्पावें ऐसें निर्धारून जोश्यास बलाविता तो येतो पाहा.

(दरू) : राग काफी ।। आदिताल ।।

हाती पंचांग घेवून माहतारा फार लवून ।।
टेकित काटी सभेला शंकर जोशी तो आला ।। १ ।।

**सूत्रधार :** येणरिती जोसी आल्यानंतर मुहूर्त पाहून बाणासुराने विधुक्त कन्या रत्न अनिरुद्धास अर्पिता संतोषानें हरिहरानीं बाणासुरास अभीष्ट वर माघ म्हणतां तो बोलतो पाहा.

(श्लोक) धर्मिष्ठांसि कदा बिपति न लगो स्वप्नांतही येकदा ।।
लाभो नित्य सदाशिव प्रभुदयेसद्बोध लोकां तथा ।।
श्रीमद्रामपदारविंद युगलिं कल्याण भाग्य प्रदा ।।
जोडो भक्ती उदार ते अनुदिनी स्वानंद राज्यास्पदा ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती बाणासुराने प्रार्थिता त्याचे मनोरथ पूर्ण करून अनिरुद्ध उषेसीं हरिहरादिक नित्यानंद मंदिरास आले पाहा.

दरू : राग शुद्ध सावेरी ।। आदिताल ।।

नित्यानंद मंदिरासी ।। सत्यानंत सुखरासी ।।
हरिहर प्रमुख महा परिवारें आलो पाहा ।। १ ।।

(श्लोक) श्रीमालोजि नरेंद्र नंदन भलाशाहेंद्रनामाथिला ।।
पुण्यश्लोक म्हणुनि लोक निगदि ज्याला प्रपंचातिला ।।
त्याचा पुत्रकसच्चरित्र जगती येकेंद्र भाग्या गला ।।
त्यापासूनि शिवस्वरूप तुजला राजेंद्र जो जन्मला ।। १ ।।
प्रतापसिंहेंद्र कुमार त्याचा ।। जो अंसी श्रीविष्णु
गजत्पीया चा उमासतीची सुकृतैकरासी कल्पद्रु ज्याच्या
तनुलेकरासी ।। २ ।। जो कां त्रिवर्ण गुरूसी अपरूप कासी ।।
आधार थोर अजि आत्म निरुपकासी तेणे उषापरिणयाख्यसुरूपकासी ।।
केलें पहा निरूप माम्दुतरूपकासी ।।

इति उषापरिणयाख्य नाटकं संपूर्ण ।।

---

## १७. ।। लक्ष्मणा परिणय नाटक ।।

श्रीराम कर्ता ।। तोड यं ।। सरसिज भवनुत पदकंज भासुर ।। पुरहर वरशरधी खंडोणो दार ।। निरूपम निरवधि गुणासिंधु गंभीर ।। सुरलोक सार स्मर शत शत विजित सुंदराकार अरिकुळ गिरिपविजो भव्य सुखकर परम पुरुष अनुपम कंबुकंधर तरणि कुलहरि ।। १ ।। अतुळिक गुण गण संदोह आगळा शतमख मुख सुरवर वंद्य जो भला अतिशय अभिनव तर मूति सावळा सीताभि लोला सतत शरण जनवर तरण सुलीला वितत विलसित हिम करार्ध सुफाला जितदश वदन कुमति विदळित ज्याला कांत शून्न-शीला ।। २ ।।

मंगळ ।। राग परज ।। आदि मंगळं भूजाधवाय मंगळं ।। प ।। शरणागत रक्षणाय ।। शरदिं दुबिंब वदनाय अरविंद दळ लोचनाय पुरंदर वंदिताय ।। १ ।। भय भय हरणाय भानुवंशा भूषणाय ।। भासुर प्रभावाय भक्त जन पोषणाय ।। २ ।। विविधावताराय विभिषण रक्षकाय ।। वालीदर्पशमनाय विरिंचादि सन्नुताय ।। ३ ।। श्रीराम कर्ता नाट्यारंभ करून लक्ष्मणादेवी कल्याण कोरवंजी नामक रूप रूपक सुकवि विरचित या रंगभूमित नाट्य करितों या करितां सकळ सभ्यास आनंद व्हावया कारणें कवि इष्ट देवतेची प्रार्थना करितो पाहा ।।

**(श्लोक)** ज्याला स्तवी निर्जर पंक्तिसारी ।। जो चिंतिता पातक दूरसारी ।। ज्याची दया विघ्नदमाविदारी ।। वंदू तया पूजित तो उदारी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणेरिती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर भारतीची स्तुति करितो पाहा ।।

**(श्लोक)** जे सर्वनारीत महा प्रभावती । जीच्या कृपें ज्ञान कळा दुणावती । तैसीच चाले कवनीं सरस्वतीं । भावें नमू ते सदया सरस्वती ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती भारतीचे स्तवन केल्यानंतर सद्गुरुची प्रार्थना करीतो पाहा ।।

**(श्लोक)** जो ब्रम्हवित्तम शिरोमणी पुण्यराशी । रेक्ये वशी कृत सदामहि ज्यावराशी ।। अद्वैत बोध सुख सागर पूर्णसोमा । वंदू तया गुरुस जो धरि सेतुनामा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सद्गुरुची प्रार्थना केल्यानंतर हरिहराचें स्त्रोत्र करितो पाहा ।।

**(श्लोक)** पतगाधिप पुंगवासितो फणिशय्या रमणीय्य भूषणौ । धृत कौस्तुभ बाल-चंद्रकौ भजचेता मुरमार वैरिणौ ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणे रिती हरिहराची प्रार्थना केल्यानंतर येकदंताची प्रार्थना केलि असतां तो प्रत्यक्ष येतो पाहा ।।

**दरू :** मध्यामावति ।। आदिताळ ।।

गणपती येतो पाहा गुणसिंधु । हा मूषक वाहन ज्यासि तोषक भक्तां सुखराशी ।। १ ।।

वाक्य : विघ्नेश्वरें येऊनि सकल विघ्ने निवारणें केलीं कीं या प्रस्तुत कायसि तां इकडें यावें 'जी मीं हजीर अहें' पारिपार्श्वककोण या दिव्य ग्रंथाचा निर्माता ?

वाक्य : जो भोंसल वंशाब्धि चंद्र करूणा समुद्र तेणें हा ग्रंथ रचिला अरे त्याचा दिव्य प्रभाव सांगतो ऐका

(श्लोक) धैर्य मेरु समान वीर्यजलधी शौर्ये महेंद्रासरी। औदार्ये जणुं राजराज दुसरास त्योक्ति धर्मापरी। सौंदर्ये सुमसायकासदृश हा शंभू दयेनें पहा ।। तो जाणा नृपसिंह भोंसलमणी भूपाकृती राम हा ।। ५ ।।
प्रतापरामीं दृढ धक्ति ज्यासी। प्रतापसिंव्हेंद्र गुणैक रासी। तेणेंची या सुंदर नाटकासी। केलें पहा हो शुभ दायकासी ।।

वाक्य : अरे पारिपार्श्वका नाटकार्थ संग्रह श्लोक सांगतो ऐक ।।

(श्लोक) दीनालागि शरण्य जो तपजप ध्यानादिकीं पैं अती। नाना युक्तिस विवेचिल्यांहि न पवेनारायण श्रीपती ।। माना लक्षण दक्ष शास्त्र शकुनें कैंकाडिणीच्या मुखे। प्राणाचा पति लक्ष्मणेस घडला तो देव रक्षो सुखे ।। ७ ।।

वाक्य : अरे पारिपार्श्वका किन्निमित्त चंचल चित्त आहेस ?

सूत्रधार : या सभ्यानुरुप अपरूप रूपक नाचवायास सूचत नाहीं.
अरे विसरलास काय लक्ष्मणा परिणायाख्य नाटकास ? अरे पारिपार्श्वका ब्रम्हसेन कन्येच्या हृदयारविंदी जैसी श्रीमूर्ति बिंबली तैसी तूझी गोष्टी अंतः कर्णी बिंबली ऐसें संवदता लक्ष्मणा देवी येते म्हणून सम्यास सावध करायास दौव्वारिक येतो पाहा.

(वृत्त) सुनासिका सभेसि येते गुणावळी लक्ष्मणा जनासि जाणऊं असें मनि धरोनि भाव हा ।। कनकक्नक दंडही करि वळोनी साधारणें विनीत गुण कंचुकी वेगि येतसे तो पहा ।। १ ।।

दरू : राग सौराष्ट्र आदिताळ ।।

पंचू जो सर्व विषई हा ।। कंचूकी येतसे पाहा ।। प ।।
किटतानकथ्थैतथ्थैत धृकुडुत्थिमि किटतरि धृकुडुतत्धृ कुडुत न धिगिणतो असें आ ।। पासोडिची मांजी भारी पचंगी बांधूनी बरी पागोटे शोभवी शीरी धिमित त्थिभिछिमि तधिगिणतो असें ।। १ ।।

वाक्य : या परि कंचुकी येउन सभ्यास सावध केल्यानंतर श्रीलक्ष्मणादेवी येते पाहा ।। अधवल् ।। सुंदर मुख इचें इंदु तो पाहूनि मंदुनिसकळंक मग्नामानी स्वर ईचा ऐकता परभृत व्रातही झुरुनि काळेजले निरत पाहीं चतुर तेचि जन्म भूमिका हे बरि न तुकती नारीही ईच्या बरोबरी लोकनाथासि त्या चिंतित अंतरी लक्ष्मणा ते अली येथ शातोदरी,, ।। १ ।।

दरू : राग आहरी ।। आदिताळ ।।

कुंदसदृशरदना सुंदरी पृथुजघना इंदुबिंब वदना आनंद सदना येते लक्ष्मणा

अरविंद जय नयना मंदर प्रति मस्तना सुंदर ही गुणगणा मंद गमना येते लक्ष्मणा ।। १ ।। सौंदर्यजित रति औदार्य गुणवती ।। कंदकामल तेची छंदे सुदती येते लक्ष्मणा जे हो कंदर्प इषुधिनासा वृंदारक वर कांता वृंद पूजित जे कां नंदित नटना येते लक्ष्मणा ।।

दरू : राग तोडी ।। आदिताळ ।।

आली ते लक्ष्मणा गुणी उल्लास भरूनी ।। प ।। आळीची संगे पाळी अलिवेणी सुगुण शाली मद्दळताळविधें जति नाचत तत्धिमिताहत धींगिण तो असि ।। आ ।। सोम बिंबवदना शोभनांगी जे शामाकुंदा भरदना सीमातीत गुणि जे कां भामा शिरोमणि मन्मथ आगमसार प्रवीणा नाचत किटतक झें धळंगुतो असि ।। १ ।। मदन रतिहुनि सुंदरा रंजित कंबु कंठी शुकसी सुस्वरा वेदना जेविरहाची विरसभा विततेचि मदक्षकुंभीवर गमना नाचत तक्कुधिक्कुता तधिगिणतो असि ।। २ ।।

**सूत्रधार :** या परि लक्ष्मणा आल्यानंतर विरहातुर आप आपणांत कष्टी होते पहा ।।

(वृत्त) विरहताप न सोसिती विराम पाउनी मनीं विरसभावातिशयें तरळ भावें तळमळी तरूणीं मनीं खेद भावी चारूनेत्री सुकेशा तारूण्य मदभरानें स्मरासि निंदिते सुदती ।। १ ।।

---

# राजे शरभेन्द्र उर्फ सरफोजी (दुसरे) कृत नाटके

## राजे सरफोजी

राजा सरफोजी आपल्या साऱ्या नाटकांत आपली वंशावळ पुढील श्लोकांत देतात :—

शाहजी गाजी । तज्जातिघे संभाजी दुजा शिवाजी कनिष्ठ एकोजी ।
तत्सुत तुक्कोजी नृप तत्तनय श्री. प्रतापसिंह गुणी ।।
तत्सुत सद्गुणराशी श्री. तुलजेंद्र वीर भूपमणी ।।

प्रतापसिंह राजाचा पुत्र तुळजेंद्र ऊर्फ तुळजाजी गादीवर आला. तो निपुत्रिक असल्यामुळे त्याने आपल्या कुळातील म्हणजे बाबाजी राजाचे ज्येष्ठ पुत्र विठोजी त्यांच्या वंशातील आठवा पुरुष शरभेंद्र ऊर्फ शरफोजी वा सरफोजी ह्याला दत्तक घेतले. तुळजाजी मृत्यू पावला, त्यावेळी सरफोजी अल्पवयीन होता; म्हणून तुळजाजीने आपल्या अमरसिंह ह्या भावाला तो वयांत येईपर्यंत राज्यकारभार पाहण्याची विनंती केली; परंतु अमरसिंहाने सरफोजीचे दत्तकविधान रद्द करून घेण्याची खटपट केली. त्याचे हे प्रयत्न सरफोजीने आपले शिक्षक स्विस मिशनरी श्वार्झ ह्यांच्या मदतीने मोडून काढले व अधिकारग्रहण केले; परंतु प्रतापसिंहानंतर इंग्रजांचे हाती तंजावरचा बहुतांश कारभार गेलेला असल्यामुळे[1] मर्यादित रक्कम व अधिकार यांवर त्याला समाधान मानावे लागले.[2]

सरफोजीला विद्वत्तेचा व कलाप्रेमाचा वडिलोपार्जित वारसा मोठ्या प्रमाणात लाभला होता. त्याचे पौर्वात्य पद्धतीचे शिक्षण उत्तम झाले होते. शिवाय त्याचे शिक्षक मिशनरी श्वार्झ यांच्याकडून पाश्चात्य विद्या व वाङ्मय यांचे ज्ञान झाले होते. त्याला इंग्रजी भाषा चांगली अवगत होती. त्यामुळे त्याच्या व्यासंगाचे क्षेत्र विस्तारले. त्याला नृत्य, संगीत व नाटक यांची आवड, अभिज्ञता व निर्मितीक्षमता होती. त्यामुळे त्याने नृत्यानुकूल व संगीतानुकूल लिहिलेली पदे व नृत्ताचे बोल व स्वरसंहिता यांचा मोठा संग्रह सरस्वती महाल ग्रंथालयात आढळतो. त्यांनी स्वत: ग्रंथनिर्मिती केली व दुर्मिळ ग्रंथांचा व हस्तलिखितांचा फार मोठा संग्रह करून 'सरस्वती महाल' हे उत्तम प्रकारचे ग्रंथालय स्थापिले. दुर्मिळ ग्रंथ घेण्यासाठी त्यांनी खूप पैसा खर्च केला. त्यासंबंधी अनेक आख्यायिका लिहिल्या आहेत व सांगितल्या जातात. ज्ञानसंवर्धन व ज्ञानप्रसार हे त्यांच्या अनेक कृतीमागील हेतू होते.

**नाट्यलेखन.**—सरफोजीने लिहिलेल्या नाटकांची हस्तलिखिते सरस्वती महालमध्ये आहेत. त्यांतील फक्त 'देवेन्द्र-कोवंजी' हे नाटक मद्रास शासनाने मुद्रित केले

---

१ सरोजिनी शेंडे : मराठी नाटकांची नांदी–मराठी संशोधन पत्रिका, ऑक्टोबर १९६९ मराठी संशोधन–पत्रिका मुं. म. ग्रंथसंग्रहालय, मुंबई– १४

२ विनायक सदाशिव वाकसकर : तंजावरचे मराठे राजे, प्रका. दा. सा. यंदे, १९३३

आहे. त्या हस्तलिखितांत काही नाटके देवनागरी लिपीत तर काही तेलगू लिपीत आहेत.

(१) गणेशलीलार्णव
(२) श्रीगणेशविजय
(३) श्रीशिवरात्री उपाख्यान
(४) श्रीगंगा-विश्वेश्वर परिणय
(५) मीनाक्षी (परिणय) कल्याण (तेलगू)
(६) मोहिनी-महेश परिणय
(७) राधाकृष्ण विलास
(८) देवेन्द्र कोर्वंजी,

या साऱ्या नाटकांचा संकलित विचार करता असे आढळून येते की, सुभद्रा कल्याण हे नाटक सरफोजी राजांनी लिहिलेले नसून ते शाहराज यांचे आहे. त्याला तसा अंतर्गत पुरावा उपलब्ध आहे. बाकीच्या नाटकांतील 'श्री गंगा-विश्वेश्वर परिणय, 'मीनाक्षी कल्याण' व 'मोहिनी–महेश परिणय' ही तीन नाटके इतर राजांनी लिहिलेल्या कल्याण '(विवाह) नाटके' या परंपरेतील आहेत. 'देवेन्द्रकोर्वंजी' हे कोर्वंजी पद्धतीचे साऱ्या पृथ्वीची भौगोलिक माहिती देणारे नाटक आहे. कोर्वंजी नाटयप्रकाराचा अभिनव पद्धतीने केलेला हा उपयोग आहे. 'राधाकृष्ण विलास' या नाटकात संस्कृत, मराठी, तामिळ, गुजराथी व हिंदी या भाषांचा वापर संवादासाठी केला आहे.

'गणेशलीलार्णव' व 'श्रीगणेशविजय' ही गणपती या देवतेवरील नाटके आहेत त्यात पहिले म्हणजे 'गणेशलीलार्णव' हे नाटक गणेशपुराण, क्रीडाखंड, उत्तरा. उत्तरार्ध यातील कथेवर आधारित आहे, तर श्रीगणेशविजय हे 'गणेश विजय' या गणेशयोगीन्द्राचार्यांच्या १७९८ च्या सुमारास लिहिलेल्या ग्रंथाच्या आधारे (त्यातील सोळाव्या अध्यायातील एका कथेच्या आधारे) लिहिले आहे. भाद्रपदातील गणेशचतुर्थीला प्रयोग करण्यासाठी ही नाटके लिहिली, असा उल्लेख सूत्रधार सुरुवातीलाच करतो.

तंजावरच्या इतर राजांनी लिहिलेल्या नाटकांहून सरफोजी राजांची नाटके रचना, भाषा व काव्य या दृष्टीने पृथगात्म जाणवतात. त्यांच्या नाटयलेखनावर संस्कृत नाटकांचा अधिक खोलवर संस्कार जाणवतो. तंजावरी मराठी नाटके बव्हंशी एकांकी स्वरूपाची आहेत. प्रतापसिंहराजानी अनुवादित केलेले 'प्रबोध-चंद्रोदय' हे नाटक अनेक अंकांत विभागलेले आहे. सरफोजीराजांची सारीच नाटके दोन, चार व पाच अंकात रचलेली आढळतात. प्रत्येक अंकाच्या शेवटी आपली नाममुद्रा गुंफलेली असते. उदा. 'गणेशलीलार्णव' नाटकाच्या शेवटी 'इतिश्री भोसलकुलदुग्धसागर सुधाकर श्रीचंद्रमौलीश्वर प्रसादलब्ध चोळसिंहासन संतत्संतती राजाधिराज महाराज छत्रपती देवेंद्र श्रीशरभेन्द्र भूपाल विरचित श्रीगणेशलीलार्णव नाटके पंचमोंक: ।।' म्हटले आहे.

सुरुवातीला नांदी व शेवटी भरतवाक्य या संस्कृत नाटकाच्या वैशिष्टयांचाच नव्हे, तर नांदीनंतर पूर्वरंगाची जरी सारी बारा अंगे उपयोजिली नसली तरी त्यातील

बऱ्याच अंगांचा उपयोग तंजावरी नाटकांत आढळतो. नांदी म्हणून सूत्रधार बाजूला झाल्यावर रंगमंचावर स्थापक येई व त्रिगत, प्ररोचना आणि स्थापना तो सादर करी. त्यात नाटकाचा प्रस्ताव, प्रेक्षकांच्या रसिकतेला व गुणग्राहकतेला आवाहन, नाटककाराचा परिचय व नाटचवस्तूची सूचना या गोष्टींचा अंतर्भाव आढळतो. उदा. 'गंगाविश्वेश्वर परिणय' या नाटकात नांदी, इष्टदेवता चंद्रमौलीश्वराचे स्तवन झाल्यावर नाटचप्रस्ताव करणारा पुढील श्लोक आढळतो.

जो कैलास महीधरी गिरिसुतेसंगे सुखे राहिला ।
भोळा केवळ भक्तवश्य कमरव्यूही सदा पूजिला ।।
टाकी कोपुनी पार्वतीसहीं नसे ज्यासारखा की भला ।
श्रीगंगा गिरिजेसमेत शिव तो म्या मानसी पूजिला ।।

यातील पार्वतीपती विश्वेश्वर गंगेशी विवाह करणार आहे ही नाटचवस्तू सूचित केली आहे.

---

# १. गंगा विश्वेश्वर परिणय नाटक

'मुद्राराक्षस' या विशाखदत्त या नाटककाराच्या नाटकात पुढील नांदी आहे— ध्यन्या के यं स्थिता ते शिरसि शशिकला किन्तु नाम तदैस्या नामैवास्याः तदैव परिचितमपि ते विस्मृत कस्य हेतोः ।। नारिं पृच्छामि नेंदु कथयतु विजया न प्रमाणं यदि नैः देव्या निह्नोतुमिच्छोरिति सुरसरितं शाठ्यमोव्याब्दिभो वं:ग त्यात गंगेला शंकराच्या मस्तकावर पाहून पार्वती मत्सरग्रस्त रागाने विचारते, 'ती कोण' प्रश्न न समजल्यासारखे दाखवून शिव बुद्धयाच म्हणतो, "ती इंदुकला (चंद्र) तुला माझे म्हणणे खोटे वाटत असेल, तर तुझ्या मैत्रिणीला विचार' या श्लोकात भगीरथाच्या विनंतीवरून आपल्या जटेत शंकरांनी गंगेला स्थान दिले होते. इतरत्र तिचा उल्लेख सागरपत्नी असाच आढळतो. शहाजीराजांच्या गंगा-कावेरी संवार नाटकात कावेरी नदी गंगेचे नाव शिवाशी जोडले जाते, याचा उल्लेख करून तिला व्यभिचारिणी म्हणते. प्रस्तुत नाटकात शिवपार्वती आनंदाने वनविहार करीत असता, नारद मुनी त्यांच्यात मुद्दाम गैरसमज निर्माण करतो. पार्वती रागाने निघून जाते. शंकर तपाचरणास बसतो. गंगा शिवप्राप्तीसाठी आतुर असते परंतु शिव पार्वतीच्या अनुमतीशिवाय पाणिग्रहण करायला नकार देतो. पुन्हा नारद कपटनाटक करून पार्वतीची अनुज्ञा व तिच्या गळ्यात हार इनाम म्हणून आणतो. शिव गंगेशी विवाह करतो. पार्वती येते. दोघी सवती आनंदाने राहाण्याचा वर मागतात. असे हे तीन अंकी नाटक आहे.

स्फटिकशुभ्र शिवाच्या अंगावर आपलेच प्रतिबिंब आहे हे पार्वतीला उमगले नाही. तिचा गैरसमज तिच्या सख्यांनी आरशाचा उपयोग करून घालविला. यातील पार्वतीची विरहावस्था इतर नाटकांप्रमाणेच सांकेतिक शब्दांत वर्णिली आहे.

# गंगा विश्वेश्वर परिणय नाटक

॥ श्रीगणेशाय नमः ॥

॥ राग केदार ॥ झंपताळ ॥
जय बालशशिशेखर ॥ जय भूतिधूसर शरीर ॥
जय किरात वेषधर ॥ जय गिरीजा वर ॥ जय जय ॥
जय कध्र्तपिंगटाक्षर ॥ जय मृगविभूषित कर ॥
जय सूदित वनसूकरा ॥ जय विपिनचर ॥ जय जय ॥ १ ॥
जयरणविजित विजय ॥ जय प्रणत दत्तात्रय ॥
जय सुरमुनि गेय ॥ जय सर्वसदय ॥ जय जय ॥
जय गजचर्म वसन ॥ जय भुजंगम भूषण ॥
जय दुर्जयासुर दमन ॥ जय सज्जनावना ॥ जय जय ॥ २ ॥

॥ राग गौळ ॥ आदिताळ ॥
शरण शरण मणि कर्णिकालय ॥ शरण दीन जनाश्रया ॥ प. ॥
शरण भूति विभूषित काय ॥ शरणशाश्वतचिन्मय ॥ अ ॥
शरण शरण ॥ शरण शरण ललाट लोचन ॥
शरण काल निषूदन ॥ शरण भरव मूर्ति जनन ॥
शरण ईश निरंजन ॥ १ ॥ शरण शरण ॥

॥ राग केदार गौळा ॥ अटताळ ॥
गंगाधराय जय मंगळं ॥ प ॥ गौरी वराय शुभ मंगळं ॥
अ ॥ अंबर वास चिदवर निलपाय ॥ जय मंगळं ॥
शंबर निषूदन डंबर हरणाय ॥ शुभ मंगळं ॥ १ ॥
नंदी मुखावृत्त नंदित विषधाय ॥ जय मंगळं ॥
बंदो कृतासुर वंदित चरणाय ॥ शुभ मंगळं ॥ २ ॥
येणे रिती नाटयारंभ झालियानंतरे सूत्रधार गंगाविश्वेश्वर परिणयाभिधान नवीन नाटक नाचवून सभ्यांचे मन रंजवावया करितां आपले इष्ट दैवत सकल विघ्न परिहारक श्री विश्वेश्वराची प्रार्थना करितो परिसा

**(श्लोक)** विश्वेशालय मार्ग साधुनिवसेकाशीश जो रक्षिता ॥
ज्याचे केवल दर्शनें घडतसे पात्रेस संपूर्णता ॥
धुंडोनि भजकांस जो सतत ही इष्टार्थ 'दे लौकरी ॥
तो श्री धुंडि गणाधिनाथ विहरोमच्चित सद्मांतरी ॥ १ ॥
येणे रिती विघ्नेश्वराची प्रार्थना केलियानंतरे वाणीस वंदन करितो परिसा ॥

**(श्लोक)** जे चौकरीं पुस्तक बोध मुद्रा ॥ पाशांकुशा तें मिरवी दयार्द्रा ॥
तीचे कृपें वाक्य मुखें निघावें ॥ वाणीस म्या त्या नमिलें सुभावें ॥

सूत्रधार : येणे रिती वाणीस वंदन केलियानंतरे श्री गुरुस वंदन करितो परिसा

(आर्या) ज्याची विचित्र करितें नवल पहा जो गुरुस गुरु झाला।
शिष्यांस हीं गुरु करितो विमल ब्रम्ह गुरुनि या नमिला ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती गुरुस वंदन केलियानंतरें सूत्रधार नाटकार्थ संग्रह नांदी श्लोक युगळीं वदतो परिसा

(आर्या) जो मित्र धनवताचा रजताचल गृह सुवर्णगिरी धन्य ।।
मिरवी शंकर नामा शशि शेखर तोचि नित्य सेवावा ।।

(श्लोक) जो कैलासमहीं धरिं गिरीसुते संगें सुखे राहिला ।।
भोळा केवळ भक्त वश्य अमरत्यूहीं सदा पूजिला ।।
टाकी कोपुनि पार्वतीसहिं नसे ज्या सारखाही भला ।।
श्री गंगागिरिजेसमेत शिव तो स्या मानसि पूजिला ।।

सूत्रधार : येणे रिती नांदि श्लोक मणालियानंतरे आदौविघ्नेश्वराची प्रार्थना केल्या करिता विघ्नहर प्रत्यक्ष येतो म्हणुन सूचना करावयास गणपाल नामक दौवारिक येतो निरखा

राग अठाणा ।। शाप ताळ ।।
येतो दौवारिक पहा ।। येकदंताचा भक्त हा ।। प ।।
भेत धरोनि खांद्यावरी ।। अति वेगें नाचे कुसरी ।।

सूत्रधार : येणेरिती दौवारिक येऊन सभ्यांस पाहून बोलतो परिसा ।।

(श्लोक) अजाद्यमरसत्तमीं निज हितार्थ जो पूजिला ।।
गजानन दयाब्धि तो त्वरित येतसे या स्थळा ।।
द्विजाते मुख सभ्य हो अमरमान्य देवा तया ।।
भजा स्थिरमनें अतां सकल सौख्य भोगावया ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रिती दौवारिकानें सभ्यांस ताकीद केल्यानंतरे विघ्नेश्वर प्रत्यक्ष येतो निरखा

दरू : ।। राग नवरोजु ।। आदिताळ ।।

गजवदन येतो पहा ।। वाजत गाजत हा ।। प ।।
माज बांधोनि सर्पानें ।। मंजुल नाचत जोमानें ।।

सूत्रधार : येणे रिती विघ्नेश्वर रंग स्थळा माजी प्रकटल्या नंतरें सूत्रधार नेपथ्याभिमुख होऊन 'प्रिये अशी ये' मणतां नटी येते निरखा ।।

दरू : ।। राग नीलांबरी ।। मिश्रताळ ।।

नटी येते पाहा ।। नवरसाश्रय देहा ।। प ।।
मोटी चतुर रुपवती ।। नाटच करित द्रुत गती ।।
वेगें येतां ते कुसरी ।। वेणी शोभे पाठीवरी ।।
राग गात नीलांबरी ।। वीणा घेऊनि ते सदरि ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नटी येऊन जी मी सिद्ध आहें काय आज्ञा म्हणता ?

सूत्रधार : प्रिये मी आज्ञापिजेलो

नटी : कोणांकडून ?

सूत्रधार : श्री मद्भोसल कुलपयोधिसुधाकर श्रीशरभेंद्र भूपाल वितन्य मान विघ्नेश्वर महोत्सिव दर्शनार्थ नाना देशाहून आल्या विद्वज्जनांकडून.

नटी : स्वामी सदादेव ब्राम्हणाराधन निष्टांत श्री भोंसल वंशोत्पन्न राज परंपरेते आदौ ऐकूं इच्छितें.

सूत्रधार : प्रिये चित्त देऊन ऐक.

(आर्या) श्री शंभू एकोजी शस्त्र महासेन एक शिवराम ।।
भीमहि एक वराहाभिध एक ब्रम्ह शाहजी नाम ।। १ ।।
अंबाजि परशु वीरहि बाबा मालोजि शाहजी गाजी ।।
तज्जतिचे संभाजी दुजा शिवाजी कनिष्ट एकोजी ।। २ ।।
तत्सुत तुवकोजी नृप ततनय श्री प्रतापसिंह गुणी ।।
तत्सुत सद्गुण राशी श्री मतुलजेंद्र वीर भूपमणी ।। ३ ।।
प्रिये बाबाजी राज्याचे ज्येष्ट पुत्र विठोजी राज्यापासून आठवें पुरुष शरभेंद्र महाराज्यांस स्वीकार करूं घेतले परंपराहीं सांगतो ऐक —

(आर्या) बाबाजीचा आतमज दुजा विठोजी तदात्म भूगाजी त्र्यंबक नृप
सुत त्याचा गंगाजी तत्तनूज बुवाजी ।। १ ।। त्याचा गंगा जो सुत
सुभानजी सुत सुभाजी तत्त जनरनाथ ।। त्याचा तनूभव बहु
श्लाघ्य गुणी शाहजी जगिं प्रथित ।। २ ।।
तत्पुत्र स्विकारूनि तुलज महीपाले अवनि देवेंद्र ।।
शरभेंद्र नाव ठेऊनि बसवी सिंहासनीं सुगुण सांद्रा ।।
त्या शरभेंद्राचे गुण सांगतो ऐक.

नटी : सांगावें.

(आर्या) जो निज जनेष्टदाता रिपुगुण जे तामनोज्ञमित वक्ता ।।
धारा जो संगिता नवरस वेतासु काव्य निर्माता ।। १ ।।
भोसल वंशांकुरश्री शिव चरणाबुजीं सदा निरत ।।
त्या शरभेंद्राचा सुत सगुणालंकृत शिवाजी नरनाथ ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रिती राज परंपरेते ऐकून आनंद भरित होऊन नटी साटोप फिरूनी सूत्रधारा प्रति बोलते.

नटी : स्वामी आता आज्ञा प्रकार ऐकू इच्छिते.

सूत्रधार : ऐक.

आर्या : जे नवरसास धारा मनोज्ञ लोकोक्ति ज्यामधें साजे ।।
श्री गंगा विश्वेश्वर परिणय नामक नवीन नाटक जे ।। १ ।।
त्याच्या प्रयोगें आम्हास संतोष नांवे म्हणून.

नटी : एतादृश्य ग्रंथ कर्ता कवि कोण ?

सूत्रधार : प्रातःकाळीं उठोनि करूनि शिवनुति स्नान शिवार्चनेतें ।। छाया दानादिनित्याह्निक मग करूनी जो महादेव भक्त ।। रक्षी शिष्टांसी शिक्षी नयवुध जनां वोपुनी चोर धूर्ता ।। ऐशा तो धर्म वेत्ता शरभ नृप मणोई दृश ग्रंथ कर्ता ।।

नटी : शिवः कंप करोतु फार सरस ।। ३ ।। श्री शरभेंद्र भूपाल विरचीत गंगा विश्वेश्वर परिणय नाटक काय आतां स्मरणास आलें ।। ज्या माजि पार्वतीच्या वेषात उपयुक्त साहित्य समग्र हीं म्या पाठ केलें कीं सांप्रत चिंतेनें हे देखील विसरलें पहा. काय आश्चर्य ?

सूत्रधार : प्रिये मी असतां तुजला ऐशी काय चिंता सांग.

नटी : स्वामी माझ्या वहिणीची लेंक कलावतीचा दाल्ला रसिक तिजवर गारा भरून गेला तो कैसा येयील मणावयाच्या चिंतेनें मी चुकूर आहें.

सूत्रधार : प्रिये तूं चिंता करूं नको सांप्रत आरूढ लग्नावरून पाहतां मजला सुचला अर्थ सांगतो ऐक.

(श्लोक) सुरमुनि वचनें श्री शंभु तो पार्वतीला ।।
त्यजुनि मग विवाहें लाहुनि स्वर्णदीला ।।
परतुनि गिरिजेला पावला जेंवि हौशी
रसिक तव सुतेला तेंवि पावे दुजाशी ।। १ ।।
सांप्रत यास म्यासरंजऊन श्रेयः संपादनार्थं या वर्ष ऋतूस अनुसरून संगीतोपक्रम कर,

नटी : आज्ञा. सांप्रत कीं.

(श्लोक) शंपादिपकषा जळोनी गगनीं धारा धरीं वैसुनी ।।
वक्रे रूद्र जपीत गर्जितमिसें शुद्धा बुधारा गणीं ।।
विश्विशा अभिषेचितांतदुदुके ज्या जाहल्या वाहिनी ।।
तत्संगे जडवं जुळांस सुमनः संपति आली क्षणी ।। १ ।।

सूत्रधार : येणें रितीं ऋतु वर्णन करितां नेपथ्यामधें
नमः पार्वतीपते हर हर महादेव
(नटी हा गजर ऐकून तटस्थ उभी राहती)

सूत्रधार : प्रिये, शंकू नको. तां केल्या ऋतु वर्णनें तश्लिष्ट ऐशा सुमनः पदे कडून सूचित देव समूह विश्वेश्वर दर्शनार्थ येतोसे दिसतें. आतां अम्हीं हीं अनंतर करणीयास जाऊ. (म्हणून उभयतां ही जातां भजन करित देव समूह येतो निरखा.)

दरु : ।। राग सावेरि ।। आदिताळ ।।

पहा येतो देवनिकर ।। महादेवा पाहूं आदर ।। प ।।
महानंदे शिव शंकर ।। महादेवा मणत गजरें ।।

**सूत्रधार** : येणे रिती देव समूह येऊन महादेव प्रशंसापूर्वक आपली भक्ती प्रकट करितो परिसा.

**(दोहरे)** हिमगिरीतनया नंद विधाता तो मुनि मानस धाम ।।
जो निज भक्तांचित्सुख दाता गाजी त्याचें नाम ।। १ ।।
शंभो महादेव ।। ३ ।। सकलहि सुरनर ज्याचे किंकर
ऐशा शंकर थोर ।। न करिति जे हरनामोच्चारहिं ते जन
भूमिस भार ।। २ ।। शंभो बाजारीं स्त्री पुत्रां पाहुनि मणतां तें
शिव शिव ।। त्या शिव नामोच्चरें झाले शिपीहीं नामदेव ।।
शंभो ।। हर हर मणतां पातक हरि सुख शंकर मणतां देत ।।
भव भव मणतां प्रसन्न होता भोळा गौरी नाथ ।। ४ ।।
शंभो ।। विषई गुंता न करि चिंता परिसा मोक्ष पाव ।।
बसतां उठतां आणिकहीं रमतां मणा महादेव ।। शंभो ।।

येणे रिती देव समूह येऊन दौवारिकाची आज्ञा उल्लंघन करिनासें उभा राहातां पार्वती समवेत विश्वेश्वर वन विहारार्थ येत्यामुळें सेवकांनीं वन परिष्कार केले ते पाहणेस आदौ नंदीकेश्वर येतो निरखा.

**दरु : ।। सारंग ।। शापताळ ।।**

नंदिकेश येतो पाहा ।। चंद्रचूड भक्त हा ।। प ।।
वृंदारकादि जन ।। वंदी ज्याचें शासन ।।

**सूत्रधार** : येणे रिती नंदिकेश्वर येऊन वन निरखून पाहून आप आपणांत बोलतो परिसा.

**(श्लोक)** सूर्यानि जल शोषुनी सुगवहा पंथा बरा निर्मिला ।।
केली निर्मल मारुते वनमही मेधीं स्वयें घातिला ।।
व्योमी मांडव जाहल्या द्रुम युगाशिष्टालता तोरणें
श्री विश्वेश विहार योग्य बरवें श्रृंगारिलें हे वन ।।

**सूत्रधार** : येणे रिती बोलुन नंदिकेश्वर परततां देव समूह त्या समीप येऊन 'स्वामी, आम्हास विश्वेश्वर दर्शन करवांवे' म्हणून नम्रतेनें सांगता नंदिकेश्वर बोलतो पारिसा.

**(श्लोक)** ऐका सर्वहीं देवहो समय हा नाजूक आहे पहा ।
आता बाळा दशाननादी निज सद्भक्तांस सोडोनि हा ।।
श्री शंभू गिरिजेसवें सुख भें येतो वनां येकला ।।
वेगें दर्शन घेउनि प्रणमुनि जा सर्वहीं स्वस्थला ।। १ ।।

**सूत्रधार** : येणेरिती सांगून नंदिकेश्वर निघून जातां पार्वती समवेत विश्वेश्वर येतो निरखा.

**दरु : ।। राग कांभोजी ।। आदिताळ ।।**

विश्वेश्वर येतो पाहा ।। विबुधादिका कां वंद्य हा ।।
वश्य होवोनी गौरीस ।। वन विहारार्थ हौसें ।। अ ।।

गौर वर्णे लखलखित ।। गौरीचा धरोनि हात ।।
गौरवें पाहे मुखांते ।। गौतमादि ऋषीतुन ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती विश्वेश्वर येतांच समस्त देवही त्याला प्रदक्षणा करीत स्त्रोत्र करिताहेत परिसा ।।

(वोव्या) तू जग पालक ।। तूंचि आदि अंति ।।
शंभो उमापति ।। पाळी दासा ।। १ ।।
युद्धीतां आमुचि ।। चढविली कक्षी ।।
गजानन साक्षी ।। या विषई ।। २ ।।
त्रिपुराधि पति ।। असुरा जाळोनी ।।
स्वर्गाचे तां धणि ।। केलें आम्हा ।। ३ ।।
ना ना संकटीं तां ।। तारिलें दयाळा ।।
सेवा वेळोवेळां ।। घडो तुझी ।। ४ ।।

सूत्रधार : येणे रिती समस्त देवही विश्वेश्वराराधन करून निघून गेल्या नंतरे विश्वेश्वरानें काल भैरवाचें स्मरण करिता सपरिवार काल भैरव येतो निरखा.

दरु : राग भैरवी ।। आदिताळ ।।

काल भैरव येतो पाहा ।। कपाळ हातीं घेउनि हा ।। प ।।
शूल धरोनि उजव्या हातीं खलां लावी सुपथी ।। अ ।।
मोर पिंछ खांद्यावरी भारी डमरूक करी ।।
ये रीतिचे परिवारी ।। गौरी वल्लभ सामोरी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती काल भैरव विश्वेश्वरास प्रणाम करून आपण केलीं कार्ये निवेदन करून आज्ञाहीं प्रार्थितो परिसा.

(पद्या) मृड भवा हे ऐक ।। जडजीव कितियेक ।।
ताडोनि पढविले नाम वाचे ।। कोंडिले अणु आंत ।।
सोडिले ज्वलनांत ।। वोटिले चरकांत कुटिल मतिचे ।।
लोटोनि नरकांत लोटोनि काटयांत ।।
भूतळीं सोडिले ।। जंतुकाचे ।। शक्तिसही अधिक ।।
सत्कार करुनि ते मुक्तीस धाडिले भक्त तुमचे ।।
जगि न करि आपली जन अवज्ञा ।। समजले हें असे ।।
सकल विज्ञा ।। नाथ मज लागि दाविजे ।। नेत्रसंज्ञा ।।
शिव पूर्ण करिन मी शीघ्र आज्ञा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती काल भैरवाचें वचन ऐकून विश्वेश्वर त्या प्रति बोलतो.

वचन : फार संतोष. आजिपासून आनंद कानन नामक वना मध्ये पार्वति समवेत मी आनंदे वास करिल्यामुळें तां त्या आनंद वनाचे रक्षणे विषई जागरूक असावें.

सूत्रधार : येणे रिती ताकीद करून नाटये कडुन वन प्रवेश करून पार्वतीप्रतिस प्रेम बोलतो परिसा ।।

(श्लोक) पहा दैर्घ्ये रुंदी बहुत अटतां भूधर सुते ।।
तुझ्या वेणीशी हे वन सरणि येथोनि दिसते ।।

अथवा : (येणे रिती बोलत च्यारि पावले जाऊन)

(श्लोक) तुझ्या ऊरू स्तंभापरि सरळ रंभा तरू बरें ।।
अता तोयाधिवयेंत तळा तगिति पाहीं सुख बरें ।। १ ।।
(आणिक चारि पावले जाऊन)

(श्लोक) बिंबा त्यजोनि अधरा शुक पाहताती ।।
हे येतसे मधुकरावळि कुंद दंती ।।
या प्राथिती तव सुखास चकोरपंक्ति ।।
या कारणें बहुत जाग्रत ऐस चित्तीं ।। १ ।।

अथवा : भ्रूचापयुक्त लसताति कटाक्ष तुझे ।।
ही रम्य चंपक कळोपरि नाक साजे ।।
तुझे सदा शशि मुखी मुख पद्मगंधी ।।
त्या कारणें न करिती तुज ते उपाधी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती पार्वतीशी सप्रेम बोलत वन मध्य भागीं जाऊन विश्वेश्वर वनवर्णन करितो पारिसा ।।

दरु : ।। नादनाम क्रिया ।। आदिताळ ।।

सुंदर हे वन ।। सादर तूं पाहें ।। प ।।
मंद मारुत जेथें ।। सुरभि शीतळ वाहे ।। अ ।।
क्रूर बक द्रुम ।। कुसुमोद्भव नव ।।
सुरभीं गंध जेथें ।। भरला हे दाटुन ।। १ ।।
जेथें पारिजात सुमीं ।। झांकिली वनमही ।।
मिश्रमंदार संतान ।। जितिले येणे नंदन ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती विश्वेश्वरानें वन वर्णन करितां पार्वती नम्रतेनें विश्वेश्वराप्रति आपले अभीष्ट विनविते परिसा.

दरु : ।। राग कंभोजी ।। तिश्रताळ ।।

प्राणविसाव्या ।। पाप धरूनि मीं
प्राथिति माझी पुरवी आशा ।। प ।।
प्रणतार्तिहर परमेशा निज पाणीतें तां ।।
पारिजात सुम वेचुनि बसवुनि वामांकीं मज ।। व ।।
वेणी घाली वरद महेशा ।।

सूत्रधार : येणे रिती पार्वतीने प्राथिता विश्वेश्वर तैसेंच करून टिकला लावणेनिमित्त पार्वतीस तिसकस बसऊन हातीं कापूर मर्दित असतां नारद येतो निरखा.

दरु : ।। राग फरज ।। शापताळ ।।

नारद मुनी येतो पाहा ।। नामस्मरण करित हा ।। प ।।
निरंतर लोक संचारें ।। निष्पाप कृश ज्याचें शरीर ।।

सूत्रधार : येणे रिती नारद येऊन आपल्यांत आपण बोलतो परिसा ।।

(श्लोक) विश्वेश हा सोडुनि पार्वतीला । येईल कैसा । तुहिनाचलाला ।।
गंगा कशी यास वरील बाला । उपाय कांही न सुचे मनाला ।।

सूत्रधार : तरी पार्वती समवेत विश्वेश्वर विविक्त स्थली आहे करितां येथें जाऊन यत्न केल्या कार्यसिद्धी होईल. ऐसे बोलुन विश्वेश्वरासमोर जाऊन उभा राहून विश्वेश्वराचे उजवे भागीं पार्वतीचे प्रतिबिंब पाहुन आपण आलें कार्य साधावयास परते प्रबल निमित्त नाही म्हणून संतोष पावून कृत्रिमें स्तोत्र करितो परिसा.

दरु : ।। आनंद भैरवी ।। आदिताळ ।।

देवामाजी तूं पुण्य किर्ती ।। सर्व जन तुजला वंदिती ।। प ।।
पार्वती हे धन्य युक्ती ।। सवंतीची सळे नेणे चितीं ।। अ ।।
गायत्री सावित्री सरस्वती गांजिती अन्योन्यसती ।।
काय सुख त्या अनुभवती गौरी सारिखें येकांती ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारदानें प्रशंसा करितां पार्वती विश्वेश्वरास गर्वाने पाहतां त्याचे उजवे भागीं आपले प्रतिबिंब पाहून सवतीची शंका मानून विश्वेश्वराप्रती बोलते.

वचन : जिवलगा, तुझे उजवे भागीं कोण आहे सांग.

सूत्रधार : येणे रिती पार्वतीनें विचारितां तीचा आशय समजून हांसून विश्वेश्वर विनोदे बोलतो.

वचन : उजवे भागी मीच आहे.

पार्वती : उजव्या भागी आहे ते स्त्री कोण ?

विश्वेश्वर : डाव्या भागी आहे ते पार्वतीच.

सूत्रधार : येणे रिती दोनि चारिदांही विश्वेश्वरानें उत्तर देतां पार्वती रागानें बोलते.

वचन : मी डाव्या भागी आहे ते रुजूच उजव्या भागीं आहे ते स्त्री कोण सांग.

सूत्रधार : येणेरिती पार्वतीने सकोप बोलता विश्वेश्वर यथार्थ सांगतो.

वचन : प्रिये राग करूं नको तें तूझेंच प्रतिबिंब त्वां भ्रमलीस नीट पाहा.

सूत्रधार : येणे रिती विश्वेश्वरानें सांगतां पार्वती तेथें रोख लाऊन उजव्या कानीं ताटंक पाहून नारदानें मंद हास्य करावयाचे हीं पाहून आग्रहाने विश्वेश्वरा प्रति तूं मोटा वंचक दिसतोस म्हणून उठून पलिकडे जातां विश्वेश्वरा प्रति नारद बोलतो परिसा.

(श्लोक) अन्योनें गिरिजा महेश वसती नाहीं अशी दंपती ।।
लोकी अन्य असे रमेश सदरीं पूर्वी ऋषी सांगती ।।
ते ऐकोनी बहुत मी हरिखलो प्रत्यक्ष हें पाहतां ।।
दूरोनी गिरि साजिरा वचन हें ध्यानास आलें आतां ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारदानें विनोदें बोलतां विश्वेश्वर पार्वतीस समाधान करून बलावितो परिसा.

(श्लोक) तूझें हें प्रतिबिंब जाण मजला नाही दुजी कामिनी ।।
कां वायां रुसतेस राग न करिं शोधूनि पाहे मनीं ।।
येयीं सत्वर लावितो निजकरें भाळीं टिळा चांगला ।।
कर्पूरेस सुतापरि मुख शशी नेणें दिसो हा भला ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती विश्वेश्वरशचे वाक्य ऐकून पार्वती अनादरें बोलते परिसा ।।

दरु : ।। राग तोडी ।। आदिताळ ।।

न लगे टिळा न लगे भाळा ।। नयनीं देखिली अबला ।। प ।।
कळली तुझी वंचना ।। पळभर दुजी सोशिना ।। अ ।।
माय बापां अनारूनी मान लज्जाहीं सांडुनी ।।
काय क्लेशें तुझी राणी ।। मी झाले स्वरुपा भाळुनि ।। १ ।।
मिळुनि असतां येकांती ।। मणशीं वंचक स्त्री जाती ।।
तां लपविली सगळी युतीं ।। फालनेत्रा सांगूं किती ।। २ ।।
मी जाणतें तूं निर्गुण ।। माझया योगें हुझालाशि सगुण ।।
तूझा तूंचि शेखीं पूर्ण ।। आंजि पासून ऐस सुखानें ।। ३ ।।

सूत्रधार : येणे रिती बोलुन पार्वती पलिकडे जाता विश्वेश्वरास अधीक राग यावया जोगें नारद बोलतो परिसा.

श्लोक : कीतीदा कीं दोघे मिळुनि असतां म्या निरखिलें ।।
उमेचें तैं ऐसे वचन न कधीहीं पारिशिलें ।।
सतीशीं बोलावे अवचट विनोदें बहुत तां ।।
सखी केली बोल अहित सलगीनें गिरिसुता ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारदाचे वाक्य ऐकून पार्वतीचे ठाई तिटकाऱ्याने विश्वेश्वर नारदास पाहून बोलतो.

वचन : नारदा अजि म्या पार्वतीचा परित्याग केला तपाचे ठाई मन प्रवर्तविलें.

सूत्रधार : येणे रिती विश्वेश्वरानें सांगता नारद मनामाजी माझी इष्ट सिद्धि झाली मणून नम्रकाशें कडून विश्वेश्वराप्रति साधारण बोलतो,

वचन : स्वामी, पार्वतीने अप्रीये बोलिल्या करितां तत्काल तिचा त्याग करणे युक्तच तपास सांप्रत हिमाचलासमान स्थान नाहीं.
येणे रिती नारदानें सांगता नेपथ्यामधे.

(श्लोक) स्वयें शोषिली भूमिका होयदांनी ।।
किती आर्द्रकेली निजाज्ञें कडोनि ।।
किती या वरी आर्द्र कीजे मणेनी ।।
निरीक्षीरवी मध्य भागीं बसोनीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती मध्यान्ह काल वर्णन ऐकून उभयतांही निघून जातां निष्क्रांत सर्वे ।।

इति श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासन संपत्संतति भोंसल कुळ पयोनिधि सुधाकर राजाधिराज छत्रपति वसुंधरामंडलाखंडन श्रीशरभेंद्रभूपाल-विरचितं गंगा परिणायनाटके प्रथमोंकः ।।

।। श्री गणेशाय नमः ।।

तदनंतरे सवतीच्या व्यसनें आणि विश्वेश्वराच्या विरहें कडुनहीं फार व्याकुळ ऐशा पार्वतीच्या परार्शास तीची सखी चंद्रकला येते निरखा ।।

दरु : ।। राग पंतुवराळि ।। आदिताळ ।।

चंद्रकला येते पाहा ।। चंदन शीतल देहा ।। प ।।
सुंदर वीणा घेऊ हाते ।। चंपकांगी गात नाचत अ ।।
ऋतू गतीने जातां स्थिर ।। रुणुझुणु वाजवि घुंगुरें ।।
गजगामिनी वीण स्वरें ।। रंजवि सभा समग्र ।।

**सूत्रधार :** येणे रिती चंद्रकला येऊन चहूंकडे पाहून ।। मृणालादि शीतलोपच्चार सामग्री घेऊन विजया येतसें दिसतें मणतां तैशीच विजया येते निरखा.

दरु : ।। राग असावेरी ।। शापताळ ।।

विजया येतसे पाहा ।। विजितामर्ष मोहा ।। प ।।
निजकरीं घेवोनि मृणाल ।। विजणे जल आणि शेवाळ ।।

**सूत्रधार :** येणे रिती विजया येतांच चंद्रकला जवलि जाऊन विजये हे सीतलोपचार सामग्री नेत्या वरून तां पार्वतीचा सपत्नीश्रम परिहरिल्यापरिं दिसतें.

**विजया :** म्या कोणत्या उपायें त्या श्रमाचा निवाडा वरावा बाह्यतापशमनार्थ हे सामग्री नेते.

**चंद्रकला :** त्या श्रमाचा निवाडा होणेस म्या येक उपाय योजिला आहे.

**विजया :** सांग ।। २ ।।

**चंद्रकला :** या प्रकारें मणुन कानामधें सांगतां.

**विजया :** शाबास चंद्रकले, या उपायें तीचा श्रम वारिल्यांते बहुतेक विश्रांती पावेल. तदनंतरें तीचा विरहताप शमनार्थ विश्वेश्वरास हुडकुन काहडणेस काय उपाय करावा ?

**चंद्रकला :** ब्राम्हणास विचारिल्यां विश्वेश्वराचा लाग लागेल मणतां सकुटुंब बृद्ध ब्राम्हण येतो निरखा.

दरु : ।। राग मोहन ।। आदिताल ।।

बृद्ध ब्राम्हण येतो पाहा ।। श्रुध्रतांमसी गरीब हा ।। प ।।
मधे मधे माजकसीत ।। वधुपुत्र स्त्री समवेत ।। अ ।।
ताव करोनि पुत्राकडें तावट होवोनि त्या पुढें ।।
गांव पुसत झाडो झाड ।। धांवे वांकडे वांकडे ।। १ ।।
(येणे रिती बृद्ध ब्राम्हण येतां दोघेहीं त्या समोर जाऊन) स्वामी या माथारपणांत इतुक्या श्रमानें कोठें जातां ? बृद्ध ब्रांम्हण तुसडेपणानें 'जा जा

मी महतारा ! कोठें तरीं जातों तुम्हास काय ? तुम्ही निरंतर तरूणीच होऊन असा.'

येणे रिती जावारून जातां विजया बोलते परिसा ?
स्वामी राग करू नका.

**(आर्या)** संचारें वृद्धपणें श्रमलां क्षणमात्र तरुतळा सेवा ।।
सुंदर शीतळ जल हे प्राशुनि विश्रांति पाउनी जावा ।। १ ।।
येणे रिती विजयेनें सांगतां वृद्ध ब्राम्हण ' बरेंगे आई ' ' ताहनानें घसा वाळतो पाणी पिऊन सविस्तार माझें वर्तमान सांगतो.' मणून सावलींत बसुन पाणी पिवून बोलतो परिसा. ऐक आई.

**(श्लोक)** हिमाद्रिकन्या सकुमार गंगा ।। विश्वेश्वरातें वरितें शुभांगा ।।
ऐकोनि ते मी सकळत्र तेथें ।। जातो वऱ्हाडीं सुख भोजनार्थे ।। १ ।।
येणे रिती सांगुन उशीर झाला मि जातों म्हणुन निघून जातां विजया बोलते.

**बचन** : चंद्रकले येक ! विचारितां येक झालें विंच्यास भिऊन पलतां सर्पाचे पुसावर पाय पडला. विचार जाहला काय करावें ? होईल प्रबल तदनुसारच पार्वतीसहीं बुद्धि सुचली. असो. हें वर्तमान दोघीमधेंच असुंदे सांप्रत पार्वतीस कालक्षेपार्थ विश्रांतिमंटपास बलाऊन आणू मणें (चल मणून विजया चंद्रकलेसमवेत निघून जातां पार्वजि विश्रांति मंटपास येत्या मुले तेथें जन संचार होऊं देइनासे जाग्रत करणेस) पिचंडिल नामक द्वारपाल येतो निरखा ।।

राग सौराष्ट्र ।। आदिताल ।।

द्वारपाल येतो पाहा ।। दोंदेल बहु भीकर हा ।। प ।।
थोर गदा घेउनि हातीं ।। द्वार राखी दिनरातीं ।।
येणे रिती द्वारपाल येऊन दरवाजयांत उभा राहिल्या नंतरें विजया चंद्रकला या दोघीचा हस्तलाग घेऊन पार्वती आग्रहानें येते निरखा.

राग कल्याणी ।। आदिताल ।।

पार्वती येते पाहा ।। परम पवित्र देहा ।। प ।।
शर्वावरि करूनी राग ।। परिवारेंशी लगबग ।। अ ।।
मौनें मान करोनि खाले ।। मदिराक्षी वाटारि डोळे ।।
मानिनी संवंतीची सळे ।। मनी धरोनि तळमळे ।। १ ।।
येणे रिती पार्वती येऊन सखीचा हात सोडून टाळी पिटवून नाकावर बोट ठेऊन बोलते.

**बचन** : काय आश्चर्य त्यानें काय कपट केलें ? हा विश्वेश्वर येवढा वंचक मणून मजला कळेनासें गेलें ।।

**दरु :** राग शंकराभरणा ।। आदिताल ।।

कायरे माझ्या कपाळा ।। कैसा त्या विश्वेश वरिला ।। प ।।
माय ना बाप जयाला ।। केविं मानील तो मजला ।।

जो शुध्दू स्फटिकाकार ।। जो अद्वितीय अविकार ।।
ऐशे गुण ऐकतां फार ।। जीव गुंतला त्याजवर ।। १ ।।
शुध्द तो पशुपती भोळा ।। सवतीनें वश केला ।।
सदारवीत तिजला ।। सुखी असो मज निराळा ।। १ ।।

येणे रीति पार्वतीचें वाक्य ऐकून विजयेनें ' काय हें पार्वती, तू उत्तम स्त्री विश्वेश्वराची राणीहीं होऊन प्राकृत स्त्री परीं बोलतेस ' मणतां पार्वती ती बोलते परिसा.

राग नीलांबरी ।। आदिताल ।।

धिगी धिगी स्त्रीचे जिणें धाक वाहावा आपण ।। प ।।
लग्नी बोलिलें वचन ।। धकलिलें सहज जेणें ।। अ ।।
मी त्या विश्वेश्वरास मानित होतें दिसदीस ।।
मातेंच तूं बोलतेस ।। भीत्या पाठीं ब्रम्ह राक्षस ।। १ ।।
थारा झाला जो सवतीस ।। तूं वानितेसि त्या शिवास ।।
थोर पण आहें ज्यास ।। तो जें करि तेंच सरस ।। २ ।।

येणेरीति पार्वती बोलतां विजया बोलते.

**वचन :** सयेग पार्वती, अद्वितीय भोळा ऐशा विश्वेश्वरावर का लटिका आळ घालितेस ? येणे रिती विजयेनें बोलतां पार्वती आग्रहानें बोलते परिसा.

**वचन :** मी काहीं लटिका आळ घालिना. त्याचा भोळ्या पणास तांच वानावें.

**(श्लोक)** विनोदें पर्यंकीं बसूनि पुसतां म्या त्रिभुवनी ।।
आहे काय त्याक्षा सदृश मजला अंन्य रमणी ।।
म्हणे तै मीं नेणे सुमुखी ललने ते तुजविना ।।
तयाचे आंगी म्या सखि निरखिली अन्य ललना ।।

येणे रिती पार्वतीचें वाक्य ऐकून विजया बोलते.

**वचन :** सयेग पार्वती हें यथार्थच काय ?

**पार्वती :** सखी म्या लबाड बोलिलें तें तां कधी तरीं ऐकिलें काय ?

**विजया :** तर तेव्हां विश्वेश्वरास हटकाऊन तांस कां विचारिलें नाहीं ?

**पार्वती :** तेव्हां म्या नीट विचारिलें.

**विजया :** त्यास त्याने काय उत्तर दीधलें ?

**पार्वती :** तुझेंच प्रतिबिंब म्हणविलें.

**विजया :** त्यानें सदुत्तरेंच दिधलें तो श्रुध्द स्पटिकाकार जाहल्यामुळें तूझें प्रतिबिंब त्याचे ठाअी दिसू ये कीं, ते कां तुजला समंजस भासले नाहीं ?

**पार्वती :** प्रत्यक्ष तीचे उजवे कानीं तांटक असतां मजला तें उत्तर कैसें समंजस भासेल सांग येणे रिती पार्वतीचें वाक्य ऐकून चंद्रकला बोलते.

**चंद्र. :** साजणे पार्वती तां सरस विचारिलें तरि तूं या विश्रांति मंटपा माजि क्षण मात्र स्वस्थ चित्तें बसशील तरि तां विजयेस विचारिल्या पूशीस मी उत्तर देऊन तूझा मनस्ताप परिहार करीन.

येणे रिती बोलून नाटयें कडुन मंडप प्रवेश करून पार्वतीप्रति चंद्रकला बोलते परिसा.

(आर्या) त्या श्री शिवा समीपीं बसली होतीस तूं कसी तेथें ।।
तैसें माझ्या निकटीं बैसावें तां त्यजूनि रोषातें ।। १ ।।
येणे रिती बोलुन चंद्रकला बसतां पार्वतीहीं फार सरस मणून तीचे वाम भागीं तिरकस बसतां चंद्रकला विजये कडील अरसा घेऊन आपल्या ऊरा समीप धरून पार्वती प्रति बोलते परिसा.

(आर्या) आदर्शी जे दिसतें प्रतिबिंब हीं तें तुझेंच कीं नोहे ।।
येणे रीति विचारितां पार्वतीनें संदेह काय? ते माझेंच प्रतिबिंब (मणतां चंद्रकल बोलते परिसा).

(आर्या) त्यामाजि नीट पाहे कर्णी ताटंक कोणत्या आहें ।। १ ।।
येणे रिती चंद्रकलेचें वाक्य ऐकून सावध होऊन बिंबास प्रतिबिंब अभिमुख होत्या मुळें उजवा डावा भाग व्यत्यास कडुनच दिसेल मणुन समजून त्या विश्वेश्वरास आठवून मूर्छिले होतां विजयेनें मृणाळादिकांकडून शितळोपच्यार केल्यानंतरें सावध होऊन सख्यास पाहून काकुलतीने आपल्यास या अर्थी समाधान केला प्रकार सांगते परिसा.

(श्लोक) तूझें हें प्रति बिंब जा० ।।
येणेरिती आपल्यास विश्वेश्वराचें समाधान केला प्रकार सांगून पुनश्च विरह सोसवेनासें बोलते परिसा ।।

दरु : राग कांभोजि ।। आदिताल ।।

'कोठें माझा जिवलग ।। काय करूं आतां सांग ।। प ।।
दाट बळें त्याचा वियोग ।। कैसा म्या जोडिलाग ।। अ ।।
प्रेमळ तो माझा धणी ।। निर्मळ चित्सुख खाणी ।।
सोमशेखर कां सजणी ।। म्या मोहें आव्हेरिला वनी ।। १ ।।
काय योजावा उपाय ।। कोठें जाऊ मी माये ।।
बायको मीं करूं काय ।। कैसा भेटे शिवसदय ।। २ ।।
येणे रिती पार्वती विरहाने बोलत असतां नारद जोशी होऊन येतो निरखा.

दरु : राग तोडी ।। ताळ आदि ।।

जोशी येतो पाहा ।। जोम कडून हा ।। प ।।
राशि नक्षत्रें मेजून ।। सांगे जनास प्रश्न ।।
येणे रिती नारद येऊन आप आपणांत बोलतो ।।

वचन : पार्वतीच्या निरोपाविना विश्वेश्वर गंगेचे पाणिग्रहण करीत नाहीं त्या करितां या वेषाने पार्वती समीप जाऊन प्रश्न सांगून ती पासून येक वस्त इनाम घेऊन ते विश्वेश्वरास दाखऊन गंगेचा मनोरथ पूर्ण करितो.

सूत्रधार : येणे रिती बोलत दरवाजांत घुसावयास जाता द्वारपालक हटकून बोलतो ।।
कोण रे तुं न पुसतां जाऊ इच्छितोस हे छत्र नव्हे, पार्वतीचा विश्रांति मंडप जा पलिकडे.

नारदा : अरे द्वारपालका मी जोशी पार्वतीकडे कांही याचना करावयास जातो ब्राम्हणांस कोठेंही अटक नाहीं मार्ग दे.

द्वारपाल : अरे ब्राम्हणा ते यथार्थच पण सांप्रत विश्वेश्वराचे वियोगें पार्वती व्यसनस्थ आहे येथे जोशाचे काय काम ?

येणे रिती द्वारपालानें मणतां नारद बोलतो परिसा.

वचन : अगाये दौवारिका अशा ठिकाणी कीं अमुचें काम ऐक.

(आर्या) वेश्येला विट वैद्यां रोगी भेभिस्त जप परां भोळे ।।
व्यसनींहीं जोश्यांला ब्रम्हातें जीवनार्थ निर्मियले ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारदाचें वचन ऐकून अटक करावयास वेधले उत्तर सुचेनासें जातां द्वारपालकानें मी तुजला आंत सोडिन कीं सोडिना हा प्रश्न सांग मणतां नारदानें हा मूर्ख दिसतो उफराट्याचें सुफराटे करील मणुन समजून त्यास पाहून तू मजला आंत सोडिनास मणतां द्वार पालकानें तूझी गोष्टि लटिकी झाली तूं आंत जा मणाल्यानंतरें नारदानें मंडपात प्रवेश करितांच विजया पाहून चंद्रकले प्रति येकांति बोलते.

चंद्रकले पूर्वी, ज्या ब्राम्हणाने अम्हास वर्तमान संगितले तो हा नव्हे कीं.

चंद्रकला : नव्हे नव्हे म्हणून त्या ब्राम्हणास पाहून स्वामी तुम्ही कोण कोठ आला म्हणतां.

नारद : बायानो मी जोशी याचनार्थ आलो मणतां पार्वती त्याला आसनावरि बसवून अर्घ्यपाद्य पूजा करून स्वामी माझा जिवलग मजवरि रागा भरून गेला तो केव्हा येईल तें सांगावें मणतां नारद सांगतो परिसा.

बाई ऐक.

(श्लोक) आता कर्कट लग्न जाण चरया पाह गुरू चांगले
मीनाहूनि तसाचि शुक्र मकरापासूनि आहे बळें ।।
भाग्यामाजी असे शनी सकळ हीं हे पाहतां योजुनी ।।
कन्या लाभ घडे तया फिरूनि तो येयील येथें क्षणीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती त्याचें वाक्य ऐकून पार्वतीनें तो सुखी लग्न करूं घेवा पण येयील कीं मणून परतून विचारिल्यास जोशाने अवश्य येयील मणतां अपल्या गळ्यातली मोत्याचा हार कांहडून विजयेचे हातें त्याच्या गळा घालऊन निरोपहीं देऊन तो गेल्यानंतरें पार्वती सख्यास पाहून वैमनस्येकडून बोलते परिसा.

(आर्या) येती विपत्ती आधी दे ते बुद्धीस पालट अशी हे ।।
जे गोष्टी ऐकीली ते मजला प्रत्यक्ष जाहली पाहे ।।
असो चंद्रकळे तुं जाऊन विश्वेश्वर कोठें आहे तें कळू घेऊन ये विजये शयन गृहास जाऊं चला.

सूत्रधार : येणे रिती बोलुन पार्वती सख्या समवेत निघून जातां नारदा समवेत विश्वेश्वर येतो निरखा.

**दरु** : ।। राग हंबीरा ।। तिश्रताळ ।।

विश्वेश्वर येतो पहा ।। विरहे अति पांडुर हा ।। प ।।
शाश्वतपद जो देणार ।। वनी झाला तो ऋषीवर ।।
येणे रिती विश्वेश्वर येऊन नारदा प्रति बोलतो.

**वचन :** नारद तां पार्वतीची आज्ञां घेऊन मुक्ताहारहीं आणिल्या मुळें गंगेच्या पाणिग्रहणाविषयीं मी फार काहीं इत्छावंत आहें तरि हे कार्य हिमाचलास कैसें संमत होइल.

**नारद :** स्वामी मी सत्परिषिसमवेत हिमाचलापासीं जाऊन त्यांचे मुखें प्रकारांतरें सांगवून त्याला संमत केलों आहें.
येणे रीति नारदाचे वाक्य ऐकून विश्वेश्वरानें नारदां सप्तऋषीनी कैसें सांगीतिलें त्यानें कैसा अंगीकार केला तें सवस्तर सांग मणतां नारद सांगतो परिसा.
स्वामी ऐकावें.

**(श्लोक)** आहे त्वन्निकटींच धूर्जटि ऋषी गौरीशसा जो गुणी ।।
माहात्म्ये गिरिजा पतीचा मणिजे तद्‌भृत्य आम्ही वनी ।।
गंगा हे तनया तुझी वितरिजे त्याला असें सांगतां ।।
त्यानी शैल तयांस वंदुनि मणे मी धन्य जालों अत्तां ।। १ ।।
येणे रिती नारदानें सांगतां ।।

**विजया :** पुलकांकित होऊन नारदा तर मी आश्रमासच जातों मणतां नारद मीहीं त्वरा करणे निमित्त हिमाचला समीप जातों मणून जातां निष्क्रांत्ता सर्वे इति श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासन संपत्संतति भोसल कुल पयोनिधि सुधाकर राजाधिराज छत्रपति वसुंधरा मंडला खंडल श्री शरभेंद्र भूपाल विरचित गंगा परिणय नाटकें द्वितीयोंकः ।। २ ।।
तदनंतरें नारदा प्रेष्ति अश्वमुख किन्नर येतो निरखा.

**दरुः** राग कल्याणि ।। आदिताल ।।

किन्नर येतो पाहा ।। किनरी वाजवीत हा ।। प ।।
खिन्न झाल्याहीं श्रमानें ।। गात नाचत आनंदानें ।।
येणे रिती किन्नर येऊन चहुंकडे पाहून कोण हा कपि त्वरिनें येतो मणतां नारदाचा स्नेहित पर्वत कपि रूपें येतो निरखा.

**दरु :** राग बिलहरी ।। आदिताल ।।

कपी येतो पहा ।। कुचेष्टा करीत ।। प ।।
झेंप घाली झाडोझाड ।। किल किलाट करीत हुडी ।।
येणे रिती कपीरूप धारी पर्वत येऊन किन्नरास पाहून आपण कपिरूप धरिल्यामुळे लज्येनें त्याचे दृष्टीस पडनासें जावें, मणून त्या मागून जाऊं — इछितां किन्नर हीं तो आपल्यास उपद्रव करिलसें समजून त्यास अभिमुख होतां उभयतांहीं बाह्य भ्रभरी अंतर्भ्रमरी दिग्भ्रमरी इत्यादी गतीनें फिरत

फिरत रेंचतां किन्नर घावरा झाला ते पाहून कपिरूप धारी पर्वत किन्नरा प्रति बोलतो.

**वचन** : अरे कररवा भीऊ नको मी कपि नव्हे तूझ्या गुरूचा स्नेहित पर्वत मणून जाण

**किं.** : स्वामी मजला आतां जीव आला स्वामीनीं हें रूप कां धरिलें ते कारण सांगावें.

**प.** : कलहप्रिय सकल ऋषीश्वरासमवेत विश्वेश्वरास विवाहार्थ त्वरेनें बलाऊन आणणे निमित्त आणी पार्वतीस मी या कार्यास मणावयाचें कळतां नये मणूनहीं म्या हें रूप धरिलें तूं कोठें जातोस ।।

**किं.** : मी हीं विवाह मंटप सिद्ध करावया विश्वकर्म्याला बलाऊ आणावयास जातो.

येणेरिती उभयताहीं बोलुन निघुन जातां विश्वकर्मा येतो निरखा.

दरु : राग सोहनि ।। आदिताल ।।

विश्व कर्मा येतो पाहा ।। विश्व रचना दक्ष हा ।। प ।।
विश्वेश्वर सेवा निरत ।। विवाह मंटप रचनार्थ ।।

येणेरिती विश्वकर्मा येऊन विवाह मंटप सिध्द केल्यानंतरें परिवारेंशी हिमाचल येतो निरखा

दरु : राग मोहन ।। आदिताल ।।

हिमाचल येतो पाहा ।। हितकारी सकळास हा ।। प ।।
नेमेशीं पत्नी सुत ।। हरिणादि मृगां सहित ।।

येणेरिती हिमाचल आल्यानंतरें ऋषीश्वरांसमवेत विश्वेश्वर येतो निरखा.

दरु : राग हंबीर ।। शाप ताळ ।।

विश्वेश्वर येतो पाहा ।। विरहें अति पांडुर हा ।।
शाश्वत पद जो देणार ।। वनीं झाला तो ऋषिवर ।।

येणेरिती विश्वेश्वर आल्यानंतर नारद येतो निरखा ।।

दरु : राग फरज ।। मिश्रताळ ।।

नारद येतो पाहा ।।

येणेरिती नारद येऊन हिमाचलास पाहून कां अजुनी गंगा नये मणतां देव गंधर्व स्त्रिया समवेत गंगा येते निरखा.

दरु : राग कन्नडा ।। आदिताल ।।

गंगा येते द्रुतगती ।। गीर्वाण स्त्रिया सांगति ।।
प ।। श्रृंगारूनी अप्रीती ।। कुसुम माळ घेऊनि हातीं ।।

येणेरिती गंगा येऊन नर्म सखी कमलिनी प्रति बोलते परिसा.

**वचन** : अवोये कमलिनी श्री विश्वेश्वरच धूर्जटि ऋषी वेषें येथें तप करितो मणून मजला स्वप्नही पडिलें तरि माझा निश्चय ऐक.

दरु : राग शाहना ।। आदिताल ।।

जरि तो विश्वेश्वर ।। धरील माझा कर ।। प ।।
तरि मी तुजवर ।। जीव हा वोवाहीन बरें ।। अ ।।
घरीं असतां मी नवरी ।।
घसरूनिद्य धैर्य गौरी पुरहराची झाली नारी ।।
खुपतें तें निज अंतरीं ।। १ ।।
मज वागतो येकांतीं ।। तिजवरि करो अति प्रीती ।।
निज जाण तू दृढचित्तीं ।। स्यां वरिला तो पशुपति ।। २ ।।

येणेरिती गंगा येतांच नारदाचे आज्ञे वरून समस्त ऋषीहीं वधूवरास समोर समोर बसऊन अंतर पाट धरून मंगळ श्लोक मणताहेत परिसा.
सुलग्ने सावधान.

(श्लोक) कैलासीं कनकाचलीं सुरगणीं स्वर्गी विमानांतरीं ।।
त्या आनंद वनीं समस्त भुवनीं सद्भक्त हृन्मंदिरीं ।।
गौरि वल्लभ विश्वनाथ मिरवे मोदें ज्यसात्या परी ।।
श्री गंगा सखी धूर्जटी प्रति घडो कल्याण पारंपरी ।। १ ।।
सुलग्ने सावधान ।।

येणेरिती मंगळ श्लोक मणून वधूवरां दृष्टी करवून अक्षतारोपणादि देव कोत्यापनांत याज्ञीकय थोक्त करवून ऋषीश्वर निघून जातां देव गंधर्व स्त्रिया येउन वधूवरास कडून हलेदे उटणें करविताहेत निरखा.

दरु : राग शंकर भरणा ।। आदिताळ ।।

गंगा : करि कर संन्निभ बाहो ।। कौतुक हें जन पाहो ।।
हात द्या धूर्जटि हो ।। गंध लाऊं ।। १ ।।
अनंग सुंदर गात्रा ।। अमरगणस्तुतिपात्रा ।।
आज्ञा द्या धर्जुटि हो ।। अबीर घालूं ।। १ ।।
सरळ त्रिरेखांकीन ।। स्फटिक शिला समक्तित ।।
ललाट द्या धूर्जटि हो ।। तिलक लाऊं ।। ३ ।।
हाटकवर्णा भारी ।। जटाया सावरूनी ।।
कंठ द्या धूर्जुटि हो ।। हार घालू ।। ४ ।।

दरू : राग शंकरा भरणा ।। आदिताळ ।।

विडा घ्या धूर्जटी हो ।। वरखानें शोभिता प ।।
बरव्या सुप्पारींत वेला लवंगा कात्त ।।
विशेष वास युक्त ।। वरि पानें सुधालिप्त ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती गंगेने हळदे उटणें करितां विश्वेश्वर हलदे लटणें करितो निरखा.

दरू : शंकरा भरणा ।। आदिताळ ।।

वि. ।। हरिणाक्षी शशिवदने ।। हिमसदृशांनी गंगे ।।
गिरि तनये मुख देयीं ।। हळेदे लाऊं ।। १ ।।

कुटिल सुकेशी चटुले ।। कुटिल शशी समफोल
निटिल देयीं गंगे कुंकू लाऊं ।। २ ।।
कलवीणासमनिनदे कलित महामणि हारे ।।
गळा देयीं गंगे ।। गंध लाऊं ।। ३ ।।

दरू : राग शंकरा भरणा ।। आदिताळ ।।

विडा घे प्राणप्रिये ।।

**सूत्रधार :** येणेरिती विडा घेतल्यानंतरे गंगेस बोटी धरून विश्वेश्वर तेथून निघून आनंद वनास येतां पार्वती विरह सोसवेनासें विश्वेश्वराचा क्षेम परामर्श करित विजया चंद्रकला नामक सख्या समवेत येते निरखा ।।

दरू : राग कल्याणी ।। आदिताळ ।।

पार्वती येते पहा ।।
येणे रिती पार्वती येऊन चंद्रकले प्रति बोलते.

**वचन :** चंद्रकले विश्वेश्वरानें गंगेचे पाणिग्रहण केलें तें तां दृष्टीनें पाहिल काय ?

**चंद्र. :** म्या नीट पाहिले या अर्थि संदेह नाहीं.

**पार्वती :** तर मी विश्वेश्वर दर्शनार्थ तप करितें.
येणे रिती बोलुन मौन धरून बसतां तत्समर्यी गंगेस जटेंत लपउन विश्वेश्वर येऊन पार्वतीचे डोळे झांकितां स्पर्श सुखाने फुलकांकित होऊन उठून — विश्वेश्वरास पाहून क्षमापान करिते परिसा.

दरु : राग सावेरी ।। आदिताल ।।

मी अपराधी देवा ।। माझ्या सांभाळा तां करावा ।। प ।।
किं अपराधी स्वदेहाला ।। मारील नरहीं भोळा ।। अ ।।
मी तुझें अर्ध शरीर ।। मज नाहीं दुजा आधार ।।
प्रिति करोनि मजवर ।। मान राखीं चघा समोर ।। १ ।।
येणेरिती क्षमा पन करून पार्वतीनें गंगा कोठें मणुन विचारितां तीचे चित्त निर्मळ आहें ते वळखून जटेहुन गंगेस खाले सोडितां परस्पर प्रीतीनें त्या दोघीनी अलिंगन केलें तें पाहून संतुष्ट होऊन विश्वेश्वरानें त्या दोघीस पाहून तुम्हाला काय वर पाजे तें माघा मणतां त्या दोघी वर माघताहेत परिसा.

**(आर्या)** आम्हा दोघीशींतां विहरावें या वनी प्रमोदानें ।।
श्री शंभो विश्वेशा द्यावें आम्हांस हेंचि वर दान ।। १ ।। आणीक हीं ।।

**(श्लोक)** या आनंद वनात येउनि आम्हा तीघांस जे सेविति ।।
येथें क्षणमात्र वास करिती जें अंतरीं चिंतिती ।।
या क्षेत्रास तयास संतति घडो संपत्ति येथें बरी ।।
शेखी हीं समता तुझी पशुपति हे चालवी वैखरी ।। १ ।।
येणरिती गंगा पार्वतीची प्रार्थना ऐकून तथास्तु मणून श्री विश्वेश्वर अपण सकलांसहीं अनुग्रह करितो परिसा.

(श्लोक) वर्षोतमेघ समअींच पिको धरित्री ।। देवोत भूपधनहीं विष्णुघांस सत्रीं ।।
सेवोतसेवक नृपांस अनन्य भावें ।। नांदोत विप्र सुर रूप निज प्रभावें ।। १ ।।
येणेरिती अनुग्रह करून गंगा पार्वती समवेत विश्वेश्वर नित्यानंद मंदिरास येतो निरखा.

दरु : राग श्रुध्र सावेरी ।। आदिताल ।।

नित्यानंद मंदिराशि ।। निजसुख अनुभवाशिक्त ।। प ।।
अत्यादरें सपरिवार ।। निःसंग आला विश्वेश्वर ।।
येणेरिती सपरिवार विश्वेश्वर नित्यानंद मंदिरास जातां ।। निष्कांताःसर्वे ।। इति श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिहासन संपत्संतति भोंसल कुलपयोनि सुधाकर राजाधिराज महाराज छत्रपति वसुंधरा मंडला खंडल श्री शरमेंद्र भूपाल विरचित गंगा विश्वेश्वर परिणय नाटके तृतीयोक: समाप्तः ।।

।। श्री विश्वेश्वराय नमः ।।

---

# गणेश लीलार्णव नाटक

## राजे शरभेंद्र कृत

### श्री. गणेशाय नमः ।।

दरु : नाटराग ।। झंपाताळ ।।

जयशिवतनय सुमुख ।। जयमद गजवर मुख ।। जयकृत निज जनसुख ।। जयनतशत मुख ।। जय जय ।। जयमुखर निगम शिख ।। जयमुदित जगद सुख ।। जयजित कुसुम विशिख ।। जयसित तरनख जय जय ।। १ ।। जय धीर हेरंब ।। जयसुतिताखिलांब जयविष्ट पालंब ।। तय हृषित सांबा ।। जय जय ।। जयक धृत विधु बिंब ।। जयचलद धरबिंब जयभृत सुरकदंब ।। जयसलोलंब ।। जय जय ।। २ ।। जयमूषिक सुयान ।। जय निजसुख निधान ।। जयगंडस्त विदान जय शुभ निदान ।। जय जय ।। ३ ।। जय दीव्य दपदान ।। जय विजहदुपमान ।। जय दधि फलदसान ।। जय युकरदन ।। जय जय ।। ४ ।।

दरु : पाडिराग ।। अटताळ ।।

शरण शरण मुखैका सिंधुर ।। शरण सुर वर शेखर शरण भक्त चकोर हिमकर ।। शरण शर्व मनोहर शरण शरणा ।। १ ।। शरणसन्नत सकल सुर वर शरण लंब पृथू दर ।। शरण नित्यानंद मंदिर ।। शरण तूं अति सुंदर ।। शरण शरण ।। २ ।। सग्दुण रत्न सागर ।। शरण दीनदयापर ।। शरण कर धुत फळ पुष्कर ।। शरण पाश कृतादर ।। शरण शरण ।। ३ ।। शरण तारक जित्सहोदर ।। शरण करसृणि भासुर शरण पन्नगवलित कटिकर शरण सकल कलाधर ।। शरण शरण ।। ४ ।।

दरु : श्रुटिराग ।। आदिताळ ।।

श्री सिद्धी विनायकाय मंगळं श्रित जय पालकाय शुभ मंगळं ।। प ।।
सिद्ध जन सेविताय जय मंगळं ।। सिंधुर वर वदनाय शुभ मंगळं ।। अ ।।
जल जासन मुख सुर पूज्याय जन्म जरा भय दूरत राय ।। जल जां कुश रद पाशक राय जय मंगळं ।। १ ।।
सिंदू रारुण शरीराय शिवमानस सुखकर चरिताय ।।
सुंदर चंद्रलसन्कुटाय शुभ मंगळं ।। २ ।।
करुणा रस पूरित जयनाय ।। तरुणा रुणनिभ शुभ वदनाय ।। चरणारुण रुचि जित कमलाय जय मंगळं ।। ३ ।। कटितट वेष्टित नागवराय कलि कल्पा हरनाम धराय स्फुट चटुलायत कर्ण युगाय शुभ मंगळं ।। ४ ।।

यापरि नाट्यारंभ झालियानंतर सुत्रधार गणेशलीलार्णवाभिधान नवीन नाटक नाचऊन सभ्यांचें मनरंजवाया करितां आदौ इष्ट देवता प्रार्थना करितो निरखा.

(श्लोक) जो कल्याणगुणी चराचर गणीं माया जया टेंगणी ।।
ज्याची ते करणी वटुं गुण गुणी तो शेषनामा फणी ।।
दैत्य ध्वांत निवारणीं दिनमणी जो कीं सुरांची धणी ।।
सिद्धी नेतपणीं विनायक धणी तो वंदितो मी क्षणी ।।
यापरि विघ्नेश्वर प्रार्थना केलियां नंतरें वाणीची प्रार्थना करितो निरखा.

(श्लोक) वाणी नमू सांप्रत पद्मपाणी ।। राणी अजाची जणु जे पुराणी ।।
खाणी सुखाची नकरोनि वाणी ।। वाणीस माझी पुरवे शिराणी ।।
यापरि वाणीची प्रार्थना केल्यानंतर श्री गुरु प्रार्थना करितो निरखा.

(आर्या) श्रीगुरु चरणा रजाला ।। वंदन हें जें अलभ्य सुर जाला ।।
यत्करुणामृत लहरी ।। प्रापंचिक सर्वदुरख जाल हरी ।। छ ।।
यापरीं सद्गुरु वंदन केलियानंतरें श्री परमेश्वर प्रार्थना करितो निरखा.

(श्लोक) ज्याचे मस्तकिं थोर देवतटिनीकुल्यापणा लाभते ।।
तेणें तग्दत शुक्तिकेपरिं अहो चांद्रीकळा शोभते ।।
मार्कंडेय यदर्चनें जागें चिरंजीवित्व पैं लाभला ।।
ऐसा श्री शिवचंद्रमौळि नमितों सर्वार्थदांता भला ।। छ ।।
यापरि परमेश्वर प्रार्थना केल्यानंतर सूत्रधार नाटकार्थ संग्रह नांदी श्लोक वदतो निरखा.

(श्लोक) श्रीमन्मंगल मूर्ति तो गणपती गौरीपतीचे घरीं ।।
प्रादुर्भाव करोनियां गिरिसुता संतोषवूनी बरी ।।
प्राप्त श्रीमदसिंधुदैत्य वधुनी भक्तात्पदुःखा पहा ।।
देवेंद्राशि निजाधिराज्य पदवी देवोनि रक्षी पहा ।। हे अष्टादश पदानांदी ।।
यापरीं नाटकार्थ संग्रह नांदी श्लोक वाचेस आस्पद केल्यानंतर रंग जमवण्या-निकित्त रंग प्रासादन करितो निरखा.

(श्लोक) मृदंग पांवे आणि टाल झालरा ।।
जमोनि मोर्चगहिं वाजतो बरा ।।
शित्तारहीं श्राव्यसरोत गाजतो ।।
मिलोनि गातां बहुरंग माजतो ।।
यापरीं रंग प्रसादन केल्यानंतर आदौ गणपति प्रार्थना केल्या करितां विघ्नहर पहिल्यानें येतो हे म्हणवूनि सर्व श्रृंगार मंडित चतुर विद्वज्जन भूषित सभा सिद्ध करावयास गणदास नामक दौवारिक येतो निरखा.

**दरु : कनडा राग ।। झापताल ।।**

दै वारिक तो येतो पाहा ।। शैवाग्रेसरसाधु महा ।। प ।। कैवारि हा दीन जनांचा ।। दैवासचिया तेज तसाचा ।। अ ।। हालत हालत डोलत झूलत हांसत खद खद फारचि संतत ।। बोलत अविरत बहुविध भाषित ।। तालही तोडुनि सुंदर नाचत ।। १ ।।
यापरीं दैवारिक येउन ताकीद करितो निरखा

(श्लोक) गणपति पहिल्यानें येत विन्धाद्रिभेत्ता ।। सकल सुर समूहा पूज्य जो विश्ववेत्ता ।।
म्हणउनि विणाधारा हे सभा सौख्य हेत ।। धरुनि चतुर विद्वत्भसुरानी समेत ।।

यापरीं दौवारिकानें येउन सभा सिद्ध केल्यानंतर भक्त जना सहित सपरिवार पंचमुख गणपति प्रत्यक्ष येतो निरखा.

दरु : कल्याणी राय ।। आदीताल ।।

पंचास्य गणपति येतो पाहा ।। परम दयानिधि हा ।। प ।।
पंचास्य वाहनि बैसुनि दशकर ।। पद्म भवादिक सुरनुत सादर ।। अ ।।
सिंदूर चर्चित वदन मनोहर ।। मंदिर नैज सुखाचें गुरुतर ।।
इंदु शिखामणि दिव्य गुणाकर ।। सुंदर रूप विनिर्जित सुमहार ।।
मणिमय मस्तकि मुकुटविराजे ।। श्रोणिवर पार्शहि करतलि साजे ।।
फणिवर मंडित कटितट मधुकर ।। रणितविनादित सर्व दिगंबर ।। १ ।।

यापरीं पंचमुख महा गणपति आल्यानंतरें कमलासना रूढ शारदा देवि येते निरखा.

(दरू) वाणी ते येते पहा ।। राणी अजाची ।। प. ।। पाणि धृतवीणा ।। खाणी सुखाची ।। अ. ।। सारस दल नेत्री ।। साधु शुभ कर्त्री ।। सारसुखसवित्री ।। फार सुंदर गात्री ।। १ ।।

यापरि शारदा देवी आल्यानंतरें व्याघ्रपादपतंजलि प्रमुख मुनिगणावृत सर्व मंगले सहित वृष वाहनारूढ सग्दुरू रूप परम सदाशिव येतो निरखा.

(दरू) परम सदाशिव येतो पाहा ।। पंचमुखी परमैश्वर हा ।। प. ।। वरद शिखामणि वांछित पूर्ती ।। करवी सकलांशी करुणामूर्ती ।। अ ।। सोम कलाधर ।। शोक विनाशन ।। व्योमकेश निज ।। धाम पुरातन । स्यामनाम प्रिय ।। साधु जनायन ।। भीम नामा सर्व ।। भीति निवारण ।।

यापरीं गणेशदिकानीं येऊन समस्त विन्धतमस्तोमासवासरमणि परीं नटल्यानंतर सूत्रधार नेपथ्याभिमुख पाहून पारिपार्श्वका इकडें येई.
पारिपार्श्वक प्रवेशून बोलतां -- जें कां जी मज बोलाविलें

सूत्रधार : अरे श्रीमद्भोसल कुल तिलक राजाधिराज श्री शरभेंद्र महाराज प्रतिवर्षं क्रियामाण विनायक चतुर्थी प्रयुक्त गणेश महोत्सव विलोकन कुतूहलें कडून धीरोदार गंभीर बहुतर द्विवज्जन मिलाले आहेत. यास्तव श्रीगणेश लीलार्णवाभिधान नवीन नाटकपों पुढे नाचवण्यानें याचं मन रंजउन आत्मयातें कृतार्थ करूं इच्छितों. पारिपार्श्वका काय सांगू मी आश्चर्य.

पारिपा० : कायतें आश्चर्य ?

सूत्रधार : अरे प्रपंचा मध्यें सुज्ञचतुर रसिक विद्वज्जन फार दुर्लभ त्यामध्यें यखादे असताहेत. ऐशा समद्भाग्य योगें कडून सकलहीं सभासद माझ्या मना जोगेंच लाभले कीं म्हणावयाचेचि परम आश्चर्य. तरि ते कैशे मणिजें सांगतों ऐका.

(श्लोक) काव्यालंकृति नाटकादि रचना कर्ते भले सत्कवी ।।
श्रौतस्मार्त समस्त धर्मविक्षा जे पारीण वेदार्णवीं ।।
श्रृंगारादिरसैकनिष्ठ अवघे चातुर्य सिंधू महा ।।
शास्त्रांचे अवतार भूसुर अशे येथें मिलालें पहा ।।
आणिक यांचा गुण सांगतों ऐका.

(आर्या) उत्तम मुकुरीं पाहे स्वल्प परीं रूप थोर दिसताहे ।।
गानादिक गुण तैसा ।। येथें होईल अधिक दों गुणसा ।।

सूत्रधार : (कान देउन ऐकुन) सभ्य हो काय आज्ञापितां ?

(श्लोक) गणेश लीलार्णव नाटकाला देखावया जीव पहा भुकेला ।।
नवीन झाल्यास्तव तें पहावे तेणें तुवातेंच कि नाचवावें ।।
याप्रकारें आज्ञापितां तरि नवल पारिपार्श्वका हें कसें आहें? म्या जें नाटक नाचवावें म्हणवून मनी योजिलें कीं तेंच नाटक नाचवावें म्हणवून सभ्यांचा नियोगहीं झाला. या वरून काय कीं ईश्वर सत्ता प्रबल आहेशी दिसता हे. तेणें अनंतर करणोयास तुवां शीघ्र सिद्ध झालें पाहिजे.

पारिपा. : विषादें कडून तुम्हास काय नाटक गोंधळ घालून कथाहीं कराल.

सूत्रधार : काय झालेंरे तुजला इतुक्या अनास्थेनें बोलावयास ?

पारि : यापरिस होणें काय प्रत्यक्ष अमचे गोत्रज प्रबल होऊन आमुचा विषय येकंदर आक्रमून आम्हास फार निर्बंध करिताहेत. त्या चिंतेनें मीपणा माझे स्वाधीन नाहीं अनंतर करणीय तें केंवि घडतें ?

सूत्रधार : अरे वेड्या, वावुगि चिंता कां करितोस ? आमुचा धणी राजधिराज दुष्ट निग्रह शिष्ट परिपालनार्थं कृतावतार श्री शरभेंद्र महाराज क्षणांत दुष्टांस शिक्षा लाउन न्याय करून तुझा विषय येकंदर तुजला घेउन देईल परंतु शरण जाउन विज्ञापन मात्र करावें.

पारिपा. महा प्रभूस विज्ञापन करण्यास आमुच्या प्रतिवाद्यानीं कृत्रिमें कडून कांहीं विघ्न योजिलें तरि काय करावें ?

सूत्रधार : अरे कृत्रिम करणाराचें कृत्रिम येकंदर मनास आणुन शेवटीं प्रमाद घडावयाचे पथीं त्यांस निग्रह करावयास समर्थ ऐसा प्राड्विवाक आहे त्याकरितां तन्निमित्त चिंता करावयास कारण नाहीं.

(पारि०) : तरि या नाटकाचा कर्ता कवण.

सूत्रधार अरे बहु प्रसिद्ध या जगीं भोंसल वंश तो तुजला विदित आहे कीं. तो कैसा म्हणिजें.

(आर्या) : आधार कवि जनाला ।। कल्पद्रुम कामधेनु सकळाला ।।
सकल कला गुणशाला ।। ऐसा श्री भोसलाख्य वंश भला ।।
तरि त्याची परंपराहीं कांही सांगतो ऐका.

(आर्या) शंभू येकक्षिति पति शरभ महासेन एक शिवगाजी ॥
श्रीरामचंद्र भीमप्रभु एकोजी वराह एकोजी ॥
परशु ब्रम्ह महीपति शाहू अंबाजि पुरशु पुण्यमती ॥
तैसाचि वीर बाबा मालोजी शहजी तसा नृपती ॥ छ ॥
पुत्र तयाचे तीचे ज्येष्ठ शिवाजी तसाचि संभाजी ॥
तदनुज एकोजीनें आक्रमिला चोल देश बरवा जी ॥ छ ॥
तुक्कोजि राज तत्सुत पुत्र तयाचा प्रतापसिंव्ह नृप ॥
तत्पुत्र श्री तुलज क्ष्मापति जो कीं पित्यास अनुरुप ॥

सूत्रधार : पारिपार्श्वका बाबाजी राजाचे जेष्ठ पुत्र मालोजी राजा पासून साहेब पुरुष तुजला महाराजानीं त्या बाबाजी राजाचे कनिष्ट पुत्र विठोजी राजा पासून आठवे पुरुष शरभेंद्र महाराजांस स्वीकार करुन घेतिलें. तें परंपराहीं सांगतों ऐका.

(आर्या) बावाजि राजयाचा पुत्र दुजा जो विठोजि नाम भला ॥
पुत्र तयाचा त्र्यंबक तदुदरिं गंगाजि राज उद्भवला ॥ छ ॥
बुव्वाजि राज तत्सुत त्याचा ग्रंगाजि राज सुत चतुर
तज्जसुभानजि सौंदबाई धवतज्ज शहजी शूर छ
तत्पुत्र दस्त घेउनि राजस राणी सहित तुलजेंद्र
शरभेंद्र नाम ठेउनि बसवी स्वपदीं तयाशि राजेंद्र

सूत्रधार : तो शरभेंद्र कैसा म्हणिजे सांगतों ऐका.

(श्लोक) उदार गंभीर तसाचि पाहीं। विभूति रुद्राक्ष धरी सदाहीं
शिवार्चनी तत्पर एक रुप शैवाग्रणी हा शरभेंद्र भूप ॥
ज्याचें बाल शिवाजी राजा सदगुण सुकुमार पांचहि कन्या सुंदर शोभत ज्याचा मनोज्ञ संसार ऐशा श्री शरभेंद्रें नाटक हे निर्मिले दयासांद्रं आश्रित चकोरचंद्रेसमस्तविद्याकलापतिस्तंद्रें

पारि. : तरि या वर्षऋतूस वर्णून गावोंयास आरंभ कीजे म्हणतांच सूत्रधार गातों निरखा.

(आर्या) हे दिवस दंपतीलां तरुण पणीं फार मोहक मतीला।
स्त्री पुरुष बहुत मानी पहुडति अन्योन्य हृदयिं कवलोनी ॥
आणिक ऐकें

(श्लोक) सिंधुप्रताप शमवोनि गणेश धरता। इंद्राशिजेंवि निज राज्य सुखाशि दाता
तैसेंचि वर्षऋतू हा सुखवु महीला ग्रीष्म प्रताप शमवोनि पहा उदेला ॥
(यापरीं सुत्रधार गात असतां नेपथ्या मध्यें) अरे रे कोणरे तो ऐसा गाणार पापी दुरात्मा। (म्हणवोनि शब्द होतां सूत्रधार पारिपार्श्वकास विलोकून) कायरे आम्ही गात असतां ऐसें बोलिला तो अमुका म्हणवून कलत नाहीं बरें आणीक येकदां हा श्लोकच गाणं म्हणिजे अपाप कळतें म्हणवून पुनश्च तो श्लोक गातो निरखा.

'सिंधु प्रताप श. इंद्राशिजे. तैसेचि व. ग्रीष्म प्रताप.' यापरीं पुनश्च नातां : पुनश्च नेपथ्या मध्यें

**(श्लोक)** धणी आमुचा सिंधु दैत्य प्रतापी। यदाज्ञा पहा सर्व लोकाशि तापी ।।
वसे स्वर्ग लोकींच तो मर्द गाजी। अकल्याण तूं बोलशी केंवि पाजी ।।

**सूत्रधार :** तें ऐकून, अरे सिंधु दैत्यमंत्री परमतंत्री चंडासुर येत्या सारिखें दिसतें. या पुढें आम्ही उभें राहणें उचित नव्हे तेणें अनंतर करणीयास जाऊं चला म्हणवुन उभयातानिघून गेल्यानंतर स्वसेवकासहित सिंधु दैत्यमंत्री चंडासुर येतो निरखा.

दरु : वसंत राग शापताल

चंडासुर तो येतो पाहा। खंडा हातीं घेनि हा। प बंडाजुणु हा नीलगिरीचा दिंडा। केवल दुष्ट मतीचा। अखंड पराक्रम दंड धरापरि भंड महा कलभंड हटेशीं। दंडकरीत अखंडहिं व्यर्थचि अंडरिवासि अदंड जनांशी ।।
यापरीं चंडासुर येउन स्वजनास पाहून बोलतो निरखा

**(श्लोक)** जो गंडकी नगरिचा नृप चक्रपाणी। उग्राख्य त्या नृपतिची सुगणैकराणी ।।
तेशानकोतरविमंत्र जये सुताशा। पोटीं धरोनि आणि चिंतुनियां दिनेशा ।।
(त्यानंतरें) स्वप्नी तीच्या तत्पति रुपधारी। तत्कामने नेंतला तमारी ।।
तद्गर्भतामा न सहोनि माता ।। सिंधु प्रदेशीं करिगर्भ पाता ।।

**(छंद)** गर्भतो तदाशोधुनीं जला ।। अर्भका कृती वाढला भला ।।
दुर्भरोदरा सिंधु नामहीं ।। दर्भकुंतला लाभलें महीं ।।
त्यानंतरें आमुचा धणी दिवाकर वर प्रसादें कडून विद्यमान देव यक्ष, राक्षस, दैत्य, दानव, मानवादिकांपासून अवध्यत्व लाभून त्रैलोक्याधिपत्य करित असतां आम्हीं हीं अद्यापि जीवंत असतां कोणकीं आमुच्या धण्यास निग्रह करून देवेंद्रास निजपद देणार? म्हणवून मूर्ख जन मूर्धन्यामाजि अवाई उत्पन्न झाली आहे. त्यास आम्हीही दुस्वप्न पडित्या जागें व्हावें म्हणावयाचें न्यायें कडून इंद्रादि देवांचें बल समूल तुटुन जावयाजोगें भूलोकीं असणार लोकांस शुंभासुराकडुन ताकीद करविली आहे. त्यालाहीं कित्येक कार्य सांगीतिलें आहें. या विना गंडकी नगरामध्यें कारागृहवासी इंद्रादि देव ब्रम्ह विष्णुशीसहित काय करिताहेत म्हणावयाचे वर्तमानासहीं कमलासुरास पाठविलें आहें. शंकर तर गौरीशी सहित कैलास सोडुन प्रथम गणानिशीं गौतमादि ऋषी मंडली निवास भूत त्रिसंध्या क्षेत्रास जाउन पावल्या नंतर तिकडील वर्तमानाहीं चार पाठविले आहेत. यापरीं आम्ही करावयाची जाग्रताकरितों म्हणवून बोलुन चंडासुर आस्थान मंडपीं आसनावरि बसुन मनसुभा करित असतां भुलोकाहून शुभांसुख येतो निरखा.

दरु : वृंदावन सारंग ।। आदिताल ।।

शुंभासुर तो येतो पाहा ।। संभावित निज बांधव हा ।। प ।। रंभादिक सुर युवती देखुनी ।। जंभा फारचि करि मधुपानी ।। अ ।। कुंभ कुंचापरि रंभ

महोदित ।। दंभ भरें दोस्तंभ विलोकित बंभर कूजित गुंभ विरारज ।। दंभो जात विजृंभि मुखां तुज ।। १ ।।
यापरीं शुंभासुर येउन चंडासुर प्रति मुजरा करुन वर्तमान सांगतो निरखा.

(दरू) दैत्य मंत्रि या देवतालयें ।। चैत्यवर्जुनी पाडिलीं स्वयें ।।
सत्य सांगतो सिंधु दैत्य हा ।। नित्य पूजिती लोक ते पहा ।।
यापरी यथाज्ञ सकलही करुन आलों म्हणउन शुंभासुर बोलत असतां ।। गंडकी नगराहून इंद्रादि देवांकडील वर्तमान घेऊन गुप्त चार शिष्य शिष्यणी सहीत माध्व विव्दांस वेषें कमलासुर येतो निरखा.

दरु : कापि राग ।। शापताल ।।

कमलासुर तो येतो पाहा ।। कमलासन मुख सुररिपु हा ।। प ।। कमला पतिहीं भांडुनि ज्यांशीं श्रमला व्यर्थचि सद्गुण राशी ।। अ ।। यापरिं कमलासुर येउन चंडासुराप्रति आशीर्वाद करुन बोलतो निरखा.

(छंद) मंत्रि राजया देव सर्वहीं ।। तंत्र कायकीं योजिती महीं ।।
गंडकी नदी तीरगाश्रमीं मंडपाशी ते निर्मितीयमी ।। यापरीं गंडकी नदी तीराश्रमी ।। मंडपादि रचना पूर्वक कायकीं देवांचें तंत्र चालिलें आहेसें कमलासुरोंन सांगतां तें ऐकुन प्रत्युत्पन्न मती चंडासुर बोलतो निरखा.

(छंद) ममहृदंतरी एक सूचतें ।। अमर सर्वहीं गीष्यमी मतें ।।
श्रमवशें पहा कायकीं व्रत ।। श्रमन साहतां करिति सांप्रत ।।
यापरिं चंडासुरानें त्या गोष्टीची परवाच करिनासें बोलतां ते ऐकुन कमलासुर बोलतो निरखा.

(छंद) जरि मदाग्निचा सूक्ष्मतो कण ।। तरि हीं विझविते न लगतां क्षण ।।
पेटला जरी तो उपेक्षितां नीट आपदा देत तत्वता ।।
यापरीं कमलासुरानें बोलतां तें ऐकुन यास काय करावें म्हणुन विचारुन त्याशि कानामध्ये कमलासुरानें उपाय सांगतां ।। तें ऐकुन चंडासुर फार संतुष्ट होऊन शाबाशि बरें सांगितलास वंचकास वंचकच व्हावें खंडकी नदी स्नानास जातों म्हणउनि देवानिं निरोप घेतिला तो ये करितांच जणु बरें या कामास महा मायावी मुंडासुर प्रबलासुर दोघें हीं समर्थ आहेतसें बोलुन तिकडील जन काय बोलताहेत म्हणउनि विचारितां ऐकिलें वर्तमान कमलासुर सांगतो निरखा.

(छंद) यवसकृशतन् विरह तत्पते ।। निवसुनीशची फार कष्ट ते ।।
नवस नवसुनी सुषपतीस्तव दिवस लोटिते ध्यातवासव ।।
यापरीं नारद मुखें इंद्राणीचे श्रम ऐकुनच देवहीं कायकी यत्न प्रयत्नास लागले आहे तसें तिकडील अवाई आहे म्हणउन कमलासुरानें सांगतां तें ऐकुन चंडासुर हें वर्तमान येकंदर दैत्य राजास जाणतें करूं म्हणत असतां राज्यतंत्र परामर्श करावयास्तव सिंधु दैत्य आस्थान मंडपा प्रति येणार त्याकरितां सभालंकार करावायास दुर्मदा सुर येतो निरखा.

दरु : सामराग ।। आदिताल ।।

दुर्मदासुर येतो पाहा ।। दुष्ट शिरोमणि हा ।। प ।। धर्ममती लवलेशहिं नाहीं वर्मचारी सकलांचे पाहीं ।। अ ।।

यापरीं दुर्मदासुर येउन देव सभेची कटाव गिरी पाहून बोलतो निरखा.

श्लोक : कनक मय सभेचें तेजकिं भारी ।। मरकत मणि याच्या तोरणाच्या कतारीं। सुरतरु सुमनाचे घोंसलबायमान ।। प्रतिखणिहिं सभा हे फार शोभायमान ।। याविनानटविट गायक विदूषकांशी सहित निरंतर प्रवृत्त संगहित निर्मुक्त जलयंत्र मार्गच हे सभा आहे त्याकरितां येथें सिद्ध करावयाचें कांहीं नाहीं म्हणुन निघून जातां मुंडासुर प्रबलासुर दत्त हस्त सेवक जनांशी सहित सिंधु दैत्य येतों निरखा.

दरु : सारंग राग ।। आदिताल ।।

दैत्य धुरंधर येतो सिंधु ।। दौर्जन्याकर दुर्गुण सिंधु पहा ।। प ।। सत्य शौचहीनदुर्जन बंधू समूल आटवि सद्गुण सिंधु ।। अ ।। योगयागति बुडउनि लोकीं राग लोभ वश होउनियांकीं। भोग भाग्य बहु भोगित नाकी ।। नागवरापरीं मस्त विलोकी ।।

यापरीं सिंधु दैत्य येउन चंडासुरानें उठून मुजरा केल्यानंतर आसनावरि बसता सिंधु दैत्याचे चाकरिस गायक जन येतो निरखा.

(दरू) गायक जन तो येतो पाहा ।। गान कला विद हा ।। प ।। काय वदूमी डंभययाचा कांचन भूषित वीणा ज्याचा ।। अ ।।

यापरी गायकानी येउन स्वस्व सामर्थ्य प्रगटन करुन बहुमान घेउन गेल्यानंतरें सिंधु दैत्याने चंडासुरा प्रति जूमाकाय खर्च काय म्हणुन राज्यतंत्र परामर्श करितां त्याप्रति चंडासुर बोलतो निरखा.

(श्लोक) जमाखर्च दोनीसहीं ठावनाहीं ।। जसानातसा स्वर्ग हा नीट पाहीं ।। नसे देवनाथेबहीं पीक पाणी ।। तुम्ही ते तुम्ही तेवि आम्हीं हि आणी ।।

यापरीं बोलुन पुनश्च बोलतो निरखा.

छंद : मनुज पुंगवा कारभार हा ।। अनुदिनीं तुझा करित मी पहा ।। मनुज लोकिचें वृत्त ऐकुनी ।। तनुसकांपाही सुटत निशीदिनीं ।। अ ।।

यापरीं बोलुन देवानीं आरंभिला तो यत्नहीं कानीं सांगतां तें ऐकुन सिंधु दैत्य बोलतों निरखा.

दरू : व्यागडा राग ।। आदिताल ।।

तारापति ब्रंम्ह बंधू तो हा ।। मारावा क्षण न लगत पाहा ।। प ।। कारा गृहवास लाभुनि हा हा ।। काराकरितां हिं दुर्बुद्धि महा ।। अ ।।

यापरीं बोलुन इतुकियास निज वर्तमान कळत नाहीं कीं म्हणुन सिंधु दैत्यानें तजवीज करित असतां पर्वत ऋषी सहीत कलह प्रिय नारद येतो निरखा.

दरु : पंतुवरालि ।। शापताल ।।

सुरमुनि नारद येतो पाहा ।। करधृत दिव्य खिपंची हा ।। प ।। परशिव चिंतन पूर्ण मनोरथ ।। परम दयार्णव कामादिक हा ।। अ ।। हर म्हणउनि हरिखुनि नाचत ।। पुरहर वरितहि सरसचि गात ।। सरीगमपधनिस सनिधपमगरिस ।। स्वर ऐशे वाजवि त्वरित जिनाजिनस ।। १ ।।

यापरीं नारद येतं त्याशि नमस्कार करून विशेष वर्तमान काय म्हणवून सिंधु दैत्यानें विचारितां नारद बोलतो निरखा.

श्लोक : पहा कैलासातें त्यजूनि तुज भीणें द्रुतगती ।।
त्रिसंध्या क्षेत्राशी शिव निघुनी गेला पशुपती ।।
हरि ब्रम्हेंद्रांशी अवघडगती प्राप्त सहसा ।।
प्रतापी ऐसा त्रिभुवनिं असे कोण तुजसा ।।

परंतु, (श्लोक) माघ कृष्णचवर्ती कुज वारी ।। संकटापह महाव्रत भारी ।।
त्याशि देव करिती गुरू वाक्यें ।। प्राप्त होत म्हणुनी निज भाग्यें ।।

यापरीं नारदाचें वचन ऐकुन सिंधु दैत्य मंत्रि याची श्लाघना करून बोलतो निरखा.

दरु : मल्हार राग ।। आदिताल ।।

मंत्र तुझा बरखा ।। मंत्रिया ।। प ।। तंत्र आतां करी मानल तैसा ।। मंत्र करी परवा ।। अ ।।

यापरीं श्लाधा पूर्वक चंडासुरास तंत्र करावयास निरोप देउन सिंधु दैत्यानें अंतःपुरास जातां नारद चंडासुर हीं स्वकार्यास निघून गेल्यानंतर इंद्राणीची सखी शर्मदा पटाथेपेंकडून प्रवेशून कनकांगी अझुणीं आली नाहीं म्हणुन कष्टी होतें निरखा.

दरु : सावेरी राग ।। आदिताल ।।

कांते सखी अझुणी आली नाही ।। कनकांगी पाहीं ।। म्या तो तिजकिते कीं सांगितिलें ही ।। प ।। श्रांति अती मम सखिस अहोवि ।। श्रांति चडेइज कवण उपाई ।। अ ।।

यापरीं शर्मदेनें येउन कष्टी होत असतां नलिनी पत्र म्हणालें घेऊन कनकांगी येते निरखा.

दरु : हुशेनी राग ।। आदिताल ।।

कनगांगी ते येते पाहा ।। कमनीय समी हा ।। प ।। कनकाब्जाशीं सदल म्हणालें ।। करीं घेउनि बहुशीत रसालें ।। अ ।। कुंदाकृति शुभ रदना ।। इंदीवर दल नयना ।। इंदु मुखी तेसुविमलजधना ।। सुंदरी निर्जित करिवर गमना ।।

यापरीं कनगांगी येतां ती प्रति शर्मदा निष्ठुर बोलतो निरखा ।।

(श्लोक) स्वाहा देवी धार्यं माण स्वदेहा ।। प्राणत्यागीं प्रायशा योजिते हा ।।
इंद्राणी ते कष्टते फार कांहीं ।। ऐश्या वेली शीघ्र आलीस पाहीं ।।

यापरीं रागें भरुन कनकांगीस माहूत कमल दलादिक शर्मदेनें हिरोनि घेतां कनकांगी बोलते निरखा.

(श्लोक) मंदाकिनी तीर अधींच दूर ।। तेथें अले नारद कीं समोर ।।
त्यांनी कृपेंन कथिली सुवार्ता ।। गणेश युष्मछ्रम शीघ्र हर्ता ।।

यास्तव कांही उशीर लागला म्हणुन कनकांगीनें सांगत असतां शुकशारिकाद्यलंकृत क्रिडोद्यानवनगत पल्लव शयनोपविष्ट प्रियं वद दिचेटी जनोप चर्यमाण स्वाहा देवी इंद्राणी देवी देत निरखा.

दरु : आहेरी राग ।। आदिताल ।।

इंद्राणी ते येते पाहा ।। इंदुमुखी विरहीण महा ।। प ।। इंद्राचाकीं आठवला भुनि ।। तंद्रा घडि घडि पावत निजमनिं ।। अ ।। पांडर कांति विराज दपधन ।। पल्लव विरचित मृदुतर शयना ।। मंडन भूत चतुर्दश भुवना ।। मणिमय रुचिरतरान्दुभुत वसना ।। १ ।। विरह भरें अति कृश अलि वेणी विपुलाक्षी मृदु पल्लव पाणी ।। परभृत कूजित सुंदर वाणी ।। परमोदार गुणांची खाणी ।। २ ।।

दरु : गौलि पंतुराग ।। आदिताल ।।

आली इंद्राणी देवी ।। आलींशी बरवी ।। प ।। झाली जे विरहीण ।। काल गती कडुन ।। अ ।। सोनीं वचां पेकली ।। सोन्याचीकीं पुतली ।। बोलत कामीण ।। बोल बहु करुण ।। १ ।।

दरु : पूर्व भैरवी ।। आदिताल ।।

मी कैशी सोसुं बाई ।। हा ताप केवि जाई ।। हें दुस्त तूंचि लेई ।। हे वस्तभाव घेई ।। मी काय सांगुं आई बहु कष्टतें अगाई ।। मी गुंतलें अपाई मम चित्त केंवि धाई ।। हे नव्हे नव्हे घाई ।। कैं प्राणनाथ येई ।। १० ।।

(दरु) दहिमत सुरासुर सुमशर मजकरि ।। अमित उपद्रव ।। शमन नव्हे परि ।। १ ।।
यापरीं इंद्राणी देवी येतां ती प्रति सखी जन शीतलोपचार करितो निरखा ।।

दरु : आनंद भैरवी राग ।। आदिताल ।।

सारशीतलोपचार सखी जन ।। फार करितकि सारस नयन ।। प ।। गार जशी सुख ।। कारकतत्पाधार तसें धन ।। सारविले पुन ।। अ ।। चंदन पंक हि चर्चनि तिजला ।। सुंदरी बोलति ।। सुख काय तुजला ।। इंदुमुखी ते निंदुनि बोले ।। मंदपवनहिं मजलागि पोले ।। १ ।। शीतहि मोदक सेवन करितां जात वेदीं धृत ।। पातन होती जोति उठेत्मशि ।। रीती घडे मज मातखरी सखी हे तूं समज ।। २ ।।

यापरीं धनसार चंदनद्रवव्यजनवात परिमलोदक मृणाल वलयादिकांकडून नाना शीतलोपचार करितां हीं विरहताप साहवेनासें इंद्राणी देवी सखी प्रति बोलते निरखा.

दरु : पुन्नागवरालि राग ।। अटताल ।।

सखी ये मी कैशी सोसुं बाई ।। बहुताप अगाई ।। अखिलांगी बाधा सांगं काई ।। प ।। सुखित करुं मज झडकरि भेटवि निखिल सुरेश्वर तो या

समई ।। अ ।। मंदानिल मजकरित उबारा ।। जिव झाला वारा ।। धंदा मज नाहीं सुचत दुसरा ।। मंदारद्रुम पुष्पित बकुल हिं ।। कुंदावलि मज योजि अपाई ।। १ ।। इंदुम किरणें तापी ।। गुरुतल्पग पाणी निंदूं मी किति लांछित रुपी ।। वंदूनिहिस्मर उद्भव बहुजल ।। बिंदु मम नेत्राचे ठाई ।। २ ।। राहुहर नेत्रानल कण भुजगी ।। प्रस्तांगहिं वेगीं दाहूं मज सांप्रत तदैंगुण भागी ।। राहुनिकि मज गांजिति तीथें ।। साहूं मी कीति ।। निशिदिनि हुदई ।। ३ ।। सलिती मजलागी शुकपिकनिनद ।। बहु मंजुल सुखद ।। अलिचाझंकारहिं उपजवि खेद ।। पलभर हीं मम ताप शमेना ।। पल्लव शयन हिं शोषुनि जाई ।। ४ ।।

यापरीं इंद्राणी देवि विरहतापें कष्टी होतां तीची सखी शर्मदा बोलते निरखा.

(आर्या) आजि गणेश चतुर्थीव्रत सखि ये जाण विन्ध्य राजाचे ।।
त्यास्तव पूजा त्याची केल्यां पुरवील इष्ट तो मनिचें ।।

यापरीं शर्मदेनें बोलतां अंद्राणी देवि परम भक्ती कडून सिंह वाहन दशभुज त्रिमुख महा गणपतीची पूजा करून प्रार्थना पूर्वक स्त्रोत्र करितेत निरखा.

(श्लोक) श्रीसच्चिदानंद गणेश पाहीं ।। भक्तावली रक्षितसे सदाहीं ।।
कालत्रया बाधित दिव्य देहीं ।। प्रवेश वोतो मज सौख्य गेहीं ।।

यापरीं स्त्रोत्र करून भक्ती पारवश्यानें इंद्राणी ध्यान करित असतां हंसवाहनारूढ दशेंद्रिय दशभुज सत्वरजस्पमो गुणात्मक मुखत्रय विशिष्ट शुद्ध सत्व सत्व प्रधान तुरीय मूर्ति महागणपति प्रत्यक्ष होऊन येतो निरखा ।।

दरु : सौराष्ट्र राग ।। आदिताल ।।

येतो महा गणपति पाहा ।। येथें करुणा सिंधु महा ।। प ।। देतो निज सुख भक्त समूहा देवेश्वर सुर पालक हा ।। अ ।। सिंदुर पंक विराजित सुंदर सिंधुर वदन मनाशि अगोचर इंदुशिखामणि विश्व धुरंधर ।। इंद्र सुखासर पूजित सादर ।। १ ।।

यापरीं महागणपति प्रत्यक्ष होता सपरिवार इंद्राणी महागणपतीची पूजा करून भक्ती पारश्यानें नर्तन करित प्रदक्षिणा करिते निरखा.

(श्लोक) कृतादित्तीं युगीं पहा मृगेंद्र मोर उंदिरीं ।। उदार धरिर तुं महा बसोनि राजशीतरी ।। अनादि मध्य — दाहासाहाचहूकरीं ।। प्रकाशसी गणाधिपा कृपानिधे कृपाकरी ।।

यापरीं नर्तन करून इंद्राणी देवी प्रार्थना करिते निरखा.

दरु : शाहन राग ।। शापताल ।।

श्रीगणनाथा सिद्धि विनायका ।। प ।। योगि जनांशी यो . . . . मुखा ।। अ ।।
मागतसें तुज ।। लागि मी आतां ।। लागवेगें पति योग अनंता ।। १ ।।
यापरीं महागणपतीची प्रार्थना करितां आकाश वाणी होते निरखा.

(श्लोक) इंद्राणी तावक मनोरथ सर्व पूर्ण ।। होतील मामक कटाक्ष वशें किं तूर्ण ।। . . . . . .मानसांबुज दिवाकर वासवाची होईल भेटि तुजला मम गोष्टिसाची ।।

यापरीं महागणपति इंद्राणीस वर प्रदान करून नित्यानंद मंदिर प्रवेशतां निष्क्रांत. सर्व इति श्री भोसलकुल दुग्ध सागर सुधाकर श्रीचंद्र मौलीश्वर प्रसाद लब्ध चोल सिंहासन संपत्संतति राजाधिराज महाराज छत्रपति भूलोक देवेंद्र श्री शरभेंद्र भूपाल विरचित श्रीगणेश लीलार्णव नाटके प्रथमोंकः ।। १ ।।

।। सिद्धि विनायकाय जय मंगलं ।।

श्रीगणेशाय नमः ।। त्यानंतरें संकष्ट हर चतुर्थीव्रता चरणानिमित्त गंडकी नदी तीरस्थ बृहस्पत्याश्रमा प्रति देवेंद्राची स्वारी होणार त्या करितां मार्ग नीट करावा म्हणवुन विश्वकर्म्यासि जोर ताकीद करावयास देवदास नामक दौवारिक येतो निरखा.

(दरु) दौवारिक तो ।।

यापरीं दौवारिकानें येउन स्वजन मुखें ताकीद करवितां मार्ग नीट करावयास खनित्रपिटकादि युक्त स्वसेवकांसहित विश्वकर्मा येतो निरखा.

दरु : शद्ध सावेरी राग ।। आदिताल ।।

विश्वकर्मा तो येतो पाहा ।। अश्वगती अवलंबुनि हा ।। प ।।
विश्वपती पथ नीट कराया विश्व निजजन घेउनियां ।। अ ।।
यानगमागम योग्य विशाल ।। मान धराया निज जन पाल मान दंडकरिं घेउनि सादर ।। मार्ग मेजीतकिं धाउनि फार ।। १ ।।

यापरीं विश्वकर्मा येतां त्याचे शेवक संकोचानें त्याप्रति बोलताहेत निरखा.

(श्लोक) मुखानिलें मार्ग समान पाहीं ।। त्रिविष्टपामाजि करूं सदाहीं ।।
खनिज खांदूंया त्या अम्हाशी ।। पांटी शिरीं वोढवली त्रियेशी ।।

यापरीं शेवकांनी कष्टी होतां त्यास अनंत कोटि ब्रम्हांड नायक विनायक प्रसादें कडून लौकरीच देवेंद्रास निज राज्य प्राप्ती घडेल तुम्हीं कांही चिंता करु नका सांप्रत कालावरि दृष्टि देउन कार्य करा म्हणुन समाधान करुन मार्गहीं नीट करवुन विश्वकर्मा निघून गेल्यानंतर बृहस्पति भगवान स्वाश्रमांत व्रतकार्यासक्त आहे त्याकरितां देवेंद्राचे स्वारीस मुहूर्त पहावयास गंडकी नगरिचा पंचांगी प्रभाकर जोशी येतो निरखा,

दरु : पूर्ण चंद्रिका राग ।। झापताल ।।

जोशी तो येतो पाहा ।। जो गणिप्तति महा ।। प ।। कोशी कृतफल शास्त्रा सांगुनि ।। कोटीश्वर झाला जो भुवनीं ।। अ ।।
हातीं घेउनि पुस्तक भार ।। हालत मालत डोलत सुंदर ।।
धौतांबरहीं नेसुनि वेगें ।। धीचत शिष्यहिं घेउनि संगें ।। १ ।।

यापरीं जोश्यानें येउन दौवारिकाकडे वृषभ लग्न स्वारीस मूहूर्त उत्तकुआहे म्हणवून सांगून जातां बृहस्पत्याश्रमास जावयास सुरपरिवारासहित रथारुढ देवेंद्र येतो निरखा,

दरू : वसंत भैरवी राग ।। आदिताळ ।।

अमराधिप रथि बैसुनि येतो ।। अद्भत महिमा हा ।। प ।।
अमितामरगण वेष्टनि सविनय ।। आदर करिति पहा ।। अ ।।
श्रमतशची विरहानें सांप्रत ।। सुमुखाचें भजनें ।।
अमरावतिचा लाभ घडेलचि म्हणउनि हरिखानें ।। १ ।।

यापरीं देवेंद्र येउनि भारी कार्यास ब्रम्ह विष्णूखेरीज आम्ही जाणें उचित नव्हे म्हणवून महा विष्णूचें स्मरण करितां गरुडउरूढ महाविष्णू येतो निरखा.

दरू : श्रीराग ।। आदिताळ ।।

विष्णु तो गरुडावरि बैसुनि वेगें येत पहा ।। प ।।
विष्णुचा जो निज कैवारी जितमन्मथ वपु हा ।। अ ।।
कमलानायक पीतांबर धर ।। करुणा सिंधु महा ।।
कमलानन निज भक्तजनावन कंसा सुरवर हा ।। १ ।।

यापरीं महाविष्णु येतां त्याशि नमस्कार करून इंद्रानें ब्रम्ह देवाचें स्मरण करितां हंसारुढ ब्रम्ह देव येतो निरखा.

दरू : रीति गौळ राग ।। आदिताळ ।।

हंसावरि बैसुनियां ब्रम्हा हरिखें येत पहा ।। प ।।
कंसा रांति तनुज चतुर्मुख ।। कमनीया कृति हा ।। अ ।।
सकळ जगासहिं निर्माता जो ।। समस्त गुणसीमा ।।
अकपटतापस जनवर दायक अद्भुत तर महिमा ।। १ ।।

यापरीं ब्रम्हदेव आल्यानंतर त्यासहीं नमस्कार करून सर्वज्ञा सहित असुर भयास्तव रहस्यानें बृहस्पत्या श्रमास देवेंद्र जात असतां ।। हें वर्तमान दैत्यांस अगाऊच कळल्या करितां देवानी गुर्वाश्रमास जाउनपांवना त्या अगोधरि मनोवेगें तिकडें जाऊन तिरस्करिणी विद्या प्रभावें कडुन उदृश्य असून संदर्भानुसार माया प्रयोग करून व्रतास विन्ध करावें म्हणावयाचे तात्पर्यानें प्रबलासुरा सहित मुंडासुर येतो निरखा.

दरू : अठाणा राग ।। शापताळ ।।

मुंडासुर येतो पाहा ।।। शुंडाकृति भुज हा ।। प ।।
चंडालचि जणु दुसरा ज्याची ।। चंडासुर वत दुष्टसमी हा ।। अ ।।
शूल विराजित हस्त कृपाणी ।। स्थूल महा अति कर्कश पाणी ।।
मूल अद्याचें जोखर पाणी ।। झुलत झुलत दुर्गुणी खाणी ।। १ ।।

यापरीं मुंडासुर येउन प्रबलासुरा प्रति ।। सखे प्रबला सुरा ।। बृहस्पती महा तपोनिधी तपोनिधी ब्रम्ह निष्ठ झाल्या करितां यखादें शापून भस्म करून सोडील त्यास्तव आम्ही फार जाग्रतेनें कार्य करावें म्हणउन बोलुन सवेंच अडवाटेनें देवांस अगाऊ आश्रमा समीप जाऊन आश्चर्य मानितो निरखा.

(श्लोक) व्याघ्रीच्यास्तन्यपाना करिति पह पहा वांसरें या वनांतीं ।।
आन्योन्य क्रीड तीरेन कुल भुजगहीं लाघुनी वैरशांती ।।
शुंडा दंड प्रमोदें कवलुनि बरवी कंधरा केसरीची ।।
खेळे निःशंक येथे कलमनवल हे राहटीकीं मृगांची ।।
यापरीं मुंडाबुरानें आश्चर्य मानितां त्याप्रति प्रबलासुर बोलतो निरखा.

दरू : शंकरा भरण राग ।। अटताळ शाप ।।

निश्चय सुरगुरु आश्रम हा ।। निर्वैरचरत मृगाळि पहा ।। प ।।
निश्चलात्मक हृदय होतकीं ।। निर्मलत्व हि सहज येतकिं ।।
दुश्चरित्रीं मनहिं नरिझत ।। दुःख परिहरि हें विलोकी ।। अ ।।

यापरीं बोलुन दोघेंही आश्रमांत जाऊन तिरस्करिणी प्रभावें कडून अदृश्य होऊन बसुन आश्रम व्यापार येकंदर अवलोकित असतां ।। येइकडें सुरवरांसहित देवेंद्र आश्रमा समीप येऊन दैवाधीन जलदीनें रहस्यें कडून आश्रमास येऊन पावलों की म्हणउन संतोषानें चहुंकडें पाहून आश्रम वर्णितो निरखा.

दरू : कुरंजी राग ।। आदिताळ ।।

आश्रम बरवा गुरुचा ।। प ।।
विश्रांतिचा ठांवचि नयना ।। विश्वमुखें हिरवा ।। अ ।।
भगवंताशी पूजूं रोपित ।। बहुदन नामरुवा ।। १ ।।
मधुकर संहति ।। कुसुमित वृक्षीं ।। मंजुळ करितरवा ।। २ ।।

यापरीं आश्रम वर्णून देवेंद्र आश्रमांत जातां ।। ब्रम्ह विष्णुनीहीं आश्रम पद चरण रजें पावन करितां ।। त्यांस अर्ध्यपाद्य पूजा करावयास गुरु पत्नी तारा येते निरखा.

दरू : असावेरी राग ।। आदिताळ ।।

तारायेते पाहा ।। ताराधिप वदना ।। प ।।
दाराजे सुरगुरुची सुरवर ।। वारा उपचारुं गजगमना ।। अ ।।
पति शुश्रुषा करणीं ।। अति तत्पते शुकवाणी ।।
मति सागर मृदुपल्लव पाणी ।। प्रति सज्जनहीं पूजूं शांहणी ।। १ ।।

यापरी गुरु पत्नी तारेनें येउन विष्णु ब्रंम्हादिकांस अर्ध्य पाद्य पूजा केल्यांनंतर देवेंद्र तारें प्रति प्रणाम करुन बोलतो निरखा.

(आर्या) श्रीगुरु कोठें गेले या समई सांग माउले बाई ।। व्रतविधि करावयास्तव आलों आम्हीं समग्रहिं उपाई ।।
यापरीं देवेंद्रानें विचारितां गुरुपत्नी तारा बोलते निरखा.

(श्लोक) शुभ्राक्षता कुसुम चंदन तूप केलें ।। नैवेद्य मोदक सुपक्वकपित्थ केळें
सिंदूर धूप आणि दीपहि नारि केलें पंचामृदिक समस्तहिं सिद्ध कलें ।।
या विना.

(श्लोक) दुर्वाजपा कुसुम मुख्यतशीत पत्रीं ।। आणावयाशि तुमचे गुरु पुण्य गात्री ।।
गेले कचासहित या सुम वाटिकेशी ।। येतील सत्व पहा तुम्हीं मंडपाशी ।।

यापरीं बोलुन गुरु पत्नी तारा देवां प्रति कदळींस्तंभ तोरण पुष्पमालाद्य-लंकृत पूजा मंडप दाखवित असतां देवहीं असुर प्राबल्याची वेळ संध्याकाळ होत येताहीं अद्यापि श्रीगुरु आले नाहींत की म्हणउ नि चिंता करित असतां हें अंतर लाभून बृहस्पति आणि तत्पुत्र कचया उभयतांचीं रुपें अवलंबून मुंडासुर प्रबलासुर येताहेत निरखा.

दरू : मोहन राग ।। शापताळ ।।

मुंडासुर प्रबलासुर गुरुकच ।। मूर्ती येत पाहा ।। प ।।
मुंडाहृतजटसम दूर्वांकर मूर्ख धुरीणु महा ।। अ ।।
दंडावरि रुद्राक्ष स्मरणी ।। तळाकंठीं तुंडाकृति बहु सौम्य भूतिधर
तुष्टताशितिकंठीं ।। १ ।।

यापरीं गुरूकचरुपीं मुंडासुर प्रबलासुर दोघेंही येतां मुंडासुर प्रति एकांतीं प्रबलासुर बोलतो निरखा.

(श्लोक) ऐशा तुवां आकृति तेचि आतां ।। तारा तुझी बाइल होय आतां ।। अदृष्ट माझे फटकाळ पाहीं । सेवा करावी तुमची सदाहीं ।।

यापरीं प्रबलासुराचें वचन ऐकुन हंसुन हा परवनिता स्वीकीयत्व कल्पना नंद येकंदर बृहस्पति येतो. पर्यंतर्चाकि इतुकियांत कां असूया करितोस सांप्रत देव जवळि झाले आतां उगाच ऐस म्हणवुनि देवांस सन्मुख जातां देवेंद्र समोर येउन साष्टांग प्रणाम करितां मुंडासुर आशीर्वाद निरखा.

(श्लोक) बारे तुला विजय शीघ्र घडोनि पाही ।। कल्पद्रुमातळिंशची रति सौख्य लाही त्रैलोक्य राज्यपद तूर्ण हतासि येवो ।। श्रीमद्गजानन कृपा तुज आशु होवो ।।

यापरीं मुंडासरानें आशीर्वाद करितां त्याशि देवेंद्रानें ।। स्वामीनीं मजकरितां मनः पूर्वक इतुकें श्रमत असतां ।। मजला कोणती गोष्टि असाध्य ।। शीघ्र सिंधु दैत्य मस्तकीं स्या पद अर्पिलेंच म्हणतां ।। प्रकृतानुसार देवेंद्रा प्रति प्रबलासुर बोलतो निरखा ।।

(श्लोक) इंद्रा तुझा ध्यासचि नित्य पाहें ।। श्रीतात पादा बहु लागला हे ।।
तुला कसें हीं निज राज्य यावें ।। तेंव्हांचि यांचें मन तुष्टव्हें ।।

यापरीं बोलुन दुरुन पाहून महाविष्णु ब्रंम्हा देवानीहीं आमचे आश्रम पदपावन केल्यासें दिसतें हें म्हणतां ।। त्याशि देवेंद्रानें स्वामीचे शिव्यत्वेंकडून माझेठाई त्यांस इतुका अनुग्रह म्हणतां मुंडासुर विश्वासाभिनय करून बोलतो निरखा.

दरू : कांबोदि राग ।। शापताळ ।।

ते हरिविधी कोठें ।। हे हरति भव दुःख हिं मोटे ।। प ।।
हे कुरवंडी करीन त्यांवरिं ।। मोह ममतादि सोडुनि लवकरि ।।

यापरीं बोलुन कचा अर्ध्व म्हणतां त्याशि देवेंद्रानें मातोश्रीनीं पूजा केली म्हणतां त्वरित गतीनें येउन महाविष्णु ब्रम्हदेवांस प्रणाम करून त्यांनी शिघ्र देवेंद्र मनोरथ सिद्ध करी म्हणवुन केला तो आशीर्वाद हीं घेऊन पुनश्च बोलतो निरखा.

दरू : घंटाराग ।। शापताळ ।।

धन्यमी आजी जाहलों पांही ।। वन्य वृत्ती करितां हीं ।। प ।।
मान्य त्रिभुवनि श्रीहरि तदुदर जन्य विधीहिं मदशिसगोचर ।। अ ।।

यापरीं मुंडासुर हरिविधी दर्शनानंदाभिनय करून देवेंद्राप्रति बारे असुर प्राबल्याची वेळ झाल्याकरितां येखादे कांही विघ्न वोढवेल. त्याकरितां लौकरीच निनायक पूजेचा प्रयत्न कीजे म्हणत असतां ।। दौवारिक येउन आश्चर्य पूर्वक देवांस विज्ञापन करितो निरखा.

(श्लोक) नवल नवल पूर्वी श्रीगुरु एक आले ।। कच सहित दुजेते सांप्रत प्राप्त झाले
कुसुम सहित दुर्वायुक्त हस्ताग्रहे हीं ।। उभयसुर गुरुजी भेद कांहीच नाहीं ।।

यापरीं दौवारिकानें येउन विज्ञापन करितां प्रबलासुरांसहित मुंडासुर येकंदरा बराबरी आपणहीं क्षणभरि तटस्थ राहुन मग बोलतो निरखा.

(श्लोक) अगाऊच म्यां सुचना जाणविली ।। अहो असुरी वेळ हे प्राप्त झाली ।।
त्वरेनें समारंभ कीजे व्रताचा ।। असें जाणुनी यत्न केला तयाचा ।।

यापरीं मुंडासुरानें बोलतां त्याप्रति देवेंद्र बोलतो निरखा.

(श्लोक) स्वामी तुम्हीं सांगितल्या प्रकारें आरंभिली भावकिं दैत्य चोरें ।।
टाळोहि विघ्न पहा त्वरेनें ।। म्या पाविजे स्वार्थ भवकृपेनें ।।

यापरीं देवेंद्रानें बोलतां मुंडासुर. बृहस्पतीचें ठाई इंद्रास दैत्य बुद्धि आली. ते दृढ करावयास अत्युक्ती करून बोलातो निरखा.

(श्लोक) निजासन्निधानीं पहा कृत्रिमाला ।। घडे ठाव हे युक्ती जगाला ।।
असें जाणुनी युक्ती हे व्युक्रमानें ।। नवी काढिली जाण दैत्याधमानें ।।

यापरीं बोलुन याचा भाव देवेंद्रास नीट समजाया जोगें पुनश्च बोलातो निरखा.

(श्लोक) आम्ही पहा तुजकडें असतां त्वरेनें ।। अस्मद्वपु आपण ओलियानें ।।
होऊं किं आपणचि साव म्हणोनि त्यांनें ।। अत्युक्ती युक्ती रचिली कशि राक्षसानें ।।

यापरीं बोलुन पुढें बृहस्पतीच्या दर बोलण्यास देवेंद्रानें मनामाजि अन्यथा भासुन घ्यावया जोगें बीजारोप करून पुनश्च बोलतो निरखा.

(श्लोक) यथामानसामोर जावोनि त्यां ते ।। बलावोनि कीं आणि जे दानवातें ।।
तदुक्तीसकीं भावतो होत जाय ।। स्वभावें तुला सांगणें फार काय ।।

यापरीं मुंडासुरानें बोलतां बृहस्पतीस प्रणाम करायास मागें सरून देवेंद्र बोलतो निरखा.

(श्लोक) स्वामीचे चरणारविंद नमीले ज्या मस्तकें म्या असा ।
तो मी त्या निज मस्तकें अरिचिया पायांशि वंदू कसा ।
कैसें वोढवलें मला कटकटा हें कर्म आतां बळें ।। स्वामी श्री गणनायका लवकरी देई कृपेची फळें ।।

यापरीं देवेंद्रानें बोलतां मुंडासुर देवेंद्राप्रति पाहून प्रपंच मध्य वेषधाऱ्यास देखील वेषानुसार कळुन मर्यादा आहे. अैक्यास हातरसुर गुरुमीच म्हणऊन

आला आहे त्या करितां अवश्य मर्यादा करूनच सरावीसें बृहस्पती शापभयें बोलुन व्रतास मात्र कसेहीं अटताळा पडावया जोगें पुनश्च बोलतो निरखा.

(श्लोक) भ्रम प्रमादप्रति पुरुषांशी ।। संभावित प्राक्त कर्म पाशी ।।
तेणें तुवां त्या कड्नीच ताता ।। नारंभि जेकी व्रतमात आतां ।।
यापरीं बोलुन त्यांनी जास्ती पांडित्य कांही केलियां क्षणांत शापून भस्म करून तपोव्यय झालातरीं करीन. परंतु तु कांहीं चिंता करू नको म्हणउन बोलुन बृहस्पतीसमोर ठराबयास मागें सरून मुक्तपंतरानें बोलतो निरखा.

(श्लोक) आम्हा समोर जनुदानव दुष्ट बुद्धी ।। येतांचि खिन्न मनि होतिल जाण आधीं ।।
तेव्हां तदश्य समग्र नये बिदीस ।। तेणें अम्ही क्षणकिं आड असूं दिष्टीस ।।
यापरीं मुंडासुरानें बोलतां देवेंद्रानें स्वामीची इच्छा प्रमाण म्हणतां प्रबलासुरासहित मुंडासुर बाजू घेऊन तिरस्करिणी प्रभावें अदृश्य होउन बसला असतां देवेंद्रानें दौवारिकास सांप्रत आले. ते गुरुहीं आश्रमांत येवोत म्हणऊनि आज्ञाप करितां कच नामक पुत्रासहित सुरगुरु बृहस्पति येतो निरखा.

दरू : दरुबारु राग ।। आदिताळ ।।

सुरगुरु गुरु येतो पाहा ।। हरित कचातनुजास हा ।। प ।।
परिस मनोहर दुर्वासुमकर ।। हरिशिव म्हणउनि बोलत सादर ।। अ ।।
मस्तकिं भव्य जटाभर शोभत ।। मंगळ दिव्य विभूति विभूषिता ।।
हस्तामिताहंकृति सुख राशी ।। अमल गुणप्रद सकल जनांशी ।।
शस्त गुणाकर निज सुख राशी ।। क्षर्मविधायक सकळ जनांशी ।। १ ।।
यापरीं सुद्गुरु बृहस्पति येउन कचा प्रति पाहून. बारे आम्हीं आश्रमातुनि निघूनि येतांच इंद्रादि देव आश्रमास आले असतील. हे अंतर लाभून असुर काय कृत्रिम करिताहेत कीं कळेना.
यापरीं बोलुन चिंता करित बृहस्पती येत असतां दौवारिक सामोरा जाउन बोलतो निरखा.

(आर्या) दुरुनि तुम्हाशि देखुनि निरोप घेवोनिक पातलो आतां ।।
नातरि अटक करावें पडतें तुम्हाशि आश्रमीं जातां ।।
यापरींदौवारिकानें बोलतां बृहस्पती फार संशया विष्ट चित्त होउन बोलतो निरखा.

दरु : जुजावती ।। राग शापताळ ।।

अटक कां तुवां तुम्हाशि ।। आजि करिजतें रे । प ।।
हटकुनि विचारितों किं ।। आशु तुं कथीं रें ।। अ ।।
कटकटा प्रमाद बहुत ।। घडुनि अता असे नियत ।।
झटिति कृत्रिमाशि ठाव ।। जाहला कसारे ।। १ ।।
यापरीं बृहस्पतीनें विचारितां. दौवारिक बोलतो जें. कृत्रिमास ठाव कसा झाला म्हणुन तुम्हीं आमास विचारितां. तरि फार चांगलें आहें. आमुचे गुरु स्वामी आश्रमास येउन पावले तें वर्तमान कळनासें दगा पाउन आला कीं. नाहीं तरि आमुच्या गुरु स्वामीनीं सांगीतल्याप्रमाणें त्यांस कृत्रिमी

करून दाखवायास अत्युक्ती युक्ती करून आलां कीं. बरें तें कसेंतरी असो मर्यादेनें आश्रमांत जाऊन निघुन गेलां तरी बरें. नाहीं तरि स्वामीचे शापें दोघेहीं भस्म होउनि जाल.

यापरी दौवारिकानें बोलतां बृहस्पती कचा प्रति बोलतो निरखा.

**दरु :** मोहन कल्याणी राग ॥ आदिताळ ॥

ज्यास मी भात होतें ॥ तें मज आलें ॥ या समई मन भ्रमलें ॥ प ॥
भासत्तेस मज समूळ माया ॥ भाषित अैकुनि याचे सखया ॥ अ ॥

यापरी बोलुन. कचा आम्ही वाट चुकलों नाहीं कीं.

अथवा वाटे मध्येंच दैत्यानीं मायेनें आश्रम निर्माण करुन सपरिवार देवेंद्र सपरिवार आम्हीं यां समस्ताचीं रुपें अवलंकन आम्हीं उभयतांचें रुप धरिल्यां त्याचे ठाई मात्र अम्हास असुरत्व भासण्यानें ॥

भलत्या असुरास आम्हीं देवेंद्र म्हणुन समजुन व्रत करावयास बैसलें तर ॥ काल विलंबिलंबें कडून व्रतास विघ्न घडेल म्हणावयाचे तात्पर्येकडून महामाया प्रयोग आरंभिलासा दिसतो कीं यास काय करावें ॥

यापरीं बृहस्पतीनें व्यसन मानितां त्यांप्रति कच बोलतो निरखा.

**(श्लोक)** दैत्यांशितो दैव गणेश पाहीं ॥ प्रसन्न होणार कदापि नाहीं ॥
त्याचा कृपा लाभचि सत्य आतां ॥ सुरासुरांशीं निवडोनि देतों ॥

यापरी कचानें बोलतां. त्याशि आम्हा उभयतांची रुपे घेऊन दोघें जण आहे त्या करितां. आम्ही व्रत करावया जोगा संदर्भहीं पडून इकडे देवेंद्र ही यथार्थच असतातर तेव्हां महागणपति प्रत्यकेंकडून निवाडा होईल. नाही तरि देवेंद्राच्या व्रतास विघ्न वोढवलेंच कीं ॥

यापरीं बृहस्पतीनें बोलतां हे येकंदर अैकुन दौवारिक बोलतो निरखा.

**(श्लोक)** जगांत भेटे ठकडेजनाला ॥ तुम्हा परीं वेचुनि युक्ती जाला ॥
बोलोनियां कीं ठकवींत चोर ॥ साधुत्व दावोनि बहु प्रकार ॥

यापरीं दौवारिकानें बोलतां. त्या तें निश्चयें कडुन असुरसें समजुन बृहस्पति प्रत्युत्तर देतो निरखा.

**(श्लोक)** युक्ती प्रयुक्ती सकळांशि पाहीं ॥ प्रज्ञा विशेष सुचती सदा हीं ॥
परंतु दुष्टांस अपायसंतीं योजावया त्या उपयुक्त होती ॥

यापरीं बोलुन कचा सहित आश्रमांत जातां देवेंद्र सामोर येउन प्रणाम करितां बृहस्पती आशीर्वाद करितो निरखा.

**(श्लोक)** बारें तुला विजय शीघ्र घडोनि पाहीं ॥ कल्पद्रुमातळिशचीरति सौख्यलाहीं ॥
त्रैलोक्य राज्यपद तृण हिताशि येवो ॥ श्रीमद्गजानन कृपा तुज आशु होवो ॥

यापरीं बृसस्पतीनें आशीर्वाद करितां. त्याशि देवेंद्रानें मना महिन हा असुर रुपानुसार बोलतो हेसें समजून. बहिरंगास स्वामीनी मज करितां इतुके श्रम करित असतां. मजला कोणती गोष्टि असाध्य शीघ्र सिंधु दैत्य मस्तकीं म्या पद अर्पिलेंच म्हणतां. त्याशि बृहस्पतीनें ही हो दैत्य आपण देवेंद्रच

म्हणुन आम्ही समजाया करितां ऐसें बोलतो म्हणुन मनी समजता. प्रकृतानुसार आम्ही हीं बोलु म्हणउनि देवेंद्राप्रति कच बोलतो निरखा.

(श्लोक) इंद्रा तुझा ध्यासचि नित्य पाहें ।। श्रीतात पदा वहुं लागला हे ।।
तुला कसें हीं निज राज्य यावें ।। तेंव्हांचि यांचें मन तुष्ट व्हावें ।।
यापरीं बोलुन कचानें दुरून पाहून. महाविष्णु ब्रम्ह देवानींहि अदुमुचे आश्रमपद पावन केल्यासें दिसतें. म्हणतां. त्याशि बहिरंगास गुरु स्वामीचे शिष्यत्वें कडुन माझे ठाई त्यांस इतुका अनुग्रह यापरीं देवेंद्राने बोलतां बृहस्पतीहीं बहिरंगास बोलतो निरखा.

(दरू) ते हरिविधी ।।
यापरीं बोलुन कचा अर्घ्य ।। २ ।।
म्हणतां त्याशि देवेंद्रानें ।। हे दोघें हीं अगाऊच आश्रमांत अदृश्य होउन बसुन ।। गुरु स्वामीचें बोलणें आदि करुन सकळ हीं कृप्त करुन घेउन ।। सांप्रत कृत्रिम करावयास आले आहेततेंसें नीट समजून ।। बहिरंगास मातोश्रीनी पूजा केली म्हणतां ।। बृहस्पति त्वरित गती येउन महाविष्णु ब्रंम्ह देवांस प्रणाम करून ।। त्यानी शीघ्र देवेंद्र मनोरथ सिद्ध करी म्हणुन केला तो आशिर्वादहिं घेउन बहिरंगास बोलतो निरखा.

(छंद) धन्यमी आ ।।
यापरीं बृहस्पतीनें हरिविधी दर्शनांनंदाभिनय करून समस्त देवांसहीं असुरसं मानित असतां देवेंद्रहीं तैसेंचि बृहस्पतीस असुरसें समजुन त्यानंतरें दैव योगानें गुरु स्वामी आश्रमास येइना हा अगोधरि त्या उभयतांची रुपें घेउन दैत्यानीं आम्हामध्यें शिरुन अत्युक्ती युक्ती करुन गुरु स्वामीचें ठाई आम्हास इतुका संशय पडाया जोगें केलें असल्यां कामा नये काय म्हणुन उभयत्र संशय पाऊन महाविष्णु प्रति एकांती बोलतो निरखा.

श्लोक : जगन्निवासा गुरु येक मागें ।। आले दुजे सांप्रत लाग वेगें ।।
कोणाशि आता वरि जे दयाळा ।। व्रताशि तूं सांग सुराळि पाळा ।।
यापरीं देवेंद्रानें महाविष्णु प्रति विचारितां कपट नाटक सूत्रधार महाविष्णु देवेंद्राप्रति बोलतो निरखा.

श्लोक : स्वभाव स्थिती माजि येतां विशेष ।। तयाचा अधीं गुणकीं आणि दोष ।।
मना आणितां सर्व हीं व्यक्त होत ।। स्वभावीं विचाराशि नाहीच हेत ।।
यापरीं सयुक्तीक बृहस्पती कडूनच व्रत काय चालाया जोगें महाविष्णुनें बोलतां देवेंद्र महाविष्णुप्रति पुनश्च येकांतीं बोलतो निरखा.

आर्या : यद्यापि संशय मजला उभय गुरु माजि पातला पाही ।।
चित्त तथापि दुजा लाभजतें विश्वास युक्त लवलाहीं ।।
यापरीं देवेंद्रानें बोलतां. बृहस्पती हीं कचाप्रति एकांतीं बोलतो निरखा.

आर्या : यदयपि संशय मजला ।। प्राप्त पहा सर्व देव समुदाई ।।
चित्त तथापि प्रेमळीयांचें ठाईच यास वरुं काई ।।

यापरीं बृहस्पतीनें हीं बोलतां. इतुकियांत श्री महागणपति मंत्रोपदेशा मध्येंच प्रायेण संशय येकंदर परिहृत होईलसें निश्चय करुन सुरनात देवेंद्र बृहस्पतीस प्रणाम करुन त्यासहित मंत्रापदेश करुन घ्यावयास नेपथ्या मध्यें जातां. त्या समई कचानें महागणपती पूजा सामुग्री येकंदर सिद्ध करितां उपदेश घेऊन प्रसन्न मुख देवेंद्र येउन बोलतो निरखा.

दरू : नीलांबरि राग ।। आदिताळ ।।

काय झालें पाहा नवल आतां ।। पाय गुरुचे ध्यातां ।। प ।।
ध्याय मानसताद ऐकुनि धारण बहुधत निजमनि ।।
होय साक्षात्कार म्हणउनि ।। जायचित्त किं धैर्य भवनि ।। अ ।।

यापरीं देवेंद्रानें बोलतां. बृहस्पतीनें येऊन चंद्रोदयाची वेळ होत आली लौकरिच संकट हर विनायकाची पूजा करावी म्हणतां. दैवेंद्र बृहस्पतीस आचार्य पीठावरि बसुऊन. आपणहीं आसनस्थ ब्रम्ह विष्णुचे आज्ञें वरुन आसनावरि बसुन बृहस्पत्युक्त संकल्प पूर्वक सिंव्ह वाहन दश भुज नाग यज्ञोपवीत त्रिमुख गजानना ध्याना वाहनादि षोडशोपचार पूजा करुन चंद्रार्घ्यहीं सोडुन समस्त सुरवरानीहीं मंत्र पुष्प अर्पिती गणेशाचें स्तोत्र करितो निरखा.

(श्लोक) श्रीसच्चिदानंद गणेश पाहीं ।।

यापरीं गणेशाचें स्तोत्र करुन दैवेंद्र प्रार्थना करितो निरखा.

दरु : नाटकुरंजी राग ।। झंपाताळ ।।

पाहि श्री गणपती ।। पावन करि मती ।। प ।।
पाहुनि मम स्थिती ।। पाव त्वरित गती ।। अ ।।
वाहुनि सुम दुर्वा ।। वासरहितहीं ।।
लाहूंकी निजपद ।। लाभें बहुसुख ।।
साहित्य शिव शिव ।। संतत चिंतन ।।
राहित्य असतां ही ।। रक्षि म्हणे मी ।। १ ।।

यापरीं प्रार्थना करुन भक्तिपारवश्याने देवेंद्र समस्त देवांसहित नर्तन करितो निरखा.

(श्लोक) कृतादि ...... मीं पहा मृगेंद्र मोर अंदिरीं उदार धीर तुं महा बसोनि राजशी तरी अनादि मध्यमांत तूं दहा सहा चहूंकरीं प्रकाकाशसी मणाधिपा कृपा निधे कृपाकरी.

यापरीं नर्तन करित असतां नेपथ्यामध्यें दिव्य दुंदुभि ध्वनि होतां तें ऐकुन. देवेंद्र नादा पहूत चित्त होउन तटस्थ पाहत असतां. सिंव्हारुढ दशभुज नाग यज्ञोपवीत सत्वर जस्त मोगुणात्मक मुखत्रय विशिष्ट शुद्ध सत्व प्रधान तुरीय मूर्ति महा गणपति प्रत्यक्ष होउनि येतो निरखा.

दरू : सौराष्ट्र राग ।। आदिताळ ।।

येतो महागणपती पाहा करुणा सिंधु महा ।। प. ।।
देतो निज सुख भक्त समूहा ।। देवेश्वर दीनपराहा ।। अ ।।

सिंदूर पंक विराजित सुंदर ।। सिंधुर वदन मनाशि अगोचर ।।
इंदुशिखामणि फार मनोहर ।। इंदु मुखापर पूजित सादर ।। १ ।।

यापरीं महागणपति प्रत्यक्ष होतां देवेंद्र साष्टांग प्रणाम करुन निजानंद पारवश्यानें स्तोत्र करितो निरखा.

दरू : नादनाम क्रिया राग ।। आदिताळ ।।

धन्य मी आजि जाहलों ।। गजानना ।। ए ।।
जन्य सकळ जगीं ।। चैतन्य रुप तूंचि एक ।।
अन्यनसें तुतें वृत्ति ।। शुन्यवतहि जाणलों ।। १ ।।
दीन मी अनाथ परम ।। दीन बंधु तूंचि सुगम ।।
हीन मी तथापि तावकीन आजि म्हणवितों ।। २ ।।
श्रीगुरु कृपा कटाक्ष ।। योग जाहला विशेष ।।
भोग भग्न कारि राज योग सुलभलों ।। ३ ।।

यापरीं देवेंद्रानें स्तोत्र करितां आकाश वाणी होते निरखा.

(श्लोक) इंद्रातुझें अभीष्ट प्रगट समजलें श्री शिवाचें घरीं मी ।।
प्रादभावींशि पाहें करुनि गिरिसुता तोषवोनि स्वधार्मी ।।
सिंधु त्रैलोक्य राज्याक्रमण करुनि जो मातला फार कांहीं ।।
त्या दुष्टांकीं वधोनी निज पदि तुजला स्थापितों शीघ्र पाहीं ।।

यापरीं आकाश वाणी होतां ते ऐकुन गणेश प्रसाद जाहला म्हणऊन समस्त सुरवरांनीं आनंद मानितां. नारद ऋषी या गणपतीचे रुपास गणेश पुराणांतील आधार वचन बोलतो निरखा.

(श्लोक) ध्यायेत्सिह गतं विनायक ममुं दिगबा हुमाद्ये युगे ।।
त्रेतायांतु मयूरवाहनममुंषड्बाहुकं सिद्धिदं ।।
व्दापारेतु गजाननं युग भुजंग रक्तांगरागंविभुं ।।
तिष्येतु व्दिभुजं शितांगुरुचिरं सर्वार्थदं सर्वदा ।।

यापरीं नारदानीं आधार बचन सांगतां. हे येकंदर मुंडासुर प्रबलासुरानीं पाहून आमुचा यत्न येकंदर व्यर्थ होउनि गेला. त्या करितां इकडील वर्तमान समग्र दैत्य राजास जाणतें करुं म्हणउनि पळनि जातां बृहस्पति महागणपतीस साष्टांग प्रणाम करुन बोलतो निरखा.

(आर्या) देवां आणिक आम्हां संशय पडिला परस्पर प्रबळ ।।
दैत्य म्हणोनि गणेशा फिटला तोत्वत्कृपा बळें सकळ ।।

यापरीं बृहस्पतीनें बोलतां देवेंद्र बृहस्पतीस लज्जाव नम्र मुख होऊन प्रणाम करित बोलतो निरखा.

स्वामी तुमचे ठाई संशय मज भासला वदूं काई ।।
तो अपराध क्षमि जे म्हणउनि मी दीन पडतसे पाई ।।

यापरीं देवेंद्रानें बोलतां बृहस्पति त्याप्रति बोलतो निरखा.

(आर्या) अकपट जनं ससुदाईस कपट शत्रशि ठावजरि झाला ।।
तरि ते भेदुनि चित्तें अनर्थ देतां ति एकमेहाला ।।

ऐश्यास दैत्यांनीं संधि पाहुन कृत्रिम करुन अंतर भेदिलें तर तुंवां काय करावें. शेवटोर प्रमाद घडेनासें महागणपति प्रसादें उकला झाला कीं तेंच थोर म्हणऊन बृहस्पतीनें इंद्राचें समाधान करुन बोलतां ब्रम्हा विष्णु महागणपतीस प्रणाम करुन सर्वज्ञा सहित नर्तन करीत प्रदक्षिण करिताहे तू निरखा.

(श्लोक) गजानन प्रभोपदांबुजा येते नमोनमोखिल प्रजावनाय सज्जन व्रजार्ति हारिणे नम: ।।
अजाजितायते नमोब्दिजाधिराज शेखरं भजामहे भवंतमब्जजादयो वयं नम: ।।
यापरीं ब्रम्हविष्णु प्रदक्षिण करुन स्तोत्र करिताहेत निरखा.

(श्लोक) देवाधि देवा तव अंशलीकी ।। विधी हररीरुद्व अम्ही विलोकीं ।।
सृष्टयादि कार्याशि करूं दयाळा ।। रक्षी अम्हातें निज भक्त पाळा ।।
यापरीं ब्रम्ह विष्णुनीं स्तोत्र करितां पुष्पपातनें कडुन त्याची अभीष्ट सुचऊन श्रीमहा गणपती नित्यानंद मंदिर प्रवेशतां निक्रांत: ।। सर्वे ।।
इति श्री भोंसल कुल दुग्ध सागर सुधाकर श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासनसंपत्संतति राजाधिराज महाराज छत्रपति भूलोक देवेंद्र श्री शरभेंद्र भूपाल विरचित श्री गणेश लीलार्णव नाटके तीव्दियोंक: ।। २ ।।
।। श्री सांब शिवाय नम: ।।

श्री गणेशाय नम: ।।

त्यानंतरें बृहस्पत्याश्रमीं चालिलें वर्तमान येकंदर मुंडासुर प्रबलासुरमुखें ऐकून फार दुर्मनायमान सिंधु दैत्य मंत्रालोचना कारावयास आस्थान मंटणास येणार त्या करितां अति शीघ्र चंडसुरास बलावुन आणावयास दुर्मुख नामक दौवारिक येतो निरखा.

दरू : कनड राग ।। शापताळ ।।

दौवारिक तो येतो पहा ।। दावा करि साधूंचा हा ।। प ।।
मेवा खाउनि मस्त सदाहीं ।। सेवा न करिच संतत काहीं का ।। अ ।।
हालत मालत ।। १ ।।

यापरीं दौवारिकानें येउन समोर पाहुन दैवाधीन सेनापती वक्रदंत येत्यासें दिसतें त्याला विचारिल्या चंडासुराचा समय कळेल म्हणतां वक्रदंत येतो निरखा.

दरू : बिलहरि राग ।। शापताळ ।।

वक्रदंत तो येतो पहा ।। वक्रगती अवलंबुनि हा ।। प ।।
शक्रलोक वारवधू सागर ।। नक्रचि हा जणु सांप्रत पामर ।। अ ।।
सेउनियां मधु घूर्णित नयनें ।। शेखर मस्तकिं लाउनि सुमनें ।।
जेउनियां बहु मंद गतीनें ।। जेर असे अति कैफ भरानें ।। १ ।।

यापरीं वक्रदंत कैफानें झोले खात येत असतां दुर्मुख सामोरे जाउन 'काय सेनापती कोठून येतोस' (वक्रदंत उर्वशीच्या घरास जातो.) दुर्मुखः अजि कोठें मेजवानगी? वक्रः शुक्राचार्यांचे घरीं (त्याशि दुर्मुख बोलतो निरखा.)

(आर्या) तरि तुज गुरु प्रसाद प्रबळचि घडला असेल आजि बरा ।।
तैं कोण कोण दुर्मद आले तथें कीं दैत्य वद चतुरा ।।
यापरीं दुर्मुखानें विचारितां वक्रदंत बोलतो निरखा.

(दरू) जंध प्रजंघ शुंभनिशुंभ ।। जातरोष आणि कुंभनिकुंभ ।। १ ।।
संघ बहु असुरांचा आला ।। सकळां आनंद फारचि झाला ।। अ ।।
हार तुरे आणि जधादि गंध ।। आणि कलेउनि बुक्का सुगंध ।।
फारचि सकलांहि झोल मदांध ।। पामरांशि कैंचा हा सुख संबंध ।।
यापरीं वक्रदंतानें बोलतां दुर्मं तरि आम्हास कां बलाविलें नाहीं त्याशि वक्रदंत बोलतो निरखा.

(आर्या) दनुज कुल प्रभुसिंधु चंडासुर तुं तुम्हासि गुरु अमुचे ।।
नस्मरती मनु सिंधु स्व यमाचार्यत्व देखुनी तुमचें ।।
यापरीं वक्रदंतानें बोलतां दुर्मुख बोलतो निरखा.

(दरू) आमुचे कृत्याशि गुरु कशाला ।। आणी कशास्तव मंत्राचा झोला ।। प ।।
काम तयांचे मोक्ष वराया ।। कारण काय उगाचि भजाया ।। अ ।।
या परीं दुर्मुखानें बोलतां.

वक्र. : तुला श्रद्धा नाहीं त्या करितां तूं भ्रष्ट झालास.

दुर्मु. : अरे भ्रष्टामाजि शिष्ट येक भ्रष्ट येक असतो काय? असो.
महाराज सिंधुचे ठाई देखिल शुक्राचार्यास उपेक्षासकीच दिसते.

वक्र. : अपेक्षा नसली तर बृहस्पतीनें करावयाचे यत्न प्रयत्नास प्रतिक्रिया करिनासें उगाच असतील काय? यापरीं वक्रदंतानें बोलतां त्याच्या तोंडानेंच त्याने आपणही भ्रष्ट म्हणावयाजोगें दुर्मुख युक्तीनें प्रश्न करितो निरखा.

(आर्या) नाहीं सुराजयाला असुर म्हणावे किं तेचि अैश्यास ।।
नित्य सुरा पान्यांलां आम्हा सुरतानयेचि कशास ।।
यापरीं दुर्मुखानें प्रश्न करितां.

वक्र. : अरे ते सुरा वेगळी.

दुर्मु : ते सुरा कोणती?
त्याशि वक्रदंत सांगतो निरखा

(श्लोक) सुषुम्नामार्गानें पवन चढतां ऊर्ध्वसहसा ।।
सहस्ता राहून घडत अमृतस्ताव बहुसा ।।
सुरा ते देवांची भजुनि सुर होती बहुतकीं ।।

तुम्हां आम्हां सर्वा मदकर सुरा हेचि भुरकी ।।
यापरीं वक्रदंतानें बोलतां.
दुर्मुख आणिक त्याना आग्रह यावया जोगें बोलतो निरखा.

(दरू) कासया ऐसें बोलशि सखया ।। काय मी सांगूं तुज गुणालया ।। प ।।
या सुरेसहि ग्रंथ बहुत आधार भूतकीं असति जगांत ।। अ ।।
यापरीं दुर्मुखानें बोलतां.

वक्र : अरे त्या ग्रंथ रीतीनेंही हे सुर मुख्ये नव्हें.

दुर्मु : ते कसें त्याशि वक्रदंत त्याच ग्रंथांतील वचने बोलतो निरखा.

(श्लोक) लिंगत्रय विशेष झष्पण्णवाधारभेदक: ।।
पीठ स्थानानिचागत्य महा पद्भवनं व्रजेत् ।। १ ।।
आमूलाधारमा ब्रम्ह रंध्रंगत्वा पुन: पुन: ।।
चिच्चंद्र कुंडली शक्ती सामरस्प सुखोदय: ।। २ ।।
व्योम पंकज निष्पंदि सुधापानरती भवेत् ।।
मधुपानसिदंप्रोक्त मितरेमद्य पायिन: ।। ३ ।।
यापरीं वक्रदंतानें बोलतां.

दुर्मु : तरि ते सुरा आम्हास कां प्राप्त नाहीं ?

वक्र : विषया सक्तीनें साधन नाहीं त्या करितां.

दुर्मु : तरि विषयां सक्तांस हे सुरा विषय विरक्तांस ते योग जन्य दिव्यसुरा म्हणउन ग्रंथा मध्ये व्यवस्था करुन सांगितल्या सकें नव्हे दिसतें.

वक्र : तसें आहे कीं नाही तरि दिव्यामृत पानें कडुन अजरामर व्हावया जोगें श्रुतितो दित मार्ग जगत्प्रसिद्ध असतां हीं विषया सक्तीनें जनते मार्ग आचरत नाहीं ते करितां.
ईश्वरानें त्यावरि आग्रहानें त्यांस नीटच भ्रष्ट करुन शिक्षालाउ म्हणऊन वेद विरुद्ध ग्रंथ निर्माण करुन त्या ग्रंथामध्येंही पुनश्च जनावरी दया करुन या सुरेस निदून दिव्यामृत पानच विशेष म्हणून सांगीतलें आहे कीं कायकीं कोणास कळे.
यापरीं वक्रदंतानें बोलतां दुर्मुख बोलतो दुर्मुख बोलतो निरखा.

(श्लोक) भली युक्ती हे काढिली बुद्धिवंता ।। तुवां आजि शाबाशिरे वक्रदंता ।।
विशेष सकीं ठाव तो या सुरेनें ।। नहो त्यास्तव त्वन्मती शुद्ध सोनें ।।
यापरीं त्याची गोष्टि स्थापून निश्चय आम्हीं विषयासक्त झाल्याकरितां आम्हास ईश्वरानें शिक्षाच लाविली आहे संशय नाहीं. म्हणुन दुर्मुखानें बोलतां वक्रदंत मग सावध होऊन बोलतो निरखा.

(श्लोक) अनादि प्रपंचासका मार्ग हा हीं ।। तया कोण निंदिलरे आजि देहीं ।।
जयाच्या मना मानलें आजि तैसें ।। पहा वर्तती लोक हे कर्म पाशें ।।
यापरीं वक्रदंतानें हा मार्ग हीं अनादि झाल्यास्तव निदुंन वसें बोलतां. दुर्मुख बोलतो निरखा.

(दरू) अंधार अनादि पासून आहे ।। असतांचि उजेड होईल काये ।। प ।।
बंध समस्त अनादिच त्याशीं ।। बंढावया युक्ती कविं तूं करिशी ।। अ ।।
यापरि दुर्मुखानें बोलता.

वक्र : मोघ मार्गास या परी आधिक्षेप करु नये.

दुर्मु : अरे मोक्ष इतुका सुलभ झाला तर कृछ्चांद्रायण व्रतोपवास नियम ध्यान धारणादिकांचे काम काय निर्विषय ऐसा मोक्ष विषय भोगें कडून कैसा साध्य होईल ?
यापरीं बोलुन पुनश्च दुर्मुख बोलतो निरखा.

(दरू) भक्षूनियां विषजीव हा पाहें ।। वांचुनियां केंवि शाश्वत राहे ।। प ।।
पक्षपात मति व्यर्थचि कांहे ।। परमार्थ दृष्टिशि झडकरिला हें ।। अ ।।
विषय भोग तोचि बंध तयाशीं विरहित असणेंचि मोक्ष जिवाशी ।।
तुष भक्षुनीं अन्न रवादलें म्हणतां ।। तोष तृप्ति जन्य होय कें हंता ।।
यापरीं बोलुन पुनश्च दुर्मुख बोलतो निरखा.
तरि तुझिये मतें विषयासक्त भ्रष्टांस येकंदर मुक्त म्हणुयेकीं थोर थोरहीं यापरी नव्हे बोलताहेत.

(श्लोक) धातुवादेच वित्ताशा मोक्षाशा कौलिके मते ।।
जामातरिच पुत्राशात्रय मेतन्निरर्थकं ।। १ ।।

वक्र : तरि शास्त्र कां निर्माण झालें ?

दुर्मु : भ्रष्टांस भ्रष्ट मार्गानेंचि श्रद्धा भक्ती निर्माण करुन तारावया करितां अत एव हा मार्ग शिष्ट संमत नव्हे.

वक्र : काय झालें तरि शास्त्र विषई फार अति युक्ती करुन बोलु नये.

दुर्मु : ऐसें काय तरि बरें म्हणुन प्रकृतास अनुसरुन बोलतो निरखा.

श्लोक : असो ते कथा घेउनी काय कीजे ।। तुवां कोठुनी येइजे जाणवीजे ।।
यापरीं दुर्मुखानें विचारितां वक्रदंत बोलतो निरखा.
न भेटोनि चंडासुरा तद्‌गृहाला ।। विलोकूनि मी येतसें व्दारपाळा ।।
यापरी वक्रदंतानें बोलतां.

दुर्मु : चंडासुर कोठें गेला ?

वक्र : जाणें कोठें समय नाहीं.

दुर्मु : निमित्त काय ?

वक्र : कळेना काय तिलोत्तमाच.
यापरीं वक्रदंतानें बोलतां दुर्मुख बोलातो निरखा.

(श्लोक) रंभा भ्रमें समय कीं न घडे प्रभूचा ।। मंत्र्यासहीं भ्रम तसाचि तिलोत्तमेचा ।।
आम्हा तुम्हाशि मग कोण विचारिता हे । ऐश्यास कार्य गति ते कशि चालता हे ।।
यापरीं दुर्मुखानें बोलतां.

वक्र : स्वर्ग लोकीं या परीस काय कार्य आहे ?
यापरीं वक्रदंतानें बोलतां दुर्मुख बोलतो निरखा.

आर्या : वरकड कार्य नसे परिं शत्रु प्राबल्य जाहल्यां उपरि ।।
कैशी गति ते बरि म्हणउनि.
हे योचना कशी त्याजिजे यापरीं दुर्मुखानें बोलतां.

वक्र : तैसें काय सांप्रत शत्रु प्राबल्य.

दुर्मु : देवेंद्रास गणेश प्रत्यक्ष होऊन त्यानें तुझें राज्य तुला देतो म्हणउन अभय दिले आहें.

वक्र : तरि तें प्रबळ कार्यंच.

दुर्मु : हें वर्तमान देखील मुंडासुर प्रबळासुरानीं धण्याकडें सांगावयास समय नाहींसें गेलें तर पलीकडें गति कैशी ?

वक्र : शेवटीं कळविलें कीं नाहीं.

दुर्मु : कळविल्या करितांच चुंडासुराचा समय विचारानें म्हणून तुजकडें आल्यास स्पष्ट झालें परंतु म्या जाऊनच सरावें.

वक्र : तरि प्रभुकडें अद्यापि थोडा विवेक आहेसा दिसतो अथवा स्वभावच हा तें कैसें म्हणिजे सांगतों ऐका.

(श्लोक) लोकीं कुरुप वनितेसहीं मोहताती ।। हे शाहणे चतुर सात्विक पुण्य जाती ।।
ऐश्यास नाक गणिका जन लाभल्यानें ।। दैत्यांशि मोहन कसा उपजे त्वरेनें ।।
यापरीं बोलुन दुर्मुखा माझें चित्त स्वाधीन नाहीं मीं ठिकाणास जातों.

दुर्मु. : होय होय उशीर झाला उर्वशी वाट पाहत असेल.

वक्र. : तिला मला सर्वथा प्रसक्तीच नाहीं.

दुर्मु. : तूं गोपन केलास तर काय झालें तुझ्य गुरुप्रसादानें मजला कलविलें.

वक्र : मदावेशें प्राणी काय येक बोलत नाहीं जा जा,
यापरीं बोलुन वक्रदंत निघून जातां दुर्मुखहीं चंडासुराचे घरास जातां सपरिवार सिंधु दत्य येतो निरखा.

(दरू) चंडासुर तो ।।
यापरीं सिंधु दैत्य येउन आस्थान मंडपी बसुन चंडासुर अझुणी आला नाहीं कीं म्हणून तजवीज करित असतां दौवारिका स्व सेवकानिशीं चंडासुर येतो निरखा.

(दरू) चंडासुर तो ।।
यापरीं चंडासुर येउन सिंधु दैत्या प्रति मुजरा करुन तिलोत्तमेस सोडून आल्याकरितां आग्रहानें बोलतो निरखा.

(छंद) असुर पुंगवा काय जाहलें ।। अतिशयें तुवां मूल धाडिलें ।।
असुनियां अम्हीं कार्य पाहतां ।। अधिक कार्य तें कायसें अतां ।।
यापरीं चंडासुरानें बोलतो सिंधु दैत्य बोलतो निरखा.

(श्लोक) प्रत्यक्ष झाला सुरनायकाशी ।। गणेश तो चिन्मय पुण्य राशी ।।
प्रादुर्भवोनीं शिव मंदिरीं तो ।। इंद्राशि हें राज्य बळेंचि देतो ।।
यापरीं सिंधु दैत्यानें बोलतां.

चंडासूर : हें वर्तमान कोणें सांगीतलें ?

सिंधु : मुंडासुर प्रबळासुरानीं.

चंडासुर : ते दोघेहीं ऐसें कां वाट चुकून चालिले ?

सिंधु : वाटेंत कांही प्रतिबंधक आलें असेल.
चंडासुरानें तें ऐकून रागानें बलावा त्या दोघास म्हणता प्रबळासुरासहित मुंडासुर येतो निरखा.

(दरु) मुंडासुर तो ।।
यापरीं प्रबळासुराहित मुंडासुर येउन मुजरा करुन उभें राहतां त्यां प्रति.

चंडासुर : विशेषाकार वर्तमान मजकडें आधीं कां सांगितलें नाहीं ?

मंडासुर : सेवक जन या प्रश्नास कैसें उत्तर देईल ?

चंडासुर : गरज नाहीं अगाच सांग म्हणतां
मुंडासुर बोलतो निरखा.

(श्लोक) समय उभयतांचा रक्षिला फार कांहीं ।।
प्रभु समय अधीं तो लाभला आजि पाहीं ।।
म्हणउनि कथिलें म्या वर्तमान प्रभूशी ।।
दनुज कुल हिता तें आणुनीयां मनाशी ।।
यापरीं मुंडासुरानें बोलतां ।।

चंडासुर : आम्हा दोघांपरीस तूं फार शाहणा समर्थच भूलोकास जाऊन निर्वाह करुन आलास कीं जा पलीकडें
यापरीं धिक्कारितां.
मुंडासुर पलीकडे जाऊन प्रबलासुराप्रति येकांतीं बोलतो निरखा.

(आर्या) पंडित मूढ जनाचा सेवक जरि जाहला अहो साचा ।।
तरि तो मूढचि जाण श्रम त्याचे जाणता असे कोण ।।
त्यास्तव म्या केले ते श्रम येकंदर येक्याच गोष्टीनें व्यर्थ होऊनि गेले.
यापरीं बोलुन प्रबलासुरासहित मुंडासुर निघुन जातां
चंडासुर सिंधु दैत्या प्रति पाहून बोलतो निरखा ।।

श्लोक : तूं तो सुरां लागि अवध्य पाहीं ।। चिंता तुला काय असे अंतांही ।।
तथापि मीं तों सकळाशि आहे ।। दैत्याधिपा स्वस्थ उगाचि राहें ।।
यापरीं बोलून भौमासुर जाऊन फार दिवस झोल अजुनही आला नाही म्हणून चंडासुर बोलत असतां त्रिसंध्या क्षेत्राहून शिष्य शिष्यिणीसहित श्री वैष्णव वेषें गुप्तचार भौमासुर येतो निरखा.

दरु : मध्यमावति राग ।। आदिताळ ।।

भौमासुर तो येतो पाहा ।। भौमापरि रक्तांगी हा ।। प ।।
कौमारिचकीं हा बहु मायी ।। कामातुर आणि बहुत उपायी ।। अ ।।
दुष्टशिरोमणि वंचक पापी ।। भ्रष्ट महा अति कोपी ।।
शिष्ट जनाशीं फारशि तापी ।। पुष्टजलें जाशिविषमयवाणी ।।
यापरीं भौमासुर येऊन आशिर्वाद करुन चंडासुरानें काय वर्तमान म्हणून विचारितां वर्तमान सांगतो निरखा.

(छंद) गौतमाश्रमीं रुदतो महा ।। कांत गिरिसुता देऊन पहा ।।
श्रौत वेद्यतो वसतसे स्वयें ।। धात प्रथमहीं ऋषि गणान्वयें ।।
यापरीं बोलुन पुनश्च बोलतो निरखा.

(श्लोक) श्रीरुद्र यापरीं अहो वसतां त्रिशुली ।। सिद्धासनीं बसुनि येकट येक वेळीं ।।
ध्यानस्थ होउनि उठेतंवविस्मयानें ।। झाली तयाशि पुसती गिरिजा त्वरेनें ।।
कैसे म्हणिजे.

(छंद) देव देव तूं चंद्रशेखरा ।। देव तुजहुनीं कोण दुसरा ।।
ध्यावया तुवां या जगीं असे ।। मावहे तुझी सांग सौरसें ।।
यापरीं गौरिनें विचारितां त्याशि शंकरानें सकल जगद्विवर्तपादान कारण महागणपतीचें ध्यान करितों म्हणतां आपणहीं त्याची उपासना करीत म्हणुन श्रीशंकरा कडून उपदेश करुन घेऊन तपश्चर्या करावया करितां गौतमाश्रमा पलीकडील विवक्तरमणीय प्रदेशाप्रति जावयास गौरीदेवी निघणार हें वर्तमान सांप्रत कळऊन जावयास आलों.

यापरीं भीमासुरानें वर्तमान सांगतां सिंधु दैत्याप्रति चंडासुर बोलतो निरखा.

(छंद) तनुज पाहिजे म्हणउनी जनीं ।। मनुज पाप हा करिति भामिनी ।।
अनुदिनीं तशी अंबिका अतां ।। अनुभवी दशा ऐक तत्वता ।। त्यास्तव ।।

(श्लोक) गौरितपोभंग करोनि आधीं ।। रुद्रासहीं लाउनियां उपाधीं ।।
अन्योन्य संबंध जसा घडेना ।। तैसा अतां यत्न करीन जाणा ।।
यापरीं बोलुनू यत्नाचा प्रकारहीं चंडासुरानें दैत्य राजाचे कांनीं सांगतां तें ऐकून सिंधु दैत्य बोलतो निरखा.

(श्लोक) ऐशी हे जणु योचना तुज भली कीं सूचली मंत्रिया ।।
दोघेंही भ्रमतील नीट विषयीं आसक्ती पावोनियां ।।
तेणें त्यां उभयां वियोग सहसा हाईल त्यानंतरे ।।
प्रादुर्भाव कसा असे करिजतो जेथें गणाधीश्वरें ।।
याखेरीज स्त्री पुरुष संबंधाविनाहीं नरसिंहादयवतार जाहले म्हणावयाच्या गोष्टी येकंदर बुद्धिमत्कल्पित कथा प्रपंच म्हणऊन तुला समजलें तेहीं जास्तीच.

यापरीं सिंधु दैत्यानें बोलतां त्याप्रति चंडासुर बोलतो निरखा.

(श्लोक) हे सूक्ष्म बुद्धि जरि कीं न कळे मनाला ।।
तैं तू धणी परम तुष्ट कसा अम्हाला ।।
तेहीं तुझ्याचि सहवास गुणें सुरारे ।। मंदांशि नातरि कशी घडते प्रमारे ।।
यापरीं चंडासुरानें बोलतां

सिंधु दैत्य : अगोधरिल्यासकें मात्र होइनासें असावें ।।

चंडासुर : येकदां झाल्यासकेंच दुसऱ्यानें हीं होईल काय ।।

सिंधु दैत्य : मनीं तरकून बरें जाग्रतेनें कार्य पहा ।।
यापरीं बोलून सिंधु दैत्य अंतः पुर प्रवेशतांच चंडासुर भौमासुराप्रति पाहून बोलतो निरखा

(श्लोक) तुं शाहणाचतुर आणिक फार मायी । कीं स्वामी कार्य करणार तसा उपायी ।।
तेणें तुला प्रबल कार्य कधीन आतां । साधोनि शीघ्र मज कीर्तिस देई ताता ।।
यापरीं बोलून चंडासुरानें कार्य कानीं सांगतां. तें ऐकुन बरें म्हणुन भौमासुरानें निरोप घेउन जातां. विकटासुरास बलावा म्हणतांच बिकटासुर येतो निरखा

दरु : माळव श्रीराग ।। शापताळ ।।

विकटासुर येतो पाहा ।। विकटा न न बहुः मायी हा ।। प ।।
शकटासुर सुत परम प्रतापी ।। नकटा जो बहुकुस्मित रुपी ।। अ ।।
कपटी मोटा दुर्गुण राशी ।। करुणालेशनसेचि जयाशी ।।
निपटचि दुष्ट सदाहि जनाशी ।। निरवधि दुःख करीत हटेंशी ।। १ ।।
यापरीं विकटासुर येतां त्याप्रति चंडासुर बोलतो निरखा

(श्लोक) तुं शाहणा चतुर आणिक फार मायी ।।
कीं स्वामी कार्य करणार तसा उपायी ।।
तेणें तुला प्रबला कार्य कथीन आतां ।।
साधोनि शीघ्र मज कीर्तिस देई ताता ।।
यापरीं बोलून चंडासुरानें कार्य कानीं सांगतां तें ऐकून बरें म्हणून विकटासुरानें हीं निरोप घेऊन जातां तिलोत्तमेचें स्मरण होतांच सपरिवार चंडासुरानेंही निघून गेल्यानंतर तपश्चर्या करावया करितां पूर्वोक्त विवक्त देशाप्रति जावयास सख्याशीं सहित हंसवाहनारूढ जगदंब गौरी देवी येते निरखा

दरु : केदारि गौड राग — आदिताळ ।।

गौरी देवी येते पाहा ।। बारिजमृदुदेहा ।। प ।।
शौरीची जे भगिनी म्हणांवी ।। शारद विधुवदना जे बरवी ।। अ ।।
सारस दळ नयना ।। सामज वर गमना कारित जग दवना ।।
तारित बहु सुजना ।। १ ।।
यापरी गौरी येऊन उपदेश झाल्यास्तव वैराग्यानें सखी प्रति बोलते निरखा

(श्लोक) नको भोगतो भाग्यहीं दुःखहेत ।। प्रकाशें नमीं स्वस्व रुपीं निवांत ।।
असें वाटतें माझिया मानसाला ।। गणेश प्रभू शीघ्र भेटो जिवाला ।।
यापरीं बोलून वखत विचार पूर्वक पुनश्च बोलतो निरखा

दरु : पूर्वि कल्याणी राग — आदिताळ ।।

काय वदूं जगनश्वार अहहा ।। काय हिं ममतेंवि पहा ।। प ।।
धाय कधीं मन निश्चळ होउनि ।। धाम स्वरुप सुखाचें पाउनि ।। अ ।।
नरुचे नसुचे मजला काहीं ।। न गणीं कवणाहीं करुणाकर शिव श्री गुरुपांई।
शरणागत आजि जाहलें बाई ।। १ ।।

यापरीं बोलून सख्यानो मीं एकांत भजन करणार त्या करितां तुम्हीं स्वकार्याशि जाईजे. मजला महागणपति साक्षात्कार झाल्यानंतर तुम्ही येउये म्हणऊनि सख्यांप्रति निरोप देऊन तपश्चर्या करावयास गौरीदेवी विवक्तस्थला प्रति गेल्यांनंतर माये कडून गौरीचें रुप घेऊन भौमासुर येतो निरखा

(दरु) भौमासुर ।।

यापरीं भौमासुर येऊन बोलतो निरखा

(छंद) गौतमाश्रमानिकट सांप्रत ।। घालूनीं अम्हीं आसनद्रुत ।।
ध्यात बैसतां कैतवान्यें ।। भूतनाथ तो येइल स्वयें ।।

त्यानंतरें निर्गुण ध्यान योगास चितैकाग्री करणा रूपश्रम साध्यत्व प्रति पादन पूर्वक परिहार करून. त्यापरीस तुझें सगुण भजन मनास रचतें म्हणुन श्रीशंकरास विनंती सकी केल्यां स्त्री स्वभाव चपल म्हणून तोहि ते गोष्टि यथार्थच मानील

त्यानंतर गौरी तपश्चर्या सिद्धि पाऊन आली तर भेद करुन सोडुं
त्यापरीं बोलुन गौतमाश्रमासमीप जाऊन भौमासुरानें बसलें असतां श्री. शंकर रुपधारी विकटासुर येतो निरखा

(दरू) विकटासुर ।।

यापरीं विकटासुर येऊन बोलतो निरखा

(श्लोक) मम शिव कल्पित कामितादरानें ।। निजपति बुद्धिस आदरोनितीने ।।
पति मति तोषण मुख्यतें स्वबोलें ।। रति दिधल्यां मम कार्य सिद्ध झालें ।।

त्यानंतर : श्री शंकर आलातर भेदकरुन सोडूं
यापरीं बोलून गौतमाश्रमासमीप येउन दुरुन भौमासुराप्रति पाहून विकटासुर बोलतो निरखा

(दरू) अजंगला राग ।। शापताळ ।।

तेग तेग तेग तरुताळं गौरी ।। तेजतपाचें भारीं ।। प ।।
वेग तयाचा शमविन आतां वेचूनियां बहु सुंदर माता ।। अ ।।

यापरीं बोलून सांप्रत मागूनच जाऊन गौरीचे डोले झांकिल्यां माझें ठाई तिजला संशय काहीं भासेना म्हणऊन झाडाच्या अडोश्यानें विकटासुर हळूच येत असतां त्याप्रति पाहून भौमासुरानें श्रीशंकर आम्हीं चितिल्या प्रमाणें इकडेच येत्या सारिखा दिसतो हे बरें शेवटोर पाहूं म्हणून डोले झांकुन बसतां सवेंच विकटासुरानें मागुन येऊन डोले झांकितां भौमासुर अंतरीं फार संतुष्ट होऊन बहिरंगास बोलतो निरखा.

दरु : मांजि राग ।। शापताळ ।।

सोडि सोडि नयन शीघ्र ।। सुखा करा स्वामी ।। प ।।
गोड तुझ्या दर्शनाशि गुप्त अर्थलें मी ।। अ ।।
मोडखातसें किं चित्त ।। मूढ भजूं निर्गुणाशि ।।
झोड हे तुवां कशाशि ।। जुडविली मनाशि ।। १ ।।

यापरीं भौमासुरानें बोलतां ।। विकटासुरानेंही दैवाधीन अम्हीं चितिल्या कार्यास गौरी फार अनुकुलच बोलतेसें समजून हात अवरुन मंदहास्य करित सामोर उभं राहतां शीघ्र भौमासुरानें पायां पडतां विकटासुर आशिर्वाद करुन बोलतो निरखा.

(श्लोक) संतान सौभाग्य घडोनि पाहीं ।। तूं नांदकीं शाश्वत सौख्य गेहीं ।।
परंतु आतां मम काम पूर्ण प्रिये करिबाल मृगाक्षि तूर्ण ।।

यापरीं विकटासुरानें बोलतां भौमासुर उत्तरोत्तर अस्मच्चिचिततास अनुगुणच आहे श्री शंकर चित्त वृत्ति झालें तरीं या समई बोहडूनच कार्य करावें परंतु येका येकीच ठाव देता नये म्हणवून बहिरंगास बोलतो निरखा

(छंद) कामवैरिया तृप्त मानसा ।। काम तो तुला बाधितो कसा ।।
धामविरतिचें असुनियां अशी ।। कामना तुला प्राप्त हे कशी ।।

यापरीं भौमासुरानें बोलतां विकटासुर बोलतो निरखा.

(छंद) वामलोचनें कायकीं अतां ।। काम बाधितो फार तत्वता ।।
दाम एक तो देई लवकरि ।। कामना अशी पुरवि जे बरी ।।

यापरीं बोलुन विकटासुरानें वेणीस हात टाकितां झटका मारुन भौमासुर बोलतो निरखा.

(छंद) तप करीत मीं बैसलें पहा तव कृपाबळें कलमषा पहा ।।
चपलचपलता कशी आदरे अतां ।। चंद्रशेखरा सांग तत्वता ।।

यापरीं भौमासुरानें बोलतां विकटासुर बोलतो निरखा.

(छंद) पति मनोरथा पूर्ण जे करी ।। अति पति-व्रता तेचि सुंदरी ।।
किति वदूं अतां जाणती प्रती ।। किसलयाधरे शीघ्र दे रती ।।

यापरी बोलून विकटासुरानें हनुवटी धरुन चुंबनास प्रवर्त्तातां लाघवानें मागें सरुन भौमासुर बोलतो निरखा.

(छंद) सर्व जाणता देव पशुपती ।। शर्व म्हणउनीं गातसे श्रुती ।।
सर्वथा तपा विन्ध त्यातुवां ।। साधित्यां कसें सांगिजे भवा ।।

यापरीं भौमासुरानें बोलतां विकटासुर बोलतो निरखा.

(छंद) कटिल कुंतले कुचभरान ते चटुल भाषिणी चारु सुस्मिते ।।
कटिलसन्महा कनक मेखले निटिल मीं निरखुनीं भुलें ।।

यापरीं बोलुन पुनश्च वेणीस हात टाकून विकटासुरानें बलात्कार करितां ।। मग सुटना त्या पक्षीं अंगिकार केल्यासकें करुन त्यालाहीं घेऊन भौमासुर नेपथ्या

मध्यें जातां. सवेंच विकटासुर लज्जित होउन कर्म कर्म म्हणून बाहेर येतां. इतुकियांत भौमासुर. मंत्रावृत्ति चुकून दगा झाला कीं म्हणून घाबरा होऊन शीघ्र मंत्रावृत्तीनें पुनश्च स्त्रीत्व लाभून मंत्रावृत्ति करित बाहेर येऊन. स्वामीं तुम्हीं गणपति भजनास विघ्न केलें म्हणऊन महागणपतीनें तुमच्या कार्यासहीं विघ्नाचा दाखला दाखविला. आतां यथा प्रकार झाले नेपथ्या मध्यें चला म्हणऊन विकटासुराप्रति भौमासुरानें बलात्कार करितां. त्यास त्यानें झिडकारुन देऊन वैरस्यानें तोंड परतवित असतां. हाता तमाशा येकंदर पाहून गगन मार्गाहून विनोद प्रिय नारद येतो निरखा.

(दरु) सुरमुनि नारद ।।

यापरीं नारद येउन विकटासुर भौमासुरांप्रति परिहार करितो निरखा.

(श्लोक) दोघें तुम्हीं दनुज मायिक रुपधारि ।। होवोनि आजि परमेश्वर आणि गौरी ।।
वंचावया जणु तयां उभयां खलीले । आलां तुम्हांशि फळ शीघ्र हताशि आलें ।।

यापरी बोलुन नारदानीं टाळें पिटून हसतां सवेंच भौमासुरानें नारदाप्रति. हा दैत्यकाय म्हणऊन विचारितां त्याशि नारदानीं होय म्हणतां मग भौमासुरानें काम कर विलोकून कर्म कर्म म्हणतां. इतुकियांत विकटासुरानें नारदांप्रति या वेळेस तुम्हीं येथें कोठें आलांत नारद त्याप्रति बोलतो निरखा.

(श्लोक) गौरी परामर्श करावयाला ।। गेलों तियेची स्थिति हीं मनाला ।।
कळोनि घेवोनि महेश भेटी ।। जातां तुम्हां देखियलें कीं दृष्टी ।।
यापरीं नारदानीं बोलतां ।।

विकटासुर विशेषाकार काय गौरीची स्थिती ।।

नारद : साक्षात्काराचें पूर्वार्ध येकंदर गौरीस अनुभवारुढ जाहलें ।।
इतःपर साक्षात्कार होण्यास संशय नाहीं त्या करितां हें संतोष वर्तमान श्री शंकरास सांगावयास जातों ।।

यापरीं बोलून नारद निघून गेल्यानंतरें. इतुकियास देखांचे कृत्रिम काय आहें कीं म्हणोवयाचें संशायानें विकटासुर भौमासुराप्रति विचारितो निरखा.

(श्लोक) अरे कोण तुं देव कीं यक्ष सांगें ।। तुवां येउनी साधिला वैर वेगें ।।
अतां काय सांगूं धण्यालागि दुष्टा ।। अहारे अहा माझि याकीं अदृष्टा ।।
यापरीं विकटासुरानें विचारितां भौमासुरहीं तैसेंचि विचारितो निरखा.

(श्लोक) अरे कोण तूं देवकीं यक्ष सांगे ।। तुवां येउनि साधिला वैर वेगें ।।
अतां काय सांगूं धण्यालागि दुष्टा ।। अहा रे अहा माझि याकीं अदृष्टा ।।

यापरीं बोलून भौमासुरानें या चंडासुराची योचना कधीहीं अशीच शिखरास चढत नाहीं म्हणतांच विकटासुरानें हाहीं चंडासुर प्रेषित दैत्यच म्हणून जाणून चंडासुराप्रति शिव्यागाल्या देऊन याला मंत्रिपद दिलें कीं त्याला नव्हें बुद्धि सांगावी म्हणून फार रागानें आर्भाट करितां त्याशि भौमासुरानें हीं निश्चय हा चंडासुर प्रेषित आम्हास काच म्हणून जाणुन त्याला कां उगाच शिव्या देतोस. तुला मलाच ऐशी गांठि पडते म्हणून त्याला

कैसें कळेल? त्या करितां गुप्त मंत्र चंडासुरानें परस्परांचें कार्य परस्परांस कळविलें नाहीं म्हणतां त्याशि विकटासुरानें 'अरे जा जा काय बोलतोस. येखादें यां दोघांसच गांठि पडली तर कसें म्हणावयाची योजना असावी कीं नको. बरें तुं कोण सांग म्हणतां.' त्याशि त्यानें 'मीं भौमासुर' म्हणतांच विकटासुरानें होट चाऊन घेऊन खाले मान करून काका अपराधक्षमा करिजे म्हणून नमस्कार करुन लज्जेनें तोंड चुकाऊन नेपथ्या मध्यें जाऊन निज रूपानें निघून जातां. भौमासुरानेहीं आम्हा चुलत्या त्या पुतन्या मध्यें पुनश्च परस्पर मुखावलोकन करावयास नाहींसें दुर्मुखी चंडासुरानें केलें पाहा म्हणुन शिव्या गाळचा देऊन नेपथ्या मध्यें जाऊन निज रूपानें निघून जातां. अनुभूत साक्षात्कार पूर्वांग गौरी देवी येते निरखा.

(दरु) गौरि देवि येते ।।

यापरीं गौरि देवि येऊन शिवकृपा प्रशंसा करिते निरखा.

दरु : फरजु राग ।। आदिताळ ।।

कृपा कटाक्ष थोर तें किति पहा गुरुचें ।। प ।।

न पाहिलें ऐकिजतें अपाय येत आत्मया ।। अतींद्रियत्वसाचे ।। अ ।।

यापरीं गुरूकृपा प्रशंसा करून पुनश्च पद्मासनीं बसून गौरीनें ध्यानारूढ होतां नेपथ्या मध्यें येकायेकी अनेक विद्युलता झळकतां सवेंच गौरी उन्मन होऊन तटस्थ पाहत असतां.

कुंडली शक्तीरूप शेषवाहनारुढ पूर्वोक्त मुखत्रय विशिष्ट दशेंद्रिय दशभुज पद्मासनस्थ शुद्धसत्व प्रधान तुरीय मूर्ति महागणपति प्रत्यक्ष होऊन येतो निरखा.

(दरु) धन्य मी आजि जाहलें ।। गजानन ।। यापरी गौरिदेवि स्तोत्र करित असतां ।। गौरीस साक्षात्कार जाहला तें कळून पर्वत ऋषी सहित नारद येतो निरखा.

(दरु) सुरमुनि ।।

यापरीं नारद येऊन महागणपतिस प्रणाम करुन त्याच्या रूपास गणेश पुराणांतील आधार वचनें बोलतो निरखा.

(श्लोक) किरीट कुंडल धरोदशबाहु त्रिशूल भूत ।।
मध्ये नारायण मुखो दक्षिणेच शिवाननः ।।
वामे ब्रम्हमुख शेष पद्मासन गतो विभुः ।।
तत्फणा मंडल छायः कुंदकर्पूरसन्निभः ।।
कृपयाविरभूत्प्रीतो गुणेशो गुण वल्लभः ।।

यापरीं नारदानीं आधार वचन सांगतां गौरीचा सखीजन येतो निरखा.

दरु : धन्यासि राग ।। आदिताळ ।।

गौरीसखि जन येतो पाहा ।। गौरव सखीजनि ऐकुनि हा ।। प ।।
भारी जयाशी आनंद मानसिं पाहुं म्हणउनि गौरी सुखाशी ।। अ ।।
अंबुजलोचन कोकिल वाणी ।। अद्‌भुत दिव्य गुणांची खाणी ।।
कुंबुकंत मणि भूषित वेणी। कंकण राजित कोमल वाणी ।।

यापरीं सखी जन येऊन महागणपतिस प्रणाम करून मग गौरिस भेटून गौरि देवि धन्य तूं आजि एकाग्रमनें दृढनिश्चयें कडून सर्व व्यापक परमात्मा अगोचर तो गोचर केला आम्हीं काय वानावें म्हणउन गौरि देवीचें स्तोत्र करितां त्यावृत्ति रूप सख्यांप्रति पाहून जगदंबा गौरी देवी बोलतो निरखा.

दरू : यमुना कल्याणी राग ।। शापताळ ।।

निरखा तुम्हीं सखियानो श्रीगणनाथा ।।
अनाथ नाथा भिरकाउनि द्याहो वरकड गाथा ।। प ।।
चिरकाळकिं तप करुनि मनाला चिन्मय रूपी गोचर झाला ।। अ ।।

यापरीं बोलून सर्वत्रासहित आनंदउ पारवश्यानें गौरि नर्तन करितो निरखा.

(श्लोक) नृणाय ते यदर्चया नृणाय सौ पगद् श्रमोगुणाति गाय दिव्य भूषणाय ते नमो नमः ।।
प्रणाम कारीणाम हो घृणाकर स्वमेव श्रेमणामि नान्यथा महागणाधिपाय ते नमः ।।

यापरीं गौरी नर्तन करितां आकाशवाणी होते निरखा.

(श्लोक) निष्टा तुझी देखुनि फार काहीं ।। प्रसन्न झालों तुजलागि पाहीं ।।
तूं इच्छिला तो वर माग आतां ।। देतो तयातें न उशीर होतां ।।

यापरी आकाशवाणी होतां महागणपति प्रति जगदंबा गौरी देवि वर मागते निरखा.

(श्लोक) स्वामी श्री गणनायका तव कृपे मीं तृप्त झालें पहा ।।
वांछा आननसे मला तुजविना संसार संताप हा ।।
तेणें कीं मजला वियोग न घडे तूझा जसाकीं तसा ।।
मावे मीं वर शीघ्र मत्सुत तुवां व्हावें अतां राजसा ।।

यापरीं गौरी तें वर मागतां पुनश्च आकाशवाणी होते निरखा.

(श्लोक) होवोनियां पुत्र तुझाचि गौरी ।। वधीन मीं सिंधुसु पर्व वैरी ।।
शची सुरेंद्राशि करोनि भेटी ।। सिंहासनीं कीर्ति करील मोटी ।।

यापरी आकाशवाणी होतां तें वर प्रदान ऐकून सर्वत्रानीं आनंद मानितां. चित्तवृत्ति ईश्वर स्वरूपीं टिपरी परी जडून बसावी म्हणून जनास कळावया करितां आनंदानें गौरी सहित सख्या येकंदर महागणपती भोतालें टिपऱ्या खेळताहेत निरखा.

दरु : सैंधव राग ।। आदिताळ ।।

टिपरी खेळू गें बाई ।। टिपरी खेळुं ग ।। प ।।
अपरांपर सुख स्वरूपीं निशिदिनी ।। आम्हीं भोगूं ग ।। अ ।।
शब्द न साहे गें बाई ।। शब्द न साहे ग ।।
शब्दें वारा तपतां सुखहे ।। अतिशय दुर्लभगा ।। १ ।।
अपापरंगित ग बाई ।। टिपऱ्या अमुच्या ग ।।
सुपाष्ट कीं संगीत ऐकें ।। अपणा माजी ग ।। २ ।।

(दरु) पाहि पाहि लंबोदरा ।। पावना श्री करूणाकरा ।।
मोहमाया दूरतरा ।। मोद रुपा सर्वाधारा ।। १ ।।
गजवदना परम पुरुषा ।। गणराजा मंगळ वेषा ।।
अज अजिताविदलित दोष ।। मज रक्षी कटि शोमिथाग ।। २ ।। (?)
देव देवा विघ्नहरा ।। देई मज स्वरुपीं धारा ।।
केवळात्म्यादीनोध्दारा ।। सेवकांचा निज माहेरा ।। २ ।।
यापरीं सखिजन गौरी सहित टिपऱ्या खेळतां पुष्प पातनें कडून सर्वत्रांस शुभ सुचना करुन श्री महागणपती नित्यानंद मंदिर प्रवेशतां निष्क्रांता सर्वे । इति श्री भोंसल कुल दुग्द सागर सुधाकर श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोलसिंहासन संपत्संतति राजाधिराज महाराज छत्रपति भूलोक देवेंद्र श्री शरभेंद्र भूपाल विरचित श्रीगणेश लीलार्णव नाटके तृतीयांक: ।। ३ ।।

**श्रीसिद्धि विनायकाय जय मंगळं ।।**

श्री गणेशाय नमः ।।

त्यानंतरे गौरीदेविस महागणपति साक्षात्कार होऊन वर प्रदान हीं झालें म्हणावयाचें संतोष वर्तमान नारद मुखें ऐकुन. उव्देलानंद सागर शिष्य जन वत्सल जगद्गुरु श्री ध्यान गुहेपासून गौरीसमालोकन कुतूहलें कडून सभेस येणार त्या करितां सभा सिद्ध करावयास नंदिकेश्वर येतो निरखा.

(दरु) : नंदिकेश्वर येतो पाहा ।। नंदनीये गुण हा ।। प ।।
वंदनीय शिवाचे चरणीं ।। छंद धरित कि वेत्रपाणी ।। अ ।।
भूति विभूषित मस्तक सुंदर ।। पूत महा शिवभक्ताग्रेसर ।।
भूतपतीप्रति भजुनि निरंतर ।। धूत समस्त मनोमल सत्वर ।। १ ।।
यापरीं नेंदिकेश्वरानें येऊन सभा सिद्ध केल्यानंतर परम संतुष्ट वषवाहनारुढ श्री शंकर येतो निरखा.

(दरु) : करुणाकर शिव शंकर तो हा ।। हरिणांकित कर येतो पाहा ।। प ।।
तरुणाब्जा हुत शेखर शूली ।। शरणागत पाल ब्रम्ह कपाली ।। अ ।।
वर दायक निज भक्त जनांशी ।। वर्धित संपदही सुख राशि ।।
परमाद्भूत भूति भूषित आंगी ।। पदजित सारसतति वरयोगी ।। १ ।।
यापरीं शंकर येऊन गौरी अझुणी कां आली नाहीं म्हणुन चिंता करितो निरखा.

(दरु) : गौरी अझुणी कां आली नाही ।। पारीणतेत्तपि होऊनियां हीं ।। प ।।
नारीमणिशी देखुनी वर्षे बारा झालें आजि भेटेन हर्षे ।।
यापरीं श्री शंकर चिंता करित असतां ।।
त्याचे दर्शनास आतुर होत्सातील लब्धाला साक्षात्कार सुप्रसन्न मुख गौरीदेवि सखी जनासहित येते निरखा.

(दरु) : गौरी देवि ये ।।
यापरीं गौरी येऊन श्री शंकरास प्रणाम करुन आनंद बाष्प भरित नयन होऊन त्याप्रति बोलतो निरखा.

(श्लोक) प्रत्याहारादिकानें प्रथम मन पहा जाहलें फार खिन्न ।।
स्वामी तूझ्या कृपेनें गणपति मग तो जाहला सुप्रसन्न ।।
त्या सौख्यापार नाहीं वचन विषय तें केंवि होईल आतां ।।
सोहं भावें मनाला गमत निगवुनीं कायसें व्यर्थ माता ।।
यापरीं गौरी देविनें बोलतां श्री शंकर बोलतो निरखा.

(छंद) धन्य तूं पहा आजिगे प्रिये ।। धाम निज तुवां साधिलें स्वयें ।।
मान्य तो महागणपति तुला ।। मानुनी तुझा हाय सुत भला ।।
यापरीं बोलून तपस्सिद्धीने गणपती साक्षात्कार झाल्यानंतर हीं दहा दिवस तिकडें राहावयास कारण काय म्हणुन श्री शंकरानें विचारितां गौरी देवी बोलते निरखा.

(श्लोक) वियोग त्याचा न सहोनि त्याची ।। मूर्ति प्रतिष्ठा करवोनि साची ।।
प्रासादहीं निर्मुनी उत्सवाशी ।। करोनि आलें तव दर्शनाशी ।।
यापरीं गौरी देवीचें वचन ऐकुन श्री शंकर बोलतो निरखा.

(दरु) वेद शास्त्रांचे मर्म विदित झालें ।। खेद जावोनि सौख्य हता आलें ।। प ।।
भेद तूझा निरसला गणेशाची ।। हेदयाकीं म्हणऊनि जाण तूंची ।। अ ।।
यापरीं श्री शंकरानें बोलतां गौरीदेवीं बोलते निरखा.

(दरु) उपायानें तूझिया दया सारा ।। उपार्तिलेंचिद्रुप म्या उदारा ।। प ।।
उपासीनां त्या तुला भेद नाहीं ।। सुपाष्टची बोलतें आजि पाहीं ।। अ ।।
यापरीं गौरीदेवीनें बोलतां श्री शंकर फार संतुष्ट होऊन उपासना काळीं चैतन्य येकंदर येक झाल्या करितां भेद नाहीं. वरकड वेलेस देहोपाधी कडून भेदसका भासतो, परंतु वस्तुता तो भेद नव्हे म्हणुन संप्रज्ञातसमाधीचें वर्महीं जाणुन फार सरस बोललीस. म्हणुन फार श्लाघला करुन पुनश्च ध्यान समाधीस जातां महागणपति वियोगानें उद्विग्न चित्त गौरी देवी सख्यांप्रति बोलते निरखा.

(दरु) अझुणी मम गणपति पुत्र कां न झाला ।। अगुण पण मजवरि दाखवी कशाला ।। प ।।
रिझुनी मम वरदाकि तोचि आजि त्याला ।। वुझवी पर कवण कि सर्व जाण त्याला ।। अ ।।

यापरीं बोलून पुनश्च बोलते निरखा ।।

(श्लोक) मुलें देखुनी सानशि या मनाला ।। असें वाटतें हाचि कीं सोंडवाला ।।
अगाई अतां काय सांगूं दिठीस ।। प्रभूतोचि कीं दीसतो आसपास ।।
यापरीं बोलून सख्यानें पूर्वी गणपति व्रत केल्याकरितां श्री शंकर प्रिया झालें. त्यास्तव आजि भद्रपद शुक्ल चतुर्थी झाल्या करितां त्याने पुत्र व्हावया निमित्त त्याची पूजा करीन म्हणून मृण्मय सिंहावाहनारुढ दशभुज त्रिमुख विनायकाचा विग्रह करुन सख्याशी सहित त्या विग्रहाची षोडशोपचार पूजा करुन स्तोत्रपूर्वक प्रार्थना करिते निरखा.

(चुर्णिका) श्रीमन्महागणपते गजवदन ।। कृतानन्य शरण भक्तजनावन ।। दुर्मद दजुज धन चंड प्रभजन प्राजुज्ञतांगीकार कृत कश्यपद्धिति मनोरंजन ।। ततश्चयाज्य कुलोद्भव काशिराज गृह गमन प्रख्यातपित नाना वैभव प्रतान ।। तदैव देवांत कनारांतकशिधन संतोषित त्रिभुवन ।। त्रिषय निरत जन दुलभैक सुख सदन ।। अनादि मध्य निधन ।। सर्वाभीष्ट प्रपूरणैक दक्ष संतान ।। वर्धित भक्तजन संतान मां पाहि नमस्ते नमस्ते ।। यापरीं गौरीदेवीनें स्तोत्र करितां तो महागणपति विग्रहच सचेतन होउन येतो निरखा.

(दरु) येतो महागणपती.

यापरीं महागणपति गौरीस पुनश्च प्रत्यक्ष होतां तें दिव्य तेज पाहून घाबरी होऊन गौरीदेवी बोलते निरखा.

(श्लोक) हें स्पप्न कीं ना तरि पित्त दोष ।। उन्मादकीं मोह अहो विशेष ।।
मी हीं दिशेना मज माजि आतां ।। ते जो भरें व्यापियलें दिगंता ।।

यापरी गौरीदेवी भांबावत असतां त्या दिव्य तेजो मंडळांतूनि आकाशवाणी होते निरखा.

(श्लोक) ज्याच्या वियोगा नसहोनि पाहीं — त्वां पूजिलें ज्याप्रति कीं अतां हीं ।।
तो मी गणेश प्रभु जाण चित्तीं ।। भांबावशी कां धरि धैर्य वृत्ती ।।

यापरीं आकाशवाणी होतां गौरीदेवी सावध होऊन पूजिली ते प्रतिमाच सचेतन होऊन प्रत्यक्ष झालीं ऐसे जाणुन महागणपति प्रति प्रणाम करुन बोलते निरखा.

(श्लोक) हें रुप अप्राकृतकीं अनंता ।। नव्हे प्रपंच क्षम येक दंता ।।
आतां तुवां प्राकृत बाल व्हावें ।। तेणें पहा मामक चित्त धांवे ।।

यापरीं गौरीदेवीनें प्रार्थितां ।। तो महागणपतीच नेपथ्यामध्यें जाऊन षड्भुज त्रिनयन प्राकृत बाल रुपें गौरीपुत्र होऊन येते निरखा.

(दरु) बाल गणपती येतो होउनि ।। बालक गौरीचा पहा पहा ।। प ।।
फाल विलोचन षड्भुज सुंदरा । काळचि असुरांचा ।। पहा पहा ।। अ ।।
काल काल शिव शंकर सुत तो ।। कामित फल दाता पहा पहा ।।
चाळक सकळांचा अवतरला ।। साधू देवहिता पहा पहा ।। १ ।।

यापरी महागणपतीनें पुत्र होऊन येतां तन्माया मोहित गौरीनें अपुला औरसपुत्रच म्हणऊन ऊचलून कडिये घेऊन दाम देऊन आनंद सागरीं मग्न होतां गणपति जन्म महोत्सवास दिव्य पुष्पवृष्टि होते निरखा.

(दरु) दिव्य पुष्पवृष्टि होते पाहा ।। भव्य गजानन जन्म महा ।। प ।।
गव्यसमृद्ध तें गाई होती नव्य सुखोदय होय कि जगती ।। अ ।।

यापरीं पुष्पवृष्टि होउन सुंगंधि मंद मारुता गमनादिक शुभ सूचक चिन्हें येकंदर होतां ।। सर्वानंददायक बालकाचें रोदन ऐकुन प्रथम गणानीं श्री शंकराकडें जाउन स्वामी तुला पुत्रोत्सव जाहला म्हणुन संतोष वर्तमान सांगतां. तें ऐकुन परम संतुष्ट श्री शंकर येतो निरखा.

(दरु) : करुणाकर जागि शं. ।।

यापरी श्री शंकर येऊन पुत्रमुख पाहून गौरिप्रति बोलते निरखा

(छंद) : पुत्रकीं तुझा ऐक वो प्रिये ।। पूर्ण ब्रम्हसें जाण निश्चयें ।।
मैत्र फार हा होय सुरगणीं ।। जैत्रहीं तसा दनुज शिक्षणीं ।।

यापरीं बोलुन गौतमादि थोर थोर ऋषीश्वरांस बलाऊं पाठविता गौतमादि ऋषीश्वर येताहेत निरखा

(दरू) : त्वरित ऋषीश्वर येती पाहा ।। हरिखुनि मानसिं फार महा ।। प ।।
गिरिजा तनुजाशिसांप्रत निरखुनि ।। गुरुतर आनंदाहूं म्हणउनि ।। अ ।।
योग निष्ठ आणि भक्त शिवाचे ।। युक्तयुं जानहिं भक्त हरीचे ।।
भोग विरहि फार विरक्त ।। भूसुर आत्म विचारासक्त ।।

यापरी ऋषीश्वर येऊन श्री शंकरांशी संतोष सल्लाप करित असतां गौरीसुताप्रति फणा मंडल छाया करावया करितां आदिशेष येतो निरखा

(दरू) : आदिशेष तो येतो पाहा ।। अद्भुत महिमाहा ।। प ।।
गावी करोनि निजांगें छाया ।। आदि पुरुषाशि करावया ।।

यापरीं आदिशेषानें येतांच श्री बाल गणेशानें तत्फणा मंडला खोंल बसतां तें पाहून सर्वत्रानीं आश्चर्य मानितां मग तें लेंकरु उचलून गौरीदेवीनें गौतमांचे मांडिवरि बसवितां तें लेंकरु विलोकून फार संतुष्ट गौतम बोलतो निरखा ।।

(श्लोक): आजि भद्रपद शुक्ल चतुर्थी ।। चंद्रवार शुभ सर्व हितार्थी ।।
सिंव्ह लग्न शुभ पंचग्रहाशीं ।। युक्त तैं प्रगटला गुण राशि ।। त्यास्तव ।।

(दरू) : बाल तुझा बरवा ।। गिरिजे ।। प ।।
काळचि हा कीं दैत्यां आतां ।। काय अम्हा परवा ।। अ ।।

यापरीं बोलून श्री शंकराकडून आतकर्म करऊन मृणाय गणेशाची पूजा करुन उपवास आणि दुसरे दिवशीं पारणा करुन दाहा दिवस गणेश महोत्सव करावया करितां निज निवायास जावयास श्री शंकराचा निरोप घेऊन ऋषीश्वरां सहित गौतम निघून नेल्यानंतर श्रीशंकर हीं वस्त्रें भूषणें वाटावयानिमित्त समांतरास निघून जातां लेंकरुं हातीं धरुन फार हरिखानें गौरीदेवी सख्यांप्रति पाहून बोलते निरखा

(दरु) : दाखवांकि बाळ असा ।। धरिणि वरि सख्याने ।। प ।।
शेखरायमाण चंद्र ।। शेष वाहनारुढ ।।
देखिला त्रिनेत्र दिव्य तेज कीं सख्यानो ।।

यापरीं गौरीदेवी आपुला पुनश्च अतिशयानें जन्मला म्हणुन फार हरिखून सख्याशि सहित बाळ गणेशाप्रति नाहीणजेत निरखा

(दरु) : नाहणिते गणनायका ।। प ।। शहणी ते गौरीसाधु विलोका ।। अ ।।
देह धर्मातीत देवाचे मस्तकीं ।। स्नेहमाखितसे मोहूनिया कीं ।। १ ।।
सागर कुक्षिशि सागर पाणी ।। रागावशें बाली राजीव पाणी ।। २ ।।

यापरीं नाहणून दूध पाजविते निरखा

(दरु) : पेरे पेरे गजवदना दूध पेरे ।। प ।।
कांरे सनिशि मुख तुझें पसरी वेगें रे ।। अ ।।
ऐसें वदतां सोंड तें वांटित सोडी रे ।।
भासे मातेशि करितो म्हणउनि खोडी रे ।।
श्वासें फुत्कार करितां तें गिरिजा तोडीं रे ।।
हासे आळी जन बहु त्याची मानुनि गोडी रे ।। १ ।।
यापरीं दूध पाजऊन एकादशदिनीं सर्वज्ञानि मिळून गौरी सुतास गणेश म्हणऊनि नामकरण केल्यानंतररें गौरीदेवी गणेशास पाळणा घालून हलविते निरखा

(दरु) : जो जो जो जो रें सुमुखा ।। जो जो जो जोरें ।। प ।।
साजे तुजला पालख हाकी ।। सत्वर सुख सुख करिरे ।। अ ।।
चारी वेदहि रे ज्याला ।। झोल चौंपाय ।।
भारी शास्त्रपुराणें पाद्या ।। भासतवदु काय ।। १ ।।
साग्र स्वछ पहा मुक्ती ।। चारि कळस जया ।।
जाग्रत्स्वरून सुषुप्ती तुर्या ।। झाल्या सांखळिया ।। २ ।।
महतापी चांदणी त्यावरि ।। मध्यें शोभतसें ।।
सहजी सहज तेज तियेचें ।। सदरीं फांक तसे ।। ३ ।।
दोरा ध्याना धरुनी ।। गौरी डोलतसे ।।
शूराग्रेसर अखंड जाग्रत ।। भारी हांसतसे ।। ४ ।।
यापरीं श्री शंकर मंदिरी महोत्सव चालून गौरीशि सपरिवार श्री शंकर संनिधानास जातां हे येकंदर पाहून सिंधु दैत्यास वर्तमान कळवायास गुप्त चार येताहेत निरखा

(दरु) : गुप्तचार ते येती पाहा ।। गुण गण रहित पहा ।। प ।।
आप्त बहुते दैत्य पतीचे ।। अगणित निरुपम दुर्गुण सांचे ।। अ ।।
आहि तुंडिक होउनि येक ।। आणि दुजातो ऐंद्र जालिक ।।
साहित्य सकळ हीं घेउनि संगे ।। सामर्थ्य दाविति बहुमति योगें ।। १ ।।
यापरीं गुप्त चार येउन जनाकडें स्वस्थ सामर्थ्य प्रदर्शनाविषई दोघें हीं मांत्रिक झाल्या करिता परस्पर चर्चा पाऊन पहिलें विष भेदकानें मोडी ठेऊन उत्कट मायानें काढितां त्या ऐंद्रजालिशनेहीं नाना विद्या लाघव दाखवितां त्यासि अहि तुंडिकानें मंत्रवलें कडून विद्या निरोध करितां मग परस्पर दैत्य म्हणुन समजून सांप्रत आम्ही वर्तमान कोणाकडे सांगणें पडतें कीं काय अनर्थ येतां कीं कळना म्हणुन उभयतां तजवीज करित असतां सपरिवार चंडासुरासहित सभास्थित सिंधु दैत्य येतो निरखा

(दरु) : दैत्य धुरंधर ये ।।
यापरीं सिंधु दैत्य येउन चंडासुरा येकदां झाळचासकेंच दुसऱ्यानें ही होईल काय म्हणलासकीं तेव्हांच मी मनी तरकून जाग्रतेनें कार्य पाहा म्हणालों शेवटीं प्रकारीतरच झालें. हें वर्तमान हीं नारदानीं सांगतां अवगत झालें त्या भौमासुर विकटासुरांची गति काय झाली कीं कळत नाहीं.
यापरीं सिंधु दैत्यानें बोलतां त्याप्रति चंडासुर बोलतो निरखा.

(श्लोक): जो भृत्य कार्य करितोचि समर्थ जाणा ।। कार्याविना सहज होतकिं दैत्य वाणा ।।
ऐश्यास कार्य विपरीत करी पदाति ।। तोहीं न दावि मुख हे तरि केंवि येती ।।
यापरी चंडासुरानें बोलतां.

सिंधुदैत्य : आमुचे आप्त सोयेरे ऐश्या कामास योजून परस्परांचें वर्तमान परस्परांस कळविलें नाहीं ते तुजवरि गुणाच.

चंडासुर : गुना दैवावरि ।।
यापरीं बोलून पुनश्च बोलतो निरखा.

(श्लोक): हे सोयरे आप्त म्हणोनि भोगी ।। म्या योजिलें जतावक कार्य भागीं ।।
प्रत्येक झाल्यास्तव कार्य तंत्र ।। प्रत्येक नाहीं कथिल स्वमंत्र ।।
यापरीं चंडासुरानें बोलतां.

सिंधुदैत्य : या दोघांसच यखादें गांठि पडल्यानें कार्य सकळहीं नाशेल की म्हणावयाची तजविज केली नाही ते सर्वथा तुजवरि गुणाच.

चंडासुर : रागें भरून तुझें मंत्रिपद मजला लागत नाहीं.
यापरीं बोलून सदरेंतुन उठावयास जातां.

सिंधुदैत्य : लौकरि चंडासुराचा हात धरून काय चंडासुरा तूं फार शहाणा चतुर असुन हीं सहजी बोलण्यास येकंदर मूर्खाचे परीं रागें भरलास तर कसें यापरीं बोलुन समाधान करून चंडासुराशि बसवितां. चंडासुरानें हीं तेवढ्यानेंच मनी फार संतुष्ट होतां इतुकियांत दैवाधीन दोघें ही येकत्र आहेतकीं म्हणुन चारानीं येउन मुजरा करून सामोर उभें राहतां. त्यांप्रति पाहून चंडासुर बोलतो निरखा.

(आर्या): कोण तुम्ही कवणाचे ।। कोठुनि येतां कीं सांगिजे साचे ।।
खूण स्वल्प वदावी ।। जाणिव मग होय नीट मज वर वी ।।
यापरीं चंडासुरानें विचारितां. इतुकियांत दौवारिकानें चार बाहुल्यानें स्मरण नाहीं सांगा चार बोलताहेत निरखा.

(छंद): गौतमा श्रमाहुति कीं अतां ।। येतसूं अम्हीं चार उभयतां ।।
यापरीं चारानो बोलत असतां. आहो तुम्ही जंघ प्रजंघ नव्हेत काय. असो तिकडील वर्तमान काय सांगा म्हणतां. ते सांगताहेत निरखा.

(छंद): श्वेत साध्य तो गणपती भला ।। भूतपति गृहिं जन्म पावला ।।
यापरी चारीनीं वर्तमान सांगत असतां आकाशवाणी होते निरखा.

(श्लोक) : तुंझा संहार करितो त्रिभुवन महित ख्याति जो विश्व पाता ।।
कोठें कीं जन्मालासे म्हणउनि तुजला जाणवी मीचि आतां ।।
तेणें कीं गर्व सर्वत्युजुनी झडकरी नम्र हो सिंधु दत्य ।।
तैलोक्य क्षेमकार्यी अणि करमशिजें सोडि त्या पाप पैत्या ।।
यापरीं आकाशवाणी होतां तें ऐकुन. सिंधु दैत्यानें धरा धरा मारा म्हणतां. सर्वेच कितेक दैत्यानीं आकाशीं उडून पडतां. सिंधु दैत्य मुर्छा पाऊन पुनश्च सावध होउन बोलतो निरखा.

(आर्या): त्रैलोक्य कंट काला ।। कंटक तो काण आजि अवतरला ।।
निर्जित सकळ सुराला ।। मृत्यु कसा व्योम वाड्मृषा मजला ।।
यापरीं सिंधु दैत्यानें त्याप्रति चंडासुर बोलतो निरखा.

(श्लोक): तूं मृत्यु मृत्यु तुजलाभि जाण ।। हे व्योमवाग्व्योम फुला समान ।।
यापरीं चंडासुरानें बोलतां हीं सिंधु दैत्य फार मनी भाविश होउन बोलतो निरखा.

(श्लोक): माया प्रयोगें अवघ्या जणानीं ।। शत्रू कसें हीं वधिजे धरोनी ।।
यापरीं सिंधु दैत्यानें बोलतां. सर्वत्रानी शत्रू संहारा विषई मी तुं म्हणुन सरसावतां चंडासुर त्यांप्रति बोलतो निरखा.

(श्लोक): ज्याला जसें मानल तेवि आतां ।। माया करोनी अरिच्या विधाता ।।
करोनी आल्यां सकळां इनाम ।। देईन नाहीं तरि हा प्रणाम ।।
यापरीं चंडासुरानेंचें समस्तांस आज्ञापन होउन सर्वत्रानीं निघून जातां. सिंधु दैत्यानें वैद्य कोणीं हजीर आहे काय म्हणतां वैद्य येतो निरखा.

(दरू): वैद्य शिरोमणि येतो पाहा ।। वातरोग युत हा ।। प ।।
खाद्य कांही मंद लागे परि ।। खंडित बोलत इतरांशि बहुपरि ।।
यापरीं वैद्यानें येऊन हात पाहुन प्राणभय नाही म्हणुन सांगुण जातां. सिंधु दैत्य अंतःपुरास गेल्यानंतर चंडासुरहीं स्वकार्यास निघून जातां. गौरीस पुत्रोत्सव जाहला तें वर्तमान ऐकून दोहित्र दर्शनास्तव हिमालय येतो निरखा.

(दरू): हिमालय तो येतो पाहा ।। हिमज्य वरि कीं फार महा ।। प ।।
उमा सुता तें निरखूं नयनीं ।। अमूल्य आभरणें तें घेउनि ।।
यापरीं हिमालय येउन बोलतो निरखा.

(श्लोक): कन्या म्या दिधली पुराण पुरुषा जो कीं त्रिशूली पहा ।।
तेकीं पुत्रवती अहो म्हणउनी संतोष झाला महा ।।
आतां भेटुनियां तिये आणि तिच्या देखोनिया बाळका ।।
वस्ता लेवउनी जयाशि मग मी पाहीन त्या कौतुका ।।
यापरीं हिमालय बोलत असतां बाल गणेश सहित सपरिवार गौरीदेवी येते निरखा.

(दरू): गौरी त्रे ये ।।
यापरीं गौरी येउन पित्याप्रति आलिंगुन व्दंव्दार्थे बोलते निरखा.

(श्लोक): दिगंबरा देउनि कन्येकेशी ।। निश्चितकं येकचि भूप्रदेशीं ।।
कन्या पित्तात्वत्सम कोण लोकीं ।। आहे सुखी सांग मला अतांकीं ।।
यापरीं बोलुन गौरी देविनें लेंकरूं मांडिवरि बसवितां त्या लेंकरास भेटुन दाम देउन हिमालय गौरिप्रति बोलतो निरखा.

**(श्लोक):** आई तुझे भेटिस यावयाला ।। उद्‌युक्त होतें मग नारदांला ।।
म्या देखिलें त्या मुनि पुंगवानीं ।। त्व त्वत्पुत्र लाभाकथिलें भवानी ।।
यापरीं बोलुन लेंकरास बाळलेणी येकंदर लेवउन हिमालय निघून जातां बाल गणेशाप्रति उचलून न्यावें म्हणुन सिंधु दैत्य प्रेरित गृध्रासुर येतो निरखा.

**(दरू):** गृध्रासुर तो येतो पाहा ।। गृध्राकार महा ।। प ।।
कुधापरीं बहुवर्धित रुपी ।। सिध्रांचा जो वैरी पापी ।।
यापरीं गृध्रासुर येउन झेप घालून बाल गणेशाप्रति उचलुन घेउन नेपथ्या मध्यें जातां प्रेमविव्हल गौरीदेवी सख्यांशी सहित घाबरी होउन पात असतां. गृध्रासुर वधून सपक्ष हस्ते श्री बाल गणेश येतो निरखा.

**(दरू):** असुर वधोनी गणपती येतो ।। अगजा बाल पहा ।। विजयी ।। प ।।
असुनिहिंसाना अघटित घटवी ।। अद्‌भुत विग्रह हा ।। अ ।।
अवनीत्राकीं उत्तर अंभार ।। अतिशय सुखराशी ।।
अवतरलासे महिमा ज्याच्या ।। अविदित वेदांशी ।। १ ।।
यापरीं बाल गणेश येऊन पंखें हाती घेउन गौरीदेवी आदि करुन समस्तांस आपुलें शौर्य दाखवितो निरखा.

**(दरू):** पहा पहा तुम्ही सकळ ।। परम शौर्य माझें ।। प ।।
महा महा दैत्य आणिक मधिन भूमि बोझें ।। अ ।।
यापरीं शौर्य दाखउन गौरीदेवी सखीप्रति बोलते निरखा.

**(दरू):** आजि सोनियाचा दिवस बाई ।। अद्‌भुत हें तरि सांगु मी काई ।। प ।।
गाजविलें यश माझिये बाळें ।। धारिशि मारुनि निज भुजबळें ।।
यापरीं गौरीदेवी सखीप्रति बोलत असतां बाल गणेशाशीं खेळावयास मुनि बालक गण येतो निरखा.

**(दरू):** मुनि बालक गण येतो ।। मुदित मनें पाहा ।। प ।।
वनतरु कुमुमालंकृत वाद्‌युनि खेळ महा ।।
यापरीं मूनि बाल गण येतां मूषिक रुपी क्षेम कुशल दैत्य आंगावरि पडून गणेशास मारावें म्हणुन परस्पर भांडत येताहेत निरखा.

**(दरू):** मूषिक रुपी दैत्य येती पाहा ।। मुर्ख धुरीण महा ।। प ।।
दूषिति जे नित्य साधु जनांशी ।। दुर्जन फारचि जे अघराशी ।।
यापरीं क्षेम कुशलांनी येउन भांडुनि आंगावरि पडतां त्यांशी संहित नेपथ्या मध्यें जाऊन त्यांस बघून त्यांच्या मिश्या उपडून घेऊन श्री बालगणेश येतो निरखा.

**(दरू):** असुर व ।।
यापरीं बाल गणेशानें येउन मातेशि त्याच्या मिश्या दाखवितां तें पाहुन तीनें आश्यर्य मानितां श्री बालगणेशास उचलून न्यावें म्हणुन मार्जार रुपी क्रूरासुर येतो निरखा.

(दरू): क्रूरासुर तो मार्जाराकृति ।। कुमती येत पहा ।। प ।।
शूराग्रेसर गणपति निवटूं ।। शोभ न रहित महा ।।
यापरीं क्रूरासुर येउन हाका मारीत फिरत येका येकीच गणेशावरि झेंप घालितां त्याशीं सहित नेपथ्यामध्यें जाउन त्याचा वध करुन त्याच्याहि मिश्या उपडून घेउन बाल गणेश येतो निरखा.

(दरू): असुर व ।।
यापरीं बाल गणेश येउन मातेकडे उभें राहतां. असुर शरीरें उचलून टाकण्यानें बेजार होउन गौरीदेवीकडें बाल गणेशाविरि फिरादि करुन घ्यावयास प्रमथ गण येतो निरखा.

(दरू): प्रमथ गण तो येतो पाहा ।। प्रथित पराक्रम हा ।। प ।।
अमर रिपूचे उचलूं काय ।। श्रमत सदा बहु करुनि उपाय ।।
यापरीं प्रमथ गण येउन गौरीदेवी प्रति बोलतो निरखा.

(दरू): अचल सुते देविपुत्र तुझा हा ।। असुर निवटित नित्य पहा ।। ।।
उचलील कोण तयांशि निरंतर ।। रिचवति जे दश योजन भीकर ।।
यापरीं प्रमथ गण बेजार होउन बोलतां. त्याशि गौरी देवीनें काय करावें अरिष्ट आलें तें तुम्हीच कीं निवारण करावें म्हणुन समाधान करुन त्यां त्यांनीही निघून जातां. गणेशा वरि पडून त्याचें अहित करावें म्हणुन आम्रवृक्षारुपी व्योमासुर येतो निरखा.

(दरू): आतां व्योमासुर येतो पाहा ।। आम्रवृक्षाकृति होउनि हा ।। प ।।
धाताशि चिंतुनि गणपतिच्याकीं ।। वात विघूर्णित शाखोपशाखी ।।
यापरीं व्योमासुर येउन गणेशावरि झुकतां त्याला हात देउन नेपथ्या मध्यें नेउन वृक्षोन्मूलन पूर्वक त्याचा वध करुन बाल गणेश येतो निरखा.

(दरू): असुर व ।।
यापरीं बाल गणेश येउन मातेकडें उभें राहतां इंद्राणीचें रुप घेउन बाल घातिनीशंत माहिषा राक्षसी येते निरखा.

दरू: राग ।।

येतशे शत माहिषा ।। येतसे ।। प ।।
भूता कृति ते लपउनि अपुली । पुतने परि विषमय पुतळी ।। अ ।।
इंद्राणीचें घेउनि रुप ।। चंद्रमुखी बहु सुंदर रुप ।।
इंद्राच्या विरहाचा ताप ।। सांद्र करीतचि अभिनय अपाप ।। १ ।।
यापरीं शतमाहिषा येउन गौरीप्रति बोलते निरखा.

(दरू): आलें पहा मी ईश्वर कांते ।। ऐकुनि पुत्र महोत्सव माले ।। प ।।
पालक होईल हा सुर वारा ।। परम दयाकर निज जनधारा ।। अ ।।
निरुपमलील तुझा सुत गौरी ।। निरखिन म्हणउनि हरिखुनि भारी ।।
त्वरित गतीनें भामिनि ।। करिं मम देई बाळ भवानि ।। १ ।।

यापरीं शतमाहिषेनें बोलतां गौरीदेवीनेंही बालकहाती देतां त्याला दाम देत्या परीं तोडानें दावुनि मारावयास शतमाहिषेनें प्रवर्तता. तीचे दोनि कानास हात टाकुन तोडानें नाक धरून दाबितां श्वास कोंडून तीनें हात पाय झाडितां. इतुकियांत गौरीदेवीनें सोडि सोडि म्हणत असतां. ती सहित नेपथ्या मध्ये जाऊन तीचा वध करून कान नाक घेउन श्री बाल गणेश येतो निरखा.

(दरू) असुरी व ।।

यापरीं बालगणेश येउन नाटयेंकडून कान नाक दाखवितां. इतुकियांत येकायेकीच भूकंप होतांच काय हे अतिशय म्हणउनि सर्वत्रानीं पाह असतां गणशानें आपुल्यावरि खेळतां उलठून पडून मारावें म्हणुन आगाउच अंकणाकार होउन राहिला तो कमठासुर येतो निरखा.

(दरू) कमठासुर हो येतो पाहा ।। कठिण तराद्भुत पृष्ट महा ।। प ।।
दमन कराया गणपति लागी ।। दडूनि हळुहळु अंकण भागीं ।।

यापरीं कमठोसुर येतां त्यावरि गणेशानें खेळावयास बसतां. त्यानें कासाविस होउन गणेशा सहित नेपथ्यामध्यें जाता त्याच्या वध करून तत्पृष्ट हस्त श्री बालगणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ।।

यापरीं बाल गणेश येउन सर्वत्रास त्याची पाठि दाखवितां. गणेशाप्रति विषफल देउन मारावें म्हणऊन गणबाल रुपी दुंदुभि दैत्य येतो निरखा.

(दरू) दुंदुनि दैत्यय येतो पाहा ।। दुष्टसवेंगडी होउनि हा ।। प ।।
फंद करोनी विष फळ देउनि ।। सुंदर गणपति वंचित म्हणउनि ।।

यापरीं दुंदुभि दैत्यानें येउन अमृत फळ म्हणउनि गणेशास विषफळ देतां तें भक्षुन आणीक ऐशीं फळें दे म्हणउन त्याशि धिंगा मुस्ती लडत घेत नेपथ्या मध्यें जाउन त्याचा वध करून बालगणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ।।

यापरीं बालगणेश येतां त्याला गिलावें म्हणुन अजगरासुर येतो निरखा.

(दरू) अजगरासुर येतो पाहा ।। अमित पराक्रम हा ।। प ।।
गिळण्यासहिं योग्य निजाननिं ।। गजवदता प्रति घालीन म्हणउनि ।।

यापरीं अजगरासुरानें येउन गणेशास गिळीत नेपथ्यामध्यें जातां त्याचें पोट फाडून बाहेर निघून श्रीबाल गणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ।।

यापरीं गणेश येउन बाल चेष्टेनें टोळ धरित असतां शलभासुर येतो निरखा.

(दरू) शलभासुर तो येतो पाहा ।। शलभा कार महा ।। प ।।
खल चूडामणि गणपति लागि ।। स्वरतरदंशिन म्हणउनि वेगीं ।।

यापरीं शलभासुर येतां त्याला धरून नेपथ्या मध्यें वधून श्री बालगणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ॥
यापरीं गणेश येतां त्यावरि टकरघेउन मारावें म्हणुन मेषासुर येतो निरखा.

(दरू) मेषासुर येतो पाहा ॥ मेषाकार महा ॥ प ॥
दोषाकर बहु हिंसक पापी ॥ दुष्ट शिरोमणि परम प्रतापी ॥
यापरीं मेषासुरानें येउन गणेशावरि टकर घेतां. शिगें धरून त्यावरि चढून नेपथ्या मध्यें जाउन त्याचा वध करून श्री बालगणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ॥
यापरीं बालगणेश येतां उष्ट्रारुपी खड्गासुर येतो निरखा.

(दरू) उच्चस्वन खड्गासुर येतो ॥ उष्टाकार पठा ॥ प ॥
सच्चिद धन गणपति तें निवदूं ॥ सत्वर गमन महा ॥
यापरीं खड्गासुर येतां त्याला धरून गणेशानें नेपथ्यामध्यें जातां वाट-निरोधांवें म्हणुन आडवा शैलासुर येतो निरखा.

(दरू) शैलासुर तो येतो पहा ॥ शैलाकार महा ॥ प ॥
कैलासपरि उन्नत वाढत ॥ काय जयाचा मार्ग निरोधिता ॥
यापरीं शैलासुर येतां उष्ट्ररुपीं खड्गासुर वधून श्री बालगणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ॥
यापरीं बालगणेश येउन पर्वतानें मार्ग कि रोधिला तो देखून फूत्कार करितां त्या फूत्कारें कडून तो पर्वत गगन मार्गी उडून नेपथ्यामध्यें पडून शतपूर्ण होउन दैत्यगत्त प्राण झाल्या. नंतर बाळकांसहित श्री बाळगणेशा वन विहार करावयास जातां. बालगणेशाच्या खोडी साहवेनासें गणेशासहीं हाती धरून घेऊन गौरी देवीकडें फिरादि करून घ्यावयास रागारागानें गौतम ऋषी येतो निरखा.

(दरू) गौतम कोपें ॥ येत असे पाहा ॥ श्रौतनिधी आणि शास्त्रज्ञ महा ॥ प ॥
चौत्तवसानाशीं धाउनि गणपति ॥ हातीं धरोनिच आर्भाट करि अति ॥
यापरीं गौतम येउन गौरीदेवीचें हातीं गणेशाप्रति वोपुन बोलतो निरखा.

(श्लोक) गौरी तुझा पुत्र गड्यांसमेत ॥ येवोनि माझ्या वसतीस आंत ॥
नैवेद्य पक्वान्न समग्र खातां ॥ धरोनि म्या आणियलेंकि आता ॥
यापरीं बोलुन पुनश्च बोलतो निरखा.

(दरू) फार अनवाळ गौरि तुझा सुत ॥ पोरांशी येउनि देव घरांत ॥ प ॥
॥ तारक ज्या मुनि पूजित मूर्ती ॥ दारि झुगारुनि करितसे कीर्ती ॥ अ ॥
खोडी ययाच्या सांगू मी काई ॥ थोडीच हे परि कथिली उपाई ॥
जोडूनियां कर ध्यान करितां ॥ तोडितसे पहा यज्ञोपवीत्ता ॥ १ ॥
यापरीं गौतमानीं फिरादि करून तुझ्या पुत्रा करितां आश्रम टाकून जातों म्हणतां. गौरी देवी त्यांस बरी गोष्टी सांगुन फोकाटी घेउन बालगणेशास ताडावयास जातां इतुकियांत गौतमानीं नको नको म्हणतां तो गणेशच शंकर होउन येतो निरखा.

(दरू) येतो महा गण. ।।

यापरीं गणेशानें शंकर रुपें येतां फोकाटी खाले टाकुन गौरि लज्जित होवोनि उभी राहतां पुनश्च नेपथ्या मध्यें जाउन निज रुपानें येतो निरखा.

(दरू) येतो महा गणपती ।।

यापरीं बाल गणेशानें येतां त्याला कोठडींत घालून कवाडास किलपहीं लालितां सवेंच गड्याशि सहित खेळतां देखून कवाड उघडून पाहतां तिकडें हीं त्याला पाहून गौरी देवी भावावतां. सवेंच जवळ येउन पदर धरून लाडू दे म्हणुन हट्ट करून लोळण घालितां तुला ईश्वरा कडुनच शिक्षा करवितें चाल म्हणुन बाल गणेशास उचलून कडिये घेऊन गौरीदेवी निघून जातां निष्क्रांतास्सर्वे.

इति श्री भोंसल कुल दुग्ध सागर सुधाकर श्रीचंद्र मौकीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिव्हासन संपत्संतति राजाधिराज महाराज छत्रपति भग्लोक देवेंद्र श्री शरभेंद्र भूपाल विरचित श्री गणेश लीलार्णव नाटके चतुर्थोंक: ।। ४ ।।

सिद्धि विनायकाय जय मंगळं ।।

---

श्री गणेशाय नम: ।।

त्यानंतरें आणि येक दिवशीं श्री बाळ गणेश मुनि बालका सहित वनविहार करावयास गेल्या ठाई विनता सुत मयुराशि वाहन करून विनता वाक्यें नाग लोकास जाऊन वासुकि आदि शेषास जिंकून स्वाभरण करून कारागृह स्थितश्येत संपति जटायुस सोडऊन घेऊन श्री बाल गणपति मयूरेश्वर होऊन सर्वत्रा सहित येणार त्याकरितां सभा सिद्ध करावयास गणदास नामक दौवारिक येतो निरखा.

(दरू) दौवारिक तो ।। सिद्धिविनायक जय मंगळ ।।

यापरीं दौवारिकानें यउन सभा सिद्ध केल्यानंतर यथानिर्दिष्ट सर्वत्रासहित मयूरेश्वर बाल गणपति येतो निरखा.

(दरू) येतो महागण ।।

यापरीं मयूरेश्वर बाल गणेश येउन विनतेचें स्मरण करितां कश्यप पत्नी विनता येतें निरखा.

(दरू) विनता ते येते पाहा ।। तनया लोक महा ।। प ।।
कनकांगी पति कश्यप वचना ।। मनिं आठवितचि मृग शिशु नयना ।। अ ।।
पक्ष पवन परि कंपित भुवना ।। भव्य गुणा शशि सदर वदना ।।
दक्षमहापति कश्यप भजनिं ।। रक्षित जे निज धर्मा लागुनि ।। १ ।।

यापरीं विनतेनें येतां श्री बाल गणेशानें तीचे हाती श्येन संपति जटायूस वोपुन माय लेंकरांची भेटि करविता विनता प्रणाम करुन बोलते निरखा.

(श्लोक) सपत्नीकद्रुनें श्रमउनि मला कीं स्ववनयीं ।।
गुरुत्मतें माझे अवनि बसतां त्याचि समयीं ।।
सुतां माझ्या तीघां निज नगरिं कारागृहिं भलें ।।
विले केलें ते हे मम करिं तुवां आजि दिधले ।।

यापरीं बोलुन पुत्रांसहित गणेशास नमस्कार करून विनता निघून गेल्यानंतर श्री बाल गणेश मुनिबालकांसहित ना ना खेल खेळत असतां मुनि पत्यांशी सहित गणेशास हुडकावयास गौरीदेवि येते निरखा.

(दरू) गौरी त. ।।

यापरीं गौरीदेवि येउन लेंकरें येकंदर खेळतां देखुन गणेशास उचलुन कडिये घेउन दाम देतां वरकड मुनि बालकानीं बयास गेल्याठाई वाहन येक संपादिलें म्हणुन ते वृत्तकथाहीं सांगुन मयूर हीं दाखवितां गौरीही पुत्र पराक्रम ऐकुन संतोषतां श्री बाल गणेश कडिये वरुन उतरुन मुनि बाळकां सहित कंतुक क्रीडा करितो निरखा.

(दरू) मणिमय चंडू गणपति खेले ।। आणिमादि नायक ।। अद्‌भुत लीले ।। प ।।
मणिपूर वेष्टित ।। वरफूत्कुर ।। मणि बंध भूषण रणितविमिश्रित ।।

यापरीं श्री बाल गणेश चेंडू खेलत असतां बालरुपी चंचलासुर येतो निरखा.

(दरू) चंचलासुर येतो पाहा ।। चंचल फार महा ।। प ।।
वंचन ज्याकुल विद्यामाना ।। संचय करि पापाचा जाणा ।।

यापरीं चंचलासुर येउन गड्यांत मिलून खेळतां त्यावरि डाव येतां त्याला घोडा करून त्यावरि बाल गणेशानें बसतां भार साहवेनासें बुबलें बाहेर काढुन त्यानें नेपथ्या मध्यें जातां त्याला वधून श्री बाल गणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ।।

यापरीं चंचलासुर वधुन गणेश येतां. इतुकियांत भुकाची वेल झाली म्हणन लेंकरांस गौरीदेवीनें दूध साखर मेवे मिठाया पेडे फुल फलादिक आणूकन देतां ते पदार्थ सर्वत्रा सहित गणेशानें भक्षिल्या नंतरें श्री बाल गणेशाप्रति आयुधें द्यावयास आयुधें घेउन विश्वकर्मा येतो निरखा.

(दरू) वरद गणेशा विश्वकर्मा हा ।। वर आयुधें देडं येत पहा ।। प ।।
परशुपाशांकुश कमल शितधार ।। हरिदश्वकांतिवि निर्मित् सार ।।

यापरीं विश्वकर्मानें येउन हें चारि आयुधें गणेशाप्रति देउन गेल्यानंतर गणेशाचें अहित चिंतन वृकासुर येतो निरखा.

(दरू) दुष्ट वृकासुर येतो पाहा ।। नष्टमहाखल दुर्जन हा ।। प ।।
शिष्ट जनांशि बाधुनियां अति ।। कष्टवितो बहु तामस दुर्मति ।।

यापरीं वृकासुरानें येउन सर्वत्रांस घाबरें करितां त्याला धरुन नेपथ्यामध्यें जाउन त्याचा वध करून श्री बाल गणेश येतो निरखा.

(दरू) असुर व ।।

यापरीं श्री बाल गणेश येतां त्याला कडिये घेउन आतां उशीर जाहला खेल पुरे म्हणुन गणेशा सहित निज निवासास जातां ऋषी पत्नीहीं स्व स्व बालकांसहित निज निज वसतीस जातां. श्री गणेशास व्रत बंध झालिया नंतरें मुनि पुत्रा सहित वेदाध्ययन करावयास श्री बालगणेश येतो निरखा.

(दरु) येतो महा ।।

यापरीं गणेश येउन अध्ययन करित असतां अष्टपादचतु: शृंगचतुष्कर्णव्दिपुछ पंच नेत्र त्रिमुखश्वापदासुर येतो निरखा.

(दरु) श्वापदासुर येतो पाहा श्वापद रुपी हा ।। प ।।
आपद देईन म्हणउनि सुमुखा ।। आत्म मतीनें मानित हारिखा ।।

यापरीं श्वापदासुरानें येउन सर्वत्रांस घाबरें करितां. मुनि पुत्रानीहीं हें अपूर्व मृग धरावें म्हणतां त्या मृगाशी झटून त्या सहित नेपथ्यामध्यें जाउन त्याला वधून श्री गणेश येतो निरखा.

(दरु) असुर व ।।

यापरीं श्री गणेश येउन मुनि पुत्रांशी ना ना खेल खेलत असतां मस्तकिचा चंद्र दिसत नाही म्हणउनि प्रमथ दंडावयास सपरिवार श्री शंकर येतो निरखा.

(दरु) करुण ।।

यापरीं श्री शंकर येउन प्रमथ गणाप्रति बोलतो निरखा.

(छंद) सर्वहीं तुम्हीं जवलि राखतां ।। शर्वरीपती हरपला अतां ।।
आणि जे तुम्हीं चंद्र लवकरि ।। कोण दुसरा येत मंदिरीं ।।

यापरीं श्री शंकरानें चंद्र लौकरि आणावा म्हणुन फार रागें भरतो. प्रमथ गण घाबरे होउन महा प्रभूची सेवा करणें. फार कठीण काय करावें म्हणुन कांपत उभें राहतां त्यां भाजि येक जण बोलतो निरखा.

(छंद) कालवैरिया तुं कृपाकरी ।। आल घालिशी कां अम्हावरी ।।
फालचंद्र तो खेलतां घरीं ।। बाल चंद्र म्या देखिला करीं ।।

यापरीं प्रमथ गणानें बोलतां पुत्र प्रताप समस्तांस कलवा म्हणुन श्री शंकर बोलतो निरखा.

(छंद) कोण कां तया नेइना अतां ।। आणिजे तुम्ही चंद्र तो खता ।।
नातरि तुम्हा दंड योजिले ।। मात हे तुम्हीं सत्य मानिजे ।।

यापरीं श्री शंकराने दबावितां बाल गणेशाकडें येउन प्रमथ गण बोलताहेत निरखा.

(छंद) बालका तुवां चंद्र चोरुनी ।। आल आणिलासेवि त्याजनीं ।।
चंद्र तो अतां देयिजे मुला ।। चंद्र चूडकीं शिक्षिता तुला ।।

यापरीं प्रमथ गणानीं बोलतां तें कानावरीच घेइनासें गणेशानें खेलत असतां. प्रमथ गणानीं गणेशास श्री शंकराकडें उचलून न्यावयाचा यत्न करितां सवेच गणेशाचे फूत्कार वेगें समस्तानीं श्री शंकराकडें जाऊन पडतां. भग नंदिगेश्वरास पाठऊन त्याची हीं गति तैशचि होतां. इतुकियांत गणेशानें येउन श्री शंकर मस्तकीं चंद्र ठेऊन. चंद्र मस्तकींच ओह कीं वृथा गलबला-कासया म्हणुन हांसत उभें राहतां त्या गोष्टीचें शंकरानें ही कौतुक मानितां. श्री शंकर प्रति. नंद्यादि प्रमथ गण प्रार्थिताहेत निरखा.

(श्लोक) स्वामी बालक हा तुझा सकली कां आम्हां कि आतां प्रभू ।।
नेमावा म्हणीजें आम्हाशि बर वें रक्षील हा कीं विभू ।।
ऐसें या प्रमथादि कीं बिनवितां शंभू वितापा पहा. पुत्राशी गणराज हा म्हणउनी नामाशि ठेवी पहा.

यापरीं गणेशास गणाधिपत्य देऊन श्री शंकर निघून गेल्यानंतर गणराज मुनिकुमारांशी खेलत असतां. सर्वदाया प्रकारें असुर भय प्राप्त होत्या करितां तत्परिहारार्थ गौरी देवीचे आज्ञेनें इंद्र याग करावा म्हणुन दीक्षित ऋषिगण येतो निरखा.

(दरु) येत पहा ऋषी गण येत पहा ।। प ।।
भूतनाथ भक्त धवल ।। भूति भूषितांग विमल ।।
श्रौत मार्ग निरत सकल ।। शास्त्र जाणताहि चपल ।। १ ।।

यापरीं ऋषीगण येउन इंद्र प्रीत्यर्थ याग करित असतां. गणेशानें येउन कैंचा याग काय हें म्हणुन यज्ञ वाटस्थ ऋषीश्वरांस विचारित असतां महिष रुपी दोघे असुर येताहेत निरखा.

(दरु) महिषासुर ते येती पाहा ।। महिषा कार महा ।। प ।।
अहिवाशी गणपतिच्या चिंतित ।। अहिवत दीर्घश्वासहि सोडित ।।

यापरीं महिषासुरानीं येऊन गणराजावरी हुल्कतां त्यांच्या पुछास हात टाकून दर दर वोढून नेपथ्या मध्यें नेऊन वधून गणराज येतो निरखा.

(दरु) असुर व ।।

यापरीं गणराज येतां वराह रुपी मंगलासुर येतो निरखा.

(दरु) मंगलासुर येतो पाहा ।। धिग बराहाकार महा ।। प ।।
अंग जयाचें फारचि पृथुतर दंगचि देखुनि सकलहि सुरनर ।।

यापरीं बराह रुपीं मंगलासुरानें येउन घर्घर स्वरें सर्वत्रांस खिदडितां त्याला धरुन नेपथ्या मध्यें जाऊन त्याचा वध करुन श्री गणराज येतो निरखा.

(दरु) असुर व ।।

यापरीं गणराज येउन पुनश्च कैंचा याग काय हें म्हणुन विचारितां अरिष्ट परिहारार्थ इंद्र याग करितों म्हणुन ऋषीनीं सांगतां. त्याशि कामधेनुस अजा प्रार्थनेनें काय होणें म्हणुन गणराजानें याग विध्वंसितां. सवेंच इंद्रानें गणेशाचें सामर्थ्य कलुन घ्यावें म्हणुन समस्ताचे जाठराग्नि आणि वायू स्तब्ध करितां. त्यास गणराज आपण अग्नि वायु रुपें संचरला तें देखुन इंद्रानें सिंधु दैत्य वधीं भरवसा मानितां त्यानंतर हीं मुनि कुमारांशि गणराज नाना खेल खेलत असतां व्याघ्रासुर येतो निरखा.

(दरु) व्याघ्रासुर तो येतो पाहा ।। व्याघ्रा कार महा ।। प ।।
आघ्राणुनि नर गंधा पापी ।। आग्रह करित भयंकर रुपी ।।

यापरीं व्याघ्रासुरानें येउन ज्यां त्यांवरि झेप घालितां त्याशीं झटून नेपथ्या मध्यें नेउन त्याचा वध करुन गणराज येतो निरखा.

(दरु) असुर व ।।
यापरीं गणराज येउन मुनि कुमारांशीं खेलत असतां गणराजाचा लग्नाचा निश्चय करावयास ब्रम्ह देवाकडून नारद येतो निरखा.

(दरु) सुर मुनि ना ।।
यापरीं नारद येउन श्री शंकराचा समय काय आहे कीं म्हणुन तजवीज करितां गौरीसहित श्री शंकर येतो निरखा.

(दरु) करुणा ।।
यापरीं गौरीसहित शंकर येतां त्याप्रति नमन करून नारद बोलतो निरखा.

(श्लोक) स्वामी सुंदर चांगल्या विधिसुता त्या ऋिद्धि सिद्धी महा ।।
कळचा त्या गणराज यास विधिनें योजावयाकीं पहा ।।
मातें धाडियलें तुम्हा उभयता पाशीं कृपा सागरा ।।
सांगा निश्चय तो विवाह विधिचा संबंध साजे बरा ।।
यापरीं नारदानीं कल्याण वार्ता बोलतां श्री शंकर गौरीप्रति पाहून प्रिये आम्ही गणराजास पंधरा वर्षे झाली कीं म्हणून लग्नाची तजवीज केल्यास सवेंच नारदहीं आल्या करितां शकुन फार चांगला आहे त्या मुलीच गणराजास करणें यापरीं बोलुन नारदाप्रति लग्नाचा बोलहीं देऊन गण-राजासहित निज निवासास जाउन सप्तकोटि प्रमथ गण गौतमादिसमस्त ऋषिगणासहित वाहन गणराजास घेउन हंसावाहनारुढ गौरी सहित गंडकी नगरा प्रति जावयास वृषवाहना रुढ श्री शंकर येतो निरखा.

(दरु) करुणा ।।
यापरीं श्री शंकर येतां. गणराजानें ब्रम्हदिकांस कारागृहापासुन सोडउन मग लग्न करुन घ्यावें म्हणुन शिष्टाचार संप्रदायें कडुन सिंधु दैत्याकडें शिष्टाईस अगाउच पाठविला तो नंदिकेश्वर येतो निरखा.

(दरु) नंदिकेश्वर ।।
यापरीं नंदिकेश्वर येउन गणराजाप्रति पाहुन बोलतो जें स्वामी शिष्टाईस गेल्या ठाई माझी गोष्टी कानावरि घेइनासें सिंधु दैत्य सवेंच फौज सिद्ध करुन युद्धासच निघाला मी अगाऊ निघून आलों.
यापरीं सिंधु दत्य येतां प्रमथ गणासहित श्री गणराज सिंधु दैत्यास घेउन नेपथ्यामध्यें जातां युद्ध येकंदर पाहून श्री शंकरास संतोष वर्तमान सांगावया नारदमुनि येतो निरखा.

(दरु) सुरमुनि ।।
यापरीं नारद येउन श्री शंकराप्रति पाहून युद्धाचें संतोष वर्तमान सांगतो निरखा.

(श्लोक) स्वामी त्वत्सुत आणि सिंधु उभयां जें युद्ध झालें महा ।।
युद्धा त्या उपमानसे उभय ते दृष्टांत त्याला पहा ।।
शेखीं दुर्मद सिंधु दत्य वधुनी संतुष्ट केली धरा ।।
केले देव समस्त मुक्त सुमुखें त्वकीर्ति हे शंकरा ।।

यापरीं नारदानीं संतोष वर्तमान सांगत असतां. सिधु दैत्य वधन जय लक्ष्मी समेत मयूर वाहनारुढ सपरिवार श्री गणराज येतो निरखा.

(दरु) येतो महा ।।

यापरीं गणराज येतां त्याचे भेटीस कारागृह मुक्त स्वस्व वाहनारुढ सुरवरांसहित ऐरावता रुढ देवेंद्र येतो निरखा.

(दरु) ऐरावतारुढ देवेंद्र येतो ।। अमर गणावृत शोभत कीं तो ।। प ।।
कारागृह मुक्त होउनि सांप्रत ।। कमल विलोचन भूषण भूषित ।। अ ।।
सिंधु वधें मनि हरिखुनि फार ।।
सिद्ध मनोरथ धृत शतधार सिंधुर वदना भेटुनि सादर ।।
सेवा करावी म्हणउनि सत्वर ।। १ ।।

यापरी देवेंद्र येतां हंसवाहनारुढ ब्रम्हदेव येतो निरखा.
यापरीं ब्रम्हदेव येतां गरुडारुढ विष्णु येतो निरखा.

दरु : विष्णु तोग ।।

यापरीं विष्णु आलिया नंतर देवेंद्र गौरी शंकरास प्रणाम केल्यानंतर श्री गणराजास प्रमाण करुन बोलतो निरखा.

श्लोक : स्वामी श्री गणराज या तव कृपें कारागृह पासुनी ।।
झालों आजि विमुक्त सर्वहि अम्हीं आनंदलों कीं मनीं ।।
भूमीचा भर सर्व हीं उत्तरला दैत्येंद्रं संहारितां ।।
आनंदाब्धि निमग्न तो ते ऋषि तपः प्रत्युह हा टालितां ।।

यापरीं देवेंद्रानें बोलतां इंद्राचे पट्टाभीषेकास गणराजानें इंद्राणीचें स्मरणा करितां इंद्राणि देवी येते निरखा.

(दरु) येतसे इंद्राणी पाहा ।। येथें हरिखुनी महा ।। प ।।
केतुकीं मदनाचा ऐशी केवल लावण्याची राशि ।। अ ।।
परम चातुर्य खाणी ।। पल्लव कोमल पाणी पर भृत मंजुल वाणी ।।
पति भेटि लागी झणी ।।

यापरीं इंद्राणी देवी येतां. इंद्र इंद्राणीस येकासनावरि बसऊन त्रैलोक्याधिप त्याची माल गला घालुन गणराजानें इंद्रास पट्टाभिषेक करितां कमलासनारुढ लक्ष्मी देवी येते निरखा.

(दरु) येतसे लक्ष्मी पाहा ।। एणाक्षी शुभ देहा ।। प ।।
देतसे संपद भारी ।। दीनांशी जे निर्धारीं ।। अ ।।
मारजनक राणी ।। मंगल गुण श्रेणी ।। सारस युत पाणी ।।
सांप्रत अलिवेणी ।। १ ।।

यापरीं लक्ष्मी देवी येतां सरस्वती देवी येते निरखा.

(दरु) वाणी ते येते पाहा ।। राणी अजाची ।। प ।।
पाणि धृतवीणा ।। खाणी सुखाची ।। अ ।।
सारस दल नेत्री ।। साधु शुभ कर्ती ।।
सारसुख सवित्री ।। फार सुंदर गात्री ।। १ ।।

यापरीं सरस्वती देवी येतां गणराजा तें वरावयास ब्रम्ह कन्या ऋषि सिद्धी येताहेत निरखा.

(दरु) ऋद्धि सिद्धी येती पाहा ।। वृद्धिस हेतु महा ।। प ।।
सिद्धि सकलहिं देउनि राखिति ।। बुद्धिशि देउनि बोध करिती ।। अ ।।
विश्व विधा तृपितामह कन्या ।। विमल मुखांबुजसुर जनमान्य ।।
विश्व गुणालय विस्तृत नयना ।। विपुल नितंबहिं सुंदर जघना ।। १ ।।

यापरीं ऋषि आल्यानंतर श्री शंकरानें श्री गणराज विवाहास मुहुर्त पहावयास बृहस्पतीचें स्मरण करितां तो येतो निरखा.

(दरु) अमर गुरु तो ।। आला पाहा ।। अमित गुणाकर ।। विमल मती हा ।। प ।।
शमदम संपन्न शास्त्र सरित्पती ।। रमणीय पुस्तक ।। रत्नहिं हातीं ।। अ ।।

यापरीं बृहस्पतीनें येउन हेंच मुहुर्त विवाहास सर्वोत्तम आहें म्हणतां सवेंच सर्वत्रानीं कैवल्यरुप पंचमुख सदाशिवाचें स्मरण करितां चिछक्ति सर्व मंगले सहित वृष वाहनारुढ सपरिवार सदाशिव येतो निरखा.

(दरु) परम सदाशिव येतो पाहा ।। पंचमुखी परमेश्वर हा ।। प ।।
वरद शिखामणि ।। वांछित पूर्ती ।। करवी सकलांशी ।। करुणा मूर्ती ।। अ ।।
सोम कलाधर शोक विनाशन ।। व्योम केश निज ।।
धाम पुरातन ।। साम गान प्रिय ।।
साधु जनावन ।। भीम नामा सर्व भीति निवारण ।।

यापरीं सदाशिव येतां ब्रम्ह विष्णु रुद्र गणराजादिक समस्त सुरवर प्रणाम करून प्रदक्षिणा करित नर्तन करिताहेत निरखा.

(श्लोक) पुराण पुरुष प्रभो परात्परायते नमश्चाराचर स्वरुपिणे हरायते नमो नमः ।।
निराकृति निरंजना जरामरायते नमः स्थिराय चंद्र मौलये सुरादये नमो नमः ।।

यापरी समस्तानी हर्षपारवश्यानें नर्तन करून गणराज विवाहांग सोजीस मुहुर्त वाङनिश्चय देवता प्रतिष्ठादिक विधान सकल हीं केल्यानंतर ऋद्धि सिद्धी आणी गणराजा मध्यें अंतः पट धरून गौतमादि ऋषिश्वर मंगलाष्टके वदताहेत निरखा.

(श्लोक) सारासार विचारणैक चतुरांथारा मना जो भला ।।
तारानाथमिभास्य जो सुरगणीं मारा कृती शोभला ।।
दारालंकृत वाम भाग सुजना पाराशि लावी बलें ।।
गौरा कारकिं चंद्रमौलिवितरोधाराल सन्मंगलें ।। १ ।।

ज्यांचे चिंतन सर्व पातकतमस्तोमाशि सूर्यापरी ।।
ज्या माजि प्रगटे विवर्त जगदाशिराशि जो आदरी ।।
ज्याची शीत कृपा कटाक्ष लहरीं संताप वारी बळें ।।
ऐसा श्री शिवचंद्रमौलि तुजला देवो सुखें मंगळें ।।
यापरीं मंगळाष्टकें वदुन अंतः पट सोडून लग्न लागल्यानंतर सुरवधु गाताहेत निरखा.

(दरु) गज वदना जय जया ।। गण राजा जय जया ।। अज अजिला जय जया ।।
अमित यशा जय जया ।। १ ।।
प्रणत जनावलि रक्षा ।। परशुकरारणदक्षा ।।
मणि मकुटा पृथु वक्षा ।। सृणि हस्तासुकटाक्षा ।। २ ।।
परम दया सागरा ।। फाल विलोचन धीरा ।।
वरद महेश कुमारा ।। र्वाधत सुखसाय ।। ३ ।।
बुद्धिस तूं दातारा ।। वृजिनविनाशक बीरा ।।
बुद्धि नियोजन चतुरा ।। ऋषि सिद्धी पते ।।
यापरीं चारि दिवस सुख सोहले होउन सर्वत्रांस वस्त्रें भूषेणें देउन रस भोग साडे सकल सन्नाहानिशी मिरवणी आणी लक्ष्मी पूजनहीं होतां गणराज देवेंद्राप्रति पाहून बोलतो निरखा.

(श्लोक) इंद्रा तुझा निज मनोरथ पूर्ण झाला ।। आणीक मागवर वांछित मी तयाला ।।
देईन शीघ्र सम भक्त मनोरथा तें ।। मातें विना पुरवि कोण यया जगांत ।।
यापरीं गणराजानें बोलतां देवेंद्र वर मागतो निरखा.

(श्लोक) सत्पुत्र पौत्र परमोजित संपदेशीं ।। नांदोत भूप जन लाभुनि सौख्य राशी ।।
तैशिचि सर्व जनही निज संततीशीं ।। लाभोनि वांछित असोत सुखी स्वदेशीं।
यापरीं देवेंद्रानें वर मागतां तो वर देउन सपरिवार गणराज नित्यानंद मंदिरास चालिला निरखा.

(दरु) नित्यानंद मंदिराशी ।। निरुपम गुणराशी ।।
सत्य रुप गणराज हा ।। सपरिवार आला पहा ।।

सूत्रधार : यापरीं या दिव्य प्रबंधाचा निर्माता हीं.

(श्लोक) श्री. भोसलान्वय सुधानिधि शीत भान ।। राजाधिराज तुलजेंद्र नरेंद्र सून ।।
श्री चोल देश परि पालन जयाशि साजे ।। सिंहासनीं शरभ भूप पहा विराजे ।।

(श्लोक) औदार्य ज्याशि विलसेजन रक्षणाशी ।। गांभीर्य धैर्य विनयादिक सद्गुणाशीं ।
ज्याच्या तुलेज तुकती जगीं अन्य राजे ।। सिंहासनी शरभ भूप पहा विराजे ।।
इति श्री भोसल कुल दुग्ध सागर सुधाकर श्री चंद्र मौलीश्वर प्रसाद लब्ध चोल सिंहासन संपत्संतति रागाधिराज महाराज छत्रपति भूलोक देवेंद्र **श्री शरभेंद्र भूपाल विरचित श्री गणेश लीलार्णव नाटके पंचमोंकः ।।**

**समाप्त**

# ३. मीनाक्षी (परिणय) कल्याण

शुभं अस्तु ।। श्री ।। श्रीराम ।।

**केदार :** जय सुमुख गुणाजनक जय सकल सरतिलका जयसरी नृपकटक ।।
जय सुष्टलोक । जय शिवारतिरसिक । जय सुखतनत लोक ।।
जयशीर्षगणेशाक । जयशमित शोक । जय शरण हृतशमन जयचंडकृतकर्ण ।
जय चमत्कृतिसदन । जय चारुवदन ।।
जयसर्वासितमदन । जयशयकतितहरण । जयशस्तगुणपूर्ण जय शरभशरण ।।

**गौड० :** ।। आदिताल ।।

शरण शंकरचंद्रशेखर । शरण सकल सुरेश्वर ।
शरण शरणागत कृपाकर । शरण शर्वाणीवर ।।
शरणीषतिगळ गणजान्हवीधर । शरण शर्वमनोहर ।।
शरण शिवकल्याण सुंदर । शरण शरभ शिवशंकर ।।

**केदार :** अशा.

श्रीशृंगार शेखराय जयमंगल ।। शशिधर निर्मल खंडधराय शुभमंगल ।
गंगाशोभित तुंगादीशनिवासकाय । रंगस्थलनटकाय मंगळदायक निजबरणाय ।।
नागफणिमणिभूषणाय नारदमुखमुनिसविताय । नगतनया संतोषिताय
नवनवीसुणशोभिताय ।।

**सूत्रधार :** येणेंरिती नाट्यारंभ झाल्यानंतर सूत्रधार रंगभूमीत सरस कविविरचित मीनाक्षी कल्याणाधिधान. शृंगारवीर रसप्रधान नवीन नाटकानुसंधान चतुरवर सभासद निकरण मनोरंजन करावयाकारणें. विघ्नहरणाची प्रार्थना करितो निरखा.

**(श्लोक):** प्रसन्नवदनप्रभो प्रथम आदरितो तुला ।।
प्रसन्न मज हो करा प्रबळ सत्कृपा निस्तुळा ।।
प्रसाद करिशी जरी प्रथित कीर्ती वाढे जनी ।।
प्रमाण करितों झणीं प्रकट हे सभारंजनीं ।।

**सूत्रधार :** येणे रिती गणेशाची प्रार्थना करून निजवाणी नवरसा गुणखाणी नवनवोन्मोषणी व्हावया कारणे वाणीचे स्तोत्र करितो निरखा.
श्री भारती प्रबळ दैवत तूं प्रवीण ।।
साजे करी सरसी पुस्तक माळ वीणा ।।
धात्यासिही रिझविसी बहु अंतरंगी ।।
ते तूं प्रसन्न झणि हे मम भव्य रंगी ।। ये ।।
वाणीची प्रार्थना करून अज्ञानतभोगणवारिणी वासरमणी अैसा श्रीगुरुचें स्तवन करितो निरखा.
आर्या बोधें भवभया हरीसी ।। विमलब्रम्हाचि निजाश्रिता करिसी ।।
त्या तुज नमितों भावे ।। शुभ नाटक हे सभेत शोभवे ।।

सूत्रधार : यापरी गुरुचे स्तवन करून निजकुलदेवता । श्री चंद्रमोळीश्वराची प्रार्थना करितो निरखा.

(श्लोक) सदाशिवा भूति विभूषितांगा ।।
सदाशिवा शिंगित वामभांगा ।।
सदासतूं येऊनि चंद्रमौही सदा या देशी सर्वकाळा ।।

सूत्रधार : येणेरिती चंद्रमौळीश्वराची प्रार्थना करून नाटकार्थसंग्रह नांदी श्लोक वदतो पारिसा

(श्लोक) देवि संपत्ति द्यावी निखिलनिजविभूवागी असे स्वजभाविति स्वभाप्रवी अवतारुनि जायला कुणी सर्व देवी ।
गोवी शंभूशि माविझळ नयना ।
लसत्प्रांत भावे सुखावी ।
सोवितात पाणिभावी सततहि सुख वो या जनाते सुदेवी ।।
येणेरिती नाटकार्थसंग्रहा नांदीश्लोक वदल्यानंतर नाटकारंभीची प्रार्थना केल्यास्तव तो दयाकर विघ्नतमस्तोम दिवाकर प्रत्यक्ष येतो म्हणून सभासदांस सावध करावयाकारणे दौवारिक येतो निरखा.

दरु० : ।। शंकरा ।।

दौवारिक येतसे पाहा ।।
शैवाग्रेसर भूतिभासूर हा ताव देत मिशियावरि महा ।।
ताकीद कर जो सचसमूहा ।। हाती लोक बहु जयवंत ।।
हावभावे मान हालवित ।। हातीं घेऊनि रौप्य विलसित वेत ।।
हर्षे गाय तो नाचत नाचत ।।

सूत्रधार : यापरि दौवारिकाने सभासदास सावध केल्यानंतर गणपित प्रत्यक्ष येतो पहा.

दरु : ।। व्यागडा आदिताल ।।

गणराज येतो पाही गजरे उल्लासे शुभ देहीं ।।
शिणहारक जो लवलाही शिवतनय वंद्य सुरांहीं ।।
मूषिकावरी वळघला मोठा मोदकी पोसला ।।
तोषवाया सर्वजनाला थोर प्रीतें सभे आला ।।

सूत्रधार : यापरी गणपति येऊन सकल विघ्न निरसल्यानंतर सूत्रधार चहूंकडे पाहून अहो, सिद्ध आपे (हे) रंगमंगळ विधि ।।

(श्लोक) सुशिर सुशिराच्या ज्या स्थळ नादनादे ।।
अतिवितत सुखास्वानंद घोषु जना दे ।।
सुघनधनि निनादें शोभिता सर्व लक्षणीं ।।
सतत सतत नाचे कौतुकारंग लक्ष्मी ।।

वचन आणि कैसे म्हणिजे ?

(श्लोक) नानादेशनिवास भूसुर महा विद्वांस हे राजती ।।
वीणवेळू मृदंगताळ बरवें मोर्चेगहि वाजति ।।
जेथे गानकळाप्रविण हरिखे, आतां भलें माजती ।।
त्या गाने सकलाप्सरा कुशल ते गंधर्व ही लाजती ।।
रंगप्रसाधन.

**सूत्रधार** : (नेपथ्यास पाहून) अरे परिपार्श्वका, येणे ये.

**पारि०** : मी हाजिर आहे आज्ञा करावी.

**सूत्रधार** : आगा ये पारिपार्श्वका, सकळजनमनश्रवण नयनानंद करण्याविषयीं मी आज्ञापजेलों.

**पारि०** : कोणाकडून ?

**सूत्रधार** : सभाकडून.

**पारि०** : कोणते सभासद ?

**सूत्रधार** : येथे श्रीमंत भोसल कुलातिलक राजाधिराज श्री शरभेंद्र महाराज प्रतिवर्षी क्रियमाण गणेशमहोत्सवविलोकन संतोष भरभरित शंकरकिंकर चतुरस्व तर मिळाले आहेत. कैसे म्हणजे ?

(श्लोक) काव्यालंकृति नीतिनाटक महावेदांवेत्ते भले ।।
तर्कव्याकरण श्रुतिस्मृतिगणीं निष्णांत जे चांगले ।।
सत्साहित्य कलानिधी परगुणीं जे श्लाघती ती महा ।।
मात्सर्यादिक दोषहिन कुतुकें येथें मिळाले सहा ।।
आणखी कैसे म्हणजे सांगतो ऐका.

(श्लोक) वाचस्पतीहूनि विशेष वक्ते ।। जे कीं चतुषष्टी कलेसि धर्ते ।।
कवी सुनेत्र लसताती पाही ।। अत्यंत जे आवडी ती नृपांहीं ।।

**व०** : अैशाचा हा अलभ्य योग वडला आहे। यास्तव ह्या सभेस उचित मीनाक्षी परिणयाभिधान शृंगारवीर रसप्रधान अभिनव नाटक नाचवन सम्यासरंजन करवून आत्यांते कृतार्थ करूं इच्छितो.

**पारि०** : त्या रसाळ ग्रंथाचा निर्माता कोण ?

**सूत्रधार** : अरे पारिपार्श्वका, त्वां अैकिले कीहि काय या कलियुगी अतिप्रख्यात भोसल कुलपरंपरा सांगतो अैका.
श्री शंभु येकोजी शरभोज राज तो महासिनें ।।
अेक शिवाजी राजा नृपति भला रामचंद्र गुणसदन ।।
भीम महीपती क्षितिपती सुगुणावराह अेकोजी ।।
विख्यात ब्रम्हाधिध नृप शाहूजी तसाची संभाजी ।।
परशु नृपवीर बाबा मालोजी, शहाजी महाज्ञाता ।।
संभाजी तत्भ्राता भूप शिवाजी प्रचंड रिपुहती ।।
तुकोजी तत्तनय प्रतापसिंहेंद्र तज्नवीत तनय ।।
तत्सुता तो तुळजेंद्र प्रथित महीपाल भव्य गुण सांद्र ।।

वचन : अगा ये परिपार्श्वका, बाबाजीराजाचे ज्येष्ठ पुत्र मालोजी राजेच्यापासून सहावे पुरुष तुळजी महाराजांनींच्या बाबाजी राजाचे कनिष्ठ पुत्र विठोजी राजापासून आठवे पुरुष श्री शरभेंद्र महाराजांस स्वीकार करून घेतले ते परंपरा सांगतो अैका.

बाबाजी राजाचा पुत्र विठोजी द्वितीय बहुगुणी त्र्यंबक पुत्र तयाचा गंगाजी तो तदीय सुत माना ।
तत्सुता तो बुवाजी निपजे त्याहून चतुर गंगाजी ।।
त्याचा सुखानुजी सुत ।।
तत्सुत तो शाहजी जगप्रसिद्ध ।।
मग तत्तनय सुमतीपाळू तुळजेंद्र दत्तक घे सुमती त्या शरभेंद्रा सपदीं स्थायी मोदे रिझानि राज्यपदा ।।

व० : श्रीशंकर सकलजन परिपालन करावयाकारणे विषयदृष्टी सोडून समदृष्टीं होऊन श्रीशरभेंद्रभूपरूप अवतरला असें.

पारि० : ही काय विचित्र महाविष्णूचें ।
कृत्य श्रीशंकर अवलंबितें ।
त्याकरण सांगतो.

(श्लोक) ब्रम्ह सृष्टी करी परि जगत या पाहूं अशी धी सने ।।
पाता विष्णु परंतु कलित ये जो बुद्धला असे ।।
यासाठी शिवदेववर्य करुणासिंधु जनालागुनी ।
पाळाया शरभेंद्र होऊनि असे जो राजराजाग्रणी ।।
प्रातःकाली उठोनि करुनि शिवनुति स्नान विध्युक्त सारी ।।
पूजोनि सांवरत्नधनवसनगणीं दिव्य नानोपचारि ।।
छाया गोधान्य थवित्तादिक बहु वसुलधा मर्त्यवृंदासी. . . . . ।
न्यायें पाळी प्रजाते शरभ नरपती जो ससाम्याजना दे ।।
धर्माधर्मव्यवस्था सकल कलिगुणे शीण झाली म्हणूनी ।।
श्रीसांबे दीननाथे शरभ नरपती होउनि राजधानी ।।
तंजाख्यीं द्विवाकादीं सुमति भले सम्य कल्पूनी लोकां ।।
केला आनंद धर्मे रीतीवुनी सुध्दुसुयशा त्या प्रभूतें विलोका ।।
यच्चभ्य द्विजराज हंस शुचि जे अत्यंत पै शोधिली ।।
वहुराजे अतिशयें सच्चाश्रये सांज ती ।।
न्यायान्याय पयोजलानिनिभ प्रसन्नवदती तादावयो भेदिती ।।
हा राजा शरभेंद्र एकचि असे वीराधिवीराग्रणी ।।
कराविष्ट करी रिपूंसि सुजनाधारा विराजे जनीं ।।
ज्याचा पुत्र शिवप्रभू गुणनिधी साम्राज्य भाग्यादिला ।।
जेथें शंभू कटाक्ष सांद्र विलसे अत्यंत तो चांगला ।।
जो राजा निजमानसीं अविरत ब्रम्हातनेणें प्रति ।
आनंदा जनकापरी अनुभवी व त्यूनि लोकस्थिती ।।

**व०** : ये ताहृश गुणगामणी चोळदेश धणी या ग्रंथाचा निर्माता हे ऐकून पारिपार्श्वक बोलतो.

**वचन** : अगा ये सूत्रधारा, चतु:षष्टीकला प्रवीणा दिग्विजयकर्ता जगप्रसिद्ध चोळदेशाधिप शरभेंद्र भूपालया, या ग्रंथाचा निर्माता काय ?
तरी सभासदांचे तुजेही मनोरथ सफळ होतील.

**सूत्रधार** : (चहूंकडे पाहून) अगा ये पारिपार्श्वका दंपतीमन: संतोषकारक वर्षाकाळ शोभतो पहा.

**(श्लोक)** कांतार्धरेह शिव येक म्हणोनि लोकीं ।।
होती प्रसिद्ध जन सर्वतसे विलोकीं ।।
सज्जौवना झणि जरी नवरी पतीशीं ।।
तो वर्षवोनीं शरजाचवी इंद्र तीसीं ।।
(नेपथ्यामध्ये) असा कोण सर आहे ?

अगा ये पारिपार्श्वका, मागायला श्लोकाचा अर्थ अन्यथा कल्पून मीनाक्षीची दूतिका चपलाक्षी येतेसी दिसते.

आम्ही अनंत करणे यांस जाणार म्हणून दोघेही गेले असतात.
चपलाक्षी येते निरखा

दरु : (।। सावेरी ।। आ ।। (अटताल) ।

चपलाक्षी येते पाही चमकत जन मोही ।।
चपलेहुनी भा बहु देहीं ।।
सरूपा जी सम नाहींहीं ।
(अ) कमठा तीर हीदी असती हाती ।।
कचकुच दृढतर कसलें नुगती ।।
सुमशर करितो नयनीं वस्ती ।
शूरही पाहूनि सांडी मस्ती ।। ये ।।
चपलाक्षी येउन फिरून पाहून त्रिभुवन रक्षणी ।।
ऐसा दक्ष मीनाक्षीस जाचणारा कोण आहे ?
म्हणुनी आपआपणांत बोलते निरखा.

**(श्लोक)** मीनाक्षी सत्कटाक्षी त्रिभुवन जनसंरक्षणी वीचिंतां जे ।।
साक्षात् लक्ष्मीपतीच्या बहिण घन जिचे त्रिसानीवक्ष ।
यरक्षसहस्त्राक्षसहि सुसमरीं साजे बुभुक्षा ।।
मक्षिकातुल्य साहे ।।
जेतालत्यानुलक्षासदृश वर इला दक्षसा कोण लाहे ।।

**सूत्रधार** : ये ।। चपलाक्षी श्री मीनाक्षीस अतिचतुर वीरवर संवटनी आलोचना करीत असता ।। सूत्र सारोप फिरून पाहून आवाशासी कान देऊन झंकार ऐकून त्येच्यावरून शंकरपरारविंद भ्रमरी-भूत भृंगीरिटी येतोसा दिसतो म्हणतांची भृंगीरिटी येतो निरखा.

दरु : सुरटी ।। ता.

भृंगीरिटी येतो पाही ।। भृत्य शंभुशा नतदेही ।।
रंगीं नाचत जो सकळांसी । रंजवीत सि लवलाही ।।
चारु रुद्राक्ष मंगळाच्या गळां ज्या अस्तिचा पुतला ।।
चीर व्याघ्राजन नेसला ।। चिंतितसे मनि शिव भोळा ।।
तिनिपायीं जो लिंग चाले ।। मान हलवीत फारचि डोळे ।।
अन शंभुविण तो न बोले ।। अवघे लक्ष ति त्या हर्षवेळो ।। ये ।।

भृंगीरिटी येतांजि हाती धरिल्या काठीसहित चतुष्पाद सपुश व्याघ्राभरदरी आणि कवला ऐशा ते पाहू—
धनुष्य रज्जून ठाणामान उभे राहतां श्री शिवस्मरण ऐकून चपलाक्षी बोलते.

व० : यावे यावें. व्याघ्रमुनी हा आपण कोण आहे द्विपादमान ।। वन्हि नव्हेतां. चतुष्पाद मृगी नव्हेता माझ्या कोमद्या सतीनी पाय मणताच सारिखे काय विचित्र रूप भृंगिरिटी सहास्य बोलतो.

व० : अवो ! ये पोटाळले आपुल्या डोळ्यात मुसळ लोंबत असता, पराव्या डोळ्यात कुसळ आहे म्हणून सांगणे हा जनाचा स्वभावच तूं ताटंकादि दिव्य भूषणे विराजमान असल्यामुळे पुरुष नव्हेसी वीरापरी धनुच्या नरा धरल्यामुळे तुजलास्त्री म्हणूनही भाविता नयेही विचित्र नीट तूच समजा ना. पहा. असो तथी ये वन की मई फिरतीस ऐकू इच्छिता.

चप० : जे सौर्य सागर सुता मलयध्वजाची
(श्लोक) अत्यंत सुंदर तनु ती जे मार ज्याची ।।
कुठे मिळे वर अनुरूप लोकीं ।।
ऐसा वचार करिते फिरते विलोकी ।।

व० : आर्कि तिची अवस्था काय म्हणून सांगू.
(पद्य) राजाजेश्वरी राजेंदुनिथमुखी मुकरांत आपुले मुखही पाहे ।।
कोम्कांग सरसकोकिला लाविनी चतुर परि भाषिणी ।।
चक्ति पाहे । कनक भासुर तनुकमलसंनिभ पाणी ।।
कनमी सुरसीकाधय हे ।। शृंगार शेखरा भुगालका ।।
केशाशी कशी चागलपालवी हे मार करितो ।।३।।
शक्ति मार देहीं ।। फार कुशल करी राज्यभार तोही ।।
धीरइजसी तुल्य नरवीर न मही ।।
शूरवर धुंडिते तिज कीर पाही ।।

व० : अरे ये भृंगीरिटी. श्री सदाशिव चरणारविंदमकरंदपानें तुदिल न होता निजांगे-कृतजालास परंतु तुला वाऱ्याने नासे तीन रापायटे कां संपादिला रतिचित्र ते कारण ऐकू इच्छिते.

भृंगी : ओ ये चपलेक्षणे तूं अबला परंतु वीरवेष घेऊन. वीराधिवीरासही भेडसावतीस तेअपेक्षा विचित्र नव्हे काय? बरें तें असो मी आलें कार्य सांगतील ऐका

(द्विपाद) (तेलगू प्रास)

मुख्य मानू. . . . . . . . . .मूर्ति ।। ईशाची अंचिके ।।
वीण पै अचिंता साची ।। अर्धशिवमूर्तितळे ।।
आर्याची झाली ।। अंतरी माझीया चिंता उदेली ।।
भव शीण वाता तो भव हा स्वामी ।।
शिववीवा कवणी शिसवीण कहि मी ।।
धरुनि असा भाव रक्षणामूर्ती पूततिच्चें या पूजली निगुते ।।
केल्या प्रदक्षिणा कर दोघांसी ।।
घडली म्हणुनीया गाभीऱ्यामसिती ।।
अळिरूप धरुनी उभयांतरी ।। रिघुनि भवभाग बोवता भवानी ।।
शक्ति हरितां काय शतजीर्ण झाला ।।
पाय टेंका की ज्या पावने दिधला ।।
पाहुनि अप्रति ।। पतिची विराली ।।
प्रणय कलहें शिवा ।। प्रत्येक झाली ।।
संधि अशा बाण संधान करूनि ।। मारमारी तसे ।।
सुंठ होऊनि ।। वदन पार मी असा मदही जिराला ।।
रदन वच कीव वरू मदशालिनीला ।।

(श्लोक) असें क्षण पें बोगितां शंकरानें ।।
कसें पाहिजे सांग मी किंकरानें ।।
म्हणोनि फिरे मी जनराणी आणि ।।
विवाहितया व्याधरोनी ।। शिराणी ।।

**सूत्रधार** : येणेरीति भृंगुटीने बोलताचि.
चपलाक्षी अत्यंत हर्षे बोलतेत्त फार संतोष. दैवी विचित्रागतिः.
परंतु. आ०.
हृदयज विकारहर्ता फोहिल जो जाण तो तिचा भर्ता ।।
दोघे पीणिती जला कोण उपाय रचूं की धि ।। जला ।।

**सूत्रधार** : याप्रकारे चपलाक्षी बोलतांचि भृंगिरिटी ये चपलाक्षी मीनागे वक्षोजविषमा विघटनीं विषमाक्षदक्ष यासि ऐसा उपाय करावा.

**सूत्रधार** : येणेरीति परस्पर एकमेकात करित असता नेपथ्यामध्ये वीणीझणत्कार ऐकून चपलाक्षी माझ्या विलंबना साहित्या मीनाक्षी ना जला हुडकणें विषयीं प्रेशिली ऐसी कनकांगी येतीसी दिसते. आतं मी त्वरेनें मीनाक्षी जवळ जाते. कांही श्री शिवासमीप जाऊन य कार्यसंघटणीं उद्युक्त असावें.

याप्रकारें दोघीही बोलून निघोन गेल्यानंतर मीनाक्षीची दुसरी खी कनकांगी येते निरखा.

(खमाल) राग ।। आदिताल ।।

कनकांगी येते पाहा ।। मनमोहन रूपा हे ।।
वनतेजें शोभविताहे ।। वचन चातुर्यें गुरुही मोहे ।।
झणीं नेसली पैठणी ।। चोळी गतटी तटतटस्थन
वीणा वाजवी मधुर ध्वनी ।। वीरवेशा विनटें गानीं.

**सूत्रधार** : येणेरीति कनकांगी येऊन वन पाहून बोलते

**वचन** : ऐशा स्थानांत मीनाक्षी जडून केंवि विरहेल बरे चपलाक्षी
कुठें असेल पाहूं ।। ऐसे म्हणून धुंदीत वनवर्णन करिते निरखा

दरु : नीलांबरी ।। आदिताल ।।

नंदनासम हें नवशुभवन पाहे ।।
मंद पवन आनंद प्रद अरविंदज बहु मकरंद सेवुनि तुंदिल रसें
मिलिंद मरी वृंदसहित स्वच्छंदी गुंजती ।।
चंदन मधुमंदारबिल्वपिचु मंद सरळ आणि कंदराळही
स्वदंनघनमाकंद दंबकी कुंदलता अतिसुंदर नटली ।।

**सूत्रधार** : येणेरीती कनकांगी वर्णन करीत असतां चपलाक्षीनें सांगितलें वर्तमान ऐकून मीनाक्षी निजहृदयजविकार हरण विचक्षण रण दक्षणवर परीक्षावया संदिग्विजय व्याजें अक्षौहिणी सेनेसहित येते म्हणून सखेस सावध करावयास दौवारिक येतो निरखा.

(दरु) दौवारिक येतसे पहा

**सूत्रधार** : येणे दौवारिक येऊन सभेस सावध केल्यानंतर मीनाक्षी येते निरखा

राग --- आनंद ।।

मीनाक्षी येते जयसंकल्प मीनध्वज तळविसेना संगें विलसती अनूपा ।।
सिद्धचरणापें हे नागिणी सुरवरकिन्नर कोणासही स्थिरचरांत हूपें ।।
मतिमोहकरा पाहे शर्वाणी ।।
गति निर्जतकरणी प्रतिनाहेती जला पाहता भुवनी ।। प्रथिताकल्याणी ।।
रतिसम मानी ।। रतिश निजमनीं । स्तुति करिती सुरपति तिजलागुनी ।।
ये मीनाक्षी येऊन निजपराक्रम सांगते निरखा ।।

**श्लोक** : जो भूपति शिवदाता सुजना प्रर्थ्याति सिह . . .
भमइ मत्प्रिय दिग्विजय करून दिग्पति विजय करीना निजबाही.

**सूत्रधार** : याप्रकारे बोलतां इंद्रदिशेस अभिसुखे चाली करितांचि पुरंदर येतो निरखा.

(वृंदावनसारंग ।। आदिताल ।।)

पुरंदर येतो पाहे ।। पूर्ण गर्वे ।। सुरसूमूहे
पुरंदच्या तेजें रोहें पुन्हां जंजा उभा राहे ।।

**सूत्रधार** येणेरिती इंद्र येऊन आपल्या देवसेनेप्रति बोलतो निरखा.

(श्लोक) विश्वामित्र पराशरादिक महा. . . .
ते तपस्वी भले नारी भव्यकविछविछण गुणे मोहसी फैलावले ।।
आता धैर्य रणांगणी निरखुनि नारी नसादा कदा ।।
सज्जोनी कम सिबाणनिकरा वर्षा तुम्ही अेकदां ।।

सूत्रधार : याप्रकारे देवांस इंद्र सांगतांचि मीनाक्षी आपल्या सखीप्रती बोलते निरखा.

(श्लोक) सहस्त्रक्षट लसुनी बाण मारीतयातें निवारा तुम्ही ही सुमारी ।।
न तो हलविती जसा पापण्यातें । करावे तसें त्यागराजाच्या धन्यातें ।

सूत्रधार : येणे रिती मीनाक्षीचे वचन अैकून उभय सेना वीरशर वर्षी अतिक्रूर समद करित असतां सुरराज पराजये पावून
हे राजराजेश्वरीस पावून बोलते निरखा.

(आ.) ध्यावें यया करातें पाडुनियां मानसी निकुरातें ।।
तुष्टोनि लेंकरांते पाळि देउनि अभिष्टद वरातें ।।

सूत्रधार : येणे रिती इंद्राने कामधेनू कल्पवृक्ष चिंतामणी प्रभृति अमूल्यवस्तू अर्पून प्रार्थितांची मीनाक्षी त्यासी अभय देऊन अद्रिशेष । अभिमुख चाली करितां हव्यावाह वेद येतो निरखा.
पूर्वकल्याणी मिश्र (चापू)
हव्यावाह येतो पहा ।। नव्यपात्र विजणा वाहे ।।
सतोमर शक्ति लाहे ।। हव्यासें भिडू रभा राहे ।।

सूत्रधार : येणे रिती हव्यवाह येऊन तरुणीच्या कांतीकडून मोहित होऊन निज वीरांस आज्ञापितो निरखा.
आ. ।। आनंदभैरवी ।।
तरुणी मदेन ज्वाला धैर्यघृतातें तयातना घालावा घाला
वर्षा शर अेकसरी ।। माघें प्रमदा समूह जे विसरे ।।

सूत्रधार : येणे रिती निजभटांसी सिखंटवचन आज्ञापितांचि मीनाक्षी सख्या प्रीती बोलते ।
आ.
वर्षा गे शरधारा लाहेना जसा रणांत आधारा ।।
जुझांया मज दावा कोणी त्या आश्रयासही दडवा ।।

सूत्रधार : येणे रिती आज्ञापितांचि परस्परें बाणबाणियांस हेंताचि हव्यवाह पराजय पावूनही राजराजेश्वरीस समजून अमूल्य पदार्थ देऊन प्रार्थितो निरखा ध्यावे या करातें ।।
येणे रिती दिग्विजय करून दक्षिणाभिमुख फिरून क्षणमात्र उभा राहतांचि ।

चपलाक्षी : अवो ये स्वामिणी तुजसमोर । यमसर्वेदा येणार नाही ।।
राजराजसख्यांना ज्याचा माज मोडला ।।
तो राजराजेश्वरीसमोर माझा केंवि धरिला ।।
मीनाक्षी वृश्चिकाला नेंही ।। त्याला धुंडून नांगी दंड करावी ।।
आ० ।।
भानुजलोका दंडी तयासी चलेक्षणी दंडी ।।

चपला : धाकी झाला दंड वधी तयालागी कोण कोदंड ?

येणे रिती चपलाक्षीने बोलिले, वर्तमान वैवस्वते चारूमुखे ऐकून समोरून येता अमूल्य पदार्थ पाठवितांचि मीनाक्षी ते पदार्थ घेऊन नैऋत्य कोणी अभिमुख होतांचि नैऋत्य येतो पहा ॥

दरु : राग आठाणा ॥ आदिताल

नैऋत्यी येतो पहा शरचापा हे धर जो सदाही
सुरवैरी भ्यासुर सुरदेही क्रूर सेनेशि लवलाहीं ॥

सूत्रधार : येणे रिती नैऋत्यी येऊन वीर भटांसी बोलतो निरखा ॥

आ० ॥
या तूं नव्हे ती अबला अतिमोहक भासती महाप्रबला ॥
न जुडां अवयुवा अपाइ ज्या झाल्या करूं कसे उपाई ॥
येणे रिती नैऋती बोलतांची मीनाक्षी आपल्या सखीप्रती बोलते निरखा॥
रवि भासुर ताटके जसा रात्रीचर प्रभु शंकी ॥
जो लागे पाये ते वधिला मग कोण कोण फायांते ॥
येणे रिती त्यास उपेक्षितांचि नियुति सदाक्रांत होऊन मीनाक्षीस प्रार्थितो निरखा.
आ० ॥
घ्यावे यया करातें ॥
येणे रिती मीनाक्षी दिग्विजय करून वरुण दिशेस सन्मुख होतांचि तो वरुण येतोचि पहा ॥

राग तोडी आ०

वरुण येतसे पाही वारुणी आगम हा ॥
धरुनी पाश सव्य करीत आर्फाट झष पाहा.

सूत्रधार : येणे रिती वरुण येऊन उचंबळल्या ऐशा वधूंसिधूते पाहून चकित होऊन बोलतो परिसा.

आ० ॥

(श्लोक) लावण्यामृत सत्र थोर मकरे दुभत्स्यजयें पहा ॥
ग्रीवा शंधकटाक्षलोल लहरी धम्मिल्ल शैवाल हा ॥
धर्मामःकण मौक्तिकें कुचगिरी ये थोर सामावले ॥
पावू सारखिसे वधू जलनिधी पासोनि आम्ही बले ॥

सूत्रधार : येणे रिती वरुणाचे वचन ऐकून मीनाक्षी बोलले परिसा.

आ० ॥
शूर नोहे की पाशीं कैसा जंझा सखे आम्हां पाशी ।
हा केवळचि जडपति तत्सैसी कळा कसे रणीं खपती ॥

सूत्रधार : याप्रकारे मीनाक्षीने बोलतांचि हितकर सैनिक वरुणि बोलताती निरखा.

(श्लोक) अगत्स्याव्या आजि अतिकुशल अजि विलसती ।।
तुम्हाला नाराजी तरी तन शुराजी गवसती ।।
असें माना तुम्ही न कहीं असमाना म्हणुनियां ।।
बरें राखा माना त्वरित बहुमाना करुनियां ।।

**सूत्रधार** : येणे रिती सेवक जानांचे वचन जिंकून वरुणराज राजेश्वरीस विनवितो निरखा.
अ० ।।
ध्यानें यया करावें याप्रकारे मीनाक्षी दिग्विजय करून पवन दिशेस अभिमुख होतांचि पवना येतसे निरखा.

(आ. भैरवी आ ।।)

पवन येतसे पाहा ।। नव लाहुनि देहा ।। जवशाली शोभे महा ।।
प्रवर लोक झाली हा ।।
येणे रिती पवन येऊन निजभटास आज्ञापितो निरखा.

(श्लोक) मनाचा अम्हाहुनि ही वेग भारी ।। तयाकारणें थोर पुशीं करांती ।।
गळे शस्त्र ज्या देखुनी वीर हस्ती ।। जणावेत या पाहुनी कार हस्तीं ।।

**सूत्रधार** : येणे रिती वायूचे वचन ऐकून त्याचे चतुररववीर बोलताती निरखा.

(श्लोक) निजायुधें गळालिया स्वनखरीं तयाच्या पुरी ।।
गिरूं मग कसुबले भुजलतागुणे सत्वरीं ।।
डसू करिन मानसी मृदुल भव्य बिंबाधरीं ।
आम्ही वियज लाहते भट तुझे भया ना धरीं ।।

**सूत्रधार** : येणे रिती वायूभटाचे वचन ऐकून मीनाक्षीच्या सख्या बोलताती निरखा.
अ० ।।
भव्यकटाक्षप्रसरें । छा धू तुम्हाक्षणेंचि एकसरें ।।
अथावा शस्त्रास्त्रसरी जुंझायाचि रणीं पहा कुसरी ।।

**सूत्रधार** : या प्रकारे मीनाक्षीच्या सख्यांचे वचन ऐकून पवन बोलतो पहा.
अ० ।।
तुम्ही अबला कदलिकापविता निजगुणे तुम्हा शिदळीं ।। प्रथमा ।।
गिरीधर आम्ही प्रहादातव ब.. कसे त्यजी स्वमदा ।।

**सूत्रधार** : येणे रिती प्रमदावदने जित ऐसा पवमान राजराजेश्वरीस प्रार्थितो निरखा.
ध्या नेयया ये ।।
मीनाक्षी दिग्विजय करून कुबेर दिशिशीं अभिमुख होतांचि तो यक्षराज येता पहा.

(।। तोडी० आदिताल ।।)

यक्षराज येतो पाहा ।। बीक्षकपट निग्रही ।।
लक्ष नसे धनसंग्रही क्षसखा जो नर बाही ।।

**सूत्रधार** : येणे रिती राज राज येऊन राजराजेश्वरीस पाहूं मनीं वचन ऐकून सावधपणे बाह्य शौर्य बोलतो निरखा.

(श्लोक) उणे काय आम्हांसी घ्या द्रव्यराशी ।।
ज जुंझू तुम्हसी अम्ही जे घराशी ।।
कशी कर्ती ये जिकल्या बायकांतें ।।
करावे तुम्हीसी वृथा युद्ध येतें ।।

सूत्रधार : येणे रिती कुबेराचे वचन ऐकून मीनाक्षी बोलते निरखा.

(श्लोक) जगीं जिकल्या काय घोरी कुबेरा ।।
न जिकूं ते सर्वदा ज्या कुबेरा ।।
तुवां अर्पिल्या घेऊनी द्रव्यराशी ।।
भिउं सज्जितां हे सुबेरा पराशी ।।

सूत्रधार : येणे रिती मीनाक्षी बोलितांची कुबेर राजराजेश्वरीप्रती बोलतो परिसा.
घ्यावे यया करातें.
येणे रिती दिग्विजय करून इशान्स दिशेस अभिमुख होतांचि श्रीशिवबंदी जनाग्रेसर नंदिकेश्वर येतसे निरखा ।।
कल्याणी ।। आदिताल ।।
नंदिकेश्वर येतो पहा ।। नंदिनीय गुणा ।।
बंदि शंभूचा महा ।। छंद घेऊनि भूतसमहा ।।

सूत्रधार : येणे रिती नंदिकेश्वर येऊन शूरवेषधर प्रमदासमूहास पाहून बोलतो परिसा.
।। आ ।।
जितकामा बा बंदी नंदिश्वर मी पाहा । रणानंद जितरतिरूपा ललना ।।
तुम्हाची पाहे नियकदा बुलसा ।।

सूत्रधार : येणे रिती नंदिकेश्वर बोलतांची प्रमदाजन बोलतो निरखा.
।। आर्या ।।
कैसा शंभू विलासी निजसेना याजमान्य बैलासी ।।
देउनि झाला परता म्हणुनी आली तया दिगंबरता ।।

सूत्रधार : येणे रिती प्रमदाजन बोलतांचि मीनांक्षी आपल्या भटावरी संतुष्ट होऊन संख्यासी आज्ञापिते निरखा.

(पद्य) पद्माक्षी येक घे प्रदितविरा प्रतिपादरे छत्र रविपानही दे ।।
चपलाक्षी ऐक गे । चतुरवीराप्रती चांगली भूषणें ।
चामरें दे कनकांगी ऐक गे कर्कशा वीराशी कनक शाशिमालिका कटाकी ही दे ।
मुदित वदनें ऐका मुख्य वीराप्रति मुकुट रत्नखचित मुद्रिका दे ।।

सूत्रधार : येणे रिती मीनाक्षी निजभटासी बिरदेंभूषणें देऊन बोलतें.

(श्लोक) सजोनियां कार्मुक शीघ्र अवध्या नंदशराच्या
समरांत अवध्या झुंझानया ये मजसी मुरारी ।।
तरी क्षणें होईल किंकराणी ।।

सूत्रधार : येणे रितीं प्रमदाजनास आज्ञापितांचि परस्पर बाणाबाणीत नंदिश्वर पराजय पावून श्रीशंकराचें स्मरण करितांची तो सुंदरेश्वर येतो निरखा.

दरू : शाहन ।। आदिताल ।।
सुंदरेश्वर येतो पहा ।। वंदनि पदसुरवर्याही
चंद्रशेखर जो मन मोही ।। चारुरूप जनि ज्यासम नाहीं ।।

**सूत्रधार :** येणे रिती श्रीसुंदरेश्वर येतांचि नंदिश्वर साष्टांग प्रणाम करून स्वामी रक्ष दक्ष म्हणतांचि सुंदरेश्वर बोलतो.

**व० :** अगा ये नंदिश्वरा, तुझे भूतगण असतां या प्रमदांस पाहून घाबरा झालास हे कार्य आश्चर्य असें म्हणतांचि नंदिकेश्वर बोलतो.
।। आ ।।
घुमविती इतरां भूतें त्यासहि खेदें पराजयोभ्दुते ।।
भ्रमवी अशा प्रमदा भुलसी माशी प्रसून मदा ।।

**सूत्रधार :** येणे रिती नंदिकेश्वरानें बोलतांचि श्रीशंकर हंसून त्याप्रति आश्वासन करून मीनाक्षीच्या विषम वक्षोज पाहून बोलतो.

**(श्लोक)** इंद्रांशि का शिरणीं जिंकुनि गर्व भारी ।।
तालाधला विषमरूप उरीं धरारी ।।
वक्षोज भव्ययुगुलीं हुनि गोल मोटा ।।
त्या तें क्षणें हरिणसुंदर तेसि काटा ।।

**सूत्रधार :** येणे रिती शिवानें बोलतांची कनकांगी अन्यापदेशें चपलाक्षी प्रती बोलते.

**(श्लोक)** हृदय जहतन् त्यालाहूनी अद्रिसंदी ।।
तपुनि सुचि महत्वा वोहटा लक्ष साधी ।।
मग सुचित यनाने पाहता तो न भासे ।।
सुचपल नयनें तूं हें पहा गे तमासे ।।
आणिख अेक आश्चर्य ।।

**(श्लोक)** सोन्याचा नग पाहुनि पृथल सा त्या भोंवते भोवतें
मी साधन तया नवग्रह असें ते संधि पैं लक्षिती त्यामध्यें ।।
मग पुष्पवंत शिव धू वोति पूजाफलें ।।
हेमाची नगजाकडे बहुत त्या मेरुद्वया लाभलें ।।

**सूत्रधार :** येणे रिती या प्रकारे सख्या परस्पर बोलत असतां मीनाक्षी अपली रजशांत पाहन आश्चर्य मानितांचि

**चपला :** हाच तुझा भर्ता म्हणून कर ना सांगितांचि धनुर्बाण घेऊन.
फार भुज्जावती होऊन मेदिनी अवलोकितां उभी रहाता ती जला थोर सुंदरेश्वर मोहून बोलितो परिसा.

**(श्लोक)** जया काकणी चतुर केवळ राजकन्या वन्या
मृगामृगापतीपरि वीर मान्या ।।
संन्यासि या भुलविती सि दिरीकाभसून्या ।।
अन्यासि ना वरि करी मजलांगी धन्या ।।

सूत्रधार : या प्रकारची शिववचन अैकून लज्जावती अैसी मीनाक्षी बोलते.

व० : पाणिग्रहणाविषयीं कांचनमालिकेचे आज्ञेविना मी स्वतंत्र नव्हे, अैसे म्हणून शिवाप्रती मंदहास्ये निजप्रेम जाणवुन आपल्या नगराप्रति येतांचि. श्रीसुंदरेश्वर तिच्या वियोगें निजनयन विजित मनासिजशर पराजित होऊन अत्यंत शिणतहित्था नंदिकेश्वरासी बोलतो निरखा.

(घंटा ।। आदिताल ।। )

भुललो मी निजमन भुललो ।। ललनामणि निजमानसी रिझनी ।।
कलभाषिणी निजहृदयहीं कळवुनि भलत्या मिसें ठक मी मजलागुनी ।।
खळ ना वणा प्रमदाकरणी ।। तजवीज केली नाही पुरती
गजगामिनी पाठविली निगुती गजबज तेणेंही तसें चित्तीं ।।
निज पाहीना कै सखिया हें कधीं ।।

येणे रिती श्री सदाशिव मीनाक्षीची घटना कोण करवील म्हणून अलोचन करित असता नारद येतो निरखा ।।

।। राग मोहन ।। मिश्र ।।

सुरमुनी नारद येतो पाहा ।। सुमती भूतिभूषित शुभ देही ।।
तरममंजुळवीणा धरुनि या डाहीं हर नामावळी वाजवी गायही ।।
माजी शोभे व्याघ्राजित वसन माथां जयेजूट ।।
भासुर पूर्ण हे जीविकरी सकळांची आपणा हर्षे नाचत तकतांधिगणा ।।

सूत्रधार : येणे नारद येऊन श्रीशंकरा नमन करून बोलतो.

व० : अगा ये परमेश्वरा तूं जितकाम होऊनही प्राकृत जनांपरी मन्मथ वेदनेने का शिणतोस ?

(शि. श्लोक) 
म्यां जिंतिला मदनमीन दृशापदासी ।
सेवूनि ततकुचगिरींद्र सदाशी ।
आहे निजी वितरितो मज आपदांशी ।।
तो गुप्त भिल्लव निजेवी चतुष्पदासी ।।

सूत्रधार : येणे रिती श्रीशंकराचे वचन ऐकून नारद सहास्य बोलतो

व० : अगा ये परमेश्वरा तूंही मीनाक्षीच्या सुखरसत्वर अवलंबून अपार सुखांत पावला. ऐसे म्हणताचि सुंदरेश्वर बोलतो. अगा ये नारदा तूं अघटित घटनाचतुरानन कुमार जाहल्याकरितांच हे घटना करावीत ऐसें म्हणतांचि नारद बोलतो.

(श्लोक) 
भूतांसवें संचारितो कपाळीं । वस्त्रादि कीं केंवि कळपपाळी ।।
ऐसें न बोलो जनत्या नृपाळी ।। घे दिव्य वेषा मम वाक्य पाळी ।

सूत्रधार : येणे रिती नारद बोलून श्रीसुंदरेश्वराची आज्ञा घेऊन कदंबवनाप्रती जातांचि पुन्हां श्रीशंकर विरहभेद बोलतो परिसा.

।। गौळी पंतु ।। आदिताल.

कीरवाणी ते वेल्हाळी । केव्हा भेटेल आनंदमेळी ।।
धीर धरावे ना यावेळी । कीरमानस बहु तळमळीं ।।

मंद गंधवाह पाहे में ।। दसाचार तो भासताहे ।।
चारही निजकर पोळवितां हे चंदनाची उटीही न साहे ।।
स्मरू पूर्वीला वैराशी स्मर वर्षती खर शरांसी ।।
परमशीण केंवी ।। कधिंजे पराशीं । कर देईल कै सुखराशी ।

**सूत्रधार** : याप्रकारें विरहभरें सुंदरेश्वर बनोवनी फिरत असतां मीनाक्षी कांचनमालिकेस आपण दिग्विजय केला वृत्तांतकडून आणि सुंदरे-वराचे कृपा कटाक्ष विषमस्तन लोपला. वृत्तांत निवेदून विरह सोसवेनासी अंतरंग सखिजनासमवेत निजाराम वाटिकेसी येते निरखा.

।। जुजावता अटताल ।।

देवी मिनाक्षी महादिव्यरूपा येते पाही देवी वरखो जो त्या स्मरणहासेवूं करिताचि उहापोहा,

**सूत्रधार** : येणे रिती मीनाक्षी येऊन विरहभरें बोलते परिसा.

(फरजु आदिताल ।।)

ऐक काय करू गजगमनें ।। नौ कसें करूं शशीवदने ।।
तो कां नये सुमरदने तूं सांग वो शुभवचनें ।।
अदयमदन करि हृदयविदारण हृदय हर सदनि तये कां ।।

**वचन** : अवो ये सखी माझा प्राणसखा कुठें गुंतला कीं कळेना.

(श्रीराग ।। आदिताल ।।)

सोमसुंदर कां नये अजुनि । सोय ना धरि कां निजमनीं ।।
प्रेम खाऊनि मज भुलवूनि ।। प्रीती गुंतला कवणिचे सदनीं ।।
शिच सुमनाशीं ।।

**सूत्रधार** : येणे रिती मीनाक्षी शिणत असतां मन्मथ प्रत्यक्ष आलासें भासून घाबरी होऊन बोलते परिसा.

अगा ये स्मरा प्रहारूं नको मी स्मरहरन नव्हे नीट पाहा.

।। देवगांधारी ।।

भुललासी मदना अलकजटा भेदा न जाणसी कलकसूरी विषसम समजसी ।।
फुले मस्तक धरिती नीट शशी ।।
वलक्षपणे विरहज भूतिमाविशी ।।
मलयानिल घोडावरी चढून कलभाषण शुकविकभट घेऊनि कळनासे ।
स्मरहर मी म्हणुनि हलकल्लोल करिशी बाणी ।।

**सूत्रधार** : याप्रकारें मन्मथ प्रत्यक्ष येऊन वाडित्यासारखे भावून रोमांचस्वेद भयकंपादिकांते पाहून झाला अैशा मीनाक्षीसख्यानीं शीतलोपचार जाग करितांची कोण एक सखी पटाक्षेप येऊन बोलते.

**वचन** : अवो ये रुक्मिणी नारदे तुझ्या बऱ्हाडा या बोलणे कांचनमालिकेजवळ बोलती त्यावरून मदनमदहर सत्वर येईल चिंता करूं नको.

सूत्रधार : ऐसे पटाक्षेप दुतिकाने सांगिततांचि मीनाक्षी सख्यांसी बोलते पाहा.
।। यमन आदिताल ।।
सजणी कै पाहिन पाणविसांवा सत्वर त्या दावा ।।
सजलास्मरण मिळवुनि निजसमुदावा मजसी करि दावा ।।
गजगामिनी गजब ते मम वन तजविज करुनि मज शिव भजवा ।।

सूत्रधार : येणे रिती मीनाक्षी शिणत असतां हा समाचार अंतरंगसखीने सत्वर कांचनमालिकेस निवेदितांचि त्या कांचनमालिकेच्या आज्ञेवरून मीनाक्षी विवाहार्थ निजसमुदायासहित मंत्री येतो निरखा.
।। नायकी आदिताल ।।
मंत्री मादी येतसे पाहा ।। मनसुबदार महा ।।
तंत्रीवर फार कुशल होता गीद करी जना । समुगो ।।
येणेरिती मंत्री येऊन चारास पाहून तागीद करतो ।।
।। मणिरंग आदिताल ।।
मणिमयतेजागळा मंडप चांगला झणि कचवुनि भूपाळा जवें आणावा सकळां ।।

सूत्रधार : येणे रिती चारास तागीद केल्यानंतर कल्याणमंडप निर्माण करावया कारणें विश्वकर्मा तागीद करविती ची स्वसेवकांसहित विश्वकर्मा येतो निरखा.
विश्वकर्मा येतो पाही । वेग निजशिल्पासमूही ।।
ज्यासी समान नवीसे मही ।।

सूत्रधार : येणे रिती जोशी येऊन मुहूर्त सांगितल्यानंतर रेंचीं सचीव वेचारमुखे अंगवंग कलिंगादि देशाहून सकळ भूपाळसहित बलावन पाठवितांची ते राजे येताती निरखा.
।। असावेरी आदिताल ।।
(दरु) राजे येताती मोदें पाही रतशिवविनाही ।।
लोजे देखुनि रतिपतीही ।। लावण्यासमूही ।।
राजराज शिरताज सुदेही । भोजगाज रीती भ्राजमान माही ।।

सूत्रधार : येणे रिती राजे सकळ आल्यानंतर नारदवाक्य सुंदरेश्वर विवाहार्थ गुंडोदर नंदिकेश्वरादि कासीसहित येतो निरखा.
दरु : पंतुवराळी आदिताल ।।
सोम येतसे सुरसे उल्लासें ।। सोम सुरवर स्तोम मान्य निष्काममूर्ति जितकाम म्हणता कामज बाण प्रकामविरहें बामलोचना काम मानसें ।।

सूत्रधार : येणे रिती सुंदरेश्वर येतांची ब्रम्हादि सकळदेव ऋषिगणासहित येताती निरखा.
दरु : झिंजोटी ।। मित्र ।।
केशवादि कळोकाधीश येताती पहा ।।
व्यासादि मुनिही हव्यासौ धरूनि विवाहा ।।

**सूत्रधार :** येणे रिती सर्वत्र देव आणि ऋषिवर येऊन हेच मुहूर्त म्हणून मीनाक्षीस आणि सुंदरेश्वरास दिव्यासनीं बसवून अंत:पाट धरून मंगळाष्टक वदताती पारिसा.
श्रीमत् सुंदरनाथदिव्य नवरा श्रीशंभो जयजय
श्रीतपाला कृतविजया हे शर्वाणीप्रिया हेमाद्रीशशी या ।।
भूतिविभूषितदेहा । भुवनाधारा सुमुहा ।।
भूतिप्रदारा क्षोहा भो शिव उक्षावाहा ।।

**सूत्रधार :** यापरी चार दिवस सुखसोहळे करून सर्वत्रांस वस्त्रें भूषणे देऊन नमस भोगसाडेस सकळ संभ्राहानिसीं मिरवणी आणि लक्ष्मीपूजाही होतांचि सुंदरेश्वराप्रति नारद पाहून बोलतो परिसा.

**(श्लोक) :** वरि दर्या तरि ते पाणी । अर्थे विण केवळ दीनवाणी ।।
वाणीविना अर्थ कसा वी . . . तेसी जोडि तुमची प्रकाशे ।।
देव जिणोनि उमरेंद्र सुखा करातें । घेऊनि सर्व वितरी तुज शंकरातें ।
घेई परात रध अर्थ अनेकपाळी । मा देशि वा निजसुभक्त अनेकपाळी ।।

**सूत्रधार :** यथा करोन नारदाने प्रार्थितांचि श्री सुंदरेश्वर सपरिवार नित्यानंद मंदिरास निघुमस्तुत जो निखिलावासी अत्यानंद मीनाक्षीसी आला अद्‌भुत सुखकररासी.
याप्रकारे दिव्य प्रबंधाचा कर्ता हे

**(श्लोक) :** स्वशवितनें लोक जणुनि सकळादेव निकरा ।।
कराते लाहेवुन । धन वसन भूषापरिकरा ।।
करायाक्षी मातें । निजजनसमूहाप्रति महादेव
प्रिय मे डुलत विलसे निस्तुल महा ।।
श्री मत्भोसल वंश वारिधि भव्य प्रख्यात जो चंद्रमा ।।
चंद्रोतुसकृपाकटाक्षलहरी ज्याला भली सांद्रमा ।।
ज्ञातृत्वें जनकापरीच जगती पाळी महाराजा तूं ।।
अैशा श्री तुळजेंद्र नंदन । विभू सिंहासनीं राजितो ।।
अैसा नवरसज्ञ शिखामणी राजराजाग्रणी चोळदेशधणी श्री शरभेंद्र महाराज तयाचे संन्निधानीं सकळ बुधबळ निकर करुणापात्र अैसा रंगनाथ कवि अत्यंत हर्षभरें आसीर्वाद करितो निरखा ।।

**(श्लोक) :** मीनाक्षी परिणय भव्यनाटकासी । कल्पून विबुधवराशीं सौख्य देसी ।।
नांदें तू जनीं सकुटुंब पत्रपौत्र । पाळी दिग्विजय करुनिया धरित्री ।।

**(श्लोक) :** वर्षोतकाळी बहु मेघराजी होऊ सदा सव्यवीती धरा ही ।।
असो तुला लोकसमस्त राजी ।। होऊत कल्याणपरंपरा जी ।।

।। श्री मस्तु ।।

श्री भोसल कुल कलशोदधिजनित कलानिधी श्री चंद्रमौळी श्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासन संवत्संतति सुविराजमान सार्वभौम महाराज छत्रपती भूलोकदेवेंद्र भूपाळ विरचित मीनाक्षीपरिणयाभिधान नाटक संपूर्णम् ।।

श्रीरामार्पणं ।। श्रीरामजयम् ।।

# ४. गणेश विजय नाटक

श्रीगणेशाय नमः ।। श्रीगणेश विजय नाटक प्रारंभः ।।

दरू : ।। राग केदार ।। ताळ झंपा ।।

जयसुमुख गजवदन ।। जय सर्वसुदसदन ।। जयभक्तकृतकरुण ।।
जय भव्यचरणा ।। प ।। जयविघ्नगणहरण ।। जयविश्वसंचरण ।।
जयवेदनुतसुगुण जयविभोशरणा ।। अ ।। जयगानरसलोल ।।
जय नृत्तविधि कुशल ।। जयचंद्रयुतफाला जयविबुधपाला ।।
जयहेमनिभचेला ।। जयसुखद श्रुमलीला ।। जयनिहतरिपुजाला ।।
जयसदनूकूला ।। १ ।।

दरू : ।। राग गौळा ।। आदिताळ ।।

शरण भवसुत भक्तपालक ।। शरण भाउकदायका ।। प ।।
शरणभव जलनिधि सुतारक ।। शरण भयविनिवारक ।। अ ।।
शरण मोदक हस्तपावन शरण मूषक वाहन ।।
शरण मोहक गान नर्तन ।। शरण मोदक दर्शन ।। १ ।।

दरू : ।। राग केदार गौळा ।। अटताळ ।।

श्रीमग्दजानतम नाय जय मंगळ ।। शितिकंठ नंदनाय श्रुभमंगळं ।। प ।।
वामदेव गौरीतनयाय जय मंगळं ।। वासरमणि सन्निभकायाय ।।
श्रुभ मंगळं ।। अ ।। दानझरीचं लसितकटाय जय मंगळ ।।
दयांबुनिधयेस्वप्रकटाय श्रुभ मंगळं ।। गानवृत्त लीला निरताय जयमंगळं ।।
गंधर्वामरचय स्तुताय श्रुभ मंगळं ।। १ ।।

येणे रिती नाट्य प्रारंभ जाहलिया नंतर रंगभूमीत सरकवि विरचित गणेश विजयाभिधान श्रृंगार वीरस्य प्रधान नवीन नाटकानुसंधानें चतुरवर सभासदनिकर मनोरंजन करावया कारणें विघ्नहरणाची प्रार्थना करितो निरखा

(श्लोक): प्रसन्न वदनाप्रभो प्रथम आठवीतों तुला ।।
प्रसन्न मजहोकरीं प्रबल सत्कृपा निस्तुला ।।
प्रमाद करिशीं जरी प्रथित कीर्ति वाढे जनीं ।।
प्रमाण करितों झणीं प्रकट हो सभारंजनी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती गणेश प्रार्थना करून निज वाणी नवरस गुण खाणी नव नवोन्मिषिणी व्हावया कारणें वाणीचे स्तोत्र करितो पहा

(श्लोक): श्रीभारती प्रबल दैवत तूं प्रवीणा साजेकरीं सरस पुस्तक माळवीणा ।।
धात्याशिही रिझविशी बहु अंतरंगी ।।
ते तूं प्रसन्न झणि हो मज भव्यरंगी ।।

सूत्रधार : येणे रिती वाणीची प्रार्थना करून अज्ञान तमोगण निवारणी वासरमणी ऐशा श्रीगुरुचें स्तवन करितो निरखा.

आर्या : बोधें भवभय हरिशी ।। विमल बम्हचि निजश्रितां करिशी ।।
त्या तुज नमितो भावें ।। शुभ नाटक हें सभेत शोभावें ।।

सूत्रधार : यापरि श्रीगुरुचें स्तवन करून निजकुल देवता श्रीचंद्रमौळीश्वराची प्रार्थना करितो निरखा

श्लोक : सदाशिवा भूति विभूषितांगा ।। सदाशिवा लिंगित वामभागा ।।
सदास तूं येऊनि चंद्रमौळी ।। सदास बा दे शिव सर्वकाळीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती चंद्रमौळीश्वराची प्रार्थना करून नाटकार्थ संग्रह नांदीश्लोक युगळी वदितो परिसा

श्लोक : राजीवाक्षवरीसुजन्म सुजनी राजीजयाची महा ।।
गाजी तो श्रुति गीत दुर्जन गणा गांजीतसे कीं पहा ।।
सिंधुराभिध दुर्मदासि निवटूं सिंधूदयेचा बळें ।।
साधूं इंद्रहिता उमासुत जना साधू करो मंगळें ।। १ ।।
गर्भी स्वशीर्ष कपटें हरिलें जयानें ।।
त्यातें वधूं म्हणुनि ज्या गणराजयानें ।।
श्रीशंकरा हृतगजासुरशीर्ष पाहीं ।।
स्वीकारिले सुरहिता सुखवो नृपाहीं ।। १ ।।

सूत्रधार : येणेरिती नाटकार्थ संग्रहनांदी श्लोक वदल्यानंतर नाटकारंभी विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यास्तव तो दयाकर विघ्नतमस्तोम दिवाकर प्रत्यक्ष येतो म्हणुन सभासदांस सावध करावया कारणें दौवारिक येतो निरखा.

दरू : ।। राग शंकराभरणा ।। मिश्रताळ ।।

दौवारिक एतसे पहा ।। शैवाग्रे सरभूति भासुर झ ।। प ।।
ताव देत मिशियावरि महा ।। ताकिद करी जो सम्य समूहा ।। अ ।।
हाती लोकी बहु जयवंत ।। हावभावें मान हालवित ।।
हाती घेउनि रौप्य विलसित वेत ।। हर्षे गाय तो नाचत नाचत ।। १ ।।

सूत्रधार : या परिं दौवारिकानें सभासदांस सावध केल्यानंतर गणपति प्रतइक्ष येतो निरखा

दरू : ।। राग व्यागडा ।। आदिताळ ।।

गणराज येतो पाहिं ।। गजरें उल्हासें शुभदेही ।। प ।।
शीण हराक जो लवलाहीं ।। शिव तनय वंद्य सुराहीं ।। अ ।।
मूषकावरी वलघला ।। मोटा मोदकीं पोसला ।।
तोषवाया सर्व जनाला ।। थोर प्रीती सभे आला ।। १ ।।

सूत्रधार : या परि गणपती येउन सकळ विघ्ने निरशिल्यानंतर

सूत्रधार : (चहुंकडे पाहून) आहो सिद्ध आहे रंग मंगळविधि ?

(श्लोक) : सुषिरसुसुषिरांचा ज्या स्थलीं नांद नांदे ।।
अति वितत सुख स्वानद्ध घोषूज नादे ।।
सुघनघननिनादि शोभिता सर्व लक्षीं ।।
सतत सतत नाचे कौतुकें रंग लक्ष्मी ।। १ ।।
आणिक कैसें म्हणिजे ?

(श्लोक) : ना ना देश निवास भूसुर महा विद्वांस हे राजती ।।
वीण वेणु मृदंग टाळ बरवे मोर्चंगही वाजवी ।।
जेथें गानकला प्रवीण हरिखें गातां भले माजती ।।
त्या गानें सकलाप्सरा कुशल ते गंधर्व ही लाजती ।। १ ।।
(हे रंग प्रसादना ।।)

सूत्रधार : (नेपथ्यास पाहेन) अरे परिपार्श्वका ये येथें.

पारि० : जी मीं सिद्ध आहे आज्ञा करावीं.

सूत्रधार : अगा ये पारिपार्श्वका सकल जनमन: श्रवणनयनानंद करण्याविषयी मी आज्ञापिजेलों.

पारि : कोणा काडून?

सूत्रधार : सभ्यांकडून.

पारि० : कोण ते सभासद ?

सूत्रधार : येथें श्रीमद्भोसल कुलतिलक राजाधिराज श्रीशरभेंद्र महाराजें प्रतिवर्षी क्रियमाण गणेश महोत्सव विलोकन संतोष भरभरित चतुरवर मिळाले आहेत ते कैसे म्हणिजे.

(श्लोक) : काव्यालंकृति नीति नाटक महावेदांत वेत्ते भले ।।
तर्क व्याकरण श्रुति स्मृति गणीं निष्णांत जे चांगले ।।
सत्साहित्य कलानिधी परगुणा जे श्लाधिती कीं महा ।।
मात्सर्यादिक दोषहीन कुतुलें येथें मिळाले पहा ।। १ ।।
आणिक कैसे म्हणिजे.

(श्लोक) : वाचस्पतीहूनि विशेष वक्ते ।। जे कीं चतुःषष्टिकलेंसि धर्ते ।।
कवीसुनेत्रील सताति पाहीं ।। अत्यंत जे आवडती नृपाहीं ।। १ ।।
ऐशांचा अलभ्य योग घडला आहे त्यास्तव या सभेस उचित गणेश विजयाभिधान अभिनव नाटक नाचवुन सभ्यास रंजन करून आपणातें कृतार्थ करूं इच्छितो.

पारि० : कोण त्या रसाल ग्रंथाचा निर्माता ?

सूत्रधार : अगा रे पारिपार्श्वका तां ऐकिला नाही काय ? या कलियुगीं अति प्रख्यात भोसलवंश ते परंपरा सांगतो एक.

(आर्या) श्रीशंभू एकोजी ।। शरभोजी राज तो महासेन ।।
एक शिवाजीराजा ।। नृपति भला रामचंद्र गुणसदन ।। १ ।।
भीम महापति एक ।। क्षिति पति सुगुणी वराह एकोजी ।।
विख्यात ब्रम्हाभिध ।। नृप शाहूजी तसाचि अंबाजी ।। २ ।।
परशु नृपवीर बाबा ।। माळोजी शाहजी महाज्ञाता ।।
संभाजी तभ्राता ।। भूप शिवाजी प्रचंड रिपुहर्ता ।। ३ ।।
तुक्कोजीत तनय ।। प्रतापसिंव्हेंद्रतज्जवित्ततनया ।।
तत्सुता तो तुळजेंद्र ।। प्रथित महीपाल भव्यगुणसांद्र ।। ४ ।।

अगाये पारिपार्श्वका बाबाजी राजाचे ज्येष्ठपुत्र मालोजी राजे त्यापासून सहावे पुरुष तुळजा महाराजानीं त्या बाबाजी राजाचे कनिष्ठ पुत्र विठोजी राजा पासून आठवे पुरुष श्रीशरभेंद्र महाराजांस स्वीकार करून घेतले तें परंपराही सांगतो ऐक.

(आर्या) बाबाजी राजांचा पुत्र विठोजी द्वितीय बहुसुगुणी ।।
त्र्यंबक पुत्र तयाचा ।। गंगाजी तो तदीयसुतमानी ।। १ ।।
तत्सुता तो बुव्वाजी ।। निपजे त्याहुनि चतुर गंगाजी ।।
त्याचा सुभानजीसुत तत्सुत तो शहाजी जगी प्रथित ।। २ ।।
मगततनय वसुमती ।। पाळूं तुळजेंद्र दत्तधेसुमती ।।
त्या शरभेंद्रास पदीं ।। स्थापी मोदें रिझोनि राज्यपदी ।। ३ ।।

**सूत्रधार** : श्रीशंकर जन परिपालन करावया कारणे विषम दृष्टी सोडून सम दृष्टी होऊन श्रीशरभेंद्र भूप रुपे अवतरला असें.

**पारि०** : हें काय चित्र महाविष्णूचे कृत्य श्रीशंकरे अवलंबिले.

**सूत्रधार** : त्यास कारण सांगतो ऐक.

(श्लोक) ब्रम्हा सृष्टी करि परीं जग तया पाळूं असो धी नसे ।।
पाता विष्णु परंतु तो कलिभयें जो बुद्ध जाला असे ।।
यासाटीं शिव देववर्य करुणासिंधू जना लागुनि
पाळाया शरभेंद्र होऊनि असे जो राज राजाग्रणी ।। १ ।।
प्रातःकाळी उठोनी करूनि शिवनुति स्नान विध्युक्तसारी ।।
पूजोनी सांब रत्नी धनवसन गणींदिव्य नानोपच्यारीं ।।
छाया गोधान्य वित्तादिक बहुवसुधामर्त्यवृंदांशि जो दे ।।
न्यायें पाळीं प्रजे तें शरभ नरपती जो ससांम्राज्य नांदे ।। २ ।।
धर्माधर्म व्यवस्था सकल कलिगुणे क्षीण झाली म्हणौनि ।।
श्रीसांबें दीननाथें शरभ नरपती होउनी राजधानी ।।
तंल्याख्यी प्रविडवाकादिक सुमति भले सभ्य कल्पोनि लोकां ।।
केला आनंद धर्मी रतउनि सुयशा त्या प्रभूतें विलोका ।। ३ ।।
यत्सभ्य द्विजराजहंसश्रुचि ।। जे अत्यंत पैं शोभती ।।
सत्पक्षीं बहु राजती अतिशयें सत्याश्रयें साजती ।।
न्यायान्यायपयोजला निवडुनि लोकत्रयीं गाजती ।।
तो हा जाण शिवावतार शरभ क्षमापाल वर्णू किती ।। ४ ।।

सारासार विचार कारक गुणी तारापती भाषणी ।।
तारानाथ निभ प्रसन्न वदनी तारावया मेदिनी ।।
हा राजा शरभेंद्र एकचि असे वीराधिवीराग्रणी ।।
काराविष्ट करी रिपुशि सुजना थारा विराजे जनीं ।। ५ ।।
ज्याचा पुत्र शिवप्रभु गुणनिधि साम्राज्य भाग्याधिला ।।
जेथें शंभु कटाक्ष सांद्र विलसे अत्यंत तो चांगला ।।
जो राजा निजमानसी अविरत ब्रम्हात्मनेनें अती ।।
आनंदा जनका परीं अनुभवी वर्तोनि लोक स्थितीं ।। ६ ।।

वचन : एताहृश गुणग्रामणी चोळदेशधणीया ग्रंथाचा निर्माता ?

पारि. : अगाये सूत्रधारा चतु: षष्टि कळा प्रवीण जगत्प्रसिद्ध चोळ देशाधिप शरभेंद्र भूपाळ या ग्रंथाचा निर्माता काय तरीं सभासदांचे तुझेहीं मनोरथ सफल होतील.

सूत्रधार : चहूंकडे पाहून अगाये पारिपार्श्वका दंपति मनसंतोष कारक ताप निवारक ऐसा वर्षाकाल शोभतो पहा.

(श्लोक) नाटच क्रियाविलसतें बहु नीलकंठी हर्षोत्करें सरसचातक वेळकंठी ।।
संतोषुनी सुरमणी कलकंठीकंठी ।। आलिंगिती सुदृढ त्या निजनाथ कंठी ।। १ ।।
वर्षोनिया शरगणासि पर प्रतापा । हा पां वारोनियां विलसतों घनराज विद्युत्सु भुषण विभूषित भव्यदेहीं ।। उंचावला जनसुख पदयासि पाहीं ।। १ ।।
(नेपथ्या मधें) अहो फार संतोष फार संतोष इंद्र कोठें कोठे ?

सूत्रधार : अगाये पारिपार्श्वका, म्या गायिच्या श्लोकाचा अर्थ स्वाभिप्रायानुसार कल्पून देवेंद्राचा सारथी मातली येतोसा दिसतो. आम्ही अनंतर करणीयांस जाऊं (म्हणून दोघेहीं निघून गेले असता मातली येतो निरखा) ।।

दरु : ।। राग शुद्धसावेरि ।। आदिताळ ।।

येतसे मातली पाहिं ।। सूत इंद्राचा लवलाहीं ।। प ।।
वेत हस्त ।। अति सुंदर देही ।। गात नाचत जो महीं ।। अ ।।

सूत्रधार : (येणे रिती मातली येउन फिरून पाहून) हा भ्रमलो भ्रमलों इंद कोठे आहे ? असो श्रम वाक्य ऐकिलों अखंड मंडलाधिपत्यातें पाऊस आखंडल सुखी केव्हां होईल (म्हणून आप आपणात बोलतो परिसा).

(श्लोक) सिंधूरांचित गंजमंडित बळी सिंधूर नामामहीं ।।
सिंधूराननत्याहरिलसुदयासिंधूनृशंसाकहीं ।।
चिंता सांडिल देवराज सुरसच्चितामणी तो कदां ।।
संताचे करूणें कडूनि सुख सत्संतान लाभे सदां ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारे मातली भगवत्कृपा कटाक्षवीषणें इंद्रासि सुख प्राप्ति व्हावया विषई अलोचना करीत असतां ।।
(साटोप फिरून पाहन आकाशीं कान देऊन मंजुळ वीणनिनाद ऐकूं येत्यावरून नारद येतोसा दिसतो म्हणताच नारद येतो निरखा)

दरु : ।। राग आरभि ।। ताळ शाप ।।
नारद मोदें येतसे पाहीं ।। नाम जय तवाचेसि सदांहीं ।। प ।।
धीर निरत लोकोत्तर कळहीं ।। धीमंत वीणा धारक बाहीं ।। अ ।।

**सूत्रधार** : येणे रिती नारद येतांचि.

**मातली** : मी नमस्कार करितों नारद : मातली चिरंजीव सुखी भव अगाये मातली इंद्रेवीण येथें कोठें येणें केलें.

**मातली** : स्वामी त्रिकालज्ञा तुजला कोणतें तरि न कळे.

**(श्लोक)** सिंधूरांचित गंडमंडित बळी सिंधूरनामामहीं । सिंधूरानन त्याहरील
सुदयासिंधू नृशंसाकहीं । चिंता सांडिल देवराज सुरसच्चितामणी
तो कदा ।। संताचे करूणे कडूनि सुख सत्संतान लाभे सदा ।। १ ।।

**वचन** : सिंधूरासूराचे भयें देवेंद्र कोठें कीं गुप्त संचरतो त्या दुष्टाच्या वधाविषई तुवां उपाव कल्पावा.

**नारद** : अगाये मातली तो सिंधुरासूर माझा कनिष्ट भाऊ परंतु फार दुष्ट शिष्ट जन पीडक झाल्यास्तव त्याचा वध मजला इष्टच.

**मातली** : तो कैसा भाऊ ?

**नारद** : अगाये मातली त्याचें वर्तमान सांगतो ऐक. तो माझ्या बापाच्या जांभाईपासून संभवून त्यापासून वरातें ही लाहून त्यातेंच कवटाळून भस्म करूं इच्छिते वेळेस त्या सिंधुरासुराला महा विष्णूनें सामें कडून भोंदून महादेवासी जुंझावयासी प्रेरितांचि तो असुर कैलासास जाऊन तपश्चर्यासक्त शिवातें सोडून पार्वती तें हरितांचि महादेव सावध होऊन पार्वतीस सोडऊन आपण जुंझते वेळेस महाविष्णुनें वृद्धावेषे साक्षि असतो म्हणून त्या असुराची शक्ति मंदविली आतांही त्या विष्णूनेच त्याचा संव्हार करावा असें भासते बरें भींऊ नको :

**(गीत)** सपदि या भया सांडि मातली ।। परगणावळी फार मातली ।। १ ।।
मधुरसीं महामांगरातली ।। पहा पहा तिला पाडितों तळीं ।। २ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें बोलातांचि.

**मातली** : अगाये नारदा सिंधुरासुरा शुष्कवना सदा या दावानल तूंचि असतां आम्हा भय कैचें ?

**सूत्रधार** : म्हणतांचि.

**नारद** : आतां येथें असु नये सिंधुरासुरा येईल मीं महाविष्णुपासीं जाऊन कार्य साधितों तूं इंद्रापासी हा वृतांत निवेदे.

**सूत्रधार** : म्हणून परस्पर बोलून निघून गेले असतां सिंधुरासुर येतो म्हणून सभासदांस सावध करावया कारणें दौवारिक येतो पहा ।।

(दरु) ।। तोडी राग ।। आदिताळ ।।
विद्युज्जिव्ह दौवारिक हा ।। विचक्षण येतो पहा ।। प ।।
मद्यपानीमत्तमहा माईक मोटा सज्जन गणहा ।। अ ।।

सूत्रधार : येणे रिती दौवारिक येऊन सभेस सावध केल्यानंतर सिंधुरासुर येतो पाहा
(दरु) ।। नाटराग ।। आदिताळ ।।
सिंधुरासुर येतो पाहीं ।। शिष्ट विशिष्ट जनाचा द्रोही ।। प ।।
सिंधुमदाचा जो लवलाहीं ।। विधुनि सुरगण बाण समूहीं ।। अ ।।
ताव देत मिशियावरि भारी राव करित सभेंत परोपरीं
माव कारक भुज थापटीत करीं ।। हाव भावें नाचत सुरवैरी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सिंधुरासुर येऊन बोलतो निरखा.
(दरु ।। राग पंतुवराली ।। आदिताळ ।।
सावधानें ऐका हें मम वैखरी ।। देवदानवादिक जिंतिले समरीं ।। प ।।
जीवेंधालों आता मज कोणवैरी ।। नाव केलें म्या फार चराचरीं ।। अ ।।
यक्ष किन्नर सिद्ध गंधर्व आगळे ।। लक्षावधि भूसुरहि पिळिलें ।।
रक्षो गणाध्यक्षपणासि साधिलें ।। भक्षीन मी पहा काळासि सगळे ।।

सूत्र : येणे रिती मदोत्धत सिंधुरास स्व पराक्रम वाखाणित असतां अशरीरवाणी होतसे परिसा.

(श्लोक) वेदमुखें जो स्वपराक्रमाशीं ।। तो मूर्ख पावे सहसा श्रमाशी ।।
स्वकिर्ती वाखाणिसि कां ददांधा ।। करील वैरी तुजलागि बाधा ।।

(आर्या) अधिक प्रकाश वाढे ।। दीपाचा जाण राहते समई ।।
तैसाचि काळ तुजला ।। आला झांकोळलासि गर्व धुआीं ।। २ ।।

सूत्रधार : येणे रीति अशरीर वाणी होतांचि सिंधुरासुर बंधून कुसुम सम नयन होवोनि निज भटां प्रति बोलतो परिसा.

(श्लोक) बाधा कोणकरी मला त तया बांधा धरारे चिरा ।।
साधा आत्म हितासि तो रिपुमनीं साधा न मानापुरा ।।
वेधा आदि करोनि देव मजला वेधावया भीत कीं ।।
ये धावोनि असें कसें मजवरीं ये धावया भूतकीं ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारें सिंधुरासुर बोलतांचि चारमुखें हा समाचार ऐकून अति वेगें मंत्री ऐशा चंडासुर येतो पहा.
दरु : ।। राग अठाणा ।। आतिदळ ।।
चंडासुर येतो पहा ।। चंड पराक्रम हा ।। प ।।
खंडा हाती घेऊनि महा ।। खंडावला निजवैरी समूहा ।। अ ।।

सूत्रधार : येणे रिती चंडासुर येतांच त्या कारणें खंडासुर सांगतो परिसा।
अगाये चंडासुर आमचे यजमानासही कोणकी वैरी म्हणें ।।
ऐशी अशरीर वाणी ऐकिली हें काय आश्चर्य !

सूत्रधार : ऐसें म्हणतांचि कोपायमान ऐसा चंडासुर बोलतो निरखा.
(दरु) : राग कन्नडा ।। आदितळ ।।
वैरी कोण बळी ।। वसुधातळी ।। प ।।
वीर शिरोमणीविजयी सिंधुर ।। विश्वजनासि पिळिली ।। अ ।।
पिपीलिकेशीं ।। पंख फुटले जरी ।। दीपक केवि गिळी ।। १ ।।

(श्लोक): रक्षी नायक सिंधुराज्य सुजना संक्षोभवीकाळसा ।।
याक्षेणी वरि त्याविषक्ष गणसंलक्षोनि राहेकसा ।।
यक्षादि प्रभुदेव दक्षसमरीं लक्षावधीं कापती ।।
वीक्षा स्वल्प अपेक्षितो क्षणभरी दाक्षायणीचा पती ।। १ ।।

**वचन :** अगाये स्वामी सिंधुरासुरा ।। तूं लक्षावधि विपक्षगणास क्षोभविणार तुजसीं कोण जुंझूं सकेल.

**सूत्रधार :** म्हणतांचि सिंधुरासुर आकाशीं नयन देऊन मान हलऊन.

**सिंधु :** अ लक्षा तें लक्षूनि कैसे सिक्षू ।। बरें ।। जगाचा काल मी मजला कालमय कासायाचे हें वाक्य मिथ्याच ।। परंतु दुःस्वप्न पहिल्या जाग होऊनि शांति करावी ।। निजभट हो ऐका ।।

(श्लोक): दायाद अग्नि रिपुरोगसाना ।। वायांचि गर्व स्वमनीं न माना ।।
कानासि झाल्यां श्रुत तोनिकाना ।। वानाचि हा बोधवरिष्टवाना ।।

**सूत्रधार :** येणें रिती सिंधुरासुर बोलतांचि चंडासुरानें शुक्राच्यार्यास मूल धाडितांच शुक्राच्यार्य येतो निरखा ।।

(दरु) : राग शंकराभरणा ।। मिश्रताळ ।।

शुक्राच्यार्य येतो पाहीं ।। शुभकारक बहु भव्य देहीं ।। प ।।
जो क्रतु कर्मी पटु लवलाहीं ।। जो में येतो शिष्य समूहीं ।। अ ।।
येणे रीति श्रुक्राच्यार्य (ये) तांचि सिंधुरासुर साष्टांग नमस्कार करून उच्यासनी बसवितांचि ।। श्रुक्राच्यार्य आशीर्वाद वदतो परिसा ।।

(श्लोक): कल्याणहो तुजराक्षसेन्द्रा ।। राहें सुखें तूं न गणोनि इंद्रा ।।

**सिंधु :** स्वामी महोत्पात आला म्हणताति त्याचा परिहार करावा ।।

(श्लोक): उत्पात पीडेसि करोनि शान्ति ।। देईन सौख्यासि तुलानिशांती ।।

**सूत्रधार :** या प्रकारें श्रुक्राच्यार्य वदत असतां पंच्यांगी येतो पहा ।।

(दरु) : राग मध्यमावती ।। आदिताल ।।

हर्षे पंच्यांगीं येतसे ।। हरहर वदतसें ।। प ।।
वर्ष मास पक्ष तिथी ।। वार नक्षत्रादिक सुमती ।।
घर्षण करिताचि लोकां प्रती ।। घरोघरीं सांगे ग्रहगती ।।
अ ।। मोटकारवेतांदळाची ।। मोटचा मोटचा प्रतीयाची ।।
धीटपणें स्थिति सर्वांची ।। धीमंत वाखाणीसाची ।। १ ।।
येणे रीति पंच्यांगी येऊन सिंधुरासुरा प्रति आशीर्वाद करून बसतांचि.

**चंडा. :** अगाये जोशी हो चांगल्या वेळेस आलेत आरूढ पाहून प्रश्न सांगा.

**पंच्यांगी :** (आर्या) आरूढ लग्न सिंहचि षष्टाधिप शनि वसे पहाकुंभी ।।
कुंभी नससहित बळी रिपु सिंहा पाहसील मदकुंभी ।।

(श्लोक) : साता खाले पांच घालावयाची ।।
आली पाहें वेळ श्रुक्राशियाचीं ।।
कीजे भारी दक्षिणायुक्त शान्ति ।।
उत्पाताची होइजे जें विशान्ती ।। १ ।।

दौवा : वाटे मध्यें शुक्राच्यार्यासी तजवीज करून आलांत जणू.

सूत्रधार : ऐसें बोलतांचि शुक्राच्यार्य हासून हा समय पारिहास्यच नव्हे.

सूत्रधार : या प्रकारें म्हणून अतिशीघ्र शान्तिक विधि करवितांचि.

सिंधु. : अगाये जोशी हो माझा वैरी कोण ?

पंच्या : (आर्या) शांतिक कर्मे टळली पीडा तूझी मनासि आकळली.
जो गौरीचे उदरी. वाढे तो जिंकिजेल पां त्वदरी ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारें जोश्याचे वचनें कडून सिंधुरासुर थोडी तजवीज करून.

सिंधु. : भूमीतिल मोड चिमटिल्यावरि पुन्हः त्याची वृधि होईल काया बरें तैसाचि उपाव कल्पितों.

सूत्रधार : या प्रकारें बोलून त्वरित पार्वतीस धुंडावयासि जातांचि नारदानें हा वृत्तांत श्रीशंकराचे कानीं निवेदितां श्रीशंकर पार्वतीसहं कांही न सांगतां.

शंकर : तूं गर्भिणि आहेस कीं तस्मात तूं सखीयासीसंह वनविहार करावयास जा. नारदासीं बोलून मिहीं येतां.

सूत्रधार : म्हणतांचि पार्वती श्रुकपाणी सख्यांसीसह वनविहारास येते पहा.

दरु : राग गौळिपंत ।। आदिताळ ।।

येतसे गौरी सुंदरी ।। यदुवर सोदरी ।।
प ।। सीतद्युति मुखिसाजि ।। गीत नर्तन वातुरी ।।
आ ।। चरणीं नुपुरें रूण झुणिती ।। करिणी मृदुगती ।।
हरिणी नयानाचे श्रुभमती ।।
हारिणी उल्लसती धरणी भूषाजणु युवती ।।
तरणी शत समान कांती ।।

सूत्रधार : येणे रीति गौरी येऊन वन वर्णिते निरखा.

दरु : केदारगौळा ।। आदिताल ।।

रमणीय पर्यळीवन ।। सुमफळ भरपूर्ण ।।
प ।। कमलिनि कमल गण ।। कमनीय मन मोहन ।।
आ ।। भ्रमरांचे मंजुळनिस्वन भ्रमविती मन ।।
अमरदुम शोभायमान श्रमहारक जाण ।।
स्वमनीं रंजुनि आपण रमणी रमताति रमण ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीति सुंदर वन वर्णित असतां शीतल सुवास मंद पवन लागतांचि पार्वती विरहभरें सख्याशीं बोलते पहा.

**(श्लोक) :** हा गांजितो मंदसमान वारा ।। न सोसवे या प्रतिशीघ्रे वारा ।।
आणोनियां सत्वर विश्वपाळा ।।
वाई सख्यानो मजलागि पाळा ।।

**सूत्रधार :** या प्रकारें विरह वेदनेनें बोलतांचि सखी कीर वाणी गौरीस आश्वाससिते पहा.

**(श्लोक) :** हा तुंदगंधवह मंद सधर्म येतो वाताशूभूषवनिता म्हणवोनि भीतो
हें कां न जाणसि मनांत वृथाचि भीसी ।।
येईल शंकर तुझा झणि सांडि भीती ।। १ ।।

**सूत्रधार :** या प्रकारें सखी कीरवाणी गौरीस आश्वासित असतां गौरी निजकर स्थितराव्याचें मधुर भाषण ऐकून विरह भरेंत्यास मिखंदिते परिसा.

**(श्लोक) :** माझाचि तूं निश्चित जाणराव्यां ।।
तां जाचिणें युक्त दिसे पराव्यां ।।
आत्पीं न तुझा जरि पक्षपात ।।
करीन तूझा तरि पक्षपात ।। १ ।।

**सूत्रधार :** या प्रकारें राव्यांतें दबावीत असतां चंद्रकिरण पोळतांचि ते पार्वती सखीसीं बोलते पहा.

**वचन :** अवोये सखी जनाच्या बोलण्या वरून चंद्रही सळितो ।।

**(श्लोक) :** हा जिंतिला चंद्र मदाननें ।।
म्हणौनि मातें स्तवितां जनानें ।।
आलाय या कोप जनाननाशी ।।
दांडासखी घालिन सांग कैशी ।। १ ।।
अवोये सखी हा विरहिणी घातुक चंद्रकीं कोण पाहा ।।

**पद्य :** कलशोदधीहूनि कांत तनुनिपजला किर कीर कां करी कीरवाणी ।।
विष्णुपद सेउनी विलसतो हा मलाविपद दे कां गमन विजित करिणी ।।
श्रुचि मूर्ति म्हणुनिया श्रुभ कीर्ति जो बरि सुकवितो कां मला सुगुण खाणी ।।
कुवलयाल्हादनीं कुशलहामज लागि कुछितत्वें सळी कुसुमवर्णी ।।
उर्ध्व तरणीचकी सांग उगलाहे ।। ऊंच बडवाग्नि कीं उडनि सांचलाहे ।।
उशिर नलवी पहा नीट उमगुनि हे ।। उग्रसंताप हा फार उगवला हे ।।

**वचन :** अवो ये सखी हा मन्मथहीं फार जाचितो माझ्याने सोसवेना.

**दरु :** ।। फरज ।। आदिताळ ।।

विरह सोसवेना ।। विरह सोसवेना ।। प ।।
स्मरशर खरवर सरसर सोडी हर हर उरहें शतधाकोडी ।। अ ।।
मदनें मारफार केले ।। हृदई तीरपार जाले ।।

**सूत्रधार :** येणे रिती पार्वती बोलून मूर्छाग्रस्त जाली असतां सख्यानी शीतलोपच्यारे सावध करितांचि पार्वती बोलते पहा.

पार्वती : स्मर हर कोठें कोठें ?

दरु : राग यरुकुलकां ।। आदि ताळ ।।

सोमशेखर कां नये अजुणि काम विधितो मज निजवाणीं ।। प ।।
यामयुग समगमतसेमनों ।। क्षेमलाहे न कैशी सजणी ।। अ ।।
हर नयनें जों भस्मजाला हर्ष चितस वाटला ।।
परम पापी सळितो जनाला ।। हर हर कैसा पुन्हः उदेला ।। १ ।।
अवोये सखी मी वेडी शिव सुजनाचे ठाई कैसा रिझेल ।।

(श्लोक) : दोषाकराशि मकुटावरी ठेवियलें ।। तैसे समुदे वनितेसहीं आदरीले ।।
जे कीं द्विजिव्हवर भूषण त्याशि कल्पी ।। कैसा ऋझेल सुजनी रतनाथ अल्पी ।।१।।

वचन : अवोये सखी कारण वेगळेही.

दरु : ।। रागमांजि ।। तिस्त्रताळ ।।
सवेग शिव आजुणी न आले सवतीनें दावाचि साधियेला ।। प ।।
सवे लावोनी जाण भुलविला ।। सवेंतीनें मन्मथ वसवीला ।। अ ।।
कोणीं जावोनि पुसा पिंगळयाला ।। कोठे गुंतला साजणा न आला ।।
कोण उपाव रचूं सांगयाला सीण होतति फार या जिवाला ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सखीसी बोलत असतां पिंगळा येतो पहा.

दरु : राग व्यागडा ।। आदि।।

पिंगळा येतसे पहारे सखया पिंगळा येतसे ।। प ।।
मंगळ बोलतो अमंगळ टाळितो पिगट मिशियाचा हा ।।
भांग खाउनियां रंगले डोळे दंगकरी जन समूहा ।। १ ।।
अ ।। भंडार कपाळी दंडासि करि धरितों डाळ साचार जोगी ।।
वाकळ आगी वाकडे पागोटे रोकडे सांगे लोकालागि ।।१ ।।

सूत्रधार : येणे रिती पिंगळा येतांचि ।।

पार्वती : अगाये पिंगळया ।। माझे मनिचे गुज सांगसी जरि तुला दुशाल देऊन खुश खुशाल करिन.

(पि.पद्य.) : चितमध्ये तुवा चिंतिला तो जीवदोनि पद त्यासंग तीनि डोळे ।।
सर्वदेही जया सर्प गुंडाळले मदभरें सतत जो मत्त डोळे ।।
भोवताले जया भूतगण वेताळ झोटिंगमैराळ कोटि काळे ।।
मस्तकीं ज्याची या मदवती बैसली सोंकवी त्यालागि रोक बाळे ।।
साचि माझी गोष्टि साजणी बाई ।। सरस साडी मला त्वरीत देई ।।
सवतिचा मोह झणि सोडुनि आई ।। सजण आला व्यसन सांडि हे काई । १ ।।

सूत्रधार : येणे रिती पिंगळयानें सांगून वस्त्रे भूषणें घेऊन पलीकडे जातांचि पार्वती श्रीपरमेश्वराशि केव्हा पाहीन म्हणून बावरी होऊन उपवन प्रदेशीं धुंडित वृक्षांतरित जाहली असतां कैलासी पार्वती विरहित रोश्या श्रीशिवासि पाहून मन्मथानें पूर्व वैर स्मरून बाणाचा भडमार करितांचि ईश्वर बावरा होऊन पर्यळी वनासि येतसे निरखा.

(दरु) ।। राग सुरट ।। अटताळ ।।

परमेश्वर येतो पाहीं ।। परमानंदे भव्यदेहीं ।। प ।।
सुर नायक जो जगमोही स्मरूनी गौरीशी लवलाहीं ।। अ ।।

**सूत्रधार** : येणे रिती परमेश्वर येऊन पार्वतीस न देखतां विरहभरें बोलतो परिसा.

(दरु) ।। पुन्नागवराळी ।। आदिताळ ।।

केमि पाहीन या दृष्टी ।। कीरवाणी ते गोरटी ।। प ।।
सीमारहित प्रेमळ मोटी ।। का माझे न येतसे निकटीं ।। अ ।।
घडिहि न सोडी जे कीं मजला ।। घनकुच युगळा जे बहु कोमला ।।
घडवी वंधा प्रति रति कुशला ।। घडि घडि आठवते ते महिला ।।

**सूत्रधार** : येणे रिती परमेश्वर विरहभरें सिणत असतां कोणी येक सखी पार्वतीस तूझा सजण आला। पिंगळचाची गोष्टि साच जाहली।
म्हणतांच पार्वती फार संतोषानें वृक्षांतरित ऐशी डोंकावितांचि परमेश्वर पाहून बोलतो परिसा ।।

(पद्य) अधि सहजात कीं अरविंद कुसुम कीं आदर्श बिंबकी आस्यहे कीं असि-
तोत्पलेच कि अति अपित चपल मीन कीं असमशर बाण कीं अक्षियुग कीं ।।
आम्रनवचिकुर कीं अति पक्व बिंब की अरूण प्रवाळ कीं अधर हा कीं ।।
अर्कहित पतंग कीं अद्भुत की अतुलघन कशल कीं आणि कुचकीं ।।
तकतकित घन कांति तटित हे कीं ।। तरूण प्रभा जाल तारका कीं ।।
वर मोहकर कनक वल्लिकाकीं ।। वसुधातला भरण वल्लभाकीं ।।

**सूत्रधार** : येणे रिती अति मोहभरें पार्वतीस आदरूं जातांचि पार्वती प्रणय कोपें बोलते परिसा ।।

(दरु) ।। राग आनंद भैरवी ।। आदि ।।

कळलें प्रीतीचे लक्षण कळभंडा मज लागून ।। प ।।
कळ दावितां सवतीनें ।। वळलासी तिज लागून ।। अ ।।
सळलें सळलें फार तेणें ।। तळलें देहाचे स्मरण ।।
जैसा मीन तळमळित होतें मन ।। १ ।। फळ कर्माचें दारूण ।।
तिळहीं न सुटे भोगें वीण ।। भलती स माथां घे उचलून ।।
नलगें तूझें संदर्शन ।। २ ।।

**सूत्रधार** : येणे रिती पार्वतीचें कठोर वाक्य ऐकून गंगा प्रत्यक्ष येतसे निरखा.

(दरु) ।। राग कल्याणी ।। आदिताळ ।।

गंगा येतसे पाहीं ।। भृंगाळ का भव्यदेही ।। प ।।
मंगळ रूपा तुंगकुचाही ।। मंदस्मेरामद भरिताहीं ।। अ ।।

**सूत्रधार** : येणे रिती गंगा येऊन पार्वतीस पाहून सकोप बोलते निरखा.

(दरु) ॥ बिलहरि ॥ आदिताळ ॥

काय तुझें थोरपण ॥ नायकाशीं निखंदिण ॥
न्याय नोहें तुज लागुन ॥ होय सावध मनीं आपण ॥ १ ॥

पार्वती : कळलें तूझें भलेपण ॥ जलधीशी कंटाळुन ॥ भलत्या नाथाशी भाळून ॥ गळा पडलीस भोंदून ॥ १ ॥

गंगा : काळी म्हणुनीं शिव कंटाळे ॥ खालि केले घालुनिवाळे। भालिशी कैशी भोळे ॥ कालि राणाशी दवडिलें ॥ १ ॥

पार्वती : भंग पाउनि फिरशी रानोमाळ ॥ वोंगळ धूताति तुज माजि सकळ ॥ संगी पहा बहु खळखळ ॥ हंगू नको मज पावशी फळ ॥ १ ॥

गंगा : देव देवें प्रेमे भजलागी ॥ जीवें धरिलें न यत्तमांगीं ॥ आवडीची कोण जगीं ॥ भाव जाण तूं अंतरंगी ॥ १ ॥ पथ ॥

पार्वती : वाहडविल्याहूनीचाडेली ॥ बायिलेहूनि बटिक आगळी ॥ पहा पहा जगीं हे बोली प्रस्तुत मज फलाशि आली ॥ १ ॥

गंगा : पतिनें वानिलें जियेशी ॥ सतिनें वानावें तीयेशी ॥ मति ऐशी कां नेणशी ॥ किति मी सांगू वेडि झालिशी ॥ १ ॥

पार्वती : आलें दैवत ॥ अधमेवरी ॥ आदरावें तिज उपच्यारी ॥ काळा ऐसें वर्तावें चतुरीं ॥ भोळा शंकर संकल्प भारी ॥ १ ॥

सूत्रधार : येणे रिती उभयतांचा संवाद ऐकून परमेश्वर गंगेस आश्वासन करितो निरखा

(आर्या) वहिण तुझी हे गंगे ॥ करिशी हा व्यर्थ वाद कां सांग। सलगीनें हें बाला ॥ बोलेन रूसें निरीक्षुनी मजला ॥ १ ॥

सूत्रधार : येणे रिती गंगेस आश्वासून पार्वतीस पाहून परमेश्वर बोलतो परिसा।

आर्या : जे कीं मदुत्तमांगा ॥ वरि वळघोनीं वसे तरी गंगा ॥
न जुडेमत्सवांगा तुज परि कालाहसी मती भंगा ॥ १ ॥

सूत्र : येणे रिती परमेश्वर बोलताचि पार्वती परिहासपूर्वक स्तविते निरखा ॥

श्लोक : पाता जनीं थोर थोर भल्याभल्यांचा ॥
दातांचि तूं सर्वद गा फळांचा ॥
भूतांव्दिजिव्हासहिं आदरीशी ॥
नाथा स्तवूं फारचि केंवि कैशी ॥ १ ॥

सूत्रधार : येणे रिती पार्वती बोलतांचि श्रीशंकर

शंकर : अवो ये पार्वती तुजला मजला अनादि सिद्ध अभेद आहे त्यामुळे तूझे गुण तुवां वर्णिलें ते कैसे म्हणीजे ऐक.

आर्या : मी पट तूं गुणसजणीं ॥ सुरत्न मी तूं प्रभा असेंचगणीं ॥
मी चंद्र चंद्रिका तूं ॥ स्तवन करायास कोणता हेतू ॥

**सूत्रधार** : येणे रिती श्रीशंकर बोलतांचि उभयतांस मरसून नित्यानंद मंदिरी प्रवेशिताचि निष्कांतास्सर्वे.

(दरु) ।। श्रीराम ।। आदिताळ ।।

नित्यानंद मंदिरासि ।। सत्यानंद सुगुणराशी ।। प ।।
कात्यायनीशी व्योमकेशी करी धरूनि ये पहा हौसी ।।

इतिश्रीमम्दोसल कुल कलशोदधि जनित कळानिधि श्रीचंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिव्हासन संप्तसततिसुविराजमानसार्व भौम महाराज छत्रपती भूलोक देवेंद्र श्रीशरभेंद्र भूपाल विरचित श्रीगणेशविजय नाटकें प्रथमोंक:

---

**द्वितीयांक प्रारंभः ।।**

**सूत्रधार** : तदनंतर पावती परमेश्वर पर्यळी वनामाजि दिव्य मंटपी पहुडले असतां सिंधुरासुर कैलास पर्वताप्रति जाऊन पार्वतीस तिकडें न देखतां पर्यळी वनाप्रति येऊन पार्वती परमेश्वर निद्रित असतां ते संधिसाधून वायुरूपे गौरीचें उदरीं शिरून गर्भाचे शिर चिमटून शोणभद्रेंत झुगारून टाकून आपण कृत कृत्य झालों म्हणुन अत्यंत गर्वेसी सपरिवार सभेस येतो म्हणुन सभासदास सावध करावया कारणें दौवारिक येतो पाहा.

(दरु) राग तोडी ।। आदिताल ।।

विद्युज्जिव्ह दौवारिक हा ।। विचक्षण येतो पहा ।। प ।।
मद्यपानी मत्तमहा ।। माईक कोटा सज्जन गण हा ।। अ ।।

**सूत्रधार** : येणे रिती दौवारिक येऊन सभेस सावध केल्यानंतर सिंधुरासुर येतो पहा.

(दरु) नाट राग ।। आदिताल ।।

सिंधुरासुर येतो पाहीं ।। शिष्ट विशिष्ट जनाचा द्रोही ।। प ।।
सिंधु मंदाचा जो लवलाही ।। विंधुनिसुरगण बाण समूहीं ।। अ ।।
ताव देत शियावरि भारी ।। राव करित सभेंत परोपरीं ।।
माव मारक भुज थापडीत करीं ।। हाव भावें नाचत सुर वैरी ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रिती सिंधुरासुर येऊन अशरीर वाणी लबाड जाली म्हणुन अति संतोषें मदें बोलतो परिसा ।।

(दरु) राग हुशानी ।। आदिताल ।।

धन्य मी झालो भला धरणीवरि ।। प ।।
धन्य मी सकलीं मान्य हीं सुखरीं ।। अन्य नसे सामान्य मजला ।। अ ।।
नखरी हे सुर वैखॅरी गर्भी वैरी ।।
नखाराच्या तीक्ष्ण शिखरीं म्या निवटिल ।। १ ।।
शोणितार्द्ररिपु । शोण मस्तक खंड ।।
शोणभद्रें तखिसोनि झुगारिला ।। २ ।।

सूत्रधार : येणे रिती बोलून सिंधुरासुर निज भटासिसह स्वस्थलासि गेला असतां गौरीसीसह श्रीशिव कैलासा प्रति येतो म्हणून सभासदांस सावध करावयास दौवारिक येतसे पहा.

(दरु) शंकरभरणा ।। ताळमिश्र ।।

दौवारिक येतसे पहा ।। शैवाग्रेसर भूति भासुर हा ।। पा ।।
ताव देत मिशियावरि ।। अ ।। हाती लोकीं बहु जयवंत ।।
हावभावें मान हालवित ।। हातीं घेऊनि रौप्य विलसित वेतह्य ।।
हर्षे गाय तो नाचत नाचत नाचत ।।

येणे रिति दौवारिकानें सभा सावध केल्यानंतर पार्वतीशीं सहित परमेश्वर येतसे पहा.

(दरु) राग व्याडा ।। आदिताळ ।।

सुंदर शिव आला ।। सुदयां बुधि भोळया ।। प ।।
नंदीवरि आनंदी बैसुनि बदि वतनिज मंदिराला ।। अ ।।
बिंबाधर जगदंबा सह शशि बिंबाकित शिर सांबडवरला ।। १ ।।

येणे रीति श्रीशंकर पार्वती समवेत कैलासास येऊन श्रीपार्वतीसीं शुभ गर्भ चिन्ह पाहून कौतुकें बोलतो परिसा.

(द्विपद) पद्म नयने वदत पाढरें विलसे ।।
परम कृश कटि पृथुरु फारसी भासे ।।१।।
उच्चकुच वाढोनि खोंचतां गगनीं सांचली घनकांति साचत वदनी ।।२।।
हरपली ते त्रिवळि हर्ष सांटवला ।।
भारावलें उदर हारहीं त्यजिला ।।३।।

सूत्र : येणे रीती परमेश्वरें दौहृदलक्षणें वर्णितांची लज्जावती पार्वती नम्र मुखी होऊनी मंदहास्य करीत असतां श्रीशंकर डोहाळे पुसतो निरखा ।।

(दरू) भैरवी राग ।। आदिताल ।।

सांग मनिचें साजणी ।। सांग मनिचें ।। प ।।
सांग प्रिय जें सांग पुरविन ।।
माग आवडि मागें सरूं नको भोग सकळहीं ।।
भोगीं देतसें ।। कांग लाजसी चांगले झणि ।।

सूत्र : येणे रीति डोहाळे विचारितांचि लज्यायुक्त ऐश्या पार्वतीचे मंदस्मित वदन पाहून श्रीशंकर पाहून प्रथम गणांसि आज्ञापितांचि त्यानी उत्त त्या द्राक्षें नारीगें कमरकें अनरसें बांदाबेंधारोळे अंबे केळें नारळें तूपकेळें सीताफळें रामफळे जांबळें गुलाबी जांबळें व दूधपेढे घीवर बरफ़ी गुंजा लाडू चुरमा लाडू फेण्या मांडे सोमासे दूध साखर लोणीं इत्यादि पदार्थ आणून ठेवतांचि त्या पदार्थांचा फारसा स्वीकार करण्या विषई मंदावली ऐश्या पार्वतीचें मुख चिन्ह सख्यानीं पाहून लगवगें हस्त लाघव देऊन ये वनिकेंत बोलाऊन नेतांची कीर वाणी सखी.

**वचन** : अगाये प्रमथ गण हो जनन वेळ धरावी धरावी

**सूत्रधार** : ऐसें अति तांतडीनें म्हणतांचि ते प्रथम गण आकाशीं नयन देऊन वेळ पाहते समई उदेजल्या अद्‌भुत तेजा तें पाहून चकित होऊन श्रीशिवास आश्चर्य निवेदितांचि विश्वंभर विनायक रूपें सिध्दि बुध्दिसीं सहित सिंहवाहना रूढ गणपती प्रत्यक्ष येतो निरखा.

(दरु) राग शकरभरणा ।। आदिताल ।।

सिध्दि विनायक येतसे पाहीं ।।
सिध्द गणीं सेवित लवलाहीं ।।प।।
सिध्दि बुध्दि दोघी धरूनिया बाहीं ।।
सिंव्ह वाहना रूढ विलसतेसे महीं ।। अ।।
कोटि सूर्य भासुर श्रुमकांती ।।
कोमलांग च्यारि भुजा विराजती ।।
कोटीरांगदादिक भूषा लख लखिती ।।
कोलाहलें मोदें स्तवितातित सुरतती ।।१।।

**सूत्रधार** : येणे रीती सिध्दि विनायक येतांची परमेश्वर परमानंद भरित होउन त्या निज स्वरूपानें स्तवितसे परिसा.

(दरु) राग आनंद भैरवि ।। आदिताळ ।।

परमानंद तूं आद्यंतरहित ।। परेहूनि परत्या सत्य ।।प।।
चराचरा सजननी तूं तात ।। च्यारि सहानि न कळे अंत ।।अ।।
कोटि सूर्याची कांति उदेली ।। कोण पाहिल भूमंडली ।।
मोटी तपश्चर्या केली ।। मूर्ति डोळां म्या देखिली ।।१।।

**सूत्रधार** : येणे रीती महादेवें स्तविचांचि सिध्दि विनायक स्वानंदे बोलतो परिसा

(द्विपदा) सिंधुराभिध दैत्या सिंधू बळाचा ।।
बंधूकसुम नयन बंधूखळाचा ।।१।।
संतासि जो करी संतापभारी ।।
हंता भल्यांचा अहंता उभारी ।।२।।
मारावया त्यासि माराव पाहूं
भारावळी भूमी भारासि टाळू ।।
आलों तुझा पुत्र जालों पहारे ।।
आलोचना सांडि हे लोक पारे ।।३।।

**सूत्रधार** : येणे रीती सिध्दि विनायकाचे बोलणें ऐकून महेश्वर बोलतो परिसा

(श्लोक) तुझ्या दिव्य तेजासि कोणी न साहे ।।
पिता मी तुझा लौक जाणे कैसा हें ।।
बरीं बाळ रुपासि हे देवराया ।।
करीं बोलणें साचहें देवराया ।।१।।

सूत्रधार : येणे रीती परमेश्वराचे वचन ऐकून सिध्दि विनायक ये वनिकें माजि प्रवेशून बाल पणासि अंगिकारितांचि पार्वती ।। विशिरस्क बाळकातें देखून व्याकुल पणें बोलते परिसा ।।

(दरु) ।। राग कांबोदि ।। आदिताल ।।

अब्जज्याने श्रृजिलें काओी अशिरस्क बाळ अगाओी ।। प ।।
गज मुखा नवसा बाई ।। गणनाथ भक्तांसाओी ।। अ ।।
कैसें जालें शिवशिवा ।। कवणें साधियला दावा ।।
कैसी आवरुं या जीवा ।। केविं कृपा येईल देवा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीती पार्वती करुणा भाकित असतां श्रीपरमेश्वर सर्वज्ञ जालातरि पुत्रमोहें विशिरस्क बाळ पाहून म्लान वदन होऊन मनीं नंदीश्वराचें स्मरण करितांचि शिवबंदी जनग्रेसर नंदिकेश्वर येतसे पहा.

(दरु) ।। गण अठाणा ।। आदिताळ ।।

नंदिकेश्वर येतसे पाहीं ।। मंदी कृतासुर जो भूति देही ।। प ।।
वंदि शिवाचा प्रिय लवलाहीं ।। नंदित सुरगण नाचतसे महीं ।। अ ।।

सूत्रधार : येणे रीती नंदिकेश्वर येऊन साष्टांग प्रणाम करून म्लान वदन ऐश्या श्रीशंकरा प्रति पाहून बोलतो.

वचन : अगाये श्रीशंकरा, तूं सच्चिदानंद स्वरूप कूटस्थ निर्विकार निरंजन निर्विकल्प तुजला विकल्प आलासा भासतो यासि कारण काये ?

श्रीशंकर : अगाये नंदिकेश्वरा पार्वतीस आश्चर्य कर विशिरस्क बाळ निपजलें आहे काय कारण कीं कळेना नंदी.

नंदी : तूं जगत्कर्ता आणि सर्वज्ञ परंतु लोक मोहनार्थ मजला पुसतोस बरें माझ्या बुध्यनुसार सुचला अर्थ निवेदितों.

(दरु) ।। राग परज ।। मिश्रताळ ।।

अष्ट मूर्ति शिपि विष्ट महेशा स्पष्ट मी सांगतो परिसे ।।
कष्ट न मानीं अरिष्ट टळेलचि इष्ट घडे त्या सरिसें ।। प ।।
दुष्ट जिन्ह झणि धृष्ट करावें तुष्ट अम्ही हाइजेसें श्रेष्ट ।।
सुरांत प्रतिष्टित त्याशि विशिष्ट निवेदावें सुरसें ।।

सूत्रधार : येणे रीती नंदीकेश्वरानें बोलतांचि श्रीशंकरानें वानून शिरः कंप करितांचि आज्ञा मानून नंदीश्वर जाऊन इंद्रादि सकल देवतांस हा भाव निवेदितांचि सकल इंद्रादि देव येताति पहा.

(दरु) ।। राग धनासरी ।। आदिताल ।।

इंद्र येतसे पहा ।। ईश्वराचे गेहा ।। प ।।
सांद्र गुणालय हा ।। संगे घेउनि सुर समूहा ।। अ ।।
सजला भूषणीं भला ।। गजराजीं वळघला ।।
गजरेंशीं निघाला निजहिता भुकेला ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रीति इंद्र येऊन सकल देवांशी सह श्री शंकरास साष्टांग प्रणिपात करून उभा राहतांचि श्रीपरमेश्वराच्या भूसंकेतें आज्ञापिजेला ऐसा बसून बोलतो.

**इंद्र.** : अहो आलोचनेस सृष्टिकर्ता चतुरानन आला नाही कीं

**सूत्रधार** : ऐसें म्हणतांच ब्रम्हदेव नारदासीं सह येतो निरखा.

दरु ।। राग पंतुवराळी ।। आदिताल ।।

शारदा पति येतो पहा ।। शारदा भोजविलसितकरहा ।। प ।।
धीर चतुर कोटि सूर्य सम महा ।। नारदादिक मुनिसीं सह ।।
दिव्य कमंडलु आणि अक्षमाळ ।। सव्य करीं शोभती अळुमाळ ।।
नव्य भूषण गणी बहुते जाळ ।। भव्य हंसावरी हर्षो डोळे ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रीति ब्रम्हदेव येऊन इंद्रादि सकल देवी वंदित चरणारविंद होत्साता निजनातें समजूनि श्रीशंकरा प्रति वंदन करून बसतांचि ब्रम्हदेवा प्रति इंद्र बोलतो परिसा.

**(श्लोक)** तूं सृष्टि कर्ता जनि सर्व जाणसी न जाणवे जें अमरीं न माणशी ।।
पाहोत हे देव विचित्र बाळका ।। कथी रहस्या मग विश्व पालका ।। १ ।।
येणे रीति इंद्राचें वचन ऐकून परमेश्वर नंदिकेश्वराकडे पाहतांचि नंदिकेश्वरानें यवनिका सरकऊन देवांस बाल दावितोंचि ब्रम्हदेव.

**वचन** : हा साक्षात्परम पुरुष नारायण विनायक स्वरूपें अवतरला.

**सूत्रधार** : ऐसें म्हणून स्तवितसे निरखा.

**(दरु)** सावेरी राग ।। आदिताल ।।

आदरें पाळी ।। अमुतें या काळीं ।। प ।।
आदि पुरुष अविनाश गणाधिप ।।
अमरविनुत असुराशि पिटाळीं ।। ग ।।
अद्‌भुत महिमा अपारदयाबुधि अभय वटुनि अम्हासीं कवळीं ।।

**सूत्रधार** : येणे रीति ब्रम्हदेवानें स्वविता बाळरूप विनायक संतोष भर भरित होवोनि दिव्य वाणी प्रकटवोनि ब्रम्हदेवाशीं बोलतो.

**(श्लोक)** आधीं पूजुनिया जयाह्य मग तुवां हे सृष्टि केली पहा ।।
तो गा जाण उमेहुनी प्रगटलों मी विश्व संताप हा ।।
जालों वस्य तुला अपार वर ह्येहे घेवोनि हाइ सुखी ।।
सिंधूराशि वधून हव्य सुर हे लाहोत मोदें सखी ।।

**सूत्रधार** : येणे रीति बाळरूपी विनायकांनें दिव्यवाणी प्रकटवोनि बोलतांचि परमेश्वर बाळकाशीं बोलतो परिसा.

**(द्विपदा)** शिर मुख्य वदति जन सर्व कायाशी ।।
साजण्या नादरिशि सांग कां याशी ।। १ ।।
देवजरि म्हणविशी देव रायाशी ।।
दिव्य शिर आदरीं देव रायाशी ।। २ ।।

सूत्रधार : येणे रीति परमेश्वराचे वचन ऐकून ब्रम्ह देवासीं सिध्दि विनायक बोलतो.

वचन : अगाये चतुरानना पुर्वी महादेवानें पर्यळी वनाचे ठाईं गजासुराचें मस्तक हरितांचि तो गजासुर दिव्य देहानें पाऊन माझें मस्तक जग त्पूज्य व्हावें म्हणून प्रार्थितांचि परम दयाकरें श्रीशंकरानें तें शिर पूजोनि ठेविलें आहे तें तुवां जुडवावें

सूत्रधार : ऐसे ब्रम्हदेवाप्रति बालरूप विनायकानें सांगतांचि परम चतुर चतुरानन कुमार नारद आपण सविनय बोलतो परिसा.

(श्लोक) त्वद्दत्तशक्ति सुर सर्वहि देव देवा ।।
आल्या श्रमा हरूनि रक्षसि तूं सदैवा ।।
माया तुझी प्रबळ जाणति हे कशी रे ।।
मायाळु वासुर जना प्रति ना कशीरे ।।

(आर्या) शिर तुझें जुडवाया वांया श्रम होय जाण देवांया ।।
पायां नमितो पायां कायास शिरस्क तूं करीं राया ।। १ ।।

सूत्रधार : येणे रीति नारदानें प्रार्थितांचि श्रीशंकर कर पूजित पूजित नगजासुर शिर-कमळ नाळीं उगवल्या कमलापरीं सरसरत जुडतांत्रि सकल सुरवर संतोष भर भरित होऊन जय जयाकारें गर्जत पुष्पवृष्टि करित असतां परमानंद भर भरित होऊन नारद नाचत गातसे परिसा.

(दरु) ।। राग बिलहरी ।। झंपाताळ ।।

जय जय श्रीविघ्न हरण गजास्या ।।
जय जय स्वानंद दामंद हास्या ।।
जयजयामर वंद्य चरणा सुलास्या ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती स्तवन करून मुनि पुंगव नारद येऊन बृहस्पत्याचार्यास सांगता बृहस्पताचार्य ऋषीगणासीं सह येतात निरखा.

(दरु) ।। राग दर्बार ।। आदिताळ ।।

सुरगुरू येतो पाही ।। सुलक्षणी भव्यदेही ।। प ।।
सरस वक्ता जाणे सर्वहीं ।। परमानंदाशी पाहूमही ।। अ ।।

सूत्रधार : येणे रिती गुरगुरू येऊन श्रीसांबसदाशिवास नमस्कार करून बसतांचि.

नंदी : स्वामी बृहस्पत्याचार्य हो चांगल्या समयेस आलांत श्रीशंकरास पुत्र जन्मला जातक फल सांगावें.

सूत्रधार : बृहस्पत्याचार्य जातक कल्पून बोलतो परिसा ।।

(आर्या) अवतरला कर्कटकीं लग्नी गुरू चंद्र योग उद्धटकी ।।
कविलाभाधिप लाभी होय सुख भूरहायशोलाभी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती जातक सांगून अतिगडबडीनें जातकर्म करून बृहस्पत्याचार्य बोलतो.

(श्लोक) करी दात्याशि धन्या तें इहलोकीं परत्रहीं
देईस धन धान्य तें मीनले ऋषी पात्रहीं ।।

**सूत्रधार** : येणे रिती बृहस्पत्याचार्यांनीं सांगतांचि परमेश्वरानें धन धान्यादिक वाटितांची मग सुरक्षित दहा दिवस क्रमल्यानंतर बार्श्याचे दिवशी बाळ गणपतीशीं घेऊन येते निरखा.

(दरु) ।। सौराष्ट्र राग आदिताळ ।।

बाळंतीण येतसे पार्वती ।। बाळ गजवदन घेऊनियां हातीं ।। प ।।
बालिका त्या संगे विराजती ।। बहुतफाकली जनीं अंगदिप्ती ।। अ ।।

**सूत्रधार** : येणे रिती पार्वती येऊन बाळिराणा पूजिताची नामकर्ण महोत्सवी श्रीशंकर करून बोलतो परिसा.

**(श्लोक)** आत्माचि तूं जाण गजाननारे ।। देहें जगीं भेदचि आननारे ।।
देईन घेई आणि भव्यचंदा बाहोत ऐसे तुज फालचंद्रा ।। १ ।।

**सूत्रधार** : येणे रिती नामकरण महोत्सव जाहलियानंतरे वस्त्रे भूषणें घेऊन ऋषीश्वर स्वाश्रमास जाताच हा समाचार ऐकून पुत्रासी सह पार्वतीस पाहावयाचे हर्षभरें वाण घेऊन ऋषीपत्नी येताति निरखा.

(दरू) ।। असावेरी ।। आदिताळ ।।

वायका येताति पाहीं ।। बाळांतिणीच्या गेहीं ।। प ।।
सायंकाळी लवलाही ।। साऱ्या त्या शुधदेहीं ।। अ ।।
कमलाक्षी बहु सरसा विमला अति मंदहासा ।।
कमले परि सुप्रकाशा ।। कमनीय भूषा वेश्या ।।

**सूत्रधार** : येणेरिती ऋषि पत्नी येऊन बाळ पाहून अति संतोषानें पार्वतीस स्तविताति निरखा.

(दरु) राग कल्याणी ।। आदिताल ।।

फळलें फळलें दैव तूझें ।। फळलें फळलेंग ।। प ।।
टळलें टळलें विघ्नसारें टळलें टळलेंग ।। अ ।।
वळलें वळलें सगुण ब्रम्ह ।। वळलें वळलेंग ।।
कळलें कळलें नीट मनीं हे ।। कळलें कळलेंग ।। १ ।।
आजिचा हा दिवस आम्हा सोन्याचा झाला ।।
अज अविनाश निरंजन गणपति अद्भुत अवतरला ।।
साजतसे बहु दिव्याभरणीं सर्व सुरागला ।।
सजणीं पाहें प्राप्त जाले सकल निधी तुजला ।।

**सूत्रधार** : येणे रिती ऋषि पत्न्यानीं स्तविल्यानंतर सायंकाळी श्रीबाळगणेशास रत्न खचित दिव्य पालखांत पहुडऊन सख्या गाताति परिसा.

(दरु) राग शाहना ।। आदिताल ।।

जो जो जो जो बाळा ।। जोगी सेऊं आला ।। प ।।
सेजेलांवी डोला सिद्धि प्रदा गणपाळा ।। अ ।।
हंसगमा सुरंग ।। हसित मुखी अनुरागें ।।
हौसें गाती सुरागें ।। हालविताति चांग ।। १ ।।

सोन्याचा पाळणा ।। सुरसवरी खेळणा मान्या पाहीं ललना ।।
मानवती तुज सगुणा ।। २ ।।
पाचीचे हे पाट ।। पालणीं लाविलें दाट ।।
पंचरत्नाचे गोट ।। परम स्वोज्वल नीट ।। ३ ।।
झ्यालरी भर्जरी चांदणि बुट्टेदारी ।।
बाळ गणा साजिरी बांधिली पहा कुसरी ।। ४ ।।

**सूत्रधार :** येणे रिती ऋषी पत्न्यानीं अत्यानंदे पाळणा गाउलन वाण घेऊन निजग्रहांप्रती जातांचि कलह निरतां तरंग मुनि पुवंग नारद अति वेगें सिंधुरासुराकडें जाऊन श्रीशिवालई शिरोविहिन होऊन निपजल्या बाळास शंकर प्रजित गजासुर मस्तक अपाप जुडल्यास्तव तेथें भारि महोत्सव चालिला आहे म्हणुन सांगताचि सिंधुरासुर अशरीर वाणीतें स्मरून मनी वचकुन सकोप स्वसैन्य घेऊन युद्धास येताति निरखा.

दरु : ।। राग वृन्दावन सारंगा ।। शापताळ ।।

धेंडा सिंधुर दैत्य येतसे पाहा धेंडा सिंधुर दैत्य ।। प ।।
धेंडाहुनि पापी पेदार स्वारा हातीं ।। अ ।।
भंडाधिपति चंड मुंडा सहित रणीं भांडावयासि गज तुंडासहित हा ।।

**सूत्रधार :** येणे रिती सिंधुरासुर येऊन युद्ध रंगणी सन्नध्त उभा राहून चंडासुराकडे पाहतांचि चंडासुर बोलतो परिसा.

**(आर्या)** जिंकू सुराशि सहजीं जुडले असुरास्य जाण या सहजीं ।।
त्यास्तव बहु मायावी कपटें जुंझेल तेंवि मायावी ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती चंडासुराचे वचन ऐकून सिंधुरासुर बोलतो निरखा ।।

**(श्लोक)** कोलत्याशि जे दवडिले जनिं बाळकानें ।।
तें जिंकिजे तरणि भिक्षुक बाळकानें ।।
पंचास्य तो गज मुखांकित होय जेव्हां ।।
लाहेन मी अपजया प्रति जाण तेव्हां ।। १ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सिंधुरासुराचा अर्भाट ऐकून घाबरिल्या ऐश्या स्वजनाते आश्वासून त्रिविक्रमापरीं निज पराक्रम दाखवायासि विराट रुपी अभिवृद्धी होऊन प्रथम गणाशीं सह सिव्हवाहना रुढ सिद्धी विनायक येतो परिसा.

(दरु) ।। राग तोडी ।। मिश्रताळ ।।

भल्लागणेश भांडु येतसे पाहा ।। प ।।
भाल्ला घेउनि रणीं उल्लासुनि रिपु मल्लाशीं वधूं करि हल्लामहा ।। अ ।।
कल्याणमूर्ति सिव्हीं पल्याण घालुनि बसुनि ।।
हल्यात्मकच्याचापल्या निवटूं हा ।। १ ।।
क्षुल्ला सुराधिपति ढिल्ला जाणुनितभूदट मला वाचवो म्हणति सल्लाम करिती पहा ।। २ ।। सल्लाप करिती सुरडल्लासहित अमचा ।।
किल्ला अला म्हणुनि तिल्लाना गाति महा ।। ३ ।।

**सूत्रधार :** येणे रिती सिद्धी विनायक निज सैन्य सज्जाऊन ठाणमानेंसी उभा राहतांचि सिंधुरासुर बोलतो परिसा.

(श्लोक) रक्षः श्रेष्ट विपक्ष शिक्षण विधीं मी दक्ष हें जाणपां ।।
साक्षा यक्षहि लक्षसान गणिला लक्षी मला कोण वां ।।
वेतंडासुर तुंडमंडित तुझ्या धंडावरि जें वसे ।।
खंडू त्या भुजदंड फुर्फरितसे भांडू त्वरें ये असें ।।

सूत्रधार : येणे रिती मदोध्दत सिंधुरासुरानें बोलतांचि सिद्धी विनायक किंचित हांसून बोलतसे निरखा.

(श्लोक) नवर्षे शरत्कालिचा मेघ जैसा बहु गर्जतो व्यर्थ तूं जाण तैसा ।।
मंदा धारणीं दाखविरे बळा तें ।। क्षणेंशीक्षितो पावशीरे फलातें ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सिद्धी विनायक बोलून निज भटांप्रति अज्ञापितो परिसा.

आर्या : न धरोनि भीड/भांडा अडवे येईल जो तया तोडा ।।
ऐसा करोनि झगडा घ्यारे क्षणांत शत्रुगडा ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती सिद्धी विनायकानें निज भटांस आज्ञापितांचि सिंधुरासुर आपुल्या निज वीरांप्रति आज्ञापितो निरखा.

(आर्या) कमठ कठिण कमठातें ।। करिं कवटाळोनि कनक पृष्ठातें ।।
सण सण सण शर सोडूनि ।। दण दण पाडा रिपूसि पें भिडुनी ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती युद्ध होतसे निरखा

दरु ।। राग पंतुबराळी ।। आदिताळ ।।

सौरसें भिडती ।। नैऋत गणपति ।। प ।।
धीरवीर्य सिंधुर सैन्य सुरहीर ।।
भव्यगण श्रूर सैन्यहीं फार खवळुनी ।।
येर येर संव्हार करूं हुशियार करिती
तरवार झळकविति घोर बहुत आराव करित
बडिवार कथिति शरभार सजुनि भंडमार
करिती शिरऊ चरण परिवार सहित ।।
चबचूर करूनि बहुदूर सांडिती स्थीर
गडुनिसरदार भांडति ।। तीर खोंचतां नीर
मागती चार करूं विचार म्हणुनि संचार करिति
जवजेरतदा कर्बूरतती साचार अम्ही लाचार म्हणति
शिर जोर गणाधिप वीर सर्व जयकारें गर्जती ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारिच्या युद्धरंगी अति लाघवें कडून श्रीगणाधिपानें सिंधुरासुरास पराजय पावविताच सकल देवांनी आकाश मार्गी जय उयकारें गर्जत पुष्पवृष्टी करित असता श्रीगजानन ध्यासमात्रें कडून सिंधुरासुर दिव्य देहातें लाहून अत्यंत स्त्रोत्र करून तेजःपुंज विमानीं वधळून सूर्यमंडल भेदून जातांचि अत्यंत हर्षभरें नारद येतो निरखा.

सूत्रधार : ।। राग आरभि ।। शापताळ ।।

नारद मोदें येतसे पाहीं.

सूत्रधार : येणे रिती नारद येऊन सिद्धि विनायकास प्रार्थितो निरखा.

(श्लोक) भांडोलाहती दैत्य जें तव रणी डोलायमानामरां ।।
त्या डोलां निरखोनि जाणुनि मनिं डोलांशि दुष्टांशरां ।।
भाला घेउनियां तुवां निवटिलें भालाक्षपुत्रा क्षणें भालाहूं
स्तवितो सुरें सुर सांभाळा यया कारणें ।। १ ।।

(श्लोक) तुला विजय हो भला जयजय प्रसन्नानना कळानिधि
जगीं दुजा तुजविना दिसे अजा ना ।।
सुधा वचन देऊनि वसन भूषणें हे महीं ।।
बुधास परिपालुनि यश अपार घेईमहीं ।। १ ।।

सूत्रधार : येणे रिती नारदानें स्तवितांचि सिद्धि विनायक सकळ जनाचि मनोरत सिद्धि करून अनेक वरांते देऊन सपरिवार नित्यानंद मंदिरास येतसे निरखा ।।

दरु : राग गौरी ।। आदिताळ ।।

नित्यानंद मंदिराशि निरूपम सुखराशी ।। प ।।
सत्य ज्ञान समुद्र विलासी ।। सहजिच आला पाहें हींसी ।। अ ।।

सूत्रधार : या परीं या दिव्य प्रबंधाचा निर्माता हीं.

(श्लोक) दरिद्रय सिंधुर वधोनि लोकीं ।। बुधां समस्तां सुखवि विलोकीं ।।
श्रीमत्प्रसन्नानन देव देव ।। सिव्हासनीं शोभतसे सदैव ।। १ ।।
श्रीमद्रभोसल वंशवारिधि भव प्रख्यात जो चंद्रमा ।।
चंद्रोत्तंस कृपा कटाक्ष लहरी ज्या लाभली सांद्रमा ।।
ज्ञातृत्वें जनका परींच जगती पाळी महाराज तो ।।
ऐसा श्रीतुलजेंद्र नंदन विभू सिव्हासनीं राजतो ।।

सूत्रधार : ऐसा नवरसज्ञ शिखामणी राज राजाग्रणी चोळदेश धणी श्रीशरभेंद्र महाराज तयाचे संन्निधानीं सकल सकल बुधवर निकर करूणा पात्र ऐसा रंगनाथ कवी अत्यंत हर्षभरें आशीर्वाद करितो निरखा.

(श्लोक) कल्पोनी सुरसें गणेश विजयाभिख्या भल्या नाटका ।।
मोदें पंडित पामरा सुखविशी ज्ञाता भला नेटका ।।
शौर्ये दक्षिणा सागरादि हिमवत्पर्यंत राजाग्रणी ।।
केला दिग्जय पुत्र पौत्र सह तूं पाळीं सुखें मेदिनी ।। १ ।।
वर्षोत काळीं बहु मेघ राजी ।। होवो सदांसस्यवती धराजी ।।
असो तुला लोक समस्तराजी होवोत कल्याण परंपराजी ।। १ ।।

**इतिश्रीमद्भोसल कुल कलशोदधि जनित कळानिधि श्रीचंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिव्हासन संपत्संतति सुविराज मान सार्व भौम महाराज छत्रपती भूलोक देवेंद्र श्रीशरभेंद्र भूपाल विरचिते श्रीगणश विजयाभिधान नाटके द्वितियोकः ।।**

हायने चित्र भान्वाख्ये भाद्रेमासि सिते तरे ।।
पक्षेतिथौच सप्त म्यां वासरे रवि जन्मनः ।।
श्रीमच्छरभ भूपाल तुष्ट येद्वच्युते नतु ।।
लिखितं पुस्तक मिद शोधितंच यथामति ।। २ ।।

# ५. मोहिनीमहेशपरिणय नाटक*

## (श्रीशरभेन्द्र विरचित)

जय शैलजारमण जय कद्रुजाभरण।
जय विद्रुतावरण जय जगत्कारण॥
जय विमल निजचरण जय श्रितावळी भरण।
जय गजासुर हरण जय दीनशरण॥ १॥
जय मेरुकोदंड जय दनुजरिपुकांड।
जय जनितजगदंड जय नटनचंड॥
जय पृथुलभुजदंड जय निगमततिकांड।
जय बद्धशशिखंड जय शिवोद्दंड॥ २॥
जय नतामरवृंद जय भक्तमकरंद।
जय जगत्ततिकंद जय धीमुकुंद॥
जय रदायतकुंद जय मुक्तमुचुकुंद।
जय शरीरमुकुंद जय चिदानंद॥ ३॥

[ पाडी राग अटताळ ]

शरणु शरणु गिरीन्द्रजायुत शरणु निर्जरसन्नुत।
शरणु तूं शशिशेखरामृत शरणु नन्दिनिषेवित॥ १॥
शरणु निजजनरक्षणोद्यत शरणु दक्ष जयावृत।
शरणु शिक्षितदक्ष दीक्षित शरणु दक्षिण वीक्षित॥ २॥
शरणु दीपित सूनकार्मुक शरणु गिरिजा कामुक।
शरणु करधृतविष्णुसायक शरणु दैवतनायक॥ ३॥

[ शहना राग आदिताळ ]

चन्द्रमौळीश्वराय जयमंगळं।
सुरसचन्द्रसुभगाय शुभमंगळं॥ श्रीचन्द्र॥
ललितकुंडलीवररचित सुकुंडलाय।
ललनादृतसुरूपाय जयमंगळं॥
चलितांकमृगांकसम्मिताननाय।
मुनिजनसुलभदिव्यशरीराय शुभमंगळं॥ १॥ श्रीचन्द्र॥
चर्वितवारणदंभचर्मवस्त्रावृताय।
शर्वरीशशिशिराय जयमंगळं॥
शर्वाणीशसुंदराय शरण्याय शोभितांग।
सर्ववेद्यस्वरूपाय जयमंगळं॥ २॥ श्रीचन्द्र॥

*Ms. No. D. 1731 Marathi Section T. M. S. S. M. Library.

**सूत्रधार :** एणेंरीति नाटचारंभ झाल्यानंतर सूत्रधार रंगभूमींत सुकविविरचित मोहिनीमहेश परिणयाभिधान नूतन नाटक प्रयोगें सभासदांस मनोरंजन करावया कारणें इष्टदेवता प्रार्थना करितो निरखा.

जो गौरीमुखपद्मबालतरणी जो सर्वदेवाग्रणी।
जो विघ्नौघतरंगमालितरणी बालेन्दुचूडामणी ।।
तैसा श्रीगणनाथदैवतमणी सद्भक्तचिन्तामणी।
रक्षोसन्ततभूषणीकृतफणी स्तम्बेरमग्रामणी ।। १ ।।

**सूत्रधार :** यापरीं गणेश प्रार्थना केल्यानंतर शारदा प्रार्थना करितो निरखा.

जियेची तनू सर्व सौभाग्यखाणी। जियेच्या कटाक्षें स्फुरे मंजुवाणी।
सदा शारदापद्मसंशोभिपाणी। जिभेमाजि नाचोत श्रीब्रह्मराणी ।। २ ।।

**सूत्रधार :** यापरीं शारदा प्रार्थना केल्यानंतर श्रीगुरु प्रार्थना करितो निरखा.

सदा सद्गुरू वंदितों सौख्यसिन्धू। जगामाजि जो संचरे दीनबन्धू।
हरी चिन्तितां तो कृपें अन्तराया अनादि स्वयें मी भवाब्धीतराया ।। ३ ।।

**सूत्रधार :** यापरीं सद्रु प्रार्थना केल्यानंतर परमेश्वरची प्रार्थना करितो निरखा.

कामारि होऊनि असे परिपूर्णकामें। प्रख्यात सौम्यतरिं विश्रुतभीमनामें।
जो सृष्टिरक्षणलयप्रथित स्वकेळी। रक्षो सदात्मकुलदैवत चन्द्रमौळी ।। ४ ।।

**सूत्रधार :** एणेंरीती महादेवाची प्रार्थना केल्यानंतर नाटकार्थ संग्रह नांदीश्लोक वदतो निरखा.

जगन्मोहिनी शक्ति ज्याची गुणाची। जिच्या आश्रयें कल्पना हे जगाची।
करी देव पहा चिदानन्दरूपा। प्रशास्ताहि दे सौख्य लोकां अमूपा ।। ५ ।।
(हे अष्टादशपदानांदी)

**सूत्रधार :** यापरीं नाटकार्थसंग्रहश्लोक म्हणालियानंतर गणपती प्रार्थना केली असतां गणेश प्रत्यक्ष येतो म्हणून सभ्यास सावध करायास दौव्वारिक येतो निरखा.

(दरु---तोडी राग---अटताळ छापु)

दौव्वारिक येतो पहा। केवारी जो सकळांसि हा ।। ।। प ।।
हांसत हांसत देखा। हांसवीत लोकां हा हा ।। ।। अ ।।
भूती लाऊनियां आंगी भूतापरीं नाचे रंगी।
धृतरुद्राक्ष सुभाङ्गी। भ्रांतक्रूरतरापांगी ।। १ ।।
शिव शिव वाचे बोले तंवे सौख्य भरें डोले।
भव भक्तीं अनुकूलें भावें शिवपद पूजिलें ।। २ ।।

**सूत्रधार :** यापरीं दौव्वारिकानें सभ्यांस सावध केल्यानंतर गणेश प्रत्यक्ष येतो निरखा.

(दरू---वृंदावनसारंगा राग---आदिताळ)

गणनाथ आला आतां मुख्यकीं येथें
सिन्दुरशोभित अमित ।।
उन्दिरवाहन सुन्दर जो मनो-
नन्दक आनन्द घनत ।।१।।

गंडविभूषित कुंडलभावित-
खंडशुभाकर चंड ।। २ ।।
स्पंदत सोंडहीं सिंधुरापरी मद-
बंधुर गंड युगळ ।। ३ ।।

**सूत्रधार :** (यापरीं एकदंत येऊन सकलविघ्न निरसिल्यानंतर सूत्रधार येऊन चहूंकडें पाहून) अहो ! सिद्ध आहे रंगमंगळविधी तैंसेंच येथें.

अतिमनोज्ञ कुशीलव हे बरें
सलयमद्दळ वाजविती करें ।
सुरसवेणु निनादहिं संभवें
रसिकमानस तेथचि तें भवें ।। ६ ।।

(हे रंग प्रसादन)

**सूत्रधार :** (नेपथ्यास अभिमुख पाहून) । अरे पारिपार्श्वका ! (पारिपार्श्वक प्रवेशून बोलतो)

**पारिपार्श्वक :** जी मी सिद्ध आहें. आज्ञा करावी.

**सूत्रधार :** अगाये पारिपार्श्वका मी आज्ञापिजेतों.

**पारिपार्श्वक :** कोणाकडून ?

**सूत्रधार :** सभ्यांकडून.

**पारिपार्श्वक :** कोणते सभासद ?

**सूत्रधार :** येथें श्रीबृहदीश्वराचा वसन्तोत्सव पहावया कारणें चतुःषष्टिकलाप्रवीण साहितीधुरीण तौर्यत्रिकप्रवर्तन चणविचक्षण मिळाले आहेत ते कैसे म्हणालियां.

द्विजाधीश द्वेषा त्यजुनि बुध हे साच बरवे ।
कवी ऐसी आख्या सुरहित करायांसि मिरवे ।।
शिवातें सेवीती सतत हीं तरीं दक्ष सुमनें ।
तया संतां भावें करिन सकळां आजि नमनें ।। ७ ।।

**सूत्रधार :** हा अलभ्य योग मिळाला आहे, त्यास्तव या सभेस उचित मोहिनीमहेश-परिणयाभिधान अभिनव नाटक नाचऊन यांचे हृदयरंजन करावया इच्छितो.

**पारिपार्श्वक :** कोण या दिव्यग्रंथाचा निर्माता ?

**सूत्रधार :** अगाये पारिपार्श्वका ! तां ऐकिलें नाही काय या कलियुगीं प्रख्यात भोसलवंश ज्यास विद्वांस ऐसें वर्णिता आहेत.

जयति जगति गेयः सत्कवीन्द्रैरुपेयः
कृतिभिरनुपमेयः केनचिच्चाप्रमेयः
निखिलगुणनिकायः प्राप्तसामाद्युपायः
परिहृतसदपायो भोसलीयान्ववायः ।। ८ ।।

सूत्रधार : त्याची परंपराहीं कांहीं सांगतो ऐक.

शंभू येकोजि तैसा शरभनृप महासेन विख्यात शैव
प्राज्ञाधार प्रसिद्धैकशिवनरपती रामचन्द्राख्य राव ।
तैसा श्रीभीमयेकक्षितिपतिहिं भला विश्रुत श्रीवराह
ख्यातैकोजी तसा तो परशु महिपती ब्रह्मनामा निरीह ॥ ९ ॥

शाहू अंबाजि तैसा परशुनरपती वीरबाबा महीप
श्री माळोजीहिं शाहुनृपति तदुदरी जात संभाजिभूप ।
तद्भ्राता शिवाजी त्रिभुवन विदित ख्याति पाता द्विजेश
येकोजी तो तयाचा अनुज नरपती रक्षिजो चोळदेश ॥ १०॥

तत्सूनु तुकोजि तदीय पुत्र प्रतापसिंहांभिध साधुमित्र
तदात्मज श्रीतुळजेंद्रभूप प्रसिद्धकीर्तिप्रथितप्रताप ॥ ११ ॥

सूत्रधार : अगाये पारिपार्श्वका बाबाजीराजाचे ज्येष्ठपुत्र मालोजीराजापासून सहावे पुरुष तुळजा महाराजांनी त्या बाबाजीराजाचे कनिष्ठ पुत्र विठोजीराजापासून आठवे पुरुष शरभोजी महाराजांस पुत्रस्वीकार केला तेहिं परंपरा सांगतो ऐक.

बाबाजीचा कनिष्टात्मज बहुत भलातो विठोजी तयाचा
पुत्र श्रीत्र्यंबकाख्य क्षितिपतदुदरी जात गंगाजि याचा ।
बुव्वोजी तोक त्याचा सुत सुमति ततीशान गंगाजि राजा
सूनु त्याचा सुभानुनृपति रिझविजो सर्वदा सत्समाजा ॥ १२ ॥

सुभानूचा पुत्र प्रथित सुयशा शाहनृपती
तयाचा सूनु तें तुळजपृथिवीपाल सुमती ।
सुखें स्वीकारोनी शरभम्हणुनी नाम करुनी
तयातें तो स्थापी मग निजपदीं फार रिझुनी ॥ १३ ॥

सूत्रधार : त्या शरभोजीराजाचे गुणगण अपारतरीं कांहि सांगतों ऐक.

करीं जितसुरद्रुजो शुचिधरी विभूती बरी
गिरीशचरणाम्बुजार्चनकरी सदा अन्तरी ।
धुरीणशरभेन्द्रतो नुत सुरीं सुधी केसरी
करीशगतिभाषणें जितसरीं नृपाग्रेसरी ॥ १४ ॥

तो शरभाधिपसैंदपौत्रक या नाटकास निर्माता ।
जो कीं भासुर भूसुर कविजन सन्मण्डलीस सन्माता ॥ १५ ॥

सूत्रधार : (चहूंकडे पाहून) अगाये पारिपार्श्वका कामिनीजन मनोहर हा ! वसंतकाळ प्रादुर्भवला.

विकसितरसाल (मधुतें) मधुकर पिऊनी प्रमत्त तद्गुण निकरें ।
गाती आनंदभरें जेकीं कामातुरांस बहुमोह करें ॥ १६ ॥

सूत्रधार : (हे भारतीवृत्ति प्रस्तावनांग)

सूत्रधार : हे काय अतिशय जितकाम ऐसा महादेवहीं मोहिनीस भुलत झाल. (नेपथ्यामध्यें) अहा कोणरे अमचे स्वामीचें मर्म प्रकट करणार ।।

सूत्रधार : अगाये पारिपार्श्वका, माझें वचन ऐकून शुद्ध शिवगणोत्तम नन्दिषेण आलासा दिसतो; त्यास्तव आम्ही हीं अनंतर करावयाचे कामास सिद्ध होऊं म्हणून ते दोघेंही गेल्यानंतर तो नंदिषेण येतो निरखा ।।

[ दरु : नाटकुरंजि राग—आदिताळ ]

नन्दिषेण येतो पहा—
नन्दनीय सुचरित हा ।। ।। पल्लवि ।।
वन्दनीय महादेव—
वन्दिती हे ज्यातें भावें ।। ।। अनुपल्लवि ।।
करीं धरीं कनकवेत्र—
कटींधृत हेमसूत्र ।
करिदन्तनिभगात्र—
करी सौख्य साधुमित्र ।।१।।

सूत्रधार : यापरी नंदिषेण येऊन साटोपफिरून चहूकडें पाहून अरे कोण हा जंघाल मारुत मैनाकापरी येतो म्हणून व्याहळून पाहून अहो ! आम्ही यत्न केला त्या कामास शकुन व्हावया कारणें गरुड येतोकीं काय म्हणतांच गरुड येतो निरखा.

[ दरु : पन्तुवराळि राग—आदिताळ ]

एतो पहा पक्षिराज ।। एतो ।। ।। पल्लवि ।।
कनकगिरि समपक्ष—
कविधूनितविपक्ष ।
कनकसूनप्रियपक्ष—
काद्रवेयकृतशिक्ष ।। एतो ।। १ ।।
निगमजाचें निजरूप—
निरुपमधृत भूप ।
न गिळिजो द्विजो अनुप—
नियत वासास कलाप ।। एतो ।। २ ।।

सूत्रधार : यापरी गरुड आल्यानंतर नंदिषेण आपआपणांत बोलतो निरखा.
ज्याची कृपामोह निवृत्तिहेतू
जो सर्वदेवेश वृषेन्द्र केतू ।
त्या देवदेवासहि मोहवीते
कोठें असे कीं न कळे कशीते ।। १७ ।।

सूत्रधार : (हे बीजन्यास उपक्षेप मुख संध्यंग)

सूत्रधार : (फिरून पाहून) अहो ! खगपति हो अम्हाकडेंच येतोसा दिसतो.

गरुड : (गरुडनिकट येऊन) शिवगणसार्वभौम ! नन्दिषेण ! प्रणाम करितों मी.

नंदीषेण : सुखी ऐस !

गरुड : शिवगणोत्तमा नन्दिषेण कां
वनतळा प्रती पावलासि कां ।
खगपमोहिनी मोहितें शिवें
मज नियोजिलें मोहिनी स्तवें ।। १ ।।

नंदिषेण : खगकुलेश्वरा येथें कासया
विरचितागती बोलगारया ।
भुलुनिया हरा दारुकावनी
मजहि पाठवी तेथें मोहिनी ।। ३ ।।

सूत्रधार : (हे बीजबहुकरणपरिकरमुखांग) यापरी अन्योन्यप्रेमानुबन्ध आहे, त्यास्तव प्रस्तुत कार्यसिद्धी ऐसी करावी म्हणून परस्पर येकांत बोलत असतां नेपथ्यामध्यें पैंजणचा झणत्कार ऐकतां येथें असणें युक्त नव्हें चालिले वर्तमान स्वामीस सांगू म्हणून ते दोघेंहि गेल्यानंतर मोहिनीनें खगपतीचें वर्तमान शीघ्र-कळावयासाटीं प्रेषित तीर्चे. सखी विष्णुमाया येते निरखा ।।

[ दरु : शंकराभरण राग—आदिताळ ]

विष्णुमाया येते—विख्यात जगीं ।। ।। पल्लवि ।।
कृष्णसारशिशुनेत्री—जिष्णुमुखसुरसावित्री ।। अ ।। ।। विष्णु ।।
श्रृङगा रसखाणी—भृंगाळिसमवेणी ।
मंगळगुणश्रेणी—अंगनापृथुश्रोणी ।। ।। विष्णु ।। १ ।।

सूत्रधार : एणेरीती विष्णुमाया येऊन वनवर्णन करिते निरखा.

[ दरु : केदारगौळ राग—अटताळ ]

विश्रांतिकर हे वनें अवनी माजी
मिश्रित मृदुपवने ।।
अश्रांत मधुकर अमितध्वनि निकरे
आश्रित कमलाकर येथें अपार ।। अ ।। ।। विश्रांती ।।
कूजति मधुरपिक ते मग अनु
योजति हेहि शुक । भूज अनेक प्रसून भरें आतां-
राजती हे लताराजीसी संयुता ।। ।। विश्रांति ।। १ ।।

सूत्रधार : (हे युक्तिअंग) या प्रकारे विष्णुमाया वनवर्णन करीत असतां गरुडानें सांगीतले तें वर्तमान ऐकून मोहिनी येते निरखा. (हें उद्भेद अंग)

[ दरु : अठाण राग—आदिताळ ]

मोहिनी ते पातली अतिचांगली-
त्या वनामाजी महेशि जे रतली ।। ।। पल्लवि ।।

नाहिं कांहिं उपमा तीची
पाहतां श्रृंगाराची ।। ।। अनुपल्लवि ।।
अतसी सूनसदृशदेहीं
अरुणाधर विद्रुमाहीं ।
अतसी या जगीं नाहीं
अवतार रसाचाहीं ।।
अतनूची निजजननी
अवध्यास हे मोहिनी ।
अतनु सुन्दरस्तनी
अति पृथुतर श्रोणी ।। १ ।।
ललितांगी जलजपाणी
विलसिते सखि जनी ।
ललनामणी गुणखाणी
लावण्य श्रेणी ।।
झळकते तारागणी
ज्वलितस्वरूपिणी ।
अलिवेणी हे रोहिणीं
जलजाची म्हणुनी वानी ।। २ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती मोहिनी येऊन विरह सोसवेनासारिखें बोलतें निरखा.

शिवशिव विरहची यातना जेंवि मोटी
प्रबळ सजणि तेंवीं मन्मथाची हिं धाटी ।
कधि हिमकरलेखा रम्यकोटीरकोटी
विधुमुखि मजसाटीं येऊनी दे स्वभेटी ।। १८ ।।

[ दरु : घण्टाराग—आदिताळ ]

शतकोटिमाराकृती
शशिचूड तो ।। पल्लवि ।।
शतपत्रनेत्री कोठें
सजणी तूं समज आतां ।। अनुपल्लवि ।।
निजप्राणपती वीणें
निजराजती येयिना ।
द्विजराजता विकिरणें
मज कारणें ।।
गुज हेचि मनी म्हणूनी जाण
भुजगासा जगत्प्राण ।
द्विज हेंहीं पाहीं रमण
भजती आनन शरण ।। १ ।।

कुटिलदुर्लिपि झालें
जटिल हें माझें भाल !
निटिलाक्ष नाहीं आला
चटुलाक्षी कां बोल ।।
कनकांगी करूं काय
मनसिज वेधी माये
वनजशर निकाये
वनामाजी पाहीं सये ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती महेश विरहानें विपिनामाजी मोहिनी येऊन कष्टी होत असतां नंदिषेणानें येकांती संकेत वर्तमान सांगीतलें तें ऐकून ससम्भ्रम परमेश्वर येतो म्हणून मोहिनीस कळाया कारणें नंदिकेश्वर येतो निरखा.

(दरु : भैरवि राग—आदिताळ)

नन्दीश येतो महा—
सकळदेव वंदिती ज्यासी पहा ।। ।। ध्रु ।।
पाळी जो शिवगणासी—
भाळी भूती भासे ज्यासी ।
बालचन्द्रयुत केशीं—
फालनेत्र प्रेमराशी ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती नंदिकेश्वर आल्यानंतर महादेव येतो निरखा.

(दरु : नायकी राग—आदिताळ)

चंद्रमौळीश्वर येतसे पहा
सान्द्रकृपानिधि हा ।। ।। ध्रु ।।
तन्द्रारहितसुरेंद्रादिवन्दित
मन्द्रनिनादडमरुकशोभित ।। १ ।।
फाललोचनपाळी जो सुरगण
कालकालप्रबलोरगभूषण ।
शूलविधारणशील विविधगुण—
शाली निजजन विशाल भयहरण ।। २ ।।

सूत्रधार : या प्रकारें परमेश्वरने आला म्हणन विष्णुमायेने मोहिनीस सांगतां मोहिनीस विलास सम्भ्रम परवशें वृक्षान्तरींत होऊन पाहत असतां परमेश्वर बोलतो निरखा.

सदा मानसीं मोहिनी गुंतलीते
तरी लोचना तेचि भेटी न देते ।
करूं काय मी कांहि आतां सुचेना
कशा माजिहीं चित्त माझें रुचेना ।। १९ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती चपलचित्त महादेव विरहवेदना सोसवेनासारिखें बोलतो निरखा.

(दरु : मांजि राग—आदिताळ)

मोहिनीं ते न दिसे तत्वतां ।। ध्रु ।।
कामरूपिणी ते कां मज बाधिते
प्रेमळ माझें मन करूनी ।। १ ।।

खन्तिभारी होते सन्तत मानसी
चिन्तितां तीचें रूप तें सुन्दर ।। २ ।।

इन्दुहि ताविती चन्द्रहि पोळतो
कुन्दरदना करिते नादर ।। ३ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती परमेश्वर विरहवेदनाभरें कष्टी होत असतां नंदिषेण येऊन या विपिनांत पूर्वसंकेताप्रमाणें मोहिनी आली असावी त्यास्तव चहूंकडें पाहून हुडकावें म्हणतांच परमेश्वर सशिर:कम्प अनुज्ञा देता झाला. (हें समाधान सांगा) मग परमेश्वर नंदिकेश्वराप्रति अम्हींहि हुडकायास आरंभ करितों म्हणून यत्न करीत असतां नेपथ्यामध्यें वेदघोष ऐकतां परमेश्वर नंदिकेश्वराप्रति कोणाचा आश्रमकीं हां दिसतो यास्तव आम्ही येथें असलियां कोणतरी पाहतील म्हणून मोहिनीस हुडकावयास निघाले. (आरम्भबीजसंयोगसांगमुखसन्धि) नेपथ्यामध्ये माध्यान्हिककाळ झाला तैसाच.

सावली तरुतळास पावते
श्रांतप्रान्थ निकरापरीहि ते ।
शत्यजेवीं दड ते जलान्तरीं
मत्स्य तेंवि अवघे बरोबरी ।। २० ।।

**सूत्रधार** : ऐसें माध्यानिक काळवर्णना ऐकून (निष्क्रान्ता: सर्वे).

इति श्रीभोंसलकुलकलशजलनिधिकौस्तुभ श्रीचन्द्रमौलीश्वरप्रसादलब्ध चोळ-सिंहासन सबिरुद चतुरंगसैन्यजितसार्वभौम महाराजछत्रपतिनामधेय कर्णाट-वसुन्धराधिपधुरंधर तुळजोर्वीश तनुज श्रीशरभोजीभूसुत्रामविरचित मोहिनी-महेशपरिणयनाटके प्रथमोऽङ्कः ।।

श्रीशारदम्बायै नमः ।।

---

## द्वितीयोऽङ्कः ।

सूत्रधार : तदनंतर भूलोकामाजि चालिलें वर्तमान कळायासाठी नारदें प्रेषित ऐसा पर्वतऋषी येतो निरखा.

(दरु—आनंदभैरवि राग—आदिताळ)

एतो जी पर्वत हा—
ज्ञाता जो खर्व महा ।। ।। ध्रु ।।
गाता हो सर्वगुणास—
आतां तो आला पहा ।। १ ।।
घटिताजिन कटीतटी—
पटुबरवा मुनीजटी ।
झडिती येतसे घटी
नटतो ह्मणत धूर्जटी ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती पर्वतऋषी येऊन चहूंकडें पाहून अहो शांतिरसप्रधान हें तपोवन !

हरिणश्रृङ्गतळीं हरि खाजवी
वदनतोंहि मुखस्थिर दाखवी ।
उरगमुंगुसयुग्म परस्परें
ससुख खेळति उन्दिर मांजरें ।। २१ ।।

सूत्रधार : कान देऊन ऐकून कोणकीं या तपोवनीं बोलल्यासारिखें दिसतों. फिरून पाहून अहो ! आश्चर्य शुकमिथून बोलतें काय यांचे वचनमाधुर्य देवलोकाचें हें बरें तें ऐकूं म्हणून लापून असून ऐकतां शुक बोलतो निरखा.

महादेव तो सिद्धसंकल्प झाला
तरी मोहिनी दर्शनाला भुकेला ।
(हे बिन्दु)
अवो भामिनी कंठचा मी कराची
जसी प्राप्ति तशीच हे मोहिनीची ।। २२ ।।

(परिसर्पांग) शुकीवाक्य ।। अगाये प्राणनाथा ! मोहतसाचकी प्रबल । जेंणें जितमन्थन महादेवहि मोहिनीचे ठाईं भुलला । (हे प्रगमांग)

शुक : अवो ये प्रणयिनी स्त्रीबुद्धिनें महादेव भुलला म्हणून म्हणतेस हा मोटा अपराध कीं.

शुकी : तरी काय म्हणावें ?

शुक : लीलाचि हे एक परमेश्वराची ।।
(हे पुष्पांग)

शुकी : लीलावदें कां जितमन्मथाची
ऐसी महामोहिनि दानसाची ।

**शुक** : लोकोपकारास्तव देवदेवें,
केळी असी हे रचिली प्रभावें ।। २३ ।।
(हे उपन्यासांग)

**सूत्रधार** : एणेंरीती पर्वतशुकमिथुनाचें बोलणें लपून ऐकतां याला पाहून शुकमिथुन गगनमार्गी उडतां पर्वत साश्चर्यसम्भ्रम फिरून पाहून कोण हा विप्रवटु समित्पत्रपुष्पफलादिक घेऊन सत्वरें येतो त्याहळून पाहून अरे हा गौतमाचा शिष्य शैब्य अम्हाकडें येतो म्हणत असतां तो शैब्य येतो निरखा.

(दरु—शुद्धसावेरि—आदिताळ)

आला शैब्य पहा सत्वर हा ।। ।। आला ।।
शिष्य गौतमाचा शिष्ट जनाग्रणी
प्रेष्य मुनीस जो प्रेमळ शिवगुणी ।। १ ।।

**सूत्रधार** : एणेंरीति शैब्य येऊन पर्वतऋषीस पाहून आर्या! प्रणामकरितों म्हणतांच पर्वत आशीर्वाद करून शैब्याप्रति बोलतो निरखा.
अरे शैब्यका क्षेमकीं गौतमासी
सती माझिया सांग? तूं त्या मुनीसी ।

**सूत्रधार** : एणेंरीती पर्वताचें वचन ऐकून शैब्य बोलतों निरखा.
स्वयें येउनी दर्शना आश्रमातें
करीं तुष्टचेता तया गौतमातें ।। २४ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती शैब्याचें वचन ऐकून पर्वत बोलतो निरखा ।।
आश्चर्यकारक विलोकित वर्तमान
प्रस्थानबाण सदना प्रति पैं करून ।
सांगूनि तें सरसिजासन सम्भवासि
येतों पुन्हा झडकरी मुनिदर्शनासि ।। २५ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती पर्वत बोलून पाताळाप्रति गेल्यानंतर शैब्यही यथागत शिवपूजा सामग्री आश्रमास नेऊन सिद्धि केल्यानंतर गौतम पूजा करायास येतो निरखा.

(दरु—कांबोदि राग—आदिताळ)

एतो गौतम मनीं ईशा चिंतूनी ।। ।। पल्लवि ।।
ख्यात जगामाजि केवळ ।
भूतनाथ सेवाविलोल ।। ।। अनुपल्लवि ।।
भसिताची जो लावी ऊटी—
भासुररुद्राक्ष सज्जटी ।
लसितविनतदम्बोळिकर हा—
हसित रुचिर मुखपंकज पहा ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती गौतम येऊन अहल्येस चिंतितां अहल्या येते निरखा.

(दरु—पूर्वीकल्याणी राग—आदिताळ)

एते अहल्या हे बहुकल्या ॥ ध्रु ॥
शांतिरसावतारिणी कांतोपचारकारिणी ।
क्षांति माजी धरणी-स्वांती भावी रुद्राणी ॥ १ ॥

सूत्रधार : एणेंरीती अहल्या आल्यानंतरें तीप्रति पाहून गौतम बोलतो निरखा.
सुदति पार्वतीनायका करीं ।
सरस पायसान्नादि लौकरीं ॥ २ ॥

अहल्या : मुनिवरा गिरीशार्चनांत मी ।
सतत उद्यता ठाकुनी भ्रमी ॥ ३ ॥

सूत्रधार : यापरीं अहल्या बोलून सकल शिश्रूषा करीत असतां गौतम सांग शिवपूजा करून शिवाचें स्तोत्र करितो निरखा.
उडुपमकुटमोहा पारवारा कराचा
उडुपनिरुपमाना मान जो पार्वतीचा ।
पति विनतजना जो तारितो सर्वकाळीं
सततहि मज रक्षो तो कृपे चंद्रमौळी ॥ २६ ॥

सूत्रधार : एणेंरीती महादेवाचें स्तोत्र करून आनन्दानें नर्तन करितो निरखा.
समस्तदेवसन्नुता दयानिधी सदाशिवा
मुनीश पावती तु तें भजूनियां सदाशिवा ।
प्रशस्तमस्तनिस्तुलप्रनृत्तजान्हवी कळा
सुभुक्तिमुक्ति दे मला प्रबोधरूप सत्कला ॥ २७ ॥

सूत्रधार : एणेंरीती गौतम नर्तन करीत असतां नेपथ्यामध्यें वीणारव ऐकून शैव्यास विचारितां तो पर्वतानें सांगिजेलें वर्तमान सांगत असतां नारद येतो निरखा.

दरु—आरभि राग—आदिताळ)

देवदेव कृतकौतुक चिंतूनी—
देवतापस येतो ॥ ध्रु ॥
गावयासि करीं भासुर महती—
घेउनि वीणा नारद मुनि तो ॥ १ ॥
ग्राममूर्छनातान बरोबरी—
गान करी हरनामा ।
वामदेव पद भक्तपरीं वर्तमान—
सकलसद्‌गुणगणधामा ॥ २ ॥

सूत्रधार : या प्रकारें नारद आल्यानंतर गौतमऋषी अर्घ्यपाद्यादिकें उपचार करून कुशल प्रश्न करितो निरखा.
विमल नारदा क्षेमकीं बरा ।
कमलजापतीप्राणकिंकरा ॥

वद कशासितां प्राप्त हें वनें।
स्पदरेणुनें जात पावनें ।।

सूत्रधार : एणेंरीती गौतमाचें वचन ऐकून नारद प्रत्युत्तर देतो निरखा.
बाणालयीं करूनि भोजन योगिराया
आलों तु तेंच निरखूं झणि आश्रमाया।
प्रल्हादबाणबलितो वृषपर्वनामा
येती कवीहि सदना तव पूर्णकामा ।। २८ ।।

सूत्रधार : एणेंरीती नारदगौतम दोहें हिं संवाद करीत असतां प्रल्हाद येतो निरखा.
(दरु : श्रीराग—आदिताळ)
प्रल्हाद भाविकेंद्र महा-
प्रख्यात पहा ।। ध्रु ।।
स्यन्दनान्तरीं बसूनी
सन्तत हरिनाम चिन्तुनी।
नन्दकधर हृन्ननन्दकचरिता
नन्दनिधी हिरण्यनन्दना ।। १ ।।
सुरारातिकुलाग्रणीधरि जो
शूरशितकृपाणी।
हरिपदकमलपरिचरणतत्पर
सुरनरवरनुत सुचरित सुन्दर ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती प्रल्हाद आल्यानंतर बाणासुर येतो निरखा
(दरु : धन्यासी राग—आदिताळ)
बाण येतो पहा गजारूढ ।।
भूतनाथपादकमलसेवक
धूतविविधरिपुजात विवेकी ।। १ ।।

सूत्रधार : या प्रकारें बाणासुर आल्यानंतर बलिचक्रवर्ति येतो निरखा.
(दरु : माळवश्री राग—छापुताळ)
बलिसुरवैरि हयारूढ आला बरा ।। ध्रु ।।
दामोदरा जो दे पैं भूमी-
अमितगुणाकराकारा हरा तें नमितों ।। ९ ।।

सूत्रधार : या प्रकारें बलिचक्रवर्ती आल्यानंतर वृषपर्वारिथारूढ होऊन येतो निरखा.
[दरु : ललित राग—छापुताळ]
वृषपर्वदानवेश्वर वीरसमागत हा ।। ।। ध्रु ।।
काळमेघनिकाय भासुर।
काळकाळ पदाब्ज सेवक-
शूल दारित शत्रुकुञ्जर ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती वृषपर्व आल्यानंतर गजारूढ शुक्राचार्य येतो निरखा.

(दरु : नारायणगौळ राग—आदिताळ)

असुरगुरुबुधवर्य
आला जो सुकृती भला ॥ ॥ ध्रु ॥
दानवावळी मोद दाता
दीनसमूहा पालयिता ।
मानसीं शम्बुपद ध्याता
जाणतो सकळत्रयी जाता ॥ १ ॥

सूत्रधार : एणेंरीती प्रल्हादबाणबलिवृषपर्वा शुक्राचार्य ऐसे पांचजणहीं बाह्यांगणींच वाहनादि परिवार राहते करून गौतमनिकट येऊन त्या ऋषीस यथार्ह वन्दनादिक केल्यानंतर गौतम उपचार करून कुशल प्रश्न करितो निरखा.

कविवरा बलीधानवाधिका ।
बलिसुता हिरण्यात्मजातका ॥
सुवृषपर्वनामाधिकोज्वला ।
त्वदुचितागमें तोष वाटला ॥
करुनियां नदीस्नानसत्वरें ।
प्रमथनामका पूजुनीं बरें ॥
अतिथि सत्कृती स्वीकरुनियां
झडिति तोषवा मानसायया

सूत्रधार : एणेंरीती गौतमाचें प्रेमळ वचन ऐकून आतिथ्य अंगीकारून ते अवघेहिं माध्यान्हिक स्नानास गेल्यानंतर त्यांचा भृत्य निकर पूजासामग्री मंटपादिका सिद्ध करावयास येतो निरखा.

(दरु : मोहन राग आदिताळ)

भृत्यनिकर येतो पहा
भूतसाधन संहति हा ॥ ध्रु ॥
विमलविभूती धरूनी
अमलस्नान तदा करूनी ।
अमितगुणेंकडूनी
नमुनि साम्बशिवा स्वमनी ॥ १ ॥

सूत्रधार : या प्रकारें भृत्यसंघ येऊन शिवपूजा मण्टपादिसामग्री सिद्ध करून परस्परें आत्मसंतोषानें बोलती निरखा.

(प्रल्हादभृत्यश्लोक)

तप्तस्वर्णविशालमण्टपतटीं पीठ स्वयें स्थापिलें ।
अगस्त्याभिध शिल्पतंन्त्ररचित प्रख्यातरत्नोज्वलें ॥
पाद्यार्घ्याचमनार्थ हे पुरहरा सौवर्णपात्रावळी ।
पूजाद्रव्यभरूनि रत्नतबकें सज्जूनियां ठेविली ॥ २९ ॥

(बाणभृत्यश्लोक)
राकारम्य हिमांशुमण्डलगळत्पीयूषधारा बरें ।
पूर्णस्वर्णघटप्रतिष्ठित असे साम्बाभिषेकादरें ।।
पात्रीं दुग्धदधीमधूघृत नवें सच्छर्करागोस्तनी ।
रम्भेक्षुद्रवनारिकेळजलहि म्या ठेविलीं आणुनी ।। ३० ।।
(बलीचाभृत्यश्लोक)
लिम्बें कपित्थें अवळे हिं जांबळें ।
नारंगखर्जूर रसाळ नारळें ।।
बोरें गरे दाडिमबीज संहती ।
म्या स्थापिली येथफलें सुभाकृती ।। ३१ ।।
(वृषपर्वाचाभृत्यश्लोक)
कस्तूरीघनसारकेसरलसद्गोरोचना मिश्रिता ।
श्रीखण्डागरुगन्ध हैम सलिला सारौघसंपेषितें ।।
नानारत्नविभूषणें सुवसनें पञ्चाक्षता चांगली ।
गन्धद्रव्यनिशाहि कुङ्कुमसख्या द्रव्यें असी स्थपिलीं ।। ३२ ।।
(शुक्राचार्यभृत्यश्लोक)
जलस्थलजदेवतातरुसमूहपुष्पाळीसी ।
सुवर्णनवरत्नकप्रकरसूनजाती असी ।।
अम्ही मिळविली श्रुतिस्मृतिपुराणशास्त्रोदिता ।
गिरीशचरणाम्बुजार्चनविधीसि नित्योचिता ।। ३३ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती भृत्यनिकरबोलतअसतां ते प्रल्हादबाणबलीवृषपर्वशुक्राचार्यगौतमा समवेत स्नानाद्यान्हिक संपल्यानंतर पूजागृहांत शिरून शिवपूजा करावयास उद्युक्त होतां नारद येतो निरखा.

(**दरु** : देवदेवकृत कौतुक चिंतुनि ।।)

**सूत्रधार** : एणेंरीती नारद येऊन शिवपूजा संभ्रम पाहून आनन्दाने वानितो निरखा.

**चूर्णिका** : अहो! हे प्रल्हादबाणबलिवृषपर्वासुरवर, धृतभूतित्रिपुण्ड्ररुद्राक्षधौताम्बर, निजगुरुकविचरणकमल नमूनी सादर, गौतमभार्गवाज्ञापुरःसर, त्यांसी समवेत देशकाल संकीर्तनानन्तर !
त्रिपुरहरचरणार्चन करूं म्हणूनी संकल्पुनीं, तदंगगणेशपूजापूर्वक भशुद्धिभूतकलशस्थापनार्घ्यपात्रासादन न्यासजपपीठपूजा करूनीं, निर्माल्यविसर्जुनीं, स्नानवेदिकेवरीं स्वस्वलिङ्गस्थापितीं ।।
हारकमरकतपांडरबाणस्फटिकाच्छरौप्यलिंगातें ।
प्रल्हादबलितदात्मजवृषपर्वाशुक्रपूजिती यातें ।।

**चूर्णिका** : तदनंतरें हे आवाहन स्थापन सन्निधापन सन्निरोधनावकुण्ठन सकलीकरणार्घ्यपाद्याचमन पुष्पदानाभिधसंस्कृती दशक करूनीं, पन्चामृतनानाफलरसगन्धोदकगवयश्रृंगप्रमुखानेकशतसहरापात्रगलितशुद्धजलें अभिषेचुनीं, पूवाक्तपीठावरीं स्थापूनीं, वस्त्रयज्ञोपवीताभरणगन्धाक्षता समर्पूनीं !

कोमलबिल्वदळदूर्वामाचीविष्णुक्रान्तापामार्ग दर्भाग्रमरुवकदवनकतुलसी शिव-
मुण्डीद्रोण श्वेतार्क कनककुंद करवीर कल्हार कमलकुवलयबकुळकुरवकमंदार
बकमन्दारशम्याकपुन्नागजाजीचंपकमल्लिकामालतीशतपत्र सेवंतिकापाटलनं-
द्यावर्तबृहतीप्रमुखपत्रपुष्पें अर्चितीं ।।
तदनंतरे धूपदीपनाविधभक्ष्यभोज्यलेह्यचोष्यषड्रसभरित नैवेद्य दाखऊनीं, मग
पानीयाचमन दीपमालोत्तर नीराजन सपचतिक्तताम्बूल दक्षिणादर्पण छत्रचामर-
व्यजनगीत वाद्यप्रदक्षिणनमस्काराद्युपचारयथोक्ताचरुनीं, स्तोत्र करिताती निरखा.

फालकीलिशलभीकृत मारा
कालकाल भवभीति निवारा ।
मूलसंसृति हरा त्रिपुरारी
नीळकण्ठरुचिरा मज तारीं ।।

**सूत्रधार** : एणेंरीती स्तोत्र करून प्रार्थना करिताती निरखा.

(**दरु** : गौरी राग—आदिताळ)

शम्भो दीनजनाधारा
शान्त करुणाकरा ।। ध्रु ।।
कामितार्थ देवदेवा-
दे मज स्वपादसेवा ।
कामिनीपुत्र दे बरवा
यामिनीश मौळी शिवा ।। १।।
भोगि लोकाधीश भूषा
भक्तजनाकरी तोषा ।
भागलों मी सुवेषा
भीतिबार्रि पीत विषा ।। २ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती प्रार्थना करून भक्ति परवशाने नर्तन करिती निरखा.

जटाकुटीरजान्हवी पटीरशैलजाहिका ।
घटीभवादिसन्नुता पटीभवत्सुकृत्तिका ।।
वटावनीजससत्तटी नटातु तें सुखच्छटा ।
लुटावयाशि चिन्तितों सटोद्भटासतीविटा ।।

**सूत्रधार** : एणेंरीती पांचजण नर्तन करीत असतां नेपथ्यामध्यें नूपुरझणत्कारमिश्रित मुनिबायिका संवादहोतां नारद कान देऊन ऐकून, अहो ! कोण तो शंकरात्मयोगी ? ज्या कारणें मुनिकन्या उपचार करितातिं म्हणून चिंतित असतां तो शंकरात्मयोगी येतो निरखा.

[ **दरु** : कापि राग—छापताळ ]

शंकरात्म निजयोगी पति-
शंकरहित येतो ।।
किंकरीकृत सकळतापस-
पंकिलाखिल देहकि दिसे ।।

रंकनृपही पाहि सम
अंकरहित ।। शंक ।। ध्रु ।।
सकललोक हीं शिव म्हणूनी जो-
संतत हीं निज भाविकां ।
प्रकटकरितनु पञ्चमाकृति
स्वकरीं घेउनि पादुका ।। १ ।।
सुखभरें शिवबोलतो स्वयें
निखिल ऋषिजन नायिका ।
स्वकटीं अलमल्लकाधारि नाचे
सुहृदय मी याचे ।। २ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती शंकरात्ममुनि आल्यानंतर गौतमकन्या येते निरखा.

(दरु : केदारगौळ राग—आदिताळ)

एते पहा गौतमकन्या एते पहा ।। ध्रु ।।
कमलसन्निभनेत्री
कविजनकृतमैत्री ।
कनकसदृशगात्री
कलितसावित्री ।। १ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती गौतमकन्या येऊन शंकरात्ममुनिप्रति बोलते निरखा.

मुनिजनोत्तमा शंकरात्मका ।
झणिमदाश्रमा ये चिदात्मका ।।
करुनि येथ पैं मृष्ट भोजना ।
मग यथेष्ट तूं जाईं सज्जना ।।

**सूत्रधार** : एणेंरीती गौतमकन्या बोलत असतां तो शंकरात्ममुनि आनन्द परवशानें नाचत उडत वृषपर्व शिवलिंगांतराळ प्रदेशीं जाऊन उभा राहिला, तेंव्हां वृषपर्वा फार रागानें बोलतो निरखा.

अरे ! कोण हा दुष्टचण्डालपापी
करीं घेउनीं वाहणा घोररूपी ।
उभा टाकला आडवा अन्तराळीं
सपर्या शिवाची अहो व्यर्थ झाली ।। ३६ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती यास्तव दुष्टाची उपेक्षा करून ये शिक्षा करितों म्हणून शस्त्र उचलितां तो शंकरात्ममुनिही पळत असतां पाटलाग करून वृषपर्वाहीं जातां नेपथ्यामध्ये कोलाहल शब्द होतां । अवघेंहि कान देऊन ऐकतां हा हा वृषपर्वनि शंकरात्ममुनीस मारिलें म्हणून शब्द ऐसा ऐकून गौतम मूर्छागत होतां नारदानें गौतमास आश्वासन करून उठविल्यानंतर तो गौतम शिष्य वियोग सोसवेनासरिखें नारदाप्रति बोलतो निरखा.

(दरु : बेगडा—शापु ताळ)

शंकरात्म तो मझा किंकरोत्तमा ।।
हे तोयजभव सुता
कैसा त्याचा वियोग सोसूं मी ।
शिवपदाम्बुजयुगीं चित्त ठेउनी तो
भवजलधि अपार अहो सहज पाउनी ।। १ ।।
आणी—
जगहीं मृषा म्हणूनी चित्तीं समजूनीहा ।
निगम शिरोदित सच्चित्सुखघनाकार अहा ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती प्रलाप करून शंकरात्ममुनीचें स्वरूप वानितो निरखा.
मूढालानरसा सुरासि सुरसा योग्यांसि तो योगिसा ।
आचार्यासहि शिष्यसा सदय हृत्साध्वीसि तो बालसा ।।
आत्मज्ञानि जसा ऋषीसि ऋषिसा मूर्खासि चण्डालसा ।।
भासे शंकर मानसाख्य मुनितो सर्वासि सर्वात्मसा ।। ३७ ।।

सूत्रधार : ऐसा तो ज्ञानी काय अपराध केला म्हणत असतां गौतमकन्या येऊन बापाची स्थिति पाहून फार व्यवसनानें कष्टीं होऊन शंकरात्ममुनीचें वर्तमान निजसखीप्रति वर्णिते निरखा.

(दरु : नीलाम्बरी राग—अट ताळ)

हा देहाभिमान न धरितो कीं सखी ।।
गेह नाहिं ज्यास पैं सुखी
मोह त्यास काय निरखी ।।
कामक्रोधलोभादि नाहीं
ज्यासहि रमणी ।
कामनाते सजणी कामारि
गुणगुणी कमिनी ।।
हेय हेय नामनीं
हे कीरवाणी ।
हे गति गुण खाणी
योग्य नव्हे कल्याणी ।।
हा निकाय त्यासि वानी
साम्य ज्यासि नसे त्रिभुवनी ।।

सूत्रधार : एणेंरीती गौतमकन्या संवाद करीत असतां नारदमुखें वर्तमान कळून शुक्राचार्य शंकरात्ममुनीस मृतसंजीवनी विद्येनें वांचऊन त्या समवेत गौतम निकट येऊन बोलतो निरखा.
अहो गौतमा शंकरात्ममुनी हा
पहा पातालात्वत्समीपीं निरीहा

मृतोज्जीवनी मन्त्रसिद्धि प्रभावें
अम्ही वांचवीला असा मित्रभावें ।। ३८ ।।

**सूत्रधार :** एणेंरीती शुक्राचार्याचें वचन ऐकून गौतमऋषी शंकरात्ममुनीस पाहून गाढालिङ्गन करून बोलतो निरखा.

अरे ब्रह्मनिष्टोत्तमा शंकरात्मा
सदा ध्यात सच्चित्सुखाब्ध्यंतरात्म्या ।
दया वारिधीनें पुन्हा भार्गवानें
तुझा स्थापिला भूतळीं देहभानें ।। ३९ ।।

**सूत्रधार :** एणेंरीती शंकरात्ममुनी आल्यानंतर गौतमाश्रमीं एकरात्र संतोषाने वास करून प्रल्हादबाणबलिवृषपर्व शुक्राचार्य तें स्वस्थलास पावल्यानंतर तो कलहप्रिय पवताकडून ऐकिलें ते वर्तमान मनांत चिंतून त्या मोहिनी महेश्वरास पहावया कारणें गौतमाश्रमांत चालिलें वर्तमान सांगावयाचा मिसानें कैलासपर्वताप्रति जावयास सिद्धि झाला.

इति श्रीभोसलकुलकलशजलनिधिकौस्तुभ श्रीचन्द्रमौळीश्वरप्रसादलब्ध चोळ-सिंहासन सबिरुद चतुरङ्गसैन्यजितसार्वभौम महाराजछत्रपतिनामधेयकर्णाटक-वसुन्धराधिप धुरन्धर तुलजोर्वीशतनूज श्रीशरभोजीभूसुत्रामविरचित

मोहिनीमहेशपरिणय नाटके द्वितीयोऽङ्कः ।।

---

# तृतीयोऽङ्कः

सूत्रधार : तदनन्तरें सदाशिवसभासन्नाह करावयास नन्दिकेश्वर येतो निरखा.

[ दरु : सारंगा राग—आदिताळ ]

आला शैलादी हा
आतां अनादी महा ।
प्रालेयाचलीं पहा ॥ ॥ आला ॥ ध्रु ॥
आलेपुनी भूती
आवारितकीं भूतीं ।
शूलधर सुमती
शुद्धस्फटिकाकृती ॥ १ ॥ ॥ आला ॥

सूत्रधार : एणेंरीती नन्दिकेश्वर येऊन सभासन्नाह करून त्या सभेस पाहून सशिरःकम्प सन्तोषातिशयें बोलतो निरखा.

सभा ईशाची हे प्रबळ हिमशैलेन्द्र शिखरीं
महाकैलासाची प्रथितपरिते ईसिदुसरी ।
श्रुतिस्त्रीसीमन्तप्रचुरमणिरम्याकृतिलसे
इये माजी तारारुचिरतरसिंहासन असे ॥ ४० ॥

सूत्रधार : एणेंरीती नन्दिकेश्वर बोलत असतां सपरिवार परमेश्वर येतो निरखा.

[ दरु : फरजु राग—शापु ताळ ]

एतो शशिशेखर येनस्ततिहर-
आतां सुरमुकुट हीर ॥ ॥ ध्रु ॥
भतिभषित काय-
भोगिभूषाचय ।
भीतिहर नामधेय
भासुर अमेय ॥ १ ॥
असित कण्टगत वासुकी
अहिपति शैलसुतापति ।
त्रास भारित सुरासुरावळि
पूजिति पद ज्याचें आदृत ॥ २ ॥

सूत्रधार : एणेंरीती परमेश्वर आल्यानंतर सवेंच पार्वती येते निरखा ॥

[ दरु : असाबेरि—आदिताळ ]

शैलसुता येते शशिमुखिते ।
शैलसुता वासुदेव सोदरी भली ॥ ॥ ध्रु ॥
मंजीरमणि समुदय मंञ्जुळचरणी ।
शिंजित विलसित चञ्चद्रशना ॥ १ ॥

चञ्चरीक निभरत्नयाञ्चलक वेणी ।
पञ्चशराकर सदय सुवीक्षणी ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती पार्वती आल्यानंतर सर्वेच गणेश येतो निरखा.

[दरु : वराळि राग—आदिताळ]

एतो लम्बोदर हा
येथें तो महा ।। ।। एतो ।। ध्रु ।।
वारिजो भक्त विघ्नासी-
भारी कुक्षि पहा ज्यासी ।। १ ।। ।। एतो ।।

सूत्रधार : एणेंरीती गणेश आल्यानंतर सर्वेच स्कन्द एतो निरखा.

[दरु : नागध्वनि राग—आदिताळ]

वन्दनशील संक्रन्दन मुख- ।। वन्दन ।।
स्कन्द शिवतनूज आला ।।
नन्दिताग सुत सुन्दर परमा-
नन्दनिधीमहा ।। ।। वन्दन ।।

सूत्रधार : एणेंरिती पार्वती गणेश स्कन्द परमेश्वराजवळि आल्यानंतर परमेश्वरास पाहून नन्दिकेश्वर स्तोत्र करितो निरखा.

गङ्गाधराधृतकुरङ्गा वृषाधिपतुरङ्गा हुनी उतरुनी
रङ्गान्तरीं हळुचि शृङ्गारितासनि भुजङ्गाङ्गदा निवसुनी ।
भृङ्गाळिभासुरवीहङ्गाधिरूढमुख साङ्गा मराळि नमनें
भङ्गातिगासरसपिङ्गानलाक्ष जनिताङ्गारकावरि मनें ।। ४१ ।।

सूत्रधार : एणेंरीती नन्दिकेश्वरानें विज्ञापना केल्यानंतर साम्बमूर्ति उपनिषत्सभांतरीं प्रणवसिंहासनावरी बसून दर्शनास येणार येऊन द्या म्हणून नन्दिकेश्वरास आज्ञापिल्यानन्तरें नन्दिकेश्वरानुमतीनें ब्रह्ममुख सुरपरिबृढ क्रमें कडून येती निरखा.

[दरु : कल्याणिराग—शापुताळ]

एतो अब्जभव अतिप्रभाव ।। ।। एतो ।।
चण्डीश्वरा प्रिय कमण्डलु शोभित ।
पण्डिताळि हितकारि पुण्डरीक स-
माण्डसर्जन चण्ड मुनिजन षण्डसम्भव ।। १ ।।

सूत्रधार : एणेंराती ब्रह्मदेव येऊन महादेवाचें स्तोत्र करितो निरखा.

जटाकलापभासुरा सुराररिराजभञ्जना
जनार्दनाक्षिपूजिता जितान्तरप्रभाञ्जना ।
जनावळिकृतादरा दरापहारिकारणा
रणाङ्गणाधिकोद्वला बलातू ते नमी घना ।।४२।।

सूत्रधार : एणेंरीती ब्रह्मदेव आल्यानंतर महाविष्णु येतो निरखा.

[दरु : साळग भैरवि---आदिताळ]

कमलनायक हरि
कामितार्थ प्रदाता ॥ ॥ कमल ॥ ध्रु ॥
कमलायत नेत्रयुग
कामारि विमोहक येतो ॥ १ ॥ ॥ कमल ॥

सूत्रधार : एणेंरीती विष्णु येऊन विलाससंभ्रमें महेशास नमस्कार करून सानुरागें बोलतो निरखा.

आशाम्बरावृततनूरुचिरा महेशा
काशामरावळिव धुनीसित केशपाशा ।
ईशा तुतें निरखुनी मम चित्तवृत्ती
क्लेशा त्यजूनि विलसे मुदित प्रवृत्ती ॥ ४३ ॥

सूत्रधार : एणेंरीती विष्णूचे स्तोत्र ऐकून महादेवें साभिप्राय कुशल प्रश्न पुरस्सर निजसमीपीं बसविल्यानंतर इंद्र येतो निरखा.

[दरु : हिंदोळ वसंतराग---शापु ताळा]

एतो सहस्राक्ष हा सरुद्राक्ष ॥ ॥ एतो ॥
घाति तामरवैरिजात अप्सरो
गीत बहुविध संगीत सन्नुता ॥ ॥ एतो ॥

सूत्रधार : एणेंरीती इंद्र येऊन स्तोत्र करितो निरखा.

असार संसार पयोधि पारा
ताराधिपाकार मुखा अपरा ।
आराधितों तूज भवा पुरारी
हरा उदारा मज तूंच तारी ॥ ४४ ॥

सूत्रधार : एणेंरीती इन्द्र स्तोत्र करीत असतां नन्दिकेश्वरानमति पुरस्सर नारद येतो निरखा.

[दरु : गोपिकावसंत राग---शापु ताळ]

सुर मुनि आला पहा हरप्रिय ॥ ॥ सुर ॥
स्वरगति सुश्रुति परिगत संजती
भरित संगीतकाराधित शिव हा ॥ ॥ सुर ॥

सूत्रधार : एणेंरीती नारद येऊन महादेवास नमस्कार करून स्तोत्र करितो निरखा.

कुण्डलीकृतकुण्डलीमृदुगण्डमण्डलशोभिता
काण्डजातजकाण्डजातकरण्डसंहृतिसंभृता ।
पाण्डुवाहनपाण्डुनन्दनपुण्डरीकसमर्चिता
ताण्डवोचितताण्डवस्वनडिण्डिमाजयशाश्वता ॥ ४५ ॥

**सूत्रधार** : येणेंरीती महादेव नारदाचें स्तोत्र ऐकून नारदाप्रति प्रश्न करितो निरखा.

कमलजात्मजा त्वत्कृतस्तवें ।
उदितहर्षमी बोलतास्तव ।।
हिमधराधरेन्द्रावरी झणी ।
मज सभातळी पातला मुनी ।।

**सूत्रधार** : यापरि परमेश्वराचे वचन ऐकून नारद बोलतो निरखा.

नवल हे शिवा गौतमाश्रमी
निरखिलें स्वयें तें तु तेंच मी ।
विनवितों भवा ऐक सुन्दरा
झडिति त्या मुळें पातलों हरा ।।

**सूत्रधार** : एणेंरीती नारदाचें वचन परमेश्वर ऐकून अगाये नारदा काय तें नवल वर्तमान सविस्तार सांग म्हणून विचारितां तो नारद उत्तर देतो निरखा.

दैत्येन्द्र जोकीं वृषपर्वनामा
पूजा करीतो तव नित्यभीमा ।
पूजेमध्ये शङ्करचित्त आला
म्हणूनि तेणें मुनि मारिजेला ।। ४६ ।।

तें पाहुनी पुरहरा मग गौतमाला
सन्तापभार हृदयांबुजि फार झाला ।
दैत्येन्द्र देशिकवरें झणि काळकाला
तो शङ्करात्म शिवभक्तहिं रक्षिजेला ।। ४७ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती नारदाचें वचन ऐकून परमेश्वर या मिशेंकडून पुन्हा तपोवनास जाऊन स्वामीष्टहिं येक्या अंशाने साधूया म्हणून आशय मनांत धरून त्या गौतमशङ्करातममुनी दोघासहिं पहावया जावें म्हणऊन समस्त स्वपरिवारास स्वस्वस्त्रीसमवेत येण्यास नन्दिकेश्वर मुखें आज्ञापिल्यानंतर नंदिकेश्वरानुमतीने लक्ष्म्यादि देवांगनांक्रमेंकडून येत असतां लक्ष्मी येते निरखा.

[दरु : आहिरी राग—आदिताळ]

लक्ष्मी येतें वदान्या
रक्षी ते धन्या ।। ।। लक्ष्मी ।।

जेक्षीराब्धीचीं कन्या
दक्षिणाबुध मान्या ।। ।। लक्ष्मी ।।

पद्मापरि जिचें नेत्र
पल्लवकर मित्र-जें ।।
पद्मनाभ कळत्र-पद जिचें
पवित्र कनक गात्र ।। १ ।। ।। लक्ष्मी ।।

सूत्रधार : एणेंरीती लक्ष्मी आल्यानंतर वाणी सरस्वती येते निरखा.

[ दरु : कल्याणी राग—शापुताळ ]

वाणी येतसे पुराणी
वनरुह पाणी ॥ ॥ वाणी ॥
आणी गुणाची भरणी
आश्रित चिंतामणी ॥
वीणा धारिणी विधि-
राणी शुकवाणी ॥ १ ॥
गंगालहरी सम
श्रृङ्गाररस सीमा
मङ्गळ गुण धामा
अंगना सुलल्मा ॥ २ ॥

सूत्रधार : एणेंरीती सरस्वती आल्यानंतर इंद्राणी येते निरखा.

[ दरु : कन्नड राग—आदि ताळ ]

एते सुरपति जया ॥ ॥ एते ॥
शातकुंभाभछाया ।
शतमख माननीया ॥ ॥ एते ॥
शीतांशु निभ मुखी
गीत वर निज सखी ।
शातोदरी निरखी
माताङ्गगती लेखी ॥ १ ॥ ॥ एते ॥

सूत्रधार : ऐणेंरीती इन्द्राणी आल्यानंतर नन्दिकेश्वराची स्त्री सुयशा येते निरखा.

[ दरु : रामकलिराग—ताळ ? ]

एते सुयशा—ईडित निजेशा ॥ ॥ एते ॥
राकेन्दुनिभवदना—राजीवदळ नयना ।
कोककुचसुमदना—कुन्द सदृश रदना ॥ १ ॥

सूत्रधार : एणेंरीती सुयशा आल्यानंतर समस्तदेव समूह यतो निरखा.

[ दरु : सौराष्ट्र राग—आदि ताळ ]

एते हे अमराळी ॥ ॥ एते ॥
दैत्यकदंभ वनिता
संहती समवेता ।
एथें राक्षसाशीं ॥ ॥ एते ॥
ते मोटी वर्तमान सिद्धाशीं-
साध्याशीं संघटिता तुषित तीशीं ।
विमानीं समानीं बसूनीं स्यंदनीं—प्रसुन्दरतरीं
स्वर्णमयीं बहुवर्ण मनोहरीं ॥ ॥ एते ॥

सुर वनिता दनुज प्रमदा गन्धर्व-
चारण किन्नर किंपुरुषादिका-शिवसदनीं ।
वररवि कवि कुवलय हितकरशुभ वन्हि इनोद्भव-
निऋऋति पाशिक कुबेरिका-त्वरित गतीनें ।
धरणीं तनुभव विधुसुत सुरगुरू-
सौरि विधुं तुद केतु मुखखिल गृहादिका ।
वृषपर्वासुर बलिबाण नमूची प्रल्हाद
कुम्भनिकुम्भक शंभर रावण समूहिका ।।
सनकसनन्दन सनाथिका-
बहुमुनिजन वर संधिका--मुदितमना ।
सरसतर पाताळवासी--उरगाधिपती
वर शुभ तरुणी रमणीमणी ।।
वासुकी तक्षक काळीय कम्बळशेषिका ।।
पर्वत रेखा संयुता सोर्वशी-मेनका-रंभा ।
सतरंगिणी-मिळित सुपतंगी गुणगणकसंगी ।।
अतिसरसभंगी-भरितशिवरंगी ।
सरभस तर परवशा झणी ।। ।। एते ।।

**सूत्रधार** : एणेंरीती दंपती समेत देवादि दंपती आल्यानंतर महादेव गौतमाश्रमाप्रति सपरिवार निवते वेळेस नारद गौतमाकडें जाऊन हें वर्तमान सांगता गौतमहीं ससंभ्रम संतोषें अर्घ्यपाद्यादि सकलोपचार सामग्री घेऊन महादेवासमोर पटाक्षेपें सपरिवार नारदासि सहित येऊन समय रक्षित असतां नमो मार्गी महादेव यावयाचा संभ्रम पाहून नारद गौतमाप्रति बोलतो निरखा.

देवा छत्रधरी शिलादज सुधा भानूपरीं पांढरे
दो भागीं मणिदण्डभासुरतरें हंसापरी चामरें ।
हाती घेऊनि हेमवेत्रगण हे भाटापरी गर्जती
धर्माकार वृषावरी वळघुनी येतो भवानीपती ।। ४८ ।।
उन्दिर मयूर खगपति हंस गजारूढ होउनी येती ।
गजमुख षण्मुख हरिविधि हरिहयमुख हे समस्त सुरजाती ।। ४९।।

**सूत्रधार** : एणेंरीती नारद गौतमाप्रति बोलत असतां सांगीतल्या प्रमाणें परमेश्वर येतो निरखा.

(दरु : एतो शशिशेखर)

**सूत्रधार** : एणेंरीती परमेश्वर पार्वती गणपती स्कन्द ब्रह्म विष्णू इंद्र लक्ष्मी सरस्वती सुयशा क्रमें कडून आल्यानंतर गौतम महादेवास षोडशोपचार पूजा करून स्तोत्र करितो निरखा.

[दरु : बेगडा राग (आसावरी राग) आदिताळ]

धन्य जाहलों देवा--धन्य महादेवा
वन्य ऋषी ऐसा वानूं (मी) कैसा ।। ।। धन्य ।।
निगम सकळहि निरुपम म्हणती
अगणितगुणगणा अगजापती ।

अघटितघटना हे आश्रमी निऋती ।
प्रकटला मजसाटीं तो पार्वतीपती ।।

सूत्रधार : एणेंरीती गौतमाचें स्तोत्राकडून परमेश्वर बोलतो निरखा.

(दरु : श्यामकल्याणि—शापुताळ)

घेई आतां गौतमा इष्ट सर्वकामा ।। ।। घेई ।।
मुक्तिचारी देवविती भक्ति तूझी अधिक
आसक्ति मनीं करितसे माझि या ।। ।। घेई ।।

सूत्रधार : एणेंरीती महादेवाचें वाक्य ऐकुन गौतम प्रार्थना करितो निरखा.
देवा पद्मभवादि भाग्य नलगे जें शेवटीं नश्वरा
भक्ती श्रीपदपङ्कजी तव असो चित्तीं मला हे स्थिरा ।
राहो शाश्वत शङ्करात्ममुनि तो क्षेमें सदा शङ्करा
आतिथ्योचित सत्कृती मम घरीं घेऊनि जाई हरा ।। ५० ।।

सूत्रधार : एणेंरीती महादेव गौतमाचें वचन ऐकून आतिथ्य अंगीकारून आपण सपरिवार बसवया योग्य ऐसें सदन निर्माण करा (व) यास्तव विश्वकर्म्यास चिंतितां तो विश्वकर्मा येतो निरखा.

(दरु : देवगान्धरि राग—शापुताळ)

विश्वकर्मा येतो विश्वकारिजो ।
विश्वरूपाचा पिता हळु हळु ।। ।। विश्व ।।
सुन्दर तर मनि स्मरणें-
मन्दिर संहति करूनिया ।
पुरन्दरगृहाहूनि अधिक-
राणा माजी बरे निर्माण केले ।। ।। विश्व ।।

सूत्रधार : तदनन्तरें महादेव कामदेनूस पाचारूनि षड्रसोपेतभोजन शीघ्र करावयास आज्ञापुनी गोदावरी नदीमाजी स्नान निमित्तें जलक्रीडा करावयास श्रीपार्वतीसमेत निघूनि लक्ष्मीनारायण वाणीहिरण्यगर्भ सचीपुरन्दर वल्लीदेवयानी सुब्रह्मण्य सुयशा नन्दि ऊर्मिला वीरभद्र कनका चण्डीश्वर उत्पलावती तण्डु तुष्टिपुष्टि बुद्धि सिद्धि अलम्बु सारंभा मेनका ऊर्वशी तिलोत्तमा इत्याद्यप्सरा तेत्तीस कोटिदानवासुरराक्षस सहाषष्टिकोटिसप्तमरुत अष्टवसु नवग्रह द्वादशादित्य सिद्धसाध्य यक्षगन्धर्व किन्नरकिंपुरुष उरग प्रल्हाद बाणबलि वृषपर्व रावण महाकाळ सप्तकुलाचलसप्तसमुद्र समस्त नद्या भूतपिशाचादिगण तत्तद्वनिताहि समागमें घेऊनि दंपतीस जोडी बांधून वनितासमग्र पार्वतीसमीप पुरुष समग्र आपणाकडें घेऊन परस्परें प्रतिदंपतीहि नदींत उतरून जलक्रीडेस निरोपून आपणहि जलक्रीडा करीत असतां त्या समई परमेश्वर विनोदार्थ टिपर्याचें खेळणें करिवितो निरखा.

**कोलाटदरु :**

पाळि चन्द्रमौळी साम्बा पाळि चन्द्रमौळि ।
पाळि चन्द्रमौळी साम्बा पाळि सदाकाळी ।।

कनकशैलचापा करधृत कमलापति रोपा ।
कलित महीरथ कंजज सारथि निगमवाजि सार्था ।। १ ।।
रविशशिचक्रयुगा मौर्वी कल्पित पन्नगा ।
शतमख सुपरिवारावृत मस्तकधृत गंगा ।।
कन्दर्पदर्पहरा आम्नाय सन्दर्भाकारा ।
मन्दस्मितयुत निटिनाल लवभस्मीकृत त्रिपुरा ।। २ ।।
अभयवरदहस्ता पुरहर शरभेन्द्रप्रशस्ता ।
अखिलसुरासुरपूजित पदयुग अमलकलासमस्ता ।। ३ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें परमेश्वर नानाविध विनोद करीत असतां गौतम स्नानादि समस्त अन्हीक सम्पऊन श्रीईश्वर भोजनास केंव्हां येतील म्हणून मार्गनिरीक्षित असतां नारद गौतमऋषिपाशीं येऊन जलक्रीडासम्भ्रम समग्र सांगतो निरखा.

।। चूर्णिका ।।

अतिविकटतटयुगळघटित पदन्नततिततिमिळित बहुविटपिवरशिखरपतदतिसुरभि विकचसुमनिचय गळदमितमधुमधुरतरमलयगिरिकुहरवलदनिलचल निजहृदयगत कुमुदकमलचय परिमिळितशिशिरतर वरिगोदावरी माझारीं। उतरूनि गौरी हर परस्परें। प्रमे पुरस्सरें। परिगृहीत सुरासुरादिस्त्रीपुरुषनिकरपरिवारा बरोबरीं। चिरकाण्डि प्रभृतिवारि क्रीडा साधनभरें। वदननयनहृदयोंदरीं। सुकुमारीं। तत्तत्कळेवरीं। सुमार धरूनि वारि मारकरीत असतां। तेव्हां सांबमूर्ति असुरपति बाण असुरारिपति नारायण या दोघांसहि द्वन्द्वयुद्ध लाऊन जयापजय पाहत असतां ।।

बाणासुर प्रथित बाहुबलाब्धि वारी
व्याघूर्ण होउनि हळूं निरखी मुरारी।
कारुण्यवारिनिधि हासुनि तो पुरारी
दोघासि तैं वरद होउनि भीति वारी ।। ५१ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती नानाविध परमेश्वराचे खेळ नारदमुखें ऐकून काल विळम्ब झाला म्हणून प्रति विज्ञापना करावयास गौतम ऋषीश्वर जातां परमेश्वरहिं गौतमाश्रमा प्रति त्वरेनें येत असतां पटाक्षेपें मारुती येतो निरखा.

**(दरु : एरुकलकाम्बोदिराग—आदिताळ)**

अनिलकुमार येतो या-
तुचापरि पंथि जोतो ।। ।। अनिल ।।
परमशिवपदीं सतत आसक्त-
निरवधि शौर्यनिधी शिवभक्त ।। १ ।। ।। अनिल ।।

**सूत्रधार** : एणेंरीती मारुति येऊन शिवाचें स्तोत्र करितो निरखा.

**(दरु : आनन्दभैरवी—आदिताळ)**

भूतनाथा तुजवीण भूमीवरी नाहिं शरण ।।
मातें पाहिं माजि या क्षणा।
सुजन रक्षणा—भूतगणवृतावरणा ।। ।। भूत ।।

सूत्रधार : एणेंरीती मारुतीचें गान ऐकून त्या कारणें अभीष्ट वर देऊन सपरिवार भोजनास विश्वकर्म निर्मित रम्यमंदिरीं परमेश्वर असतां शिवाज्ञेनें नारायण मोहिनीचे वेष घेऊन यथायोग्यठाईठाई देवादि पंक्ती बसऊन अमृत वाढ्डील्या-प्रमाणें अन्नादि समस्त पदार्थ वाडून अवघ्यांस तृप्ति करविली ते पाहून नारद संतोषाने चालिलें वर्तमान अनुवाद करून बोलतो निरखा.

देवा लागि सुधा प्रदान समई जैसा हरी मोहिनी
तूं झालासि तथान्नदान समई संतोष देई बनी ।
सर्वान्त:करणासहिं म्हणूनि तो संप्रेरित श्रीपती
तैसा घेउनि हेमपात्रहिं पळी वाढीतसे स्वाकृती ।। ५२ ।।

सूत्रधार : एणेंरीती नारद वानीत असतां गौतमाकडून समस्त देवहि यथार्ह बहुमान पाऊन शिवाज्ञेनें स्वस्व मंदिराप्रति जात असतां मोहिनीमहेश दोघेंहि संकेताने सपरिवार आनंद मंदिरीं प्रवेश केला हें वर्तमान ऐकून विष्णुमाया एते निरखा.

**(दरु : शंकराभरण राग--ताळ)**

(येते विष्णुमया-)

सूत्रधार : एणेंरीती विष्णुमाया येऊन बोलते निरखा.

पाहुनि मोहित सदाशिव मोहिनीला
मोहार्णवोदरतळी सहसा बुडाला ।
अंशावतार करुनी झणी चालिली ते
विन्ध्याचलीं हळु हळू मग मींहि जाते ।। ५३ ।।

(इति निष्क्रांता)

इति श्री भोसलकुलजलधिकौस्तुभ चंद्रमौळीश्वरप्रसादलब्ध चोळसिंहासन सविरुद चतुरंग सैन्यजित सार्वभौम महाराज छत्रपति नामधेय कर्णाटकवसुन्धराधिपधुरन्धर तुळजोर्वीश तनूज श्री शरभोजिभूसुत्राम विरचित मोहिनीमहेशपरिणयनाटके तृतीयोऽङ्कः ।।

।। श्रीशारदाम्बायै नमः ।।

---

## चतुर्थोऽङ्कः

**सूत्रधार** : तदनंतर परमेश्वराज्ञानें अंशावतार घेऊन विष्णु मोहिनीरुपें महादेवाच्या दर्शनास्तव विन्ध्यपर्वत शिखरीं असतां तिला पहावयास विष्णुमाया येते निरखा.

दरु : (विष्णुमाया येते)

**सूत्रधार** : एणेंरीती विष्णुमाया येऊन चहूंकडें पाहून परमेश्वर अंशावतार घेऊन विन्ध्यपर्वतास येणें अति दुर्घटकीं म्हणून बोलते निरखा.

जो अर्धनारीलसितस्वमूर्ती
गङ्गासमालिंगितभव्यकीर्ती ।
उमापतीसंवृतनैकभूती
येतो कसा तो धृतदिव्यभूती ।। ५४ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती विष्णु मायाचें वचन ऐकून लतामन्दिरीं होती ते मोहिनी येते निरखा.

दरु : (सुरटि राग शापु ताळ)

मोहिनी येते जगन्मोहिनी ।। ।। मोहिनी ।।
मोहित नानाविध मुनि-
सिद्धसंहती मोद भरें ।
हळू हळु मुदित निर्जेक्षिता ।। ।। मोहिनी ।।
वदन जितेन्दुरदनाळिकुन्दा-
मदनासि जे लोक विजई शर ।
कदनपर संक्रन्दनमणि-
सदन परिगत अमरसुन्दरी ।।
मदहरामितरूपशालिनी-
मत्तगजनिभललितगामिनी ।। ।। मोहिनी ।।

**सूत्रधार** : एणेंरीती मोहिनी येऊन पटाक्षेपीं असून विरहाभिनये करिते निरखा.

दरु : (आनन्दभैरवि राग आदि ताळ)

मी सोसूं कैशी माये-
तो येईना कांसये ।। ।। मी ।।

हा काय वाया सजणी-
मी काय करूं रमणी ।। ।। मी ।।

मदनकदनपरवदनकमलरद
वदनसुधारस वद कधि देतो ।। ।। मी ।।

अरुणकिरणजितत़रुणिमकुटरत-
तरुणसुधानिधितरुणि न भेटे ।। ।। मी ।।

सूत्रधार : एणेंरीती मोहिनी विरहाभिनय करून निजसखी विष्णुमायेस पाहून महादेव येणें दुर्घट म्हणून बोलिली सखीं मी काय करूं म्हणून विरहवेदना सोसवेनासारिखें सखीं प्रति बोलते निरखा ।।

दरु : (एरुकलकाम्बोदि राग : आदि ताळ)

सम्मोहसागरातें-
सजणि कैसी तरूं मी ।। ।। सम्मोह ।।
कामिनी या यामिनींत-
स्वामिसीं मिळवीं सखी ।
तामरसनेत्री अनंग-
वैरीच विसरला मज ।। ।। सम्मोह ।।
कुवलयिनीपति उदेला-
पवनमलयज निघाला ।
कवण सोसूं विरहवेदना-
कमलपाणि विनवीं त्या प्रति ।। १ ।।
(नी) निजहीं रातीं मला नाहीं-
निजपति येईना पाहीं ।
माझें शरीर करीं शशि दाहीं-
माझें शरीर वेदितो हा सये ।। २ ।।

सूत्रधार : एणेंरीती कष्टी होऊन विष्णुमायेप्रति वर्तमान बोलते निरखा.

जाऊनि तूं झडकरीं हळु विष्णुमाये
सांगूनि ये वचन मामक येथ माये ।
मातें कसा विसरलासि शशांकमौळी
बोलूनि कां न भजसी मज उक्तवेळी ।। ५५।।

सूत्रधार : एणेंरीती विष्णुमाया मोहिनी संवादकरीत असतां पूर्वसंकेताप्रमाणें परमेश्वर अंशावतार करून येतो निरखा.

दरु : (चंद्रमौळीश्वर येतसे)

सूत्रधार : एणेंरीती परमेश्वर येऊन विन्ध्यपर्वतीं मोहिनीस हुडकीत वृक्षा प्रति मोहानें बोलतो निरखा.

अरे रसाळनयनीविशाला
माझीं कृशालाक्षणिकोक्तशीला ।
ना देखिली कीं पदपुण्यशीला
माझी सतीसे सलिजे सुशीला ।। ५६ ।।

सूत्रधार : एणेरीती बोलत मोहानें कष्टी होतो निरखा.

दरु : (यमुना कल्याणि : शापु ताळ)

मोह कसा सोसूं मी
मोहिनी करितां कामी । मोह ।। ध्रु ।।

शशिकळा रवीपरीं-
शतदाहे निजकरीं ।
कृशकरी रुसुनी-
शरीरा मजवरी भारी ।। १ ।।

पाटीर सुरभिणी भेटी-
न देते सुदृढ मजसाटीं ।
गजनमना स्वयें पेटी
गुणाची हे मोटी ते ।। मोह ।। २ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती कष्टी होऊन मरिणीस पाहून बोलतो निरखा.

ते मोहिनी मृगशिशुप्रतिमस्वपांगी
कीं पाहिली झडिति या वनिं हे कुरंगी ।
तूं बोलकां सुनयना तटिदुज्वलांगी
कोठें असे निरखितों कलितत्रिभंगी ।। ५७ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती मोहिनी विरहाने महेश कष्टी होत असतां मोहिनी प्रेषित विष्णुमाया चहूंकडें अकस्मात परमेश्वरास पाहून मोहिनीची स्थिति समग्र सांगून बलाविते निरखा.

(दरु : गौळिवन्तुराग झंपताळ)

पुरहरास मी तुज परमशिवा हे ।
विरहतापें आतां परवशा मोहिनी ते ।। ।। पुर ।।

एई तूं लवकरी येण शिशु लीचना ।
कायकरी तुजवीणें कामदळना ।।

नायका शशिकिरण नावडे रमणीय ।
सोयरि तुझी तेहिं शोभते साच नाहीं ।। १ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती विष्णुमायाचें वचन ऐकून परमेश्वर निज बरोबर मोहिनी कडें येऊन आनंद परवश्याने बोलतो निरखा.

दरु : (जुजावंति राग अट ताळ)

मोहिनी तुझे ठाई ।
मोहिता मति माझी-द सुदती ।। ।। मोहिनी ।।
देहा माझा स्मर दाहितो ।
निज मनी दावा धरूनी-
अंगीकारीं लवकरिं ।। ।। मोहिनी ।।
ललनामणीलोचनदेखुनी
तुझें विलसित सुवदन ।
कलशभरित कनककलशस्तना-
काळाकाळीं मला हेचि कामना ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती परमेश्वर मोहिनीप्रति बोलतअसलातरीहिं ते मोह पारवश्यानें परमेश्वरास प्रत्युत्तर न देतां आप आपणांत बोलतेवेळेस तिची सखी विष्णुमाया संबोधन करून परमेश्वर आला आहे म्हणून सांगीतले तें ऐकून तीसीं संवाद करिते निरखा.

दरु : (सैंधवी राग। आदि ताल।)

विष्णुमाया: कालमदहरणशील निखिल सुर-
पाल हा सखि मोहिनी ॥
मोहिनी : सुरपालकीं शुचिफालकीं-
विधिपालकीं मी नेणें ॥
वि– : राजराजसख रजितगिरीवरि-
राजमानतो मोहिनी ॥
मो– : राजमानकीं भ्राजमानकीं-
शुभ्रायमानकीं मी नेणें ॥
वि– : क्रूरगजासुरहारक विमल-
ज्ञानसार हा मोहिनी ॥
मो– : ज्ञानसारकीं उरगहारकीं-
विजितमारकीं मी नेणें ॥

सूत्रधार : एणेंरीती विष्णुमायेचें वचन ऐकून लज्जा कोपभरें मोहिनीनें समंजस उत्तर दिल्यामुळें विष्णुमाया समाधान करून मोहिनीचें मनोगत जाणून परमेश्वरास गांधर्व विवाह करून घे म्हणून येकांतीप रमेश्वराची स्थिति सांगीतल्यानंतर मोहिनी ससंभ्रम उठून परमेश्वरास साष्टांग प्रणाम करून बोलते निरखा.

दरु : (सावेरि राग। शापु ताल।)

चंद्रमौळीश्वरा आजि मी सुकृती ॥ चंद्र ॥
इंन्द्रादिभोगहिं ईशा लेश तुमची।
सान्द्रसुखाब्धी तुं सादरें भेटलासी ॥ १ ॥
नयनसरोरुहिं नियमें पूजिजेलासि।
गात्र संगतीस मी पात्र जाहलें स्वामी ॥ २ ॥
भव्य चरित माझें फालनेत्रा सफल।
भक्त कल्पद्रुमा पाहि जेलासि सोमा ॥ ३ ॥

सूत्रधार : एणेंरीती मोहिनीचें वचन ऐकून परमेश्वर गांधर्व विवाह करावयासाठी बृहस्पतीचें स्मरण करितांच बृहस्पतीं येतो निरखा.

दरु : (हुशेनि राग। आदि ताल।)

देवजोशी येतो पहा-
देवगुरु महा ॥ देव ॥
आर्यमादिग्रहा माजि-
आर्य ज्यांचे पद पूजी ॥ ॥ देव ॥

**सूत्रधार** : एणेंरीती बृहस्पति येऊन शुभलग्न पाहून लग्नास मंगळाष्टक म्हणतो निरखा.

मंगळाष्टकश्लोकें ॥

उद्यत्कोटिसहस्रभानुरुचिर श्रीशंकरश्रीपती
प्रत्यङनिस्तुलनिस्तरंग सहजानन्दैकबोधाकृती ।
तत्तद्भूतनिकायभासुरविवर्ताधारसत्तोज्वल
प्राप्तश्रीपरमेश्वराद्भुततनू देवोत सन्मंगळें ॥ ५८ ॥

अन्योन्यान्तरहर्षपूरजनितानन्दैकसंवादिनी
गाढालिंगनलालसाद्भुततरश्रीभारसोल्लासिनी ।
श्रीगौरीशपदप्रवृत्तिविषयव्याप्ताखिलोर्जस्वला
त्या मूर्ती सततैकतानकुशला पावोत सन्मंगळा ॥ ५९ ॥

**सूत्रधार** : एणेंरीती बृहस्पति येऊन मंगलाष्टक म्हणल्यानंतर मोहिनी परमेश्वर दोघेंहि पाणिग्रहण होऊन येकासनीं बसून असतां वाणीभार्गवींद्राण्यरुन्धती-प्रभृति सवाष्ण्या मिळून मोहिनी महेश्वरांस हळदखेळणें खेळवितात निरखा.

(नलुगु-हळदखेळणें दरु)

श्री सांबा जय जय-
श्री गौरी मनोहरा ।
वासवनुत धीरा-
वटमूलागारा ॥ ॥ श्री सांबा ॥ १ ॥
पाय तुझें धृतचंद्रा-
पाहुनि मी सुख सान्द्रा ।
पावन पूजुनि भद्रा-
पावन मी शुभरुद्रा ॥ ॥ श्री सांबा ॥
कालमनोमदहरण-
कामारी जें चरण ।
कोलरूपें नेक्षित ते
कोमळ आजि पाहते ॥ ॥ श्री सांबा ॥
अरुणसरोरुहमित्र-
अमरारीसलवित्र ।
पुरहरा निजकरा-
परमशिवा देई हरा ॥ ॥ श्री सांबा ॥
मलयज लावी उटी
विमलतनू धूर्जटी ।
मल माया दूर करी-
महनीय माझी तारी ॥ ॥ श्री सांबा ॥ ५ ॥

**सूत्रधार** : एणेंरीती हळद खेळविल्यानंतर कुलदेवता प्रसन्न व्हावयासाठी शिवदास येऊन गोंदळ घालतो निरखा.

गोंदळ : मध्यमावति राग आदिताळ

पाळी तूं चन्द्रमौळी-पार्वतीपति ।।
फालाक्षि जितमारा पालित सुर-
नीलकंधर रुचिरा-त्रिशूलधर ।।
वेलातिगाति रुचिरा-
कालाविदारण पालितमुनिजन
शीलित सुखघन देवकपाळी ।। १ ।।

भोसलकुळदेव श्रीचन्द्रमौळी-
भो सुरक्षित देव ।
भोगिभूषण जाला-भोगविशाला-
फालनिटला भालिक अनुकूला ।।
भूतिविभूषित भूसुरहित-
शरभाधिपपूजित वेळोवेळी ।। १ ।।

(दरु : मध्यमावति राग आदिताळ)

चिन्तितों हृदई शिवसांबा-
त्या नित्य दयासदना ।।
फाललोचना पाशविदळना-
पर्वतसदना परशुधारणा ।
पापविघटना पावनचरणा-
पामरतरणा पार्वतीरवणा ।
पावकमयनयना ।। ।। चिन्तितों ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती शिवदास गोंदळ घालिल्यानंतर मोहिनीमहेश दोघेहीं लीलामंदिरीं प्रवेशिल्यानंतर मोहिनीची सखी विष्णुमाया हा अत्याश्चर्यकरवृत्तात पाहून ज्योश्याप्रति बोलते निरखा.

कस्तूरिका सुरभिणी तटिनी निघाली
केळीगृहाहुनि सदाशिव भोगकाळी ।
विन्धाद्रि श्रृन्ङ्गानिकरावरि लोटुनी ते
आश्चर्य हे नदनदीपति माजि जाते ।। ६० ।।

श्लोक : एणेंरीती ज्योश्याप्रति बोलत असतां विष्णुमाया मोहिनीस पाहून तिज समीप जाऊन आहेत लक्षण कळूंघेऊन पुन्हा परमेश्वराकडें यैऊन मोहिनीची स्थिति यथाप्रकार नाहिं त्याकरितां वैद्यास बलाऊन दाखवावें अथवा डोहळचे होत आहेतकीं कळत नाहीं म्हणून तीची स्थिति सांगते निरखा.

दरु : (रीतिगौळ रागअट ताळ)

मानिनीमणी मोहिनी मंगळमूर्ति-
माननीय सद्गुणी ।।

आसनसुधाकर-अवदात तीचा फार-
अतनुहें तदुदर-अति सुकुमार ।।
देहहिं कृशजाहला-
नादरी मनीं देवी भुषणजाला ।
गेहिनी तुझ महादेवा वेळोवेळी
आहार हे बलात्कारे घेते अबला ।। १ ।।

कुचकलश शिक्षर कामिनीचें तें-
कोटि माजि पृथुळ।
काळसर सरसकलितेन्दुशेखरा-
खाते मनोहर भूतीशीं भूबरें ।। २ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती विष्णुमायाचें वचन ऐकून महादेव सुरवैद्याचे स्मरण करितांच ते येताहेत निरखा.

(दरु : कर्णाटदेवगांधारि राग : शापु ताळ)

आश्विनेय आले अद्‌भुतविग्रह-
विश्वेतहृद्यभले ।।
पूर्णसुधारसपूरितौषधाशीं-
चुर्णनिकरांशीं अपर्णापतीपाशी ।। १ ।।

**सूत्रधार** : एणेंरीती वैद्य येऊन मोहिनीचा हात पाहून विष्णुमायेप्रति बोलतो निरखा.

अवो ये सखी जे तुझी विष्णुमाये
तिला रोग नाहे कदा हिं सुकाये ।
करीं पहतां तो स्फुरे गर्भधातू
तनू माजिहि भासतो तोचि हेतू ।। ६१ ।।

**सूत्रधार** : एणेरींतीं वैद्याचें वचन ऐकून परमेश्वर सुयेणींस चिंतिता सुईण येते निरखा.

(दरु : पुन्नागवराळि राग शापुताळ)

एते पहा जरठा-जे अतिविकटा ।।
शीतानें कांपते फार-
भीत भीत ते प्रचारी ।। ।। एते ।।

**सूत्रधार** : एणेंरीती सुईण आल्यानंतर परमेश्वर शुभलग्ननिरीक्षित असतां त्या शुभलग्नात इंद्रादिसमस्तदेवहिं वाद्यनृत्तपुरस्सरपुष्पवृष्टी करून विन्ध्यपर्वतशिखरावरि येती निरखा.

दरु : ।। येते अमराळी ।।

**सूत्रधार** : एणेंरीती समस्त अमराळी येऊन परमेश्वराप्रति बोलते निरखा.

श्री चंद्रशेखर वरा जगिं सर्वशिष्टा
रक्षावया हिमगिरीन्द्रसुता विविष्टा ।

उत्पन्न आजि सदया तवपुत्र शास्ता
दद्भक्ति भार हरिचा सफल प्रसस्ता ।। ६२ ।।

सूत्रधार : एणेंरीती इंद्रादिदेवाचें वचन ऐकत असतां मोहिनी पुत्ररत्न घेऊन येते निरखा.

(दरु : नादनामक्रिया राग आदि ताळ)

मोहिनी येते ससुता ।
मोहित शिवनिरीक्षता ।।
देह कृश झाल्याहि पाहतां ।
अतिरुचिर आहे ।।
हेमधराधरस्तना ।
हिमकरसस्मितवदना ।।
कामकलाळीं कुशला ।
कामिनी कनक सुचेला ।। १ ।।

सूत्रधार : एणेंरीती मोहिनी आल्यानन्तर समस्त देवाशीं सहवर्तमान शिव जातकर्मादिक करून निजपुत्रास शास्ता म्हणून नाम ठेऊन मोहिनीस अभीष्टवर देतों घे म्हणतां ते मोहिनी वर मागते निरखा.

गण्डाहुनी श्रमजलात्मधुनी प्रजाता
ते गण्डकी म्हणूनी सिद्धसुराभिगीता ।
ती माजि चक्रितशिला सकला महेशा
पूज्या असोत तुजशीं सह अभ्रकेशा ।। ६३ ।।

सूत्रधार : एणेंरिती महादेव मोहिनीस वर देऊन शास्तासहि आपले परिवारभूत-पिशाचाद्यनेक गणाधिपत्य देतांचते पाहून इन्द्रानें ऐरावतवंशज अनेक हत्ती दिल्हे. वरुणानें हजार घोडे दिल्हे. कुबेरानें येकतरवार दिली. निऋऋतीनें येकढाल दिली. या प्रकारें येथीलवर्तमान असतां कलहप्रिय देवांबरोबर आला होता. तो पूर्वीपर्वतानें सांगीतलें तें वर्तमान यथार्थ जाहलें म्हणून मन्धरपर्वतीं पार्वतीप्रति विनवितां ते कळून विष्णु निजरूप घेऊन असतां पार्वती सखीसमवेत येते निरखा.

दरु : (शैलसुता येन शशिमुखी ।।)

सूत्रधार : एणेरिती परमेश्वरसन्निधानीं येऊन सक्रोध आपअपाणांत निंदापुरस्सर बोलते निरखा.

नाही ज्यारूप आख्या कुलंहि धनधनक्षेत्र मातापिताहीं
धर्मोक्षा वाहभूषा अहिगण अशनस्वादुकाकोल पाहीं ।
दिग्वासाभूतसंधी परिवृत्त तनुतो भीक मागे कपाळी
ऐसा तूझा पती हो म्हणुनि विधि लिहीं दुर्लिपी हा कपाळीं ।। ६४ ।।

**सूत्रधार** : एणेरिती आपआपणांत बोलून परमेश्वराप्रति बोलते निरखा.

दरु : (मध्यमावति राग — शापु ताळ)

**पार्वती** : परमशिवा तूं भोळा म्हणूनि आख्या लटिकी भासे हें ।।
(आर्या) परिहरूनि मज विन्ध्यगिरीवरि भोगीशीं सवतीशीं ।।

**परमेश्वर** : परिसगे! गिरिजे! पर्वतावरिमी पातलों मुनिपाशीं
(छंद) परस्त्री संगति काहिं मी नेणें पापकशी बोलशी ।।

**पार्वती** : अर्धतनू माझि आश्रित असतां वंचुनि मजला तुं
मूर्धावरी सुरतटिनी धरितोशीमूर्धन्य कपटांशी ।।

**परमेश्वर** : भक्तपराधीन होउनिमस्तकीं भामिनि धरितों मी ।
व्यक्त हे वार्ता विदित समस्तांशीव्यर्थ तूं कां बोलशी ।।

**सूत्रधार** : एणेंरीती उत्तरास प्रत्युत्तर समंजस देतां पार्वतीस राग येऊन शास्तास पाहून हा कुमार कोणाचा म्हणून विचारितां परमेश्वर उत्तर नाहींसे उगाचि असतां त्यासमई नारद येतो पहा.

दरु : (सुरमुनि आला पहा)

**सूत्रधार** : एणेंरीती नारद येऊन सपार्वतीपरमेश्वरास समाधान करून परमशिव शक्तीच विष्णुरूप म्हणून पुराणवचन बोलतो निरखा

एकैव शक्तिः परमेश्वरस्य । भिन्ना चतुर्धा विनियोगकाले ।
भोगे भवानी पुरुषेच विष्णुः । कोपेच काली समरेच दुर्गा ।। ६५ ।।

**सूत्रधार** : ऐसें म्हणतां पार्वती उपशांत होऊन विष्णुस्वरूपैक्य होऊन पार्वतीपरमेश्वर दोघेंहि शास्तास आशीर्वाद करून आनंदमंदिरीं प्रवेश करायास इच्छितां तैं शिवदास येऊन पार्वतीपरमेश्वरास वेदांत वाक्यीं वानून शिवभक्तिप्रकटन-पूर्वक येक निरूपण म्हणतो निरखा

गणेशानवाणी गुरूतें स्वचित्तीं सदावंदुनी वानितो भक्तिवृत्ती ।
शिवद्रोहहीं अर्चनाहीं शिवाचो दृढाकार ज्या त्याजगीं मुक्तिसाची ।। ६६ ।।

दरु : (यमुनाकल्याणि — आदिताळ)

भक्ति ज्याची नियता शिवपदींमुक्ति त्याची वनिता ।।
विहिताविहित हो दृढतर झालातो सुमती तरला-शिवपदीं ।। १ ।।
गाण्डीवानें शिवा पाण्डव ताडुनीपाशुपता पावला-शिवपदीं ।। २ ।।
पाण्डयनृपें वेत्रें शङ्कर आहत त्यावरि तो रिझाला-शिवपदीं ।। ३ ।।
थोंड मार करुनी मूर्खानें हर सहज तोषविला शिवपदीं ।। ४ ।।
पूर्वी येक महेशभक्त नियमे देवालई जाउनी
पाषाणें शिवमस्तकीं दृढतरें भावें स्वये ताडुनी ।
जेवी नित्यहि येकदा विसरुनी जेवावया बैसुनी
तेंव्हा चिन्तुनि नित्यकृत्य उठला तो भोजना टाकुनी ।। ६७ ।।

प्रायश्चित्ति नसे श्रुतींत नियमभ्रंशाशि शास्त्रींखरी
देह त्यागचि निष्कृती सुनियमभ्रंशासि ऐसी परी।
ऐसें चिंतुनि शकड़रा निजतनू अर्पावया इच्छिला
तेंव्हा तो वृषभाधिरूढ झणि त्या सारूप्यमुक्ति दिला ॥ ६८ ॥

**सूत्रधार :** एणेंरीती शिवदास निरूपण म्हण्टल्यानन्तर पार्वतीपरमेश्वरास वंदून तो शास्ता लोकानुग्रहार्थ प्रार्थितो निरखा.

धरे माजीं धाराधरनिकरवर्षोस्वसमई
व्दिजक्षत्रोरव्यांघ्रिजतति असो स्वीयसमई।
त्रयी विद्या नित्या बुधजनमुखांभोजकुहरीं
वसो भक्ति भक्तिसततहि लसो मुक्तिद हरीं ॥ ६९ ॥

**सूत्रधार :** एणेंरीती शास्ता प्रार्थितां त्याचे मनोरथ परिपूर्ण करून सपरिवार पार्वतीपरमेश्वर निस्वानन्दमन्दिरास चालिले निरखा

दरु : (शुद्धसावेरी — आदिताळ)

शुद्धानन्द निजवराशी।
सदानन्द स्वप्रकाशी ॥
चन्द्रमौळी गौरीश हा।
सपरिवार आला पहा ॥

**सूत्रधार :** एणेंरीती या दिव्य प्रबन्धाच निर्माता.

माळोजीक्षितिनाथतस्समजनि श्रीशाहुराजस्ततो
एकोजीनृपतिस्ततस्तुळजराट् तस्मात्प्रतापेमहा।
तत्पुत्रस्तुळजाख्यभूवलरिपुश्रीचोळभूनायक-
स्तत्पुत्रश्शरभोजिभूपतिरसौ सिंहासने राजते ॥ ७० ॥

मालोजीक्षितिनाथपुत्र शहजी तत्पुत्र येकोजि हा
तज्जन्मा तुळजेन्द्रभूवलरिपू त्याचा प्रतापेभहा।
तत्कुक्षी तुळजावनीपतिमणी उत्पन्न झाला महा
तत्सूनू शरभोजि भूप विलसे सिंहासनीं तो पहा ॥ ७१ ॥

करीं जितसुरद्रुजो शुचिधरी विभूतीबरी
गिरीशचरणाम्बुजार्चनकरी सदा अन्तरी।
धुरीण शरमेन्द्र तो नुत सुरीं सुधी केसरी
करीशगतिभाषणें जितसरी नृपाग्रेसरी ॥ ७२ ॥

**मग्दगळ :** चन्द्रमौलीश्वराय जय मग्ड़लम् ॥

शम्भो शकड़र गौरीशा।
शिव साम्ब शकड़र गौरीशा।
हर साम्बशकड़र गौरीशा।
शिव शम्भो शकड़र गौरीशा ॥ चन्द्र ॥ १ ॥

(दुरितकाल)

शम्भो शङ्कर चन्द्रकळाधरा।
साम्बसदाशिव शाश्वता ।।
ईश गिरीश महेश नटेश्वरा
गौरीनायक धूर्जटी ।। चन्द्र ।। २ ।।

गात्रेण वाण्या करणैश्च सर्वै-
र्मया च यद्यत्रिदशासु कार्यम्।
करोमि तत्तन्निखिलं शिवाय
श्रीशङ्करायेति समर्पयामि ।।

महोत्सवो भवेत्तेषां महादेवो दयानिधि:।
येषां हृदिस्थ: श्रीसर्वमङ्गळायतनं हर: ।।

कल्याणगात्रधानुष्क: कल्याणं तनुतां चिरम्।
स सर्वमङ्गळाकारस्सर्वमङ्गळदृक्छिव: ।।

इति श्रीभोंसलकुलजलधिकौस्तुभ श्रीचन्द्रमौळीश्वरप्रसादलब्धचोळसिंहासन-सबिरुद चतुरङ्गसैन्य जितसार्वभौम महाराजछत्रपतिनामधेय कर्णाटक-वसुन्धराधिपधुरन्धर तुळजोर्वीशतनूज **श्रीशरभोजी भूसुत्राम विरचित मोहिनी-महेशपरिणयनाटके चतुर्थोऽङ्क ।।**

मोहिनीमहेशपरिणयनाटक संपूर्ण ।।

---

# ६. देवेंद्र कोर्वंजी

त्यानंतरें इंद्राणि सखी कल्पलते सहित शकुन सांगणार महाकाया बुरडीण इंद्राणीचे भेटीस येणार त्याकरितां सभा सिद्ध करावयास तीचा दौवारिक कैकाड येतो निरखा.

(दरु राग कल्याणी मिश्रताळ)

।। येतो दौंवारिक तो पाहा
।। जातीचा कैकाड हा ।। प ।।
।। हाती तोडयाची बंदुक घेऊनि ।।
।। हरिकें पागोटेंहिं मस्तकीं लेऊनि ।। अ ।।

यापरी दौवारिकानें येऊन सभा सिद्ध केल्यानंतर कल्पलते सहीत बुरडीण येते निरखा

(दरू : राग कांबोदि आदिताळ ।।)

।। इंदु मुखीते ।। येथें बुरडीण ।।
।। इंदीवराक्षी ।। येतसे पाहा ।। प ।।
।। कुंदरदना ।। कोमलांगीहे ।।
।। मंदरसमकुचा ।। मंजुळ वाणी महा ।। अ ।।
।। विमल शंख मणी ।। विपुल गुंजाकृत ।।
।। अमित हार गळा ।। हांसे मुखामाजी ।।
।। गमन जियेंचें ।। गजरमणि परीं ।।
।। कमनीय किंकिणी । गर्जती माजीं ।। १ ।।
।। माजुनि पैंजण ।। वाजती पांई ।।
।। साजत हातीं ।। सानशी काठी ।।
।। माजी कडदोरा ।। मणिमय शोभे ।।
।। लाजत लाजत ।। लावण्य पेटी ।। २ ।।
।। जातरूपमय ।। जातीय भूषण ।।
।। मातुनि साजे ।। मस्तकीं जोशी ।।
।। हाती कवळूनि ।। हळवट बुट्टी ।।
।। वात विधूनित ।। बद्ध सुकेशी ।।२३।।

(दरू : राग अठाना – आदिताळ)

।। आली ते बुरडीण आतां ।। आनंदुनि पाहा । प ।।
।। बोले जें बहु धीटपणानें ।। बालेंहि दीर्घ महा ।।अ।।
।। तरुणी आणिक नेत्र जियेचे ।। तांबूस बहु दिसती ।।
।। अरुणाधरते अभ्दुत शकुनहिं ।। परमार्थे वदती ।।१।।
।। नासा जीची मन्मथ तूणी ।। नाचुनी जे शहाणी ।।
।। भासुरदेहे वीज जशीतशी ।। भासतसे रमणी ।।२।।

।। माज जियेचा देखुनि साना ।। आजि मृगेंद्र वनी ।।
।। लाजुनि गेला अैसे जीचें ।। गाजत यश भुवनीं ।।३।।

यापरीं बुरडीण येवून इंद्राची अमरावती वर्णिते निरखा.

(दरु : राग गौरी : आदिताळ)

।। अमरावतीहे ।। अभ्दुत आहे ।। प ।।
।। कमनीय नगरी है ।। कमठ लाहे ।। अ ।।
।। गमन करीतां ।। श्रम येथें नाहीं ।।
।। अमरपुरीहे ।। अनुपम पाहिं ।। १ ।।
।। प्राकार उन्नत ।। प्रासाद असतांहीं ।।
।। पाकारि पुरींगति ।। बाधक नाही ।। २ ।।
।। भासतसे मजा ।। भामय सर्व ।।
।। वास उटे आस ।। पास अपूर्व ।। ३ ।।
।। सकल सुख प्रद ।। संतान येथें ।।
।। फुकट जनाचें ।। पूर्ण मनोरथ ।। ४ ।।

यापरीं अमरावती वर्णन केलें तें ऐकून अंतःपुराहून सख्याशी सहित शकुन विचारावयाचे कौतुहलेंकडून इंद्राणी देवी येते निरखा ।। इंद्राणी येउन बुरडिणीस विलोकुन फार संतुष्ट होउन तीप्रति बोलते निरखा.

(दरु : राग केदार गौळ—अटताळ)

।। कोणग तुं बाई ।। कोठुनि येशी ।। प ।।
।। जाणवी जे मज ।। जाणे मी जैशी ।। अ ।।
।। खाणखूण तुझी ।। काहीं मी नेणे ।।
।। जाणशी तूं मज ।। सद्‌गुणराशि ।। १ ।।
।। इंदु बिंब मुखी ।। सुंदर तुजपरि ।।
।। कुंदरदना ।। कोणते अैशी ।। २ ।।
।। ठाणमाण तुझें ।। ठारुनि पाहतां ।।
।। कोण ह्मणउनि ।। जाणुं मी कैशी ।। ३ ।।
।। माय वहीणशी ।। मजलागि भासशि ।।
।। काय जगदीश ।। माया आहेशि ।। ४ ।।
।। सकल जगासहि ।। सारस नयने ।।
।। शकुन वदुनि तूं ।। सौख्य करीशी ।। ५ ।।

यापरीं इंद्राणी देवीनें विचारितां बुरडीण बोलते निरखा.

(दरु : राग यदुकुल कांबोदी—आदिताळ ।।)

।। दशपर्वतनदी लोक......
।। जाती माझी ऐक ।। कातरापांगी ।। प ।।
।। प्रीति करीशि तूं ।। कीतीं मजवरि ।।

रीति तुझी बहु ।। नीति अपंगी ।। अ ।।
जातीनें मी आई ।। जाण बुरडीण ।।
खातनसेपरिं ।। खाद्य मी हीन ।।
जीत मांजराचा ।। जीव घेति अैशी ।।
जाती नव्हे माझी ।। जातरूपांगी ।। १ ।।
मद्यमांस बहु ।। मधुर गुणाचे ।।
विद्यामय मम ।। विग्रहीं लाभे ।।
आद्य परमात्मा ।। आमुचा धणी ।।
विद्योतिताखिल ।। विश्वकीं शोभे ।। २ ।।
मेरुचे शिखरी ।। मी वसतसे ।।
थोरला डोंगर ।। तो जाण बाई ।।
स्वारी तेथूनियां ।। चारी देशी माझी ।।
नारीमणि देव ।। नायकी आई ।। ३ ।।
अवनितलगत ।। अवधेंहि देश ।।
अवगतकीं मज ।। अमयेस पर्वत ।।
भुवनें समस्तांहि ।। भूर्भुवरादिक ।।
जवगतिनें मी ।। जाउनि पाहत ।। ४ ।।

यापरीं बुरडीणीनें बोलतां इंद्राणीदेवी बोलते निरखा.

दरू : राग आनंदभैरवी—अडताळ ।।

सर्वज्ञ तुं माये ।। सकळहीं जाणशि ।।
गर्व नसेपरिं ।। काहींच मानशि ।। प ।।
पर्वत नदी देश ।। परिवृत्त भूगोळ ।।
पर्वशशीमुखि ।। परिसवी प्रांजल ।। अ ।।
अवनी काय फिरे ।। अरुणमंडलाशि ।।
सविता किंवा फिरे ।। सांग अवनीशि ।।
श्रवण करवी तुं ।। चंद्रगती कैशी ।।
कवण फिरताति ।। ग्रह सवित्याशी ।। १ ।।
धरणि गोळकाचें ।। परिमाण तें काय ।।
तरणिचेंहीं तैसें ।। परिसवी माये ।।
सरस सांगणार ।। साजणि जगिं तुज ।।
परिस कोण ते ।। वर वर्णिनी मज ।। २ ।।

यापरीं इंद्राणी देवीनें विचारितां बुरडीण बोलते निरखा.

आर्या : ज्योतिः शास्त्र पुराणीं कथिले भूगोळ जाण इंद्राणी ।।
त्याशी विलक्षण वाणी कथितें भूगोळ अैकिजे श्रवणीं ।।

यापरीं बोलुन पुनश्च बोलते निरखा.

(दरु : राग सावेरी—अट ताळ)

समज तेजोमय गोळ दिवाकर ।।
सकळांशि कारण गगनीं असेस्थिर ।। प ।।
भ्रमति तयाशि बुधारशनैश्चर ।।
भार्गव आणिक जीव निरंतर ।। अ ।।
गरगर अलातचक्रवत पहा ।।
फिरत आपणांत आपण रविहा ।।
वरि उंच उमाठ कितेक ठाईं ।।
वसत अशे त्याशि निरखितां बाई ।। १।।
अवनिशि येकदां नित्य भ्रमत ।।
अमृतकर त्याशीं नित्य आपणांत ।।
जवि कंतुकापरिं येकदां फिरत ।।
रविशि भूमि येक वर्षाशि भोंवत ।। २ ।।
असति अनेकचि आकाशि दिनकर ।।
दिसति जे जिगजिग तारकाकार ।।
दुसरे ग्रह त्याशि फिरति निरंतर ।।
दुर्घटहें घटवीतकिं ईश्वर ।। ३ ।।
अैशिया त्याग्रहगोळीं खालवर ।।
असति चराचर लोकहिं फार ।।
तैशिया गोळांशि नित्य फिरणार ।।
तारेश आकाशि असति अनिवार ।। ४ ।।
तरणि ते जें नित्य चंद्र प्रकाशत ।।
धरणि भ्रमणें त्या क्षय वृध्दी भासत ।।
हरिणाक्षि हे तुज हौणिक सिद्धांत ।।
सरणि कथियली भूगोळ विषयांत ।। ५ ।।
यापरीं बुरडीणीनें सांगतां इंद्राणीदेवी विचारिते निरखा.

(दरु : राग श्यामकल्याणी—तिस्रताळ)

आवर्त रविचा केवढा माये ।।
अणि शलाकेचें परिमाण काय ।। प ।।
भाव समग्रहा जाणवि अमये ।।
टाव संदेहाशी जेंवि न होय ।। अ ।।
यापरीं इंद्राणीदेवीनें विचारितां इबुरडीण बोलते निरखा.

दरु : राग मणिरंग—तिस्रताळ ।।

अैक रविशलाकेचें प्रमाण ।। एकोणनव्वदहजार योजन ।। प ।।
आकारितें त्याचें आवर्त परिमाण ।। अर्धोत्तर पंजरधसुख योजन ।। अ ।।
व ।। सूर्याचे आवर्त प्रमाण दोनि लक्ष येकुणअैशीं हजार दोनशे येक्याअैशीं योजनें हाणउन जाण ।।

योजन किती घटिकेचें म्हणशीलतर सांगते अैक.

(दरू : राग फरज—आदिताळ)

जाण साडेसात घटिकेचें योजन ।। आणि इतरत्र हेंचि प्रमाण ।। प ।।
जाणविलें तुज यापरी भूगोळ ।। संगतीनें निज मर्म हे प्रांजल ।। अ ।।

यापरीं बुरडीणीनें सांगतां इंद्राणी पुनश्च विचारिते निरखा.

श्लोक : खूर्यगोळ परिमाण मनाशी ।। नीट त्वां कळविलें गुणराशी ।।
भूमिगोळ परिमाणहिं तैसें ।। सांग सांप्रत मना समतेसें ।।

यापरीं इंद्राणीनें विचारितां बुरडीण बोलते निरखा.

(दरू : राग मोहन—आदिताळ)

धरणि गोळ येके बाजूशि कांहीं ।। ताशियल्यापरि दिसतसे बाई ।। प ।।
परिस तयाचें परिमाण आतां ।। सरस सांगेन तुजला तत्वता ।। अ ।।

स्थलमय कांहीं जळमय कांहीं ।।
विलसतसे भूमि गोळहा पाहीं ।।
कलहंसगमे त्याचें शलाका परिमाण ।।
कमलाक्षी जाण तुं जाधस योजन ।। १ ।। व ।।

भूगोळ शलाकेचें प्रमाण ।।
सातशें अठ्यांणवुं योजनें ह्मणऊन जाण ।।
बाई तयाचें आवर्त परिमाण ।।
घेईं समजुनि घनमार योजन ।।
काहीं संदेहाशि ठाव न होयसें ।।
कामनाहे तुझी पुरविली म्या असे ।। २ ।।

भूगोलाचे आवर्त प्रमाण ।।
दोनि हजार पांचशे चारि योजनें ह्मणवुन जाण ।।

आतां सूर्यास आणि भूमीस अंतर किती आहे आणि चंद्रशलाकेचे परिमाणहीं काय म्हणशीलतर सांगतें अैक.

(दरू : राग केदार—अटताळ)

अवनी रवीसहीं अंतर जाण ।।
अमये ननगसपामध योजन ।।
भुवनेशि चंद्रशलाका परिमाण ।।
गवशि मनीं नीट दापर योजन ।।
सूर्यास आणि भूमीस अंतर पंचाणौ ।।
लक्ष सत्तरा हजार तीनिशें योजनें ।।
चंद्रशलाकेचें प्रमाण दोनिशें अठ्ठरा योजनें ह्मणउन जाण ।।

नटच शिशु बांधुनिया पाठीसव्य करि घेंऊनिया काठी ।
डावे कांखे कवळूनि पाठी भव्य वदे भाविक गुरु धाठी ।।१।।

सूत्रधार : एणेरितीं कैकाडीन येतांच

आर्या : कैकाडिणीं शिरमणी दे मोते सूप भरुनि निज पाणी ।
पुसे हद्‌गत तिजला म्या चिंतीत कार्य सांग क्षणी मजला ।।

सूत्रधार :

श्लोक : मग कैकाडिण चित्ती स्मरुनि देवांसि कार्य तो चिंता ।
तैं शूर्प हलवोनी झांकुनिकर शकून सांगते वाणी ।।

कैकाडिण पद्य—

हृदई धरु योग्य हरपली ते वस्तहार न पदक न हर्ष खाणि ।
करि धरुं योग्य ते कंकण्या ना जवेकमनीय मुद्रिका कमल पाणि ।।
कंठी धरुं योग्य कंठसर तो नशितिकंट बहु मान्य कलकंठ वाणि ।
कटि धरुं योग्य ते खचित नव रत्नकीकस्र रसना नव्हे ।।
कनकवर्णी व पुसि कवळ वसते ते नव्हे ।
जपूनि म्या पाहिलें जतनें ते आहे ।।
गुज सांगते तुजशि निज साजणें हे ।
स्वजनचि चोरिले समजुनी पाहे ।।

राधा : अवो ये कैकाडिणी तां सांगितले तें निजेच परंतु ते वस्त मजला कैशा प्राप्त होईल ?

कैकाडिण : अवो ये राधे. हे काय आश्चर्य माझें सामर्थ्य ऐक.

पद्य : हरिवश्य होऊनि उरीं धरीं लक्ष्मीसकरितें मत्कृत्य नीरजाक्षि ।
हे रमेन दिले हीरकंकण भव्य हे मगन परिमित हेचि साक्षि ।।
गौरीश लोकेश नाकेश नागरींवानूनि मज लागि वनज नयन ।
शकुन म्या सांगतां सकल भूषणें दीधली अपरिमित दिव्य वनें ।।

सूत्रधार : या प्रकार कैकाडिण बोलतांच.

राधा : माझे मनोभीष्ट पूर्ण झाल्या तुला बहुत वस्त्रे आभरणें देईन ।

सूत्रधार : याप्रकारें म्हणतांच चिंताग्रस्त ऐसां राधे प्रति कैकाडिण बोलते.

पद्य श्लोक :

जाईल चिंता अवधी क्षणी गणी । येईल तुझा पति शीघ्र आगणीं ।।
देईल तो खम पुरेल हे धणी । होईल अंदाचि सदा तुझा क्षणी ।।

सूत्रधार : या प्रकारे कैकाडिणे बोलून पलीकडें जातांच पेंद्यानें सरसेसी केली तजवीज कृष्णास निवेदित वेळेस ते इंकित जाणून अभिनव कुतूहल निरत नारद राधिकें समीप कुञ्जवना प्रति येतसे निरखा.

दरु : राग सुरटी—ताळ मिश्र

देवमुनी येतसे पहा देवांछित जो महा । ।। प ।।
सावकारक कारण कलहादेवासुरांप्रति प्रियकर हा ।। ।। अ ।।

कासे शोभतसे भासुर शाटी कमनीय मोटी ।
भासे उगवले जणुरवि कोटीभानसि ज्याची फार गोमटी ।।१।।
आलापें वीणा मधुर निनादें कोलाहल वादें ।
डोलावत करि मन विनोदेंलीलाकरि छंदे ।।२।।

सूत्रधार : एणेरिती नारद येतांच राधिकास संभ्रम विनविते पहा.

चूर्णिक : जयजयाजी नारद मुनिवर भुर्भूवरादि चतुर्दशलोक विचिरत विहार ।।
सुरासुर सिद्ध गंधर्व किन्नर । किंपुरुषादि सकळ जनमन मोहकर ।।
नवनव कलह विनोद निरंतांतर । अघटित घटना चतुरतर चतुरानन कुमार ।।
करुणाकर मज कृपेनें निरक्षीं/ निरक्षीं/

राधा : अगाये नारदा मी राधा प्रमाण करितें.

नारद : दीर्घ सुमङगली भव अवो ये राधिके तुझे मुख फिके दिसल्यावरुन विरहिणीसी दिसतेस.

सूत्रधार : राधा किंचित् लज्जेनें मंदहास्य पूर्वक बोलते.

राधा : अपणास माथारपण आणि ऊनांत आल्या मुळहीं तसे दिसूये.

नारद : अवो ये राधे तां म्हणालले ते युक्तच मी माथारा म्हणूनच त्रैलोक्यामध्ये संचरतो कृष्णाने तुला सोडिल्यावरुन तू तरुणीच संशय नाही .

राधा : नारदा विनोद पुरे माझिलाज स्या स्वमुखें सांगावी म्हणून तूझा अभिप्राय जाणूं, बरें असो माझे आप्त म्हणविणारांनी माझा घात केला तों प्रकार ऐका.

श्लोक : कां घाली घरटी हरी निशिदिनीं आमुचे मंदिरी ।
सत्पद्मीं भ्रमिजे मधूस्तव जसें की नित्य इंदिरी ।।
आल्याही सदना आपाप हरितो जाईल हे बावरी ।
रोधावी म्हणतानये हरि घरा कैसें करू यावरी ।।

सूत्रधार : ऐसे राधेनें म्हणतांच नारद आश्चर्य बोलतो.

नारद : हे राधे. हाच काय घात ब्रम्हदेवानें नेमिला तो भर्तार सुटेल काय.

द्विपद : विधिनिश्चितारा कधिहि सोडावया विधिनसे भामिनी विधिशी टाळावया ।
कोणेसुग दडेक्ष जाणता या जनी नेणुनी कासया शीण धरिशीमनी ।।

सूत्रधार : या प्रकार नारद बोलतांच राधिके सकोप बोलतें.

राधा : अगाये नारदा तुझे बापाचे बुद्धीस अनसरु नको त्यांचे शाहणपण सांगते ऐक.

श्लोक : चंदे योजी कळंका सरस कवि बरेंनि स्व ते लागि जोडी ।
द्रव्येशें लुब्ध तेथें सुदृढ जुडवितो जीसलोकी न जोडी ।।
जोडी श्रिंगार लीला चतुरसुतरुणी दिव्य रुपातियेशी ।
योजी मूढाशि मौढ्य म्हणउनि तव पित्याख्याती कुंभार ऐशी ।।

सूत्रधार : ऐसें म्हणतांच नारद.

नारद : उदंड शाहणी असलीसहीं माय बापें ज्यासि दिधले तया खालेंचें वर्तावे म्हणतांच.

सूत्रधार : राधा अपुला मनोभाव प्रकट करिते पहा.

श्लोक : माता आणि पिता पुरोहित सखे हे बंधु पैं सर्वहीं ।
धुंडाळोनि मही विचित्र वर हा संपादिला तो तिही ।।
म्या श्रीकृष्ण धनी गुणी परिणिला सारज्ञ चूडामणी ।
कोणी काय वदोन गोप रमणी त्याचीच मी कामिनी ।।

सूत्रधार : ऐसे बोलतांच नारद बोलतो निरखा.

द्विपद : कामाशि वश होय कामिनी जरि हें।
कामा नये सुकृत कामाशि पाहे ।।
सोयसलोक तुज सोडिना । तो मन सोडि कां सोमसन वदने ।।

सूत्रधार : नारद ऐसे बोलतांच.

राधा : अवो ये सरसे हा अरसिक आणि माथारा कायकाय की बोलतो हा माझामनो-निश्चय तुजला सांगते ऐक.

पद्य : सास नणंदादि सकळहीं गांजोनसहिन सर्वहीं श्रम न काहीं ।
देर भावा श्वशुर दैवहीं मजलागिदुष्ट भावे सलो दुःख न काहीं ।।
लोकहीं लोक तो ठाउका एक सम मजलागि धाक त्याचा नसे धाक नाहीं ।
पाकशासन तथा लोकनायक तरितो कसो मजलागि शोक नाहीं ।
तेंव्हा निरीक्षीन केशव सुदेहींकलन पडे होय कष्ट बहु बाई ।।
सकळगणगोल तो स्वामी कुलदेवहींरसिक मोहनापांग रंग मज पाहीं ।।

सूत्रधार : या प्रकार राधा सखीशी बोलतांच नारद पुलकांकित होऊन असें प्रज्ञान समाधिसुख अनुभऊन डोळे उघडून बोलतो.

नारद : तूं धन्य धन्य राधे ब्रम्हादिकांसहीं अलभ्य हरि ऐसी भक्ति तुजला प्राप्ति जाहली असें तुजें मन म्यां शोधिलें राग करुनकों श्रीकृष्णासीं रमल्यामुळें लोकापवाद येईनाशि युक्ति सुचलि आहे ते सांगतों ऐक

श्रीकृष्णास तुझी मुळे इळा म्हणणारीस विवाह करुन देऊन जावांयांस घरीच ठेऊन घेऊन निःशंक विहर या प्रकारें नारदानें भोळ्या राधिके प्रतिमनी कपट करुन बोधितांच.

राधा : हे युक्ति युक्तच परि या कामास मी स्वतंत्र नव्हे.

नारद : राधे तुजला हे संमत असलिया तुझ्या सोइऱ्यास संमत करावया विषईं बृहस्पत्याचार्यास पाठऊन कार्य साधितों येथें तुला व कृष्णास कोण्ही पाहिल्यां उत्तरोत्तर कार्यास विरोध घडेल त्या करितां कृष्ण आल्यां तू निघून जा.

सूत्रधार : सांगून नारद निघून इंद्रसभेस गेला असतां पेंद्यानें सांगितलें वर्तमान ऐकून गोपगडी आणि विदूषकांसीं सहित श्रीकृष्ण कुंजवन प्रति येतो म्हणून सभ्यांस सावध करावया कारणें दौवारिक येतो निरखा.

दरु० : मल्हारराग—चौताळ

येतसे पहा दौवारिक—येत धरुनि हाति निःशंक ।। ।। प ।।
येतो म्हणउनि यदुनायक—गात जाणवी लोकां हरिखें ।।१।।

**सूत्रधार** : या प्रकारें दौवारिकानें सभेस सावध केल्यानंतर श्रीकृष्ण येतो निरखा.

दरु० : सुरटी मल्हरिराग—आदिताळ

वनमाळी एतो पहा—वनजाक्ष दयानिधि हा ।। प ।।
बनविलासे जणे पहा—वरदकारण सुखनिवहा ।। ।। अ ।।
अलकंजुक मुग्धा झाली—अत्यंत शोभतो मौळी ।
तिलक साजतसे भाली—दिव्य वेणू करकमळी ।। १ ।।
पदकें रत्नाचामाळा—परम शोभतीता गळां ।
मदन सुंदर पुतळा मदन मोहन हरि सावळा ।। २ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें श्रीकृष्ण येतांच त्यातें पाहून राधिका नारद वाक्यानें स्मरुन वृक्षांतरींत जाहली असतां श्रीकृष्ण राधिका विरह सोसवेनासें विदुषकाशि बोलतो निरखा.

**पद्य** : कोठें असें सांग कोमळांची सख्या कुटिल घन कुंतला कुतक खाणी ।
कुवलय सुलोचनी कुवलय मोहिनी नवल गुण कांता सुवलय पाणी ।
कंबु कंठी स्निग्धकठिणतर घन कुच कमनीय सुश्रोणि कनक वर्णि ।
कटि विजित सिंहिकाकर भोरु साजिरि करि गमाकान एकाग्रस्त गुणी ।
कटकटा न्याय काय म्या केला कांस या कोप त्या कामिनीसि आला ।
जीवहातक मलीजेर बहु झाला जाणऊनि तिज आणि जात्वरें कुशला

**सूत्रधार** : या प्रकार श्रीकृष्ण बोलतांच.

**विदूषक** : अगाये कांमजनका तूं परस्त्रियेसि आणिल्यां समयास ते कैसी येईल तूं तो लक्ष्मीपती संपत्तीस कांहीं उणें नाही द्रव्य देऊन वार स्त्रियेसी रमेण चांगलें. ते सांगतो ऐक.

**श्लोक** : धाकावीन नखाक्षतासि रचिल्यां दंतांक बिंबाधरीं
निर्वीबंध विमोक्ष सांग करितां संकोच ते ना धरीं ।
मोदें हास्य विनोद संभ्रम भरें तीसी रमूंये सदा
ऐसीं वारविलासिनी समजगा अत्यंत से सौख्यदा ।।

**सूत्रधार** : या प्रकारें विदूषकानें बोलतांच

**श्रीकृष्ण** : अगाये विदूषका गणिकेचा प्रेम द्रव्य पुरतांचिच परांगनेचा निज प्रेमातिशय सांगतो ऐक.

**श्लोक** : सासाचें वाक्यखंडी परीजन रगडी नाथा वाक्य मोडी
लोकांची भीति तोडी स्वकुलहीं दवडी सर्वथा शील सांडी ।
लज्यें तें फार कोंडी सततनिजडी स्वैरिणी प्रेम मांडी
त्यासाटीं जीव सोडी रिझूनि निजकुडीं धन्य तीचीच सोडी ।।

**सूत्रधार** : या प्रकार श्रीकृष्ण बोलून अत्यंत मोहें क्षणमात्र स्तब्ध होऊन मग सावधपणें बोलतो निरखा.

दरु० : नाटराग—मटचताळ

जिवलगन आली जीव हा तळमळी ।। प ।।
जीवना वेगळी जैसी सासोळी ।। अ ।।

गोडी दाखवोनि सोडिली कां मज राणी ।
जोडी ते माझी राणी जुडवित कोणी ।। १ ।।
काय तिजविण काय ही म्या वागविणें ।
न्याय न लाजिरवाणें सोय न जाणे ।। २ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें श्रीकृष्ण राधिके प्रति आठवीत असतां विरह भरें राधा वृक्षांतरीत होऊन डोंकावित्यापरीं भाऊन असतां.

**विदूषक** : अगाये कृष्णा कां भ्रमलासि राधा येथे कोठें आहे ?

**श्रीकृष्ण** : ते हरिणाक्षी आतांचि डोंकाविळी की.

**विदूषक** : हरिणी गेली, परंतु राधिका नव्हे.

**श्रीकृष्ण** : अरे विदूषका या ठिकाण समई तुझें हास्य पुरे.

**विदूषक** : या वनी झाडाचें एक पानहीं न सोठितां धुंडिल्यां राधा सांपडेल.

**सूत्रधार** : विदूषकानेंऐसें म्हणतांच नारदाचें वाक्य स्मरुन राधा स्वसदनास गेली असतां कृष्ण राधिकेस धुंडितो निरखा ।

दरु० : नागवराळी राग—आदि ताळ

चंपकानो राधारमणी काय देखिली ।। प ।।
चंपककळिका राधा या वनि कोठें लपली ।। अ ।।
पंकजानो राधारमणी काय देखिली ।
पंकजवदना अनुपम या वनि कोठें लपली ।। १ ।।
चंदनानो राधारमणी काय देखिली ।
चंदनविलसित हृदय तरुणी कोठें लपली ।। २ ।।
कुंदलतानो राधारमणी काय देखिली ।
कुंदरचना अतिसुंदरराणी कोठें लपली ।। ३ ।।

**सूत्रधार** : या परी वृक्षादिकांस पुसोनि पश्चिम गादिकांस पुसतो पहा .

**श्लोक** : शुकानो शुकनासा ते पिकानो पिक भाषिणी ।
चकोरानो चकोराक्षी चक्रानो चक्र सुस्तनी ।।
सिंहानो ते सिंहकटी गजानो गज गामिनी ।
सिंहानो ते सिंहकटी गजानो गज गामिनी ।
दिव्या (नो) ते दयिता माझी देखिली काय यावनी ।।

**सूत्रधार** : याप्रकारें श्रीकृष्ण राधिकेस धुंडित असतां नारद प्रेषित बृहस्पत्याचार्य येतसे निरखा.

दरु० : कानडाराग—मट्यताळ

जोशी देशिक देवांचा जोमें येतो बहु दैवांचा ।। ।। प ।।
ज्यासि प्रसन्न तो वाचा जाणे गुण जो सर्व जीवांचा ।। १ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें बृहस्पत्याचार्य येतांच श्रीकृष्ण नमन करून अर्घ्यपाद्याद्युपचार करून उच्चासनी बसवितांच.

विदूषक : बृहस्पत्याचार्य हो आपण जोशी जाहल्यास्तव कृष्णाचे श्रमपरिहार करावयास चांगल्या वेळेस आलां यांचे मुख पाहून प्रश्न सांगावा.

सूत्रधार : ऐसे म्हणतांच श्रीकृष्ण किंचित् लज्जेनें मंदहास्य करित असतां बृहस्पती बोलतो निरखा.

आर्या : आरुढ लग्न कन्या तात्कालिकही स्मरेश तो कटकीं ।
उच्चंगत लाभप्रद लाभ दुणावे गोष्टि हे लटकीं ।।

सूत्रधार : बृहस्पत्याचार्यानी ऐसें म्हणतांच

विदूषक : बृहस्पत्याचार्या हो मार्गी तुम्हास पेंद्याची हो सरसेची हो भेटि जाहली असेल

सूत्रधार : विदूषकानें ऐसें म्हणतांच

श्रीकृष्ण : अरे विदूषका तू कशा वरुन जोस्य सांगतोस.

बृहस्पत्या : विदूषक तुझा प्रश्न लबाड जाहला नारदानें मजला सांगीतलें असो.
चार्य : आता परिहासास समय नव्हे म्या राधिकेचे स्वजनास बोधिल्या वरुन ते वऱ्हाडी येकंदर त्वरेने येतील आणी मंटप सिद्धि करावयास विश्वकर्मा हीं येईल तूं शीघ्र मंटप सिद्धि करावें मी जाऊन नंदयशोदेस बोधून बलांऊन आणितों.

सूत्रधार : म्हणून बृहस्पत्याचार्य निघून जातांच विश्वकर्मा येतो निरखा.

दरु० : दर्बार राग—आदिताल

विश्वकर्मा आनंद येतो विचित्न कृतिकारक तो ।। ।। प ।।
विश्वप्रति कल्पूं सकतो विनयपरि बहु शोभतो ।।१।।

सूत्रधार : येणेरीती विश्वकर्मा येऊन श्रीकृष्णास नमन करुन बोलतो पहा.

आर्या : ब्रम्हांडाचा कोटी क्षणांत रचिशी अस महा शिल्पी ।
त्या तुज सुखविन पोटीं विवाहमंडप रचोनिया शिल्पी ।।

सूत्रधार : येणेरिती विश्वकर्मा बोलून सभा निर्माण करितो निरखा.

श्लोक : नानारत्नी प्रयत्नी झणी कनकसभा दिव्यभा विश्वकर्मा ।
शिल्पी कल्पी सुबुद्धीपरि न समजतां आत्म सामर्थ्य मर्मा ।।
चित्नांत दावी निरखुनि पुतल्या होयचित्तीं विकल्पीं ।।
ज्ञानी चित्तेंचि मानी शुकपिक पुतल्या निश्चितीं त्या अजल्पीं ।।

सूत्रधार : या प्रकारें सभा निर्माण करितांच गोप म्हणणारे राधिका इळा आणि वऱ्हाड्यांशी समवेत येतसे निरखा.

दरु : कानडा दरबार राग—आदिताल

गोप लग्नासी निघाला गोपाळांचा घेऊनी मेळा ।। ।। प ।।
गोपी राधे सहित चालिला गोविंदासि पाहुं भुकेला ।। ।। अ ।।
मोदें निघाले ग्रामवासी मुलेंमुली वृद्ध हीं उल्हासी ।
जेथें बसतो हृषीकेशीं गाताघातल त्या स्थानाशी ।।१।।

दरु : विलाव राग—आदिताल

नंद येतसे पाहीं नटोनि हृदय गेही ।। प ।।
नंदनोत्सव लावलाहीं छंदें विनटे भव्य देहीं ।। अ ।।
गण चिंतोनि चित्तांत मजतुरगादि सेने सहित ।
गण गोतहीं येऊनि अमित गजरें चाले बंदी विनुत ।।१।।

**सूत्रधार** : या प्रकारें नंद आल्यानंतर गर्गादिक ऋषीश्वर येतात निरखा.

दरु० : आहरी राग—आदिताल

येती गर्भादिक मुनी यदुनाथासि स्मरतांचि मनी ।। प ।।
येत चित्त सदा चरणी यशस्वीज पुण्यखाणीं ।। अ ।।
मस्तकीं जटा भारीमाजीं शाटीं साजिरी ।
हस्तकीं माळ गोजिरिहर्षे नाचत परोपरी ।। १ ।।

**सूत्रधार** : एणेंपरि गर्गादि ऋषीश्वर येतांच महेश्वर प्रभृतिदेवसपरिवारें येताति निरखा.

दरु० : बिलहरी राग—आदिताल

येतातीं मोदें निर्जर–यदुनाथी सादर ।। प ।।
प्रगटताती जे प्रेम भरें, कृष्ण गुण गण फार ।। अ ।।
शंकर सुरवर किंकर भयहर, पंकज सुखकर पावन शशिकंधर।
संकट हर श्रीषण्मुख कुबेर, झंकारक सुर समूह अपापर ।।१ ।।
श्रीकंठ गौरी गण षण्मुखाशीं, लोकेश वाणिसह सौख्यराशीं ।।
नाकेश हीं देव समस्त आले,तो केशवा देखुनि फार धाले ।। २ ।।

**सूत्रधार** : येणेंरिती महेश्वरादि सकल देव येतांच बृहस्पति आणी गर्ग पुरोहित हे दोघं हीं हेच सुमुहूत म्हणून गडबडीन कृष्ण व इळा या दोघातें दिव्यासनीं बसऊन अंतःपाट धरून मंगळाष्टक वदून अंतःपटसोन लग्न लागल्या नंतरें सुखवधू गाताहेत निरखा.

**दरु** : जयजय श्रीलोल गोपाल बाला ।। प ।।
जयजयइळापते नव जलद नीला ।। अ ।।
जय कलानिधि वदन कनकाभचेला।
जय कंज भव जनक कल्याण शीला ।। १ ।।

**सूत्रधार** : या परीं च्यारि दिवस सुख सोहळे होऊन सर्वत्रांस वस्त्रें भूषणें देऊन रुसभोग साडे सकळ सन्नाहानिशी मिरवणि लक्ष्मीं पूजा घर भरणी होतांच सकळ वऱ्हाडी गोप गोपिका विविध विलासी श्रीकृष्णासी. सह राधा अत्यानन्द भरें टिपऱ्यांचा खेळ खेळतसे निरखा.

**दरु** : पाहि पाहि गोप वेष । पाहि पाहि भक्त पोष ।।
पाहि पाहि हस्तदोष । पाहि पाहि पुण्य विशेष ।। ।। अ ।।
पाहि कमनीय शुभहार । पाहि कालिंदी विहार ।।
पाहि काळीय मदहर । पाही कृत कंस संहार ।। १ ।।

पाहि पाहि पंकज नयन । पाहि पाहि पन्नग शयन ।।
पाहि पाहि पर सुख सदन । पाहि पाहि पक्षींद्र गमन ।। २ ।।

दरु : सैंधवी राग—आदिताळ

पाहि घननीळ कृष्ण पाहि कनकचेल ।। प ।।
पाहि वनमाळ शोभित पाहि विनतपाल ।। अ ।।
गोपवंद्यचरण कृष्ण गोवर्धनधरण ।
गोपिकाविहरण कृष्ण गोकुलसंचरण ।। १ ।।
अंबुजलनयन कृष्ण अब्ज सदृश्य वदन ।
अंबुदनिभकृष्ण पुरवी अमची हे तृष्ण ।। २ ।।

**सूत्रधार** : या प्रकारें नानाविध विळास विरचुर अति संतुष्ट ऐशी राधिका बृहस्पती प्रति पाहून बोलते निरखा.

**श्लोक** : शाहणी सुदिनी होऊनि इळा जाहले दिवस आजि सोवळा ।
कृष्णहीं अति मत्कृष्ण सावळा वर्तवीं त्वरित सौख्य सोहळा ।।

**सूत्रधार** : येणेरीती राधाचे वचन ऐकून बृहस्पती गर्गादि ऋषीसीं तजवीज करून अजीचें सुमूहर्त म्हणून फलदान तांबूलदान करऊन नित्यानंद मंदिरीं प्रवेश करिते वेळेस किंचित् लज्जायमान ऐशा इळेसी राधास बुद्धिवाद सांगते निरखा.

पद्य : तो राग जरि करितो राग नको करू, हें राज मेमुदति परोपरी ।
हासवी जरी तुला हासूनको फार, हा हरामी भला हास्यकरी ।
तुजें सवें खेळेल गुज फार सांगेल, चोज मानुनि बहु भोजन धरी ।
क्षीरासवें सरस नीरापरी मिळूनि, तूं राव सतत त्या धीराकरी ।
सज वरितांचि बहुलालन वरि, काज समई सये गाज तू न धरि ।
श्रमल्यांरमीं हरीं श्रांतिने वारि, विभुलागि वशकरी विनयोपचारि ।।

**सूत्रधार** : या प्रकारें इळेस बुद्धिवाद सांगून आणी श्रीकृष्णासहीं कानीं बुद्धिवाद सांगते निरखा.

**श्लोक** : माझ्या या गुरु कांडा समदृढ न इचे ऊरु रंभे समाने
पाहें माझ्या कुचाद्रीस सकुच न इचे पद्मकोशाचिमाने ।
माझ्या दिव्या प्रवाळाधर सम न इचा बोष्ट तो बिंब भावी
माझ्या या अंगयष्टी समतनु न इची जेलता तेंवि भावी ।।

**सूत्रधार** : या प्रकारें बृहस्पतीचें वचन ऐकून श्रीकृष्ण आणि इळा राधा नित्यानंद मंदिरीं प्रवेश करतांच (निष्क्रांतास्सर्वे नित्यानंद मंदिराशि निरुपम गुण राशी ।

इति श्री भोंसल कुलकलशोदधिजनित कलानिधि श्रीचंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासन संपत्संतति सुविराजमान सार्वभौम महाराज छत्रपती भूलोक देवेन्द्र **श्रीशरमेन्द्र** भूपाल विरचित राधाकृष्णविलासाभिधान नाटक संपूर्ण ।।

---

# ८. शिवरात्री उपाख्यान नाटक

## शिवरात्री उपाख्यान

सरफोजी राजे यांनी लिहिलेल्या या दोन अंकी नाटकात शिवमहात्म्य रेखाटले आहे. नांदी, गणेशपूजन व शिवस्तुती झाल्यावर त्यांच्या **राम** नामक गुरूची प्रार्थना केली आहे.

सारासार विचार जो करुनि चित्सारासि आणी मना ।
पारावरा सुबोध पूर्णशशिला थारा जगी सज्जना ।
ताराया भजकांशि या क्षितिवरी शोभे सुविद्यन्मणी ।
त्या **रामाभिध** सदगुरूस नमितो हा राजचूडामणी ।।

सरफोजी राजांची वंशपरंपरा गौरवून नाटकाला आरंभ शिशिरऋतूच्या वर्णनाने होतो. सरफोजी राजांनी इतरत्र वर्षाकाल, वसंत इ. ऋतूंचे असेच प्रत्ययकारी वर्णन केले आहे. शिशिर ऋतू म्हणजे हिंवाळा–

उषःकाली वारा प्रचुरहिम थारा सुमशरा ।
सहायार्थ व्यापे हळदवन कामोदित बरा ।
तयासाठी कंठी दृढतर मिठी घालुनि सती ।
गृहांती नाथाशी शयनसुख त्या भोगिति अती ।।

विरसेन राजाची पत्नी विद्युल्लता ही राजा युद्धावर गेल्यामुळे विरहिणी आहे. ती बागेत मन रमविण्यासाठी मैत्रिणीबरोबर जाते तिथे एक शिवभक्त ब्राह्मण शिवस्त्रोस्त्र म्हणताना दिसतो. त्याला ती अभिवादन करते. तो तिला शिवभस्म देतो. ती ते कपाळाला, कंठाला लावते. राजा विजयी होऊन येतो. तो राणीला एकांतात भेटताच तिला भस्माबद्दल विचारतो व त्याची हेटाळणी व शिवनिंदा करतो. शत्रू परत येऊन राजाला पराजित करतो. राजा कुष्टी होतो. त्याला पक्षी टोचत असता, आगस्ती ऋषीचा पूर्ववृत्तांत ऐकून माघ वद्य चतुर्दशचे शिवरात्री व्रत सांगतात. राजा ते व्रत करतो. शिवपार्वती त्याला दर्शन देतात.

रूढ व्रतवैकल्यांत सत्यनारायणाची वा शिवलीलामृताची पोथी जशी फलश्रुती सांगते तशीच येथे आहे. बाग, वन, राजवाडा इ. ठिकाणी पात्रे रंजकरीत्या नृत्यगायन व संभाषणातून नाट्याचा अविष्कार करतात.

शिव हे भोसले राजघराण्याचे मुख्य दैवत आहे मूळ पुरुष मालोजी याने शिंगणापूर येथे शिवमंदिर बांधले. ते ऐतिहासिक मंदिर आजही प्रसिद्ध आहे.

## शिवरात्री उपाख्यान

॥ श्री गणेशाय नमः॥

श्री सरस्वत्यैनमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥

दरु : राग अडाना ॥ आदिताळ

जय अंबिका रमण ॥ जय अंबरावरण ॥
जय शंबरादि दमन ॥ जय शर्व सगुण ॥ जय जय ॥
जय भव्य निजलीला ॥ जय भक्तजन पाल ॥
जयदेव रिपुकाल ॥ जयभवती लीला ॥ १ ॥ जया जया ।
जय कैलास निलय ॥ जय कर्पूर सम काय ॥
जय फालनेत्र सदय ॥ जल काल विलया जय जय ॥
जय तंडु वाहन ईश ॥ जय तांडव लालस ॥
जय अंडजवर भूषण ॥ जय चंड वेष ॥ २ ॥ जय जया ॥

दरु : राग अडाना ॥ आदिताळ ॥

शरण शरण शशांकशेखर ॥ शरण पोषित नर्जर ॥ प ॥
शरण शासित वेर सुमशर । शरण शाश्वत शंकरा ॥ अ ॥
शरण शरण शरण शतमुख मुख्य पूजित ॥ शरण भूतगणावृता ॥
शरण दांतजनावरत शरणा शैलसुतानुता शरण शरण ॥ १ ॥

दरु : कानरा ॥ आदिताळ ॥

कार्तिकेय जनकाय जय मंगळं ॥ प ॥ आर्तजन पोषणाय शुभ मंगळं ॥ अ ॥
विजयशरासनाहति मुदितां तरंगाय ॥ विजितारि समुदायाय ॥
जय मंगळ ॥ निजरूचि भासित शशि तपन कराय ॥
इथवर चर्तावृत्त शरीराय ॥ शुभ मंगळ ॥ १ ॥

**प्र. :** या परि नांटचारंभा झालिया नंतर सूत्रधार शिवरात्रपाख्यान नामक नवीन नाटक नाचऊन सभ्यांचे मन रंजवाया करिता आपले इष्ट दैवत सकळ विघ्न परिहारक श्री विघ्नेश्वराची प्रार्थना करितो परिसा.

**सूत्रधार :** अज्ञानांधतमिस्त्र चंडकारसा जो संसार सौख्य दुमांकुरसा ॥
रुजा रसायन रसाद्युत्पतिचा आरसा ॥
जो हस्ती शिरसा बुधांशिता रसा पावे जडांदूरसा ॥
तो गौरीसुत सारसाक्ष सुखवो ष्टीस कर्पूरसा ॥ १ ॥

**प्र. :** येणे रिती विघ्नेश्वर प्रायर्थना केलियानंतर वाणीहे कियती परिसा.

**(श्लोक)** जे अक्षमाळवर पुस्तकपाश वीणा । हस्तीं सदा मिरविते करिता धुरिणा
जीच्या कृपें जडहिं पंडित सोय वेगीं ॥ ते नित्य नर्तन करो मम वक्ररंगी ॥ २ ॥

**प्र.** : येणेरीति वाणीची प्रार्थना केलियानंतर श्रीगुरू प्रार्थना करिती परिसा.

**(श्लोक)** सारा सार विचार जो करूनि चित्सारसि आणी मना ।।
पारावारसुबोध पूर्णशशिला थारा जगी सज्जना ।।
ताराया भजकांशि या क्षितीवरी शोभे सुविद्वन्मणी
त्या रामाभिद सुदुगुरुस नमितोहा राज चूडामणी ।। ३ ।।

**प्र.** : येणरीति श्रीगुरु वंदन केलियानंतर सूत्रधार नाटकार्य संग्रह नांदी श्लोक वदतो परिसा.

**सूत्रधार** : स्वाकीयांची निंदा तिळभरि न साहे जगिं जया ।।
स्व भक्तांच्या (शिखरिणी) दासा बहुवितारे जो सौख्य हिं जया ।।
प्रमोदें जो पावे झडकरि । अनायास भजने ।। ४ ।।
असा तो श्री. शंभू हृदयिं धरिला या कविजनें ।। २ ।।

**प्र.** : येणोरीति नांदी श्लोक मणाल्यानंतर आदौ विघ्नेश्वर प्रार्थना केल्याकरिता विघ्नहर प्रत्यक्ष येतो म्हणुन सभा सिध्द करावयास चंडगण नामक दौवारिक येतो निरखा.

**दरु** : राग कानरा ।। आदिताळ.।।

दौवारिक येतो पाहा ।। दड दड धावत हा ।। प ।।
भाविक आत्मसुखाचा भाव दावितो वरि जाडाचा ।। अ ।।

**प्र.** : येणेरीति दौवारिक येऊन ताकिद केल्यानंतर विघ्नहर प्रत्यक्ष येतो निरखा.

**दरु** : राग सुरट मल्हार।। आदिताळ ।।

गणनाथ येतो पाहा ।। गजापरीं झूलत हा ।। प ।।
चणचण कापवी रिपूला ।। समयी पाळी भक्त जनाला ।। अ ।।
उंदिर वाहन ज्याला सुंदर साजे सर्प मेखळा ।।
मंद मंद ठेवी पद कमला ।। तुंदिल तो नाचे भोळा ।। १ ।।

**प्र.** : येणेरीति विघ्नसहर रंग स्थळा माजि प्रगटल्यानंतर सूत्रधार नेपथ्याभिमुख पाहून कां अझुणी पारिपार्श्वक नये माणता पारिपार्श्वक येऊन सभय गदगद बोलतो.

**पारिपार्श्वक** : जी माझे संरक्षण करा.

**सूत्रधार** : काय रे हें असदर्भ बोलतोस ?

**पारिपार्श्वक** : जी या भूतापासून चुकऊन माझे संरक्षण करा.

**सूत्रधार** : खरेच हा कोठेंकी पेंचेंत सांपडून धाका भरलासा दिसतो. बरें याला दे धैर्य देऊन समाचार कळु घेतों. अरे भीऊ नको. मजपांशी आपणास भूत दृष्टीने पाहणार नाही. चालिला वृत्तांत सविस्तर सांग.

**पारिपार्श्वक** : (स्वल्प डोळे उघडून) अगाई जी मी तुमच्या कृपेने भतापासून चुकलो. आता माझें घरदार माझ्या स्वाधीनात येण्यास कांही उपाय सांगा.

सूत्रधार : बरें चालिला समाचार सांग.

पारिपार्श्वक : जी ऐकावें

(श्लोक) हे कैची अति अल्पवस्त न घरी म्या स्त्री अशी शिक्षिली ।।
बोले जी मम तात चिन्हा मणुनी म्या मस्तकी सेविली
तीनें या परि बोलतां अविनये म्या त्यासहि निंदिले ।।
श्यालानें अणि तैं घरांतुनि मला बाहेर कीं घातिलें ।। ५ ।।

सूत्रधार : मग ?

पारिपार्श्वक : (आर्या) मग मी व्यसनें पांडुर होऊनि फिरतां वनांतरी भूतें ।।
नेऊनि गगनी मजला त्यजितां पडलो फिरोनि भूवरि ते ।। १ ।।

सूत्रधार : (सोद्वेगें) मग ?

पारिपार्श्वक : मग मी धावत तुम्हांस शरण आलो.

सूत्रधार : अरे तुझे दैवतुला अनुकूल आहे. म्हणूनच या भोंसल वंशोध्दारक कृत युगधर्म प्रवर्तक श्री. शरभेंद्र भूपालकांच्या सेवेस पात्र झालास.

पारिपार्श्वक : जी म्या भोंसल वंश म्हणून सामान्येंकडून ऐकिले आहे. त्याची परंपरा ऐकूं इच्छितो.

सूत्रधार : ऐक.

(आर्या) श्री. शंभू एकोजो शरथ महासेन एक शिवराम ।।
भीमही एकवराहामिध एक ब्रह्म शाहजी नाम ।। २ ।।
अंबाजि परश्रु वीरहिं बाबा माळोजि
गाजी तज्जतिघे संभाजी दुजा शिवाजी कनिष्ठ एकोजी ।। ३ ।।
तत्सुत तुक्कोजी नृपतत्तनय श्रीप्रतापसिंह गुणी ।।
तत्मुम सद्गुणराशी श्रीमत्तुळजेंद्र वीरभूप मणी ।। ४ ।।

पारि पार्श्वका बाबाजी राज्याचे ज्येष्ठ पुत्र माळोजी राज्यापासून साहवे पुरुष तुळजा महाराजांनी त्या बाबाजी राजाचे कनिष्ट पुत्र विठोजी राज्यापासून आठवे पुरुष शरभंद्र महाराजांस स्वीकार करून घेतले ते परंपराहीं सांगतो ऐकू.

(आर्या) बाबाजीचा आत्मज दुजा विठोजी तदात्मभूगाची
त्र्यंबक नृपसुत त्याचा गगाजी तत्नूज बुधाजी ।। ५ ।।
त्याचा मंगाजी सुत सुभानजी तत्तनूज नरनाथ ।।
त्याचा तनुभव बहु श्लाध्य गुणी शाहाजी जगीं प्रथित ।। ६ ।।
तत्पुत्रा स्वीकारूनि तुळज महीपाल अवनि देवेंद्र ।।
शरभेंद्र नाम ठेऊनी बसवी सिंहासनीं सुगुण सांद्र ।। ७ ।।

**सूत्रधार** : तो शरभेंद्र कैसा मणिजें सांग ऐकू.

**(श्लोक)** : जेणे गाजऊनीं स्वनाम भुवनी जे की सुखाची मुळी ।।
काशी आणि गया प्रयागहि सुखें ते ह्या त्रिस्थली सेविली ।।
श्रीमद्भोसल वंश मौक्तिक मणी जो चोळ सिंहासनी ।।
शोभे श्रीसरभावतार भुवनीं विख्यात राजाग्रणी ।। ६ ।।
एतदृश गुणासांद्र श्रीशरभेंद्रें शिवरात्र्युपाख्यान नामक नवीन नाटक निर्मिलें आहे त्याच्या प्रयोगें या सम्यास आनंदविल्यां स्वगृहदार प्राप्ती सरिसें तूझे सकल मनोरथ पूर्ण होतील ।। हे सम्य केशो मणशील तर ।।

**(श्लोक)** : वीणा वादन मिश्र गायन कला निष्णत जे चांगले ।
जे कीं मंजुळ लास्य नृत्त नटन ग्रंथी बहू रंगले ।।
काव्यलंकृती नाटकादि रचना कौशल्य थारे भले ।।
त्वद्भाग्योपचयोदयें सकल ते रंगी पहा लाभले ।। ७ ।।

**पारिपार्श्वक** : फार संतोष.

**सूत्रधार** : जरि तूझे मन संतोषाशी मिसळलें तरि या शिशिर ऋतूस अनुसरून संगीताचा उपक्रम करी.

**पारिपार्श्वक** : जी आज्ञा.

**(श्लोक)** : सांप्रत कीं-उषःकाळी बारा प्रचुरहिम धारासुमशरा ।।
सहायार्थ व्यापे हळुदबन कामोदित बरा ।।
तयासाठी कंठी दृढतर मिठी घालुनी सती ।।
गृहांती नाथाशी शयन सुख त्या भोगिति अती ।। ८ ।।

**प्र.** : येणेरीति पारिपार्श्वकाने संगीतारंभ केलियानंतरे नेपथ्यामधें

**कंचुकी** : (मान ऊंच करून) चला पलीकडे (पारिपार्श्वक पाहून जी भूत-भीतीने येतसें दिसतें म्हणून भीत असतां सूत्रधार पाहून) अरे भीऊ नको भूत नव्हे. हा वीरसेन राज्याच्या अंतःपुरांत वागणारा अवरोध पालक मण्णार वृद्ध कंचुकी. याच्या ताकीदेवरून राणी येणारीसें दिसतें. आतां आम्ही येथें असू नये. अनतरे कारणीयास जाऊं.

**प्र.** : म्हणून उभयतांही निघून जातां वृध्द कंचुकी येतो निरखा.

दरु : राग सुरूपट मल्हार ।। आदिताळ ।।

कंचुकी येतो पाहा ।। कांपत काठी रोवित हा ।। प ।।
चंचल नाचे रेलत रेलत शंकित पाहे जेथें तेथें ।। अ ।।

**प्र.** : येणेरीति कंचुकी येऊन निर्वेदें बोलतो परिसा.

**(श्लोक)** : बाल्यापासुनि चाकरी करित या म्या लोटिलें कीं क्या ।।
आंगी वर्धकहीं अतां प्रगटलें हें सौख्य भोगावया ।।
हाले मस्तक जाहली स्वकरणें हास्यास्पदें हें जनां ।।
अद्यापी मन चाकरींत रतलें वैराग्य इच्छिचना ।

दरु : हा शृंगार बाग ।।आ ।।

वासित कुसुमीं नादित भृंगी हा प्राणि मात्र मिथुनांशी ।।
रमणीय बाग येथें राणी रंजे वियोगिनी कैशी ।। ८ ।।

अथवा आज्ञाधारकास हा विचार कशाला ? कोण हो शृंगार बागाचे कार्यस्थ ऐका सांप्रत राणी येथें आल्यामुळे दंडकाप्रमाणें सर्व जागृती करा (आकार्शी).

प्र. : जी आज्ञा.

कंचुकी : चला पलीकडे

प्र. : येणेरीति रस्ता काढीत असतां पैंजणाचा झणत्कार ऐकून

कंचुकी : विद्युल्लतेची सखी सौदामिनी येतेसें दिसतें.

प्र. : मणून निघून जातां मेघमाले समवेत सौदामिनी येते निरखा

दरु : केदारी राग ।। आदिताळ ।।

सौदामिनी येते पाहा ।। सुकुमारी चतुरमहा ।। प ।।
सादर बोले सखी प्रति ।। सरस चाले हंसगती ।। अ ।।

प्र. : येणेरीति सौदामिनी येऊन मेघमालेशी बोलते परिसा

सौदामिनी : मेघमाले या शृंगार बागांत वतिका पाहा.

(श्लोक) : हा चक्रवाक हरिखें स्ववधूस पक्षीं ।।
झांकोनिया मग हळूच मुखनिरीक्षी ।।
लक्षोनि कोकिलयुवास्ववधूस बाहे ।।
चंचू पुटी धरूनि पल्लव तेंहि पाहे ।। १ ।।

मेघमाला : सखि तां अपूर्व कवतिक दाखविले

सौदामिनी : मेघमाले मजला वाटते हा बाग सांप्रत विद्युल्लतेस सुखकर होणार नाही. त्यामुळे ते येथून अभ्रंलिह सौधास त्वरेने जायील त्यास्तव आम्ही अगाऊच तेथे जाऊ.

प्र. : येणेरीती उभयताही जातां विद्युल्लता कादंबिनी नामक नर्म सखीच्या खांद्यावर हात ठेवून वन प्रति येते निरखा ।

दरु : केदारी राग ।

विद्यल्लता येते पाहा ।। विजेपरी सुंदर महा ।। प ।।
विद्याधरी जणु हे अप्सरा वनितामणी विदुमाधारा ।। अ ।।
हात ठेवोनी सखी वरी ।।
हालत मालत राजस नारी कांत वियोगें पांढरी गतिनें जिकीमत्तकरी ।। १ ।।

प्र. : येणेरीती विद्युल्लता येऊन बोलते परिसा.

दरु : शंकरभरणा ।। आदिताळ ।।

व्यर्थ जन्म सखि तीचा ।। वीर नायक ज्यास तीचा ।। प ।।
आर्तिकर मन्मथ साचा । आजि साधी वैर जन्माचा ।। अ ।।

येके दिनी हीं पतीविणे येकट न केले म्या शयना ।।
ऐक हुरहुर करी मन ।। आजि युग गमतो दिन ।। १ ।।

**विद्युल्लता** : सखि अणीक किती दूर आहे शृंगारबाग सांग.

**कादंबिनी** : विद्युल्लते, प्रवेशलो कीं श्रृंगार बागांत अशीये.

**पद्य** : मधुर हे वनराजिमदिराक्षि पांही। गमल्लिका सुमशिरीं मधुपसाने ।।
शुकवाणी हे पहा सहकार तरूवरी प्रियवधू सहित तो पिकविराजे ।।
असितायत सुकेशि अति रम्य मोर हा तेथ धृष्टनटतो तेथदृष्टीदीजे ।।
रमणैक देवते हे मयूरी पहा पाहोनी नाटय तें बहुत माजे ।।
सरसकलहंस मंडिता अलस गमने ।।
जटिल सारसनादिता चटुल वचने कमलिनी हे सरस अमलतेनें ।।
पाहोंनी सुख मनीं पावतूंसजणे ।। १ ।।

**प्र.** : येणेरिती सखीनें सांगता विद्युल्लता सखि सांप्रत सास राजा जाऊन सवंतीच्या माहेरास गेला विचार असो वसूं इच्छितें.

**कादंबिनी** : येथें या आसनावरी बसूये.

**प्र.** : मणून यथोचित बसल्यानंतरे शिवभक्त ब्राह्मण येतो निरखा.

(दरु) शंकरभरणा ।। आदिताळ ।।

शिवभक्त येतो पहा शिव शिव ऐसे गर्जत हा ।। प ।।
सवदा गिर निज सुखाचा ।। सेवक सदाशिवाचा

**प्र.** : येणेरिती शिवभक्त बागेत येऊन भजन करीतो निरखा

**(भजन)** : शंभो शंकर गिरिजा रमणा ।। शाश्वत देयीं तवपद भजना ।।

**प्र.** : येणे रिती शिव भजन कानीं पडतां विद्युल्लता उठून कादंबिनी सहित शिवभक्ता समीप येऊन नम्रतेनें बोलते परिसा.

**(आर्या)** : जी स्वामी कोण तुम्हीं सांगा येथें किमर्थ आला हो ।।
मी वीरसेन– रमणी नमितें झाल मला सुकृत लाहो ।। ९ ।।

**प्र.** : येणेरिती विद्युल्लतेने बोलून प्रणामही केल्यानंतरे शिवभक्त मौनेकडून चिमटेभर विभूते विद्युल्लतेचे हाती घालून निघून जाता ते बीभूते कपाळांस लावू घेऊन सखीस पाहून,

**विद्युल्लता** : सखि जिवलगाच्या विजय परामर्शास मुख्यामात्यनयविशारदापाशीं पाठविलीं दासीकलकंठी कां अजुणी नये ?

**प्र.** : मणतां कळकंठी येते निरखा.

(दरु) राग ललत आदिताळ ।।

कलकंठी येते पाहा कमलाक्षी कोमल देहा ।। प ।।
अलिवेणी चाले लगबगा ।। हालेनां स्वल्पहीं आंग ।। अ ।।
वाजवीत मंजुळ जंग ।। बरवें नाचे भरूनि रंग ।।
साजूक जीचे गान चांग सहज करी जना दंग ।।

येणेरिती कलकंठी येऊन.

**कलकंठी** : हा शृंगार बाग येथे आमची स्वामिणी कोठें आहे ?

**प्र.** : मणून तजविज करितां कादंबिनीचा घसा ऐकून त्या स्थळांस जाता विद्युल्लता पाहून बोलते परिसा.

**(आर्या)** : कलकंठी ये वेगें तुजला पाहूं भूकेसली हे दृष्टी ।।
सांग सुख पद मजला भूपाळाच्या सदा विजय गोष्टी ।। १० ।।

**कलकंठी** : अमात्याणी स्वामिणीस ऐशी विनंती केली.

**(आर्या)** : श्रीवीरसेन नृपती वीजयी सर्वत्र शासितारी जन ।।
होयील आजि राणी अपल्या दृष्टीस सुखदगुण सदन ।। ११ ।।

**प्र.** : येणेरिती कलकंठीने सांगता

**विद्युल्लता** : तर आम्ही अमंलिह सौधावर जाऊं चला.

**प्र.** : मणून सपरिवार जातां राजा येत्यामुळें नगर परिष्कार करा मणून ताकिद करावयास कोतवाल येतो निरदा.

(दरु) राग ललत आदिताळ ।।

कोतवाल येतो पाहा । कुशल बुद्धीचा हा ।। प ।।
सतीं ज्याचा अधिकार सर्वजनासहि आधार ।। अ ।।

**प्र.** : येणेरिती कोतवाल येऊन चारी बीदित ताकीद करितो परिसा.

**कोतवाल** : राजबीदित राहणार लोक हो, सांप्रत महाराज शिकार खेळून चारीविदी येताहेत त्याकरितां.

**(श्लोक)** : बांधा उन्नत तोरणं गजनबे येताति खांडाचरी ।
दो बाजूस बींदींत आणि जलहीं शिंपोनिया त्यावरी ।।
घाला रांगवळी विचित्र अडवें निःशेष वागू नका ।।
सौधीं बैसुनियां नृपाशि निरखा आज्ञा अशी आयिका ।। १० ।।

**प्र.** : येणेरिती कोतवालाने ताकीद केल्यानंतरें मृग विशेषांस पूढे सोडून सन्माहानिशीं राजा येतो निरखा.

(दरु) मालकंस आदिताळ ।।

राजा येतो पाहा ।। राजीव दळ नेत्र हा ।। प ।।
राजबीदींत सुंदर साजतो हा महावीर ।। अ ।।
साजीं खोविली कटयार ।। खाजेडाबेस तरवार ।।
उजव्या करीं सांग थोर ।। रंजवी लोकांशि गंभीर ।।

**प्र.** : येणोरिती राजा येऊन त्यां त्यांस यथोचित सन्मान करून अंतःपुरात येऊन बसतां कादंबिनी समवेत विद्युल्लता येते निरखा.

(दरु) राग केदारी आदिताळ ।।

विद्युलता येते पाहा.

प्र. : येणेरिती विद्युल्लता येऊन बोलते परिसा।

(श्लोक) : सखि मजशि गृहांती जो करी फार मौजा ।।
परिचित बहुवेळा तोचि हा नाथ माझा ।।
प्रथम मजहि वाटे देखतां मूर्तियाची ।
क्षमक मग कथांही कायशी सेवकांची ।। ११ ।।

प्र. : येणेरिती विद्युल्लतेनें बोलतां

कादंबिनी : हा त्याचे ठांयी आहे त्या लक्ष्मी साननिध्य विशेषणाचा गुण.

प्र. : येणेरिती बोलत येऊन.

कादंबिनी : महाराज, माझी सखी विद्युल्लता पायां पडतें. मणतां.

राजा : पुरें. प्रीतिचे ठायीं उपच्यार कशाला ? प्रियतमे, क्षेमकाय बसूये.

प्र. : मणतां विद्युल्लता आनंदातिशयेंकडून स्तब्ध उभी राहिली. तें पाहून राजा बोलतो परिसा.

(आर्या) : उदराहुनि हर्षेकी निघतां दाटण गळ्या मधे पडली ।।
यास्तव मौन तुंबाहे धरिलें मजलागि युक्ति हे सुचली ।। १२ ।।

प्र. : येणेरीति प्रीतीनें बोलून तीचा हात धरून बसवून दाटबळें तीचे मुख पाहून

रत्जा : हे काय कपाळीं तां भस्म लाविलें ?

प्र. : मणून पुशितां तिनें.

विद्यूल्लता : भस्म नव्हे शिवलांछन वीभूते.

प्र. : मणतां तीला लोटून राजा आग्रहाने बोलतो परिसा.

(श्लोक) : स्मशानवासी आणि जो भिकारी ।।
दिगंबर ब्रह्म कपाळ धारी ।।
व्याधादिकीं ताडित भूमिलोंकीं ।।
तच्चिन्ह हें सत्य धरू न येकीं ।। ११ ।।

प्र. : येणेरिती राज्याचें वाक्य ऐकुन विद्युल्लता मनामाजि विरून कादंबिनी समवेत निधून गेल्यानंतरे राजा आपला हात पांढरा कां दिसतो ?

प्र. : (मणून पाहत असतां नेपथ्या मध्ये)

(श्लोक) : उदय पाऊनि शित रूचिपरी ।।
मग हळूच चढोनि नभावरी ।।
तपत सांप्रत तो बहु तापवी ।।
रिपु उपेक्षित ज्या परि कांपवी ।। १२ ।।

राजा ऐकून दोनि प्रहर झाले काय ।। प्र० ।। मणून उठावयाचीं तजवीज करीत असतां पटाक्षेपें कडून आल्या दौवारिकानें कानामध्ये सांगितलें वर्तमान ऐकून सावेग उठून

राजा : सेनापती वीरसेनास बोलाऊन आणे.

प्र. : मणून राजा निघून जाता निष्क्रांता सर्वे प्रथमोंक: ।

प्र. : त्यानंतरे वीरसेन राज दौवारिकाने कानामधे सांगीतलें वर्तमान ऐकून विजय सेनास बलाऊ, पाठउन माहूडीवर वेधल्याठायी दुर्धर्ष राजाने आपले नगर वेढिले ते पाहून आग्रहाने येक्या तरवाराच्या सहायें कडून त्यांच्या फौजेत पडून भांडत असता शिवनिंदा पातकाने भ्रमिष्ट होऊन पडून जाऊन रानामधे अनेक श्रम भोगून अगस्त्य ऋषीच्या आशीर्वादे शिवानुग्राहास पात्र होऊन राज्यास येतां सभा प्रवेशास अगस्त्य ऋषीनीं सांगितल्या मुहूर्तामधे राजा येणार म्हणून सभा सिद्ध करावयास नयविशारदाचा आज्ञाधारक प्रियभाषण नामक दौवारिक येतो निरखा,

(दरु): दौवारिक येतो पाहा ।।
दैवांचा मी मणताचि हा ।।
पा । भाव दावी आनंदाचा ।।
राव जो स्वामी भक्तांचा ।। अ ।।

प्र. : येणेरिती दौवारिक येऊन आनंदाने बोलतो परिसा.

(श्लोक) : अहो परविभेदिनी नयविशारदाची मती ।।
अहो रिपु भयंकरा
वरचमूपतीची धृती ।।
अहो जगी सदेंव तो नृपती वीरसेन स्वयें ।।
अहो बहुत धन्य मी मणुनी गर्जतों निर्भयें ।। १३ ।।

प्र. : येणेरिती बोलून साटोप फिरून सभासिद्ध करावयास ताकीद करितो परिसा.

(श्लोक) : काढ भीड अतां समग्र उजळा या दीपयंत्रावळी ।।
चातुर्ये झणि या सभेशि खुलवा हैं वेळ कीं चांगली ।।
घाला दोनि नृपासनें निकट त्या श्री मंत्रिवर्यासना ।।
त्या सेनापतिचेंही आसन अशी ताकीद आणा मना ।। १४ ।।

प्र. : येणेरिती ताकीद करून वर पाहून दौ. ।।
कोण हा ऋषी दिव्य स्त्री पुरुषांसमवेत येतो.

प्र. : मणतां तैसाच ऋषी येतो निरखा ।।

(दरु.) : राग विभास आदिताळ ।।
ऋषी येतो पाहा ।।
भूषित जटा भरे हा ।। प. ।।
शोषित शरीर तपाने ।।
असमान निज तेजाने ।। अ ।।

प्र. : येणेरिती ऋषी येऊन सभा पाहून

ऋषी : अप्सरा गंधर्व हो हे सभा पाहिली काय म्हणता ।। प्र. ।।
ते बोलताहेत परिसा.
जी स्वामी पाहिली
इतके दिवस सुधर्मावर आहे
त्याकरिता श्रेष्ठ म्हणून समजलों होतों सांषत.

(आर्या) : जाणों असें सुधर्मा इजसी तुळणे तमाऊनी लघुता.
इंद्राशि शरण गेली केली
केंली तेणेंची मानुनी स्वस्था ।। १२ ।।

प्र. : येणेरिती अप्सरा गंधर्वानी सभा वर्णन करित असतां दौवारिक जवळ जाऊन.

दौवारिक : मी वीर सेन राजाचा दौवारिक म्हणून त्या ऋषींस नमस्कार करून स्वामी. आपण कोण कोठे आलां हे दयाकरून सांगावे.

प्र. : मणताऋषी बोलतो परिसा. अगा दौवारिका, या अप्सरा हे गंधर्व मी भरत ऋषी

(आर्या): दुर्धर्ष भूप आल्यानंतर जे चालिलें वनी येथें त्याचा अगस्त्य ऋषीने रचिला नव नाटकासख्यसुग्रंथ ।।१३ ।।
तो मन्मुखे ययांशी सर्वही अभ्यास करविला आजि त्याचा प्रयोग कीजे मणउनी आलों यथा सभेमाजी ।। १४४ ।।

स : सांप्रत यांस वेष घालावयास जातो.

दौवारिक : मी हीं अमात्यांस हे वर्तमान कळवायास जातो.

प्र. येणेरिती येकंदर जातां नयविशारद विजयसेनांचा हस्तलाग घेऊन अगस्त्य ऋषीस पुढे करून राजा येतो निरखा.

(दरु) राग खट आदिताळ ।।
राजा येतो पाहा ।।
राजशेंखर धक्त हा ।। प ।।
वाचेस धरितां शिवनाम ।।
ज्याचा पूर्ण झाला काम ।।

प्र. : येणेरिती राजा येऊन अगस्त्य ऋषीप्रति बोलतो परिसा.

(श्लोक): जेथें समस्त सुहृदां बहु रंजविले ।।
जी माजि बसुनी नये जग पाळिलें ।।
जी जी अगस्त्य ऋषी हो आपल्या कृपेने ।।
हे म्या सभा निरखिली फिरुनी सुखाने ।। १५ ।।

प्र. : येणेरिती बोलून अगस्त्य ऋषीस येक्या राजासनावरि बसऊन आपणहि दुसऱ्या राजासनावरि बसल्यानंतर नयविशारद विजेयेसेनहि आपल्या आपल्या आसनांवरि बसतां अगस्त्य ऋषींचीं आज्ञा घेऊन मंजुरव नामक सुत्रधार नाटकार्थ संग्रह नांदी श्लोक मणतो परिसा.

(श्लोक): प्रथम गणपतीला पूजुनी शारदे तें ।।
स्तवुनी तदुपरी त्या वंदुनी सदगुरुते गतविभव जयानें वीरसेनाख्य राया. ।।
परतुनी दिधला त्या वंदितो देववर्या ।

प्र. : येणेरिती, सुत्रधारानें नांदी श्लोक म्हणाल्यानंतर नेपथ्यामध्ये आहदुर्धर्ष राजाचे सैन्य कल्याण नगरीच्या किल्ल्यास येऊन लागले.

प्र. : येणेरिती हाक ऐकून राजा यथार्थसे मानून ससंभ्रम उठून तरवार उबसून.

राजा : विजयसेना.

(श्लोक) : प्राकारावरि शब्द वेधक धनुर्धार्‍यांशिने माझणी ।।
द्वारी मत्तगजांसी आणिकवचे लवोनि वीराग्रणी ।।
आतां शीघ्र निघोत ते मज सवे जे सद्यश प्रार्थिती ।।
आज्ञा या परिसैनिकांशि करूनी युद्धाशिया मागुति ।। १६ ।।

प्र. : येणेरिती राजा बोलतां नयविशारदानें महाराज पूर्वील कथा वर्णिजेते यथार्थ नव्हे.

प्र. : मणतां यथा प्रकार आसनावर बसून राज्यानें ईश्वराचें ध्यान करून रा० ।।
चा चालूं के ।। मणतां (नेपथ्यामध्यें).

(श्लोक) : राजा सत्वर शत्रू सैन्य अवघे उल्लघुनी चालिला ।।
त्या सेनापतीचे ठिकाण न कळे मंत्री घरी राहिला ।।
हा दुर्धर्ष खटाळ अंत शिरला झाली तयाची पुरी ।।
आम्हा भूपति वीरसेनचि तया धुंडू चला भूवरी ।। १७ ।।

प्र. : येणेरिती नगरवासी जनांची सप्रेमदैन्योक्ति ऐकून राजा विमनस्क असता.

सूत्रधार : (सूत्रधार राजास पाहून) महाराज या परीं नगरवासी जन निःशंक बाहेर जाते वेळेस नयविशारदानें सांगून पाठविली तजवीजच चांगली मणून कादंबिनी समवेत गावां बाहेर जावयास निघाल्या. विद्युलतेचा वेष घेऊन कादंबिनीचा वेष घेतल्या तिलोत्तमे समवेत मंजुघोषा नामक अप्सरा येते.

प्र. : मणून निघून जातां विद्युल्लता येते निरखा.

दरु : राग रामकली आदिताल.

हा कैशी येऊ बाहेरी ।। प ।।
हे सोडी वेणी सखेबाई ।। हे काढिलेणी अगायी (अ)
सदनी मृदतर शयनी बैसुनी सरस नेऊनी नृप पदवी नेदित ।।

प्र. : येणेरिती विद्युल्लता येऊन सखी प्रति बोलते परिसा.

(पद्य) : कोण्या स्थळी बहुत कोमल क्षितिपाळ काय भोगीत की कष्ट सजणी ।।
कशि करूं गति सांग कवणदावी मला निजकांत राजया विजनी राणी ।।

माय बापास मुख काय मणुनी दाऊं परिभवा पावोनि वीरराणी ।।
जननी गृहीं केंवि दिन कंठु मी तरी जन हास्य सोसुनी दीनवांणी ।।
अहह दुर्धषें केंवि हा अति बळी झाला ।।
वचक कशि वाटली वीरसेनाला ।।
विजये न रूचें केंवि विजयसेनाला ।।
भव सत्य कोपला भाव हा कळला ।।

प्र. : येणेरिती सखीशी बोलत गेल्यानंतरे राजा अगस्त्य ऋषीस पाहून,

राजा : स्वामी अनंतर तीची गति काय झाली कीं.

प्र. : म्हणता अगस्त्य ऋषी पुढे व्यक्त होयील मणाल्यानंतरे सरोवरास स्नानार्थ अगस्त्य ऋषी येतो निरखा.

(दरु) : जोगिया आदिताळ.
आगस्त्य ऋषी येतो पाहा ।।
अगाधाभ्दुत चरित्र हा ।। प ।।
सागर जेणे आचमिला वेगें विंध्याही निजविला ।। अ ।।
(येणेरिती अगस्त्य ऋषी येऊन सायंकालास किती अवकाश आहे मणून पाहून).

अगस्त्य : काय हें पाखरूं माणसावर झेपावतें.

प्र. : मणतां पांखरा कडून खिदडिजेत कोणी येक पुरुष पटाक्षेपें कडून फिरत.

पुरुष : येऊन स्वामी या पांखरास पासून चुकवून माझे संरक्षण करा मणता (अगस्त्य ऋषी हुंकाराने या पाखरास हाकून पुरुषास प्रश्न करितो. परिसा.

(श्लोक): बारे सांग भिऊ नको कवण तूं देही दिसे कुष्ठतो ।।
तुझें वृत्त समस्त हीं मजकळे ज्ञाने तरीं पूसतों ।।
कारे येथवरी तुला खिदडिलें लोहंचमाख्य द्विजे ।।
स्वप्रारब्ध कथूनि भोगुनि नरें दुःखा परीं लोटिजे ।। १८ ।।

प्र. : येणेरिती प्रश्न करुन त्याच्या मुखे सर्वही ऐंकून राजा ईश्वरा सरिस विभूतीची निंदा करून तां भूमंडळभर विभूतीचा वियोग देहाचे ठायी. विभूतीचा वर्णही संपादिला सांप्रत पंचाक्षरी उपदेश घेऊन शिवपूजा करे तेणेकडून तूं यथा प्रकार सुख पावशील.

प्र. : मणतां राजा बोलतो परिसा.

राजा: (आर्या) पूजा कधीं करावी न कळे मज हे परंतु दृढ भावे ।
तुम्हाशि शरण आलो यास्तव मजला प्रशस्त सांगावे ।। १४ ।।

प्र. : येणेरिती राज्याने विचारितां अगस्त्य ऋषी सांगतो परिसा ।।

(आर्या) : पूजा नित्य करावी माघसितेतर चतुर्दशी रातीं ।।
जे पूजिती विशेषें चौ प्रहरीं त्यांशि सर्वहीं भजती ।। १५ ।।
वारे तुझ्या योगें आजि शिवरात्रि लाभली आज पंचाक्षरी उपदेश करितों ।।

प्र, : मणून आपल्या बरोबर स्नान करऊन जवळ बसु घेऊन पंचाक्षरी उपदेश केल्यानंतरें राजा ईश्वरानुसंधान करितां पार्वती समवेत परमेश्वर प्रत्यक्ष येतो निरखा.

दरू : देवगांधार
अखिताळ ।।
परमेश्वर येतो पाहा ।।
परमदयाकर हा ।।
प ।। स्मरता पावे भक्तांला ।
शशिशेखर हा भोळा ।।

प्रः : येणेरीती परमेश्वर प्रत्यक्ष येतां तत्समयीं वीरसेन राजास परमेश्वर प्रत्यक्ष जाहलें तें कवतिक पाहावयास तेत्तीस कोटे देवांसरिसें देवेंद्र येतो निरखा ।।

दरू : राग देसकर ।। आदिताळ ।।
इंद्र येतो पाहा ।। इंदु शेखर भक्त हा ।। प ।। मंदारदिकांचा धणी वृंदारका-समवेत झणी अ ।।

प्र. : येणेरीती इंद्र येऊन अमराळी समवेत स्तोत्र करितो परिसा.

(श्लोक) : क्षण ध्यान केले या वीरसेनें ।।
झणी तारिलें चंद्रमौळी कृपेनें ।।
भवा भक्तवश्वा शिवा सर्व भावें ।।
तुझें सर्वदा दास्य आम्हा घडांवे ।। १८ ।।

प्र. : येणरीती समस्त देवांनी परमेश्वराचें स्तोत्र केल्यानंतरे राजा पार्वती परमेश्वरां-वरून पुष्पांजली विखरून हात जोडून उभा राहून प्रार्थना करितो परिसा.

(आर्या) : मी सापराध सदया पापी मी परम पावन परेशा ।।
दीन अनाथहि शंभो सांब झणी उत्धरी यथा दासा ।। १६ ।।

प्र. : येणेरीती प्रार्थना करितां पार्वती समवेत परमेश्वर बोलतो परिसा ।।

(आर्या) : आम्ही प्रसन्न झालों तुजला बापा सुमंत्र उपदेशें ।।
संगे अगस्त्य ऋषिला घेऊनि तूं पाव झटिति निज देश ।। १७ ।।

प्र : येणेरीती राज्यास निरोप देऊन पार्वती समवेत परमेश्वर अंतर्धान पावल्यानंतरे नेपथ्यामधें.

(श्लोक) : बाहेरी जयसेन सैन्य पतिने च्यारी कडें वेढिले ।।
गावीनीति विशारदाख्य सचिवेंत त्सैन्यहीं भेदिलें ।।
हें ऐकोनि सुरंग मार्ग धरूनि दुर्घर्ष गेला अरी ।।
आली हें परिसोनि तात विभवे विद्युल्लता मंदिरी ।। १३ ।।

प्र. : येणेरीती चालिलें वर्तमान ऐकून राजा नयविशारद विजयसेन या दोघांस सप्रेम पाहून अगस्त्य ऋषी प्रति.

राजा : स्वामी ईश्वरानुग्रहें राज्य प्राप्ती झाली तरी या दोघांची स्वामिभक्ती पाहिली काय ?

प्र. : मणतां अगस्त्य ऋषी राजायांची स्वामिभक्ति विद्युल्लतेचे श्रमहीं तुजला विदित व्हावे मणूनच म्या हा उपक्रम केला तुजला आणीक काय इष्ट सांगतेही पुरवितों.

प्र. : मणतां राजा बोलतो परिसा.

(श्लोक) : गेला कुष्ट शरीर पुष्ट तर हें झाले अणी तो भयें ।।
गेला दुष्ट रिपू अलें परतुनी हें नष्ट राज्य स्वयें ।।
झाला तुष्ट शिव प्रभू मणउनी मी श्रेष्ठ झालों जगीं ।।
माझें इष्ट समस्तहीं पुरविलें शिष्टी कृपेने क्षणी ।।

प्र. : येणेरीती राजाचें वाक्य ऐकून अगस्त्य ऋषी आशीर्वाद करिता परिसा

(श्लोक) : सदृष्टिनें कणिशशालिनिसस्पवृत्धी ।।
हो वोजनांस निपजो निज धर्म बुत्धी ।
सेवोत संतत नृपा तुज तीनि शक्ती ।।
ऐशी निरंतर घडो आणि इश भक्ती ।

प्र. : येणेरीती अगस्त्य ऋषीनीं आशीर्वाद केल्यानंतरें राजा विद्युल्लतेस सांत्वन करावयास सपरिवार नित्यानंद मंदिरास येतो निरखा.

दरु : देशाभि ।। आदिताळ ।।

बख्या नित्यानंद गृहाशि ।। बहूत हर्षे गुणराशी ।। प ।।
परिवारासही तेहा ।। वीरसेन आला पाहा ।। अ ।।
तत्समयी सूत्रधार या ग्रंथकर्त्यास आशीर्वाद करितो परिसा.

(श्लोक) : मोदें बैसउनि शिवाजि तनया सिंहासनीतन्मुखें ।
पालो श्रीशरभेंद्र हे वसुमती पौत्रादिकांची मुखें ।।
पाहोनी नरपाळ चिन्ह उजळें तो पूर्ण काम क्षितीं ।
नांदो शाश्वत सर्व सेवक जनीं इष्टर्थ दे स्वाश्रितीं ।। २२ ।।

इति श्रीचंद्रमोळीश्वर प्रसाद लब्ध चोळ सिंहासन संपत्संतति–

**भोंसळ कुलपयोनिधि सुधाकर राजाधिराज महाराज छत्रपति वसुंधरा मंडलाखंडल श्रीशरभेंद्र भूपाल विरचित श्रीशिवराव्युपाख्यान नाटके द्वितीयोंकः समाप्तः ।।**

---



तंजावरचे शेवटचे राजे शिवाजीमहाराज

(कारकीर्द इ. स. १८३२—इ. स. १८५५.)

# राजे शिवेन्द्र कृत उर्फ राजे शिवाजी (दुसरे)

## नटेशविलास नाटक

शुभमस्तु ।

जयजय शिवरेशवीर । जय जय भवसौख्यकर । जय जय नवीसोमधर । जय निगमसार ।। १ ।। जय पार्वती हरण । जय हासरंगाभरण । जय परमसुखसदन । जय पापहरण, जयभूतिसल्लसित । जयभूति सगुणभरित । जय भूप शिवविनुत । जय भुवनकांता ।। २ ।।

दरू : तोडी ।।

शरण शंकर चंद्रशेखर । शरण शाश्वत सुखकर ।
शरण पंकजजातिसुरवर । शरणशंकाकारक । परा ।।
शरणकनकाचल सुकार्मुक । शरण केशव सायका ।
शरण दीन जनार्तिहारक । शरण देशिक रूपका ।
शरण नवनवसत्कृपाकर शरण भवभयपारिका । शरण शिवकल्याण सुंदर ।
शरण शिवनृप सादर ।।

**सुरटि** : चंद्रमौलिश्वराय जय मंगळं ।। सांद्रकरुणाकूपाराय शुभ मंगळं ।
इंद्रादिक सुरवंदिताय जय मंगळं । चंद्रस्फटिका पदातीय शुभ मंगळं ।
मंदस्मित विलसित वदनाय जय मंगळं ।
मणिहंसिक शोभित चरणाय शुभ मंगळं ।
कुंदम्यति निभशुभरदनाय शुभ मंगळं ।
कुतुकीकृत निजभक्तजनाय शुभ मंगळं ।
शिवाभुजलतांगिताय जय मंगळं ।
श्रीतजनिकल्प महीरुहाय शुभ मंगळं ।
शिवदायक गुणसंदोहाय जय मंगळं ।
शिवभूपतिवरवंदिताय शुभ मंगळं ।।

**श्रीकृष्ण :**

**सूत्रधार** : येणेरिती नाटचारंभ झाल्यानंतर सूत्रधार गंगभूमीस्थळी सरसकविवर विरचित श्री नटेश विलासाभिधान नाटकानुसंधाने चतुरवर सभासदनिकर मनोरंजन करावया कारणें विघ्नहरणाची प्रार्थना करितो परिसा.

**(श्लोक)** : प्रसन्नानीन शीघ्र प्रत्यक्ष न्हावे । प्रजारंजनी फार प्रजयीशी ज्ञाती ।।
प्रसार करितो प्रभू आदिदेवो । प्रभावें तुझ्या हे प्रसिद्धीसी पाहीं ।।

**सूत्रधार** : येणेरिती विघ्नहरणाची प्रार्थना करोनी निजवाणी नव सेहणें शीणावयाकारणे वाणीचे स्तवन करितो परिसा

वाणी तूं वशाशी कृषे जरि तरी वाणी महा शारदे ।।
वाणी कानि सुखाशि जो सकल गीर्वाणी गुरुसा वदे ।

आणी सिद्धी मंदिरासी भुवनीं आणीक जे जीवसी ।।
वेणी सत्कविता स्वरुप मज दे येणाक्षणें सौरसे ।।

सूत्रधार : येणेरिती वाणीचें स्तवन करून अज्ञान तमस्तोमनिवारणी वासरमणी ऐश्या श्रीगुरुचा स्तवन करितो परिसा.

(श्लोक) : जे ब्रम्हा निरंजन वास्तुते । तूं सच्छी सुखात्म तनुचिद्विभवानि हेतू ।
तारु भवांबुधिनताप्रति मुख्य सेतू । वंदूं भवत्पदयोग गुरुराम सेतू ।।

सूत्रधार : याप्रकारे सद्गुरुचे स्तवन करोनी निजकुलदेवता श्रीचंद्रमौलीश्वराची प्रार्थना करितो परिसा.

(श्लोक) : श्रीसांबगौरीवर चंद्रभूषा । श्रीकंठ शंभोनत भक्ततोषा ।।
देवाधिदेव करुणा समुद्रा । देई कृपें नाभित सर्वभद्रा ।।

सूत्रधार : येणेरिती चंद्रमौलीश्वराची प्रार्थना करून नाटकार्थ संग्रह नांदी श्लोक वदतो परिसा.

(श्लोक): श्रीमान् देवशिखामणी शिवधणी । जो मायबापाहुनी ।।
प्रेमाने पुरवी लळे । निजजनस्तोमा ।
शिवानी मनी । जो मानी नटता सुरौध नमिती सोमा तयो सर्वदा ।
सोमालंकृत चूडशुभू बहुधा क्षेमासि देवो सदा ।।

सूत्रधार : याप्रकारे नाटकार्थ संग्रह नांदीश्लोक वदल्यानंतर नाटकारंभ विघ्नहराची प्रार्थना केल्याकरिता तो दयाकर विघ्नतनुस्तोम दिवाकर प्रत्यक्ष येतो म्हणून सभासदांस सावध करायाकारणें दौवारिक येतेसे निरखा.

दरू : ( व्यागडा ।। आदिताल ।। )

गणदास येतो हा गज रे नाचत हासत महा ।।
गणपति येतो म्हणुनी हा । जाणवाया सम्यसमूहे ।। अ ।।
अतिप्रेम सुमुख चारित्र हर्षे गाति ये वामनगात्रा हाति कांचनाची ती वेत्र ।
हावभाव दावी विचित्र ।। १ ।।
गातगातचि पेंखीं । ताना । हात लावोनियां काना ।
हा तनाना करीतो नाना ।। पोतसा जो प्रिय गजासनास ।।

सूत्रधार : येणेरिती गणदास येवोनी सभासदांस सावन केल्यानंतर गणपती प्रत्यक्ष येतसे निरखा.

दरू : ( गौळीपंत ।। आदिताल ।। )

गौरी नंदन येतो पाहा । गोजिर रूपी सुंदर महा ।
स्वारी करी बरी । अंदरावरी हा ।
चारी अत्रा ज्यासी वर्णिती सहा । मोदुक पाशांकुशरद हस्ती ।
मुक्तामाळा पदकी कमरी । प्रशस्त मांदे डुले कवसीद मंदचि मस्ती मुख्य गजानन ।
से वस्ती ।। रत्नमुकुट भव्य शोभे रावरी ।

रमणीय कंकण साजती करीं। ताना फेंकी नानाविव्र बहु कुसरी।
तक्वतधिंग गण नाचे परोपरी।

**सूत्रधार :** येणेरिती गणपती येऊन सकल विघ्न निरसिल्यानंतर चहुंकडे पाहून अहो सिद्ध आहे रंगळ मंगळ विधी

**(श्लोक) :** वेदसंधविशाल आणि विविदांक खाचि शाखा जया ।।
।। शास्त्रे वृत्त सुनाच्या पुष्परस सत्याहित्य गानक्रिया वाद्यासी साहगंध पुष्पद महाविद्यास्स आनंदतो।
ज्याचे सत्फल सखासुरतरु या रंगणी सांजितो।
आर्या घनघन नाद विराजे।
आनंदाच्या शुद्धरव गाजे।
सुसुशिर खहिजे। सतत ततारावये बहुसाजे ।। हें रंगप्रसाधना ।।

**सूत्रधार :** (नेपथ्या कडे पाहून) अरे पारिपार्श्वका येथे ये.

**पारि० :** जी मी सिद्ध आहे. आज्ञा करूवी (करावी).

**सूत्रधार :** अगा ये पारिपार्श्वका, सकलजनमनश्रवण नयनानंद करण्याविषयीं मी आज्ञापिजेलो.

**पा० :** कोणाकडून ?

**सूत्रधार :** संख्याकडोनी.

**पा० :** कोणते सभासद ?

**सूत्रधार :** येथे श्रीमतभोंसलकुलकलशोदधिकलानिधि राजाधिराज श्री शिवाजी महाराजें क्रियमाणें नव नवगणेशोत्सव. विलोकन संतोषभर भरित. चतुरवर नर मिळाले आहेत. ते कैसे म्हणशील ?

(पंचचामर वृत्त भेद ।।)

सुवाक्पति कलेशयेक। देवनाध मंडळी।
कलानिधी तसा सखा अधांतरींच डंडळी। बृहस्पती कलानिधी।
कवीशसर्व येथिले। शिवप्रसाद आमचे मही सुभाग्य आथिलें ।।

**(आर्या) :** रिधि लाहती शोधक जे सजौनियां अंजानाशिनी नेत्र।
गुंख्याग चमत्कृतीरस हे जाणली नीतिशास्त्र ।।

**(श्लोक):** कीर्ति भल्यांवरी सदैव अनुग्रहाचे। दंतिकी दापि जगतीं न दुराग्रहाचे।
पूर्ति श्रुतिस्मृति पुराण समस्तशास्ति। वर्ते-सर्भे-वसती पंडित भट्टशास्त्री।

**(श्लोक):** गानप्रिया कुशल जें कलकंठकंठी ।। नाच्यक्रिये तः जणूं नीलकंठी ।।
साहित्यसत्सुममरंद मिलींद जे कीं। शृंगारसार विदही लसती विलोकी ।।

**सूत्रधार :** एश्याचा अलभ्य योग घडला आहे की त्यास्तव. या सभेत उचित श्री नटेश विलासाभिधान शृंगार वीर रसप्रधान नवीन नाटक नाचवून सभासदांस रंजन करवोनी आत्म्याते कृतार्थ करूं इच्छितो.

पा. : कोण त्या रसाळ ग्रंथाचा निर्माता ?

सूत्रधार : अगा ये पारिपार्श्वका. तो ऐकिला नाही काय ? यो नलियुगमाजी. बहु प्रख्यात भोंसलकुल तें परस्परीं सांगतो ऐका.

(श्लोक) : जगी क्षत्रियांमाजि जे श्रेष्ठ राजे तयाची महावंशवल्ली विराजे।
महाराज तो शहाजी मुख्य पाहे। तयाहूनि विस्तारले भूप पाहे ।।
येकाजी जो पुत्र त्याचा निघाला। आला युधें तो रिपूलागि घाला।
घालोनि तो चोळ सिंहासनाचा। राजा होता जे (खे) दगिला जनांघाचा।

(आर्या) : त्याचा सुत तुकोजी पाळी सर्वांसि राखुनि राजी ।।
तत्सुत प्रतापसिंह प्रताप पहातां नृपांत जो सिंह ।।
तत्सुत तुळजेंद्र भला ज्ञातर जनपालनी भरा निभला ।।
तत्सुत शरभेंद्र ज्ञाता दाता महीं शरभेंद्र ।।

(श्लोक): वर्णू एकमुखी तयाप्रति कसे भागेल तो शेषही।
ज्या सांछी दृढ भक्तिवेद पढला भावेंशी निःशेष ही।
यात्रा सर्व करोनी आणि महा दाते करी जो भला।
पत्नी युक्ती म्हणोनी जो शिव पाहातत्पुत्रता लाभला ।।

(श्लोक) : ब्रम्हा विष्णु तसाचि हा शिव पहा हे येकत धीगणा ।।
नामें भेद जनावतो शिवकृपे पाळू भल्याच्या गणीं ।।
राजोजो शरभेंद्र त्याहुनि जगिं जन्मे अहल्योदरी ।।
ज्ञाता धीर उदार शूर वसुधालंकार तो केसरी ।।

(पद्य) : अनुपम ज्ञातृत्व अज्यभवहाचनी। अखिलपालन देव अच्युत चकी। अमित सुख दे जना आदिशंकरचकी। अति विभव पाहतां अमरपति की। अगणित सुप्रताप आदित्य हेच कीं। आल्हादकर महाअब्ज हा कीं। अंगलाहुनि मदत अवतरलाच की। अष्ट दिक्पतिच अंशगणनीं सरस सुखरुप अतिसुकुमार मूर्ति सकलभुवन व्याप्त भव्यशुभकीर्ती। सिद्धिअष्टेश्वर्य नामकृपेला की। सिंहासनी नृपती सिंह शिव पाहा ।।

वचन : एतादृश सकलगुणगणरत्नाकर श्री चोळ देशनृपवर या ग्रंथाचा निर्माता।

पा० : अगा ये सूत्रधारा, चतुःषष्टिकला प्रवीण जगत्प्रसिद्ध चोळदेशाधिप श्री शिवाजी महाराज ह्या ग्रंथाचा निर्माता काय। तरी सभासिदांचे तुझेही मनोरथ सफळी होतील.

सूत्रधार : चहूंकडे पाहून अगा ये पारिवार्श्वका, सकल जनमनसंतोषकारक वर्षाकाल शोभतो पाहा.

(आर्या) : विजयी नृपा विसावा ताप शमे हे ऋतुचे। थोर महा धन पुष्पवृष्टी होती।
नाचिन स्त्रीक नीलकंठ पाहा।
हे भारतीवृत्ती प्रस्थापनांग। नेपथ्यामध्ये अहो नीलकंठ श्रीनटेश कुठें कुठें।

**सूत्रधार** : अगा ये पारिपार्श्वका, मघा इजेल्या. आर्येचा अर्थ. स्वाभिप्रायनुसार कल्पून शिवकामसुंदरीची दूतिका आणिमासिद्धी. श्री नटेशास धुंडीत येतसी. दिसते. आम्ही अनंतर करणियास जाऊं. म्हणूनी दोघेही निघाली गेले असतां अणिमा येतेसी निरखा.

**दरू** : शंकराभरणं ।। तिस्त्र ।।

अणिमा येतसे सुंदरी । अतिशालोदरी । मणिमालाभूषण भारी ।।
मानी धन निजांतरी । मदन कार्मुकसिंजनी मधुर गायनी ।
परिहंसकर वर्णु जिणी । मंदस्मितवदनी सुंदरेशाचे घटनी सुंदरी ।
विहारे वनीं ।

**सूत्रधार** : येणेरिती अणिमा येऊन फिरून पाहाते.

**वचन** : हा भ्रमले भ्रमले अणिमा नटवरे कवणेवरी मोहानि गुंतला की रे ।

**सूत्रधार** : म्हणून आपआपणांत बोलते निरखा परिसा.

**(लघुपद्य)**: भुवनमोहन मूर्ति भूतिभासूर तनु । भूतिदायक कोण भुलवी जिला ।
काम जयशील शिवकामसुंदरी सर्वकामपूरक अजि का न आला ।

**सूत्रधार** : याप्रकारे अणिमा दूतिका शिवकामसुंदरी नटेशाच्या संघटन विषयीं आलोचना करीत असता साटोप फिरून आकाशी कान देऊन.

**वचन** : अगा ये पारिपार्श्वका श्री शिवनाम मधुरध्वनी ऐकूं येतो पाहा.
गोड गात नाचे महा । गोजिर वाटे जनसमूहा ।

**सूत्रधार** : याप्रकारे गुंडोदर आल्यानंतर अणिमा बोलते.

**वचन** : अगा ये गुंडोदरा, भुकिपणें विंध्यपर्वतास जिंकिला आपण अद्यापि का न उंचालास ?

**गुंडोदर** : असो अवो अणिमे अष्टमहासिद्ध त्यात तूं वडिला जाहलीस तरी अद्यापि लहानपण सोडले नाहीसेमनुष्याची प्रकृती भिन्न भिन्न असते हे समज ते असो तू एकली या वनीं कोणच्या कामास फिरतीस ?

**सूत्रधार** : येणेरिती गुंडोदराने विचारतां अणिमा बोलते परिसा.

**(आर्या)** : शिवकामसुंदरीते. सिणते कामें बहुत दिनरजनी अभूसभेच्या तिजसी
जुड मी फिरतां जनी विजनीं ।।

**वचन** : असो श्री नटेशाच्या लडिवाळ बाळाहुनि प्रियकर ऐसा तूं त्याते सोडून येथें यावयास कारण काय ते ऐकूं इच्छितो.

**वगुडा** : अवो ये अणिमे आश्चर्य सांगतो ऐक.

**(लघुपद्य)**: कामजनिता स्वये कामिनी होवोनी सोमा तया भुलवू ।।
काम करूनि हेमाम तनुवरीत्या मोहिनीकडुनी । हा मोहला सौख्यधाम मानी ।

**वचन** : त्यास्तव मीही श्रीनटेशास धुंडितच आलो.

अणिमाव : पंतपरमलाभ, परमलाभ दैवी विचित्रा गति शिवकामसुंदरीस क्षणमात्रही नली संभवाणीर ऐसा श्रीनटेश परस्त्रियेचा छंद सोडून माझ्या स्वामिणीस कैसा स्वाधीन होईल

गुंडाव : त्यासी ऐसा उपाय करावा.

सूत्रधार : याप्रकारे दोघेही एकांत बोलत असतां नेपथ्यामध्ये जोडल्याचा झणत्कार ऐकून अणिमा अगा ये गुंडोदरा माझ्या विलंबनास त्या शिवकामसुंदरीने पाठविलेली महिमा येतेशी दिसते. मी त्वरेने स्वामिनीपाशी जाते, तूंही त्या कार्यात जाग्रता कर.

सूत्रधार : ऐसें म्हणून दोघेही निघोनीं गेल्यानंतर महिमा येतसे निरखा.

दरू : सावेरी ।। आदि ।।

महिमा यतेसे पहा मदशालिनी महा ।।
पहिला प्रीतीची हे पार्वतीशीं लपला हे ।
हेमवर्णी साजिरी व्योमभेदी कुचागिरी जोडव्याचा झणत्कारीं ।
जोमे चाले सुंदरी ।

सूत्रधार : येणेरिती महिमा येऊन वनसौभाग्य पाहानी.

महिमाव : अशा वनांत शिवकामसुंदरीशीं श्रीनटेश केविं हरेल श्रीनटेशाचा शोध घेतला असेल.

सूत्रधार : म्हणतीस धुंडत वनवर्णित पहा.

दरू : आनंद ।। आदि ।।

रमणीय दारुकावनीं । रतिपति मदन ।। प ।।
रमणी रमणीचे मन ।। अ ।।
मधुर शुकपिक हे गाती मयूर सरस नटती मधुकर ।
गुंजत सुति देत । मन अभ्यंतर सुखविती ।। १ ।।
पवने सव्दंश स्तनती । फाले सुस्वर ते निगुती ।
जिवकपोत हुंकृती । जे कीं सुंदर तालप्रकृती ।
खेसरकुविज जांवळी केळी कोसफल नारळी ।
रसाळादि कीस फळ रतल्या पाहे सुभवल्ली ।।

सूत्रधार : येणेरिती वनवर्णन करीत असता नेपथ्यांत घुंगुराचा घुश्याचा(?) ध्वनी ऐकून नंदिकेश्वर येतेसा दिसतो.

सूत्रधार : म्हणताचि नंदिकेश्वर येतसे निरखा.

दरू : अठानि ।। आदिताल ।।

नंदिकेश्वर येतो पहा । नंदिनीय सद्गुण महा ।। प ।।
बंदी शंबराचा प्रियकर हा । वंदी बर्हि देवसमूहा ।। अ ।।
नाना कुशलता जाणता । नाच्यहावभावी ज्ञाता ।।
ताना फेकी नसे समता ताकीद करी जो समस्तां ।।

**सूत्रधार** : (याप्रकारे आल्यानंतर.) महिमा : अगा ये नंदीशा यावे. यावे. या वनांत तृणवल्ली फार. सुरी वाधीन वाढला. आहे ता परंतु पशुपतीस सोडूनी येथे आलास. ते युक्ती सभासत नाही. (समजत ?)

**आर्या** : मेरु धरा धरी अवित्या न गुणंनि आलास येथ जगदीशा ।।
तृणलाभ मेरुलाभ हुनि मातिसी मुदेय सुज्ञान हृदीशी ।।

**सूत्रधार** : येणेरिती महिमेने बोलतांचि नंदिकेश्वर बोलतसे परिसा.

**वचन** : अवो ये महिमे भाग्यमदे सोन्यास स्तवितसे जाण ते सोने
तृणाहुनी उणे मानिता त्याविषयी सांगतो ऐका.

**आर्या** : भूकी ती ही न शमेना ।। मसूमा कैसी वात हे मानी ।।
तृणफलचि अन्न मानी अन्नाहुनि सर्व म्हणुनी हेमाने ।।

**सूत्रधार** : याप्रकारे नंदिकेश्वर बोलतांचि महिमा बोलते परिसा.

**आर्या** : अन्नब्रम्हचि हे तृणचा धासेविति पशूची नंदीशा ।।

**नदिआर्या** : दोराशी सर्पसम की दूर्वाही वाहताती सर्वेशा ।।

**महिमा** : दूर्वातृणादि अंगिकार किरणीं री ऐसा
श्रीनटेश धर्मेची अर्थेच कामेच नातिवरामि.
म्हणूनि प्रावरी त्या प्राणवल्लभिस वंचना करून अन्यकांतास की जाहला नवतो शब्द नटेशास. अतिप्रीति प्राप्त ऐशा तुजवरीच येईल त्यास्तव शिवकाम सुंदरी श्रीनटेशा च्या संघटनविषयीं त्वां उपाय रचावा.

**नदी०** : अवो ये महिमेच्या कराने सर्वज्ञ ऐशा यजमानास त्याविषयीं सांगणे युक्त नव्हे. त्यास्तव नारदाची भेटी जाहल्या सांगतो. यजमान आणि यजमानीण दोघेही अत्यंत संतोष मिळोनी. असणे मजला आणि तुजलाही मुख्य जाहला. स्तव नारदाची भेटि तुला जाहला तूंही कळिव.

**सूत्रधार** : येणेरिती नंदिकेश्वर बोलून निघून गेल्यानंतर.

**महिमा** : ब्रम्हवीणेचा सूर ऐकू येत्यावरून नारद येतोसा दिसतो.

**सूत्रधार** : मणतांच नारद येतेसे निरखा.

**दरु** : (मोहनं ।। मिश्र ।।)
नारदमुनि येतो पाहा ।। नास्मरण वीणा वाहुनी ।
बाही थोर कुतूहल । धरुनी जो कलही । तक्कतधिंगण नाचत मही ।

**सूत्रधार** : येणेरिती नारद येतांच.

**महिमा** : मी प्रणाम करिते.

**नारद** : अवो हे महिमे तूं धनवन्त आणि गर्वीतरुण इत्यादिकांसी सोडुनिया या वनी फिरतेस ?

**महिमा** : तूं म्हातारा होऊनही परिहासाची आणि कलह करावयाची चट सुटली नाही. बरे असो. तुझी कडूनच्या. माझा मनोरथ सफळ व्हावे.

आर्या : तो भयक्रुद्ध ये ही हरी। जैसा लोकी प्रसिद्ध देव हरी।
तेवी पटु विघडवाया तूंही दयाला। तसाचि जुडवाया।

नारद : अवो ये महिमे, तुझ्या स्वामिणीने तुझे ठायीं अधिक प्रीति धरिल्यास्तव श्री नटेश विघडला. असो तूं येथे असता श्रीनटेशाने पाहिला उत्तरोत्तर कार्यास सवरोध घडेला. कैसेही श्री नटेशास जुडविलो

सूत्रधार : येणेरिती नारदाचे वचन ऐकोनी महिमाख्य दूतिका त्यासी वंदून आपल्या स्वामीणीपासीं गेल्यानंतर श्रीनटेश येतेसे म्हणून सभासदांस सावध करांवा याकारणे विटसेखर येतसे निरखा.

दरू : (बिलहरी ।। आदिताल।।)
विटसेरवर येतो पाहा ।। विविध विलास विनोद करीत हा ।।
हाटकपाट धरुनिया हाती हावभावे गात नाचक निगुती नरवर येतो म्हणून जनांप्रती नीट ताकीद करी एजा अप्रती ।। १ ।।
उटभव्य अंगी विटकायुक्त वदनवोटी मुद्यामण गजे कंकण कटी कांचनरत्न कटिसूत्र भूषण बूटका दावीत नटे ततत्तत्त तधिगणा

सूत्रधार : येणेरिती विटसेखर येऊनी सभासदांस सावध केल्यानंतर मोहनी विदूषकासी सहित श्रीनटेश येतसे निरखा.

दरू : (फरजु ।। शा।।)
सुंदर नट येतसे पहा। श्रीचंद्रमौलि मंदहास्यलसित वदन।
कुंदकारकाभरदन सुंदरीसमेत सुगुण। सुरसंनुत भव्यचरण।
वामहस्तकी कपाल डमरु ।।
येर करी सुकलकामकोजिसुकुमार। हेमपादुकाधर ।। १ ।।
सरसहावभाव निपुण संगीत तानमान सरिगमपदनिसा म्हणोनी।
संतोषवी सकलमन ।। ३ ।।
हंसद्युतिकासमान। हंसकाविलसितचरण। हौसेन करी नटनहा सततधिगणा।

सूत्रधार : याप्रकारे श्रीनटेशामोहिनी विदूषकासह आल्यानंतर नारद बोलतसे परिसा.

आर्या : ज्या जिकामासी कामासी न मिळवील हे मानी।
हे मासी सम नवरी न वरी कधिले अनेचि दुज नवरी

वचन : अगा ये कामजयशीला तूं दिन्यालंकृत भूषित होऊन पार्वतीसी सोडूनि अन्य स्त्रियेसीसहित येथे का आलास ?

सूत्रधार : येणेरिती नारदाने विचारितांच विदूषक बोलतसे परिसा.

आर्या : शंभू सासुरवाडी वसुनि बरा वाढवाचि सुरवाडी ।। गौरीप्रिय हा विटला विटलाभास्तव चितेधुनी सुटला ।।

सूत्रधार : याप्रकारे विदूषकाने बोलताच नटेश बोलतो पहा.

वचन : परिहास पुरे

**सूत्रधार :** म्हणूनि नारदासी बोलतसे परिसा.

**वचन :** अगा ये नारदा अशी सुंदर स्त्री जवळी असताही तिशी न मोहणेचि मन्मथ जिंतला त्याची खूण म्या येथें यावयासकारणे सांगतो ऐका.

**आर्या :** कंदर्प दर्प शमवुनी जयाभिषेकार्थ पुण्यकासारी ।।
फिरतो सुपात्र सेवू वहावया पुण्यभूमिकासारी ।।

**सूत्रधार :** येणेरिती श्रीनटेश बोलतांच नारदासी विदूषक वामकोजि(?) विदूषक बोलतो परिसा.

**पद्य :** जलजोद्धवेरचित जनतृप्तीकरी महाजलजाक्षी ।।
लावण्यजाणपाणी परमसुंदर वदन पाणियुगलैसची पादही ।।
जलील पद्म मानी । मी बोलतो तथ्य मितीरहित चांचल्य।
मीननयनाचक्षू मीनच गणी । शक्रादि देव नर नरचक्रासी माहेकर।
चक्राकृतिस्तनीची । चक्रशकुन अद्भुततेचि कैवाल अलकबावी।
सुश्रोणी ते शिलासमव्दाजीवी । सकलतापाहरी ।।
स्वप्रबाची सेव्युललनास रचि सरस भावी।

**पद्य :** कांचीच्या ते गमे कांचीसुनि स्वनाकाशेषी वेष्टिली कामिनीची ।।
शिखरीहुनि वंचु शिखरी स्वयंभू ते शंखाकारस्तनी शुंभ पदवी धरणीवरी सौख्यधाम वर कामिनी।
धन्य मुखकमल ते धातृपदचि सुजनाची या जगिं सुमनाशी ही वसती।
सुमनयुत धामिल्ल सुभनपदचि अरुणतर अधरोष्ठ अरुणपदाकं तरुणिरदन भक्तिरणि पद की।
रमणीच वेगणीं। रंगपदकी। निर्जरहि सोविती। नित्य तिज की।

**वचन :** अगा ये नारदा या रीतीचा तीर्थ आणि या प्रकारच्या क्षेत्रात विहारू इहपरसुख भोगू इच्छितों

**सूत्रधार :** येणेरिती विदूषकाने म्हणताच नारद बोलतो पहा.

**वचन :** सर्वज्ञानी तूं त्यासी ऐसा उपाय करावे कैसे कार्य केले तरी ते बरेंच दिसेल परंतु त्यासी ऐसी उपाय करावे ?

**सूत्रधार :** म्हणौनी श्रीनटेशाची नमन करोनी निघून गेल्यानंतर श्रीनटेशी आश्रमा राजीत नटन करीत डमरु वाजविताच त्याचा मधुरध्वनि ऐकून खालोनि ऋषिपत्नी येताती निरखा.

**दरु :** (कांबोदी)

नायका येताती पहा। बहुतचि सुंदर देहा। आइका जी त्यांची नावे आतिरी तल्या नटेशी जीव गुणाच्या येते बहु सुगुणा सोनाच्या इते स्वर्णवर्ण धना खायि ते। बहु धन्या मन्या बाई ते। बहुमान्या ।। १ ।।

गंगा यमुना सरस्वती कृष्ण वेणी भागीरथी तुंगभद्रा आणि गोमती श्रृंगारल्या सुभांगी सती ।। २ ।। नातीच्या नद घालि कानी । (की) एकी कंकण्याल्याली चरणी । एकावळीमाजी योजोनी । ऐश्वा संभ्रमें भुलोनी ।। ३ ।।
पाद्य विता बाळालागी पातली तैशीच शुभांगी । व्दिजि हा कारिता रागी । त्यजुनि पाहू जाती जोगी । साय दुधाची प्रीती । साकरही त्या आणिती । पायसपात्र घेऊनी । हाती परमानंदा । न्या सती ।। ५ ।।
सूणमाण सां चंचलनयना खुणाविती । या या सदना । जना न लाजतां ललना । जडुनि करिताती नाना ।। ६ ।।
लक्षांनीशी त्या सुरेसी नक्षावया नटेशाची ।
विक्षामिसे त्या हौसेसीं । दक्षा आल्या आनंदेसीं ।।

**सूत्रधार :** येणेरिती ऋषिपत्नी येऊन श्री नटेशाची प्रार्थिताती परिसा.

**गोपीगीत :** परम सुंदरा प्राणनायका स्मरीं शरें आम्ही जरी बायका । दर हरोनी ते धीर दे मना पुरवी आमुची पूर्ण कामना ।। छं ।।

**छंद :** नटवरा तुजनाच्य पाहता घडली सत्सुका वाढ तत्त्वता ।। भट समस्त — सद्भावनी णती ।। खटिनटे मती धीट सज्ज ती,

**सूत्रधार :** या प्रकारें ऋषिपत्नी येऊन प्रार्थितांच श्रीनटेश मंदहास्येपूर्वक त्याचा आंगिकार करितांचि कितेक पौढ बायका आपणाहूनि धाकुटया मुली आल्या त्या पाहून त्याप्रती बोलताती परिसा.

**दरु :** हुशानी ।।
धाकटे ग तूं मुला धरूनि हा नेईल । धाक मनी बरेल धडही तुज हाकारील ।।

**सूत्रधार :** या प्रकार धाकुटया मुलीकारणे भीती दाविताच त्याचा मकून गुळमुळीत असता ये रथारगी जा. त्याप्रती धैर्य सांगिताती परिसा.

**दरु :** (येरुकुलकांबोजी)
धैर्य धरावे ग आधि । कार्य अलभ्य होथी । आर्य लोकाची उपाधी ।
वाक्य जाण युक्तिबुद्धी पत्यादिका आल्या राग ।
आत्ताचा वृत्तांत सांग कृत्या जाणुन होतील दंग । अत्यादरी लुटी रंग ।
बवकू कैसी आली पाहा । बाळंतीण दिवस दाहा । दिवस दाहा ।
ठक्कू धाकुटी माहा । ईकवुनी आली बंधुसमूह ।
तशी का घाबरि होतीस हे जीवी सुंदरी । कैसा आहे पाहा.

**आर्या :** जीवी तंडुल हाती विक्षा आणिलि नट स्वयं खाते । प्रेमरसे विरहशिखी योगे हा जाहला स्वयंभा ते ।।

**वचन :** आणिक नवल पाहा ।।

**श्लोक :** फलपत्रपुष्पपाणी आणी विक्षार्थ सुंदरी पाणी ।
विरहशिखी तिज भाजी । त्यास्तव हे जाहली पहा बाजी ।।

**सूत्रधार :** याप्रकार ढालगजा बोलत असताच त्यासी सह श्रीनटेश वृक्षांतरित होऊनी पाहत असता याग होतसे निरखा.

याप्रकारे यागी होताच त्या बायकाना नटेशास पाहून मोहून धरिण्यास ठकवून बिक्षकवराकारणे बिक्षा घालण्याच्या मीस भीक्षा भोज्यादिकं घेऊन आल्या ऐसे वर्तमान यज्ञशाळेत विद्यामान ऐशात्याच्या पतिकारणे नारद कळविताच असूयेने दीक्षितादी ब्राह्मणनटवरास धुंडत येता निरखा.

**दरु :** (कन्नडा)

येताती विप्रतापसी अपोर्यामी अग्निष्टोमी। अग्निहोत्र जे बहुकामी।
अतिरात्री अत्यग्नीष्टोमी। ऐसे तत्पर जे की सोमी ।। १ ।।
रामावधानी जो ज्ञाता। रामाभरणी धरुनि ममता ।।
सोमाभिषववित्ता। सोमानेणे। जो तत्त्वता ।।

**सूत्रधार :** येणेरिती दीक्षितादिक ब्राह्मण येतांच स्वस्त्रीयेसी न निखंदिता मोहिनी दर्शनमात्र काम परिवश होउनि परस्पर बोलताती परिसा.

**पद्य :** कोसलांगी सरस कोटि रति सुंदरी कोकिल सुनिस्वना। कोण ललना।
कुटिबालका भव्य कुवलयसुलोचना। कुवलया मोहुनि कुंदरदना कठि घन सुस्तना कलहंसगामिनी। कनकभासुर तनु। कमलवदन। कटिविजित सिंह काकरी भोरु हे पाहा।। कांतामणी परमकांतसुगुण संसारसार तिज। सर्वदा पाहूं। संगती याची या सकल राहू। कामबाळा नशा केविं साहूं। कमनीय मूर्ति इज काय पाहू।

**सूत्रधार :** येणेरिती सकल आश्रमवासी मोहिनी ते पाहोनी मोहले असतां त्यांतली कीतीकी वृद्ध ब्राह्मण सावध होऊन हा कोण की कापालीक म्हणून शापोनी त्यास दमवू अशक्त जाहल्यास्तव आलोचना करून परस्पर बोलताती निरखा.

**आर्या :** व्यभिचार कामिनीसह। व्यभिचारी मोहावि भल्या योषा।
गृहचार हा टाळाया। अभिचारे नटवेषा।

**सूत्रधार :** याप्रकारे निश्चय करून खुंडमंटपविधानपूर्वक स्वेतसर्ष पारिकाच्या होम करून परमराग पट्टापट्टी व्याघ्र निर्मोनी नटवरावरी सोमानी बोलताती परिसा.

**आर्या :** तूं धरिसी बहु घाया। साबळी पार थोर वासू या।
परवनितेची चटका नटिका यो तु हा नव्हेल घटिका ।।

**सूत्रधार :** येणेरिती व्याघ्र सोडितांचि श्रीनटेश मंदहास करोनि परिहास बोलतो पाहा.

**आर्या :** मजवश जितसिंहकटी त्या निकटी वाघ बाळकसा प्रकटी ।।
निवटुनि त्यासी बहु हटी। अजि न पटालपटी तो पहा स्वकटी ।।

**सूत्रधार** : याप्रकार श्रीनटेश बोलुनी त्या वाघातेमोनी त्याच्या अजिनाचे परिधान करिताच अतिक्रोधयुक्त ऐंऋषीश्वर पुन: स्सपाते निर्मोनी बोलताती परिसा.

**आर्या** : तूं वर भुजांग भुजगा केल्या साध्वी परीय या भुजगा। बहुयत्ने सांबाळी। विधिलिपी चुकेनाची लिही ये भाळीं।

**सूत्रधार** : येणेरिती बोलोनी सर्पाते सोडितांचि नटेश बोलतो पाहा.

**आर्या** : म्या अधरामृत घटिका सेवियली मंत्र आपुला लटिका ।। करिता भटवट। पटका हे मज कटकादि भूषणे पटका ।।

**सूत्रधार** : याप्रकारे श्रीनटेश्वर बोलोनी सर्पाते करी कंकण करितांच ऋषी याला महा प्रयोग दमवावे म्हणोनी प्रयत्न करीत असता नटवर अंतर्धानात पावोनी चतुर्भुज जट धर त्रिनयन नीलकंठ पटक्षेप येऊन नर्तन करीत आता ऋषीनी अपस्मार नामक राक्षस सोडिताचि श्रीनटवर बोलतो परिसा.

**गोपीगीत** : भुवनि थोर जे भूत त्या स्मरा। दवडिनार मी दारुनि स्मरा। नवर भूत हे नावरी कसे। नवल यापरी नाच तूं असे ।।

**सूत्रधार** : येणेरिती श्रीनटेश बोलोनी त्या राक्षसास पायातरी घालुनि नर्तन करीत असतां ऋषी पाहून हा उपाय हीच व्यर्थ झाला की. ह्मणोनी त्या शिखीनची अभिमंत्रोनी सोडोची बोलताती परिसा.

**आर्या** : धाडूं धनंजया तव माया होइ त्यापुढे वाया।। पाळाया निजशाया सायासालं करोनि नटराया।।

**सूत्रधार** : याप्रकारे ऋषिवराचे वचन ऐकून श्रीनटेश बोलतो पाहा.

**आर्या** : दु:सह हा विरह शिखी। सखी न चारि तया सुधांसु मुखी। ते प्रेमे मज रोखी। उभय सखी अग्नी। हा धरीन शिखीं ।।

**सूत्रधार** : येणेरिती श्री नटेश बोलून ते जोतिर्मयकलिका निजहस्तीं धरोनि नर्तन करिता ऋषीनी निजसर्वस्व ऐसा मंत्रगण पोतितांच श्री नटेश ऋषीस पाहोनी बोलतो परिसा.

**आर्या** : मंत्रसमूहवाला केला मजला तुम्ही ।। छ ।। हराला विखुनि लेवुनि पायीं ।। नट तो तोमावुडिचे निरपाया ।।

**सूत्रधार** : या प्रकार श्रीनटेश बोलून त्या मंत्रगणाच्या नाला करुनी पायी लेवून आनंदतांडव करितो निरखा.

**दरु** : (पंतुवराळी ।। आ० ।।)

नटराज केवळ स्वछंदे नाचे आनंदे। भटवर पटपट भावे नमिती स्फुटतर ।।
अकपट स्जवीती वाचे सखी ही त्यासवें गाली। नटती स्वानंदभरें निगुती ।।
तक्कित ततकिर धिक्किट धिमिक्कि दोंगिट तंगट किटतक ऐसे ।।

**सूत्रधार** : येणेरिती श्री नटेशासी अद्भुत करणी आणि आनंदतांडवही पाहोनी हाची परमेश्वर ऐसे समोजोनी पूजानी ऋषी आपल्या स्त्रियांसहित प्रदक्षिणा करित स्तविताती परिसा.

**पंचचामर वृत्तभेद** : नरेंद्रकन्यकावरा नटेशाचित्सुकाकरानतार्ति हापरा नमोस्तुते शुभंकरा ।।

**सूत्रधार** : याप्रकारे ऋषीश्वरांनी स्तवितांचि विदूषक बोलतो.

**विद.व.** : अगा ये नटेशा स्वस्त्रियांसी सोडोनी परदाराची कास धरिल्या सुख ऐसे घडते पाहा ।। म्हणता नटेश बोलतो ।।

**नटेश्वर** : अगा ये विदूषका परिहास करूं नको उन्हात गेल्या सावलीची सुख अधिकसे वाटते।

**सूत्रधार** : याप्रकारे बोलून निजप्राणवल्लभासक्त चित्त ऐसा नटेश पूर्वदिशेची अवलोकून विदूषकासी बोलतो परिसा.

**वचन** : अगा ये विदूषका परम लाभ। परम लाभ ।। अ ।। रा ।। डोडावित्ते सती मज मुखविकास चंद्रमंडळास मजे म्हणता विदूसषक बोलतो.

**आर्या** : शिवकामसुंदरीसे नटेशा चित्त कशी न ते समजे ।।

**सूत्रधार** : येणेरिती विदूषक आणि श्री नटेश परस्पर बोलत असता संध्याकाळ झाला म्हणूनी त्या देसिताची श्री भोंसलकुल कलशोदधि कळानिधी श्री चंद्रमौळीश्वर प्रसाद लब्ध चोळसिंहासन संवत संतति सुविराज भूषसार्वभौम महाराज छत्रपती भूमंडला खंडल **श्री शिवाजी नृपवर विरचित श्री नटेशाची विलासाभिधान नाटके प्रथमोंक :** ।। श्री प्रतापसामीची सहाय ।। श्रीरामजयां ।। धर्म मे जयां (तेलगू) शिवार्पणमस्तु ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।। श्री ।।

द्वितीयांक: शुभमस्तु । अविधमस्तु ।।

या प्रकार निखिलसुरवृंदवंदित चरणार विंद व्दंद श्री नटेश निजानंद नटनभरे ऋषिवर सुंदरी जनानंद करवोनी। आणि त्या ऋषिसंदोह्या अमंद संदेहही फेडून। मोहिनीस निरोप देऊन अतिसुंदर चंद्रमंडल पाहून श्री शिवकामसुंदरीचें वदन सेभावून तिच्या दुंडित आरामवाटिकेस येतो म्हणून सभासदास सावध करावाया कारणे नटवरदास येतेस निरखा ।।

**दरु** : व्यागडा — अटताल ।।

नटवरदास येतो पाहा। कटकादि भूषण भूषित देही ।।
भाटक यष्टी धरी हात। लवलाही पटपट बोलत नाचत मही ।।

येणेरिती नटवरदास येऊन सभासदांस सावध केल्यानंतर विदूषकचिसहित नटेश येतसे निरखा.

**दरु** : सुरटिमल्हार — अटताल ।।

नटवर येतो पाहा ।। चटक टकुनि परदारेची हा ।।
आठहिनी निज वामदेहा। अतिविरह नव शोभित महा ।।

सूत्रधार : येणेरिती श्री नटेश विदूषकासिसह आल्यानंतर श्री शिवकामसुंदरी वृक्षांतरीत जाहवसी भावोनी बोलत असे परिसा.

आनंदभैरवी — अटताल ।।

कै येशिल निकटी कोकिलवाणी ।।
गै करिशी का राणी ।
धैर्य अणूही न धरवे मनी ।
धी तुज वश मानी स्मर शंकर तर सरसर वरवर उरि दृढतर होती ।
पार पाये नयनी वारा सजल हा ।।
जाचू मजला वारावे ।। याला धारापर्यंकी ता मज के ।।
वदन दिसत परि । वदसि न काही अवयपणा त्यजि मदन धरी मनीं ।।

सूत्रधार : या प्रकार नटेश बोलताचि विदूषक बोलतो परिसा.

वचन : अगा ये नटवरा । चंद्रमंडल पाहोनि श्री शिवकामसुंदरी आली म्हणोनी का भ्रमलास ।।

सूत्रधार : म्हणताची श्री नटेश चंद्रमंडल पाहोन अतिविरह भर त्याला खंडितते परिसा.

कनकपद्य : विषसादेरा तुझ्या विषनिघोनि जन्म विषय करोनी मला विषमहास ।
विषदंष्ट्र राहू तो वैरी तुझ्या गणी विषकंठ मित्र मज विसरलासी ।
कुवलयाधार मी कुवलयाल्हाद तूं कुत्सित तेचि कां कोप करीशी ।
तोषाकर म्हणवुनि दोषकरा तुझी शिशीर्ष चवचविले व्देष करिशी ।
उदित होता मित्र उजाळवन त्यजिसी ।
गुरुदार सेवने गुरुपाप वरिसी ।
कृत्रिमी म्हणून या कृशपणा धरिशी ।
करुणाविहीन तूं कासया सळिशी ।

सूत्रधार : येणेरिती चंद्रासी खंडोनी विदूषकासी बोलतसे परिसा.

वचन : अगा ये विदूषका कळंकी कुटिल ऐशा चंद्रासी म्या मस्तकी धरिल्याकरिता त्याने संधि पाहोनी गांजिणे युक्तच
परंतु मजकडोनी जिंतिजेला ऐसा मन्मथ या कठिण समयी जाची त्यामुळे लोकांत फार हास्यास्पद जाहला

कनकपद्य : म्हणतांचि जन सकळ मदन जीजे मजलागी ।। मदन तो अद्यापि ।
मद न टकी वदन ना दावितो कदन परि करितसे ।
अदन रिपु रीती ते आदरी की । काय नसतां जया काय करितो ।
जया दायाद साव्देश दावितो की । जाया नसे जवळि जावोनि संधि हे ।
गिवुनि लवुनि फार । जावितो की ।
सुमशरीं भडिमार । मार करितो हे ।
जयशब्द शुकपिक । ज्यमिवितो पाहे ।
शक्तिवीण त्या जिणूं शक्त मी नोहे । येईल कै प्रिया येथ लवलाहे ।

सूत्रधार : याप्रकार बोलून अतिविरहभर शिवकामसुंदरी आलीसी भावून पुनश्च बोलते परिसा.

द्विपदा : (घं — आदि.)
कासया नळिते शिकवली कामविध पाही। सोसवेना सोमवदने।
सोय नेणसी काय। कामविधीं पाही।
सोसवेना सोमवदने सोय नेणसी काही। चंदनाची स्फटीहृदयी सांद्र परिते पोळे।
कुंदन मी रण चंद्रहि तासनी। सुंदरी न करी बाळे॥

सूत्रधार : याप्रकारे श्रीनटेश अतिविरहभरे भुलोनी बोलत असता विदूषक बोलितो परिसा.

वचन : अगा अगा ये काम जयशील कुटिलालका तुझी कांता येथे कुठे आहे ?

नटेश : ते कमल मुखी म्या अता येथे देखिले कोठे लपाल की ?

विदू. : कमलास पाहोनी कमलमुखी आलीसी।
भावोनि भुललास बरे असा
या रानि कमलवृक्षपक्षीमृग इत्यादिकांसी पुसीत धुंडिल्या
तीच लाग लागील

सूत्रधार : याप्रकारे विदूषकाने बोलताच श्रीनटेश कमलास पाहोनी बोलतसे परिसा.

आर्या : कमलमुखी सुललना कमलानो पाहिली असेल तरी।
करुणा करुनि कथावी। विरहश्रम वारी दमथल तरी॥

सूत्रधार : येणेरिती कमलास पुसोनी इंदीवरास पुसतो परिसा.

श्लोक : इंदीवरोनो कळवाल जागा। इंदीवराक्ष न करील रागा॥
सुदंपतीच्या न ठरे विरोंदू। संदिच्छते वांछिती लोकसाधू॥

सूत्रधार : याप्रकारे पुष्पास पुसोनी प्रियवृक्षास पूसतो परिसा.

आर्या : प्रियकर मज जी राणी प्रियानो देखली तुम्हि काय सुंदर वामांगी ते।
नेसुनी या भूषवीतसे काय॥

सूत्रधार : येणेरिती प्रिय वृक्षास पुसोनी तिलकवृक्षास पूसतो परिसा.

आर्या : तिलकोल्लसित सुसाला। तिलकानो काय देखिली महिला।
जे लवुनिया रागी। तुते मला धैर्य कौतुके राणी।

सूत्रधार : याप्रकारे वृक्षास पुसोन हंसासी पुसतसे परिसा.

आर्या : हंसगमा मम ललना हंसानोनी रखिली तरी कळवा हंसकचरणाविरहा।
हा होयील देह गमतते पळवा।

सूत्रधार : येणेरिती हंसासी पुसोनी कोकिलास पुसतो परिसा.

आर्या : कुठे कोकिलकंठी। कोकिल हा जरी असेल उवकंठी।
मज तेनि मकरकंठी या तिजविण पळ युगसमचि कंठी॥

सूत्रधार : येणेरिती हंसकोकिलादिकास विचारोनि गजास तसे परिसा.

आर्या : निरुचेचिजगमना गज हे दावा कृपेचि गजगमना। दिनरजनी मज गमेना।
पहा महाश्चर्य अणुहिती जगी मना ।।

सूत्रधार : याप्रकारे गजास विचारून सिंहास पुसतो पाहा.

आर्या : सिंहासनो सिंहकटी नयेचि निकटी प्रवर्तती चिकटी।
धुंडुनि दावा दुष्टी सृष्टी तिजवीण हेतसे कष्टी ।।

सूत्रधार : याप्रकारे श्रीनटेश शिवकामसुंदरीस धुंडीत वृक्षांतरित जाहला असता विदूषक श्री शिवकामसुंदरी नटेशाच्या संघट्टनविषयी आलोचना करीत असता शिवकामसुंदरीने फार विली गरिमा येत असे निरखा.

दरु : (देवगांधारी — आदि. ।।)
गरिमा येत असे पाहा। गजरे सुंदर देहा।
गौरव दावीत जनी। गर्वधरी निज मनी।
झणी पेठणी नेसोनी, नानाविध भूषणी।
लेवूनी वीणा वाजवी मधुर ध्वनी। विलसित मंदहास्य बदना ।।

सूत्रधार : येणेरिती गरिमा आल्यानंतर.

विदूषक : अवो जे गरिमे श्री शिवकामसुंदरीस सोडोनी या वनी कोणत्या कार्यास आलीस ?

गरिमा : अगा ये विदूषका माझा स्वामिण जे तिचे कपाळी
हा कपाली पडिल्याकरिता
ते अतिविरहभरे पालीसारखी जाहलिया
नटवरास। त्या भूधरकन्येकेची चिंता येलूनी हीन गमते

(लघुपद्य) नटवरा लागलीच्य ऐकसी ते सुखे। भिक्षान्नभक्षणी।
दक्ष जाला। भुवनैकसुंदरी।
भूमिधर जे कडुनि। पति म्हणुनि हा कसा। परिणजला।

सूत्रधार : याप्रकारे गरिमा आपल्या स्वामिणीचे गौरमा वाखणिताच. विदूषक बोलतसे निरखा.

वचन : अवो ए गरिमे प्रपंचामाजी कोण हे आपुल्यावरती अतिप्रीती करणारासच वश असेल?

(श्लोक) निकट चोखट वस्तु जरि मिळे। त्यजिति ते जन केवळ आंधळें।
सुखविताती रती पति सुंदरी। नट कसा न तया प्रति आदरी ।।

सूत्रधार : येणे रिती विदूषकाने बोलताच.

गरिमा व : अगा ये विदूषका स्वस्त्री सुंदरी आणि सुमुखी असली तर्ही,
तिजहून परदारा विदरी ही।बरीस भासते हा पुरुषाचा स्वभाव असो

जायाचा पदार्थ आपल्या पदार्थासारिखा सदा कामा येणे रीती नव्हे. हे श्रीनटेशास कळेव्ये.

**सूत्रधार :** या प्रकारे गरिमा बोलून निघून गेल्यानंतर गरिमाचा विलंब न सहता श्री शिवकामसुंदरीने पाठविली लधिमा येतसे निरखा.

**दरु :** रीती गौळ — अटताल ।।
लघमा येते गौरीची दासी । ललित गुण हांसी ।
लाघव साधी कामीसी । लावण्यचि चरासी ।
नेसली जे पांढरा झणी । नीरजनयना भासते रतिसमान ।
खाळीं विसकळौ जना ।

**सुत्रधार :** येणेरिती लधिमा येऊन विदूषकासी बोलत असे परिसा.

**लघमा :** अगा ये विदूषका श्रीनटेशा कुठे ?

**विदूषक :** अवो ये लधिमे श्रीशिवकामसुंदरीने तुझा अंगिकार केल्यामुळे श्री नटेश दुऱ्हावला.

**लघमा :** लधिमा म्हणजे लाघव. थोराची प्रीत संपादण्याते अवश्य असावी. ते लधिमा नसल्या लाघव पावेल ?

**विदूषक व० :** लघुमे प्रत्यक्षानुभव पाहा तुझ्या यजमानणीने तुझ्या सावास बोलिले. उणे उत्तर ऐका.

**श्लोक :** बी मागावे कुबेरा । हलही हलधरा टोणगा धर्मराया ।
नंद हा ये रंगा जवळि गणपती । दक्ष ज्या नागराया ।
हाकी रक्षे गुरांते । गहा मम जनका । भूधरा मा भूमी ।
भिक्षेने फार लज्जा मज तुज बरवे अन्न देतेवि भूमी ।। १ ।।
मग काय म्हणजी ।।

**आर्या :** जी भूधरवरकन्या भिक्षामान्या वदे असे मान्या ।
देवे त्यास्तव अन्या या ललना केल्या सुखी जगी धन्या ।

**वचन :** अवो ये दिव्यान्ना दिव्यस्त्री या लाहोनी भूधरकन्येसी न गणिता ऐसा श्रीनटेश तेथेच रमतो.

**सूत्रधार :** याप्रकार विदूषक बोलताच लधिमा बोलते परिसा.

**वचन :** अबलेने काही न कळता बोलिल्या थोरानी त्या स्वस्त्रियेस इतरांकडोनी जाचवूं नये तेलेआपल्या नाथास कळिले म्हणवुनी केली विनवणा सांगते ऐका.

**श्लोक :** तुला नती करीन मी । न सळलीच मारा करी ।
सकोप जरि तो सुखे । निजकरीच मारा करी ।
असे कथुनि पाठवी । मज धन्यासि हे जाणवी ।
शिणि गिरिसुता बह्र नटवरा त्परे आणिवी ।

विदूषक : सर्वज्ञ प्रभासयुक्ता युक्त सांगणेस कोण दक्ष । कृतज्ञपण ।
आणिवी नये । प्रभुचि दय संपादावे । बरे प्रयत्न करू ।
येणेरिती बोलून विदूषक आणि लघिमा दोघेही निघून गेल्यानंतर पाठविल्या दूतिकाचा विलंब न सहिता श्रीशिवकामसुंदरी प्राप्ती श्रकामेता जयाविजयादि सख्यासिसहित येतसे म्हणून सभासदांस सावध करावया कारणे श्रीशिवकामसुंदरीची मुख्य दासी दौवारिकीण पद्मिनी येतसें निरखा.

दरु : शुद्ध सावेरी — आदिताल ।।
देवदासी ते पद्मिनी ।
दैवासी येतसे जाणी ।
नवी तरुण सुंदर सुमने नाचत नाचत ये वौसेने ।
कमठातर धरुन हात बटाटोप आगि निगुठी कमनीयाकृती जी सख्याप्रती करताकि तसप्रती (पारिपाश्वक)

पारि : तुम्ही कोण कुठोनि येता ?

पद्मिती : मला जाणत नाहीत काय सांगते ऐका.

लक्ष्मी : ज्यांत मी घुमीखुमी । लवंगी, सदारंगी, कलिगी, नारंगी, सुरंगी, नवरंगी, चित्रांगी, भागी, सुभोगी, नागी, मंगी, रंगी, दिंगी, झबकी, केतकी, मिटकी, माणकी, सोंकी, अक्कू, बक्कू, ठक्कू वेक्कू, सरखू, धक्कू, रत्नी, आमणी, चिमणी, इंदाणी, रमणी, कामाणी, रुक्मिणी, नीलवेणी, नारायणी, सदामोहिनी, कांचिणी, शर्वाणी, दाक्षायणी, हरिणरायमणी, चित्रवेणी, त्रिवेणी, चूडामणी, गोपी, सुरूपी, रुप्पी, चांपा, कुप्पा, कुसुंबी, चंद्रबिंबी, डाळिंबी, सुजाची, राची, कामाक्षी, मीनाक्षी, विशालाक्षी, कमलाक्षी, सारसाक्षी, सदावशकरी, कावेरी, केसरी, कस्तूरी, गौरी, भोवरी, सुंदरी, लीलावती, मायावती, शिवांगी, पार्वती, सरस्वती, प्रभावती, अमरावती, पद्मावती, सावित्री, गायित्री, मृगनेत्री, सुगात्री, हुरळी, सुळ, सदाफळ, पुतळी, नीळी, कमलीवेली, नुलाली, मखमली, सांवळी, बाळी, कोयाळी, पवळी, मंगा, मंगा — वेंकटेशाची पत्नी अलिवेलु मंगा ।।
काशी, तुळशी, अव्वलखासी, कुळकासी, या इल्याजणीत मी पद्मणा । मुख्यखांसी । अहो अता आमची यजमानीण येणार आहे सिद्ध असा

सूत्रधार : येणेरिती शिवकामसुंदरीची दौवारिकीण पद्मण येऊन सभासदांस सावध केल्यानंतर प्राप्तिकामता जयाविजयादि सख्यासहित श्रीशिवकामसुंदरी येतसे निरखा.

दरु : अठाना — मिश्रा ।।
शिवकामसुंदरी येते पाहा ।। नवभव्यभूषण भूषितदेहा ।
शिवदायक सद्गुणसंदोहा शिवघटनीं करित ऊहापोहा ।।

दरु : कुरंजी — आदि ।।
मी काय करू वो बाई । मी कैसे वो बाई ।।

तो का नये या समयीं। तो कुठे अैसे क्यै येई।
हरहर स्मरशरखरतर रुतती। किरकिर कीर करी। साहूं किती ।।

**सूत्रधार :** येणेरीती श्री शिवकामसुंदरी येऊन प्राप्तिप्रकामतादि सख्यांस पाहून बोलतसे परिसा

**(लघुपद्य)** देवादिदेव शिवजिवा तिला जीव केव्हां निरीक्षण कीरवाणी।
विटशेखरामुळ च्यट हे नवी तया कटकटा शिणतसे कामबाणीं।

**दरु :** (पंतुवराळी — आदिताल ।।)
कामयुद्धास निघला कामिनीवरी घालि घाला।
सोमशेखराचा वैरी जो मन ज्याला। पाहे स्वारी। शुकाचाचि घोडा केला।
सुखें त्यावरि वळघला। स्वकरी इक्षुचापा धरी। जसा भ्रमराचि या दोरी।
चंद्रयाल पाठीवरी मंद वारा तोलु येठीं। छंदे मजला मार मारी।
सुंदरी न ये कौमारी ।।

**सूत्रधार :** या प्रकार मन्मथ वदेन साहवेनासा शिणती श्रीशिवकामसुंदरी मंदमारुतास पाहोनी बोलतसे परिसा.

**(श्लोक)** वाताशाभरण प्रभू नटवरा जिंकावया होईना।
वाता या परि मानसी विरच्युनि चिंतत दिव्यांगना।
घाता स्वल्प रचोनिया वरिवरि शीतांबुही शिंपिसी।
आता मी बहुतापरी शिणतसें माता वंदू कायसी ।।

**सूत्रधार :** येणेरीती मंदमारुतास निखंडोनि चंद्राशी निखंडीतसे परिसा.

**(श्लोक)** मजसमा भगिनी तुजकी नसे। हिमकरा मज जाचिसि का असे ।।
हरहरा भ्रमले भगिनी गृहा। हरित या तुजदेविकृपा आहे ।।

**सूत्रधार :** येणेरीती चंद्रासी निखडीत आसता संख्यानी आर्वो सदाची त्याची वाणी पिकवाणी भावोनी वचकोनी श्रीशिवकामसुंदरी प्राप्तिसखीस पाहोनी बोरतसे परिसा.

**दरु :** (केदार ।।)
पाहे कोकिलकूजित पापिका नाशी। दुखविती साहूं व्यसना। कैसे सजणी।
सत्वरी आणी। नटसुखखाणी। प्रानो हे कोकिलस्वामिणी ।।
आहे ती या कोकिलवाणी। साहे क्षणमात्रविरहासी। सत्वर येईल शिव-सुखरासी ।।

**शिवकाम :** पाहे शुक क्रूर संचु फार करिती हृदयपंचू साहू। व्यसन कैसे सजणी। सत्वर आणी सारंगपाणी।

**प्राप्ती० :** नोहे ती शुकशुकवासी काला हे प्ला या भसिका। साहे क्षणमात्र विरहासी। सत्वर येईल भवसुख रासी

**शिक्काम :** हे मदनाच्या कमाना। पत्शर लागती काना। साहूं कैसी ते यातना सजण आणिला तो सदना ।।

प्राप्ती : नोहे कमाना भूतला। पाहे शरनदिठी तत्वता। साहे क्षणमात्र विरहासी सत्वर येईल नट सुखराशी ।।

सूत्रधार : येणेरीती निजसख्याच्या अवयवांस पाहोनि स्मरहास करते शुकदिक भावोनी श्री शिवकामसुंदरी घाबरी होताच सख्यानी त्या भ्रमाचा परिहार केल्या उपर स्मरशरांसी निखंदित असे परिसा.

शिवकम : (पद्य) मुखतुल्य मी म्हणे मूढ पंकज तदा मुख्य निखंडिता मुरडले ग। करसाय घरि पुन:। कासया शीण तो। कवि बोलता असे सांगेल गा। पदसाम्य तरी वरुपावले कमल ते। पद साम्यता न ते पावले गा। पादकरसुखहि ते प्रतिनिशी। आठवुनि पाठिव ते। मुकुलत्व पद्म तें गा। जलज जपे बहुजली वसुनी। तप नाशी पाहांतची तप फार तपुनी। पति वैरी मदन तत बाण हिवोनी। किती सळी मज पहा की वाणी।

सूत्रधार : येणे रीती श्रीशिवकामसुंदरीने स्मर बाणांशी निखंडितांची

कोरवाणी वचन : अवो ये शिवकामसुंदरी भिऊ नको भिऊ नको श्रीनटेशाचा शोध घ्यावयास पाठविली ते गरिमा येवोनी तेथला वृत्तांत सांगेल तववरी धैर्य धरे

सूत्रधार : म्हणताची गरिमा येतसे निरखा.

दरु : देवगांधारी ।। आदिताल ।।
गरिमा येतसे पाहा ।। गजरे सुंदर देहा। गौरव दावीतां। जनी गर्व धरी।

सूत्रधार : येणेरीती गरिमा येवोनी श्रीशिवकामसुंदरीस पाहोनी बोलतसे परिसा

गोपीगीत : नति तुला असो नस जा आग्रही किती फिरु सये, मी प्रतिग्रही। परि रम तुझा, सौख्यसंग्रही। अतिविलास तो। दिव्य विग्रही ।। अवो ये शिवकामसुंदरी। मी ते नवल काय म्हणोनी सांगू श्री नटेश तुझी परिवास करिता अनेक सुंदरीने दिल्या दुष्टांगाच्या स्वीकार करोन त्यासी सह रमता। अतिविलास-भरे। नट तो म्हणे ।।

सूत्रधार : याप्रकारे गरिमेने तेथील वृत्तांत कळवितांच श्रीशिवकामसुंदरी अति खेद सख्यांस पाहून बोलतसे परिसा.

दरु : (नीलांबरी।।)
दैव थोर माये देवी करिते होय। जीव कैसा माझा धाय जी वामदेव नये। लोभि तो धन जैसे लोचनीं पाहे तैसे। भोगुली नादाले सुरसी ।। नाभी— गुंतती हेचि खुडुस ।। कोणत्या की सटव्या कुठोनीं कीं आल्या मान सोडूनी। आणी दादुल्या माझ्या नाथासी अनुसरल्या ।। सोनेवाने वसने सुख दिल्या न व्यसन। स्वनाथा वोपिले जिणे। श्यानाहूनी तिचे धिक् जिणे।

सूत्रधार : येणेरीती शिवकामसुंदरी स्वनाथाते आठवुने अतिविरहभरे मूर्छाग्रस्त होताची सख्यानी शीतोपचार करितांची जाये होऊन श्रीशिवकामसुंदरी प्राप्तिसखीस पाहोनी स्वप्न सांगते परिसा.

दरु : तोडी । आदिताल ।।
ऐका वो प्राप्तिबाळे अरुणोदय वेळे येक स्वप्न देखिले । सुख फार घडले । शंकतचि आला शंकर वराला । आंगणी म्यां देखिला । आलिंगी मजला ।।१।। नाचे तै परोपरी । नानाविध कुसरी । साच वाटे अंतरीं । सांग पळ निर्धारी ।।

सूत्रधार : येणेरीती श्रीशिवकामसुंदरीने प्राप्ति सखीसी स्वप्न सांगताची

प्राती : श्री नटेश शीघ्र येईल चिंता करुं नको.

सूत्रधार : म्हणताची.

जया : अवो अवो ये शिवकामसुंदरी बुडबुड वाद्य ऐकू ये त्यावरुन पिंगळा येतोसा दिसतो. त्या शकुन विचारु.

सूत्रधार : म्हणताची पिंगळा येतेसे निरखा.

दरु : पिंगळा येतसे पाहा । सांग मनींचे जाण महा । सांगे करुनी ऊहापोहा—— सरसचि कळवी सुखसंदोहा ।। गोल पागोटी मस्तकी । गोड बोलका जो मस्तकी । शाल अंगावरी फाटकी सांगे मंगळवाणी नीटकी ।।
येणेरिती पिंगळा येवून श्री शिक्कामसुंदरीस पाहून शकून सांगतसे परिसा.

आर्या : खटपट न करि कांही विट माझ आणिली विटे । पट पाही देजु नाट बाई नटशेखर निकटा येतसे आय ।।

सूत्रधार : येणेरीती पिंगळा येऊन शकून सांगून श्रीशिवकामसुंदरीकडोनी वस्त्रभूषण-लाहोनी पलीकडे जाताची श्रीशिवकामसुंदरी सख्यासी श्री नटेश कै येईल म्हणौनी आलोचना करीत असता

विजया : कोलाहल शब्द ऐकू ये त्यावरुनी कैकाडीण येतसे दिसते.

सूत्रधार : म्हणताची कैकाडिण येतसे निरखा.

दरु : (राग-पन्नाग०।।)
पाहे येते कैकाडीण । परमसुंदरी भुवती मना । बाहिरी आली बाई म्हणेनी प्रीतिबाळा घेऊनि पाठी ।। अति साजिरी का खे पाठी । हाती घेऊनि सुंदर काठी । हांसत मनिच्या सांगे गोष्टी ।।

सूत्रधार : येणेरीती कैकाडीण येतांची श्रीशिवकामसुंदरी बोलतसे परिसा.

शिवकाम० स्वमनी जे वसे सांग नी झणी । जमविते तुला जाण भूषणीं ।। आणिक जें मनी आज यिद्धिसि । अणविते क्षणे अमित लाभसी ।।

सूत्रधार : या प्रकारे श्रीशिवकामसुंदरीने सूपभरे मोत्ये कैकाडणीस देत

शिवकाम : म्यां मी चिंतीले कार्य सांगा म्हणताची कैकाडीण (देवास स्मरोनी शकुन सांगावयाची काठी पाठीत लटलटा घालवून हातही झोकोनी शकुन सांगते परिसा ।।).

(श्लोक): ठेवूनी स्वपदापुढे तुज लवनाडा बरे जाणवी । शंकोनी तव संकट । निजमुखे तुज धरी स्वांग प्रिया फारसी । मानितो सवती करी गवसला लादे न मी त्या कसी ।

**वचन** : असे तूं मनी चिंतिले आहेस?

**शिव** : अवो ये कैकाडणी सांगितले ते खरेंच परंतु ते वस्त मजला कसी प्राप्त होईल ?

**कैकाडंणी** : अवो ये शिवकामसुंदरी हे कार्य आश्चर्य म्यां श्रीमहालक्ष्मीसी महाविष्णू जुडविला तो आतां तीस आपल्या वक्षस्थळी सदा धरितो आणि सरस्वतीशी ब्रह्माजुडविला इंद्राणिसी इंद्र जुडविला आणि त्या त्या कडोनी उदंड वस्त्रभुषणे म्यां घेतली. तैसेच जुजसी तुझ्या नायकास जुडविते.

(लघुपद्य) जो केशव श्रीश लोकेश पाग्पती ही ती ही नवलभूषा । अर्पिला या पणीं अमित तूं देशील। आजि पां पावशी अमित तोषा ।।

**वचन** : अवो ये शिवकामसुंदरी कोल्ह्याचे शिंग देते तेणेंकडूनी तुझा पती तुलावशी होईल जतन राख.।।

**सूत्रधार** : म्हणूनी ते शिंग देऊनी श्री शिवकामसुंदरीने दीधले वस्त्रालंकार घेऊन निघोनी जाताच प्रकामता.

**प्रकामता** : जोश्यात प्रश्न पुसावा.

**सूत्रधार** : म्हणताची जोसी येतसे निरखा.

**दरू** : जिझुटी।। आदिताल ।।
जोशराज येतो पाहा । ज्योतिष जो सकलही श्रीशिवकरुणा । अमित जयावरी। जोशी न वाक्य सदा जयावरी । सुगुण के वतले कुरवाळा । सद्वाक्ये स्ववी शिवा कृपाळा । संगे लेंकुराचा पाळा ।। सांगे योगदला सुजनाला ।।

**सूत्रधार** : येणेरीती जोशी येतांची शिवकामसुंदरी अति नम्रतेने जोशासी बसावयास निरोपून लज्जायमान असतां यीशत.

**वचन** : अगा ये जोशिराजा तुला शिवकामसुंदरीचे आरुढ लक्षण पाहून प्रश्न सांगता.

**सूत्रधार** : म्हणताची जोशी आरुढ पाहोनी कन्या लग्न म्हणोनी निर्णय करोनी फल सांगतसे परीसा.

**आर्या** : भोगस्थानादि पती जीव वसे साजणी तुझ्या कटि की। उच्चहि जो लाभस्थित सवती होतिल त्या तुझ्यात्र की बटकी ।। चिंता करूं नको ।।

**सूत्रधार** : येणेरीती शिवकामसुंदरीस सौगोनी वस्त्रभूषणादि बहुमान लाहोनि जोशी निघून जाताच लधिमा पटाक्षेपें येऊन.

**लाघमा** : अवो ये शिवकामसुंदरी श्रीनटेशातें दोनी निघाला येथे येईलसा दिसतो।

**सूत्रधार** : येणेरिती लघमेने म्हणताच श्रीशिवसुंदरी धैर्य लाहोनी ह्य कोपे पद्मिनीस पाहोनी बोलतसे परिसा.

**दरू** : भैरवी।। आदिताल ।।
नटशेखर जरि येथे आला लटका ते साजणी त्याला। फटिकाळ पण जो कीं शिकला। विटशेखर त्या साह्य मिळाला। विटका भात मिळता त्याला मिटक्या देवचि तेणे घाला सखि त्या ना । की जो भुल दिला कटकटा कैसा अन्याय झाला ।।१।।

हटका मजवरि मांडिला । छुटका जीवासी लागला । चटका कैसा ग तोडिला । मुटका जिव तेणे जाला ।।

**सूत्रधार** : येणेरिती श्रीशिवकामसुंदरी पद्मिनीस आज्ञापूनव शितेसी सह पटांतरित घेऊन पाहात असता विदूषकाची सहित श्री नटेश येतसे निरखा.

**दरू** : सुरटि मल्हार।। आदिताल।।
नटवर येतो पाहा।। चट टाकुनि परदारेचा हा ।। आठवोनी निच वामदेह। अतिविरह वन शोधित महा.

**सूत्रधार** : येणेरिती विदूषकासी सहित नटेश येवून शिवकामसुंदरीने न देखता अतिविरहभरे विदूषकास पाहोनी बोलतसे परिसा.

**लघुपद्य** : आजि मज वाटते अत्यंत हूरहूर अब्जनयनेसी कै आणिक पाहू । जीव तिला शिव शिवकामसुंदरी नवल रुसली पहा केंवि पाहूं।।

**वचन** : अगा ये विदुषका तिजविण काही मनास रुचत नाही.

**दरू** : (पुन्नागवराळी।।)
काय तिजवीण काय आदरीना।। मायाळू जे क सुखवि मन । माते का सळी लपुनि ।। आपण ।। तिजविण संसार । मजस रुचे जो राजा । गजगमने विणा । गजबज फार । तीजविज निजमन । न मरी येरा ।।

**सूत्रधार** : येणेरीती श्रीनटेश अतिविरहभरे शिवकामसुंदरीस धुंडत समीप येतांची दौवार कीण पद्मन श्रीनटेशास अटकावून बोलतसे परिसा.

**दरू** : आरभी।। आदिताल ।।
कां येथे आलासी । काकुलती दाखविसी । जाई तूं परदारापाशी ।। माया तुज कळली मजसी । राजराजेश्वरी जे सजसी । सुखकरी । धजुनि न जाई हे बाहरी । तुज सोडू ना आहिहेरी ।।
विटशेखराचे सांग चट लागली । व्यंग ।। अटण करी परदारामागे । नट रे त्यापुढे होउनिह्य धुंग ।

**सूत्रधार** : या प्रकारे पद्मिनीने अटकविताच नरेश तिचे वाक्य न मानिता धजून पुढे सरताच श्रीशिवकामसुंदरी आणि नरेशाचा संवाद होतसे निरखा.

**(श्लोक)**: तूंगा कोण सशूल वैद्यगृह जे जाणेनी जागा स्वये ।
स्थाणू मी न वदेतरु कहि पाहा मी नीलकंठ प्रिये ।
कितिकीं वर नीट मी पशुपती शिंगे न ते दीसती ।
वा मे नायक वाक्य मान्य करि वो मी नायके संप्रती ।

**नटेश** : अवो ये शिवकामसुंदरी ऐसा असणें युक्त नव्हे मी कोण नीट जाण.

**दरू** : (पुन्ना ग० ।। आदिताल ।।)
सकल जनाचा सत्सुखदाता शंकर मी वो गौरी । गौरी ।।
शंकर की प्रियशंकर की अभयंकर की मी नेणे ।

नटेश : नगवर कन्यानंदकर । प्रभु नटेश की मी गौरी.

गौरी : नटेश की विदेश की घटेश की मी नेणे.

नटेश : विविध विलास विनोदन नारी विश्वेश मी वो गौरी.

गौरी : विश्वेश की अश्वेश की पश्लेश की मी नेने.

सुत्रधार : येणे रीती श्रीशिवकामसुंदरी.

शि०सु० : अगा ये नटेशा तुझी वंचना पुरे पाठी झाल्याचा अव्हेर करून इतरांस फार सुखविल्याते इगर सोमाची बुद्धि जाहली चिमुणी.

सुत्रधार : येणेरीती शिवकासुंदरीने बोलताची नटेश बोलतसे परिस.

आर्या : मधुर रस फार सेवुनि । मिठि बसता तो पुनश्च सेवाया ।
पंचामृत तैं से वन ते मुख्य करावे कथ कसे वाया ।।

वचन : अवो ये शिवकामसुंदरी, मी तुजविना अन्य स्त्रियाशी सर्वदा मना हे नीट समजून पहा.

आर्या : तुंझाचि अंश ललना नान्याते हे तुला कसे कळना ।
तू शक्तीमंतही मे एकचि गोष्ट शास्त्रसंमत ही ।।

शि०का० : ते असो तुझ्या आनंद तांडव कौतुक विलोकनास त्या ललना पात्र जाहल्या ब्रम्हयादि सुरतर आहित्वदंश अव्हे जणू रानांत नीलकंठ नाचला काय फला ?

सुत्रधार : येणेरीती शिवकामसुंदरीने बोलताचि श्रीनटेश शिवकामसुंदरीशी सह पटंतरीत देऊनि तिजशी निजानंदबोधपूर्वक येकांत करोनी भक्तसमूहास निजतांडव दर्शनानंद द्यावया कारणे शिवकामसुंदरी आणि अष्ट महासिद्धिसी विदूणकांसीसहित श्री नटेश अगि विलास भरे येते म्हणून सभासदांस सावध करावयाकारणे नटवरदास येतसे निरखा.

सुत्रधार : येणेरीती नटवरदास येऊन सभासदास सावध केल्यानंतर श्रीनटेश येतसे निरखा.

दरू : (गौरी ।। आदितळ ।।)
साक्षा नटवर येतो हौसे स्वानंद विलास । दक्षण पादे राक्षस तनवरी त्र्यक्ष सुखराध्यक्ष । नटतसे जोम कुंचित निज वाम पादा ।। त ।। जो दावी जनांते लंबसख्यकर । सांब सदय अवलंब जना शशिबवधर प्रभू ।। वोमोर्ध्व कर धरी, ज्योति कळते । वारक कली ते । डमरूहच तजव्या कर ।। ता कृति वरि करी क्षेमदक येरा । सामजमवास हा ।।

सूत्रधार : येणेरीती श्री नटेश आल्यानंतर.

विद० : अगा ये नटेशा लेंकराविना आपणच निजानंद अनुभविणे युक्तस भासत नाहीं

सूत्रधार : येणेरीती विदूषकाने बोलताचि श्री नटेश गणपतीच स्मरण करितांचि गणपती येतसे निरखा.
(गौळीपंतू ।। आदिताळ ।।)
गौरीनंदन येतसे पाहा गोजिररूपी सुंदर माहा ।।

**सूत्रधार** : येणेरीती येऊन शिवकामसुंदरी नटेशास नमन करोनी उभा रहाता। सुब्रमण्य येतसे निरखा

वसंत— आदिताळ ।।

येतो शंकरकुमार अत्यं जो सुकुमार दिति जयशील कुमार। दिव्यरूप निर्जित मार ।।

**सूत्रधार** : येणेरीती सुब्रमण्य आल्यानंतर ब्रह्मादि देव येताति निरखा

**दरु** : का हे मी सभापतिच्या प्रभाव पाहून सुबाव सुर येते पाहा जो भारतीशी ही श्रीभार्गवी पती जंभाराती इंद्र तो हा भानु बृहद्भानु आणि शीतभानू अंभःसति आणि अशरी हीं दनद प्रभू शंभूमित्र प्रभंजन स्वर्भाने केतु पाही ।।१।। अगारक बुध आणि भार्गव गुरु अर्कज येताती ते हा। मंगळरूपी मार्तंड भैरव नाचत महीं

**सूत्रधार** : या प्रकार ब्रह्मादि देव येऊन श्री नटेशास नमन करूनी उभे राहताचि ब्रह्मादिकाच्या स्त्रिया देवी येताती निरखा

**दरु** : (सावेरी ।। आदिताळ ।।)

पहा देवी या येताती पद्मजातिकाच्या सति। महिमावती। सरस्वती— महालक्ष्मी तैसी निगुती। महाकासी ही इंद्राणी म्हाळसा भानसा राणी। मल्हारीच्या दोघीजणी। महिषासुरमर्दिनी। भैरव दुर्गा सावित्री नारसिंही ही। गायित्री वाराही। आणि बनशंकर। घरा तैसे। ते कौमारी।। साक्षात राजराजेश्वरी। सर्वाभरणभूषित भारी। लक्षादिका सुरवर नारी। लक्ष भव। नटनाची कुसरी।

**सूत्रधार** : येणेरीती सकल देवी येऊन ईश्वरासी नमन करोनी उभ्या राहताची कश्यपादि ऋषीश्वर येताती निरखा

**दरु** : (मोहन आदिताळ ।।)

ऋषी येताती पहा। बुद्धसिद्धदायक महा। हर्ष शिवनाम ते गाते हा हावभावे जे नाचत ।। कश्यप भारद्वाजदादम्य कौत्सजमदग्नी मांडव्य कौशिक महाकौशिक वैग्य आश्वलायन महावैग्य आपस्तंब बोदाय (न) अत्रिमरिच शुत्वर्च्यन कपिल कपिंजल पावन कपद्धी नटनी। निरत मन।

**सूत्रधार** : येणेरीती कश्यपादि ऋषि येऊन श्रीनटेशास नमन करोनी उभे राहताची ऋषिपत्नी येताती निरखा

**दरु** : (असावेरी ।।)

आ पाहे येताती ऋषीवनिता। परम पतिव्रता। ज्या हेमवर्णोल्लरि सिता महादेवी निरता ।। अरूंधती जे अनसूया अत्रीची अनसूया निरवधि सुगुणा अहल्या नातळती जे हत्या ।।

**सूत्रधार** : या प्रकार ऋषिपत्नी आल्यानंतर श्रीशिवभक्ताग्रेसर येताती निरखा

दरु : शंकरा आदिताल ।।

शिवभक्त येताती पहा। शिवकारक लोकां शिव महा। भवनटन विलोक्चंचंद भाविक जध ते आनंद।। भृंगी नंदीश हिनाभाभजन चंडीश रावण व्याघ्रपाद अगस्त्य पावन व्यास पतंजली वररुची आना।।

सूत्रधार : येणेरीती शिवभक्ताग्रेसर येऊन बोलताती परिसा

पंचचामर वृत्त.–खगेंद्रकन्यकावरा नटेश चित्सुखाकरा नतालिहा।

सूत्रधार : येणेरीती स्ववोनि नमस्कार करून उभे रहातांची नारद तुंबरु येताती निरखा

दरु : कापी

नारदतुंबरु येऊन श्री नटेशास नमन करोनी वीणावादन करीत असता ब्रह्मादि देवता आणि पतंजली व्याघ्रपादप्रमुख भक्तवर प्रर्थिताती परिसा।

आर्या : केला सुत पाचरणी। चितुनिया नटवरा चरणी। पाहा या तव नटना केली दैवेंचि आजि घटवटना।

सूत्रधार : याप्रकारें भक्ताने निजानंदी तांडवदर्शन करवावे म्हणोनी प्रार्थिताचि श्रीनटेश नानाविध वाद्य वाजविण्याविषयी त्या तागेवास आज्ञापितसे परिसा

दरु : यरुकुल ।।

पद्मजा इंद्रा पावे। वाजवाव पद्माक्षानंद परवी वाद्यासी घ्यावे। पद्मे इंद्राणी परमानंद गावे। पवनासुती द्यावी पारुशुद्ध भावौ। वरुण कुबेर ताल ह्य करी धरावे। सार शंखाचे वादन करावे। रे राहु केतू मोर्चंग वाजवावे। नैकती तूं वास रोताशी ध्यावे। वाण सवित्री वीणे वाजवावे। वाजवी गायिली सा शिंगी सुरवे। वल शंखरी घेई चौंडक अभिनव वाराहीन मेळवा जरी वरवे।

नटेश : अगा ये इतर दैवत हे अमृतकुंडल्यादि अमित वाद्ये तुम्हासी जे जे मालतील ते ते घ्यावी

सूत्रधार : येणेरीती श्री नटेश आज्ञापिताच त्या त्या देवतानी जीव करड वाद्ये घेऊनी सिद्ध होताच श्री नटेश आनंद तांडव करीतसे निरखा

दरु : (भैरवी ।। मिश्र ।।

निर्गुणा काय सगुणाची बरी सोय नगवर कन्या मोहे। नतजन धाये साखरेची रुची। सरस तै जाणताची। त्या खरावा वीडण काची। चवि घे दुजाची।

दरु : (बिलहरी ।।)

धन्य मी जगात दिसतो। धरुनि भाव सरस नाचतो। जन्यजनक सकल मीच नान्य तुम्ही मजसी साच। अन्नभाव हा आहेच। अखिल मायिक प्रपंच।

दरु : कल्याणी ।। आदिताल ।।

देह तोची रंगदेव नाचे अभंग।। पाहे केवळ जो निस्संग। तरमात्म्याचा शाश्वत अव्यंग ।।

**सूत्रधार** : येणेरीती आनंद तांडव करोनी सकलजनानंद करवोनी। सकल देवताशी सहित टिपऱ्यांचा खेळ खेळतसे निरखा

**दरु** : (सैंधवी ।।)

गजमुख गुह जनका शंकर। अजमुखसुर तिलक द्विजवरकृतकटकाशंकर गजगमना रसिक पाहि भुवनपाला शंकर। पाहि भूतिपाला पाहि सुगुणशीला शंकर पाहि सुकृत जाला। पाहि नट सुवेषा शंकर पाहि नागभूषा पाहि नतपोषा शंकर पाहि निखिलतोषा ।। पाहि पालित सुरनिकुरंभा पाहिला ते ततगुण हेरंबा। पाहि निर्शित विश्वकदंबा पाहि निर्गुणासगुणा साच्या। पाहि पाहि निर्जित मदन। पाहि निखिल सत्सुखसदना। पाहि सुंदर सुस्मित वदना। पाहि कुंचसुमुकुलरदना ।। १ ।। पाहि नागेंद्रकमनीय हारा। पाहि नगवरजा मनोहरा। पाहि नतमानस विहारा। पाहि नमो नमो हरा।

**सूत्रधार** : या प्रकार सकलजनानंदकारक श्री नटेश टिपऱ्यांचा खेळ खेळून गुणवेणिका रचन गुणसदन विरचितो निरखा

**दरु** : पाहि अभ्र सभेशा पाहि अमित प्रकाशा पाहि सुभुसुविलासा पाहि सुरेशा पाहि नगकन्या रमणी पाहि नवर्णभरणा। पाहि सुगुणालंकरणा।
पाहि सुखसदना पाहि श्री नटवरा। पाहि सुतलोकधरा। पाहि श्रीकंठवरा। पाहि श्रीकरा ।।

**सूत्रधार** : येणेरीती सकलही गात नाचत गुणवेणिका गुणसदन रचोनी परमानंद-भरित ऐसे होते श्रीसभासतीस प्रदक्षिणा करीत स्तविताती परिसा

**पंचचामर**: निरीच्छता तुझ्या पदा निचारल्याचि असता। सुसंपदा सदाशिवा। स्वभक्ति जे सदाशिवा।

**सूत्रधार** : ये प्रकारे सकळही प्रदक्षिणा करीत स्तविता नारद स्तवीत प्रार्थितसे निरखा।

**श्लोक** : जे ब्रह्म निर्गुण परात्पर तुचि नाना। रूप वरूनि सगुणा करिसी तनाना। जो बिंबला रवि जलात आलिप्त जैसा। तूं क्रीडशी नटवरा सकलात तैसा। दावोनि खेल सुखवी निज लेंकरासी। जैसा पिता गिरीश ते वि कृपांबुरासी। प्रेमे स्वभक्तिनिवहा सकलां सुराशी। राजां प्रजाशी वितरी बहू सौख्यराशी।

**आर्या** : सच्चित्सुखरूपाशिवा। सुखविशि दावुनि नतां अश्या लीला। समयीं सुवृष्टि करुनि। धन वाढवितो बहू तश्या लीला

**सूत्रधार** : येणेरीती नारदाने प्रार्थिताचि सभापत्याशी देव, ऋषी भक्त मंडळी समस्तही श्रीमत् राजाधिराज श्रीशिवाजी महाराज। छत्रपतीस आशीर्वाद करीत आहेत परिसा

**सूत्रधार** : नटेशा मनी ध्यावया नाटकाते। वरोनी लोक या पाहुनि नाटकाते। म्हणोनी कृपे धांविले तां शिवाजी। नृपश्रेष्ठ तूं फार लाहे शिवाजी ।।

**आर्या** : प्रत्युपकार कराया आम्ही द्विज शक्त काय नृपराया। त्वत्समसंतसंतताना लाहूनि या नंद सुजन संताना ।।

श्लोक : वाजी वारणही परात रडत । द्राजी अनेकांसवें । राजीवाक्ष शिवाक्ष भूप सकलां । राजी तुले वास जे । पाजी पंचम त्यमी जन तया । जो जिंकुनी भुवरी । वाजी वा म्हणवीत ना धत अणो हा जी सुखे भूवरी ।। इति श्री जय जय श्री शिवाजी महाराज कल्याण होवूं । तुवां चंद्रमौळीश ऐश्वर्य देवूं । सुदेश प्रसादेची । सलीन्यभाग्य फावू । तुझ्या आनना शारदा नित्य सेवू ।। स्वयंभू प्रसादे सदायुष्य लाहे । हरीच्या प्रसादेची सद्वीर्य तु हे । दीनेश प्रसादें । प्रतापी भला हें । शशीची लसत्कांती ते तुचि लाहे ।। सुमेरूपरी धैर्य चित्तांत गा हें । तुझ्या दान महापूर वाहा । जनाच्या बरा हटट् त्वच्चित्त साहे । तुला पाहतां सर्वही लोक मोहे । तुज सत्कटाक्ष दया वीस्त पावो । निशानि जयाच्या । असोनि त्या धावों । तुवां साधुवृंदासी । सत्कार होवू । तुझ्या सद्यशा सत्कवी नित्य गावू ।। अवो ईश्वरी वेद्यविप्र सुभावो । त्रिलोकीं असो व्यापूनी त्वत्प्रभावो । तुझ्या इतीच्या धारी पूलागी जावो । तया ना तुझे स्वल्पही भूमि ठावो । तुझ्या सद्धितीं मंत्रीचा वर्ग जागो । तया वंचने च्यान व वाराहि लागो ।। तुजा कार्यभागीच तच्चित्त रंगो । तुझ्या वैरीचा संघ तो सर्व खंगो ।। तुझ्या आननी सत्यदाना वसो दे । सदा नेत्रयुग्मी रया हे । असों दे ।। पदी अन्य भूपौद्य तुझ्या लवू दे । तुझ्या मंदिरी नित्य पद्मा असो दे । सदा गोरस कामधुनी वास पो । तुझ्ये लोक कोणी दारिद्र् नसो दे । ससेभे माझी सुज्ञा जना वास हों दे । उदारा यश : श्री दिगंत भरूं दे । सदा बाहूलागी जयश्री वरों दे । तुझ्या मान तुसी नीति वारा करों दे । जनत्राणकार्य सदा धीट कोंदे । सदा त्वत्कृपा खास्तती पांझरो दे । सदा नेक दंत इलो द्वारदेशी । सुसंतान खेळो । तुझ्या अंकदेशी सदा वृद्धि होवू । तुझ्या संघद्देसी तुला भाट वानोत पै सर्व देशी ।।

तुझ्या वक्चपद्म सौभाग्यलक्ष्मी । करा जी वसो सर्वदा दानवक्ष्मी । वसो त्वत्पुजी जयाची सुलक्ष्मी । असो नित्यचित्तांत कारुण्यलक्ष्मी । वसो भव्य खड्गी महाशौर्यलक्ष्मी । त्रिलोकीं भरो वे तुज कीर्तिलक्ष्मी ।। तुझ्या सर्व देही वसो सौम्यलक्ष्मी । असो सौभरी तुल्य संतानलक्ष्मी ।

सूत्रधार : येणेरीतीछत्रपतीस आशीर्वाद करूनी सौभाग्यवती श्री शिवाजी महाराज याच्या पटट्राणीस आशीर्वाद करितात परिसा

इतिश्री श्रीमत् भोंसल कलशोदधि कळनिधी श्री चंटमौळीश्वर प्रसादलब्ध चोळ सिंहासन संतप्त संतत सुविराजमान सार्वभौम महाराज छत्रपती भूमंडलाखंडल श्री शिवाजी नृवर विरचित श्री नटेश विलासाभिधान नाटके द्वितीयांक । श्री राम जयं । श्री नटेश विलासादिनाटकं सूपूसं ।। श्री ।।

# त्र्यंबक ज्योतिर्विद कृत

## राजकन्या परिणय नाटक

।। श्री गुरुभ्यो नम : ।।

सजयति सिंदूर वदनो देवोयत्पाद पंकज स्मरणं ।।
वासरमणि खित मसांराशि नाययति विघ्नानां ।।

सूत्र : येणे रिती विघ्नेश्वर प्रार्थना करून तदनंतर सरस्वती देवीची प्रार्थना करितो ऐका.

याकुंदेंदुतुषाहार धवला ।। या शुभ्र वस्त्रावृता ।।
या वीण वरदंड मंडित करा या श्वेतपद्मासना ।।
या ब्रम्हाच्युत शंकर प्रभुतिभिर्देवैः सदा पूजितां ।।
सामांपातु सरस्वती भगवती ।। निःशेष जाड्या पहा ।।

सूत्र : येणे रिती सरस्वती देवीची प्रार्थना करून तदनंतर श्रीमहाविष्णुची प्रार्थना करितो ऐका.

वेणीमुले विरचित धनश्शामपिं छाव चूडो विद्युल्लेखावययुक्त
युवस्निग्ध पीतांबरेण ।। मामालिंग मरकत मणिस्तंभ गंभीर
बाहूः स्वप्ने दृष्टस्तरुण तुलसी भूषणो नीलमेघ : ।।

येणे रिती महाविष्णुची प्रार्थना करून तदनंतर पार्वती परमेश्वराची प्रार्थना करितो ऐका.

विनिहित भुज मेरू कोदंड कोद्यांपरम पुरुष बाणं मंद
मांदोलुयंतं त्रिपुर जयविनोदवसक्ष्मगौरी मुखें दुस्मित वदन
सरोजं शंकर भावयामि ।।

सूत्र : येणे रिती सकल देवता प्रार्थना करून राजकन्या परिणय नाटक शाह महाराजाश्रित त्रियंबक जोतिर्विदें शाह महाराजास संतोषा कारणें अंकित करुनि रचिलें ते नाटक आजि वेषभाषा श्रिंगार भूषितें करून नटन भावाभिनयें कडून दाखवितों सर्व जन संतोषे कडून सादर पाहा या नाटकाते प्रथम पात्र प्रवेश ऐसा जे. श्रीशाह माहाराज भूलोक देवेन्द्र भोसल कुलावतास श्रीत्यागराज स्वामीचे रथोत्सव दर्शनास पूर्व दिवसी आले अस्तां राज कन्येनें नवखन माडीवरून पाहुन त्यावरि मोहून तदेक अंतःकरण होऊन विरहताप न साहत निज आप्त सखी जनसह वर्तमान रम्य प्रदेसीं श्रिंगार वनास येते सादर महा.

दरू : ।। तेर ।। आहरी ।।

कन्यका येते पाहा ।। श्रिंगार वना शाहराज देवेन्द्रावरि मोहित होऊन राजकन्यका येते पहा ।। आहार निद्रा नसतां विरह ज्वर नसता तैसी ।। १ ।।
निमिषे कैक वरुष परि मानिते सखी समवेता ।। सुम सायक समान रुप सुंदर शाहेंद्रास ध्यात ।। २ ।।

चंद्र किरण सूर्यापरिस कठिणस मानिता यिंदा समान वैभव येकेंद्र तनय चिंतित कन्या येते पाहा.

**दरू** : राजकन्या रूप पाहा सौंदर्याधिका राजकन्या रूप पाहा ।।
राकेंदु परि बदन पहा ।। राजहंस गमन पाहा ।।
राजीव लोचना पाहा ।। १ ।। तिलक सुमना पहा ।।
अलिनील वेणी पाहा ।। कलकंठी कनकांगी पहा ।।
कामदेव निजास्त्र पाहा ।।२।। भूषणे कडुन इतर कन्या भुषित शोभत ते पाहा ।।
भूषणाचें भूषण ये भूमंडळी शोभते पाहा ।।

**सूत्र** : येणे रिती श्रृंगार वनास येऊन सत्तम रम्य प्रदेशीं बसून चिंता करि अस्तां सखीनें पाहून सविनयें कर जोडून विनंती करिते पाहा.

**सखी** : राज कन्यक चूडामणि येक विज्ञाप्ति करणें असें अभय दिलीया बोळेन

**कन्या व.** : सखी इतका संकोच कशास अवश्य जे पुसणे ते पूस यथार्थ सांगेन

**दरू** : कां कन्या तुझें मुख म्लान गे सखी ।। कधी नाही तो विचार काय गे ।। नित्य दर हास काय जाल गे ।। आजि सत्य सांग तूं मजगे सजणी जलक्रीडा कां टाकिली गे।। सत्य सांग यास हेतु काय गे।। भ्रमली सारिखी कां तू आहेस गे ।।
मुखभर वीडा कां तू नेघेसगे ।।

**कन्या व.** : सखी इतुकें सादर पुसत असतां तुजसी चोरी काय यथार्थ सांगते ऐक,

दरु : देखिला कालिगे राजा देखिला कालि ।।
महाराज सजणी येक महीपती नंदन मद मनोहर शहजी राज ।।
तनु मन धन माझें तदा धीन जालें ।। जाल विलोचन
वो मजराज त्यागेश दर्शन करुन येतां सखि म्या पाहिले शाहजीराज ।।
जो क्षिति रक्षण दक्ष सुलक्षण वर्निति दैवज्ञ जाति
तो राज एक सखी शहमहाराज बसून अला तो ।।
गज राज कैसा म्हणसील तरि सांगते ऐक ।। प्र भ कुंभजन विपक्षलक्ष गंजन वपुश्रि याजिता जननृपाल चित्त रंजन प्रतिद्विपनर्तजित अनेक दोष वर्जित नदाघदेनुर्गजित स्वबाहू विक्रमार्जित श्रवंति सप्त धाकदं ।। वहंति सप्तधामंद वहंति भूरिशंमदं निरवात मेदिनी रदं ।। विडंब यतिनीरदं प्रतिभसैय मारणं सुलब्धचित्त पारण महेंद्र दंतिवारण जयंति शाहवारण ।। ऐक सखी शाह महाराज धनुष्य हाति धरिल्या वैरियांची अवस्था कैसी होते ते सांगते एका ।। नृपाल शाहजी करीं धनुष्य बाणहि धरी अरीव सुंधरी वरी बहूत धाक वाहती ।। नृप प्रतापतिभयें करूनि धावती तसेच फार कांपती विपत्ति थोर साहती ।। करीं धरूनि कामिनी ।। विनीतसेचयामिनी ।। नसो निर्धारिता वनी सनी लपोनि राहती अपत्य घेउनीकडे रिपु स्त्रिया चहूंकडे चढेति अद्रितेकडे ।। पतीकडे न पाहती ।।

**वचन** : ऐक सखी शाह महाराजाची हातिची फिरंगी कसी ते सांगते ऐक शाहनृपाची फिरंग जगकरी रणरग जिचे भयें अवरंग शाह बहु भीतसें जिचें अविचल बळ प्रबळ मोगल दल वधूनियां ते सकळ जगीं नवा नसे धाक जीचा

देशो देश वाहताति वसुधेश सिरसा धरीतीनि देश नृपतिचें भारसें स्वयें होउनि
विकोश वाढविती शाहकोश जिला नसे अनुक्रोश विपक्षवर्धातसे.

**कन्या** : ऐए सखी शाहमहाराजाची महिमा कोणच्याने वर्णवेल ? तथापि सांगते आयिका.

**दरु** : महिमा जी महाराज राज शाहजि । गाजीतो मर्दमकरंद गाजी ।।
संग चतुरंगदला । सबल घेऊनि बली ।।
संगरिभंगीतो अरिसंभारि तर्जुनी दुर्जन भुवनी जो यवन जन ।।
मारुनी अवनीचा भार उत्तरी मही ।। १ ।।
ज्याचें महा राहाट बल देखुनि रिपु कटक तोडिति तिखट कटु धरूनि भाले ।।
गजदतिलति विकट रिपुवरि प्रकटति अट धरूनि घालित बहुत घात मही ।। २ ।।
भूतलि विधु दिनेशावरि येकच विलसत किर्ती ने जो प्रताप ।।
ज्याचे तेजें कडून सर्व धनुर्धर प्रबल अरितिमिर कुल सकल लोपे मही ।। ३ ।।
जो की नृप केसरी भुज बलें दुसरि करितसे भूवरि पातशाही ।।
न्याची हिम पर्वता पासुनि सेतुवरि शासनें करूनि फिरलें दोहीमही ।। ४ ।।
कोठ तंजापुर प्रतित ज्याचा तखत राखिजे तो सदा शैन्यचि करें त्यास उपमानसे
त्या पुढें नगरी तुछ दिल्ली तसी अन्य नगरी मही ।। ५ ।।
मेरुशैलापरी विबुध आधार जो भुजबले धरितसे सकळ धरणी ।।
व्यापुनि त्रिभुवनीं सुयाप न्यासें असें प्रीतिनें विज्ञ दैवत वर्णी ।। ६ ।।

**कन्या** : ऐक सखी शाहमाहाराजाचे गुण वर्णिले तों तों विरह अधिक होतो.

**दरु** : सजणी राजा आणि गे मज राहवेना त्याविण ।। रजनी थोर झाली जाण गे सखी नीज नलगे येक क्षणगे ।। गुज सांगाया मज कोणगे तूंची कर मज रक्षण गे ।। कैसे मला कंठलगे सखी ।। १ ।।
महीपरवासें मन माहिलें मलयानीलें सखि बाधिलें ।।
दधनें मज बहू विधिलें मृगांक करि वैर साधिलें सखी ।।
दैव गति होईल नीट गे सखि करील रमणी वाटगे देखतां शाहनृपाची वाटगे ।। दैव जै प्रभ येईल अवुच गे सखी ।। ३ ।। आणि सजणी तूं वोवि जणी ।। शाहधरणीं पाल गे रजनीं थोर झाली मज नीज न लागेडोलागें विरहान करितां मला होतिअग्नि ज्वाला गे ।। सुगंध पुष्प माला मज नको घालूं गलां गे ।। प्रलया नीलपरी कठीण मलयानील जाला गे ।। चंद्रहाला झल्या निभुवल्यामवे मजलागे ।। २ ।। येउनि आलिंगण तो मज देयील भूपाल गे ।। विरहतापशमेल माज सुख पावेन अमूप गे ।। ३।। नेईल नृपति सदना प्रति होईल प्रिति सांगे ते तुज किर्ति ।। ज्याची उत्तम किर्ति त्रिभुवन जन किर्ति ।। १ ।। स्वरुपें स्मरजिती कांतिनेतिशापति ।। २ ।। प्रतापेदिनपति बुद्धिनें ब्रहस्पति ।। ३ ।। वर्णित भूप स्थित: दैवज्ञ संतोषिती ।। ४ ।। आणि आणि गे सजणी येक्षणी भूप शिरोमणि शहजी धरणी पालतो वेग आणि आणि गे ।। ५ ।। नृपती वांचुनि स्मर मज देखुनि विधितसे बाणी ।। आणि गे ।। सखी वं तू कोजाउनि दैवज्ञासाणुनि थोर करी येजनी आणि ।। ३ ।। सजणी शाहभूपति येइना रजनी थोर जालीसे जाइना ।। मदन विसिरती भारी मारी मज सुंदरी ।। नरपतिविण करमेना ।।

विरहता बहु सोसवेना ।। जरी न येतरि मी हो जीना साजणी शाह ।। १ ।। सुमनी रचिली सेज तेथें मज नये नीज भावनही विपिनसें वाटे प्रेम आठविता मजा कंठा दाटे सखिये ।। सांग यो कैसा नृप ।। सजणी शाह ।।२।। तुजविण सखि नाणी कोण्ही ।। नृप सीरोमणी आणुनि प्राणदान देई क्षणी जाउनि दैवज्ञ प्रभु आणि न करी विलंब अति सुलक्षणी सजणी शाह ।। ३ ।। सखिये साजणि आणि शाहभूपा सत्वर ।। सरस गुण सागर अनुम गुण रुप सोसू वो मी किति विरहताप सदन जीवन धन न विन यौवन तनुही न माझे देश पतिवीण अनुरुप।। चरणी लागुनि बहु विनवी त्याचें अंतकरणी कवि नृपवराचे स्मरणीहि मी नसे कैंची वाचे तरुणी वरुणी पति विनय मज येक क्षण युग गण येतो जाण प्राणेश केविवांचे ।। १ ।। हार घन सार पल्लव शय्यावारा निस्सार दुरि चंदन पंकस्मरा न करा कैसा मंजुळ विजण वारा शशिधर मज दिनकर करसम निष्करविशिखि विदि अनंग अपारा ।।२।। विजनी येउनी नप उपचारें मजळा आलिंगन दिल्हें विपिधि कारें ।। गुज सांगितले मनिचें मजसी फार समर्रात दूतिपतिसीं करून प्रीती पावन वहुपरीत तुज उपकारे ।। ३ ।।

**सूत्र** : येणे रिती विरहाभिनय अनुभवित अस्तां तदनंतर कथा संद्विधान कैसें म्हणसील तारे राजकन्येचे माय बापानीं कन्या श्रृगार वनास जाऊन फार विलंब झाला तीस बलाऊन आणा म्णून सखीस पाठविलें ते येते पाहा.

**जरू** : पाचारुं ये सिखी परम चतुरही ।। काम दायिल परि कमनीय रुप आहे ।। सोम मुखी शुकवाणी हेमांगी ते शोभती हे ।। १ ।। सरोज लोचना ते सरस हंस मना ते ।। करि कुंभोपमकुचा ते वर युवती मनी शोभते ।।

**सूत्र** : येणे रिती सखी येऊन दूरुन पाहती तों कन्या विरहाभिनयितसें पाहुन आश्चर्य मानून हे काय अद्भुत आहे पाहा म्हणून वृक्षा आड लपून पाहती तो पूर्वील सारखीच कन्या विरहाभियांत आहे.

**कन्या पदं** : शाह नृपाविजयनीहो शाह नृपा विजयनीकांनये अज्ञुणी सखी पति वांचुनि हो मज पंचशर जाचणी मन लागलें काचनी हो साजनी नरपति लोचनी पाहिल्या वांचुनि काहीं मज योजना हो न रुचे तिसिदिनि कामाधि न मी झालें पाहता योजनी हो सजनी ।। २ ।। सखि तूं ओजाउनि माझी स्थिती वितारुनि पतिस निवेदुनि वो दैवज्ञ प्रभु आणि तूं साजणी वो ।। वुपकार नवि सरें मनी हो ।।३।

**पदं** : लागली पपति प्रीति बहुत मज वो चित्त मग माझें न पावे प्रीति ।। १ ।। सांगता वो पुरवेना ।। न सांगता राहवेना ऐसासे काय या जन मज सूचेना ।। २ ।। जाणवुं नको कोणासि जाणवेल वो जनासि शंका वाटते मनासि ।। ३ ।। कैसायास निर्वाह होइल कधी सखे देह भोगिल भूमि पतिशाह मनि होईल उत्साह ।।

**सूत्र** : तदनंतर कथा संसिधान ऐसा जे झाडा आडून कन्या वृत्तांत पाहून सखि येता कन्येनें साशंकित होऊन लज्जा नम्र मुखी होऊन भये भीतसें उभआहे पाहा.

**सखीवचन**: रोज मी येतां तुम्ही संतोषकून मजसीं बोलतसा ।। आजि कीं भय भातसा कितपर वश्य असा यास कारण काय ।। हें सत्य सांग मला तरि सर्वहि कण्ले हें ।।

मी तरि तुझे हित गुजांतील अंतरंगिची सखी यस्तां मजसीं चोरी काय जें असेल तें सांग ।। त्याचा निर्वाह करून देईन ।। हे गे माझी शपथ घे ।।

**कन्या :** कांही नाही सहज मी विनोदें करुन सहज मी खेलत होतें तें पाहून तुज संदेह कोठे होईल कीं म्हणून साशंकितक्षा हे.

**सखी :** हे सर्व मी जाणतें तूं शंका न धरिता यथार्थ सांग त्याचा निर्वाह करून देईन हें माझी शपथ घे,

**कन्या :** अवश्य भरवसियानें बोल्लीसकी या उपरि मना मधे गोष्टि आहे ते सांगते आइका. कालि श्री त्यागराज स्वामीचे दर्शनास येतां पाहून त्यावरि मोहन तदेकंत्त करण होऊन मदनास वश्य होऊन आहे. यास जो वुपाय करणें असेल तो करि.

**सखी :** जावुदे परतें. याशि इतुका संकोच कांशाला? तुझे माय बापांस सांगून त्यांस आधी आणन त्यांच्या अनूमतें शाह महाराजापासी जाउन यत्न करुं त्यांस सम्मत करुनं तूज त्यास विवाह करितें हें माझे बुद्धि कौशल्य पाहा.

**सूत्र० :** तदनंतर कथा संद्विधान ऐसें जे सखीनें कन्येच्या माता पित्यांस कन्या वृत्तात सांगून कन्येचे मनोरथ सिद्ध करायास कन्येची मायबापे येतांति पाहा

**दरू :** आला राजा दयिाता सहित ।। आपले परिवार युत बालिकमनि चिंतिलें अलिजनां विचारि ते कनक किरिट साजे काम सामान रुप साजे ।।
दिनकर समवेज साजे दिव्य हार बहुसाजे अंगज भुज बहु शोभे शीतांशुसम वदन शोभें ।।

**सूत्र :** राज राज पत्नी सखी कन्ये समीप येऊन उत्साहेंकून कन्येसी बोलताति पहा

**राजा :** तुझा वृत्ता सखीनें सांगीतला तें आइकून आम्हास बहुत संतोष झाला. कन्ये पूर्व जन्मी काय पुण्य केलें होतें जें ऐसी जूज वासना जाली? येणें करून आमचें कुल सकल सबल जालें. तुझे मनोगतानुरूपयत्न करून विवाह सिद्धी करून.

**सूत्र० :** ऐसें राज आज्ञेकरून शाह महाराजाचे सभेस सखी येऊन बोलते पाहा.
सल्लाम दरुक दीन मंदाररेदान राघे युरे मानिनी पांचालुरे महाराज शाहेद रे ।।

**सूत्र० :** येणेरीति सल्लाम करुन वृत्तांत बोलते पहा ।।
चंद्रवंशाचे काश्मीर देशाचे राजाचे कन्येनें श्रीशाहमाराज तुम्ही श्रीत्यागराज स्वामीचे रथोत्सव दर्शनास येतां पाहुन तुम्हार्पित मन होऊन तीचे कन्येने तिचे माय बापानी मज तुम्हा पासी पाठविलें ।। तिचे पाणिग्रहणाचा अंगीकार करा ।।
तिचे सौदर्यवतीची अवस्था सांगते आइका ।।
सखी पदालु

शाह भूप सिरोमणी राज कन्यारमणी न कले सौंदर्य खाणी शोभतसे सर्वगुणीकोण पावे तिची सरी ।।

पदनें जिंकिलें सरी रति चकित दूसरी असी शोभेये संसारी पूर्ण चंद्राकि कमल किंवा मुकुल हसमुख नेसो ज्वल शोभतसे हे विस्तुले ।। १ ।।
परि पक्व बिंबाफळा ।। अमृत किंवा अमल अधर तिचे कोमल बहुहसतिरसला ।।

मेघविण सौदामिनि तैसी तें हो तुज वांचुनि चाळ भोगिले कामिनी ।। २ ।। शाहमराराज देवेंद्र तिचे सौंदर्य गति ऐसी झैका ।।सुदर ते बाला शाह भूपाला ।। सुंदर ते बाला पाहे वेळो वेळां ।।

मार्ग तुझा अबला पाहे विरहानला करित विल्हल चिंती तुला अबला ।। ते चा एकले कळाह्य चातुर्य सोज्वल तुजविण ।। ऐकोनि तीचा गळा सुस्वरें आगळा ।। लाजति त्या कोकिला ऐसी हो शुभवेला दैवज्ञ बोलिला चालें वेगीं दयाला ।। शाहराज देवेंद्र तुज वांचुनि विरह व्याकुळ अबला ।। विरह व्याकुल अबला शाह भूपाला पाहे वेलों वेलां मार्ग तुझा अबला ।। तिजलागे सितलां चंद्राच्या कळा होती आंगीच्या ज्वाला ।। निंदी वसंत काळ नसोसे मलयानील ।। तुजविण शुभसीला विमल कमळ दळ सुगंध गंध कुसुम माला ।। सखि न दोखे डोलां दैवज्ञें सांगीतला ऐसा समयेतिला तो सत्यकरी सुसीला ।। ३ ।।

शाह महाराज देवेंद्र तिचें सौंदर्य सांगतें ऐका ।। नाक सुंदरि निंब नाग कन्यकाधव नागरिका नारी असे शाह भूप ।। येक धरणी तलीं एका चंद्र भूमिव आकाशासन तैसे शाह भुप ।। लोचन अंजन गर्व मोचन तिचे हे थोर लोचन सिगोरी वार शाहभूप रुचनतिल हे सूचन करण्या वेषराचनहि तुजविण शाहभूप ।। नीळ कुंचित अलकतिल कुसुम सकोक सम नवाके शाह भूप ।। कुलवंत वधू अनुकुला अैसे तुज वेलोवेलां ।। स्मरतसे शाहभूप ।। ३ ।। काव्य कला निपुण दिव्य संगीत जाण भव्य सुलक्षण ते हो शाहभूप ।। सेव्य गुण तिचे सर्व दैवज्ञ वणित वार व्यमनोभव रूप शाह भूपति सखि मंदिर पति सबल करी माझी विनंति विलंब अतिला विसी किति सुमनें सुपति सुगंध जाती ना ना विध हसति सादणि राति करितां राति पाविस बहू प्रीति ।। १ ।। ऐसी युवति असे सुमति देखुनि जिजिनुकांति ।। लाजुनुरांची जाय परती वृषभानसेराती ।। २ ।। तिची स्तुति करितां निगुती सुरंग नळपति देखुनि गति दिचि हस्ती हंस चालोसिक्रति ।। ३ ।। अलंकार करूनि अपरा चर्चुनि गंध सारति सुकुमार पाहे वाट वारंवार ।। ४ ।।

**सूत्र०** : येणेरीति ना ना प्रकारी नायकास संतोष वाटे ऐसें बोलुन राजकन्येस विवाह सिद्धि कारणें बोलावूं येते तों कन्येस शुभ सकुन होतातिं पाहा.

**राजकन्या**: दरु ।।

लवतसे आजि वो माझा लोचन वाम लवकरि होइल थोर लाभ हे नेम शाह भूप। मजवरि स्नेह करूनि येइल जरि पाहेन मी लोचन भरि पुरविल मन सारी। स्तन युग वुजृभितातिं मदताप शामतातिं मलयानिल सुख भासतातिं हे काय आश्चर्यसें दिसतातिं ।।

**सूत्र०** : पर्वोक्त प्रकारें सखी नायका पासून येऊन कन्येसी तिचे माय बापासीं बोलते पाहा.

**सखी** : ऐक राजेन्द्र ! तुमचे आज्ञेप्रमाणे शाहमहाराचा पासि जाउन त्याहातीं कन्या विवाह अंगीकार करुन तुम्हांस विवाह सिद्धी करणें बोलाऊं आले चला.

**राज** : तुझें वचन कर्नरसायनसें आयिकून आम्हांस बहूत संतोष जाला. हे गे तूं बहू मान घे. विवाह सिद्धीस जाऊं चला.

**सूत्र** : राजासीं बोलोन सखी कन्येसी बोलते पहा.

**दरु** : चला सखिये चला सखिये बहूसाल शाह धरणी पाल पाहतो वाट वेळ झाली झडकरी मान कारणि आधी मान पाक्ये अनुमान ठाकुनी वेगी ।। चाल सुंदरि यास करी तूं रतिकुण कल्याण होउनि समान पाव तूं सकल वनिता माझारि ।। १।। भूप तुजला अनुरुप नायक जाचे रूप देखिल्या स्मर पडे विचारीं दाप जायचे भुवनी कोप केल्या अरिसें कंप सुटतसे भुवन माझारी ।। २ ।। राम सर्व गुणाभिराम जन तैसा विश्राम सर्व जनासि जारी चित्त हरी सोमकांतीनें जिंकीकाम लावण्य गुण ग्रामे शोभतो राजा बहूता प्रकारि ।।

**सूत्रधार** : सकल विवाह सामग्री करुन कल्याण सिद्धी कारणें येताति पहा.

**दरु** : राज राज पत्नी सहित आले राज कन्या विवाह निमित्य परिवार सकल समवेत शाहवर भूपतिस सभेत धन्य वंश जन्म मानिता याचे कन्या कारित आइसें म्हनिता ।

**सूत्रधार** : शाह महाराजास दूरुन पाहुन सखीशी राज राज पत्नी बोलताति पहा ।

।। त्रिभंगी छंद ।।

बैसुनि सिंहासनी शासन करूनि अरि बहू व्यसनि ।। पाडितसे अति फेडितसे निजबल समुदाये विविध वुपाये देश अनेकहि साधितसे ।। गड बांधितसे मारुनि यवनाळा ।। दुष्ट जनाला सिक्षुनि बहूजन रक्षितसे मग लक्षीतसें ।। भोंसल कुलदिपक धर्म स्थापक शाहजिराज सकळ गुण सन्तुत निपुण ।।

**दरु** : सुदिन आजि वो आला सदनी भूपाचे आलेति साजणी आणि ये वेळे मदन मनोहर महाराज भूवर मजला थोरसे कलें ।।
माने संतोषिले वुपचार करिना वुपहार देईना वुपकार मी विसरेना हार घालीन मानुहार नृखति कंठी ।। हार घालिन फार ।। विविध सुख सार । कमनीय माल सुवर्नाची माळ पदक गळी रमणाचे घालिन श्रम त्याचे हरिन श्रम दे फार करीना प्रीती बहु धरीन ।।

**सूत्रधार** : कन्या शाहमहाराजास पाहुन सखीसी बोलते पहा.

**दरु** : मानस हरितसे पहा हो ।। देखतांच शाह भूपति निज रुप ।। त्यानें मन वश्य होतसे श्रवण नयन माजी गति मति संप्रति स्ववशही करिजसे पहा ।। अशन वसनत माझें सदनही न रूभूषण दूषणसे भासें ।। उपकारि करि मज वरि सखि आणुनि दैवज्ञ विनश्चितसे ।।

**सूत्रधार** : शाहमहाराजाचा जवळ जाऊन राजा पत्नीसी बोलताति पहा.

**दरु** : सकळ भूत शिरोमणि शाहजी कन्यक मणि ।। अकलंक गुण खाणि वर कल्याणी । १ पाणि ग्रहण इचें करूनि पावेन संतोष येक्षणि जनि थोर ।। नृप शिरोमणि त्रिभुवनि ।

**सूत्रधार** : कन्याचे मायबाप येणे रिती शाहमहाराजासी बोलीन यातद नंतर कन्यासी बोलताति पहा.

राज : आम्ही तुझे विषई शाहमहाराजासी जें सांगायचे ते सांगितले या वरि तुझें बोलणे काय असेल तें बोल.

राजकन्या : बरें तुमची आज्ञा.

सूत्रधार : शाहमहाराजाचे अंतःकरण आपणावरि द्रवलेसें पाहून बोलते पहा.

दरु : माझें पाणिग्रहण करि नृपकेसरी ।। माझें मपाणिग्रहण करि ।। मजवरि आता करी माझी मदनबाधा हरि ।। १ ।।
नेत्रे करुन मज पाहिले मन तुज अधिन जालें ।। वक्रेकून मजसी बोल मनें छत्रपती मी तुज आधीन ।। २ ।। माय बापे संतोषाने माझा महोछ्व देखती तुझी माय करूणी तूं आजि महाराज मंगळसूत्र बांधि मज ।।

सूत्रधार : येणे रिती नायकाशी बोलोन शाहमहाराजाचे अंतःकरण आपणावरि द्रवलेसे पाहुन राजकन्या श्रिगार बाहुलीला सांगते पहा.

दरु : सुंदर सेवन मंदिरा भूमी ।। पुरंदर शाह भूपाल चाल विहर कराया ।। नरधीपा जाली वेळ शाहभूपाला ।। तुजवीण व्याकुल होती हे प्राणमाझे । शाह भूपाल तनु मन धन तुजवीण सजणी हे न दिसे शाह भूपाला ।। येउनि आलिंगन तूं मजल करि स्वाधीन शाहभूपाला ।। करिन मी बुपचार बरवा तुज वीजणवरा ।। शाहभूपाला सभरति करूनिया संप्रति नावे प्रीति ।। यावें शाहभूपाला देंपज्ञ प्रभुवर येउनि विजनी येक वरा ।। शाह भूपाला ।।

सूत्रधार : येणे रिती कन्या शाहमहाराजासी बोलती पहा.

दरु : चाल माझे मंदिरा जाली वेला सुंदरा ।। बोल माझा अवधारा शाहभूप पुरंदरा ।१।
लाउनि गंध सारा गळां पुष्पहार करयाला विहर यावें वेगीं मनोहरा ।।
धरामृत स्वीकारा घेउनिगुण सागरा ।। मजला थोरसे करा वेगी नृप सेखरा ।।
तुजविण करमेना रगी थोरवी रमेना विरहताप शमेना पुरली माझी कामना।
चोल भूमि निलायक वेलि मी नीति ।। आइक राज कुलतिलक दैवज्ञ परिपालका ।

सूत्रधार : येणे रिती कन्येचें वचन आइकून श्रीमहाराज संतोषी होऊन कन्येचा अंगिकार करून पाणिग्रहण करून वधूवरें बैसली अस्ता वऱ्हाडी सारे आनंदेकून मंगळें गातातित पहा.

मंगळे : आजि तुज शत सहस्त्र मंगळें वाजि वाजते सेचशत सदनें ।। आदिजिल पर वीर भोज शाहजि राज तेजनिधि वाणि तुझे वसतु वदनी ।। १ ।।
जयकाम सुरूप तुझें तनय शकर रुप राम तुझें वश्य करूं ।। सकळ धरणि तुझे राम कांति करु तेज निधि दीनमणि ।। हेम पर्वत तुझे रोष सदनी ।। २ ।।
येक दिपांबिका तनय भोंसल चंद्र ।। पाक शासन पराक्रम विराज नाक लोक परिसुजवत् बहुदीन ढाक वाहति महिमाजि अरि तुझे ।।
जय मंगळं ।। शुभ मंगळं ।।

---

# नाटकांतील शब्दार्थ

## श्रीलक्ष्मीनारायण कल्याण नाटक

तोडेम् : मंगलाचरण

जितमार : मार या राक्षसाला जिंकणारा

इंदुनिभ : चंद्रासारखे गोल म्हणजेच सुंदर

नुतलोल : प्रशंसा करण्यात रंगलेले

इभमुखजनक : गजाननाचा पिता शिव

श्लोक : वंदितों महदभुत देवता. . . .

ह्या श्लोकामध्ये अर्धनारी नटेश्वराला वंदन केले आहे. त्याचे अर्धांग शिव व दुसरे अर्धांग पार्वती हे लक्षात घेऊन कवी म्हणतो शंकराच्या अंगावर व्याघ्रांबर आहे व पार्वतीचे जरतारी वस्त्र (कनकांवर) वस्त्र आहे. डाव्या बाजूला पार्वतीचा निळाकाळा केशकलाप तर उजव्या बाजूला शिवाचाजटाजूट भार दिसत आहे.

आपदामपहर्ताय : आपदाम्+अपहर्ताय—विपत्तींचे निवारण करणाऱ्याला.

ब्राम्ही मुहूर्त : सूर्योदयापूर्वी चार घटका; शुभ मुहूर्त

असकें : सारे, सर्व, ' जग असकी वस्तुप्रथा '। आ.

स्नानापरीस : स्नानापेक्षा ' परीस '-पंचमी

तुजवरि : तुझे

आनंदेऊन : आनंद देऊन, ' दोन सारखेच वर्ण आल्यास वर्णलोप होतो.

मुस्तेद : फा. सिद्ध

वासना : इच्छा

वीटी : विडा.

वस्ता : वस्तुचे अ. व. अलंकार

कुंदरदना : कुंदकळ्यांप्रमाणे ज्यांचे दांत आहेत असा

चक्र : एक प्रकारचे नाणे, दिनार (Sk–Eng. Dictionary–V. V. Bhide 1926)

जेठी : मल्ल

वोळी : ओळी.

तमासा : खेळ; कौतुक; कुतुहल वाढविणारा प्रसंग.

अंतस्तें : अंतस्थ ते. मनातील हेतू.

कंदलित : मुकुलित, नवीनच फुललेले

येद्धाळ : येवढा वेळ; फार वेळपर्यंत.
बीटि : विडा.
रामामणी : सुंदर स्त्री रत्न
कंजना : मैना
ताविती : ताप देतात
मैसी : शाई

---

## लक्ष्मी-भूदेवी संवाद

जनजळजमित्र : जनतारूपी कमलांना सूर्याप्रमाणे (विकसविणारा प्रभू रामचंद्राचे वर्णन)
फाळ : भाल. ह्या सर्व नाटकांमध्ये 'भालचंद्र' ऐवजी 'फालचंद्र' च लिहिलेले आढळते.
दिविजाग्रेसर : सर्व देवांमध्ये श्रेष्ठ
बंक : दरवाजा (मराठी भाषेचा तंजावरी कोश. संपा.-शं. गो. तुळपुळे)
अमाळसा : अंमळसा, थोडासा
भंड वचन : वावदूक बोलणे.
कुचोद्य : कुत्सित; निंदाव्यंजक शब्द; कुचाळी.
तपन : सूर्य
चूर्णिका : छंदविशेष. (पहा 'काव्यविचार' भा. १)
मृकुंडतनयदुरित : मृकुंड ऋषीच्या पुत्रावर मार्कंडेयावरील संकट
परूस : सं. परुष–कठोर
रूपजितमार : सौंदर्यात माराला जिंकणारा, अतिशय सुंदर
शर्वसंभृत : शंकर
खुळळुगा : रेडा, हल्या, टोणगा. (म.भा.तं.को.)
मुहवि : मोहवी
बंक : देवडी (१) पहारा, 'दमयंती स्वयंवर'
'अरे, तो काय सांगितलें रे'–दाक्षिणात्या पद्धतीचे मराठी वाक्य. रमा मणी–रमा उर्फ लक्ष्मी हे एक रत्नच.
'लक्ष्मी देवीस तरी कोप आणिला की।'
परिछिन्न : (यत्किंचितही)
जन तुझे वल्लभ व्हावे: राजाला पृथ्वीपती, पृथ्वीवल्ली, क्षमापति अशा नावानी संबोधितात. त्या आधारावर लक्ष्मी टोमणा मारीत आहे.

**कट्ट** : घट्ट तामीळचा संस्कार. तामीळ भाषेत 'ख, घ' ही व्यंजने नाहीत. फक्त 'क' ग, आहे.
कट्टी किंवा कट्टीकरण—विदूषक

**आर्यावर्तातील** : पवित्र स्थले सांगताना प्रथम उल्लेख श्रीरंगस्थल, कांचीपूर, श्रीनाथ शेषाचल, आदिवराह, तिरूवल्लर इ. दक्षिणेतील पवित्र तीर्थक्षेत्रांचा आहे.

**चेलेसें** : विष्णू विरहार्त होऊन आले, कलहंस, सारस, कीर यांस लक्ष्मीला पाहिले का असे विचारतो.

**चूर्णिका** : विष्णू शंकराची स्तुती संस्चत प्रचुर शद्बांत चूर्णिका छंदात करितो; प्रासयुक्त गद्यसदृश संस्कृतप्रचुर भाषेत दीर्घ रचना.

---

## गोवर्धनोद्धारण विलास नाटक

**चेतुळो उमुसुकोनेदि** : हातांत थुंकणे.

**तरि** : एकतारी
अद्दचूचि वेळ वेळ तन्नुकोनि । वेरि वेरि चेष्टेळु ससेदि ।
वेडे चार करून जीभाबाहेर काढून वेडावणे.

**बुरु** : तंबोरा

**मांदळ** : मृदंग

**तरु बुरु मृदु मिरदंग** : एकतारी, तंबोरा, मृदंग इत्यादी वाद्ये.

**तां** : त्वां

**वसुदेवुणिचूचि आशिर्वाद शेशेदि** : वसुदेवाने आशीर्वाद देणे.

**रामामणि** : सुंदर स्त्रिया हीच रत्ने

**कुडक्या** : कर्णभूषणे

**पंतुळ वच्ची मळामु सेसेदि** : पंतुळआचार्यांना प्रणाम करणे.

**फळार** : फळार (१) फलाहार.

**संलाप** : भाषण

**वाक्यविशेष** : पोरींस धरुन नेले की ।
तो कोठे आहे की ।

**हाऊने** : कोण वर्णिल याची महिमा ।

**गोळ्ळवाण्** : गवळचासारखा

**अचलळ** : पर्वत

मृत्युंजय चिरंजीव

पन्नगाभरण : सापांचे अलंकार ल्यालेला

अर्द्ध काय : अर्धकाय

शुभोत्कर्षाधेय : उत्कृष्ट स्थान. मंगल गोष्टींचे

असकें : सारे, सर्व.
भूकुंड नमस्कार केला–दाक्षिणात्य भाषांप्रमाणे वाक्यरचना.

विल्पन्न : व्यत्पन्न.

चाडलोपनयनादि : चौल, उपनयन इ. धार्मिक संस्कार

आनंदवल्ली : पार्वतीने नाव

शर्वाणी : पार्वती

भक्तीकुने : भक्ती करून.

नीललोहित : शंकर

---

रुक्मिणी कल्याण नाटक

सुदेव ब्राह्मणाचा मित्र विमलाचेत एकनाथांचा कल्याणकीर्ती.

जोच : चोज

रूक्मी निंदान्याजे : अष्टावतारांचे } चित्रण
दशावतारांचे

मूदराखडीशी पाठी कुळेवेणी : पाठीवरच्या वेणीत मृद, राखडी इ. सुर्वणफुले घातलेली.

स्त्रीजन्म मोठा फटकळ चमत्कारिक.

पृष्ठ ८ जो स्वाज्यास्वानंद. . . . अर्थ नीट लागत नाही.

अर्भार : ओबडधोबड; (२) संकट.

शृंगारवनाचे वर्णन : साप-बेडूक, वाघ-गाई, मांजर-उंदीर इ. परस्पर प्रेमाने वागतात.

अलंकार : मनोहारी हारी वरतरतारु चि मिरवते ।

विदूषक : चित्त तोषक

कृष्ण : विदूषक संवाद–' स्वामीअनृतप्रशंसेस आपणच मूळ '

विदू. : रुक्मिणीला स्वप्नात पाहून ध्यासामुळे तीच बाहेरही दिसू लागली
कृष्णाने केलेलें रुक्मिणीचे वर्णन ब्रह्मानंदसम.

| | | |
|---|---|---|
| कृष्ण | : | 'ध्यान तीचे या मानसीं लागले, आणिक विषयावरील धान सकल हारपलो' हे ऐकून. विदू. आंगे सर्व करूनिही म्हण ऐशी सांगे अकर्ता असें'. संस्कृत नाटकाप्रमाणे विदूषकाची भूमिका. |
| शिशुपाळ | : | राक्षस विधीने लग्न करण्याची इच्छा. जरासंध राजांचा पाठिंबा. |
| कंज | : | सारस पक्षासारखा सुंदर डोळ्यांचा पक्षी. |
| | : | रुक्मिणिची कृष्णमय अवस्था. |
| | : | कृष्ण आरुढलासे मनोरथीं. |
| | : | कृष्ण–मी धारावर तूं अचंचल विधू मी चंद्र तूं चंदिका, मी वारानिधी तूं अभंग लहरी मी शंभु तूं अंबिका । |
| | : | जासूद–रुक्मिणीहरणाचे वर्तमान सांगतो. 'काळा गोवळ पैठला शठ भला कोठूनि कीं तो कसा । |
| | : | रुक्मीचा पराभव–त्याचे पाच पाट काढून विटंबना. |
| | : | शृंगारलेल्या द्वारकेत विवाह. म्हातारा शंकर जोशी पंचांग घेऊन मुहूर्त सांगतो. |

---

## प्रतापसिंहकृत 'उषाकल्याण' नाटक

| | | |
|---|---|---|
| गणेशस्तुती | : | श्लोक—"विजयवैभव'. |
| भारती स्तुती | : | 'आता प्रार्थू वागधिष्ठानवाणी' अंत्ययमक–प्रवाणी. ('वाणी वेगवेगळ्या अर्थाने) |
| महाविष्णु स्तवन | : | 'शार्दूलविक्रीडित' तो हा सद्‌गुण धाम राम नमिला श्री देशिकांचा तुरा' देवक |
| भेदखेदातुरां | : | भेद आणि खेद यांनी दु:खी झालेले. |
| परमेश्वराची प्रार्थना: | | द्वैताचा नाश करुन अद्वैताचा साक्षात्कार करणाऱ्या |
| गुरुला | : | श्रीदक्षिणामूर्तिला नमन. (शार्दूल.) दक्षिणेत व तंजावरच्या आसपास दक्षिणमूर्तीची मंदिरे आहेत. |
| नाटकार्थसंग्रह श्लोक: | | कृष्णस्तुती (श्लो.) |
| गणवे | : | मोजणे. |
| गणेशप्रवेश | : | नृत्य. प्रपोतायासि ? |
| ग्रंथकार परिचय | : | प्रापसिंहाच्या गौरवपर दोन श्लोक पहा; दमयंती स्वयंवर रघुनाथ पंडितवृत. |

नाटककार, नाटयवस्तु व नट यांचा गौरव 'प्रगत्याचे मूर्धामणि' पहा—कालिदास. श्रीहर्ष इत्यादी नाटककाराप्रमाणे.

शैवाग्रेसर : शिवाच्या अग्रभागी म्हणजे पुढे असणारा.
वारिभव चूड : गंगा ज्याच्या शिरी आहे तो शिव.
भासित : भस्म. असित. पांढरा नसलेला येथे निळा.
सुसित : स्वच्छ शुभ्र. मौलिमाला—केसांवर बांधलेली माळ.
संघाट (त) : समूह. प्रथम—प्रथम—गण.
अंतस्तिमिर : मनातील अज्ञानरुपी अंधकार.
तरुकीर्तिवृंद : रुपक. स्मृचुगामिनी (१)
वनवर्णन : १ ते ५ श्लोक
शर्वमानसा : शंकराच्या मनाला आनंद देणारी.
कीर : पोपट टोणें (१).
पार्वती ह्या वनाच्या अपूर्वतेचे वर्णन करते—'फिरती केसरी मंडली करीं'
पहा. मारीच आश्रमवर्णन. गिरिदारणी—पर्वत फोडण्यात.

दनुजनिवह : राक्षसांचा समूह
यवढोल्ल : येवढा वेळ. वल्लनिधी—वलन्निधी
परमेश्वर : शंकराचे गणांसह आगमन
नंदिकेश्वराने केलेले वनवर्णन : **निसर्गचित्र** शंकराचे प्रतिकात्मक पूजन.
**त्रिपुरसुंदरी उमादेवी** : पार्वती. वनवर्णन 'गरुड सन्निधी खेलती अही
कुमारस्वामी : स्कंदाचे आगमन (कार्तिकेय.)
यवढोल्ल : येवढा वेळ.
बाणासुर : बळी या श्रेष्ठ राक्षसराजाचा पुत्र.
अलंकार : बाणी कार्मुक. . . .
बाणासुर **गायननटन** पूर्वक शिवस्तवन. शिवपार्वतीला 'मला पुत्र म्हणा' ही विनंती.
शोशितपूर : बाणासाठी वसविलेले नगर.
त्ये येते : ती येते.
नोकी : आकाशात ; स्वर्गात
शिवपार्वतीचा विलास उषेला दिसतो. पार्वती वर देते. द्वादशीच्या रात्री स्पप्नात प्रियकर भेटेल.

देवल : देऊळ.
प्राणाचार्य : राजवैद्य.
चित्रलेखा : उषा संवाद. नाटचपूर्ण. किमान शब्द. मार्मिक.
णव्याण्णो बाटे : नव्वाण्णव टक्के

रोषती : रिक्ती

वास पाहणे : वाट पाहणे.

२६. विदूषक : 'शास्त्र जाणतोस बापास (मदनास) निंदणे बरे नव्हे.

२८. विदूषकाचा विनोद : अनिरुद्धा, तू भाग्याचा. तुला जागेपणी व स्वप्नात सुंदर स्त्रिया मिळतात. मला स्वप्नात सुद्धा कुरुपच.
वेखंडासम दंत पडि विनसे
रामाय तस्मै नम :

अनिरूद्धळ : चित्रलेखा संवाद.

फुगारा : फुगवटा

टांचे : कमी, अपुरे.

उषेचा गांधर्वविवाह : गर्भसंभावना.

दाईने बाणासुरास वार्ता सांगताच तो संतापला. तो सरदारांना म्हणाला.

'उषा हे उभी चत्वरेने चिरा हो / बलें भीतरी क्षारही तो भरा हो /
बाणासुर युद्धाची तयारी करतो.

३७. : अनिरुद्धाचे वीरोचित वचन– बाणी माझी....

अब्धिजावरा : कृष्ण
प्रद्युम्नाचा सेनापति सात्यकी त्वेषाने युद्धार्थ निघता, कृष्ण सांगतो शिव बाणासुराचे नगर रक्षितो.

कीर्ण : विखुरलेली

तूर्ण : तावडतोब

सह आतंक : भीतियुक्त; चिंतेने
हरिहर आज्ञेने बाणासुर कन्या अर्पितो.

## पार्वती कल्याण नाटक

सारी कथा कुमारसंभववारीक कथेशी बव्हंशी जुळते.

१. वैहृण्य : मंडित पंडीत मंडळी.
महोत्सव पहावयास मिळाली आहे.

अनवद्य : स्तुत्य

श्लो. रुपाने जणू धर्म केवळ दुजा.....

हा श्लोक '**प्रतापविजय प्रबंध**' ह्या ग्रंथातला ; रामकृष्ण कवीचा.

संतानार्थिनी : अपत्य इच्छा करणारी.
हिमालय पत्नी मेना अपत्य नाही म्हणून चिंतातूर.

अनुचरांसंगट : अनुयायांसमवेत.

२. मेनादेवी : निजकरांचे सुगंध उगाळी. स्वतःच ईश्वरार्चनेची तयारी करी.

अवलि : पापकर्म

हिमालयाचा शुद्ध भाव पाहून शंकरपार्वती येतात व हिमालयाचे म्हटलेले स्तोत्र ऐकून देवी प्रसन्न होऊन वर देते; मना देवीलाच कन्या म्हणून यायला सांगते. देवी तसाच वर देते.

निमिषांवीण : ज्यांचे नेत्र मिटत नाहीत.

इंद्र : ब्रह्मदेवाकडे तारकासुराची दुष्कृत्ये सांगतो.

ब्रह्मदेव म्हणतात, गिरीसुतेचा शंकराशी विवाह होऊन कुमार जन्मले. तो नरकासुराचा वध करील.

लोलंगत : अत्यंत आकृष्ट

पार्वती आनंदवल्ली : पार्वती म्हणजेच देवी आनंदवल्ली (दक्षिणेतील प्रसिद्ध देवता.)

इंद्राला ईश्वर स्त्रीसमागम करील हे अशक्य वाटताच ब्रह्मदेव मदनाची थोरवी गातो. मदनालाही हे कार्य अशक्य वाटते. इंद्र व ब्रह्मा त्याचे सामर्थ्य व त्रिपुरसुंदरीचे महात्म्य वर्णितात. मदन कार्य स्वीकारतो–वसंत व मलयानिलाबरोबर. हिमालयावर तप करण्यासाठी शंकर येतो.

वाक्य : कोण की हे प्रकाशवल्ली येते ?

पार्वती ईश्वराची सेवा करीत असता मन्मथ सुमचाप लावून बाण सोडतो. शंकराचे मन विकारयुक्त होता तो तृतीयनयनाने मदत जाळतो. तेव्हा रती पार्वती प्रार्थना करते. पार्वतीच्या विनवणी-मुळे शंकर मदनाला पूर्ववत् जिवंत करतो.

वाक्यप्रयोग बहुतेक नारद होईल सारिखा दिसतो.

युध्दाचा तमासा : तमाशा, गंमत, देखावा.

कलहप्रिय नारद हरि हरांमध्ये भांडण लावावे या हेतूने येतो. हिमालयाला आपली कन्या विष्णूला द्यावी असे सांगून विष्णू-बरोबर रागाने शिव युद्ध करील ही इच्छा.

बीजे करणे : जाणे. यादवकालीन महानुभावीय वाङ्मयात फार आढळतो.

हेण (हीण) : हीन, न्यून.

१०. शिवनिंदा : श्लेषयुक्त व्द्यर्थी

११. शिवगण कुंभोदर शिवस्तुती करतो. नारद विष्णुस्तुती करतो.

१२. कुंभोदर विष्णूने वामनावतारी भीक मागितली हे सांगतो. आणि न्यूने कथन करतो. हिमालय हरी व हर एकच असे सांगून 'जे करित भेद याशी, ते केवळ पापत्मक' विनोदासाठी हा वाद असे नादर व कुंभोदर म्हणतात.

दासी : चित्तवृत्तिमंजिरी शिवव्रत करायला सांगते.

डोल : कल.

शिव पार्वतीची परीक्षा घेण्यासाठी वृद्ध ब्राह्मणवेष घेऊन येतो. शिवनिंदा. पार्वतीस परावृत्त करण्याचा प्रयत्न. स्वत:शी विवाह कर म्हणताच पार्वती म्हातार्‍या ब्राह्मणाचे ' न सुटेचि हे विषयाशा पहा' म्हणते. ब्राह्मण च्यवन ऋषी व सुकन्या यांची विवाह कथा ब्राह्मण शिवनिंदा करतो. पार्वती शिवाला अकिंचन अश्वम म्हटल्याबद्दल उत्तर देते व जायला निघते. तोच ब्राह्मण गुप्त होतो.

शिवरुपाने दर्शन : पार्वतीला पश्चात्ताप. विरहावस्था. शिवरुपाने दर्शन. शिव ऋषींना हिमालयाकडे विवाहनिश्चितीसाठी पाठवितो.

**मायावती परिणय** (रुक्मिणी--कृष्ण पुत्र प्रद्युम्न व शंबरासुरसुता मायावती विवाह.)

' श ' बद्दल 'स ' शंसि वंदना स ष शां सः । (हेमचंद्र–प्राकृत व्याकरण)

**गुणशीम** गुणसीम, गुणांना सीमा नसलेली.

**अगोधरिले (ज्याया)** : अगोदरचीच (पत्नी).

**यम** : नियम.

**सदर** : बैठकीची जागा, सभास्थान.

**धीवर मत्स्य (पुष्ट)** : नजराणा शंबरासुराला देतो.

**चित्र भानुज घटित चित्र रुचि सारं :**

**चित्रांगी ते अलि चाक चकयाची :**

**चीज** : कौतुक.

**नाहो** : नाथ (ज्ञा. नाहो लाहो).

**ग्रह** गृह.

**सुमतल्प** : फुलांचा बिछाना.

**सळितसे** : छळितसे.

**अंतुरि** : स्त्री.

**मायावती परिणय** : नवरीस ठाव नसता पुत्राच्या लग्नास अवतण (आमंत्रण).

**मित्रविंदा परिणय नाटक**

विंद अनुविंद कृष्णाची निंदा करतात. अकुलीन, अगुणी. 'जेणें मानुनि मातुला निवटिलें तद्‌बांधवा आटिले' (व्याजनिंदा).

**जाजावला** : रागावला, कातावला.

चावुटी : बडबड

कलाक : (त्यजुनि कलाक चांगले, स्वयंवरासाठी चोळ, पांड्य, केरळ, मालव, मत्स्य, पांचाळ, मागध देशाचे राजे आले. रघुवंशातील इंदुमति स्वयंवराच्या धर्तीवर. (कालिदासकृत) कर्णाच्या पराक्रमाचे प्रश सखीने केलेले वर्णन. कुरुराज सुयोधनाचे शौर्य.

रजभर : कणभर, थोडासुद्धा

सराणी : शिराणी आवड,

भरतवाक्य : मराठी नाटकांची गंगोत्री भाग १. प्र. २.५

चूर्णिका : 'विद्यानुगुण्य' दाक्षिण्या गण्य नेपुण्या 'ण्य' कार 'ष्ट' कारांची विपुल योजना.

विदूषकाचे तोंडी दरू : 'तुजला कामाचे व्यसन मोठे' (पार्वती परिणय.) 'मला खाण्याचे व्यसन, तुला (शंकराला) कामाचे व्यसन.

शिराणी : आवड.

## लक्ष्मण परिणय नाटक

सेतुनामा गुरुस वंदन. सेतुस्वामी हे रामदासी परंपरेतले.

कंचुकी प्रवेश : धिमित धिमित. . . . .नृत्याचे पदन्यास करीत प्रवेश.

विघ्नेश्वर, भारती, सद्गुरुची प्रार्थना हरिहर स्तोत्र.

त्वां इकडे यावे –' त्वां '—' तू ! ' चे तृतीयान्त रूप.

प्रतापसिंहाचा प्रतापवर्णन : धैर्य मेरुसमान

कंचुकी प्रवेश : किटतानकथ्ये

लक्ष्मणेच्या रूपाचे वर्णन : व्यतिरेक अलंकार विरहज्वरित नायिकावर्णन अपूर्ण.

## पारिजातक नाटक

गुरुस्तवन : सेतुनामागुरु.

विष्णूचे : हरिहराचे स्तोत्र संस्कृत.

दौवरिक : भिकाजी नायिक.

अतिसि पुष्प : पांढरे शुभ्र फूल

करनखरी वाजे कमनीय वीणा : हाताच्या नखांनी या अर्थी 'करनखरी' हा अनुचित शब्द.

येणाळमुखी : (एणांकमुखी) चंद्रानना.
अज्जसिक : आज्यसेक-तुपाचे शिपणे
अग्निसिखा : अग्निज्वाला.
सरसिजलद : सर सिजल कमलपत्र
निर्वेद : खिन्न
द्वर्थी शब्द योजना संस्कृत श्लोकाच्या धर्तीवर.
तूं गा कोण महीधरेंद्र - - -कृष्णाचे प्रत्यूत्तर
बुझावणी : समजूत.

कलहप्रिय नारदाने स्वर्गाचे पारिजात पुष्प कृष्णाला दिले ते त्यांने रुक्मिणीस दिले हे सखीकडून कळताच सत्यभामा रुसते. म्हणून पारिजातकवृक्ष तिच्या दारी.

## ययाति चरित्र

नटन : नाट्य
संघट्टन : संयोग
भर्गचरण सारस : सूर्यचरणकमल
कल्पशाखी : कल्पवृक्ष
तां : त्वां
कविपसी : शुक्राचार्यापाशी
कामधेनुनती : कामधेनूंच्या रांगा
संधरणी : मनधरणी
वाचस्पतिनंदन : बृहस्पतीचा पुत्र कच.
अप्रत्याख्येय : व्याख्या न करता येण्यासारखा
येढोलवरी : एवढा वेळपर्यंत
दितितनयीं : एवढा वेळापर्यंत दैत्यांनी
क्रकतें : (क्रकचें) मगराने
अवेद्य : माहीत नसलेले
स्फुट : उघड
छन : क्षण
ध्रुव : निश्ति, खात्रीने
विदारणे : फाडणे
कांक्षित : इच्छित

| | | |
|---|---|---|
| अद्यप्रभृति | : | आजपासून |
| ब्रम्हत्येस | : | ब्रह्महत्येस |
| काव्यविख्यात | : | कवी म्हणून प्रसिद्ध असलेला शुक्राचार्य |
| सहजात | : | (सह+जात) सहोदर; बंधू. |
| स्वसद्मी | : | (स्व+सद्म) आपल्या घरी. |
| भार्गवी | : | (शुक्राचार्य हे भृगु वंशीय) देवयानी. |
| राजन्य | : | क्षत्रिय. |
| कुंदाभरदना | : | (कुंद+आभ+रदन) कुंदकळ्यांचे (सौंदर्य) सदृश दांत असलेली. |
| वामलोचनी | : | सुंदर डोळ्यांची. |

विरहोद्विग्न ययाती राजा चंद्राची निर्भत्सना करतो. त्या तीन श्लोकांत कवीचा सुंदर कल्पनाविलास आढळतो :

चंद्र जसा कुवलयाप्त (कमलांचा बंधू) तसाच कालकूटाचा जुळा भाऊ (समुद्र मंथनाच्या वेळी प्रथम कालकूट विष बाहेर आले व नंतर चौदा रत्ने. त्यांपैकी चंद्र हे एक रत्न. )

| | | |
|---|---|---|
| विषनिधीच्या | : | गर्भात जन्मलेल्या व विषकंठाच्या (शंकराच्या मस्तकावर असणारा चंद्र, मावळल्यावर पातळात जात असल्यामुळे वासुकी या सर्पश्रेष्ठाच्या सान्निध्यात रहाणारा, राहू हा ग्रहणाच्या वेळी चंद्राला गिळीत असल्यामुळे तो राहूच्याउतरातून बाहेर पडतो तो विषाने माखलेलाच. त्यामुळे विरही जनांना त्यांचे किरण विषासारखे दाहक वाटतात. |
| व्यत्यास | : | उलटे |
| माज | : | गर्व |
| विप्रचूडामणि | : | ब्राह्मणांच्या मस्तकावरील रत्न म्हणजेच ब्राह्मणोत्तम. |
| सार | : | सत्व. |
| येतरौ | : | सशषां सः ।, हेमचंद्र |
| तिमिरपुंजसमकेसी | : | घनदाट अंधारासारखे (काळे) केस असलेली. |
| अनृत | : | खोटे |
| नागांगना | : | नागीण |
| वस्ता | : | वस्तूचे अ. च. |
| कल्पकाल | : | जगाचा अंत होण्याची वेळ |
| प्रालेय | : | बर्फ |
| खाजें | : | खाद्य |

| | |
|---|---|
| **राजन्य** | : क्षत्रिय |
| **करवाल** | : तलवार |
| **मुधा** | : खोटे |
| **रतिस्पर्धिनी** | : रतीबरोबर स्पर्धा करणारी म्हणजे अत्यंत सुंदर |
| **शेखी** | : (शेष) शेवटी |
| **शर्मिष्ठा** | : श्लो (शा.) जैसें निष्फल चांदणे विजनिचे..... मनुस्मृतीतील असत्य भाषण पाप केव्हा होत नाही. |

**न नर्मयुक्तं वचन**...... : मार्मिक वचन

| | |
|---|---|
| **सख्य** | : धान्य (पीक) |
| **बाटकोल** | : वर्तुळाकार (?) |
| **अंतर्भाव** | : अंतरीचा भाव |

**श्री गणेशलीलार्णव**

शरभेंद्र राजाने लिहिलेलें हे पाच अंकी नाटक आहे. तंजावर येथील नाटकात विस्ताराने बरेच मोठे आहे.

भूमिका.––दरवर्षीप्रमाणे गणेशोत्सवानिमित्त लेखकाने नवे नाटक रचले आहे. ते उत्सवानिमित्त जमलेल्या लोकांसमोर करून दाखविले जात आहे. कालिदास प्रभृतींच्या नाटकात जसे कालभैरवेश्वराच्या जत्रेनिमित्त जमलेल्या रसिकांसाठी नवे नाट्यप्रयोग केले जात तोच उद्देश सूत्रधार येथे सांगत आहे.

आर्यावृत्ताची सूबक रचना आढळते. चरणान्ती अंत्ययमक न योजता अंतर्गत यती व त्याच चरणान्ती योजिले आहे.

लेखकाचा वंशवृत्तांत :

शुंभासूर चंडासुराला मुजरा करतो.

कमलासूर या चाराने पृथ्वीतलावर गंडकी नदीच्या कांठी देवांनी आरंभिलेल्या तंत्रयागाची माहिती दिली. ते ऐकून हे सिंदुरासुराला सांगावे म्हणून विचार करीत असता तोच येत असल्याचे दुर्भदासूर येऊन सांगतो.

देवांकडील दूत व दानवांकडील नोकर यांचे वर्णन करीत असता लेखक त्यांची नांवे, कृती व रूप यांचे सांचेवार वर्णन करतो.

सिंदुरासुराचे आगमन घोषित करणारा दुर्मदासूर 'दुष्ट शिरोमणि हा। धर्ममती लवलेशही नाही। वर्म घरी सकळांचे पाही।'

सिंदुरासुराबरोबर मुंढासूर, प्रबलासूर व इतर सेवकजन असतात. त्याने आसनावर बसताच गायकवर्ग संगीतातील कौशल्य दाखवितात. ते गेल्यावर चंडासूर राज्याची माहिती

देतो. नंतर कलहप्रिय नारद व पर्वत ऋषी येतात. सिंदुरासुराला नारद देवांनी चालविलेल्या व्रताची माहिती देतो.

नंतर इंद्राणीची सखी शर्मदा कष्टी झाली (इंद्राणीच्या इंद्रविरह दुःखामुळे) असता कमलांगी नलिनी पत्र मृणाले घेऊन येते.

इंद्रायणीचा प्रवेश––संस्कृत वाक्यांनी तिची वृत्ती आकृती व अभिनय सांगितलेला आहे. तिची विरहयातना व सख्यांनी केलेले उपचार हे शब्दशः संस्कृत नाटकांतील कोणत्याही विरहविकल स्त्रीचे अक्षरशः चित्रण आहे.

सखीने गणेशव्रत करायला सांगितले आहे.

सुरवातीला पंचमुख गणेश म्हटला आहे तर 'दशभुज त्रिमुख' म्हटला आहे. ही विसंगती की नक्कलकाराची चूक ?

इंद्राणीच्या मनोमन प्रार्थनेप्रमाणे गणपतीचे आगमन.

नर्तनपूर्वक इंद्रायणीने प्रार्थना केली.

अंक २ रा

दौपारिक : इंद्र बृहस्पति आश्रमात येणार म्हणून विश्वकर्म्याला रस्ता नीट करावयास सांगतो.

विश्वकर्मा : नोकर व खनिजपिटकादि सामग्री घेऊन विश्वकर्मा येतो.

प्रभाकर जोशी : इंद्राला शुभ वेळ सांगण्यासाठी, पुस्तकभार घेऊन येतो.

इंद्र : सर्व वैभवासह इंद्र येतो व कार्य महत्व जाणून ब्रम्हाविष्णूचे स्मरण करतो.

बहुरुपीच्या आश्रमाचे वर्णन शाकुंतलातील कण्व मुनींच्या आश्रमासारखे मुंडासूर अदृष्य होऊन आश्रमात जाऊन बसतो.

मुंडासूर व प्रबलासूर बृहस्पती व कच यांची रुपे घेऊन येतात. त्या दोघांचे परस्पर संभाषण. गुरुपती तारा तुझी पत्नी होईल असा विनोद.

दौवारिक : आधीच गुरु व गुरुपुत्र आलेले असतां, पुन्हा दोघे दूर्वाफुले घेऊन आले आहेत व दोन्ही एकसारखेच.

खरे बृहस्पती व कच यांना मायावी राक्षस समजून इंद्र व दौवारिक यांची वागणूक.

संप्रज्ञात समाधी.

चूर्णिका : निरंजनमाधवाने 'सुभद्राचंपू' मध्ये उपयोग केला आहे. या ठिकाणी सर्व श्लोक संस्कृतमध्ये लिहिले आहेत.

पार्वती : आंता तुवा 'प्राकृत' बाळ व्हावे.

आदिशेषाने बालगणपतीच्या डोक्यावर फणा धरली व शुभलक्षण केले. मृण्मय गणेशाची पूजा वापर याचा 'केली' असा भूतकालवाचक 'मुजरा करून' बालगणपतीला मारण्यासाठी गृध्रासूर येतो. त्याला मारुन त्याचे पंख घेऊन येतो.

क्षेमकुशल : या दोन राक्षसांनी ठार मारण्याचा प्रयत्न केल्यावर गणपती त्यांना मारतो. क्रूरासूर मार्जाराचे रुप घेऊन येतो. 'शतमाहिष्म' राक्षसी इंद्राणीचे रुप घेऊन येते. पूतनेप्रमाणे वर्णन, तिला मारुन तिचे कान व नाक घेऊन गणपती येतो. कमलासूर अंकणावर होऊन येतो. दुंदुभी दैत्य गण बालरुपी येऊन विषफल द्यावे म्हणून प्रयत्न करतो. अजगरासूर गिळण्यासाठी येतो.

शलनासूर : 'खरतर दंशिन म्हणवुनि वेगी'

मेषासूर : टक्कर देण्यासाठी ऊंटरुपी खडगासूर येतो.

शैलासूर शलाकार महा.

गणपतीच्या खोड्यांनी (वनविहाराला) गौतम ऋषी येतो. रागाने खोडकर गणेशाला 'फोकाटी' घेऊन मारावयास जाता गौतम 'नको नको' म्हणतात. तोच गणेश शंकररुपाने दिसतो. रागाने गौरी गणपतीला कोठडीत घालून कवाड उघडून पाहाते तर बाहेर गणेश खेळतो व कोठडीतही बसलेला आहे.

अंक चौथा समाप्त.

**अंक ५ वा**

गणदास दोवारिक येतो.

बालगणेश मयूरेश्वर बनून इथेन संपाति जटायूस सोडवून घेऊन येतो, त्यांना त्यांचा माता विनता यांच्या स्वाधीन करतो.

कंदुकक्रीडा.

बालरुपी चंचलासूर येतो. त्याला घोडा करून गणेश मारतो.

वृकासूर

श्वापदासूर

'भा' ऐवजी 'फा' 'फालचंद्र' असा सर्वत्र उपयोग.

शंकराच्या मस्तकीचा चंद्र हरवला म्हणून प्रथमादिगणांना शंकर रागावले. त्यांनी गणेशाजवळ पाहिल्याचे सांगितले. तेव्हा शंकरानी त्याच्याजवळून आणा म्हटल्यावर त्यांना गणेशाने हैराण केले व चंद्र शंकराच्या डोक्यावर ठेवून सर्वांना हास्यास्पद ठरविले. तेव्हा प्रमथाने शंकराजवळ प्रार्थना केली की "त्यालाच गणांचा प्रमुख करा" शंकर म्हणाले तथास्तु.

म्हणून 'गणराज' 'गणपती.'

ऋषींबरोबर दोन महिषासूर येतात.

वराहरुपी मंगलासूर

व्याघ्रासूर

गणेशविवाह. . . .विवाह मंगल व सोहळा.

प्रबोधचंद्रोदय हे कृष्ण मित्र यांनी लिहिलेले संस्कृत नाटक आहे. हे एक रूपक नाटक आहे.

' An allegory is distinguished from a metaphor by being longer sustained and more fully carried out in its details and from an analogy by the fact that the one appeals to the imagination and the other to the reason '— Encyclopaedia Britaenica, Vol. I.

हे नाटक आध्यात्मिक आहे. ह्यात तीन प्रकारची पात्रे आढळतात :—

(१) **रूपक पात्रे.**—(१) विवेक, वस्तुविचार, क्षमा, संतोष, श्रद्धा, शान्ति, मति, पुरुष.

(२) महामोह, काम, क्रोध, लोभ, हिंसा, तृष्णा, दम्भ, अहंकार, रति, मिथ्यादृष्टि, विश्रमावती, मन, विष्णुभक्ती, सरस्वती, उपनिषद् संकल्प, वैराग्य, निदिध्यासन आणि प्रबोध.

(२) **प्ररूप पात्रे.**—चार्वाक, भिक्षु, क्षपणक, कापालिक, वट व शिष्य.

(३) **सामान्य पात्रे.**—सूत्रधार, पारिपार्श्वक, सारथि, प्रतिहारी व दौवारिक. त्यात सत्पक्ष पात्रे—पहिली **दहा** आहेत. बाकीच्यातील नंतरची **दहा** असत्यक्षाची आहेत; शेवटची **सात** सत्पक्षाला पूरक आहेत तर चार्वाक, भिक्षु, क्षपणक व कापलिक ही असत्पक्षाला सहाय्यक आहेत.

भारतीय भाषाभगिनींच्या वाङ्मयाचा तपास घेता, ह्या नाटकाचा अनुवाद अनेक भाषांत झाल्याचा पुरावा आढळतो.—

(१) **तामिळ.**—वेंकटराम वेंकटेश भट्टी पुटकोट्टे यांनी अनुवाद केला. (प्रकाशन १९११.)

(२) तेलगू.—नदिमल्लमा आणि धन्टसिंगमा ह्या दोघांनी **प्रबोधचंद्रोदय नाटकाचा** अनुवाद प्रबंधकाव्यात केला.

(३) मल्याळी.—साहित्य मल्याळीमध्ये ह्या नाटकाचे तीन अनुवाद झाले असे केरल साहित्यचरितात म्हटले आहे.

(१) कुष्णमपल्ली रामनपिल्ले ह्यांनी केला (१८४६–१९१२).

(२) शंकुण्णिमेनन (१८९३) मध्ये केला.

(३) सी. ए. नानुवैया शास्त्रींनी तिसरा अनुवाद केला (१८५०–१९१३).

(४) बंगाली.—श्री. विश्वनाथ न्याय रत्न ह्यांनी १८३९ मध्ये केल्या. हे बंगालीतील पहिले अनुवादित नाटक होय. (प्रकाशन १८७१).

(५) फारशी.—डॉ. सोमनाथ गुप्त ह्यांच्या 'हिंदी नाटक साहित्य का इतिहास' ह्या नाटकाचा अनुवाद 'गुलजारे हाल' ह्या नावाने शहाजहानच्या कारकिर्दीत केला.

(२) बलीराम साधूने केला. तो हिंदी नाटकांना प्रेरक ठरला आहे.

(६) गुरूमुखी.—ज्ञानदास साधू ह्यांनी १७८९ मध्ये ह्या लिपीत रचना केली.

(७) इंग्रजी.—जे. टेलर ह्यांचा अनुवाद प्रसिद्ध आहे. १८११. फ्रेंच.

French .. G. Deveze: Le Lever de La Lune deLa Connaissance यांनी प्रबोधचंद्रोदय या नावानेच केला.

Russian : Kovalevsky

Danish : (Dutch) T. W. Boissevain
-Maansopgang der Outwaking.

ने

German : (1) The Goldstucker Die Gubert des Begriffs.
(2) Dr. Bernahard Hirzel, Zurich—Evkenntnismonauf-gang.

अनुसूयाउपाख्यानम्

(पतिव्रता धर्माचे माहात्म्य)

सद्गुरु व विघ्नेश्वर यांची प्रार्थना.

नवरसभरित सरस भक्ति ज्ञान वैराग्य प्रधान नाटक.

वनवासातील अत्रीमुनींचा आश्रम. वर्णन.

अत्रीमुनींचे आगमन. रामादि वंदन करतात.

अनसूया सख्यासमवेत येते. अनसूया / निरसूया / उत्तम गुण म्हणती येथेंचि असूंया.

फेडा : निराकरण

युणे : उणे

सुपति : गाद्या. (तुकाराम-लोडिस्ते बोडिस्ते पलंग सुपती.)

सुधेपरिस : सुधेपेक्षा. (पं. परिस)

सीता अनुसूयेला सांगते, वनवासांत पंचमहाभूतेही सेवा करीत. त्रास देत नसत.

कलहप्रिय नारदाचे आगमन.

लांचावणे : अतिशय आकृष्ट होणे.

निगमपारग : वेदपारंगत.

संत्राण : संरक्षण

अंचे : आमचे

हरिहरदूत वार्ता आणतात. अनावृष्टीने पिडलेले लोक पार्वती, लक्ष्मीला शरण न जाता अनसूयेला गेले. तिने अभय देऊन दुष्काळग्रस्त लोकांना दिव्य अन्ने दान केली. ते पहाण्यासाठी ब्रम्हा, विष्णु, महेश आले.

शिवनामे : चिदंबरेश, शिक्कामसुंदरीनाथ, हेमगिरीचाप, शामकंठ.

ताव : ताप; उन्ह.

अनसूयेचा गर्वभंग करण्यासाठी ब्रम्हा, विष्णु, महेश.

नारद : विनोदाने म्हणतो. विष्णूचे आगमन.

विष्णूचा परिहास नारद करतो - "जन्मास येऊन अजन्मा.
लत्ताप्रहार खावून ते विरूद म्हणून मिरवावे.

ब्रम्हदेवाचे आगमन.

कलहप्रिय, कलहबीज नारद

नग्न अनसूयेचे हरिहरब्रम्हाला स्नान घालावे म्हटल्यावर अत्रीमुनी कष्टी होतात. "जायेची लाज जावया आली" अनसूया आपण हे सहज करु "सागराशी मही सर्वही बुलथूनी मागुती स्थापीन की क्षणीते" असा आत्मविश्वास. दुसऱ्या दिवशी सकाळी स्नान भोजन घालीन असे म्हणते. सीतेला स्मरते. दिव्यालंकारयुक्त सीतेचे आगमन.

| | | |
|---|---|---|
| धामिरेपण | : | घबराट |
| निदान | : | अंत (म्हणुनि निदाना झणी पाहसि किती) |
| काळीठपक | : | काळीकुट्ट |
| अर्कात्मज | : | सूर्यपुत्र शनी |
| जोडी | : | तुलना, समानता |
| दर | : | शंख (दर चक्रांबुजकर-शंख, चक्र, गदा कमल विष्णूच्या हातात असतात) २. भीति. |

पतिभक्तीचा महिमा.

| | | |
|---|---|---|
| श्लोक | : | ईश्वराचे सर्वत्र वास्तव्य. |
| साहेब | : | पार्वतीच्या तोंडी. कालविपर्यास. |
| पुठचे / फुटे | : | दुःखित होते. |
| तां / त्वां | | तृतीयान्त 'तू' चे रूप |
| भाज | : | भार्या, पत्नी |
| तन | : | तनू, शरीर |

पार्वती, लक्ष्मी, सरस्वती आपले पती कोठेच सांपडेनात म्हणून दुःखी झाल्या. तो नारद-मुनी येऊन अनसूयेचा महिमा सांगतो. तिने तिन्ही देवांना तान्ही बाळे करुन त्यांना जोजावते आहे. तेव्हा तिघी तिला शरण जातात. ब्रम्हा, विष्णू, महेश आपल्या रुपाने येतात. सीता पतिव्रतेचा महिमा सांगते.

## प्रभावती परिणय

तेलगू लिपीत लिहिलेल्या या नाटकातील कित्येक अक्षरे अस्पष्ट वा गळली आहेत. त्यामुळे कांही शब्द लागत नाहीत.

पुंडरीकनेत्र : कमलनयन ज्याचे नेत्र कमला प्रमाणे आहेत तो.

पाकशासन : इंद्र

प्रालेयाचल : हिमालय

कामउर्मि : विषयवासना

तुजुक : कौतुक

तोंडसा : थोडासा.

स्पंदन : रथ

चारण : भाट

स्मर्तृगामी : स्मरण केल्याबरोबर तेथे जाणारा

वारणेंद्रगमना : गजगामिनी

वैखरी : वाणी (परा पश्यंती, मध्यमा व वैखरी)

थ्येंबुटा : थेंब

जातवेद : अग्नि

बढाई : मोठेपणा

अभांट : आरडाओरड

पट्टण : नगर

## लक्ष्मणा परिणय

पंचू : पंजा

मद्दळताळ : मृदंगाचा ठेका, ताळ

## पार्वती कल्याण

कल्याणपरंपरावर्धन : विवाह (कल्याण) नाटक परंपरा समृद्ध करणारे

क्ष्माधरमणी : पृथ्वीवरील पर्वतश्रेष्ठ (मणी-रत्न)

सानुवर : शिखरे असलेला

मीनांककांता : मदनाची पत्नी रती

तान्या : तान्ह्या; (बाळ)

कदाचित् दिक्दंती : आठही दिशा सांभाळणारे दिग्गज, कदाचित् (शक्यता आहे)

ध्वांत : अंधार

येर्णाक : (एणांक) चंद्र (मृगांक, शशांक)
शुश्रूषा : सेवा
व्याममंडल : आकाश
डोले देणे : मन वळणे
वीचिका : लाटा
परावा : दुसरा

## श्रीगंगाविश्वेश्वर परियण नाटक

शंबरनिदूषन : शंबरासुराचा वध
कुलपयोधिसुधाकर : कुलरूपी सागराला चंद्राप्रमाणे (भरती आणणारा आनंद देणारा)
जनेष्टदाता : लोकांच्या इच्छेप्रमाणे देणारा
स्वर्णदीला : (स्वर्नदीला) स्वर्गातील नदीला
विविक्त : एकाकी
ताटंक : कर्णभूषणे; तानवडे

या नाटकात सर्वत्र "म्ह" ऐवजी "म" आढळतो

मणून : म्हणून
माथारपण : म्हातारपण
तांच : त्वांच
म्हण "विच्वास भिऊन पळता सर्पाचे पुसावर (शेपटीवर) पाय पडणे
त्याक्ष : त्र्यंबक; तीन डोळे असलेला
मेजून : मोजून
व्यसनस्थ : दुःखी

वाक्यप्रयोग--तो सुखी करुन द्येवा--त्याला सुखाने लग्न करु द्या

माघा : मागा

## शिवरात्री उपाख्यान

अंबरावरण : आकाश हेच वस्त्र; दिगंबर
सौख्यद्रुमांकुरसा : सौख्यरूपी वृक्षाच्या अंकुरासारखा (सौख्य+द्रुम+अंकुर)
चणचण : चळचळा (कांपवी)
धाका : भीती (धाक)

विस्थली : काशी, प्रयाग व गया ही हिंदूंची पवित्रक्षेत्रे.
सरफोजी राजे यांनी तीर्थयात्राकेल्या, त्यांचा उल्लेख
(पहा - तीर्थावळी=ले. सरफोजी राजे)

कुंचुकी वार्धक्याचे वर्णन करतो

संस्कृत नाटकांप्रमाणे "आकांशी" ही नाटचसूचना. व्यक्ती न दिसता तिचे भाषण रंगभूमिवरील नटाला ऐकू येते. तो प्रेक्षकांसाठी तसेच पुन्हा बोलतो.

चिमुटेभर : चिमूटभर
विभूते : विभूती राख अंगारा
चांग : चांगले
बीदी : रस्ता
द्विज : पक्षी; (२) ब्राह्मण
माघसितेतर : माघ महिन्याच्या कृष्ण पक्षात
पंचाक्षरी उपदेश : ओम् नम:शिवाय
अमराली/ळी : देवांचा समूह (अमर+आलि)
पटाक्षेपें : पडदा बाजूला सारून
वसा ऐकणे : बोलणे किंवा आवाज ऐकून

**श्रीगणेशविजय नाटक**

येत्यावरुन : येत असल्या वरुन.

माझा कनिष्ठ भाऊ परंतु फार दुष्ट. . .त्याचा वध मजला इष्टच

प्रासयुक्त : "ष्ट"कारांची गर्दी
सपदि : ताबडतोब
दावानल : वणवा
माईक : मायिक, मायावी
परिहास : विनोद, चेष्टा
रावा : पोपट
सवे : सवय; (२) समवेत
प्रासयुक्त : दुशाल देऊन खुशाल करीन
पल्याण : पालाण; खोगीर
द्विजिव्ह : नाग
येवनिका : जवनिका, पडदा.

## शिवाजीकृत नटेशविलास नाटक

वंदू भवत्पदयोग गुरुराम सेतू (अज्ञानतमस्तोमनिवारणी वासरमणी गुरु) गणेशोत्सवासाठी नाटक.

चंद्रमौलीश्वर : कुलदेवता.
दौवारिक गणरास : नाचत गात
पखी : पाहा
गणपती आगमन : "तककतधिंग" —नाचत येतो.
वंशावळ : शरभेंद्रपुत्र शिवाजी

आर्येत नीलकंठ नरेश म्हटल्यामुळे आणिमासुंदरी ही शिक्काससुंदरीची दूतिका.

नंदिकेश्वर : यजमान व यजमानीण संतोषाने असणे तुला व मला लाभदायक. तेव्हा नारद मध्यस्ती करतील तर

नारदाचे आगमन.

नारद : तूं धनवन्त व गर्वीतरुण सोडून वनात हिंडतेस ?
माहिमा : म्हातारा झालास तरी परिहासाची व कलहाची चट सुटती नाही.
विटसेखर : "ततधिंगधिंग" नाचत. वेष

नटेशमोहिनीसह विदूषक.

नटेशाने डमरू वाजविताच ऋषिपत्नी येतात. संभ्रमाने दागिन्यांची उलटापालट. कंकण चरणी. (पहा कालिदासकृत "इन्दुमतिस्वयंवर" रघुवंश).

१०. ऋषिपत्न्यांची वागणूक. स्त्री स्वभाव.

ढालगजा : भांडकुदळ स्त्री

वृक्षांतरित नरेश स्त्रियांसह. यज्ञशाळेत.

नारदाने कळवल्यावरुन ऋषी येतात.

मोहिनीला पाहुन मोह पावतात. मोहिनीवर्णन.

वृद्ध ऋषी. मंत्राने वाघ निर्मितात.

नटेश वाघ मारुन व्याघ्रांबर परिधान. ऋषी रागाने साप निर्मितात.

नटेश सापाचे कंकण करतो. मग अपस्मार राक्षस. मंत्रगणांवर नाचतो.

**आनंदतांडव**

१३. "उन्हात गेल्या सावलीचे सुख अधिकसे वाटते"
शिवकामसुंदरीचे स्मरण

प्रथम अंक समाप्त.

नटेश विलास

नटवरदास दौवारिक.

नटेश विदूषकासह : शिवकामसुंदरी वृक्षांतरित.

नटेशाची विरहावस्था.

कनकपद्य : विषसादेरा....

मन्मथाची, चंद्राची निंदा.

नटेश : कमल (कमलमुखी) इंदीवर (इंदीवराक्षी) प्रियवृक्ष, हंस (हंस भमनी) यांना विचारुन विरही नटेश शिवकामसुंदरीचा शोधण्याचा प्रयत्न करतो. कोकिल, गज, सिंह इत्यादींना विचारतो. (कालिदास–विक्रमो..)

गरिमा व विदूषक नटेश व शिवकामसुंदरीस नावे ठेवतात.

गरिमा : स्वस्त्री सुंदरी आणि सुमुखी असली तर्ही तिजहून परदारा विदरी ही बरीस भासते हा पुरुषाचा स्वभाव.

लाघिमा : लघिमा

दौवारीकीण : पद्मिनी येते.

शिवकामसुंदरी येते. विरहावस्था. व्याकुळ. गरिमा येते.

खुड्स—

गरिमा नटेशाला अनेक स्त्रिया भेटल्या त्यांचा वृत्तांत सांगते. शिवकामसुंदरी मूर्च्छित. शीतोपचार. सुंदरीचे प्रातःकालीन स्वप्न. बुडबुडू वाद्य वाजवीत पिंगळा येतो. शकून सांगतो. केकाडीण येते. सूपभर मोत्ये केकाडणीस. ती कोल्ह्याचे शिंग वशीकरणासाठी देते.

जुडविला/जुळविणे

जोशी येतो. "सवती होतील त्या तुझ्याच बटकी.

नटेश विदूषकासह येतो. व्याकूळ. दौवारिकिण पद्मिनी—कां येथे आलासी. काकुलती दाखविसी. जाई तूं परदारापाशी माया तुज कळली मजसी. (शिवकामसुंदरीच्या सांगण्यावरुन)

२४. श्लेषवक्रोक्ती—तू गा कोण....

नटेश पद्मिनीला न मानता शिवकामसुंदरीकडे येतो. दोघे एकांत. गणपती, सुब्रह्मण्य, ब्रम्हादिदेव येतात. सर्व ऋषि, ऋषिपत्न्या. सर्वांना वाद्ये वाजविण्यास सांगतो. त्या वाद्य मेळाबरोबर आनंदतांडव करतो. नंतर टिपऱ्यांचा खेळ. गुणवेणिका रचतो.

मीनाक्षी (परिणय) कल्याण

वाचस्पती : बृहस्पती.

भूसर : भूदेव, ब्राम्हण.

आपल्या डोळ्यात मुसळ लोंबत असता, पराव्या डोळ्यात कुसळ आहे हे सांगणे.

| | | |
|---|---|---|
| मुकुर | : | आरसा |
| शिराणी | : | आवड |
| हूप | : | हुरूप (उदा. "हूप धरुनि वरी तिजला") दमयंती - स्वयंवर—६.७१ |
| भट | : | योद्धे |
| कीरवाणी | : | पोपटासारखी गोड बोलणारी |
| निजारामवाटिका | : | निज+आराम+वाटिका=आपल्या विश्वात उपवन. |

## संदर्भ सूची

(१) लोकनाटयाची परंपरा.—विनायक कृष्णा जोशी, श्रीलेखन वाचन भांडार, लक्ष्मी रस्ता, पुणे-२.

(२) नाटयकला प्रवेश.—अ. म. जोशी, व्हीनस प्रकाशन, पुणे.

(३) नाटयविमर्श.—के. नारायण काळे, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई-७.

(४) तंजावरचे मराठे राजे.—विनायक सदाशिव वाकसकर, श्रीसयाजी साहित्य माला प्रकाशन, दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई-१९३३.

(५) तंजावरचे राजघराणे.—दत्तात्रय बळवंत पारसनीस, संप. "इतिहास संग्रह". तुकाराम जावजी यांनी "निर्णयसागर" छापखान्यात छापून प्रसिद्ध केले १९१२.

(६) मराठी रंगभूमीचा इतिहास.—(खंड पहिला : १८४३–१८७९.) लेखक : श्रीनिवास नारायण बनहट्टी, व्हीनस प्रकाशन, पुणे, आवृत्ति १ ली १९५७.

(७) यक्षगान.—(हिंदी) लेखक : शिवराम कारंत, अनु. बी. बी. कारंत, राधाकृष्ण प्रकाशन, २ अन्सारी रोड, दिल्ली–६, १९७३.

(8) The Karnatak Theatre — Dr. H. K. Rangnath, Karnatak University, Dharwar, 1960.

(9) The Indian Stage .. Nemendra Nath Dasgupta, Culcutta.

(10) Drama in Rural India. — J. C. Mathur (1963), Asia Publishing House, Bombay.

(11) Indian Drama .. Publications Division, Ministry of Information & Broadcasting, Government of India, New Delhi.

(12) The Producer and the Play. — Normen Marshall, Macdonald; London.

(13) An Introduction to the Theatre. — Frank M. Whiting.

(14) The Permorming Arts — Harper & Brothers Publishers, New York, 196.

(15) Problems and Prospects — Rockfeller Brothers, New York.

(16) The Indian Classical Dance. — Kapila Vatsyayan, Director, Publications Division, Government of India, Patiala House, New Delhi-110 001. Dec. 1974.

(17) The Dance in India .. Faubion Bowers, New York 1953.

(18) Dance of India .. Projesh Banerji Kitabistan, Allahabad, 1943.

(19) The Other Mind .. (A study of Dance in South India) Beryl De Zecte.

(20) The spiritual Heritage of Tyagaraja. C. Ramanuyachari, With introductory thesis by Dr. V. Raghava— Shri Ramkrishna Mission, Students Home, Mylapore, Madras-4.

(21) Bhagvata Mela Natak. Dr. V. Raghavan,
(1) Journal of the Indian Society of Oriental Art, Culcutta, Vol. V. 1937-pp. 167-170.
(2) Madras Music Academy Vol. XVII

(22) The last days of Bishop Heber. Thomas Robinson, A. M. Archdeacon Madras, Madras-1829.

(23) The Sanskrit Drama .. Keith A. B., Oxford University Press, 1923.

(24) History of Sanskrit Literature. LWinterneiz, Vol. II

(25) The Dance in India .. Enakshi Bhavanani, D. B. Taraporvala Sons & Co., Private Ltd. 210, Dr. D. Naoroji Road, Bombay-1.

(26) Ragnidhi .. A comparative study of Hindustani and Karnatak Ragas. (Vol. 1 to 4).

(27) Dr. Seetha's treatise .. Published by the Music Academy, Madras 115 E Mowbray's Road, Madras-14.

(28) Pallaki Seva Prabandhan. Telgu Opera of Shahaji Maharajah Ed. P. Samamoorthy.
The Indian Music Publishing Hourse, 4, Bunder Street, Madras-1.

(29) The Dramas and Dramatic Dance. William Ridgeway, Cambridge University Press, 1915.

Yakshagana .. Dr. V. Raghavan, Triveni 1931 No. -7-2; pp. 199 & 200.


